श्रीः

कविवर्य

# मोरोपंतांचे समग्र ग्रंथ.

## ३

# आर्याभारत.

पर्वें

कर्ण-शल्य-गदा-सौप्तिक-ऐषीक-स्त्री-शांति-अनुशासन
अश्वमेध-आश्रमवासिक-मौसल-महाप्रस्थानिक-स्वर्गारोहण


संपादक व प्रकाशक

रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर.

मुद्रक

अच्युत चिंतामण भट.

'यशवंत'

छापखाना पुणे.

---

सन १९१२.

हे पुस्तक रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर यांनी अच्युत चिंतामण भट यांच्या

'**यशवंत**' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केले.

# विषयानुक्रमणिका.

## ८. कर्णपर्व.

( पद्यसंख्या २५६१ )

**अध्याय ३६ वा: ( पृ० १५१ ):**—अश्वत्थामाधृष्टद्युम्नयुद्ध:-रणभूमि दाखवीत दाखवीत कृष्णाचे अर्जुनाशी भाषण (१-८ ); कर्णाचे धृष्टद्युम्न व सात्यकी यांशी युद्ध ( ९-१४ ); अश्वत्थाम्याचे धृष्टद्युम्नाशी भाषण ( १५-२० ); धृष्टद्युम्नाचे उत्तर ( २४-२५ ); अश्वत्थामा व धृष्टद्युम्न यांचे युद्ध ( २६-३६ ); कृष्णाच्या सूचनेवरून अर्जुन अश्वत्थाम्याचें निवारण करितो (३७-४९).

**अध्याय ३७ वा: ( पृ० १५६ ):**—संसप्तकाकडे जाताना कृष्ण अर्जुनास दूर चाललेल्या युद्धांचे वर्णन करून सांगतो ( १-३८ ):-कर्ण धर्मास विमुख करितो ( १-२६ ); भीमाचा पराक्रम ( २७-३८ ).

**अध्याय ३८ वा: ( पृ० १६० ):**—परस्परांचा युद्ध ( १-१९ ); भीमाच्या पराक्रम ( २०-२८ ); कर्णाचा पराक्रम व सहदेवाचे शौर्य ( २९-३५); -कर्ण धर्माचा पराभव करितो ( ३६-५९ ): धर्माला सोडून अर्जुनाशी युद्ध करण्याची व भीमापासून दुर्योधनाला सोडविण्याची शल्याची कर्णास सूचना ( ६०-७४ ); कर्ण दुर्योधनरक्षणार्थ जातो ( ७५-७७ ).

**अध्याय ३९ वा: ( पृ० १६७ ):**—धर्माचा पराभवखिन्नता ( १-६ ); त्याच्या आज्ञेवरून माद्रेय भीमसाहाय्यास जातात ( ७-९ ): अर्जुन अश्वत्थाम्याचा पराभव करितो ( १०-३० ): कर्णाचा भार्गवास्त्रप्रयोग व अद्भुत प्रभाव ( ३१-३६ ); अर्जुनाची चिंता ( ३७-४१ ), कृष्णाच्या सूचनेवरून अर्जुन धर्माला आश्वासण्यास जातो–जाताना कृष्णाशी भाषण ( ४२-४८ ); भीमार्जुनसंवाद —कौरवांचा समाचार घेण्याचे आपल्या आगावर घेणाऱ्या भीमाच्या आग्रहावरून कृष्णार्जुन धर्मास भेटतात (४९-६३).

**अध्याय ४० वा: (पृ० १७३):**—धर्मार्जुनसंवाद:-' कर्णास मारिले ' अशा भ्रांतीनें धर्म कृष्णार्जुनांची स्तुति करितो व वधाची हकीकत विचारतो ( १-३१ ); कर्णास टाकून अगोदर तुझें कुशल जाणण्यासाठी इकडे आलो असे अर्जुन सांगतो–आज कर्णास मारण्याची प्रतिज्ञा ( ३२-३४ ); क्रुद्ध धर्म अर्जुनाचा उपहास करून, त्यास ' गांडीव दुसऱ्यास दे ' असे सांगतो (३५-५५); अर्जुनजन्माचे वेळची आकाशवाणी (५६-७७).

**अध्याय ४१ वा: ( पृ० १८० ):**—अर्जुनाने तरवारीला हात घातलेला पाहून कृष्ण त्यास सावध करितो ( १-८ ); गांडीवत्याग करण्यास सांगणाऱ्यास

मारण्याचा आपली प्रतिज्ञा अर्जुन प्रकट करितो ( १–१४ ): ' धर्म गूढ आहे आणि धर्मवध हा अन्याय्य होय ' असे कृष्ण स्पष्ट सांगतात ( १५–४६ ). आंधळ्या प्राण्याच्या हि वधाने पुण्य च जोडणाऱ्या बलाकव्याधाची कथा ( ४७–६३ ) व सत्यव्रतपरिपालनार्थ चोरांना लपलेल्या धनिकाचा शोध सांगणाऱ्या कौशिकाची कथा ( ६४–७३ ) सांगून धर्माची व्याख्या करून ( ७४–८४ ) संदिग्ध प्रकरणी धर्माची सूक्ष्म गति कशी ओळखावी, असत्योक्ति प्रसंगी कशा तारतात इत्यादि उपदेश कृष्ण करतो. ( ८५–९८ ).

**अध्याय ४२ वा**: ( पृ० १८९ ):—अर्जुनकृत धर्मनिंदा व स्वस्तुतिः— स्वस्तुति—अर्जुन कृष्णाची स्तुति करून प्रतिज्ञारक्षण व धर्मरक्षण ही दोन्ही साधतील असा उपाय विचारतो ( १–११ ). कृष्ण 'अपमान म्हणजे वध च आहे' असें सांगून धर्मनिर्भर्त्सना करून प्रतिज्ञारक्षण करण्यास सांगतो ( १२–२४ ); द्यूत करून बांधवांना दुर्दशा प्राप्त करून देणाऱ्या तुला माझी निंदा करण्याचा अधिकार नाही, भीमाला एकवेळ आहे, असे अर्जुन धर्मास म्हणतो ( २५–४८ ). निंदारूप पापक्षालनार्थ अर्जुन वधोद्युक्त होतो व कृष्ण त्यास आत्मस्तुति हा च उत्तम वध आहे असे सांगतो ( ४९–६१ ); मग अर्जुन स्वस्तुति करितो ( ६२–७८ ); अर्जुन धर्माची क्षमा मागतो ( ७९–८३ ).

**अध्याय ४३ वा**: ( पृ० १९७ ):—धर्माचा उद्वेग ( १–८ ); कृष्ण धर्माचे पाय धरून त्याचे सांत्वन करतो ( ९–२१ ) धर्माचा गहिंवर ( २२–२८ ); कृष्णाच्या आज्ञेवरून अर्जुन धर्माच्या पायावर लोळतो ( २९–३५ ): धर्म कर्णवध करण्याविषयी विनवितो ( ३६–४० ); अर्जुनाची कर्णवधप्रतिज्ञा ( ४१–४३ ): कृष्णाची शुभेच्छा ( ४४–४६ ): धर्मकृष्णाच्या सांगण्यावरून अर्जुन धर्मास आलिंगन देऊन बोलतो ( ४७–५४ ): दारुकाने आणिलेल्या रथात कृष्णार्जुन चढतात व प्रतिज्ञासिद्ध्यर्थ चिंता वहाणाऱ्या अर्जुनास कृष्ण धीर देतो ( ५५–६२ ); भीमाचा पराक्रम—सारथि विशोकाशी भाषण—धर्माविषयी चिंता व शस्त्रास्त्रपृच्छा ( ६३–७५ ); विशोक शस्त्रसंग्रह वर्णितो ( ७६–८० ): भीमाचें विशोकाशी भाषण ( ८१–८६ ); अर्जुन आल्याबद्दलची भीमाची शंका बरोबर आहे असे बोलून, विशोक कृष्णवर्णन करितो ( ८७–९३ ): भीम विशोकास इनाम देतो ( ९४ ).

**अध्याय ४४ वा**: ( पृ० २०५ ):—अर्जुन भीमाकडे येतो—भीम शकु-

र्नाचा पराभव करितो ( १–९ ): कर्णानें भीमास पळविलेलें पाहून, अर्जुन कृष्णास बोलतो ( १०–१९ ); अर्जुनवधाला हा समय योग्य आहे असें शल्य कर्णास सुचवितो ( २०–२७ ); कर्ण हि आनंदित होत्साता उत्तर देतो ( २८–३६ ); भीमार्जुन कौरवसैन्यक्षय करितात ( ३७–५३ ); कर्णाचें शौर्य व पांचाल्यदांचें मथन ( ५४–६३ ); अर्जुन तिकडे निघतो ( ६४–६५ ).

**अध्याय ४५ वा: ( पृ० २११ ):**—भीम दुःशासनास मारून त्याचें रक्त पितो ( १–१३ ); त्याचें शिर कापून पुनः रक्त पितो ( १४–२२ ); रक्तप्राशनसमयीं भाषण ( २३–२९ ); कृष्णार्जुनांस भेटून आणखी दहा धार्तराष्ट्र मारतो ( ३०–३२ ); कर्णभय ( ३३ ); कर्णपुत्र वृषसेनाचा पराक्रम ( ३४–३९ ); अर्जुनाचें कर्णास पुत्ररक्षणार्थ आव्हान ( ४०–४४ ); वृषसेनवध ( ४५–४६ ); क्रुद्ध कर्णास पाहून कृष्णाचें अर्जुनाशीं भाषण ( ४७–५३ ). पार्थाचें उत्तर ( ५४–५८ ).

**अध्याय ४६ वा; ( पृ० २१७ ):**—कर्णार्जुन युद्धास सिद्ध होतात ( १–७ ); आपापल्या पुत्राच्या अभिमानामुळे इंद्रसूर्याचें भांडण व ब्रह्मदेवाचा निकाल ( ८–१६ ); एकमेकांची दृष्टादृष्ट ( १७–२१ ); कर्णशल्य व कृष्णार्जुन यांचा संवाद ( २२–२९ ); अर्जुनाचा पराक्रम ( ३०–३६ ). अश्वत्थामा दुर्योधनास साम करण्याचा उपदेश करतो ( ३७–५३ ); दुर्योधन सामाची अशक्यता प्रतिपादितो ( ५४–६६ ); युद्धास सुरवात ( ६७–७० ).

**अध्याय ४७ वा: ( पृ० २२३ )**—कर्णार्जुनाचें घोर युद्ध ( १–८० ):- अर्जुनाचें अग्न्यस्त्र कर्ण वारुणास्त्रानें शमवितो ( १–११ ); कृष्ण व भीम अर्जुनास उत्साहित करितात ( १२–१८ ): परस्परांचें घोर युद्ध—कर्णाचा सर्पबाणप्रयोग—अर्जुनाच्या किरीटाचें भस्म ( १९–८० ).

**अध्याय ४८ वा; ( पृ० २३१ ):**—अर्जुन तक्षकपुत्र अश्वसेनास मारतो ( १–१० ); मूर्च्छित कर्णाशीं युद्ध—कर्णाचा प्रताप—विषाद—कर्णाचें रथचक्र पृथ्वी गिळते ( ११–६१ ); कर्ण अर्जुनास थांबण्यास सांगतो ( ६२–७० ).

**अध्याय ४९ वा: ( पृ० २३९ ):**—कृष्ण कर्णास मागील प्रसंगांचा आठवण देऊन, त्या वेळीं ' तुझा धर्म कोठे गेला होता ? ' असें विचारतो ( १–१८ ); कर्णार्जुनांचें युद्ध ( पुढें चालू )—अर्जुनाची मूर्च्छा—कर्ण चाक वर काढण्याचा प्रयत्न करतो ( १९–३७ ); सावध झालेला अर्जुन अमोघ बाणानें कर्णाचा वध करितो

( ३८–५४ ); कौरवांचा हाहाकार–पांडवाचा जयघोष–दुर्योधनाचा शोक व क्रोध ( ५५–६३ ); परतलेल्या कौरवाना पांडव पिटाळतात ( ६४–७२ ); शल्यादिकांच्या आग्रहावरून व सूर्यास्तसमय आल्यामुळे दुर्योधन माघारा फिरतो ( ७३–८१).

**अध्याय ५० वा; ( पृ० २४६ ):**—कृष्णार्जुन परस्परांच्या अंगांतील बाण उपटतात–कृष्णाची अर्जुनस्तुति (१–१०); कृष्णार्जुन धर्माच्या भेटीला येतात (११–१६); कृष्ण धर्माचें अभिनंदन करितात (१७–२७); धर्म कृष्णाची स्तुति करितो ( २८–३७ ); कृष्णधर्मार्जुन कर्णाचे शव बघतात ( ३८–४६ ); मृत कर्णास उद्देशून कोमळवृत्ति धर्माचें भाषण ( ४७–५३ ); धर्म कृष्णप्रशंसा करतो (५४–६६); धर्मादि परतात–धृतराष्ट्राला हा वार्ता संजय सांगतो (६७–७०); पर्वाचा उपसंहार ( ७१–७५ ).

---

## ९. शल्यपर्व.

### ( पद्यसंख्या ३९१ ).

**अध्याय १ ला: ( पृ० २५५ ):**—संजय दुर्योधनाचे वधाची वार्ता सांगतो व त्यामुळें धृतराष्ट्रादिक शोकसागरांत मग्न होतात (१–९); धृतराष्ट्राचा विलाप (१०–२८); संजय सविस्तर कथा सांगतो:—कर्ण मेल्यावर कृपाचार्य दुर्योधनास सामाचा उपदेश करतात ( २९–३५ ); दुर्योधन सामाची असंभवनीयता व युद्धाची अवश्यकता प्रतिपादतो (३६–५८). कौरवांचा पुनरुत्साह–अश्वत्थाम्याचे सूचनेवरून दुर्योधन शल्यास सेनापति करतो (५९–६९); धर्माचें कृष्णाशी भाषण–शल्याची योग्यता वर्णन, कृष्ण धर्मास शल्यास मारण्याविषयीं सूचना देतो ( ७०–८१ ); कृष्णधर्म निजावयास जातात ( ८२–८३ ).

**अध्याय २ रा; ( पृ० २६३ ):**—संजयाचा प्रस्ताव ( १–५ ); शल्य-प्रमुख कौरव व धर्मप्रमुख पांडव यांचें तुंबळ युद्ध (६–७४ ):—अश्वत्थामा व अर्जुन यांचें युद्ध ( ५१–६० ); शल्य व धर्म यांचे युद्ध–धर्म शल्यास मारतो ( ७५–१०३ ); सात्यकी कृतवर्म्यास पळवितो–दुर्योधनादिकांशीं युद्ध ( १०४–११२ ).

**अध्याय ३ रा; ( पृ० २७४ ):**—उर्वरित सप्तशत कौरवीय रथि-जनांचा नाश ( १–११ ); कौरवाच्या पाठीस लागणारे विजयी पांडववीर व त्यांचे उद्गार ( १२–२२ ); भीमपराक्रम व दुर्योधनाचा स्वपक्षीयांस धीर (२३–३२);

सात्यकी शाल्वास मारतो ( ३३–३८ ); कृतवर्म्याचा पराभव ( ३९–४२ ); दुर्योधनाचे शौर्य ( ४३–४४ ); शकुनीचें युद्ध–धर्मावर हल्ला ( ४५–६४ ); अर्जुनाचें कृष्णाशीं भाषण ( ६५–८३ ); अर्जुनादि वीर उरलेल्या कौरवास पळवितात–कृतवर्मा, कृप व अश्वत्थामा हे तिघे हि सैन्यांतून जातात ( ८४–१०० ); संजयाचें युद्ध व पराभव ( १०१–१०७ ).

**अध्याय ४ था: ( पृ० २८४ ):**—भीम दुर्योधन व सुदर्श या दोघांशिवाय बाकीच्या धृतराष्ट्रपुत्रांस मारतो ( १–६ ). कृष्णाचें अर्जुनाशीं भाषण ( ७–१५ ); अर्जुनाचें उत्तर ( १६–२२ ); कौरवबळमथन व सहदेवकृत शकुनिवध ( २३–४२ ); दुर्योधनाचें पलायन व डोहांत दडी ( ४३–५३ ); संजयाची मुक्तता ( ५४–५८ ); संजयाशीं दुर्योधनाचें भाषण व निरोप ( ५९–६६ ); अश्वत्थाम्याचा शोक व पलायन ( ६७–७३ ); कौरवांची पळापळ–युयुत्सु व विदुर यांचा संवाद ( ७४–८८ ); या उपपर्वाचा उपसंहार ( ८९ ).

---

( शल्यपर्वांतर्गत ).

## १०. गदापर्व.

### ( पद्यसंख्या ६८० ).

**अध्याय १ ला: ( पृ० २९३ ):**—संजयकथन ( पुढे चालू ):—अश्वत्थामादि तिघांचें दुर्योधनास युद्धाविषयीं प्रोत्साहन ( १–७ ); दुर्योधनाची अनुमति व सोमकनाशाविषयींची अश्वत्थाम्याची प्रतिज्ञा ( ८–११ ); व्याध भीमाला ही वार्ता कळवितात–पांडव त्या डोहाकडे येतात–कृष्णधर्मसंवाद ( १२–२१ ); धर्म दुर्योधनास युद्धार्थ बोलावितो ( २२–२७ ); दुर्योधनधर्मसंवाद–दुर्योधन धर्मास पृथ्वी देतो ( २८–३८ ); धर्माचा नकार व जोरदार उत्तर ( ३९–४९ ); धृतराष्ट्राच्या प्रश्नावरून संजय, दुर्योधनानें धर्मास धर्मयुद्ध करण्याविषयीं केलेला इषारा वर्णितो ( ५०–६० ); पांचांतून एक जरी मारशील तरी सर्व राज्य तुला देऊं, असा धर्माचा वर ( ६१–६४ ); गदायुद्ध करण्याचे जाहिर करून बाहेर आलेला व पांचाळांनीं केलेल्या उपहासामुळें क्रुद्ध झालेला दुर्योधन ‘ एकएकटे लढण्यास या ’ असे धर्मास म्हणतो ( ६५–७३ ); धर्म उत्तरांत असहाय अभिमन्यूच्या वधाची आठवण देतो ( ७४–८० ); दुर्योधन

युद्धास तयार होतो ( ८१–८४ ); धर्माच्या भोळेपणाची कृष्ण निंदा करतो ( ८५–९७ ); भीम पुढें सरसावतो (९८–१०२); कृष्ण, धर्म व सात्यकि भीमाचें अभिनंदन करितात (१०३–११४); भीमाचें भाषण–कृष्ण त्यास उत्साहित करतो ( ११५–१२२ ); धर्माची आज्ञा घेऊन युद्धार्थ उभा राहिलेल्या दुर्योधनावर भीम चालून जातो ( १२३–१२६ ).

**अध्याय २ राः (पृ० ३०५)**:—भीमाचें दुर्योधनाशीं भाषण (१–१०); दुर्योधनाचें उत्तर ( ११–२० ); बळरामाचें आगमन व सत्कार ( २१–२८ ); बळरामाच्या सूचनेवरून समंतपंचकक्षेत्रीं गदायुद्धाचा प्रसंग घडवितात (२९–३३).

**अध्याय ३ रा; (पृ० ३०८)**:—भीमास आव्हान–भीमदुर्योधनाचें वाग्युद्ध (१–११); दोघाचें अतुल गदायुद्ध–दुर्योधनाची मूर्छा (१२–२४); भीमाची मूर्छा व पांडवशोक ( २५–२९ ); अर्जुनाचा प्रश्न–कृष्णाचें उत्तर–कृष्ण अर्जुनास भीमाला सूचना करण्यास सांगतो ( ३०–३८ ); भीम दुर्योधनाचा ऊरुभंग करून त्यास पाडतो (३९–४५).

**अध्याय ४ था; (पृ० ३१२)**:—पांडवांचा हर्ष–भीम दुर्योधनास वाक्प्रहार करून त्याचें शीर तुडवितो (१–११); धर्म भीमास निवारतो (१२–१६); धर्म दुर्योधनाचें सांत्वन करून विलाप करतो ( १७–२२ ).

**अध्याय ५ वा; (पृ० ३१४)**:—बळरामाच्या वर्तनाबद्दल धृतराष्ट्राचा प्रश्न ( १–३ ); बळरामाचा भीमावर कोप (४–७ ); कृष्ण बळरामास निवारतो ( ८–१४ ); भीमास शाप व दुर्योधनास वर देऊन बळराम द्वारकेस जातात ( १५–१७ ); भीमाच्या अधर्माबद्दल धर्म व कृष्ण यांचा संवाद (१८–२३) भीमाचें धर्माशीं भाषण (२४–२९); धर्म भीमाची प्रशंसा करितो (३०–३२ ).

**अध्याय ६ वा; ( पृ० ३१७ )**:—संजय धृतराष्ट्रास पांडवपांचालकृत दुर्योधनधिक्कारांचें वर्णन करून सांगतो ( १–८ ); दुर्योधनाची कृष्णास कोपोक्ति (९–२२ ); कृष्ण दुर्योधनास च दोष देतो (२३–३४ ); दुर्योधन " आतां कर्तव्य राहिलें काय ? " असें म्हणून स्वतःचें निर्दोषत्व स्थापन करितो (३५–४१ ); देवांची दुर्योधनावर पुष्पवृष्टि–पांडवांची लज्जा (४२–४७); "मी च अधर्मानें त्यास मारिलें " असें कृष्ण सर्वांस सांगून शिबिरास परतण्याची आज्ञा करितो (४८–५९).

**अध्याय ७ वा; ( पृ० ३२३ )**:—पांडव दुर्योधनाच्या शिबिरांत शिर-

तात ( १–३ ); कृष्णार्जुन रथावरून उतरल्याबरोबर रथ भस्म होतो–कृष्णाचे भाषण (४–११ ); कृष्ण धर्माचें अभिनंदन करितो ( १२–१४ ); धर्माचा गहिंवर ( १५–२० ); शिबिरांतील भांडागार ( २१–२५ ); कृष्ण सर्वांस शिबिराबाहेर राहण्यास सांगतो–सात्यकि, पांडव व कृष्ण बाहेर येतात ( २६–२७ ).

**अध्याय ८ वा:** ( पृ० ३२५ ):—गांधारीच्या कोपाला भिणारा धर्म कृष्णास धृतराष्ट्राकडे पाठवितो ( १–८ ). कृष्ण हस्तिनापुरीं येऊन धृतराष्ट्रगांधारींचें सांत्वन करितो ( ९–१४ ); " सर्व किल्बिष विसर " असें कृष्ण धृतराष्ट्रास विनवितो ( १५–२४ ); गांधारीस बोधून तिचे हि सांत्वन करितो ( २५–३६ ); धृतराष्ट्रगांधारींचे सांत्वन करून कृष्ण परततो ( ३७–४१ ); व्यासाचा धृतराष्ट्रास बोध (४२).

**अध्याय ९ वा:** ( पृ० ३२९ ):—संजय धृतराष्ट्राच्या प्रश्नावरून भग्नोरु दुर्योधनाचे विलापनिरोप वर्णितो ( १–२४ ); अश्वत्थाम्यास ही वार्ता कळते (२५–२७).

**अध्याय १० वा:** (पृ० ३३२ ):—शोकाकुल अश्वत्थामादि दुर्योधनाकडे येतात ( १–७ ); अश्वत्थाम्याचा विलाप ( ८–१३ ); दुर्योधन त्याचे सांत्वन करितो ( १४–२४ ); अश्वत्थामा पांचालक्षय करण्यास आज्ञा मागतो ( २५–३० ); अश्वत्थाम्याला सेनापत्याभिषेक करण्याकरितां दुर्योधन कृपाचार्याकडून जलकलश आणवितो ( ३१–३५ ). अभिषिक्त अश्वत्थामा जातो ( ३६–३८ ); उपसंहार ( ३९–४० ).

---

## १०. सौप्तिकपर्व.

### ( पद्यसंख्या १०२ ).

**अध्याय १ ला;** ( पृ० ३३६ ):—कृपकृतवर्मा शिबिराहून पळून अरण्यांत जाऊन निजतात ( १–४ ); जागृत अश्वत्थामा कावळ्यांना मारणाऱ्या घुबडापासून बोध घेतो ( ५–६ ); कृपाचार्यांचे न ऐकतां, द्रौणि रात्रीं च सुप्तपांचाळनाश करण्यास सिद्ध होतो ( ७–२० ); शिबिरद्वाररक्षक मायावी शंकराशीं द्रौणीचे युद्ध ( २१–२९ ); हताश द्रौणि ' शिरकमळ वाहून शिवाराधन करीन, ' असें म्हणतो ( ३०–३४ ); प्रभुमायानिर्मित कांचनवेदीत स्वप्राणाहुति देणाऱ्या अश्वत्थाम्यास शिव प्रसन्न होऊन पांचाळक्षयार्थ उग्र खड्ग देतात ( ३५–४७ ); ते खड्ग घेऊन द्रौणि शिबिराकडे जातो ( ४८–५० ).

**अध्याय २ रा: ( पृ० ३४१ ):**—कृपकृतवर्म्यांस द्वाररक्षणार्थ ठेवून अश्वत्थामा धृतराष्ट्रांच्या शिबिरांत जातो ( १–४ ); सुप्तोत्थित किंवा जागे केलेल्या धृष्टद्युम्नास अश्वत्थामा बुकलून मारतो ( ५–१२ ); स्त्रियांचा विलाप–सैन्याचा नाश ( १३–१९ ): उत्तमौजा, युधामन्यु, शिखंडी, प्रतिविंध्य इत्यादिकांस मारून अश्वत्थामा कृपास भेटतो ( २०–३२ ); दुर्योधनाकडे येऊन अश्वत्थामा त्यास वार्ता कळवितो (३३–४३); दुर्योधनाचा आनंद व शेवटचें भाषण (४४–४८); दुर्योधनाचा अंत (४९–५०); संजयाच्या दिव्यदृष्टीचा नाश (५१); धृतराष्ट्राचा शोक (५२).

---

( गदापर्वांतर्गत. )

## १०. ऐषीकपर्व.

( पद्यसंख्या १६४ ).

**अध्याय १ ला; ( पृ० ३४६ ):**—धृष्टद्युम्नाचा सारथि धर्मास सर्व वधवृत्त कळवितो ( १–४ ); धर्माचा विलाप ( ५–१० ); धर्माज्ञेवरून नकुळ द्रौपदीस घेऊन वधस्थानीं येतो ( ११–१५ ); तिचा शोक–अश्वत्थाम्याच्या वधाबद्दल हट्ट व प्रायोपवेश ( १६–२३ ); धर्म तिचें सांत्वन करितो–अश्वत्थाम्याच्या शिरावरील मणि आणल्यास द्रौपदी आपलें समाधान होईल असें सांगते ( २४–२७ ); द्रौपदीच्या प्रार्थनेवरून भीम रथारूढ होऊन निघतो ( २८–३३ ); कृष्ण धर्मास अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रादिप्राप्तीचा इतिहास ( ३४–७३ ) सांगून, भीमरक्षणार्थ जाण्यास सांगतो ( ७३–७६ ):—अश्वत्थाम्याची ब्रह्मास्त्रप्राप्ति ( ३४–४५ ); अश्वत्थामा कृष्णाजवळ सुदर्शन मागतो– त्याला तें उचलतां येत नाहीं ( ४६–५८ ); कृष्ण अश्वत्थाम्यास चक्र मागण्याचें कारण विचारतात ( ५९–७० ); अश्वत्थामा कृष्णविजयस्वकपटहेतु स्पष्ट करतो ( ७१–७६ ).

**अध्याय २ रा; ( पृ० ३५३ ):**—कृष्णार्जुन भीमास गाठतात ( १–३ ); त्यांस पाहून घाबरलेला अश्वत्थामा ‘ अपांडवाय ’ ब्रह्मास्त्र सोडतो ( ४–११ ); कृष्णाज्ञेवरून अर्जुन ही उलट ब्रह्मास्त्र सोडतो ( १२–१६ ); अस्त्रांचा धडाका–नारदव्यासांची मध्यस्ती– अर्जुन व्यासाज्ञेवरून आपलें अस्त्र आवरतो ( १७–२८ ); अश्वत्थाम्याचा पश्चात्ताप व अस्त्रोपशमाची अशक्यता ( २९–३२ ); व्यास त्यास

अस्त्र आवरून पांडवांस मणि देण्यास सांगतात (३३–३७): अश्वत्थामा मणि देण्यास कबूल होतो, पण अस्त्र पांडवांच्या गर्भांत पडेल असें सांगतो ( ३८–४३ ): व्यास तें कबूल करतात (४४–४५).

**अध्याय ३ रा; ( पृ० ३५८ ):—**'ब्रह्मास्त्रानें उत्तरागर्भाचा नाश मी होऊं देणार नाहीं' असें सांगून, कृष्ण अश्वत्थाम्यास शाप देतात ( १–१४ ); शाप खोटा करण्याकरितां अश्वत्थामा वनांत जातो (१५–१७); भीम द्रौपदीस मणि दाखवून तिचें सांत्वन करतो ( १८–२७ ); संतुष्ट द्रौपदीच्या सांगण्यावरून धर्म तो मणि स्वशिरीं बांधितो ( २८–३१ ): ' अश्वत्थामा धृष्टद्युम्नादिकांचा घात कसा करूं शकला ' असा धर्माचा प्रश्न ( ३२–३७ ); ' हे शिवकृपेचें फल असावें ' असें कृष्णाचें उत्तर ( ३८–४२ ); उपसंहार ( ४३ ).

---

## ११. स्त्रीपर्व.

## ( पद्यसंख्या ३६० ).

**अध्याय १ ला; ( पृ० ३६३ ):—**संजय धृतराष्ट्रास पुत्रवधवृत्त कळवितो (१–२ ); त्यास विदुराचा उपदेश ( ३–६): धृतराष्ट्राचा शोक–राजस्त्रियादिकांसह नगराबाहेर प्रयाण–कृपादिकांची भेट ( ७–१३ ): कृप गांधारीस दुर्योधननाश व अश्वत्थामाकृत पांडवपुत्रनाश इत्यादि सांगतो (१४–२१); कृप पळतो–अश्वत्थामा सांपडतो ( २२–२३ ).

**अध्याय २ रा; (पृ० ३६५ )—**पांडव धृतराष्ट्राचे भेटीस येतात (१–४); कुरुस्त्रियांचे विलापप्रलाप (५–११ ); धर्मधृतराष्ट्राची भेट (१२–१४ ); धृतराष्ट्र लोखंडी भीमाचें चूर्ण करतो–धृतराष्ट्राचा खोटा शोक ( १५–२९ ); त्याशीं कृष्णाचें भाषण ( ३०–४८ ); धृतराष्ट्राचें पश्चात्तापोत्तर व भीमप्रमुखांस भेटणें ( ४९–५६); गांधारीची भेट–तिचा शाप देण्याची इच्छा–व्यासागमन ( ५७–६० ).

**अध्याय ३ रा; ( पृ० ३७१ ):—**व्यासाचा गांधारीस बोध ( १–६ ); गांधारीचें भाषण ( ७–१६ ); भीमाचे गांधारीस उत्तर (१७–३० ); गांधारीचा पुन्हां प्रश्न ( ३१–३४ ); भीमाचें उत्तर ( ३५–४३ ); गांधारीचें पुनरुत्तर (४४–४७); धर्म गांधारीपुढें लीन होतो ( ४८–५३); गांधारीच्या दृष्टिपातानें धर्माचीं नखें काळीं पडतात व इतर पांडव भिऊन लपतात (५४–५७); गांधारी पांडवांना सांत्वून कुंतीकडे धाडते–कुंतीचा शोक ( ५८–६३ ); कृष्णेचा कुंतीसंनिध शोक–गांधारीकडे

आगमन ( ६४–६८ ); गांधारी द्रौपदीचें सांत्वन करिते ( ६९–७८ ).

**अध्याय ४ था** ( पृ० ३७९ ):—गांधारी दिव्यदृष्टीनें युद्धस्थान व तेथें स्वपतिशोधनार्थ आलेल्या स्त्रिया वगैरे पहाते (१–५); तिचे कृष्णाशीं भाषण (६–१२):—दुर्योधनाबद्दल शोक (१४–२७); दुःशासनार्थ शोक (२८–३४); विकर्णदुर्मुखादिकांविषयीं शोक (३५–३७); सौभद्राबद्दल शोक व उत्तरेचा विलाप (३८–५९); विराटशव व त्याचा स्त्रिया (६०–६२).

**अध्याय ५ वा**: (पृ० ३८५):—गांधारीचें कृष्णाशीं भाषण (पुढें चालू) (१–७०):–कर्णाचा मृत्यु (१–१६):–राधेचा शोक (५–९). वृषसेनेचा शोक (१०–१४); जयद्रथार्थ विलाप (१७–२५); शल्यार्थ शोक (२६–२८); भगदत्तार्थ शोक (२९); भीष्मार्थ विलाप (३०–३६); द्रोणार्थ विलाप (३७–४५); सोमदत्ताचा वध–तत्स्त्रीविलाप (४६–५०); भूरिश्रवस्त्रीविलाप (५१–५६); शकुनिनिंदा (५७–६२); मृत द्रुपद (६३–६४); गांधारीचा पश्चात्ताप (६५–७०).

**अध्याय ६ वा**: ( पृ० ३९२ ):—गांधारी कृष्णास शाप देते (१–८); कृष्णोत्तर (९–११); पांडवभय (१२–१३); कृष्णाचें उत्तर (१४–२२); गांधारीचा विषाद (२३–२४); धर्मधृतराष्ट्रसंवाद व मृतांस अग्निसंस्कार (२५–४५); कुंती कर्णजन्मवृत्त सांगते (४६–५२); धर्माचा कर्णार्थ शोक (५३–६४); कर्णसंतर्पण करून शोकग्रस्त धर्म गंगातीरींच बसतो (६५–६७).

## १२. शांतिपर्व.

### ( पद्यसंख्या ५०६ ).

**अध्याय १ ला**; ( पृ० ३९९ )—उत्तरकार्योत्तर व्यासनारदादींचें आगमन व नारदप्रश्न (१–४); धर्माचें शोकोत्तर व कर्णार्थ विलाप–कुंतीकर्णसंवाद कथन व कर्णशापकारणपृच्छा (५–२६).

**अध्याय २ रा**; ( पृ० ४०१ ):—नारद कर्णवृत्तांत सांगतात (१–७०):–देवसंकल्प–कर्णाची ब्रह्मास्त्रार्थ द्रोणप्रार्थना व निराशा (१–११); कर्णाचें भार्गवरामशिष्यत्व व विप्रशाप (१२–२२); ब्रह्मास्त्रप्राप्ति (२३–२४); परशुरामाची कर्णांकीं निद्रा व अलर्ककीटकृत कर्णोरुभेद–रामजागृति (२५–३०); कारणपृच्छा अलर्क उर्फ दंशासुराचें पूर्ववृत्त (३१–४१); कर्ण सत्य स्वजाति सांगतो–परशु-

रामाचा शाप व वर (४२–५३); चित्रांगदकन्याविवाह–कर्णविजय–जरासंधपराभव व कर्णसख्य (५४–६२); कुंडलहरणादि कर्णमरणकारणे व नारदबोध (६३–७०).

**अध्याय ३ रा; (पृ० ४०८):**—कुंतीकृत धर्मसान्त्वन (१–६); धर्मक्रोध व स्त्रियांस शाप (७–११); धर्मविषाद व अर्जुनाशी भाषण (१२–१६); अर्जुनोत्तर (१७–२२); धर्माचे पुनरुत्तर (२३–२८); भीमाचे भाषण–धर्मनिंदा व उपदेश (२९–४०); नकुळाचे भाषण (४१–४८); सहदेवोपदेश (४९–५८); द्रौपदीचा उपदेश (५९–८३) पार्थादीचा पुनर्बोध (८४–८७); धर्म व्यासांस सुद्युम्नकथा पुसतो (८८).

**अध्याय ४ था; (पृ० ४१६):**—व्यास सुद्युम्नकथा सांगतात (१–३०):–लिखितमुनि आपला भाऊ शंखमुनि याची फळे चोरून खातो (१–५); शंखाचे आज्ञेवरून लिखित शिक्षार्थ सुद्युम्नराजाकडे येतो (६–९); आग्रहाने शासन मागणाऱ्या लिखिताचे हात राजा सुद्युम्न कापवितो (१०–१६); लिखितास नवीन हात फुटतात (१७–२४); अपराधाची शिक्षा राजाकडून च झाली पाहिजे असे लिखितशंकेचे समाधान शंख करतो (२५–३०); अर्जुनाचे प्रार्थनेवरून कृष्ण धर्मास 'षोडशराजिक' आख्यान सांगून बोध करतो (३१–४९); व्यासांचा उपदेश (५०–५६); धर्म राजधर्म विचारतो–व्यास त्यास पूज्य भीष्माचार्यांस विचारण्यास सांगतात (५७–६५); कृष्णाचा धर्मास राज्यधारणार्थ उपदेश–त्याला धर्माची मान्यता (६६–६९).

**अध्याय ५ वा; (पृ० ४२३):**—धर्माचा नगरप्रवेश–पौरहर्ष (१–९); द्रौपदीचा सत्कार (१०–१४); धर्माचे दान (१५–१९); धर्मनिंदा करणाऱ्या कपटी चार्वाकाचा नाश (२०–३२); कृष्ण चार्वाकाचा पूर्वेतिहास सांगतो (३३–४०); धर्म सर्वांसह सभेंत विराजतो (४१–४६); धर्मास धृतराष्ट्रादीचा अभिषेक (४७–५८); हृष्ट ब्राह्मणांचे उद्गार (५९–६१); धर्म सर्वांस धृतराष्ट्राची आज्ञा मागण्यास सांगतो (६२–६८); विदुरसहदेवादिकांस निरनिराळे अधिकार (६९–७६).

**अध्याय ६ वा; (पृ० ४३०):**—तापहरणार्थ धर्माची कृष्णास विनवणी (१–८); कृष्णोत्तर व धर्महर्ष (९–१०); धर्म बंधूंचे गौरव करून त्यांना प्रासादादिक देतो (११–१८); ध्यानस्थ कृष्णास दर्शनोत्सुक धर्मराजा जागृत करतो (१९–२९); 'भक्तराज भीष्माकडे मनाने मी गेलो होतो; त्या ज्ञानदीपकापासून

तूं (ज्ञान-) प्रकाश संपादून घे ' असा कृष्णाचा धर्मास उपदेश (३०-४१); धर्माचा गाहिवर व तो कृष्णास च या कामी पुढें होण्यास प्रार्थितो (४२-४९); कृष्ण रथ सिद्ध करवितो (५०-५२).

**अध्याय ७ वा; ( पृ० ४३५ ):**—भीष्माभोवतीं व्यासादींचा मेळा (१-७); भीष्माचा 'कृष्णस्तवराज'-कृष्णाचा भीष्मावर प्रसाद (८-१५); अनुग्रह करून परत आलेल्या कृष्णास धर्म उठवितो-कृष्णाचें भीष्माकडे सपांडव प्रयाण ( १६-२२ ); भीष्मादिकांस नमन ( २३-२५ ); कृष्णाची भीष्मस्तुति व त्यास ज्ञातिविनाशमुग्ध धर्मास वर्णाश्रमज्ञानामृत पाजण्याची विनंति ( २६-४२ ); भीष्माची कृष्णस्तुति ( ४३-४५ ); कृष्णाचें शुभोत्तर ( ४६-५० ); भीष्माचा विनय व भाषणादिविषयीं निःशक्तताप्रतिपादन ( ५१-६४ ); कृष्ण भीष्मास सर्वव्याधिविनाशक वर देतात ( ६५-७२ ); सर्वांस आनंद-पुष्पवृष्टि-सूर्यास्तामुळें मुनींना वोळवून पांडव घरीं येऊन निजले ( ७३-८२ ); सकाळीं सकृष्ण पांडव व मुनी भीष्माकडे येतात ( ८३-९० ); धर्मानें पुढें केल्यावरून कृष्ण भीष्मास कुशल पुसतो ( ९१-९८ ); 'मी धर्मास उपदेश करण्यापेक्षां तुझ्याकडून च करविण्यांत अधिक गोडी आहे ' असें भीष्मप्रश्नास कृष्णाचें उत्तर ( ९९-१०७ ); भीष्म धर्मास च प्रश्न करावयास सांगतात ( १०८-१०९ ); 'ज्ञातिघातामुळें धर्म लाजतो' असें कृष्णोत्तर ( ११०-११२ ); भीष्म धर्मास अभय देऊन त्यावर अनुग्रह करून त्यास राजधर्मादिक सांगून संतोषवितात ( ११३-१२३ ); उपसंहार ( १२४ ).

---

## १३. अनुशासनपर्व.

## ( पद्यसंख्या ३६५ ).

**अध्याय १ ला; ( पृ० ४४८ ):**—भीष्माच्या प्रार्थनेवरून कृष्ण शिवमाहात्म्य सांगतात (**गीति** १-६); जांबवतीच्या पुत्रप्राप्तीच्छातृप्त्यर्थ कृष्णाचें हिमालयीं गमन-उपमन्युकृत कृष्णसत्कार ( ७-१४ ); उपमन्यु कृष्णास शिवाराधनेनें इच्छा सफल होईल असें सांगून ( १५-२० ); शंकराचें वरदानृत्त हिरण्यकशिपु, मंदर, अमसूया इत्यादिकांच्या कथांवरून वर्णितो ( २१-६३ ).

**अध्याय २ रा;** ( पृ० ४५४ ):—उपमन्यु स्वकथा सांगतो–माता उपमन्यूस दुधाऐवजीं पीठ कालवून देते (१–५); खऱ्या दुधाची चव कळल्यावर उपमन्यु पिष्टरस नाकारतो ( ६–१० ); माता त्यास शिवाराधन करण्यास सांगते ( ११–१४ ); उपमन्यूस शिवस्वरूपबोध ( १५–२६ ).

**अध्याय ३ रा;** ( पृ० ४५६ ):—उपमन्यूचें उग्र तप ( १–८ ); सत्वपरीक्षार्थ शिव इंद्रवेषानें थाटांत येऊन उपमन्यूस ' वर माग ' म्हणतात ( ९–१५); ' शंकरावांचून इतरांस मागणे नाहीं ' असा उपमन्यूचा रोकडा जबाब (१६–३०); इंद्राची शिवनिंदा ( ३१–३५ ); उपमन्यूचें सप्रमाण उत्तर (३६–५२); शिवस्वरूपदर्शन, नंदीवर्णन (५३–६० ); शिवस्वरूप ( ६१–६९ ); पिनाकादि शस्त्रास्त्रवर्णन ( ७०–७७ ); ब्रह्मदेव व ऋषी यांचा मेळा व शिवस्तव ( ७८–८५ ).

**अध्याय ४ था;** ( पृ० ४६६ ):—उपमन्यूचा शिवस्तव (१–२४); हर्षित देवांच्या विनंतीवरून संतुष्ट शंकर उपमन्यूस वर देण्यास तयार होतात (२५–३७); गहिवरून उपमन्यु शिवाची स्तुति करीत नाचतो व ' क्षीरोदन आणि तुमचें सान्निध्य द्या ' असा वर मागतो (३८–५०); प्रमुदित शंकर त्यास वर देतात (५१–६७); उपमन्यु स्वाश्रमाचें व तेथील सुखादिकांचें वर्णन कृष्णाजवळ करितो (६८–७७).

**अध्याय ५ वा;** ( पृ० ४७२ ):—कृष्णाचा उपमन्यूस प्रश्न ( १–५ ); शिवप्राप्त्यर्थ उपमन्यूचा कृष्णास ' सहस्रनाममन्त्रोपदेश (६–१७); कृष्णाचें षाण्मासिक तप व उमामहेश्वरदर्शन (१८–२७); तेव्हांचा अद्भुत देखावा (२८–४६); भक्तिप्रमुदित शंकराचा कृष्णकृत स्तव (४७–५८); कृष्णाशीं वरयाचनार्थ भाषण (५९–६३); कृष्णास आठ वर मिळतात (६४–६८); पार्वतीचें कृष्णाशी भाषण व त्यास तिजकडून वराष्टकप्राप्ति (६९-७९); हा वृत्तांत उपमन्यूस कृष्ण सांगतो(८०-८३).

**अध्याय ६ वा;** (पृ० ४८० ):—व्यासकृत शिवस्तवराजप्रशंसा ( १–५); कपिल (६–७), आलंबायन (८–१६), वाल्मीकि (१७–२२), परशुराम (२३–२८), विश्वामित्र (२९–३४), गृत्समद (३५), चाक्षुषपुत्र (३६–४२), कृष्ण (४३–५०), जैगीषव्य (५१), गर्ग (५२–५४), पराशर (५५–५७), मांडव्य [ शूलकथा ] (५८–६४) गालव [ व तत्पितृपुनर्जीवन ] (६५–८१), हे आपापल्या कथा सांगून शिवमाहात्म्य प्रस्थापितात (६–८१); कृष्णाचा पुनः शिवस्तव ( ८२–९२); कृष्णाची थोरवी (९३–९४).

**अध्याय ७ वा;** ( **पृ० ४८८** ):—भीष्माच्या सूचनेवरून धर्म श्रीकृष्णाला ब्राह्मणमाहात्म्य विचारितो (१–६); ब्राह्मणपूजन हें हीनत्वप्रद आहे, असें म्हणणाऱ्या प्रद्युम्नास कृष्ण ब्राह्मणांची थोरवी वर्णून सावध करितो (७–१८); कृष्ण त्यास दुर्वासकथा सांगतो (१९–१०५):—द्वारकेंत हिंडणाऱ्या दुर्वासास स्वगृहीं आणून (१९–२५), श्रीकृष्ण त्याची परोपरीनें रात्रंदिवस सेवा करितो–असंतुष्ट दुर्वासाचा जाच (२६–३७); उष्ण पायस दुर्वासास वाढून त्याच्या आज्ञेवरून कृष्ण अवशिष्ट खीर आंगास चोपडतात (३८–४५); कृष्णरुक्मिणीला रथास जोडून दुर्वास आपली मिरवणूक काढवितो–सुकुमार रुक्मिणीची दुर्दशा–पौरजनांचे दुःखोद्गार–कृष्ण लोकांस खुणावून शांत करितो (४६–५८); रुक्मिणी अडखळून पडते–कोपी दुर्वास रथांतून उडी टाकून पळतो (५९–६५); कृष्णप्रार्थनेमुळें प्रसन्न झालेल्या दुर्वासाचा कृष्णास वर (६६–८२); रुक्मिणीस वर (८३–८९); संतुष्ट दुर्वास गुप्त होतो (९०–९३); कृष्णाचें विप्रसेवाव्रत (९४–९५); दुर्वासवरसाफल्य (९६–१०५); ही च कथा कृष्ण धर्मास सांगतो (१०६); उपसंहार (**१०७**).

**अध्याय ८ वा;** ( **पृ० ४९८** ):—व्यासाच्या सांगण्यावरून भीष्म धर्मास परत जाण्यास अनुज्ञा देतात; मात्र उत्तरायण लागल्याबरोबर येण्यास सांगतात (१–८); युधिष्ठिर भीष्मादींस वंदून सपरिवार परततो (९–१४); दक्षिणायनातीं धर्म भीष्माकडे येतो (१५–२०); भीष्माशीं धर्माचें भाषण (२१–२६); भीष्माचें धर्मधृतराष्ट्रांशीं भाषण (२७–३३); भीष्म कृष्णाची निर्याणार्थ आज्ञा मागतात (३४–४१); कृष्णाची अनुमति (४२–४४); भीष्म विदुरप्रभृतींचा निरोप घेतात (४५–५०); भीष्माचे निर्याण (५१–५७); भीष्माच्या चितेस अभिसंस्कार (५८–६५); तर्पणविधि (६६–६९); गंगेचा विलाप (७०–८२); कृष्ण गंगेचें सांत्वन करितात (८३–९५); व्यासकृत सांत्वन (९६); गंगा परतते (९७–९८); उपसंहार (९९-**१००**).

---

## १४. अश्वमेधपर्व.

### ( पद्यसंख्या ६८४ ).

**अध्याय १ ला;** ( **पृ० ५०८** ):—धर्माचा शोक व कृष्णधृतराष्ट्रकृत सांत्वन (१–४); व्यास अश्वमेध करण्यास सांगतात (५); धर्म द्रव्याची अडचण

पुढें मांडतो ( ६–८ ); व्यास हिमालयांतून द्रव्य आणण्यास सुचवितात ( ९–१० ); धर्माच्या प्रश्नावरून व्यास त्यास मरुत्ताच्या यज्ञाची कथा सांगतात (११–१२७):—मरुत्त व इंद्र यांची स्पर्धा (१२–१५); " मरुत्ताच्या यज्ञांत ' स्रुवा ' धरणार नाही, " अशी प्रतिज्ञा (१६–१७) करून बृहस्पती त्यास धुडकावतो (१८–२०). नारद मरुत्तास त्याच्या हेतूच्या सिद्ध्यर्थ बृहस्पतीचा बंधु जो संवर्त त्यास प्रसन्न करून घेण्याची युक्ति सांगतात ( २१–३० ); त्याप्रमाणे संवर्ताची भेट होते (३१–४०); मरुत्त त्यास सर्व वृत्तांत कळवितो ( ४१–४६ ); संवर्त त्याचें म्हणणें कबूल करून (४७–५१) त्याजकडून हिमालयांतून सुवर्ण आणवितो ( ५२–५७); बृहस्पतीचा खेद–इंद्रानें प्रश्न केल्यावरून बृहस्पती त्यास सर्व जाणवितो ( ५८–६९ ): मरुत्तास इंद्राज्ञा कळविण्याकरितां आलेला अग्नि चोख जबाबामुळें परत फिरतो ( ७०–७९ ); इंद्रास हकीकत सांगतो ( ८० ): दुसरा निरोप–अग्नीची जाण्याची नाखुषी वै ब्रह्म-बलोत्कर्षविषयक इंद्राग्निसंवाद ( ८१–९२ ); इंद्राज्ञेवरून गंधर्वराज मरुत्ताकडे येऊन त्यास शेवटचा निरोप सांगतो–मरुत्ताचा दृढनिश्चय ( ९३–९९ ): क्रुद्ध इंद्राच्या वज्राचे संवर्तकृत निवारण ( १००–१०५ ); मरुत्तेच्छानुसार स्वसामर्थ्यानें संवर्त इंद्रादिकास यज्ञास आणतो ( १०६–११३ ): संवर्त, मरुत्त व इंद्र यांचीं भाषणें (११४–११९ ); सर्व देव मरुत्ताच्या यज्ञांत राबतात–यज्ञसमाप्ति (१२०–१२५); त्या वेळीं उरलेल्या सुवर्णराशी आणण्यास व्यास धर्मास सांगतात ( १२६–१२७ ).

**अध्याय २ रा; (पृ० ५२० ):**—स्थिरस्थावर व अर्जुनासह कृष्ण इंद्रप्रस्थीं रमतात (१–५): कृष्णार्जुनसंवाद (६–९); अनुगीताद्युपदेश (१०–११); धर्मादिकांची अनुज्ञा घेऊन कृष्ण द्वारकेस जातो ( १२–२३ ); उत्तंकाची भेट ( २४–२६ ): उत्तंकाचा कौरवपांडवविषयक प्रश्न (२७–३०); कृष्ण कौरवादिकांच्या नाशाचें वृत्त सांगतो (३१–३२); उत्तंकाचा कोप व कृष्णास शाप देण्याची इच्छा. (३३–३६); कृष्ण त्यास 'अध्यात्म' सांगून त्याचा कोप शमवितात ( ३७–४८ ): उत्तंकास विश्वरूपदर्शन ( ४९–५१ ); उत्तंकास वरदान (५६–६० ); जलदात्या मातंगास उत्तंक धिक्कारतो–मातंग गुप्त होतो–उत्तंकाचा विस्मय ( ६१–६७ ); कृष्ण मातंग म्हणजे इंद्र इ० सांगून वर देऊन त्यास संतुष्ट करतो (६८–८०); जनमेजयानें विचारल्यावरून वैशंपायन त्यास उत्तंक-कथा सांगतात ( ८१–१७८ ):—वृद्धत्वसूचक पांढरी जटा पाहून उत्तंक उद्विग्न होऊन रडतो (८१–८८); गृहस्थाश्रमाची इच्छा उत्पन्न झालेल्या उत्तंकास नवयौवन

व स्वकन्या देऊन गौतम तुष्टवितो (८९–९६); गुरुपत्नी अहल्या सौदासस्त्रीधृत-मणिकुंडलेरूप दक्षिणा मागते (९७–९९); उत्तंकाचें तदानयनार्थ गमन व गौतमाची चिंता (१००–१०३); राक्षस झालेल्या सौदासराजाचा व उत्तंकाचा संवाद–कुंडलें घ्यावी व स्वदेह भक्षणास द्यावा, असा उभयतांचा करार (१०४–११३); पत्ता विचारून उत्तंक सौदासस्त्रीकडे येतो (११४–११६); ती कुंडलांचें वर्णन करिते; परंतु देण्यापूर्वी सौदासाकडून 'खूण' आणण्यास सांगते (११७–१२४); 'खूण' सांगून कुंडलें घेऊन उत्तंक परत सौदासाकडे आला (१२५–१२७); ब्राह्मणांची महति वर्णून सौदास वचन पाळण्याचा इषारा उत्तंकास देतो (१२८–१३४); उत्तंकाचें आश्वासन (१३५–१३७); सौदासाच्या आग्रहावरून उत्तंक त्यास 'मी तुजकडे परत येऊं किंवा नको, असा प्रश्न करितो. व त्यास 'मित्रभावानें येऊं नको' असें उत्तर सौदास देतो (१३८–१४५); चुकून पृथ्वीस्पर्श झाल्याबरोबर नाग कुंडलांचें हरण करितो (१४६–१५२); दंडानें अठरा दिवस भूमि खणणाऱ्या उपवासी उत्तंकास इंद्राचें साहाय्य व त्याचा नागलोकीं प्रवेश (१५३–१६२); अश्वरूपी अग्नीची भेट व तत्साहाय्यानें वासुकीपासून कुंडलाची प्राप्ति (१६३–१७३); उत्तंक कुंडलें गुरुपत्नीस देतो–त्याची गुरुस्तुति, वंदन (१७४–१७७); उत्तंककथामाहात्म्य (१७८).

**अध्याय ३ रा; (पृ० ५३६):**—कृष्ण यादवांस भारतीय युद्धाची हकीकत वर्णितो–अभिमन्युवधाबद्दल सर्वांचा शोक (१–७); शोकचिंतादग्ध उत्तरा गर्भाची हेळसांड करते–तीस व्यासाचा उपदेश (८–१२); व्यासाज्ञेप्रमाणें पांडव सुवर्णादिक यज्ञसाधनें जमवितात–सयादव कृष्ण हस्तिनापुरास येतो (१३–२३); परीक्षितीचा जन्म व मरण (२४–२७); कुंतीचा शोक व कृष्णास प्रार्थना (२८–३६); सुभद्रेची विनवणी (३७–४३); सूतिकागृहांत आलेल्या कृष्णासमक्ष उत्तरेचा विलाप (४४–५८); मृतबालकास उद्देशून उत्तरेचा विलाप व मूर्छा (५९–६५); कृष्णाची प्रतिज्ञा व मृतबालकाचें पुनर्जीवन (६६–७७); सर्वांचा आनंद–बालकाचें नामकरण (७८–८३); मागाहून पांडवांचें आगमन (८४–८६); विदुरकृष्णव्यासादिकांच्या भेटी (८७–८९); व्यास यज्ञास जपण्याचें कबूल करितात (९०–९२); दीक्षाविषयक धर्मकृष्णसंवाद (९३–९८); धर्मास दीक्षा–अर्जुनासह अश्वमोचन–धर्माचा कारुण्य बाळगण्याविषयीं अर्जुनास उपदेश (९९–१०३).

**अध्याय ४ था; (पृ० ५४६):**—अश्वामागें दिग्विजयार्थ अर्जुनाचें

प्रयाण–धृतवर्माप्रमुख त्रिगर्त पराभव पावून शरण येतात (१–१४); भगदत्तपुत्राचा पराभव (१५–२०); सैंधववीरांचा पराभव (२१–२५); दुःशला सुरथाच्या मृत्यूचें वर्णन करून तत्पुत्रास ( म्हणजे जयद्रथाच्या नातवास ) अर्जुनाच्या पायावर घालते (२६–४१); बभ्रुवाहन बापास–अर्जुनास–सामोरा येतो, अर्जुन त्याचा धिक्कार करतो (४२–५०); उलूपी बभ्रूवाहनास युद्ध करण्यास सांगते (५१–५७); दोघांचे प्रखर युद्ध व मूर्च्छा (५८–७४); चित्रांगदेचें आगमन व उलूपीशीं शोकयुक्त भाषण ( ७५–८२ ); अर्जुनास उद्देशून तिचा शोक ( ८३–८५ ); उलूपीस पति उठविण्याबद्दल प्रार्थना–जागृत बभ्रुवाहनाचे प्रायोपवेशन ( ८६–९० ); संजीवन-मण्यायोगें उलूपी अर्जुनास जीवंत करविते ( ९१–९९ ); त्यायोगें आनंद ( १००–१०२); अर्जुनाचा चित्रांगदोलूपींस प्रश्न (१०३–१०७); भीष्मवधामुळें क्रुद्ध झालेल्या वसूनीं अर्जुनास 'नरकपात होवो' असा दिलेला शाप व आपण स्वपित्याच्या द्वारां वसूंकडून 'बभ्रूवाहन या शापांतून अर्जुनास तारील' असा मिळविलेला उःशाप, इत्यादि वृत्त उलूपी अर्जुनास कळविते ( १०८–१२४ ); अर्जुनाचा गहिंवर–यज्ञास आमंत्रण व निरोप ( १२५–१३२ ): अर्जुन राजगृहाहून ( १३३ ) द्वारकेस येऊन यादवास भेटून ( १३४–१३७ ) गांधारदेशीं आला–त्याची शकुनिपुत्रावर दया ( १३८–१४५ ).

**अध्याय ५ वा**: ( **पृ० ५६०** ):—हेरांकडून अर्जुनागमनवृत्त जाणणारा धर्म भीमास सर्व तयारी करण्यास सांगतो ( १–५ ); भीमाची तयारी–विप्र, नृप व बळराम यांचें आगमन व सत्कार ( ६–११ ): ब्राह्मणभोजन (१२–१३ ); दूतानी आणलेला अर्जुनाचा निरोप कृष्ण धर्मास कळवितो ( १४–२० ); कृष्णानें दाखविलेला अर्जुनाचा दोष ( २१–२५ ); अर्जुनाचें आगमन, सत्कार व भेट ( २६–३१ ); बभ्रूवाहन स्वमातांसह येतो–त्याचा सत्कार ( ३२–३७ ); व्यासांच्या नेतृत्वाखालीं यज्ञसाधन ( ३८–४९ ); व्यास धर्माची धन्यता वर्णितात ( ५०–५२ ); धर्मप्रमुख पांडव व्यासास पृथ्वीदान देतात ( ५३–६० ); त्या पृथ्वीत्यागाचा लोकांवर परिणाम ( ६१–६४ ); व्यास पृथ्वी परत देतात ( ६५–६८ ); धर्म विप्रादिकांकडून धन लुटवितो ( ६९–७६ ); लोकांची बोळवण–व्यास आपली दक्षिणा कुंतीस देतात–तिचे पुण्यव्रत ( ७७–८६ ).

**अध्याय ६ वा**; ( **पृ० ५६९** ):—एक नकुळ धर्मयज्ञाची निंदा करून

' सक्तुप्रस्थ.'ची स्तुति करितो-ब्राह्मण त्याचा निषेध करितात (१-५); स्वतःचे सक्तु देऊन अतिथीची तृप्ति करणाऱ्या कपोतवृत्ति ब्राह्मणाच्या सक्तूंच्या वासानें अर्धी काया सौवर्ण झालेला नकुळ, धर्मयज्ञांत सर्व देह सौवर्ण झाला नाहीं, तस्मात् तो निंद्य, असें प्रतिपादून गुप्त होतो (६-२६); जनमेजयानें विचारल्यावरून त्यास नकुळाची पुढील पूर्वकथा सांगण्यांत येते (२७-४३):—श्राद्धाकरितां होमधेनूचें काढलेलें दुग्ध धर्म कोपरूपानें प्याला तरी मुनि रागावत नाहीं (२८-३१); तें पाहून कोप त्यास वश होतो (३२-३६); जमदग्नी त्यास पितरांची क्षमा मागण्यास सांगतो (३७-३९); ' धर्मनिंदा करशील तेव्हां मुक्ति ' असें पितरांचे वचन-त्याप्रमाणें करून नकुळ मुक्त होतो (४०-४३); उपसंहार (४४-४५).

---

# १५. आश्रमवासिकपर्व.

## ( पद्यसंख्या ५०७ ).

**अध्याय १ ला**; ( **पृ० ५७५** ):—धृतराष्ट्राच्या नांवाखालीं धर्म राज्य करतो (१-४); गांधारीची शुश्रूषा (५-८); धर्माची त्या कामीं व्यवस्था (९-१४); भीमाचा गुप्त विरोध (१५); धर्माज्ञा व तिचे परिणाम (१६-१८); धृतराष्ट्राची मनःस्थिति (१९-२२). स्वभुजस्तव करून भीम धृतराष्ट्रास गुप्तपणें दुःख देतो (२३-३३); धृतराष्ट्र स्वकष्टदशा वर्णून तपार्थ वनाला जाण्याची धर्माजवळ आज्ञा मागतो (३४-५३); धर्माचा शोक व रहाण्याबद्दल धृतराष्ट्रास आग्रह (५४-६९); धृतराष्ट्राची धर्मास व संजयादिकांस पुनः प्रार्थना व मूर्छा (७०-७५); धर्माचा शोक (७६-८०); धर्माच्या खटपटीनें सावध झालेल्या धृतराष्ट्राचें भाषण (८१-८७); धर्माचा गहिंवर व आग्रही धृतराष्ट्रास ' निदान जेवून जा ' अशी गळ (८८-९५); धृतराष्ट्रोत्तर (९६); व्यासागमन (९७).

**अध्याय २ रा**; ( **पृ० ५८४** ):—व्यासांच्या मध्यस्थीवरून धर्म धृतराष्ट्रास आज्ञा देतो (१-१७); आनंदित धृतराष्ट्रगांधारी धर्मप्रार्थनानुसार भोजन करितात (१८-२३); धृतराष्ट्राचा धर्मास बोध (२४-३०); ' पुत्रश्राद्धे करून निघणार ' असें धृतराष्ट्र गांधारीस सांगतो (३१-३३); प्रजाजनांचा जमाव (३४-३६); धृतराष्ट्र त्यांस आज्ञा मागतो (३७-६१); प्रजांचा शोक (६२-६४); प्रजेचे तर्फेनें सांबब्राह्मण धृतराष्ट्रास निरोप देतो (६५-८७); श्राद्धाकरितां विदुर धर्मा-

जवळ द्रव्य मागतो (८८–९०); रागावलेल्या भीमाचें समाधान करण्याचा अर्जुनाचा प्रयत्न (९१–९५); भीमाचें मर्मभेदक उत्तर (९६–१०५); धर्म भीमास निर्भर्त्सितो (१०६); अर्जुनाचा भीमास पुनरुपदेश (१०७–१०८); धर्म विदुरास धन देण्याचें कबूल करितो (१०९–१११); भीमाचा राग (११२); भीमावर न रागावण्याविषयीं धर्माची विदुरामार्फत धृतराष्ट्रास प्रार्थना (११३-११९); श्राद्धयज्ञवर्णन (१२०-१२५).

**अध्याय ३ रा; ( पृ० ५९६ )**:—धृतराष्ट्र संजयाविदुरांसह वनवासाला जातो ( १–११ ); परतण्याविषयीं धर्माची प्रार्थना न ऐकणाऱ्या कुंतीचें धर्माशीं भाषण ( १२–२१ ); धर्माची कुंतीस काकुळती ( २२–२६ ); हट्टी कुंतीशीं भीमाचें भाषण ( २७–३३ ); दृढनिश्चयी कुंती पांडवांचें समाधान करिते ( ३४–४६ ); धृतराष्ट्रानें गांधारीकडून केलेल्या उपदेशानें हि कुंतीचा निश्चय ढळत नाहीं ( ४७–५२ ); धर्मादिक परततात ( ५३–५४ ); शतयूपाच्या आश्रमांत राहिलेल्या धृतराष्ट्राला नारद त्या स्थलाचें माहात्म्य सांगतो ( ५५–६३ ); शतयूप व नारद ह्यांचा संवाद ( ६४–७१ ).

**अध्याय ४ था; ( पृ० ६०३ )**:—धृतराष्ट्रादिकांच्या वियोगामुळें पौरजन व धर्मादिक यांस दुःख ( १–५ ); धर्म धौम्ययुयुत्सूंवर राज्यभर टाकून धृतराष्ट्राच्या आश्रमांत येतो ( ६–१२ ); यमुनेवर गेलेल्या धृतराष्ट्राची भेट–सर्वांच्या भेटी, कुशलप्रश्न व गाऱ्हिवर ( १३–३१ ); तापससभेस संजय कृष्णस्वरूप वर्णितो ( ३२–३३ ); धृतराष्ट्र धर्मास विदुराचें कुशल कळवितो ( ३४–४० ); स्मरणाबरोबर प्रकट झालेला विदुर धर्मास एकवार पाहून देहत्याग करितो ( ४१–४६ ); आकाशवाणी–धर्म धृतराष्ट्रास सर्व वृत्त सांगतो ( ४७–५२ ); धृतराष्ट्राच्या सेवेंत धर्मादिकांचा एक महिना जातो ( ५३–६० ); नारदव्यासादिकांचें आगमन ( ६१–६३ ); व्यास धृतराष्ट्रास विदुरधर्मैक्य वर्णून वर मागण्यास सांगतात ( ६४–७२ ); धृतराष्ट्र पुत्रशोक वर्णितो ( ७३–७७ ); गांधारी 'सर्व मृतपुत्रादिकांचें दर्शन करवा' अशी व्यासांची प्रार्थना करिते ( ७८–८७ ); कुंतीची कर्णदर्शनेच्छा ( ८८ ); द्रोणादि सर्व मृत वीर हे कोणकोणत्या देवांचे अंशावतार होत, तें सांगून, व गंगातीरीं सर्वांचें दर्शन करविण्याचें कबूल करून व्यास उठतात ( ८९–१०२ ); दर्शनोत्सुकजन गंगातीरीं जमतात ( १०३–१०५ ).

**अध्याय ५ वा; ( पृ० ६१३ )**:—व्यास तपःप्रभावानें कर्णद्रोणादींस

गंगातीरीं आणतात ( १–१० ); सर्वांच्या भेटी झाल्यावर व्यास त्यांना पुन्हां गुप्त करितात ( ११–२३ ); गंगेंत स्नान केल्याबरोबर व्यासकृपेनें कौरवस्त्रिया दिव्यलोकाप्रत जातात ( २४–३३ ); व्यासकृपेनें जनमेजयराजास स्वपितृदर्शन ( ३४–४० ); व्यासांच्या आज्ञेप्रमाणें धृतराष्ट्र धर्मास परत जाण्याला आज्ञा देतो ( ४१–४५ ); धर्माचा नकार–गांधारीचा उपदेश ( ४६–४८ ); धर्माचें ( ४९–५३ ) व सहदेवाचे ( ५४ ) भाषण–कुंती सहदेवादिकांचे सांत्वन करिते ( ५५–६३ ); सर्वांची आज्ञा घेऊन धर्मादि परत आले ( ६४–६६ ); धर्मप्रश्नावरून नारद धृतराष्ट्राकडील वृत्त सांगतात (६७–९०): –धृतराष्ट्रादिकांचे उग्र तप (७०–७४); धृतराष्ट्र, कुंती व गांधारी यांचे देह वणव्यांत भस्म होतात–धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून संजय मात्र स्वतःस वांचवितो ( ७५–८७ ); नारदादि सर्व ऋषींना हें वृत्त कळवून संजय हिमाचलीं गेला ( ८८–९० ); सर्वांचा शोक ( ९१ ); धर्माचा विलाप ( ९२–१०१ ); नारदकृत सांत्वन ( १०२–१०७ ); धृतराष्ट्राचे उत्तरकार्य (१०८); उपसंहार ( १०९ ).

---

## १६. मौसलपर्व.

### ( पद्यसंख्या १८६ ).

**अध्याय १ ला:** ( पृ० ६२३ ):—वैशंपायन जनमेजयास कथा सांगतात:—धर्मादिकांना कृष्णप्रमुखयादवनाशाची वार्ता कळून ते निस्तेज होतात (१–७); स्त्रीवेषधारी सांबास ' पुत्र की कन्या, काय होईल, ' असा यादवांचा नारदादींस प्रश्न ( ८–११ ); ' सर्वनाशक असें मुसळ होईल ' असा ऋषींचा शाप ( १२–१५ ); प्रसवलेल्या त्या मुसळाचें पिष्ट करवून उग्रसेन तें समुद्रार्पण करितो ( १६–१९ ); उग्रसेनकृत मद्यपाननिषेधाज्ञा ( २०–२२ ); द्वारकापुरी आगमन (२३–२४); उत्पातवर्णन ( २५–३० ); यादव प्रभासाला जातात ( ३१–३२ ); उद्धव परततो ( ३३ ); सर्व यादव सुरामत्त होतात ( ३४–३९ ); सात्यकी व कृतवर्मा त्यांचें वाग्युद्ध ( ४०–४२ ); कृष्णाचा राग ( ४३ ); सात्यकी सत्यभामेच्या सांत्वनार्थ कृतवर्म्यास मारतो ( ४४–४८ ); यादवी–सात्यकिप्रद्युम्नादिकांचा वध ( ४९–५५ ); मुसळांत रूपांतर झालेल्या एरकानीं कृष्ण यादवांचा संहार करितो ( ५६–६४ ); बभ्रुदारुकानीं शांतविलेला कृष्ण रामाकडे येतो ( ६५–६६ ); कृष्ण दारुकाला अर्जुनास बोलाव-

व्यासाठीं पाठवितो ( ६७–६९ ); ' द्वारकापुरीचें रक्षण कर ' असें कृष्ण बभ्रूस सांगतो ( ७०–७१ ), तों च मुसळाच्या पातानें बभ्रूचा नाश होतो ( ७२–७३ ); कृष्ण द्वारकेस येऊन सर्वांचें सांत्वन करून परत रामाकडे येतो ( ७४–८२ ); इतक्यांत बलरामाच्या मुखांतून शेषनाग बाहेर पडून बलराम त्या स्वस्वरूपाप्रत पावतो ( ८३–८७ ); व्याधाच्या बाणानीं वेधलेला कृष्ण अवतारकृत्य संपवून स्वलोकाप्रत जातो ( ८८–९५ ).

**अध्याय २ रा: ( पृ० ६३२ ):**—दारुकापासून सर्व वृत्तांत कळल्यावर अर्जुन द्वारकेस येऊन सर्व यादवस्त्रियांसह विविध विलाप करितो ( १–१२ ) व वसुदेवास भेटतो– वसुदेवाचें अर्जुनाशीं भाषण ( १३–२५ ); ' आजपासून सातव्या दिवशीं सर्वांना सांभाळण्याकरितां घेऊन जातों ' असें अर्जुनाचें आश्वासन ( २६–३४ ); वसुदेवाचा मृत्यु–सर्वांचें उत्तरकार्य उरकून अर्जुन यादवस्त्रियांसह निघतो ( ३५–४० ); सागर अर्जुनामागें सर्व प्रदेश बुडवितो ( ४१–४६ ); वाटेंत अभीरानी नष्टप्रभाव अर्जुनास परिवारांसह लुटिलें ( ४७–५४ ); शेषपरिवारासह अर्जुन इंद्रप्रस्थास येऊन वज्रास राज्याभिषेक करितो–रुक्मिण्यादि पांच कृष्णभार्या अग्निप्रवेश करितात–सत्यभामादि तपार्थ जातात–अक्रूरवधु सरस्वतींत शिरतात ( ५५–६० ); इतर सर्वांचा शोक हरून अर्जुन व्यासाकडे जाऊन त्यांस सर्व हकीकत समजावितो ( ६१–७९ ); ' तुमचें हि कार्य संपलें असल्यामुळे आतां तुम्हीं परम श्रेय साधण्याची वेळ आली आहे, ' असा व्यासाचा उपदेश ( ८०–८८ ); अर्जुन हे वृत्त आपल्या बंधुप्रभृतींस कळवितो ( ८९–९० ); उपसहार ( ९१ ).

---

# १७. महाप्रस्थानिकपर्व.

## ( पद्यसंख्या ९४ ).

**अध्याय १ ला: ( पृ० ६४१ ):**—धर्म परीक्षितास अभिषेक करून त्यास सुभद्रेला निरवितो ( १–६ ) व वसुदेवकृष्णादिकांस तिलांजली देतो ( ७–९ ); कृपाला परीक्षितीचा गुरु करितो ( १० ); मंत्रि व प्रजा यांचा कष्टानें निरोप मागून व घेऊन पांडव ' महाप्रस्थाना 'ला जातात ( ११–१९ ); पांडवभार्यांची स्थिति ( २०–२१ ); वाटेंत अग्नि प्रकट होतो–त्याच्या सांगण्यावरून अर्जुन गांडीवादिकांचा त्याग करितो ( २२–३१ ); पृथ्वीप्रदक्षिणा करणारे पांडव द्वारकास्थान पहातात ( ३२–३७ ).

**अध्याय २ रा; ( पृ० ६४४ ):**—पांडव हिमाचलावर चालत असतां वाटेंत द्रौपदी, सहदेव, नकुळ, अर्जुन व भीम असे क्रमाक्रमानें पडले—त्यांच्या पतनाचीं कारणे भीमानें विचारल्यावरून धर्मानें ती त्यास सांगितलीं (१–२१); धर्म पुढें जातो व बरोबरचा कुत्रा मात्र मागें येतो (२२–२३); इंद्र धर्मास दिव्यरथांत बसून स्वर्गांत येण्याबद्दल सांगतो—बंधु व विशेषतः बरोबरचा निश्चयी कुत्रा याना बरोबर घेण्याबद्दल आग्रह धरणाऱ्या धर्माचा व इंद्राचा संवाद (२४–३८); कुत्र्याचें रूप घेतलेला यमधर्म आपल्या पुत्राची—धर्मराजाची—धन्यता वर्णितो (३९-४६); दिव्यरथारूढ झालेल्या धर्माची नारद स्तुति करितात ( ४७–५१ ); आपले बंधु व द्रौपदी असतील तेथें आपणास नेण्याचा धर्माचा इंद्रप्रमुख देवांस आग्रह ( ५२–६० ).

---

## १८. स्वर्गारोहणपर्व.

### ( पद्यसंख्या ११६ ).

**अध्याय १ ला; ( पृ० ६५१ ):**—स्वर्गांत दुर्योधनाला पाहून धर्म रागावतो (१–४); त्याचें सांत्वन करणाऱ्या नारदास धर्म आपल्या बंधूंकडे जाण्याबद्दलचा आपला आग्रह प्रकट करितो (५–९); देवदूत धर्मास नरकलोकीं आणतो (१०–१५); तेथें कर्णार्जुनप्रमुखांचे विलाप ऐकून धर्म विव्हल होत्साता विचार करितो (१६–२७); 'मी येथें च रहाणार ' असा धर्माचा निरोप दूत इंद्रास कळवितो (२८–३१); "त्वां गुरुशीं केलेल्या 'व्याजा'बद्दल 'व्याज' नरकदर्शन तुला घडविलें; वास्तविक कर्णादिक स्वर्गांत च रमले आहेत," असें इंद्र धर्माचें समाधान करितो ( ३२–४९); सत्वाला उतरल्याबद्दल धर्माची पाठ थोपटून यम त्यास सुरनदींत स्नान करण्यास सांगतो (५०–५४); स्नानोत्तर नश्वर धर्म स्वर्गी सुखें नांदतो (५५–५९).

**अध्याय २ रा; ( पृ० ६५६ ):**—धर्म स्नानोत्तर कृष्णार्जुनादिकांस पहातो ( १–६ ); द्रौपदी व कर्णभीष्मादिक सर्व मंडळी इंद्र दाखवितो ( ७–१९ ); वैशंपायनकथित कथा ऐकून संतुष्ट झालेला जनमेजय यज्ञाची यथासांग समाप्ति करून हस्तिनापुरास येतो (२०–२९); उपसंहार ( ३०–५७ ):—भारतस्तुति (३०–३३); मित्रादिकांचा उल्लेख ( ३४–४३ ): क्षमायाचना ( ४४–५१ ); हरिसमर्पण ( ५२–५७).

# पर्वानुक्रमानें आर्याभारताची अध्यायसंख्या

## व

## पद्यसंख्या.

| पर्वक्रम. | अध्यायसंख्या. | पद्यसंख्या. |
|---|---|---|
| १. आदिपर्व | ३८ | २४७९. |
| २. सभापर्व | ७ | ६८० |
| ३. वनपर्व | १६ | १६५३ |
| ४. विराटपर्व | ७ | ७४० |
| ५. उद्योगपर्व | १४ | १४०७ |
| ६. भीष्मपर्व | ११ | ९१७ |
| ७. द्रोणपर्व | २४ | २५०१ |
| ८. कर्णपर्व | ५० | २५६१ |
| ९. शल्यपर्व | ४ | ३९१ |
| १०. गदापर्व | १० | ४५३ |
| सौप्तिकपर्व | २ | १०२ |
| ऐषीकपर्व | ३ | १६४ |
| ११. स्त्रीपर्व | ६ | ३६० |
| १२. शांतिपर्व | ७ | ५०६ |
| १३. अनुशासनपर्व | ८ | ६३५ |
| १४. अश्वमेधपर्व | ६ | ६८४ |
| १५. आश्रमवासिकपर्व | ५ | ५०७. |
| १६. मौसलपर्व | २ | १८६ |
| १७. महाप्रस्थानिकपर्व | २ | ९४ |
| १८. स्वर्गारोहणपर्व | २ | ११६ |
| | एकूण—२२४. | एकूण—१७१३६. |

**टीपः**—उपोद्घातांत एकंदर पद्यसंख्या १७१३३ ही नजरचुकीने छापली गेली आहे. तसे च विषयानुक्रमणिकेतील गदा व अनुशासन या दोन पर्वांच्या बेरजा हि चुकल्या आहेत.

# पंतलिखित
# आर्याभारतांतील परलिखित आर्या.

आर्याभारताच्या पंतलिखित पोथींतील ज्या आर्या परलिखित आहेत, असे उघड दिसून येते, ( विशेष खुलासा उपोद्धात पृष्ठ ६ मध्यें पहा. ) त्या आर्यांचा पर्वक्रम, अध्यायक्रम व पद्यक्रम पुढें दिला आहे. पंताच्या हातून आर्यांचे क्रमांक चुकण्याचा संभव असतो; म्हणून छापील क्रमांक च येथें स्वीकारले आहेत.

**आदिपर्वः**— २।१०३, १०४ व ११७; ३।३४; ४।१; ५।१८ व८८; ७।४ व ५२; १२।७६; १३।४१; २७।१४; ३०।५७, ५८ व ६२; ३१।५७ व ६२; ३३।५२; ३४।६४ ते ६६; ३६।७५ ते ७९. ( एकूण २६ ). **सभापर्वः**—१।४६,७३ व ८०; ३।१९; ४।१०४; ५।१२०; ६।२३, ५७ व ५८; ७।४;(एकूण १० ). **वनपर्वः**—१।२१, ७२, ७३, ७७ व ७८; ५।७३;६।१३, १४, ६७ व ७०; ७।२६ उत्तरार्ध, ३० पैकीं 'सानुज मदार' एवढें पंतलिखित, ३१, ४०, ४१, ६८ ते ७२ पैकीं 'का न जपावें' येथपर्यंत पर०, व ११०; ९।७१; १०।६३; ११।२० व ४३; १२।१३०; ( एकूण २२ पूर्ण व ३ अर्धवट ). **उद्योगपर्वः**—२।८, १३ व १४; ३।१५ उत्तरार्धांपैकीं [वि–]'भाग प्रार्थाया साधुबाळकासम या'; ४।३२, ३३ व ३८; ५।६९; ६।२३; ७।४९ व ५०; ८।१५ व १६; ११।३४; १३।१४३ व १४४. ( एकूण १५ पूर्ण व १ अर्धवट). **भीष्मपर्वः**— १।५१; ९।३, ४, ५, ७ व ४८. ( एकूण ६ ). **शांतिपर्वः**— ३।३८; ६।४८. **अश्वमेधपर्वः**—१।८४. (येणंप्रमाणें ८२ पूर्ण व ४ अपूर्ण आर्या परलिखित आहेत).



॥ श्रीगणेशाय नमः ॥

## कविवर्य मोरोपंतकृत

# आ र्या भा र त.



## कर्णपर्व.



(गीतिवृत्त)

## अध्याय पहिला.

भव्यप्रताप[1] कर्ण, स्वपित्याहुनि फार संगरीं तपला[2];
कीं ज्याच्या शररश्मिव्रातपटीं[3] तो सहस्रकर[4] लपला. १
स्वसख्याचें[5] साधाया चिंतित[6], जरि पार्थमर्दना जपला,
दुसरे दिवसीं[7] हरिच्या दृष्टिपुढें[8] अर्जुनाशुगें[9] खपला[10]. २
धृतराष्ट्रासि कथाया, संजय, तें वृत्त, सद्रथावरुनीं[11],

१. भव्यप्रताप हे विशेषण कर्ण व ‘स्वपित्याहुनि’ या पदाने निर्दिष्ट जो सूर्य
। दोघास हि लावता येते. महापराक्रमी, (पक्षी) प्रखरतेने तापणारा. २. [शत्रूंस]
।पदायक झाला. ३. बाणरूपी किरणसमुदायाच्या पडद्यात. ४. सूर्य. ५. आपल्या
ात्राचे (दुर्योधनाचे). ६. इच्छित. ७. कर्ण सेनापति झाल्यापासून दुसऱ्या
वशी. ८. कृष्णाच्या युक्तीने च कर्ण मारला गेला हा अभिप्राय व्यक्त करण्यासाठी
हरिच्या दृष्टिपुढे’ हे शब्द योजिले आहेत. ९. अर्जुनाच्या बाणाने. १०. मेला.
१. वेगाने जाणाऱ्या रथावर बसून.

जाय कुरुक्षेत्राहुनि रात्रौ त्या [1]गजपुरा त्वरा करुनीं. ३
संजयसूत नृपाच्या जाय [2]प्रक्षीणबांधवीं सदनीं;
जाणों प्रिय[3]जनशोकाजगराच्या उघडल्या महा[4]वदनीं. ४
वंदुनि पुत्रसु[5]हृज्जनशोकनटाच्या [6]मनोज्ञ अजि[7]रा या
धृतराष्ट्रासि म्हणे, 'मीं संजय. व्हा सावधान अजि राया! ५
पुसतों तुज मीं राया! धैर्यविवेकें सुखी च असती कीं?
निजदोषें [8]व्यसनातें पावुनि [9]मोहीं निमग्न नससी कीं? ६
भीष्म द्रोण विदुर हरि [10]परमाप्त; तिहीं[11] कथूनि [12]भावि, हितें
उपदेशिलीं तुला बहु वचनें, बा [13]भूमिवल्लभा! [14]विहितें. ७
तैसीं च [15]रामनारदकण्वांचीं सुवचनें हि [16]जनकाचीं,
अमृताधिकमधुर हितें मानी एका तुझें चि मन [17]कांचीं. ८
न स्वीकारुनि मोहें, तूं कवि, हित[18]विहितगुरुसुहृत्कथित,
तें आठवूनि आतां जाला नाहींस कीं अति[19]व्यथित. ९
रिपुनीं भीष्मद्रोणप्रमुख गुरुसुहृन्मणी रणीं वधिले,
यास्तव शोचिसि कीं [20]हतफळ जाले [21]अर्थ जे मनामधिले? १०
करि एकवीस वेळा क्षत्रियरहिता [22]मुनीश जो धरणी,
तत्प्रियशिष्य शरांहीं [23]खिळिला [24]गांगेय मुख्ययोध रणीं.' ११
धृतराष्ट्र म्हणे, 'पुससी जाणोनि हि, काय संजया! ताप?

१. हस्तिनापुरास. २. अगदीं नष्ट झाले आहेत बांधव ज्यांतील अशा. ३. प्रियजनाचा शोक हा च कोणी अजगर, त्याच्या. ४. मोठ्या तोंडांत. ५. पुत्राच्या व इष्टमित्राच्या मरणानें झालेला शोक हा च नट, त्याच्या. ६. सुंदर. ७. आंगणांत. ८. संकटास. ९. दुःखात किंवा मूर्छेत. १०. मोठे यथार्थवक्ते. ११. त्यांनीं. १२. भविष्य. १३. भूपते! १४. योग्य. १५. परशुराम, नारद व कृष्ण यांचा उपदेश उद्योगपर्व अ० ८ मध्यें वर्णिला आहे. १६. धृतराष्ट्रपिता व्यास, त्याचीं. १७. कच्चा, कार्याक्षम. १८. हितकर व योग्य असा भीष्मादि वडिलांचा व इष्टमित्रांचा उपदेश. १९. अत्यंत दुःखित. २०. निष्फळ. २१. मनोरथ, हेतु. २२. परशुराम. २३. उठण्यास असमर्थ केला; भूमीवर खिळून टाकला. २४. भीष्म.

शोक कसा न करूं? कीं माझा वधिला शिखंडिनें [1]बाप. १२
जो रथ दहा सहस्र प्रतिदिन ही [2]छळविवर्जितीं युद्धीं
प्रेषी, [3]महेंद्रलोकाप्रति, मारुनि, मत्पिता शरीं शुद्धीं. १३
स्पष्ट छळ करुनि शरीं [4]स्वपितामहभीष्ममूर्ति काशि खंडी?
अद्य अधर्मज्ञ विजय गंगासुतमृत्युहेतु, न शिखंडी. १४
हें मज सतत स्मरतें, म्हणउनि होतों क्षणक्षणीं कष्टी.
मज अंधाची हरिली, करुनि छळ, अर्जुनें बळें यष्टी. १५
ज्या द्रोणाचार्यानें करुनि दया, पढविला धनुर्वेद,
धृष्टद्युम्नकरें त्या निजगुरुचा [5]कराविला शिरश्छेद. १६
गुरुच्या वधार्थ बोले धर्मात्मा धर्म ही असत्य, जुनी
[6]अवितथरुचि [7]प्रतिज्ञा उजउनि, गुरुभक्तिचा रस त्यजुनि. १७
तें आठवितां, होतें मन माजें शोकसागरीं मग्न.
[9]आधिनगतटीं, जाला [10]धैर्यप्लव, [8]आदळोनियां, भग्न. १८
ज्यांसम [11]चतुर्विधास्त्रज्ञाता, नाहीं च, पुरुष, लोकांत,
त्यां भीष्मद्रोणांच्या जालों केवळ निमग्न शोकांत. १९
मथिलें [12]संसप्तकबळ, जें दुःसह [13]दुर्निरीक्ष्य, जिष्णूनें,
[14]स्वभुजप्रेरितचक्रें, [15]दितिदनुसुतसैन्य जेंवि, विष्णूनें. २०
[16]द्रौणिप्रयुक्त, केवळ दुःसह, नारायणास्त्र, लोका जें,

१. पितृतुल्य भीष्म. २. कपटरहित अशा युद्धीं. ( धर्मयुद्धात ). ३. स्वर्गास. ४. आपला आजा जो भीष्म त्याची मूर्ति ( शरीर ). ५. [ धर्मानें ] करविला. ६. असत्यप्रिय. ७. खोटें न बोलण्याची प्रतिज्ञा. ८. सपवून; भग्न. ९. मानसिक-व्यथारूपी पर्वताच्या कड्यावर. १०. धैर्यरूप नौका. ११. ब्रह्मास्त्रादि दिव्यास्त्र, संमोहनादि गांधर्वास्त्र, कंकपत्रादि मानुषास्त्र व नागगारुडादि असुरास्त्र हीं चतुर्विध अस्त्रें जाणणारा. १२. युद्धात अमुक एका योद्ध्यास मारीन, न मारिल्यास रौरव-गतीस जाईन, अशी शपथ घेणाराचें सैन्य. १३. पाहण्यास अशक्य. १४. आपल्या हातानें सोडलेल्या सुदर्शनचक्रानें. १५. दैत्यदानवसैन्य. १६. अश्वत्थाम्यानें प्रेरिलेलें.

तें हि प्रतिहत[1] केलें; करितो हीं सिद्ध कृष्ण तो काजें. २१
नारायणास्त्र धारुनि, विजयें तो द्रौणिवीर विप्र बळें
केला प्रतिहततेजा[2], जेंवि नभीं राहुनें रवि प्रबळें. २२
धैर्य नसेल चि उरलें, द्रोणशिर छेदितां, मनीं[3] कांहीं,
पांडवभयें, पलायन वरिलें असतां, रणीं अनीकांहीं[4]. २३
नौका फुटतां बुडती जेंवि समुद्रीं, तदाश्रित[5] क्षिप्र[6],
वाटे शोकीं मांजे[*] सर्व बुडाले चि, मारितां विप्र. २४
दुर्योधन, कृतवर्मा, कर्ण, कृप, द्रौणि, शल्य, जे असती
माझे सुत ही, ज्यांची मति, सोडीना दुराग्रहा, असती[7]: २५
त्यांचा तेव्हां कैसा जाला मुखवर्ण, संजया! सांगें.
प्रज्ञाचक्षु[8] दिलें तुज मुनिनें[9]: असशी हि तूं रणीं आंगें.' २६
सूत म्हणे, 'गा राया! तव अपराधद्रुमासि[10] जें आलें
कौरववृत्तफळ[11], तुला द्याया, आलों: सुपक्क कीं जालें. २७
सावध हो, धीर धरीं; होणार प्राप्त जें, जया काळीं,
सुखदुःख घडे: विधिनें लिहिलें पहिलें च कीं असे भाळीं. २८
सुखदुःखप्राप्तीनें कवि हर्षविषादलेश न धरीती:
वर्षाऽवर्षीं[12], जेंवि न वृद्धिक्षय सिंधु: हे चि बुधरीती.' २९
भूप म्हणे, 'चित्तकरीं[13] धरिली बुधगीतियष्टि मीं अंधें,
म्हणुन चि वागें, परि मन मोहे, बा! पुत्रमोहविषगंधें.' ३०

---

१. भगित, व्यर्थ. २. निस्तेज. ३. [ माझ्या पुत्राच्या ] मनीं कांहीं धैर्य उरलें नसेल चि. ४. सैन्यांनीं. ५. नौकेचा आश्रय केलेले. ६. तत्काळ. ७ दुष्ट, असभ्य. ८. दिव्यज्ञाननेत्र. ९. व्यासानें. १०. अपराधरूपी वृक्षास. ११. कौरवाचा वृत्तान्त हें च फळ. १२. पर्जन्यवृष्टि झाली किंवा न झाली तरी. १३. चित्तरूपी हातांत. * मांजे [ दुर्योधनादि पुत्र ].

# अध्याय दुसरा.

संजय म्हणेः– नृपाळा! परिसावें युद्धवृत्त. जें द्रोण.
धृष्टद्युम्नें वधिला, तेव्हां भ्याला न वीर तो कोण? १
पळती बळें समस्तें, हरिपासुनि मृगकुळें जसीं भीतीः
त्यांतें मागें फिरवी दुर्योधनभूप, सांगुनीं नीती. २
"ऐका हो वीर! तुम्हीं, मी तुमच्या भुजबळाश्रयें[१] शुद्ध.
यश जोडाया, कुंतीपुत्रांसीं मांडिलें महायुद्ध. ३
दिसतां विषण्ण[२] सर्व द्रोणवधीं. मरति वीर युद्धांत.
फळ जय कीं वध होणें, हा निश्चय निश्चळ प्रवुद्धांत[३]. ४
द्रोणवधें रिपु मानिति जय, मानूं द्याः न चित्र[४] हें; तो ही
क्षणमात्र चिः कीं, पावति न जयातें सर्वथा गुरुद्रोही. ५
युद्ध करील महात्मा कर्ण, पहा हो! तुम्हीं कुतूहळ तें.
विसरेल दुःख तुमचें मन, जें द्रोण स्मरोनि हळहळतें. ६
रामप्रसादलब्धें[५] दिव्यास्त्रें योजितां चि, अंगेना[६]
पाहों न शकेल चिः परबळकरिकुळ[७] हरिसमक्ष भंगेनां? ७
युद्धीं सदा हि ज्या नरसिंहाचा, पार्थमृग धरि, त्रास,
परिसा त्याच्या, रिपुमदमहिषमहाशक्तिच्या[८], चरित्रास. ८
मानुषयुद्धें[१०] चि, गजायुतबळ[११] खळभीम त्या अवस्थेला
जेणें, सेनापति गुरु असतां, समरांगणीं क्षणीं नेला. ९

१. बाहुबलाच्या जोरावर. २. खिन्न, उत्साहरहित. ३. ज्ञात्यात. ४. आश्चर्यकारक. ५. परशुरामाच्या प्रसादानें मिळालेलीं. ६. अंगदेशाच्या राजास–कर्णास. ७. शत्रूचें सैन्य हा च हत्तींचा कळप. ८. भगते चि–पंत. ९. शत्रूचा गर्व हा च कोणी महिषासुर त्याचा वध करणारी महाशक्ति, तिच्या. १०. केवळ मानवी शक्तीचा च उपयोग ज्यामध्यें केला आहे अशा युद्धानें. ११. दहा हजार हत्तींचें बळ असलेला.

दिव्यास्त्रज्ञ[1] घटोत्कच, अतिशूर, क्रूरभाव[2], मायावी
जेणें वधिला, वासवशक्तीनें[3], जीस न क्षमा यावी; १०
त्या या कर्णाचें भुजबळ, खळबळजलधिमाजि देखाल;
मग, संक्षुब्धौर्वानळदर्शन[4] जालें, असें चि लेखाल[5]. ११
करितां विक्रम, कर्णद्रौणी[7] दिसतील विष्णुवासवसे.
यांचा ठायीं, चापश्रुति[6], करुनि प्रकट वैभवास वसे. १२
भीष्मद्रोणवधजयें जाला मद पांडवांसि, तो यांचा
विक्रम करिल क्षीण, ग्रीष्म[8] जसा लघुतडागतोयांचा[9]. १३
त्या कुंतीपुत्रांच्या, अतिदक्ष तुम्हीं असा सखे, दमनीं[10].
तुमच्या विजयिभुजबळें न गुरुव्यसनीं[11] हि मीं सखेदमना[12].' १४
ऐसें निजवीरांचें करुनि समाधान, सादरें चित्तें,
दुर्योधनें स्वसेनापति केला कर्ण, वांटिलीं वित्तें. १५
मग सेनापति सृंजय[13]पांचाळविदेहकैकयांत रणीं
शिरला, मृगांत हरि तो कीं दिवसांधांसि[14] भेटला तरणी. १६
अद्भुतकर्णशरासनघनजनितामितविशुद्धशरधारा[15]
तापविती, कांपविती, निर्मिति तटिनी[16] जपासुमाकारा[17]. १७
पांडवपांचाळबळें पीडुनि, बहुलक्ष वीर तो मारी.
परि विजयबाहुराहु चि विजयी, कीं पूर्ण कर्णसोमारी[18]. १८
अतुळ पराक्रम केला; परि वधिला अर्जुनें रणीं कर्ण.
मीं आलों या वृत्तें संतप्त करावया तुझे कर्ण. १९

---

१. अलौकिक अस्त्र जाणणारा. २. निर्दय स्वभावाचा. ३. इंद्रानें दिलेल्या शक्तीनें. ४. खवळलेल्या वडवानलाचें दर्शन. ५. समजाल. ६. धनुर्वेद. ७. कर्ण व अश्वत्थामा याचा. ८. ग्रीष्मऋतु. ९. लहान तलावांतील पाण्याचा. १०. नाशास. ११. महासंकटांत. १२. दुःखित मन असलेला. १३. या नावाचे राजे व त्याचे सैनिक, यांत. १४. घुबडांस. १५. आश्चर्यजनक कर्णधनुष्यरूपी मेघापासून उत्पन्न झालेल्या अगणित व स्वच्छ बाणरूपी धारा. १६. नदी. १७. जासवंदीच्या फुलासारखी तांबडीलाल. १८. कर्ण हा च कोणी चंद्र, त्याचा शत्रु.

# अध्याय तिसरा.



कर्णक्षयवार्ताविषधारा कर्णीं जया क्षणीं पडली,
त्या च क्षणीं क्षितितळीं क्षितिप[1]तनु हि, काळजी मनीं जडली.
राजा मूर्छित पडतां गांधारीसह तिच्या सुना रडती.
उर[2]रीकृतशोकभरा, [3]कुररीशा, एकदा चि आरडती. २
त्या भारतस्त्रियांतें समजावी संजय प्रयासानें.
त्यांच्या त्या व्यसनाहुनि, भासे [4]मृतिदुःख ही तया [5]सानें. ३
सिंपुनि शीतळसलिलें, [6]सुखशीतव्यजनवायुनें विदुरें
राजा सावध केला, जो हत शोका[7]भिधें [8]महाभिदुरें. ४
जेव्हां सावध होउनि, नृप परिसे [9]निजवधूविलापरवा,
चित्तीं म्हणे, ' अहा ! म्यां मूढें संसार मानिला बरवा. ' ५
निंदी निजपुत्रांतें, तो भूप [10]महामना, [11]गततनयांतें;
वाखाणी कुंतीच्या, [12]नयसाधितभूरिभाग तनयांतें. ६
निंदी [13]शकुनिमतीतें, आत्ममतीतें हि, तो कवि, श्वास
सोडी दीर्घोष्ण, म्हणे, 'म्यां चि दिला उग्रशोक विश्वास.' ७
मग धीर धरूनि म्हणे, 'रे वत्सा ! संजया ! पुन्हां सांगें.
मीं निजकर्मफळातें सेवाया, सिद्ध जाहलों आंगें. ८
कर्ण यमपुरा गेला, पार्थासीं करुनि संग[14]रायास.
गमलें काय हित गमन, मित्राचा धरुनि संग, रायास ? ९
नित्य जयाचा लोभी दुर्योधन, कर्ण जेधवां मेला,

---

१. राजा धृतराष्ट्राचें शरीर. २. अंगीकारिला आहे शोकभार ज्यांनीं. ३. कुररी नांवाच्या पक्षिणीप्रमाणें. ४. मरणाचें दुःख. ५. थोडें. ६. सुखकारक अशा थंड पंख्याच्या वाऱ्यानें. ७. मूर्छित. ८. शोक नांवाच्या मोठ्या वज्रानें. ९. आपल्या स्त्रीच्या व सुनांच्या विलापध्वनीला. १०. मोठ्या मनाचा. ११. अनीतिमान अशा. १२. न्यायानें साधिला आहे पुष्कळसा कार्यभाग ज्यांनी अशा. १३. कपटद्यूताची युक्ति शकुनीनें काढली म्हणून निंदी. १४. युद्धाचे श्रम.

होउनि जयीं निराश, स्पष्ट गमे, सुत यमालया गेला. १०
वद संजया!; मनीं तूं संकोच नको धरूं; सविस्तर ती
युद्धकथा सांग पुन्हा. कवि शोकाब्धी धृतिप्लवें तरती.' ११
संजय म्हणे, 'नरेशा! तव सेनांचा धणी प्रवीरमणी,
पुत्रांसह बंधूंसह, मेला त्वत्सुतवयस्य कर्ण रणीं. १२
त्वत्सुत दारुणकर्मा, अतितीक्ष्णप्रकृति, कीं जसा वस्त्रा,
झोंबे सभेंत जो गुरुपत्नीच्या शोणितप्लुता वस्त्रा, १३
तो दुःशासन वधिला; त्याच्या, सेना उदंड भी, मरणीं
व्याघ्र जसे मृगशोणित, प्याला तत्कंठरक्त भीम रणीं.' १४
वैकर्तनदुःशासनमृतिवार्ता परिसतां चि तो कानें,
केवळ विव्हळ जाला, राजा धृतराष्ट्र आमशोकानें. १५
भूप म्हणे, 'सूता! मी पुसतों वार्ता तुला असी मरण
किति पावले मदीय, स्वरिपूंसीं करुनियां असीम रण?' १६
संजय म्हणे, 'नृपाळा! पडला तव तात भीष्म, धीरांचें
अर्बुद, दश दिवसांत स्वबळें मारुनि, धर्मवीरांचें. १७
मेला द्रोणाचार्य हि भगवान् कोदंडवेदपारीण;
समयीं प्राणसमर्पण करुनि, तुझें फेडिलें नृपा! रीण. १८
जें, भीष्मद्रोणांहीं वधितां उरलें पृथातनुजसैन्य,
करुनि तदर्धक्षय, निजमरणें दे कर्ण तवसुता दैन्य. १९
दुर्मुख विकर्ण दुःसह विविंशती चित्रसेन तवतनय,
दुर्जय दुर्मर्षण दुर्विषह हि भीमें चि मारिले अनय. २०

१. धैर्यरूप नौकेनें. २. वीरश्रेष्ठ. ३. तुझ्या मुलाचा मित्र ४. भयंकर कर्मे करणारा. ५. तिखट स्वभावाचा. ६. वस्तरा ७. वडील बंधूच्या (धर्माच्या) पत्नीच्या. ८. रक्तानें भरलेल्या. (द्रौपदी रजस्वला असतां हि तिचें वस्त्र फेडण्याचा दुःशासनानें प्रयत्न केला होता). ९. हरिणाचें रक्त. १०. सूतपुत्र कर्ण. ११. दशकोटि. (अपरिमित). १२. धर्मयुद्ध करणाराचें किंवा धर्मपक्षीय वीरांचें. १३. धनुर्वेदप्रवीण. १४. त्यांतील अर्ध्याचा नाश. १५. उद्दाम, दांडगे.

अनुजा अनुविंदासह, गेला स्वर्गासि, वीरवर विंद.
तोडी जयद्रथाचें शिर पार्थ, जसें करींद्र[1] अरविंद[2]. २१
दुर्योधनसुत लक्ष्मण सौभद्रें[4] अमितविक्रमें[3] वधिला.
दौःशासनिला भेटे कृष्णात्मज, घटज जेंवि नीरधिला. २२
ज्याला बाहुसहस्रप्रद[5] जाला, भक्तकल्पनग दत्त[6],
तन्नामकें[7] तदधिकें वधिला निजतातसख[8] हि भगदत्त. २३
कौरवदायाद[9] महायोद्धा भूरिश्रवा, प्रकाम[10] रण
करुनि त्वदर्थ राया ! सात्यकिपासूनि पावला मरण. २४
श्वेतहयें अंबष्ठ[11] श्रुतायुनामा रणांगणीं मथिला.
भीमें वधिला त्वत्सुत दुःशासन, तो प्रकार म्यां कथिला. २५
गज बहुसहस्र ज्याच्या कटकीं तो नृप सुदक्षिण प्रथित[12],
वधिला धनंजयानें; केला दुर्योधन क्षण व्यथित. २६
जो अधिप कोसलांचा[13] भासत नव्हता रणी शमावासा[14],
सौभद्रें, हरिशावें[15] करिवरसा, प्रेपिला यमावासा[16]. २७
करुनि शरनखीं दृढरथचर्मासह खड्ग ही शकलें[17], भाचा
यदुसिंहाचा[18], वध करि लीलेनें शल्यपुत्रकलभाचा[19]. २८

---

१. हस्तिश्रेष्ठ. २. कमळ. ३. अमित पराक्रम ज्याचा त्याने. ४. द्रौपदीचा मुलगा. ५. हजार बाहू देणारा ६. ब्रह्माविष्णुमहेशाच्या अंशापासून अत्रिऋषीस झालेला ब्रह्मनिष्ठ पुत्र. ७. ते नाव (अर्जुन) असणाराने. ८. आपल्या पित्याचा (इंद्राचा) स्नेही. ९. कौरवाचा सपिंड. (कौरव व भूरिश्रवा हे 'प्रतीप' नावाच्या मूळ पुरुषाचे वंशज असल्यामुळे भूरिश्रवा कौरवाचा सपिंड होता). १०. पुष्कळ. ११. अंबष्ठदेशाचा राजा. (ब्राह्मणापासून वैश्य स्त्रीच्या ठायीं झालेल्या संततीस 'अंबष्ठ' असे म्हणतात. यावरून त्यांच्या राहण्याच्या देशास 'अंबष्ठदेश' असे नांव पडले असावे). १२. प्रख्यात. १३. कोसल देशाचा राजा. १४. मरण्या-सारखा. १५. सिंहाच्या छाव्याने. १६. यमसदनास. १७. तुकडे. १८. श्रीकृष्णरूपी सिंहाचा. १९. शल्यपुत्ररूपी हत्तींचा. (मूळात शल्याचा धाकटा भाऊ असें आहे).

अभिमन्युवधक्रोधें, अर्जुन, कर्णासमक्ष वृषसेना[1]
मारी, तेव्हां भी तव पृतना[2] जैसी हरीस वृषसेना[3]. २९
सहदेवें ही वधिला स्वभ्राता[4], जो कुमार मामाचा,
कीं तो सहाय, राज्या! या कामक्रोधलोभधामाचा[5]. ३०
मेला भूप भगीरथ, नृपति बृहत्क्षत्र, कैकय हि मेला.
भगदत्ताचा पुत्र हि नकुळानें अंतकातिथी[6] केला. ३१
वधिला तुझा पितामह[7] बाल्हीक वृकोदरें अतिक्रुद्धें;
पुत्र जरासंधाचा सौभद्रें; तीं सुदुःसहें युद्धें. ३२
भ्राते कालिंग वृषक व्याघ्र चि, जे शत्रुमृगकुळें मथिती,
ते दोघे ही झाले श्राद्धपतीचे[8], तुझ्या गुणें, अतिथी. ३३
दिसतो, श्रीभीमाच्या अद्भुतभुजशक्तिनें निज-विलासा
दावुनि वृषवर्मा तव सचिव, रणीं सुशयनीं निजविलासा. ३४
नागायुतबळ[9] पौरव, कालिंग, वशाति, शिबि, अभीषाह,
यां शूरसेनसहितां प्रेषी स्वर्गासि वीर सितवाह[10]. ३५
जे गोकुळांत झाले बळशाली, न फिरती रणीं मागें,
वधिले संसप्तकसह गोपाळ हि सितहयें महाभागें. ३६
जे रात्रिंदिव तूझें हित साधाया धरूनि धनु जपती.
वृषकाचळनामक[11] ते, विजयें वधिले रणांत, मनुजपती. ३७
जो काय उग्रकर्मा[12] नामें कर्मे हि, शाल्वराज बळी,
तत्प्राणांतें, क्षुधित श्रीभीमभुजाहिभूपती[13], कवळी. ३८
मेला बृहंतराजा धृतराष्ट्रा! ओघवंत ही मेला.
भीमगदादेवीनें महिषसखं[14] क्षेमधूर्ति ही केला. ३९

१. कर्णपुत्रास. २. सैन्य. ३. बैलाची सेना. ४. आपला मावसभाऊ, शल्य-पुत्र रुक्मरथ. ५. कामक्रोधादि षड्रिपूचें माहेरघर च असलेल्या दुर्योधनाचा. ६. यमाचा पाहुणा. ७. हा धृतराष्ट्राचा चुलत आजा. ८. यमाचे. ९. दहा हजार हत्तींइतकें बळ ज्यांस असे. १०. अर्जुन. ११. या नांवाचे शकुनीचे भाऊ. १२. भयंकर कर्म करणारा. १३. भीमबाहुरूप सर्पराज. १४. महिषासुराचा मित्र.

सात्यकिनें त्वद्धित जलसंध व्यापादिला, दिला काळा.
वधिला घटोत्कचें हि क्रव्याद् अलंबुस, क्ष्मापाळा ! ४०
ललित्थ मालव मद्रक कैकेय तुंडिकेर रणीं,
दाक्षिणात्यप्राच्योदीच्यप्रतीच्यवीरमणी, ४१
द्रविड सविश्रीपुत्रक मावेल्लक ही उशीनर हि वीर,
श्रीमद्विजयें वधिले राज्या ! तूझे सहाय रणधीर. ४२
बहु पत्त्यश्वरथगजक्षय कर्णार्जुनसमागमीं झाला.
तव दोषें, काळानें बहुनृपवंशांत घातला घाला. ४३
इंद्रें वृत्र, रघुवरें रावण, कृष्णें हि जेंवि नरक, रणीं,
कीं अर्जुन भृगुरामें, ज्याची गाताति देव नर करणी, ४४
कीं स्कंधें महिषासुर, कीं रुद्रें जेंवि अंधकासुर गा !
तैसा विजयें वधिला कर्ण; गरुड कीं वधी जसा उरगा. ४५
जरि राज्यलुब्ध पुत्रस्नेहासवसेवनें न भुलतास,
तरि, इष्टव्यसनघनाघातशतें तूं नृपा ! न उलतास. ४६

---

## अध्याय चवथा.

धृतराष्ट्र म्हणे, 'सूता ! सांग मला, पांडुपुत्रपक्षांत
किति मेले ? बा प्राज्ञा ! तुझिया आहे चि सर्व लक्षांत.' १
"जे वीर कुंतिसंज्ञक, नारायणनाम ही, महत्योध,
त्यांतें वधी स्वधर्में तात तुझा निर्जितस्मरक्रोध. २

१. तुझा मित्र. २. मारला. ३. राजा ! ४. योद्धे. ५. दक्षिण, पूर्व, उत्तर व पश्चिम या दिशांकडील वीरश्रेष्ठ. ६. सहस्रार्जुन. ७. कार्तिकस्वामीने. ८. पुत्रस्नेहरूपी मद्यसेवनानें. ९. आप्तविनाशरूपी घनांच्या शेंकडों आघातानीं. १०. संजय म्हणतो. ११. 'कुंती' नांवाच्या देशाचा राजा व त्याचे सैनिक. १२. क्षत्रियधर्मानें. १३. भीष्म. १४. ज्यानें काम व क्रोध जिंकला आहे असा.

जो अर्जुनसम योद्धा लोकीं विख्यात सत्यजिन्नामा,[1]
त्यातें द्रोणाचार्य प्रेषी श्राद्धेश्वराचिया[2] धामा. ३
पांचाळवधीं दावी विक्रम, हरिच्या गजेंद्रमथनाचे;
वधुनि विराट, द्रुपद, स्मरपुरहरसा[3] चि रुक्मरथ[4] नाचे. ४
बाळ चि वयें परि रणीं स्वपित्यासम, कृष्णसम, बळासम ही;
ज्याच्या भुजप्रसादें पुष्कळ सेवी असृग्जळास[5] मही: ५
तो, कृतवर्मद्रोणद्रौणिकृपाचार्यशल्यकर्णांनी
वधिला अभिमन्यु, नृपा! पी हें वार्ताविष स्वकर्णांनीं. ६
अंबष्ठपुत्र वधिला तव पौत्र लक्ष्मणें, बृहंत रणीं
दुःशासनें निवटिला, पडला लोकक्षयीं[6] जसा तरणी.[7] ७
द्रोणें वधिले राजे, जे नामें दंडधार मणिमंत;
जो भोजराज अंशुमदाख्य गुरुकरें चि पावला अंत. ८
वधिला समुद्रसेन सहसुत सामुद्र[8] चित्रसेन रणीं:
नील विकर्णें मथिला, द्रौणीनें व्याघ्रदत्त वीरमणी. ९
जो भूप चित्रयोधी[9] चित्रायुध, मुख्य वीर लक्षांत,
तुझिया सुतें विकर्णें वधिला, त्या पांडुपुत्रपक्षांत. १०
केकेयनृपभ्राते दोघे त्यांतील एक तव पक्ष;
तेणें त्वदर्थ वधिला धर्मसहाय स्वबंधु रणदक्ष. ११
भूप गदायोधी जो जनमेजय पार्वतीय,[10] तो शूर,
तवसुतदुर्मुखबाणव्रातें केला रणांगणीं चूर. १२
जे रोचमाननाम भ्राते कुंतीसुताकडे होते,
श्रीमद्द्रोणाचार्यें, त्वत्पुत्रजयार्थ, मारिले हो! ते. १३

---

१. सत्यजित नावाचा द्रुपदपुत्र. २. यमाच्या. ३. मदनाचा व त्रिपुराचा नाश करणाऱ्या शंकरासारखा. ४. द्रोण. ५. रक्तरूपी उदकास. ६. कल्पांतकाळीं. ७. सूर्य. ८. समुद्रकिनाऱ्याचा राजा चित्रसेन. ९. अद्भुत पराक्रमी. १०. पर्वतप्रदेशांत राज्य करणारा.

मातुळ धनंजयाचे जे पुरुजित् कुंतिभोज[1] या नामें,
ते हि द्रोणें वधिले राया! तुझिया तनूजजयकामें[2]. १४
वसुदानाच्या पुत्रें, जो अभिभू[3] काशिराज, तो वधिला;
कांटा चि काढिला तो जाणों तवसूनुच्या मनामधिला. १५
राजेंद्रा! अमितौजा वीर युधामन्यु उत्तमौजा ही
धर्मसहाय, स्वर्गी जाले देवांस जांवई[4], व्याहीं. १६
पांचाल्य चित्रवर्मा दुसरा हि क्षत्रधर्मनामा ते,
द्रोणाशुगशुद्धतनू[5] स्वर्गा गेले रणक्रतुज्ञाते. १७
नंदन शिखंडिचा जो रणदक्ष क्षत्रदेव दृढबाहु[6],
त्याला लक्ष्मणबाणव्रात गिळी, इंदुला जसा राहु. १८
रणदक्ष पितापुत्र प्रख्यात सुचित्र चित्रवर्मा जे,
त्यांतें वधितां, द्रोण, द्विरदवधीं[7] केसरी तसा, साजे. १७
पडला पांडवहितकर वार्धक्षेमी क्ष्मातळीं[8] प्रेत.
सेनाविंदुसुतवधें पुरवी बाल्हीक तव अभिप्रेत[9]. २०
चेदीश धृष्टकेतु[10] हि, सत्यधृति[11] हि, वीर संगरीं मेला.
धर्मात्मजार्थ[12] सेनाबिंदु[13]कुरुश्रेष्ठ यमपुरा गेला. २१
शिशुपाळसुत सुकेतु, व्याघ्रें मृगसा, विदारिला द्रोणें,
मदिराश्व[14], सूर्यदत्त[14] हि; तेव्हां केलें न 'हा!' असें कोणें? २२
जो श्रेणिमंत[15], त्याची कुंतीच्या नंदनीं महाभक्ति,

---

१. प्रथमतः अपत्य नसल्यामुळे याने कुंतीस दत्तक घेतली होती. अर्थात हा ाडवाचा आजा: मामा कसा? मूळात हि असे च आहे! २. तदया पुत्राचा जय च्छिणाऱ्या द्रोणें. ३. शत्रु. ४. युद्धात मरणारास देवांगना वरतात; अर्थात ते वाचे जावई झाले. ५. द्रोणाच्या बाणानी शुद्ध झाले आहे शरीर ज्याचें. ६. ामर्थ्यवान् बाहु ज्याचे. ७. हत्तीस मारताना. ८. भूमीवर. ९. इच्छित. १०. शशुपालाचा मुलगा. ११. द्रुपदराजाचा मुलगा. १२. युधिष्ठिरासाठी. १३. ा नांवाचा कौरवश्रेष्ठ. १४. विराटबंधु. १५. 'गोशृंग' नांवाच्या पर्वतशिखरावर ाहणारा राजा.

जाला सत्कृत[1] अमरीं, समरीं करुनि क्रिया यथाशक्ति. २३
जो कीं यथार्थनामा[2] राजा! पांडवसहाय वसुदान,
आचार्यें काळकरीं दिधलें समराध्वरीं[3] तदसुदान[4]. २४
कथिले कांहीं कांहीं, मेले बहु वीर उभयपक्षांत.
भीष्म द्रोण वृकोदर अर्जुन हे दहन शत्रुकक्षांत[5]." २५

## अध्याय पांचवा.

ऐसा बहु बंधुक्षय[6] परिसुनि, तो भूमिवल्लभ[7] व्यथितें
चित्तें म्हणे, 'अहा! म्यां, हारविलें हातिचें हि भव्य[8], थितें[9]. १
सर्वांसि सुगम जालें मत्सेनारण्य, कीं, तयामधिले
जे जागरूक भीष्मद्रोणनरव्याघ्र, ते चि कीं वधिले. २
क्षात्रब्राह्मबळाश्रय[10] गुरु, तो ही जाहला चि शांत, नवा[11]
घडला पराभव कसा, जो मृत्युंजयी[12] तया हि शांतनवा? ३
कर्ण, द्रोण, पितामह, पडले जेव्हां महाप्रभव[13] शिष्ट,
सूता! संशय न धरीं, मद्वीर कबंधतुल्य[14] अवशिष्ट. ४
उरले कोण, किती, तें, सावध आहें अशांत, ऐकों दे:
जें मज मूर्छा येत्ये, ब्रह्मांड, भ्रमतमें[15] चि तें, कोंदे.' ५
"आहे अश्वत्थामा, कृतवर्मा, शल्य, कृप दुराधर्ष[16],
अद्यापि तो हि आहे, दे जो अक्षज्ञ[17] बहु तुम्हां हर्ष. ६
शल, चित्रसेन, दुःशल, सत्यव्रत, सत्यसेननाम बळी,

१. सत्कारयुक्त. २. वसुदान (धनदान करणारा) हें यथार्थ नाव असलेला. ३. युद्धरूपी यज्ञात. ४. त्याच्या प्राणांचें दान. ५. शत्रुरूप गवतात. ६. बांधवाचा नाश. ७. राजा धृतराष्ट्र. ८. कल्याण. ९. दुर्दैव्यानें. १०. क्षात्र व ब्राह्म या बलांचा आश्रयस्थान असा. ११. पूर्वीं न आलेला. १२. मृत्युला जिंकणारा. (इच्छामरणी). १३. महापराक्रमी. १४. धडासारखे. १५. भ्रमांधकारानें. १६. सामना करण्यास कठिण. १७. द्यूतज्ञ. (शकुनि).

पुरुमित्र, सुषेण, असे असति तुझे पुत्र, ज्यांसि इष्ट कली. ७
पुत्र जरासंधाचे श्रुतवर्मजयादि शेष आहेत,
कैतव्यांचा अधिपति जपतो पुरवावया तुझा हेत. ८
चित्रांगद श्रुतायू सधृतायुध चित्रसेन नररत्नें,
म्हणति, 'सपत्नप्राण ग्रासूं, साधूं तुझा चि जय यत्नें.' ९
कर्णाचे पुत्र तिघे, उरले बा! जेंवि भग्नपुच्छाही,
करितिल रण, तेजस्वी: पितृपरिभव साहवे न तुच्छा ही. १०
गजसेनेच्या मध्यें दुर्योधन शोभतो पुरंदरसा,
अत्यभिमानी रिपुबलजलधिमथननरशरीरमंदरसा." ११
भूप म्हणे, 'रे सूता! जयवार्ता दूर. काय तूं वदसि?
उरले खरे परेते चि: बहुत परजिती कबंध ही सदसी. १२
गुरु, कर्ण, भीष्म मेले: उरले ते मृत चि काय परिसों गा!?
वीर खरे ते गेले: शुद्धयशश्री कधीं न वरि सोंगा. १३
स्वजयप्रासादाचे पडले मोडोनि भीष्मगुरु खांब.
शोकभरें मज मूर्छा आली, क्षणमात्र संजया! थांब.' १४

---

## अध्याय सहावा.

इष्टविरहशोकोत्थित दुःसहमूर्छेंत लोटली घटिका.
कर्णवध क्षितिपतिच्या चित्तास गमे क्षणक्षणीं लटिका. १
शोषण जलराशीचें, संसर्पण जेंवि रत्नसानूचें,

१. शत्रूचे प्राण. २. दुखवले आहे शेपूट ज्यांचे असे साप. (एकदा मार खाऊन निसटलेला साप मारणारास पुन्हा कधी ना कधी तरी हटकून चावतो, अशी समजूत आहे). ३. इंद्रासारखा. ४. शत्रुसैन्यरूपी समुद्र घुसळण्यास मानवदेहरूपी मंदरपर्वतासारखा. ५. मृत. ६. परजतात, फिरवितात. ७. धड. ८. तीक्ष्ण तरवार. ९. प्रियजनांच्या वियोगशोकापासून झालेल्या. १०. धृतराष्ट्राच्या. ११. चलन. १२. मेरूचे.

अद्भुत वृषमरण गमे कीं गगनाहूनि पतन भानूचें! २
नृपति बहु विलाप करी सूतासि म्हणे, "अहा! कसें घडलें?
बा संजया! अकस्माद्रविबिंब गळोनि भूतळीं पडलें! ३
जो सिंहद्विपविक्रम, वीर, वृषस्कंध, वज्रसंहनन,
वृषगति, वृषाक्ष, वृषहठ वृष, त्याचें मज मृषा गमे हनन. ४
ज्याच्या भुजाश्रयें करि दुर्योधन पांडवांसवें वैर,
क्षत्रकुळीं राम जसा, शत्रुजनीं नित्य वर्तला स्वैरः ५
कृष्णधनंजययादववीरांतें जो कथंचन न मानी,
'गांडीवशार्ङ्गधन्वे मर्दीन' म्हणे 'सर्वंधुजन' मानी. ६
चिंतेंत जो म्हणे, 'मीं मारुनि कृष्णार्जुनांसि, या महिला
साधुनि देईन, सख्या! राया दुर्योधना! वदें वहिला.' ७
बा! जेणें दिग्विजयीं पुंड्र, तरल, काशि, कोशल हि, वंग,
कैकय, मद्रक, तंगण, कांबोज, कलिंग, मस्त्य, शक, अंग, ८
गांधार, सुह्म, चीरक, आवंत्य, निपाद, अश्मक, विदेह,
पांचाल, कुलिंद, ऋषिक केले जिंकूनि करद, सस्नेहः ९
तो दुर्योधनसेनापति कर्ण कसा धनंजयें वधिला?
अंध छिन्नभुज हि मीं न तरेन शुगंब्धिला गतावधिला. १०
वृष शक्र सुरांत प्रभु, कीं वृष दुसरा नरांत कर्ण, असा

१. कर्णाचें मरण. २. [चपलतेनें] सिंहासारखा व [बलानें] हत्तीसारखा पराक्रमी. ३. बैलाच्या खांद्याप्रमाणें बळकट खांदे ज्याचे असा. ४. वज्रदेही. ५. बैलाप्रमाणें आढ्यतेनें चालणारा, लाल डोळे असणारा व झुंजणारा असा वृष (कर्ण). कर्णाचें 'वृष' हें नांव यथार्थ आहे हें दाखविण्यासाठीं हीं विशेषणें योजिलीं आहेत. ६. परशुराम. ७. कोणत्या हि प्रकारें. ८. गांडीव व शार्ङ्ग हीं धनुष्यें धरणारे अर्जुनकृष्ण. ९. त्वरित. १०. पांडव अरण्यवासांत असतां कर्ण हा पुंड्र इत्यादि राजांवर दिग्विजयास गेला होता. ११. तुटले आहेत हात ज्याचे असा. १२. गेली आहे सीमा ज्याची अशा, अमर्यादित शोकसागराला. १३. इंद्राला हि 'वृषन' असें एक नांव आहे.

तिसरा न पेकिला ज्यां, तो पार्थें मारिला प्रवीर कसा? ११
उच्चैःश्रवा हयांत, त्र्यंबकसख 'राज'शब्दधारित्यांत,
प्रवर सुरांत पुरंदर, वैकर्तन हि प्रहारकारित्यांत. १२
ज्याची, कुरुयदुभिन्नक्षितिपनिरोधीं नृपा जरासंधा
दे, भगवती, अभयवरदान, श्रितवज्रपंजरा संधी. १३
तो वधिला पांडुसुतें कांतिजितस्वर्णवर्ण कर्ण रणीं;
शोकार्णवीं बुडालों; जालों हतपुत्रमित्र वृद्धपर्णी. १४
वज्राहुनि कठिन हृदय, शोकघनाहत तें न्हीं तगे, न चिरे.
बा! दग्धपक्षबळ मीं संपातिद्विज तसा जगेन चि रे! १५
पावककुंडांत शिरूं? कीं सेवूं संजया! महाविष मीं?
किंवा चढों पडाया मरणार्थ महाद्रिच्या शिरीं विषमीं?" १६
संजय म्हणे, 'महर्षिप्रतिमा! विव्हळ न हो विषादानें;
मरण अकाळीं न घडे भृगुपातें, पावकें, विषादानें. १७
तुज शुचि-वंश-यश-श्री-श्रुत-तप-इत्यादिसद्गुणीं युक्ता
संत ययाति म्हणति; या त्यजितिल पाहोनि मतिगृहोन्मुक्ता.'

१. वीरश्रेष्ठ. २. इंद्राचा घोडा. ३. कुबेर. ४. 'राज' हे नाव धारण करणाऱ्यात. ५. श्रेष्ठ. ६. इंद्र. ७. कर्ण. ८. अर्थ—ज्याची आश्रिताना वज्राच्या पिंजऱ्यासारखी रक्षणक्षम अशी भगवतीरूप प्रतिज्ञा कौरव व यादव शिवाय-करून सर्व राजांस जिंकण्याच्या कामीं नृपा जरासंधा अभयवरदान दे तो कर्ण. ९. कांतीनें जिंकला आहे सुवर्णाचा वर्ण ज्यानें असा. १०. मारले गेले आहेत पुत्र व मित्र ज्याचे. ११. शोकरूपी घणाने मारिलें असतां हि. १२. जळाले आहेत पंख व बळ ज्याचें असा, (पक्षीं) जळाले आहेत पक्षांतील लोक व सैन्य ज्याचे असा. १३. जटायूचा भाऊ. १४. महापर्वताच्या. १५. कठिण अशा. १६. ऋषितुल्या! १७. कड्यावरून उडी टाकिल्याने. १८. विषसेवनाने. १९. वेदशास्त्रे. २०. बुद्धिरूप घर सोडले आहे ज्यानें अशा तुला पाहोनि संत 'ययाति' शब्दांतील 'या' त्यजितील ('यति' म्हणतील). २१. 'ययाति' नामांतील मध्यम वर्ण—**पंत.**

'धृतराष्ट्र म्हणे, "साधो! दैव चि परमप्रभु[1] प्रसिद्धगुणें[2],
कीं सत्यकाम[3] तैसें पौरुष नोहे चि; हें उदंड उणें. १९
दुर्बळ पौरुष साचें, कीं वांछित सर्व ही न साधे या,
छेदी पार्थ कुठारें[4] दैवबळें शालशाखिराधेया[5]. २०
मारुनि युधिष्ठिराच्या वीर्यवती सुरचमूनिभा सेना,
मेला कर्ण म्हणासि, हें सत्य विचारेंकरूनि भासेना. २१
मेला कर्ण तऱ्हि कसा तच्छोकें संजया! न मेलों मीं?
देवीं[6] मदायुसंख्या केली माझ्या चि मज गमे लोमीं. २२
होते म्हणत मला 'हा प्रियसख[7] कुरुराज नाकपाळाचा[8],'
तदधिक गमें शतगुणें संततिनें मीं जना कपाळाचा[9]. २३
आतां ते चि 'करंटा' म्हणतील मला अशी दशा आली;
या दुर्दशेसि लोकत्रितयीं नाहीं च संजया! आली[10]. २४
हे गांधारी जऱ्हि शतपुत्र, मुनींच्या[11] अनुग्रहें, व्याली,
झाली वंध्या चि पहा. बहु नियति[12] क्रौर्य धरि, न हे व्याली[13]. २५
कर्णामागें जरि मीं वांचेन क्लेश कोणते अन्य?
जन निंदितील ते चि स्वमुखें जे बोलिले मला 'धन्य.' २६
कर्णरहित सुख तैसें लोकीं श्रीहीनजीवन[14] स्पष्ट,
नष्टस्वकीर्तिसत्कृति[15] जन पावे ते न नारकी[16] कष्ट. २७
पंगूस गमन, वांछित अधना, तृषितास नीरकणपानें[17]
तृष्णाशमसम दुर्घट पुत्राभिप्राय मज गमे ज्ञानें. २८

१. सर्वसमर्थ. २. पौरुष अथवा पराक्रम निष्फळ करून टाकण्याचा दैवाचा गुण प्रसिद्ध आहे. ३. ज्याची इच्छा सत्य (सफल) होते. ४. कुऱ्हाडीनें. ५. शालवृक्षाप्रमाणें उंच व बलवान् असणाऱ्या कर्णास. ६. देवांनीं माझ्या आयुष्याची संख्या माझ्या शरीरावरील केसांइतकी केली आहे असें वाटतें! ७. प्रिय मित्र. ८. इंद्राचा. ९. नशीबाचा, भाग्यवान्. १०. सखी, जोडी. ११. व्यासाच्या. १२. दैव. १३. सर्पीण. १४. धनहीन जिणें. १५. नाहींशी झाली आहे स्वकीर्ति व सत्कार ज्याचा असा पुरुष. १६. नरकांत पडलेला. १७. पाण्याचे थेंब प्याल्यानें.

माझा सुत दुःशासन भीमें वधिला असें तुवां कथिलें.
तेणें भस्म चि झालें कर्णद्वय जेंवि पाजिल्या कथिलें. २९
व्याघ्र पहातां होतो जेंवि बहुत्रस्त[1] कातराक्ष[2] ससा,
मी काय पुत्र, येतां भीम करायासि घात राक्षससा? ३०
शोकद तोखद ही सद्व्रत, न च्युतवीरपुत्रवध, मातें[3].
कीं, इहपरत्र नाहीं धर्मभ्रंशें सुकीर्ति अधमातें. ३१
सत्यप्रतिज्ञ भीम स्तुति पावे बंधुकंठलोहितपानें[5],
मारी वसिष्ठसुतशत जो मुनि[6] विश्वांत कीर्ति तो हि तपानें. ३२
झाला वितृष्ण[7] मत्सुतरक्ताच्या, यातुधानसा[8], पानें:
हें नवल काय? बापा! त्यजिजे तृषितें दुधा न सापानें. ३३
दैव चि मुख्य, जयपराजयवर द्याया जनास, दैवत रे!
तदनुग्रहें चि सर्वव्यसनमकरसादना[9] सदैव तरे. ३४
'न करीं युद्ध, नव्हे हित' धर्म म्हणे, तें चि जाहलें तथ्य[10];
तें दुर्योधन नेघे, आतुर[11] जैसें सुवैद्यमत पथ्य. ३५
शरतल्पशयानें[12], जळ जेव्हां मागीतलें, नृपें तृषितें,
भूतळ भेदुनि दे जळधारा पानार्थ पार्थ त्या ऋषितें. ३६
तेव्हां म्हणे महात्मा गांगेय, 'अगा सुयोधना! बापा!
हो शांत; पांडवांसीं सख्य करीं: पावसी वृथा तापा. ३७
केली पहा क्षणांत क्षितितळ भेदूनि अंबुधारा[13], हें

१. फार भयभीत. २. भयाने चंचल नेत्र ज्याचे. ३. माते सद्व्रत शोकद तोखद हीं; च्युतवीरपुत्रवध न=युद्धांतून पळून न जाता मरणे हे सद्व्रत मला पुत्रमरणामुळे दुःख देणारे व वीरास उचित अशा वर्तनामुळे संतोष देणारे आहे; पण युद्धातून पळून जाताना झालेला पुत्राचा वध मला दुःख किंवा संतोष देणार नाही. ४. हे आर्यागीति—**पंत.** हीत गीतीपेक्षा शेवटीं एक गुर्वक्षर अधिक असते. ५. दुःशासनाच्या कंठातील रक्त प्याल्याने. ६. विश्वामित्र. ७. तृष्णारहित. ८. राक्षसाप्रमाणे. ९. सर्वसंकटरूपी मगराच्या गृहास—समुद्रास. १०. खरे. ११. रोगी. १२. बाणांच्या बिछान्यावर निजलेल्या भीष्माने. १३. जलधारा.

विजय[1]प्रतापकौशल जाणोनि उगा चि तूं बुधा! राहें. ३८
हें युद्ध मदंतं[2] असो, सेवा सख्यें चि सर्व बंधु रसा[3];
शांति घडेल प्रशमें, मज तों वाटे न गर्व बंधुरसा[4].' ३९
तें प्रिय हित सत्य न घे मत्सुत, आतुर[5] जसा न अगदा[6] पी;
रोग्यासि बद्धमूळ[7] प्रबळ महारोग कां न मग दापी[8]? ४०
शोचित असेल आतां आठवुनि स्वहितबोध तो मानी,
[9]तापें तापोनि न जो जायाचा कोटिसूर्यसोमानीं. ४१
मेले पुत्र, अमात्य, घृतें; हें दुःख पावलों मोटें.
कोठें कवणा आलें यश करितां कर्म आग्रहें खोटें? ४२
दाउनि लोभ खगातें धरिति जसे बाळ, पक्ष कातरिती,
ताडिति नुडवे[10] जरि; बहु विपदाः योग्या सरावया तरि [11]ती.
फुटतील पक्ष केव्हां तरि, दैवबळें तुटेल ही बंध;
त्या छिन्न[12]पक्षविहगापरिस बहु व्यसन पावलों अंध. ४४
स्वगुरुपितामह वधिले युद्ध न करितां बळें अधर्मानें,
दृढ राज्यलोभ धरिला, सत्यव्रत आपुलें न, धर्मानें. ४५
[13]कपटें विजयें धर्में वधिले; पांचाळ काय? पामर ते;
न्यायें भीष्म-द्रोण न वज्रधरकरें हि सर्वथा मरते. ४६
[14]अनवरत करित असतां दिव्यास्त्रांचा प्रयोग, राधेया

१. अर्जुनाचा पराक्रम व अस्त्रकौशल्य. २. मरण्या अंतापर्यंत. ३. पृथ्वी. ४. चांगलासा, श्रेयस्कर. ५. रोगी. ६. औषधाला. ७. जुनाट, मुळें खोल गेलेला. ८. दावी, नाश करी. ९. अन्वयार्थ—जो कोटिसूर्यसोमानीं (कोटिसूर्यकिरणांनीं) तापोनि न जायाचा तो मानी (दुरभिमानी दुर्योधन) तापें (झालेल्या तापामुळें) स्वहित (भीष्मद्रोणादिकांनीं केलेला आपल्या हिताचा उपदेश) आठवुनि शोचित असेल. १०. उडवेना. ११. विपदा. १२. तुटक्या पंखांच्या पक्ष्यापेक्षा. १३. शिखंडीच्या मागें राहून बाण मारणारा अर्जुन व 'नरो वा कुंजरो वा' हें खोटें भाषण करणारा धर्म हे च भीष्मद्रोणांचे मारक होत, असा भाव. १४. निरंतर.

शिवला मृत्यु कसा रे!? वाटे माझें चि दैव बाधे या. ४७
घे कवचकुंडलांतें प्रार्थुनि, दे दिव्यशक्ति[1], हरि ज्याला;
त्यजिली घटोत्कचीं जी, यत्स्पर्शें न क्षणार्ध अरि ज्याला[2]; ४८
ज्याच्या, सर्पमुख[3] महाशर, चंदनचूर्णपूर्णसुनिषंगीं[4]
नित्य वसे, परदुःसह[5] कोप जसा जामदग्न्यमुनिसंगीं[6]; ४९
तात[7] रथातिरथांच्या संख्येंत म्हणे जयासि 'रथ अर्धा,[8]'
जो ब्रह्मास्त्रज्ञ करी भीष्मद्रोणांसवें सदा स्पर्धा; ५०
द्रोणादि विमुख होतां[9], अभिमन्यूचें धनुष्य जो तोडी,
जो भीमातें जिंकुनि उपहास करी, न मारितां सोडी; ५१
घालुनि धनुष्य कंठीं सहदेवा अभयदान दे, हांसे,
त्यास गमे त्या चापाहुनि काळाचे बरे गळां फांसे; ५२
इतुक्या हि दिसांत रणीं ज्याचें बहु भय धरूनियां पोटीं,
द्वैरथ[10] पार्थ करीना, युद्धें केलीं हि जऱ्हि महा मोटीं; ५३
तो कैसा त्या पार्थें वधिला? त्याच्या पराहितरथातें[11],
धनुतें, कीं शस्त्रातें, भंग चि झाला; नव्हे इतरथा[12] तें[13]. ५४
निश्चित धरा रथातें, पळपिंडातें[14] गिळी जसी मकरी,
जाररता[15] कुलटासी[16], पतिबांधवघात हा असीम[17] करी. ५५

१. दिव्यशक्ति. २. जगला. ३. सर्प आहे मुखी ज्याच्या असा. ४. चंदनचूर्णानें भरलेल्या भात्यात. ५. शत्रूस असह्य. ६. परशुरामाच्या संगी. (कोपाविषयीं जमदग्नि च अधिक प्रसिद्ध आहे). ७. भीष्म. ८. अर्धरथी. ९. पराजित होऊन परत फिरले असतां. १०. रथयुद्ध. (कर्णाजवळील इंद्रानें दिलेली महाशक्ति घटोत्कचवधानें नाहींशी होईपर्यंत कृष्णानें अर्जुनास कर्णाबरोबर युद्ध करूं दिलें नाहीं). ११. शत्रूंचे अहित करणाऱ्या रथास. १२. अन्यथा, नाहीं तर. १३. कर्णाचें मरण. १४. मांसपिंडास. १५. जारिणी. १६. औरस नसलेल्या पुत्रास. १७. अमर्याद, फार. अन्वयार्थ—जसी मकरी पळपिंडातें गिळी, [व] जाररता कुलटासी (व्यभिचारानें झालेल्या अनौरस पुत्रास) हा असीम पतिबांधवघात करी [या भीतीनें] गिळी, (पुत्रास मारते) [तसी] धरा [कर्णाच्या] रथातें

याच्या चि बळें याचें अत्यंताकृष्ट मोडलें चाप,
शर ओढितां चि निद्राभंगें कीं झोंबला करीं साप. ५६
'पार्थं न हन्मि यावत्पादौ तावन्न धावयेऽहमिति.'
घोरं यस्य व्रतमिदमहह! कथं सोऽप्यगाल्लयं समिति? ५७
'जोंवरि अर्जुन मारुनि तन्मांस शिवादिकां न भरवीन,
तोंवरि मी पायांचें नीट न धावन करीन, करवीन.' ५८
हें ज्याचें घोरव्रत, पार्थ म्हणे ज्या 'महारिपु': त्रास
ज्याचा त्रयोदशाब्द न लागों दे नीज धर्मपुत्रास: ५९
ज्याच्या बळें मदात्मज पांडुसुतांची मनःप्रिया राणी
पति देखतां सभेंत, स्वकरें केशीं धरुनियां, आणी: ६०
'दासांच्ये भार्ये! तुज पति नसती, म्हणसि पांच जरि, असती!
हे षंढतिळांसम वर, अन्य वरीं, कुरुसभेंत बहु असती.' ६१
इत्यादि रूक्ष वाणी कृष्णेला जो सभेंत आयकवी:
तसें कथाप्रसंगीं तरि वक्ता ही वदेल काय कवी? ६२
'कुंतीसुतांसि भीष्मद्रोण न वधितील पक्षपातानें,
तरि मी सुयोधना! तुज सुखवीन तुज्या सपत्नघातानें. ६३
अहिमुखशरवरकार्मुकदंडधर स्वभुज, काळ जीवा हे
रिपुच्या, असतां: राज्या! कां तूझें चित्त काळजी वाहे?' ६४

निश्चित गिळी, असो, किंवा, धरा जारता कुलटासी (व्यभिचारिणीप्रमाणे होऊन— दुर्योधन राजा नको, धर्म हवा, असें वाटून व) हा (कर्ण) पतिव्रतवधात (धर्म व त्याचें वध याचा घात) असे करी [म्हणून] पळीपिडानें जशी मकरी गिळी [तशी कर्णाच्या] रथानें निश्चित गिळा.

१. अत्यंत ओढलेलें. २. अर्थ—मी जोपर्यंत पार्थास मारिलें नाहीं तोपर्यंत पाय धुणार नाहीं, असें ज्याचें घोर व्रत होतें, अरेरे! तो हि युद्धांत कसा बरें नाश पावला? ३. कोल्हा इत्यादिकांस. ४. भय. ५. तेरा वर्षे. ६. अमांधित्र! ७. उत्पादनशक्तिहीन तिळासारखे. (नपुंसक). ८. कठोर. ९. शत्रुनाशानें. १०. सर्पमुखबाण व उत्तम धनुष्यदंड यांस धरणारे.

कृष्णेसि 'अपति'[1] ऐसें म्हणतां ज्याचें न लेश भी मन तें,
सोसिति निबद्ध[2] हरिसे, करुनि मुखें, वीर ते सभीम, नतें.[3] ६५
ज्याच्या दृष्टींत, न ते सहसुत पांडव बळी, न कंसारी[4]:
जो मृत्युला हि न गणी, जैसा योगी मुनी असंसारी;. ६६
ज्याच्या मतें सुयोधन करि दूता शौरिचा[5] अव्हेर जनीं*:
द्यूतापासुनि सुखदा, धर्माला यद्वयें, नव्हे रजनी[6]; ६७
जो रामशिष्य नोहे भ्यायाचा सामरा हि सुत्राम्या,[7]
त्या कर्णासि वधी जो, 'धन्य' म्हणावें चि पांडुपुत्रा त्यां.[8] ६८
जाला बंधुसुहृत्सुतसत्कीर्तिश्रीसुयोधनाश, रण
करितां साधुजनासीं: नाहीं त्रिजगीं सुयोधना शरण. ६९
तव कथित सत्य हें मज वाटे; परि कर्णवध गमे न खरा:
नखरांहीं नृहरि[9] चिरी जें उर[10] पविचा उरो न दे नखरा. ७०
अभिमानी, दुर्बुद्धी, अजितेंद्रिय, नायकें सुहृद्बोध:
दाटूनि सज्जनांसीं करि वैर स्वैर भैरवक्रोध[11]; ७१
कळत कळत जो, काळव्याळमुखीं प्रकट बाहुला दपटी,[12]
तो, कर्णनाश होतां, दुर्योधन काय बोलिला कपटी? ७२
दुःशासनगळरक्त प्राशुनियां ओंठ चाटितां ओले,
भीमाकडे विलोकुनि दुर्योधन काय संजया! बोले? ७३
या नाशाचें मूळ द्यूत, तयाचें हि मूळ शकुनी, ती
कर्णाची गति होतां काय वदे तो असज्जन कुनीती? ७४
काय म्हणे कृतवर्मा? काय म्हणे द्रोणपुत्र कर्णवधीं?
काय वदे शारद्वत कृप[13]? बोले काय मद्रराज तधीं? ७५
वदले काय सहाय क्षितिपति, न करूनि पार्थहृन्मथन[14]?

१. पतिरहिता. २. बाधलेल्या. ३. खालीं घातलेल्या मुखानें. ४. कृष्ण. ५. कृष्णाचा. ६. रात्र. ७. इंद्रास. ८. त्राता. ९. नृसिंह, (पक्षी) नरश्रेष्ठ अर्जुन. १०. हिरण्यकशिपूचें, (पक्षीं) कर्णाचें. ११. भयंकर आहे क्रोध ज्याचा. १२. दडपी; जोरानें घाली. १३. कृपाचार्य. १४. अर्जुनाच्या हृदयाचें मथन. * जनीं.

तो सर्पमुख शिलीमुख निष्फळ जाला कसा? करीं कथन."
ऐसे विलाप पुष्कळ करुनि पुसे भूप कर्णवधवार्ता,
ज्याच्यासमीप देवी गांधारी, तत्स्नुषा हि अंधवार्ता. ७७

## अध्याय सातवा.

संजय म्हणेः–नृपाळा! द्रोणवधानंतर, त्वदात्मजनीं,
कर्तव्यार्थ विचारी सर्वस्वसहायभूवराप्तजनीं. १
त्या सर्वांत नृपातें बोले, आचार्यपुत्र मेधावी,
ज्याच्या नीतिश्रवणीं ज्ञात्यांची चित्तवृत्ति वेधावी. २
'जे आमुचे महामति योद्धे होते प्रसिद्ध सुरकल्प,
त्यांहीं संप्रति युद्धीं वरिलें विक्रम करूनि शरतल्प. ३
युक्त चि तें स्वाम्यर्थी वीरांला, कीं कृतार्थ जन्म रणीं;
वरिति स्वयंवरवधू सद्गति सत्कीर्ति या चि सन्मरणीं. ४
नैराश्य उचित नोहे, स्पष्ट करावें धरूनि आंव रण,
'यत्नें परबळ भेदूं, भेदिति योगें चि जेंवि आवरण.' ५
भीष्मद्रोणवियोगज्वरतप्ता निजमनांत तव सेना
इच्छी आलिंगाया कर्णातें, अन्य कांत गवसेना. ६
हा रामशिष्य; अद्भुत गुण याचे; करिल शत्रुबळहानी;
याणें दिग्विजयीं बहु नृप केले भग्नदर्प कळहानीं.' ७
प्रेम प्रथम चि कर्णी, वर्णी गुरुपुत्र वीर हि तशांत,

१. बाण. २. विधवा झाल्यामुळे दुःखित अशा. ३. तुझा पुत्र. ४. पुढे काय करावें यासाठीं. ५. सहायास आलेले राजे व आप्त यांत. ६. बुद्धिवान. ७. ज्यानें सांगितलेली नीति ऐकल्यानें. ८. देवासारखे. ९. बाणशय्या. १०. अन्वयार्थ– या चि सन्मरणीं (युद्धांत मरण आल्यानें) सद्गति [व] सत्कीर्ति [या] स्वयंवरवधू वरिती. ११. उत्साह. १२. [अज्ञानरूपी] आच्छादन.

कीं निश्चयें सुयोधन मानी राधेय एक हित शतें.[1] ८
राधेयासि म्हणे नृप, 'कर्णा! मज ठाउकी तुझी शक्ती;
जाणें[2] माजाठायीं जें सौहृद[3], जे हि शुद्ध गुरुभक्ति[4]. ९
भीष्म पितामह दशदिन मत्सेनानाथ जाहला पहिला,
तेणें पार्थासि दिलें अभय, जसें दुग्ध पाजिलें अहिला. १०
मग बळपति गुरु केला, युद्ध करी दिवस पांच, वीरा जे,
माझे मुख्य रिपु, तयां न वधी च, न येरें[5] वांचवी राजे. ११
तंव अनुमतें चि दोघां वृद्धांचा मान रक्षिला; परि ते,
पार्थासि अभय देउनि, माझा चि विनाश जाहले करिते. १२
स्वामिद्रोहाचें फळ दोघे ही पावले चि विस्पष्ट;
तो[6] एक तसा मेला, शरतल्पीं एकें[7] भोगितो कष्ट. १३
तूं माझी परमगती[8], म्हणुनि विनवितों अगा महाबाहो!
तव भुज या तरलश्रीवडवावदनीं[9] लगाम हा बा! हो. १४
पति[10] पहिला चि, परि पुन्हां सेनापति मत्प्रियार्थ तूं हो गा!
जनकयशोर्थ[11] श्रीपति[12] वरि पुनरपि जेंवि जानकीयोगा[13]. १५
हो माझा सेनापति सुरसेनानाथ तो जसा स्कंद[14],
कंदर्प[15] हरें तैसा, त्वां कीजे भस्म सधनु तो[16] मंद. १६
अरिकरिघटा[17], पहातां तुज नरसिंहा, विमूढगति[18] होऊ;
जसि मर्कटांसि रुचिदा, तसि तव बाणांसि शत्रुचिति[19] हो ऊं[20].
उदयापूर्वीं च हरी तेजोलेशें चि जेंवि सूर[21] तमें,
नाशावीं अहितबळें एकें चि शरें तुवां हि शूरतमें[22]. १८

१. शंभरात. २. मी जाणतों. ३. मैत्री. ४. स्वामिभक्ति. ५. दुसरे. ६. द्रोणाचार्य. ७. भीष्म. ८. अंतिम आश्रयस्थान, सर्वस्व. ९. चंचललक्ष्मीरूप घोडीच्या मुखांत. १०. सेनापति. ११. जनकराजाची कीर्ति वाढविण्यासाठीं. १२. विष्णु. (राम). १३. जानकीच्या संबंधानें. १४. कार्तिकस्वामी. १५. मदन. १६. अर्जुन. १७. शत्रुरूप गजसेना. १८. भयानें मूढ झाल्यामुळे कुंठित झाली आहे गति जिची अशी. १९. शत्रुसमुदाय. २०. जीवविशेष. २१. सूर्य. २२. अतिशूरानें.

हरिसीं भिडतां सेना पावलि विजयास दानवी नाहीं,
रिपुपृतना[1] स्वभुजांहीं त्वां हि विमथिल्या सदा नवोनाहीं. १९
कर्णा! सख्या! निवारुनि विघ्नकरें[2] सर्व हीं असत्कटकें,[3]
विजयश्रीसीं मजसीं योग[4] करावा तुवां चि सद्घटकें.[5] २०
ऐसी निजविजयार्थें,[6] कर्णाची प्रार्थना करी राजा,
गुरु मेला असतां, शरतल्पीं असतां विभिन्नतनु[7] आजा. २१
भीष्म-द्रोण महाबळ, करि त्यांचा दुष्ट दैव घात रणीं;
रिपुबळजळधींत[8] धरी कर्णोडुप,[9] जन्हि बुडे महातरणी.[10] २२
गुरुसेतु[11] भंगतां, बहुदुस्तर विपदंबुराशि[12] उतराया
कर्णाच्या कासेला लागे, भागे, त्वदीय सुत राया! २३
कर्ण म्हणे, 'हें वदलों होतों पहिलें चि राजसुत्रामा[13]!
कीं, सर्व वृद्ध परहितें,[14] एकें वधिजेल पांडुपुत्रा म्यां. २४
होईन सर्वसेनापति मीं, मारीन पांडवांस रणीं;
स्थिर हो राया! रिपु यमनगरीची न धरितील कां सरणी[15]? २५
म्यां जिंकिले चि कृष्णासह पांडव सर्व हीं असें जाण;
अतितूर्ण[16] चूर्ण करितिल वज्रांत हीं सुतीक्ष्ण मद्बाण.' २६
एवंविधें[17] राधेय क्षितिपतिवृंदांत जेधवां बोले,
परमानंदें राया! दुर्योधन भूप तेधवां डोले. २७
मग विध्युक्त ब्राह्मणभूपतिसमवेत तव सुत, प्रेमें
कर्णी अभिषेक करी, वांटी गज, वाजि, गोधनें, हेमें. २८
म्हणति द्विज, नृप, बंदी,[18] 'हे सेनानायका! महाबाहो!

१. सेना. २. विघ्न करणारीं. ३. दुष्ट सैन्यें. ४. संयोग. ५. चांगल्या योजकानें. ६. आपल्या जयासाठीं. ७. छिन्नविच्छिन्न झालें आहे शरीर ज्याचें. ८. (मय-पक्षीं) शत्रुसैन्यरूप पश्चिमसागरांत. ९. कर्णरूप लहान नौका किंवा कर्णरूप चंद्र. १०. मोठी नौका किंवा सूर्य. ११. द्रोणरूपी पूल. १२. विपत्तिसागर. १३. राजश्रेष्ठा! १४. शत्रूंना हितकारक असें. १५. मार्ग. १६. फार लवकर. १७. याप्रकारें. १८. स्तुतिपाठक, भाट.

तव भुज विजयी व्हावे, कुरुपतिचा सिद्ध काम हा बा ! हो.' २९
अभिषिक्त कर्ण शोभे बहु, जैसा दिव्यरूप[1] सेनानी[2]:
केला जयजयकार प्रेक्षुनि तें तेज भूपसेनानीं. ३०
'छविनें[3] मलिना विधु[4]ला, द्युतिनें[5] हि त्यजुनि नीरसा रविला,'
प्रेक्षक म्हणति, 'स्वरसें हा हृत्प्रिय[6] कर्णवीर सारविला[7].' ३१
म्हणती राजे, 'साजे तेजस्वी पुत्र कर्ण हा रविला:
याच्या शरीरवर्णें परितप्तसुवर्णवर्ण हारविला[8].' ३२
सेनेला पति मिळतां वीरमणी कर्ण, दक्ष जो सुहिता,
कृतकृत्य होय तव सुत, जेंवि पिता अर्पितां वरीं दुहिता[9]. ३३
कर्णें देतां अभय, स्वसहाय नृप प्रमोद ही कळतां
स्वबळें सिद्ध करवी तव नंदन पूर्वयामिनी[10] टळतां. ३४
मग 'योग[11] योग' ऐसा सहसा उठला बळीं महाशब्द;
दुंदुभिसमूह गर्जति, वर्षारंभीं[12] नृपा ! जसे अब्द. ३५
गज, वाजि, रथ, पदाती यांची रात्रीं च सिद्धता होय,
तेव्हां उठे महाध्वनि, अंबुधिचें क्षोभतां जसें तोय. ३६
राधेय सिद्धयोद्धयांमध्यें[13] भासे, जयासि शंकर[14] वी,
तो स्कंद प्रभु आला कीं सर्वक्षत्रगुरु विशंक रवी. ३७
जो कांचनमणिखचित, श्वेतपताका जयावर विराजे,
कर्णरथ, तुळिति खसरि[15]च्चुंबितशिखमेरुसीं च कविराजे. ३८
तो नागकक्ष[16]केतु स्यंदनवर, शस्त्रपूर्ण, कर्णाचा,

१. अलौकिक तेज असलेला. २. कार्तिकस्वामी. ३. शोभेने. ४. चंद्राला. ५. जाने. ६. मनाला आवडणारा. ७. लिपला, भूषविला. (चंद्रसूर्यापेक्षा हि कर्ण धिक शोभूं लागला. चंद्र मलिन व सूर्य नीरस आहे; पण कर्णांत हे दोष व्हते). ८. मागे टाकला. ९. कन्या. १०. पूर्वरात्र. ११. मोठा लाभ. १२. विसाळ्याच्या सुरुवातीला. १३. लढण्यास सिद्ध झालेल्या योद्धयांत. १४. जन्म. १५. आकाशगंगेस लागले आहे शिखर ज्या मेरुपर्वताचें त्याप्रमाणे. १६. तीचा सांखळदंड आहे ध्वजावर ज्याच्या असा उत्तम रथ.

ज्यासि बलाकाभ[1] तुरग वाहति, जव दाविती सुपर्णाचा[2]. ३९
राधेयपताकेचा होता मागें चि तेथवां तोल,
तो लक्षिला नृपा! ज्यां परिभवपिशुन[3]प्रभंजनालोल. ४०
कर्ण अभेद्य सुमकरव्यूह रचोनि[4], स्वयें मुखीं[5] राहे,
कौंतेयांसि क्षुधित क्षुब्धप्रळयोग्रकाळसा पाहे. ४१
सौबळ वामीं[6] नयनीं, वीर उलूकाख्य लोचनीं दक्षीं[7],
गुरुपुत्र व्यूहशिरीं, सांग[8] धनुर्वेदवास ज्या दक्षीं. ४२
ग्रीवास्थानीं[9] सारे तव सुत, मध्यें सुयोधन विराजे,
त्याच्यासमीप पुष्कळ वसति रिपुध्वांतराशिरवि[10] राजे. ४३
वामपदीं नारायणबळगोपाळांसमेत[11] कृतवर्मा,
दक्षीं सदाक्षिणात्य[12] त्रिगर्त, कृप, धृतधनुष्य[13] धृतवर्मा. ४४
मागील वामचरणीं निजसैन्यसमेत शल्य जो मामा,
पश्चिमदक्षपदीं[14] गजबळपति वर्ते सुषेण संग्रामा. ४५
नृप चित्र चित्रसेन, व्यूहाच्या, सबळ वर्तती, पुच्छीं;
बहु लुब्ध स्वच्छयशीं, भ्रमरप्रभु जेंवि मालतीगुच्छीं. ४६

१. बकासारखी कांति असणारे. २. गरुडाचा. ३. पराजयसूचक (तोंडावर येणाऱ्या) वायूने हलणारा. ४. चांगल्या मगराच्या आकाराप्रमाणें सैन्याची रचना करून. ५. अग्रभागीं. ६. डाव्या. ७. उजव्या. ८. अंगासह. (धनुर्वेदास उपांगभूत असलेल्या विद्यांसह). ९. मानेच्या ठिकाणीं. १०. रिपुरूप अधःकारराशीस केवळ सूर्य. ११. संसप्तकासह. (मी कृष्णाबरोबरीचा आहें, असा या नारायणांपैकीं प्रत्येकास अभिमान असे). १२. दक्षिणेंतील सैन्यासह. १३. धनुष्य धारण केलेला. १४. मागील उजव्या पायाचे ठिकाणीं.

# अध्याय आठवा.

## (प्रथमदिनयुद्ध).

मकरव्यूह विलोकुनि 'पहा' म्हणे धर्म सव्यसाचीसि[1],
'कर्णें केली[2] रचना दिसत्ये, द्यायासि भव्य, साचीसी[3]. १
सूत[4] वरुनि लाजे कुरुवरगुरुविरहाकुळा, कृशा निपट[5],
अरिसेना, काढीना धूलिपटलमिष[6] मुखावरूनि पट. २
वत्सा! धनंजया[7] बहु झालीं तरि रोधितील काय तणें[8]?
करिती निजपथदूषककंटकमुखभंग[9] सुज्ञ पायतणें[10]. ३
गोमायुगृध्रपलभुक्परिवारा[11] मृत्युलागि आवतणें[12]
दिधलें कुरुसैन्यांनीं; दाविति दावानळासि आव तणें. ४
कौरवबळांत उरला अति दुर्जय कर्ण; हा तुझा वांटा;
कुशळशरकरें[13] काढीं मम हृदयांतील पव्हडा कांटा. ५
ज्यां शल्य[14] सोसिलें निजहृदयीं वर्षें समग्र बारा हें,

१. अर्जुनास २. केलेली. ३. खरी च अशी. ४. 'क्षत्रियापासून शूद्रीच्या ठायीं झालेला' अशा अर्थानें हा शब्द येथे कर्णाला लावला आहे. ५. अत्यत. ६. धुरळ्याच्या आच्छादनाचें मिष आहे ज्यात असा पट (वस्त्र). हत्ती, घोडे इत्यादिकांच्या हालचालीनें उडालेल्या धुरळ्यात कौरवसैन्य चागले दिसत नव्हते, पण धर्म म्हणतो, 'हा धुरळा नाहीं; तर, पूर्वी भीष्मद्रोणासारखे क्षत्रिय व ब्राह्मण सेनापति असतां आतां कर्णासारखा सूत सेनापति झाल्यामुळे सेनेला लाज वाटून तिनें आपले तोंड वस्त्रानें झांकून टाकिलें आहे!' ७. अग्नीला. ८. गवत. ९. आपला रस्ता चालण्यास कठिण करणाऱ्या कांट्याच्या तोंडाचा (अग्राचा) नाश. १०. जोडयानीं, वाहणानीं. ११. कोल्हे, गिधाडे इत्यादि मासभक्षक प्राणी हा आहे परिवार ज्याचा असा (मृत्यु). १२. आमंत्रण. १३. कुशल, अशा बाणरूपी हातानें. १४. [कर्णरूपी] बाणाग्र.

आतां न साहवे क्षण यावरि न धरूनि धीर बा! राहें.[1]        ६
धर्माहितें[2] रावणसा कर्ण हि जाणसि, सुयुद्धकौशल्या[3]!
प्रभुसम[4] तूं विजयी हो, कीर्तिमती माय जेंवि कौशल्या.'        ७
मग पार्थ अर्धचंद्रव्यूह रची जो अभेद्य संग्रामीं,
दक्षिणपार्श्वीं[5] धृष्टद्युम्न वसे भीमसेन ही वामीं.        ८
व्यूहामध्यें राजा धर्म, विजय नकुळ आणि सहदेव
हे राजपृष्ठभागीं[6], जैसे विजयार्थ जिष्णुसह[7] देव.        ९
ते पार्थचक्ररक्षक[8], वीरयुधामन्यु उत्तमौजा, जे,
व्यूहीं यथाविभागें युद्धोद्यत सिद्ध ठाकले राजे.        १०

'कर्णकृतव्यूहातें पाहोनि, तुझा तनूज अभिमानी,
पांडव समग्र कर्णें वधिले चि, असें मनांत नृप मानी.        ११
विजयकृतव्यूहातें अवलोकुनि, धर्मराज राजमणी
मानी, भीमार्जुनभुजभुजगीं गिळिले चि रिपु सकर्ण रणीं.        १२
आनकदुंदुभिदर्दुरडिंडिमभेरीसुशंखपणवांचे
ध्वनि उठले, यच्छ्रवणें[9] न क्षण ही त्या स्थळीं कृपण[10] वांचे.        १३
गजबृंहितसिंहध्वनिरथचक्रध्वानसहित[11] वाजिरवा[12],
खांजिर[13] वाटे टांचें[14]; कोण म्हणेल श्रुतींस[15] हा जिरवा?        १४
जन्हि म्हणति कवि क्षितिला अचळा, सर्वंसहा, क्षमा[16], उर्वी[17],
तन्हि कुरुपांडवयुद्धारंभसमय यश तिचें न तें उर्वी[18].        १५
करिति व्यूहवनाच्या[19] बाहेर निघोनि वीरसिंह रणा,
क्रोधेंकरूनि करिती अन्योन्यप्राणशक्तिसंहरणा.        १६

१. राहू नकास. २. अधार्मिका. ३. युद्धांत प्रवीण असलेल्या! ४. श्रीरामचंद्रासारखा. ५. उजव्या कोरच्या मागील बाजूस. ६. धर्माच्या मागच्या बाजूस. ७. इंद्रासह. ८. अर्जुनाचे रथसंरक्षक. ९. जे ध्वनि ऐकल्याने. १०. मित्रा. ११. हत्तींची गर्जना, योद्ध्यांचा सिंहनाद व रथाच्या चाकांचा आवाज यासह. १२. घोड्यांच्या खिंकाळण्यास. १३. आकाशांगण. १४. लहान. १५. कानांस. १६. क्षमाशील. १७. विपुला. १८. उरवी; राहू देई. १९. व्यूह हें च अरण्य.

करिती रणांगणीं भट शत्रुशिरःकंजकंदुकक्रीडा,
अरिगिरिवरि शरवृष्टि हि, तें प्रेक्षुनि शक्र ही धरि व्रीडा. १७
तों भीमसेन चित्तीं अतिदुःसहकोपपावकें कढला,
उदयगिरिशिरीं रविसा भासे मत्तद्विपोत्तमीं चढला. १८
स्वव्यूहगह्वरांतुनि जेव्हां बाहेरि भीमसिंह निघे,
कुरुसेनाहस्तिघटा त्यातें पाहोनि भीतिला मनि घे. १९
भूप कुलूताधिपती, जो नामें क्षेमधूर्ति तो, यासीं
आला युद्ध कराया तें, सिकतासेतु जेंवि तोयासीं. २०
भीम गर्जी, तो हि गर्जी, दोघे ही तोमरायुध, क्रोधीः
पडतां गांठि गमति ते कल्पांतक्षुब्ध काय पाथोधी. २१
ते तोमरायुधानीं ताडिति अन्योन्य, शोणितें गळती,
टळती गज हि न, अन्य प्रेक्षक जे ते हि तेधवां पळती. २२
दावी प्रताप पुष्कळ, भीमकरींचें धनुष्य हि छेदी,
मग सप्त तोमरानीं भीमाच्या भव्यमूर्तिला भेदी. २३
प्राण हराया राया! भीम व्याळोग्र तोमर हि सोडी,
त्यातें हि कुलूताधिप उग्रशर प्रेरुनि क्षणें तोडी. २४
भीमें पुनरन्यधनू सज्ज्य करुनि उग्र सोडिले बाण,
त्यांहीं त्या नागाचे व्याकुळ केले रणांगणीं प्राण. २५
तो गज पळों चि लागे, नाटोपे प्राकृतां जसें चित्तः
किंवा जसें अनावर यत्नशतें, दैव कोपतां, वित्त. २६
तदपि प्रयास करुनि स्वगजातें क्षेमधूर्ति तो फिरवी,
वर्षोनि बाणधारा क्षण वर्षाकाळघनतुळा मिरवी. २७
भेदूनि सर्व मर्मे भीमाचा नाग पीडिला फार,

१. कमल. २. लज्जा. ३. मत्तगजश्रेष्ठावर. ४. आपल्या व्यूहरूपी गुहेंतून. ५. गजसमूह. ६. वाळूचा बधारा. ७. शस्त्रविशेष; ते आहे जवळ ज्याच्या. ८. समुद्र. ९. रक्त. १०. सापाप्रमाणे भयकर. ११. हत्तीचे. १२. पामरजनास.

क्षितिवरि पडे नृपाळा! वृष्टिविलीनक्ष्मा¹धराकार. २८
निजगजपतनापूर्वी राया! तो भीम पांडुचा सुत रे!
टाकी उडी महीवरि, कोसळतां गिरि हरी जसा उतरे. २९
भीमें गदा हाणुनि त्या सद्विरद² क्षेमधूर्तिला विखरी³,
शिखरी⁴ ससिंह पावे शक्राशनिनें⁵ चि काय हानि खरी. ३०
त्या क्षेमधूर्तिनाशें कर्ण क्षोभे जसा महारुद्र,
त्याच्यापुढें न ठाकति वीर, जसे हरिपुढें मृग क्षुद्र. ३१
⁶वारण विदारिले बहु बाणव्रातें, जसे गिरी पविनें,
रविनें किरणगणें घन, कीं न्यायें⁷ बौद्ध⁸ खंडिले कविनें. ३२
तेव्हां त्या कर्णावरि राया! कोपोनि धांवला नकुळ,
जाणों, काळव्याळ ग्रास कराया, क्षुधार्त तो नकुळ. ३३

## अध्याय नववा.



भीम-द्रौणी यांसीं होय क्षितिपाळका! महासमर,
रोमांचिततनु झाले जे प्रेक्षक नाकनायकाद्यमर. १
विंदानुविंद राजे, त्यांसीं करि युद्ध सात्यकी भारी;
आधीं अनुविंदातें, मग विंदातें, रणांगणीं मारी. २
चित्रासीं प्रतिविंध्य, श्रुतकर्मा चित्रसेनभूपासीं,
दुर्योधन धर्मासीं⁹, युद्ध करी, जेंवि तेल तूपासीं. ३
उठला नृपा! धनंजय¹⁰ संसप्तकगणतृणांवरि क्रोधें;

१. पर्जन्यवृष्टीने व्यापिलेल्या पर्वताकारामारखा. २. हत्तीसह. ३. तुकडे करून फेकून देई. ४. पर्वत. ५. इंद्राच्या वज्राने. ६. हत्ती. ७. न्याय शास्त्राच्या सहाय्याने. (अक्षपाददर्शनाच्या आधारानें गौतम ऋषींनी न्यायशास्त्र प्रणीत केले आहे. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द या प्रमाणांनीं यांत ईश्वराचें अस्तित्व स्थापिलें आहे). ८. बुद्धानुयायी. ( यांस प्रत्यक्ष व अनुमान हे दोन च प्रमाणें मान्य आहेत). ९. धर्मपुत्र. १०. अर्जुनरूप अग्नि.

धृष्टद्युम्नासीं रण अद्भुत केला कृपें महायोधें. ४
राया ! कृतवर्म्यासीं युद्ध शिखंडी करी महाकोपें;
शल्यासीं श्रुतकीर्ति हि; नोहे बा ! क्षात्रकर्म तें सोपें. ५
ज्याचें बहु कठिन हृदय लाजवि काठिन्यवैभवें दगडा,
तो दुःशासन राया ! सहदेवा बंधुसीं करी झगडा. ६
विंदानुविंद वधिले सात्यकिनें तें विचित्र; दोघांसीं
एक चि युद्ध करी तैं भासे शिरला दवाग्नि तो घासीं[1]. ७
सात्वंत[2] केकेयांचीं[3] चापें खंडूनि बाण बहु सोडी.
अन्य धनुष्यें वाहुनि ते याचें चाप, हा हि तीं तोडी. ८
मग सात्यकि चापांतर सज्य करी, शीघ्र तत्क्षणीं धाडी,
तीव्र क्षुरप्र[4] तोडुनि अनुविंदाच्या शिरासि तो पाडी. ९
निजबंधुवधक्षोभें विंदनृपति सात्यकीसवें भांडे,
ज्याच्या नेत्रांतुनि जळ, पळ पळ रक्तौघ तनुहुनीं[5] सांडे. १०
विंदशरक्षतसात्वतवर्णद्युति ये न कुसुमिता[6] पळसा,
पळ सात्यकी न भागे आघातीं सुदृढहीरकोपळसा[7]. ११
अन्योन्याचीं चापें तोडिति, मोडिति रथांसि, तुरगांचे,
सूतांचे प्राण हरिति, सोडुनियां बाण बंधु[8] उरगांचे. १२
ते खड्गचर्मपाणी[9] नटले[10] नटसे रणांगणीं सुचिरें[11],
जंभहरीसे[12] गमले दिसति क्षतजार्द्रदेह[13] ही रुचिर. १३

१ गवतात. २. सात्यकि. ३. विंदानुविंदांची. ४. बाणविशेष. ५. शरीरांतून. (बंधुशोकामुळें अश्रुधारा व बाणप्रहारामुळें रक्तधारा). ६. फुललेल्या. ७. अत्यंत कठिण अशा हिऱ्याच्या खड्यासारखा. ८. सर्पांचे बंधु च असे बाण. ९. तलवार व ढाल हातांत धारण केलेले. १०. नटासारखे ( निर्भयतेनें ) नाचले. (जिवावर उदार होऊन युद्ध करिते झाले). ११. फारवेळपर्यंत. १२. जंभासुर व इंद्र यांसारखे. (तारकासुरयुद्धांत इंद्रानें जंभासुरास मारिलें). १३. ज्यांचे देह रक्तानें भिजले आहेत असे.

सात्यकि त्या विंदाच्या, तोडी शतचंद्रका[१] सुचर्मातें[२],
जें चर्म सात्यकीचें, खंडी, तो विंद उग्रकर्मा, तें. १४
वीर विरथ दोघे ही, दोघांच्या ही करीं प्रचंड असी,
अन्योन्यनाश इच्छिति, पडली दोघां हठांसि गांठि असी! १५
धृतधर्मप्रक्ष सात्यकि पावे जय, तो न वीरवर विंद,
तन्मस्तक अपहस्तें[३] छेदी शैनेय, जेंवि अरविंद[४]. १६
पावे जय विजयप्रियसात्यकि, चित्तीं धरूनि गोविंदा,
जाय युधामन्युरथीं, मारुनि ऐसें रणांत तो विंदा. १७
बैसोनि नवरथावरि सात्यकि विंदानुविंदसैन्य मथी;
मेले, फार पळाले, पत्ती, सादी[५], गजाधिरोह, रथी. १८
श्रुतकर्मा करि मूर्छित तीक्ष्णशरेंकरुनि चित्रसेनातें,
पाहे तटस्थभावें दोघांचें रण विचित्र सेना तें. १९
सावध होउनि नृप तो श्रुतकर्मधनुष्य तोडुनीं पाडी,
घेउनि अन्य धनूतें श्रुतकर्मा त्यासि बहुशरीं ताडी. २०
तो राजा नाराचें[६] श्रुतकर्म्यातें स्तनांतरीं भेदी.
श्रुतकर्मा मग तद्धनु खंडुनि भल्लें[७] चि तच्छिर छेदी. २१
अभिसारचित्रसेनक्षितिपतिचें सैन्य संगरीं भग्न
श्रुतकर्म्यानें केलें, निजशर, तद्रक्तसागरीं मग्न. २२
प्रतिविंध्य-चित्र यांचें युद्ध महाउग्र, तें करीं श्रवणः-
त्या द्रौपदेयवीर्यें न सुरनरांमाजि तोषला कवण? २३
चित्रनृपें प्रतिविंध्यप्राण हरायासि सोडिली शक्ती,
यावरि आली व्यालीसम, कीं महिषीं जसी महाशक्ति[८]. २४
प्रऱ्हादें हरिनामोच्चारें कृत्या जसी, तसी शुद्धें
प्रतिविंध्यें तीव्रशरें भंगिलि, विस्मय दिला महायुद्धें. २५
चित्रें गदा महोग्रा गरगर फिरवूनि सोडिली जे गा!

१. शंभर चंद्राकृति पुष्पें असलेल्या. २. उत्तम ढालेस. ३. डाव्या हाताने. ४. कमळ. ५. घोडेस्वार. ६. लोखंडी बाणानें. ७. बाणविशेषानें. ८. चंडिकादेवी.

प्रतिविंध्य तिच्या जाणे अनिवार्या दुःसहा महावेगा. २६
स्वरथावरूनि जों तो प्रतिविंध्य क्षितितळीं उडी घाली,
तों ती गदा, सदा रिपुदर्पघ्नी[1], विजयशालिनी, आली. २७
ध्वजसूततुरगसह रथ भस्म करुनि ही न दुर्भरा धाली;
प्रतिविंध्यदक्षभुज[2] ती भेदुनि भूकुक्षि[3] भेदिती झाली: २८
तोमर तो, मरण तया द्याया, प्रतिविंध्य तेधवां प्रेषी,
तेणें सकवचहृदय छेदुनि तत्काळ पाडिला द्वेषी. २९
प्रतिविंध्यावरि धांवे सैन्य तुझें मारितां चि चित्रास,
तो द्रौपदेय त्यातें विक्रम दावूनि दे अति त्रास. ३०
प्रतिविंध्यहतभटांतें भेटाया स्वर्वधूभुज[4] स्फुरले,
उरले[5], पुर लेखांचें विवृतद्वार हि न पाहुनीं, झुरले. ३१

## अध्याय दहावा.

भीमासीं द्रोणसुत, स्वीकारुनियां अनीतिचा पक्ष,
युद्ध करी, भीष्मासीं जैसा अंबार्थ[6] राम रणदक्ष.
ते वीर वृत्रवासवसम[7] गमती, युद्ध थोर घोर, नृपा!
गुरुबंधु ते सुतेजें भांडति, चित्तांतुनि त्यजूनि कृपा.
सर्वांगीं ही खरतर शर शिरले, तेधवां दिवाकरसा[8]
भीम गमे, नरनाथा! कांपे चित्तीं धरूनि धाक रसा[9].
भीम सहस्रशरांहीं आच्छादी गुरुसुतासि, परि तो ते
न स्पर्शतां चि खंडी; जाणों आले चि त्यावरि न हो! ते.

१. शत्रूचा गर्वनाश करणारी. २. उजवा हात. ३. भूगर्भ. ४. अप्सरांचे बाहु. ५. जे वीर जीवत राहिले ते केवळ दरवाजे उघडे असलेले हि देवाचे पुर न पाहिल्याने [अप्सरावियोग होऊन] झुरू लागले, असा अर्थ. ६. काशीराजाची कन्या जी अंबा, तीकरितां. ७. वृत्रासुर व इंद्र यांसारखे. ८. सूर्यासारखा. ९. पृथ्वी.

गुरुसुतनाराच्याचा, भीमललाटांतरीं शिरे, शेंडा;
शोभे रणांत तो,[१] वनीं खड्ग जसा प्राकृतांत जो गेंडा. ५
गुरुसुतशरपटळें रवि लोपे, भ्रमति प्रवीर सर्व तमीं;
द्रौणीसि महामारुत[२] मानीं, धर्मानुजासि पर्वत मीं. ६
द्रौणिशरौघें कंप न भीमीं, मारुतबळें जसा अगमीं;[३]
पाहे भीमशरौघें द्रौणि स्थिर, जळबळें जसा अग[४] मीं. ७
द्रोणात्मज भीमातें डावें घाली; न भीम तें साहे.
यासि हि डावें घाली; केंवि खिजविला फणी[५] उगा राहे? ८
[६]शरसंघर्षज वह्नि ग्रासी क्षमा चि न, गिळी नभ; स्मरणीं
भी मन; कीं तो स्वबळ हि जाळी, बाण चि करी न भस्म रणीं. ९
योजिति दिव्यास्त्रांतें, करिति प्रकट स्वशक्तिनैपुण्य;
प्रेक्षक त्या युद्धाहुनि बहु वर्णिति आपुलें चि तें पुण्य. १०
गगनीं सुरसिद्ध म्हणति, 'या युद्धाची कळा[७] हि सोळावी
युद्धांतरें[८] न पावति; या अमृतरसीं च दृष्टि घोळावी. ११
अतुळज्ञानें, वीर्यें संपन्न भले, रणीं अनिर्वेद,[९]
हे विप्रक्षत्रियवर; धन्य इहीं उजविला[१०] धनुर्वेद. १२
अद्भुत शिक्षा,[११] निस्तुल बळकुळ, बहु धन्य, पाहिले अन्य;
अन्यत्र वीर न असे, असती ते सर्व पंडितंमन्य.[१२]' १३
झाले [१३]क्षतजर्जरतनु, न्हाले रक्तें, मनीं न परि धाले;
भ्याले प्रेक्षक, तन्हि हे व्यालेशं[१४] क्रूर न क्षया भ्याले. १४

---

१. अन्वयार्थ—तो (भीम) रणात (तसा) शोभे, जसा वनीं खडग जो प्राकृतांत (प्राकृत भाषेंत) गेंडा [म्हणून प्रसिद्ध आहे तो] शोभे. २. झंझावात. ३. पर्वतांचे ठिकाणी. ४. वृक्ष. ५. सर्प. ६. बाणांच्या घर्षणानें उत्पन्न झालेला. ७. कला, अंश. ८. दुसरीं युद्धें. ९. खेदरहित, न कंटाळणारे. १०. प्रकाशित केला. ११. शिक्षण. १२. स्वतांस पंडित समजणारे; व्यर्थ गर्व वाहणारे. १३. जखमांमुळें पीडित झाली आहे तनु ज्यांची असे. १४. सर्पाधिप.

एक ब्राह्मणसत्तम,[1] एक क्षत्रावतंस[2] धीट पती,
ते, अन्योन्यवधातें, शस्त्रास्त्रगतिप्रवीणधी[3] टपती. १५
त्यांच्या कनकरथांचें मंडळ देखोनि दृष्टि बहु लोभे,
साक्षादलातचक्रासम[4] समरीं प्रेक्षणीय तें शोभे. १६
मग दोघे ही ओढुनि चापें आकर्ण[5] सोडिती बाण,
दोघांचीं ही हृदयें भेदुनि ते करिति विव्हळ प्राण. १७
दारुणशरप्रहारें एकाकाळीं च वीर ते खचले[6]
सुंदोपसुंद[7]यमळार्जुनसे[8]; बळ नियतिच्या पुढें न चले. १८
स्वरथोपस्थीं मूर्छित पडतां, गुरुपुत्र, पळविला सूतें,
भीम हि धृतराष्ट्रनृपा! सांगा[9] आश्चर्य काय मीं तूतें? १९

---

# अध्याय अकरावा.

संसप्तकगण विजयें वधिले, तें युद्ध काय वर्णवतें?
संक्षोभवी महाबळ पार्थपवन[10] शत्रुसैन्य अर्णव[11] तें. १
कुंडलमुकुटवरमणिद्युतिरुचिरें,[12] स्मितमनोहरें,[13] अमळें[14]
पार्थें असितें खंडुनि वीरांचीं पाडिलीं शिरःकमळें. २
अंगदमंडित[15] चंदनचर्चित सायुध नृपाळभुज तोडी;

१. ब्राह्मणश्रेष्ठ. २. क्षत्रियांस भूषणभूत. ३. शस्त्रास्त्राच्या योजनेंत प्रवीणबुद्धि असलेले. ४. फिरविलेल्या कोलिताचे वर्तुलासारखे. ५. कानापर्यंत. ६. मूर्छित झाले. ७. आर्या० आदि० अ० ३८ वा पहा. ८. हे गंधर्वद्वय शापामुळे अर्जुनवृक्ष झाले होते. यशोदेनें श्रीकृष्णास उखळास बांधिलें, तेव्हां कृष्णानें उखळ ओढीत ओढीत या यमलार्जुनवृक्षाच्या मुळांत घालून दोन्ही हीं वृक्ष एकदम खालीं पाडिले व गंधर्व दोषमुक्त झाले, अशी भागवतांत कथा आहे. ९. दैवाच्या. १०. अर्जुनरूपी वायु (तुफान). ११. समुद्र. १२. कुंडलें, उत्तम मुकुट व मणि यांच्या तेजानें सुंदर दिसणाऱ्या. १३. स्मितहास्यानें मनोहर दिसणाऱ्या. १४. दोषरहित अशा. १५. बाहुभूषणानें शोभित.

भासति गरुडें भुजग त्यजिले, चाखोनि पाहुनी गोडी ! ३
शत्रुगजघटांमध्यें दावी जेव्हां सिताश्व केसरिता,
सरिता[1] करि तात्काळ चि रक्ताच्या, अरिबळार्णवास रिता. ४
विजयश्रीसीं होउनि युक्त सुखें श्रीवरा सख्यासंगें,[2]
खेळे विजय शरकरें[3] वीरशिरःकंदुकें रुधिररंगें.[4] ५
संसप्तकतृणविपिनीं[5] प्रभुमारुतसख[6] नरज्वलन[7] पेटे,
तों सुरसिद्धघनाशीघृतवृष्टि[8] हि त्या धनंजया भेटे. ६
वर्णिति सुरमुनिवर नरनारायणयश परोपरी, घनसे
जयजयकारें गर्जति. गगनांत हि त्या ध्वनीस रीघ नसे. ७
सुर दिव्यपुष्पवृष्टि श्रीनरनारायणांवरी करिती,
कीं तत्प्रसादभाग्यें[9] सुवरांतें कीर्तिसुरसुता[10] वरिती. ८
संसप्तकमथनीं करि पार्थ महारथसहस्रसम[11] कर्म,
धर्मप्रसाद माथां, आंगीं भगवत्प्रसाददृढवर्म.[12] ९
युद्धक्रतूंत आला अतिथी गुरुपुत्र, त्या सुयजमाना;[13]
शरदर्भगर्भपाणी[14] गर्जोनि म्हणे, 'द्विजास मज माना.' १०
द्रौणि म्हणे, 'कौंतेया ! पूज्य अतिथि हा असें जरि नयज्ञा !
मानिसि तरि दे युद्धातिथ्य[15] मला, सांग[16] मीं करिन यज्ञा.' ११

१. नद्या. २. [ आपल्या ] लक्ष्मीपति कृष्णमित्राच्या संगतीनें. ३. बाणरूप हातानें. ४. रक्ताचा आहे रंग ज्यांना अशा वीरशिरोरूपी चेंडूनीं. ५. संसप्तकरूपी गवताच्या अरण्यांत (कुरणांत). ६. कृष्णरूपी वायूचा मित्र. ७. अर्जुनरूपी अग्नि. ८. देव व सिद्ध हे च कोणी मेघ, त्यांतून पडणाऱ्या आशीर्वादरूपी तुपाचा पाऊस. ( तुपानें अग्नि प्रज्वलित होतो, त्याप्रमाणें देवादिकांच्या आशीर्वादानें अर्जुनास अधिक च स्फुरण चढलें ). ९. त्यांच्या कृपेच्या भाग्यानें. १०. कीर्तिरूप देवकन्या. ११. हजारों महारथ्यांइतकें. १२. श्रीकृष्णाचा आशीर्वाद हें दृढ कवच. १३. चांगल्या यजमानाकडे. (अर्जुनाकडे). १४. बाणरूपी दर्भ हातांत असणारा. १५. युद्धरूप भिक्षा. १६. यथासांग.

तेव्हां अर्जुन हर्षें, प्रभुसि म्हणे, 'सांग गा सख्या ! युक्ती.
आइकिली कीं त्वां या माझ्या आचार्यसुनूची उक्ती. १२
या निजगुरुपुत्राचें आधीं[1] आतिथ्य योग्य मज वाटे,
[2]कार्यशतव्यासंगीं न त्यागावें चि साधुच्या वाटे.' १३
प्रभुनें नेला त्या गुरुपुत्ररथाजवळि सुरथ वेगानें,
तेव्हां गगनीं करिती सांगन[3] गंधर्वसुरथवे[4] गानें. १४
कृष्ण म्हणे, 'द्रौणे ! तुज पूजाया जिष्णु आणिला; जावें
कां पात्र अकृतार्थें[5] ? पार्थें कां करुनि वाणि[6] लाजावें ? १५
स्थिर हो या युद्धमखीं; सत्कर्त्यांचा[7] महागुरू पार्थ;
या सदुदारापासुनि[8] पात्रें[9] वरिती गुणानुरूपार्थ[10]. १६
त्वां हि स्वगुण समस्त प्रकटावे जरि गमेल सार्थकसें;
न पहातां पात्रगुण प्रथम चि पूजन करील पार्थ कसें ?' १७
भगवद्वचन श्रवणीं पडतां चापश्रुतिज्ञ तो धीर,
अद्भुत रणपांडित्य प्रकट करी, द्रोणसुत महावीर. १८
नाराच साठि आधीं प्रभुतें, मग तीन जिष्णुतें ओपी,
ऐसा प्रताप दावी अश्वत्थामा रणीं महाकोपी. १९
तें चाप पार्थ खंडी, तों द्रौणी सज्य करि दुजें चाप;
ब्राह्मण पुष्कळ खवळे पुच्छच्छेदार्तिनें[11] जसा साप. २०
प्रभुसी त्रिशतीं वेधी, बाणसहस्रें धनंजयासि, कवी
आचार्यपुत्र, जाणों शरसंधानप्रकार[12], तो, शिकवी. २१
तूणीर[13], चाप, तद्गुण[14], भुज, कर, उर, वदन, लोचन, घ्राण[15],

१. ससप्तकवळास मारण्यापूर्वी. २. शेकडा काम असली तरी. ३. स्त्रियासह. ४. गंधर्व व देव याचे समुदाय. ५. मनोरथ पूर्ण न होता. ६. उणेपणा. ७. सत्कार करणारांचा. ८. मोठ्या उदारापासून. ९. अतिथी. १०. गुणानुरूप संभावना. ११. शेंपुट तोडिल्यानें होणाऱ्या पीडेने. १२. लक्ष्यावर अचूक बाण मारण्याची विद्या. १३. भाता. १४. त्याची ( धनुष्याची ) दोरी. १५. नाक.

कर्ण, शिर, अंग, लोमें[1], कवच, रथ, ध्वज हि वर्षती[2] बाण! २२
ऐसें योगबळें[3] करि कौतुक तो मुनि[4] महामना; शर वी[5],
जेंवि प्रलयीं प्रकटी किरण, कराया त्रिलोकनाश, रवी. २३
जैसा नभीं न भी, घन गर्जे झांकोनि शीतभानु[6] रवी,
तैसा गुरुसुत हि रणीं आच्छादी शरपटें, प्रभा नुरवी. २४
करि सिंहनाद, वेधुनि त्यां नरनारायणांसि शरजाळें,
तें धीवरें पसरिलें मीनांवरि काय घातकर जाळें! २५
अर्जुन म्हणे, 'मुकुंदा! मज तों हा सोसवे न नाद रणीं,
व्याकुळ मन्मन होतें बहु शत्रुकृतीं तुझ्या अनादरणीं. २६
वधिलें आम्हां दोघां या भावें सिंहनाद हा केला,
एकेल काय सिंह प्रतिमल्लाच्या उगा चि हाकेला? २७
मीं भुजबळशिक्षांहीं करितों भग्नप्रताप हा; याचें
शरजाळ खंडितों. बा! आहे संधान हें पहायाचें. २८
एकैक बाण तोडिन तीं तीं ठायीं पहा सख्या कृष्णा!
गुरुपुत्राची या तों समयीं विफळा करीन मीं तृष्णा.' २९
ऐसें वदोनि सुखवी अर्जुन दुग्धाब्धिनंदिनीहारा[10],
उडवी गुरुपुत्राच्या शरजाळा, वायु जेंवि नीहारा[11]. ३०
अश्वत्था[12] मागावा वर पूजुनि, परि नव्हे भला मुंजा[13],

१. केस. २. वर्षाव करित होते. (बाणाचा वर्षाव इतका अखंड व त्वरित होत होता कीं, जणु काय त्याच्या शरीराचा प्रत्येक अवयव सर्व दिशांस बाण च सोडीत आहे असें वाटे!). ३. युक्तीच्या बळानें (पक्षीं) योगसामर्थ्यानें. ४. 'योगबळें' या शब्दांतील श्लेष साधण्यासाठीं च 'मुनि' शब्द योजला असावा; कारण, अश्वत्थाम्याची मुनित्वाबद्दल प्रसिद्धि नाहीं. ५. सोडी. ६. चंद्र. ७. समजुनीनें. ८. बाहुबळानें शिक्षा करून किंवा आजपर्यंत बाहुबलास मिळालेल्या शिक्षणाच्या प्रभावानें. ९. [ जयाची ] इच्छा. १०. क्षीरसागराच्या कन्येस (लक्ष्मीस) हरणाऱ्या विष्णूस. (कृष्णास). ११. धुक्यास. १२. पिंपळाला. १३. ब्रह्मराक्षस, बालपिशाच. (मुंज होण्यापूर्वीं मेलेल्या मुलाचें पिशाच).

अश्वत्थामा गावा, कीं, तो गुरु खंडिजे चि शरपुंजा. ३१
जिष्णुपुढें प्रागल्भ्यें द्रौणिशरांचें टिके चि न पटळ तें,
जेंवि वसिष्ठमुनिपुढें जालें[1] गाधिजमुनींद्रतप टळतें.[2] ३२
गुरुसुतशरपटळातें खंडुनि, संसप्तकांसि तो दंडी,[3]
तेव्हां सुरमुनि म्हणती, 'शंकरसम एक पार्थ कोदंडी.' ३३
विजयशरसमूह बहु क्षुधित; गिळी वीरसैन्य. हा रीती
घटकर्णाची धरि; कीं खंडी द्विजबाण जें, न्यहारी ती.[4] ३४
क्षुधितार्जुनमार्गणगण[5] त्या संसप्तकबळा शरव्या[6] पी;
निकट असो, दूर वसो, रविकरसा,[7] अभिमुखा शर व्यापी. ३५
जे शूर, दूर साग्रक्रोशीं[8] उभे, अश्वगजरथारूढ,
ते ही जिष्णुशरानीं व्यसु[9] केले फार, अल्प[10] संमूढ. ३६
अर्जुन युगांतभास्कर,[11] पसरुनि शरकरसहस्र[12] तो शोषी
संसप्तकबळसागर; निजतेज[13] चि मल्ल वपु तसें पोषी. ३७
शक्रें वज्रें गिरितें, नाराचशतें तसें गुरुसुतातें,
अभिमन्युच्या,[14] प्रमथिलें; जाणों समजाविलें चि हसता[15] तें. ३८
गुरुसुत सोडी बहुशर, कीं, सर्व हरीश[16] ते खिळावे चि;
क्षुधितशराजगरानीं रथ पार्थासकट ही गिळावे चि. ३९
अर्जुन ते शर खंडी, तेव्हां आचार्यपुत्र बहु कोपे.

१. नाश पावले. २. मारी. ३. धनुर्धर. ४. अन्वयार्थ–हा (शरसमूह) घटकर्णाची [शत्रूस तोंडात टाकण्याची] रीति धरि, जे द्विजबाण (अश्वत्थाम्याचे बाण) खंडी [ते त्या शरसमूहास] ती (रीति) न्यहारी फराळ [च] [झाली] की! ५. सुटलेला अर्जुनबाणसमुदाय. ६. निशाणास. (ज्यावर शर मारतात ते). ७. सूर्यकिरणाप्रमाणे. ८. संपूर्ण कोस. ९. प्राणरहित. १०. थोडे मूर्छित केले. ११. प्रलयकालीन सूर्य. १२. बाणरूपी किरणांचे सहस्र. १३. मल्ल [जसें] वपु पोषी तसें [संसप्तकास मारून] अर्जुन निजतेज चि पोषी. १४. अभिमन्युच्या [तातें]. १५. आपणासि टाकूनि परासी युद्ध करितो म्हणून–**पंत.** १६. विजयाश्व–**पंत.**

तच्छरपटलें केवळ न विजयरथ, भानुचा हि रथ, लोपे. ४०
धर्मज्ञ गृहस्थ जसा, प्राप्तातिथिकारणें गृह निवेदी,[1]
गुरुसुत तसा निजास्त्रें अर्पी, पार्थासि विमुख हों नेदी. ४१
संसप्तकांसि टाकी, स्वीकृति गुरुसूनुची च पार्थ करी;
त्यजुनि [2]अपांक्तेयांतें पांक्तेयांतें चि अतिथि जेंवि वरी. ४२
जैसे [3]विमार्गगामी गुरु, कवि, बुध, मंगळ ग्रह क्रूर,
तैसे लोकक्षयकर युद्ध करिति पांडु[4]गुरुजनी शूर. ४३
सर्वांगीं, गुरुसुतशर दोघां [5]कृष्णांचिया, जयीं जडले,
गमति युगांतार्क चि ते, भस्म करुनि लोक आपण हि [6]पडले.
द्रौणि शरकवच, भव[7]चतुरास्यास्त्रज्ञार्जुनास हरिस हि, तें,
जेव्हां लेववि, चित्तें पार्थें द्विज पूजिला[8] चि हरिसहितें.[9] ४५
द्विजरणकौशल सुखवी विजयमना; अतुळ ताप दे परि तें,
कीं, साक्षाज्जग[10]दात्मा जो [11]उग्रें पीडिलें चि त्या हरितें. ४६
शिरले परमोदारा भगवंताच्या यथेष्ट शर देहीं;
ब्रह्मण्यवदान्यसधनसाधूच्या अर्थिजन जसे गेहीं. ४७
तेव्हां अर्जुन योजी अस्त्र, जया नाम सर्वतो[12]धार,
शरधारा सर्वत्र प्रकटाव्या, जें असें महोदार. ४८
तदपि न भी द्विज. व्हावी मृत्यूच्या ही [13]जिहीं व्यथा चित्ता,

१. घर—घरांतील कोणती हि वस्तु—अर्पण करी. २. पंक्तिबाह्यास. ३. अयोग्य मार्गाने जाणारे, विषमस्थळीं असलेले. (केंद्राधिपति गुरुशुक्र दुसऱ्या व सातव्या स्थळी असल्यास हटकून मारक होतात. बुधमंगल ग्रहांविषयी हि असे च समजावे). ४. अर्जुन व अश्वत्थामा. ५. कृष्णार्जुनांच्या. ६. 'पडले' म्हणण्याचे कारण, ते 'प्रलयकालीन सूर्य' आकाशात न दिसता पृथ्वीवर दिसत होते. ७. शैवास्त्र (पाशुपतास्त्र) व ब्रह्मास्त्र जाणणाऱ्या अर्जुनास. ८. गौरविला; वाखाणिला. ९. कृष्णासह (पार्थानें). १०. जगाचा आत्मा किंवा जगत् हें च आहे आत्मा ज्याचा. ११. क्रूरतेनें. १२. सर्वत्र बाणरूपी धारांचा वर्षाव करणारे. १३. ज्या बाणानीं.

वेधी तशा शरांनीं कृपणा[1] पार्थो[2] हि, त्या हि तद्वित्ता[3]. ४९
खंडुनि ते शर, पार्थ द्रौणीतें निजशरालयीं कोंडी,
पाडी संसप्तक भट, करिटिघटा[3] वज्रधर[4] जसा धोंडी. ५०
प्रळयीं जसा कपर्दी[5], मर्दी संसप्तकांसि हा जिष्णु[6]
भ्राजिष्णु[7] स्वशरांहीं, दैत्यबळांतें जसा महाविष्णु. ५१
होतां रक्तनदींत स्वगजरथहयांसमेत ही मग्न,
संसप्तकबळ जालें असतां निजभुजबळें रणीं भग्न. ५२
पुनरपि गुरुपुत्रातें, झांकी, निजशरपटें कविप्राया[8].
पार्थ म्हणे, 'उष्णकरें[9] न स्पर्शो देव अर्क विप्रा या.' ५३
छिजशरपंक्ति उडवि शरपटळ, जसा पट टिको न दे वात्या[10];
सुजना जेंवि खळ, कळ[11] क्षण हि पडों दे नरा न देवा त्या. ५४
शिरति दुरुक्तसम कठिन शर हृदयीं त्या रणांत पार्थाच्या,
करिति व्याकुळ ते शरचोर प्रभुला हि साधुसार्थाच्या[12]. ५५
राया[13]! अशांत धांवुनि तव सुतबळ हीं धनंजया वेढी:
त्यांत दिसे पार्थरथध्वज, जेंवि खळांत[14] वृषगणीं[15] मेढी. ५६
एका पार्थावरि ते करिते झाले चि वृष्टि शस्त्रांची,
अस्त्रांची ही, त्याच्या[16] स्त्रीवरि करि जेंवि देव वस्त्रांची. ५७
खंडुनि शस्त्रास्त्रांतें, तव वीरांतें, हि गुरुसुतासकट,
पार्थें केला, पवनें घन वारुनि भानुसा, रथ प्रकट. ५८
त्यांच्या[17] चि क्षतजनद्या त्यांतें चि रणांगणांत वाहविती,
निजविषयवासना बहु खवळोनि जसें न धैर्य राहविती. ५९

१. कृपण धनाचे रक्षण करितो तितक्या काळजीने शत्रूच्या माऱ्यापासून कृष्णाचें रक्षण करणाऱ्या अर्जुनास. २. त्याचे (अर्जुनाचे) वित्त च अशा कृष्णास. ३. पर्वताश्रयी गजसमूहास. ४. इंद्र. ५. शंकर. ६. अर्जुन. ७. तेजस्वी. ८. शुक्राचार्यतुल्य अशा. ९. गरम हात (पक्षी) उष्ण किरण. १०. वाहुटळ. ११. चैन. १२. साधुरूपी व्यापारी संघाच्या. १३. धृतराष्ट्रा! १४. धान्य मळण्याच्या खळांत. १५. बैलांच्या समूहात. १६. अर्जुनाच्या. १७. कौरवांच्या.

त्यांचे चि रक्तपूर क्रूर, सुदुस्तर, तयांसि बुडवीती,
जैसे कुपुत्र गज हि न आवरति, पदेंकरूनि तुडवीती. ६०
पार्थें तव बळ मथितां, निजहृदयीं बाण लागतां चि रणीं,
क्षोभे द्रौणि, जसा रविकांतमणि स्पर्शतां चि तत्किरणीं[1]. ६१
शर एकदा चि सोडी दश, त्यांतुनि हृदय पांच विजयाचें
भेदिति, उरले[2] त्याचें काळमुखीं नाम वांचवि जयाचें[3]. ६२
उग्रशरक्षततनु[4] ते दोघे ही वीर शोणितें वमती;
भ्रमति[5] प्रेक्षक, देव हि; गमती वधिले चि; कृष्ण ही श्रमती.
कृष्ण म्हणे, "पार्था! तुज म्हणताति भले भले 'शहाणा;' या
रणयज्ञीं सावध हो; न करीं संकोच लेश हाणाया. ६४
हा विप्र उग्रकर्मा क्लेशकरव्याधिसारखा: यासी
न उपेक्षावें. आळस न धरील प्राणसार[6] खायासी. ६५
हूं! काय पाहसी रे!? हाण; न हा गुरु कुरुप्रियैकरुची[7].
उग्रपिशाचाश्रय जो, छाया तापप्रदा चि, त्या तरुची." ६६
आज्ञा होतां अर्जुन सर्वांगीं गुरुसुतासि तो तासी[8].
चित्तीं म्हणे, 'तईं प्रिय मजला प्राणांपरीस होतासि.' ६७
शिर, उर, भुजोरु[9] खंडी, तुरगां त्यांच्या हि तो लगामातें;
पार्थ म्हणे मनिं, 'बंधो! तूं चि अदय; काय बोल गा! मातें?'
रक्षी द्रौणीतें, जो दृढ होता आयुचा लगा[10], मरणीं;
अन्वर्थनाम[11] हरि ही; दूर हरिति खंडितां लगाम रणीं. ६९
त्या अश्वत्थाम्यातें, त्या व्यसनीं, अश्व दूर पळवीती;
समयीं पति रक्षावा ऐसें ते पशु हि धर्म कळवीती. ७०

१. सूर्यकिरणानीं. २. उरलेले पांच. ३. ज्या कृष्णाचें. ४. तीक्ष्ण बाणांनीं घायाळ केलें आहे शरीर ज्याचें ते कृष्णार्जुन. ५. चकित होतो. ६. प्राणरूपी श्रेष्ठ वस्तु. ७. कौरवांचें च कल्याण इच्छिणारा. ८. बाणांनीं सोलून काढी. ९. बाहु व मांड्या. १०. लगा=आश्रय. (अश्वत्थाम्याचें चिरजीवित्व). ११. अश्वत्थाम्यास रणांतून घेऊन पळून गेल्यामुळें घोड्यांस 'हरि' हे नांव अन्वर्थक झालें.

द्रौणि म्हणे मनिं, 'झाला जय विजयाचा चि अंकित स्पष्ट,
काय करावें? दैवें आले भागासि आमुच्या कष्ट.' ७१
मंत्रौषध[1]यत्नांहीं देहापासूनि रोगसा, नेला
अश्वांनीं दूर द्विज; अर्जुन संसप्तकांकडे गेला. ७२

---

# अध्याय बारावा.

स्वव्यूहोत्तरभागीं जातां ध्वनि तुमुळ ऐकिला हरिनें,
तिकडे चि रथ फिरविला, साधुसखानें[2], असाधुच्या अरिनें. १
अर्जुन म्हणे, 'सख्या हरि! जातां संसप्तकांकडे कां गा!
इकडे स्वरथ फिरविला? देवा! मज आपुल्या मुखें सांगा.' २
'नृप दंडधार मागध[3] भगदत्तासम महाबळी पार्था!
तव बळ मथितो, त्यातें मारुनि साधीं रणीं निजस्वार्था.' ३
ऐसें बोलत बोलत, नेला तत्काळ तेथ रथ, वातें
तो घन त्यां[4] दहनावरि नेला, तत्काळ[6]वक्त्र अथवा तें. ४
त्या धर्मसैनिकांचे झाले होते चि सर्व आव रिते,
पार्थ न जाता तरि ते वीर नें त्या मागधासि आंवरिते. ५
वर्षे गांडीवधनु प्रखरशरांच्या उद्दंड धारा; तें
वर्षे, न शमवील कसें रिपुकाननदहनदंडधारातें? ६
भासे मागधनृपगज उग्रपणें मूर्तकाळसा, गरसा

१. रोग हटविण्यास मंत्र व औषध याचें सहाय अवश्यक आहे, असे चरकादि आर्यवैद्यकग्रंथांत लिहिलें आहे. अश्वत्थाम्याच्या रथाच्या घोड्यानीं त्यास युद्धांतून दूर नेऊन तो रोगाप्रमाणें त्याज्य आहे असें सुचविलें आहे. २. साधु पांडवांच्या सख्यानें. ३. मगधदेशाचा राजा दंडधार. ४. अर्जुनरूपी मेघ. ५. दंडधाररूपी अग्नीवर. ६. त्या दंडधाराच्या काळाचें (मृत्यूचें) मुख. ७. मागधाचें निवारण करूं शकले नसते. ८. शत्रुरूप अरण्यांतील अग्निरूप दंडधारास.

अविषह्य[1]वेग, केवळ अविलंघ्य प्रलयकाळसागरसा. ७
वाटे काळाचा चि द्विरदाकृति[2], तो महाशरीर, गंडी[3].
हाणी वीरांसि वृहन्मदनद[4], पद रद शिरांवरी रगडी. ८
पाडी क्षितिवरि, जे नृप गजतुरगरथीं हि शोभले; चिरडी
चरणीं तृणसे. त्यांसीं[5] भिडतां खाती[6] भले भले चि रडी[6]. ९
प्रथम[7] विलोकुनि ही त्या पांडवसिंहासि, तो करी नखरा,
नखरा नाराचगणा मानी मानी च ना; करीन खरा. १०
तो दंडधार दुसरा भगदत्त चि; युद्ध तें महाभारी;
आधीं नृपासि, मग शतबाणांहीं पार्थ हस्तिला मारी. ११
वधिला तसा चि त्याचा भ्राता नामेंकरूनि जो दंड,
शत्रूंसि काळदंड चि भासे गांडीवनाम कोदंड. १२
स्तविति स्वकीय सैनिक पार्थातें निहतशत्रुचक्रातें,
जैसे अमर समरपटु वृत्र[10]नमुचिजंभकाळशक्रातें. १३
पुनरपि पार्थरथातें तेथुनि तत्काळ केशिहा[11] फिरवी.
त्या विजयश्रीपतिला कौरवसेनापुरींत तो मिरवी. १४
संसप्तकसेनेला नेउनि कृष्णें सिताश्व भेटविला,
ग्रीष्मीं गहनां[12]मध्यें वायूनें दहन जेंवि पेटविला. १५
नवनव निघति विजयशर, माहेरीं गीतें[13] जेंवि दळपांत[14];

१. ज्याचा वेग सहन करण्यास कोणी हि समर्थ नाहीं अशा [ हालाहल ] विषसा. २. हत्तीचें रूप धारण करणारा. ३. दोस्त. ४. मदाचा नद ( मोठा प्रवाह ) वाहणारा, मदोन्मत्त. ५. त्या हत्तीशीं. ६. रडी खाती—रडकुंडीस येतात. ७. अन्वयार्थ—त्या पांडवसिंहासि ( अर्जुनास ) प्रथम विलोकुनि ही ( पूर्वी युद्धात गांठ पडली असतां हि ) तो खरा मानी करीन ( गजश्रेष्ठ ) नखरा नाराचगणा [ सिंहाच्या नखाप्रमाणे तीक्ष्ण अशा—अर्जुनाच्या—बाणांस हि ] मानी च ना. नखरा ( चेष्टा, धिंगाणा ) करी. ८. दंडधारास. ९. शत्रुसमुदायास मारणाऱ्यास. १०. वृत्रासुर, नमुचि व जंभासुर यांचा काळ—मारणारा—जो इंद्र त्यास. ११. केशिदैत्यास मारणारा श्रीकृष्ण. १२. वनांत. १३. गाणे. १४. दळतांना.

संसप्तकांत शिरतां, हरिणांच्या जेंवि सिंह कळपांत. १६
संसप्तकमथनकथन पुष्कळ; थोड्यांत सांगतों; परिसा.
करिसारंगशशक ते, विजयविशिखगण तदंतरीं हरिसा. १७
करितां रिपुदलन म्हणे वरचेवर लोकनाथ 'बा! हूं!' तें
संसप्तकबलदलनीं दे परमोत्साह पार्थबाहूंतें. १८
संसप्तक ते राक्षस, अर्जुन तो रघुपती, न वरचील
दृष्टांत सज्जनप्रिय; यास्तव न सुमति कवी नव रचील. १९
कृष्ण म्हणे, 'विजया! या रणभूमिकडे पहा महाबाहो!
बा! हो सदैव विजयी. स्वत्राणा आर्तजन तुला बाहो. २०
पार्था! पहा पहा रे! नटताति चहूंकडे कबंध रणीं.
झाली तुझ्या रथास हि वीरशरीरीं सुदुर्गमा धरणी. २१
हे त्वां महाभुजा! भुज वीरांचे खंडिले असंख्य, अही
गरुडें जसे नखांहीं. दिसती अत्यंतउग्रमूर्ति मही. २२
हीं मस्तकें भटांचीं कमळेंसीं विखरिलीं. इहीं भूतें
त्वां पूजिलें. उदारा! केलीं तृप्तें पलाशनें भूतें. २३
तुज हे देत्ये आशीर्वाद मधुघ्नासि जेंवि दे, वसुधा.
सेविति यथेष्ट भूत क्षतजनदी, जेंवि सर्व देव सुधा. २४
दुस्तर रक्तनदी हे, वाहवित्ये द्विरद ही, बहु चि खोल.
हा शोणितमांसांचा झाला सर्वत्र दुर्गम चिखोल. २५
भटकोटिकटक वर्ते ज्याच्या आज्ञेचिया कळेवरतें,
पडलें धरावराचें रणभूमितळीं पहा कळेवर तें. २६

१. हत्ती, हरिण व ससे. २. संसप्तक. ३. कृष्ण. ४. वरकड, अन्य. ५. अर्जुना! (हें संबोधन साभिप्राय आहे). ६. नाचत आहेत. ७. धडे. ८. मृतवीरांची शरीरें दाट पसरल्यामुळे, असा भावार्थ. ९. आजानुबाहो! १०. मांसभक्षक अशी. ११. मधुदैत्यांतकासि. १२. कळ दाबली असतां यंत्र चालतें किंवा बंद होतें त्याप्रमाणें सर्वस्वीं ताब्यांत असलेले. १३. दंडधारराजाचें. १४. शरीर.

रत्नांगदमुकुटकटकहारपदकमुद्रिकादिनगराशी[1]
जिकडे तिकडे पडले. गेले भोक्ते कृतांतनगरासी. २७
हे जळ मागति; धांवति हे आणायासि; हे पहा रडती
कीं न प्राशुनि मेले; हे घेउनि आप्तनाम[2] आरडती. २८
शरचापतूणतोमरखड्गगदाशक्तिपरशुपरिघांतें,
भग्नांतें[3] अवलोकीं. त्वां जय संपादिला चि अरिघातें. २९
ऐसें कर्म कराया हरि एक समर्थ, तूं तसा चि दुजा;
पार्था! सख्या! निरंतर परिवृद्ध[4] असो भुजप्रताप तुजा.' ३०
रणभूमि दाखवीत प्रभु रथ फिरवी; अशांत तो कानीं
नाद शिरे, जो केला दुर्योधननृपबळांत लोकानीं. ३१

## अध्याय तेरावा.

तें रणचत्वर[5] सत्वर लंघुनि जावूनि कृष्ण जों पाहे,
तों धर्मसहायनृपति पांड्य महाबाहु भांडतो आहे. १
नाम प्रवीर त्याचें, मलयध्वज हें हि, पांड्य नाम दुजें.
तेणें कर्णाचें बळ मथिलें, केलें चि भग्न सैन्य तुजें[6]. २
जो भीष्मद्रोणांसीं समता[7] स्वप्नामधें हि साहेना;
कृष्णार्जुनांपरीस न्यूनत्व हि अन्यतुल्य पाहेना; ३
त्यासि रणीं बहुमानें द्रौणि म्हणे, 'वीरभूषणा! भूपा!
राजीवपत्रनेत्रा[8]! भुजगाभभुजा[9]! मनोज्ञसद्रूपा[10]! ४
अश्वत्थामा सोडुनि कां मारिसि हें अशक्त बळ हातें?
रुद्रासीं अंधकसा, तूं मजसीं मात्र योग्य कळहातें.'

---

१. रत्नखचित बाहुभूषणादि अलंकारांच्या राशीला. २. मेलेल्या इष्टमित्रांचें नांव. ३. छिन्नविच्छिन्न झालेल्यास. ४. वृद्धिंगत. ५. रणांगण. ६. धृतराष्ट्राचें. ७. बरोबरी. ८. कमलपत्राक्षा! ९. सर्पासारखे बाहु असलेल्या! १०. अत्यंत सुंदर रूप ज्याचें अशा!

मग पांड्यातें द्रौणि, द्रौणीतें पांड्य विंधिती बाणीं;
उरलें नाहीं च स्थळ तिळमात्र अभिन्न[1] तत्तनुत्राणीं[2]. ६

शिर उडवाया नव[3] शर नवदा नव[4] उग्र विप्रवीरानें[5]
जे सोडिले, नवांहीं[6] ते सर्व छेदिले प्रवीरानें. ७

च्यारही घोडे[7] वधिले, शर सोडुनि गुण हि खंडिला भूपें,
द्रौणि क्रोधें पेटे, जैसा दावाग्नि सिंचिला तूपें. ८

सेवकजन बहु सत्वर योजी त्याच्या रथासि वाजिवर.
द्रौणि हि गुण धनुला, बळ दावी जें दाविलें न आजिवर. ९

जसि योजिली[8] सुचतुर प्रभुनें व्यापी समस्त जग नीती,
तसि गुरुशतशरवृष्टि[9] क्षितिला आक्रमुनि जाय गगनीं ती. १०

ती ही खंडुनि पांड्यें वधिले रथचक्ररक्षक क्षिप्र,
तेव्हां जसा व्रजावरि[10] हरि, अरिवरि या हि तेंवि तो विप्र. ११

गुरुसुत महेंद्र, धनु घन, शर ते जलवृष्टि, सैन्य तो घोष[11],
नृप गोवर्धन, त्याचा धर्ता[12] उत्साह देव निर्दोष. १२

ज्या आयुधशकटाला[13] वाहति वृष आठ तीं असीं प्रकटें[14],
द्रौणि रणीं करि रिक्तें अर्धप्रहरांत, आठ ही शकटें. १३

ऐसे वरायुधांचे[15] गाडे, संपूर्ण आयते[16], ज्याचा
भुजशक्ति करि रिकामे; सांगावी गोष्टि काय तेज्याची! १४

१. अक्षत २. त्याच्या कवचीं. ३. नऊ. ४. नवीन. (कोरे). ५. अश्वत्थाम्याने. ६. नऊ बाणानी. ७. उत्तम घोडे. ८. योजिलेली. ९. मोठमोठ्या शेकडो बाणांची वृष्टि. १०. गोकुळावर. ११. गोवळवाडा. १२. निर्दोष उत्साह हा च उचलून धरणारा देव. (नदानें इंद्रयज्ञ करण्याची तयारी केली असता श्रीकृष्णानें त्या द्रव्याने ब्राह्मणादि सर्व भूतास संतुष्ट केलें; त्यामुळें इंद्रानें रागानें गवळीवाड्यावर भयंकर वृष्टि करविली. तेव्हा श्रीकृष्णानें एका बोटावर गोवर्धन पर्वत उचलून धरून सर्वांचें रक्षण केलें). १३. शस्त्रांच्या गाड्याला. १४. प्रसिद्ध. १५. उत्तम आयुधांचे. १६. तयार.

ते बाणवृष्टि [1]वायव्यास्त्रमहावेगपांड्यपवमानें
लीळेकरुनि उडविली, [2]मानधनप्रीति जेंवि अवमानें. १५
ध्वज धनु खंडी, मारी सूताश्वांतें हि शूरविप्रकर,
पांड्यनृपप्रवराच्या शस्त्रास्त्रांचा न ऊरवि [3]प्रकर. १६
मारायाचा समय प्राप्त चि जाला, न मारिला परि तो:
[4]परितोष तसा न दुजा दे, कीं नृप [5]शुद्ध युद्ध हा करितो. १७
झगडेल आपणासीं या [6]कामें वांचवि प्रवीराला;
म्हणुनि म्हणति सुर, ‘साधो! तूं पुष्कळ वांच’ विप्रवीराला.
सोडुनि पांड्यनृपातें, मर्दी द्रौणि [7]द्विपाधिरोह रणीं.
[8]कमळांविचयीं तैसा [9]विगतश्रम [10]वीरवरशिरोहरणीं. १९
तों एक [11]सुकल्पित गज, धांवत मलयध्वजाकडे आला,
ज्याच्या [12]अधिरोहातें वीरगुरु द्रौणि मारिता झाला. २०
त्या करिवरि, गिरिशिखरीं हरि तैसा, तो उडोनि पांड्य चढे:
तेव्हां [13]प्रवीरभूपस्तोत्रातें शत्रुभटचमू हि [14]पढे. २१
[15]रविरश्मिप्रभ तोमर, [16]गुरुपुत्रशिरःसरोज उडवाया,
प्रेरी पांड्य भुजबळें, [17]तोत्रें गज ही रथासि तुडवाया. २२
तोमर सोडी तेव्हां मोठ्यानें तो प्रवीर भूप म्हणे,
‘मेलासि द्रौणे! तूं मेलासि! स्मर [18]हरीस वीरमणे!’ २३
केंचें वारण करणें? मरणें नव्हतें म्हणोनि, तोमर तो
[19]भूषण चि हरि शिरींचें. कीं जो प्राणी [20]गतायु तो मरतो. २४

१. वायव्यास्त्राच्या महावेगानें युक्त असा पांड्यरूपी वायु, त्यानें. २. स्वाभिमानरूपी धनाची आवड. ३. समुदाय. ४. संतोष. ५. धर्मयुद्ध. ६. इच्छेनें. ७. हत्तीवर बसलेल्यास. ८. कमळच्छेदाविषयीं. ९. श्रमरहित. १०. वीरश्रेष्ठांचीं शिरें उडविण्यांत. ११. चांगल्या रीतीनें सज्ज केलेला. १२. वर बसणारास. १३. प्रवीर नांवाच्या पांड्यराजाच्या स्तुतीला. १४. करूं लागली. १५. सूर्यकिरणाप्रमाणें तेजस्वी. १६. अश्वत्थाम्याचें शिरकमल. १७. अमुडानें. १८. बिष्णूस. १९. किरीट. २०. आयुष्यहीन.

ते [1]पद्मरागहीरकगारुत्मतशक्रनीळरत्नांचें
केलें, किरीट, भस्म चि. [2]परितापें चित्त ही [3]सपत्नांचें. २५
हरितां किरीट [4]पादाहत [5]अहिपतिसा चि, गुरुसुत क्षोभे;
अंधकमथनीं हरसा, पांड्यवधीं त्या रणांगणीं शोभे. २६
बाण चतुर्दश सोडी, पांचांहीं [6]हस्तिपादकर भेदी,
तदनुचर महारथ सा [7]साहीं, [8]नृपबाहुशिर तिहीं छेदी. २७
कुंडलमंडित पांड्यक्षितिपतिचें शिर धरातळीं पडलें;
भासे पतन [9]विशाखामध्यगपूर्णेंदुमंडळा घडलें. २८
जसि [10]इष्टि दशहविष्का, तींत करिति [11]पिष्टपिंड [12]दशधा, [13]ती,
आचार्यपुत्र दावी युद्धमखीं [14]पांड्यगजवधीं, [13]जाती. २९
बळि जिंकितां जसा करि सुरपति सत्कार विष्णुचा भूपा!
दुर्योधन पांड्यवधीं द्रौणीची स्तुति करी [15]तदनुरूपा. ३०

---

## अध्याय चौदावा.

प्रज्ञाचक्षु म्हणे, "जयिं परमसहाय प्रवीरभूप मरे,
काय करी तयिं अर्जुन? तो चि महाबळ [16]सुरप्रभूपम रे! १
कर्णें ही बहु सैनिक धर्माचे पळविले चि असतील,
संमुख सिंह पहातां क्षुद्र मृग स्वस्थ केंवि बसतील? २
तें कळतां जिष्णूचें चित्त क्षोभासि फार पावावें.
पुच्छ रगडितां नागें धावावें, कडकडोनि चावावें. ३

१. या रत्नविशेषाचें. २. पश्चात्तापानें. ३. शत्रूचें. ४. पायानी तुडविलेला. ५. उग्र सर्पासारखे. ६. हत्तीचे पाय व सोंड. ७. सहा बाणानी. ८. पांड्यराजाचे बाहु व शिर. ९. विशाखानक्षत्राच्या मध्ये आलेल्या पूर्णचंद्रमडळास. २०. या नांवाची इष्टि. (यज्ञ). ११. पिठाचा पिंड. १२. दहा भाग. १३. तशी तऱ्हा, प्रकार. १४. पांड्यराजा व त्याचा हत्ती मारण्यांत. १५. त्याला साजेशी. १६. इंद्रतुल्य.

मृत्युंजयें[1] दिला वर कीं, 'तूं सर्वत्र हो अजय्य[2]' असा;
त्यापासुनि भीतों मीं. वद सूता[3]! वर्तला सिताश्व[4] कसा?" ४
सूत म्हणेः-त्या समयीं कृष्ण वदे, 'अर्जुना! रणामाजि
धर्म दिसेना. कर्णें बहु सृंजयवीर मारिले आजि. ५
प्रथम पळाले पांडववीर, पुन्हां मुरडले[5], पहा, शूर.
हें शत्रुसैन्य त्यांच्या धाकें धाकें चि पळतसे दूर.' ६
पार्थ म्हणे 'गोविंदा! सत्वर हय चालवीं; अहा! मीं तों
निर्भय तव प्रसादें, परि न दिसे धर्म म्हणुनि बहु भीतों. ७
ऐसें पार्थ वदे तयिं हाकी हा कीर्तनीयपद[6] वाजी.
धन्य तुम्हीं आम्हीं कीं नरनारायणचरित्र वदवा[7] जी! ८
भीमप्रमुख महात्मे पांडववीर प्रसिद्धकीर्ति बळी;
आम्हीं कर्णप्रमुख स्वजयार्थें मांडिली रणांत फळी[8]. ९
कर्णें पांचाळांचे[9] वीस रथी मारिले अतिख्यात[10],
केला बहु वीरांच्या प्राणांचा त्या रणांगणीं घात. १०
'धृष्टद्युम्न वधावा पुरवावा आजि काम हा मात्र,'
तव पुत्र म्हणे; तेव्हां लोटिति गजनायकां महामात्र[11]. ११
केरल, कोसल, मागध, मद्र, निषध, अंग, वंग गजयोधी[11],
धृष्टद्युम्नावरि बहु वर्षति शस्त्रें महाबळ विरोधी[12]. १२
ते शरतोमरवृष्टि[13] द्विपयोधी सोडिती सरी घनसे[14].
त्या शस्त्रांच्या पटळीं एका ही रविकरास रीघ नसे. १३
गिरिरुद्ध[15] वज्रकरसा[16] मानीं त्या पार्षतास मीं. रण तो
अद्भुत, कीं गजयोधी ते घन, पांचाळ[17] ही समीरण[18] तो. १४

१. शकराने. २. आंजक्य. ३. सजया! ४. अजुन. ५. उलटल, जाराने चालून गेले. ६. स्तुतीस पात्र आहेत पाय ज्याचे असा कृष्ण. ७. बोलवितां. ८. फळी धरिली. ९. द्रुपदराजाचे. १०. महात. ११. हत्तीवर बसून युद्ध करण्यांत प्रवीण असलेले. १२. शत्रु. १३. पर्जन्यधारा. १४. मेघाप्रमाणें. १५. पर्वतानीं अडविलेला. १६. इंद्रासारखा. १७. धृष्टद्युम्न. १८. वायु.

सात्यकि, नकुळ, शिखंडी, सहदेव, द्रौपदेय इत्यादि
वृष्टि करिति शस्त्रांची; झाले संक्षुब्ध सर्व गजसादी[1]. १५
सात्यकिनें अंगनृपति, सहदेवें पुंड्रभूप, नकुळानें
अंगनृपाचा नंदन, वधिला जैसा भुजंग नकुळानें[2]. १६
अंगाच्या वीरानीं नकुळासीं फार उग्र रण केला;
परि माद्रीसुतहस्तें[3] त्या म्लेच्छांचा मद क्षया गेला. १७
त्या पांडववीरांहीं वधिले ते म्लेच्छ वीर[4] सर्व तसे;
पडले क्षितिवरि वज्रायुधपातांहीं[5] ससिंह पर्वतसे. १८
सेनाटवींत[6] तुझ्या शिरला सहदेव दावपावकसा[7];
दुःशासना घना[8] भटमृग म्हणती, 'शीघ्र धाव; पाव कसा.' १९
त्या भ्रात्यावरि धांवे भ्राता दुःशासन प्रजापाळा!
त्याभोंवता मिळाला वीरांचा रण पहावया पाळा[9]. २०
वक्षःस्थळीं तुझा सुत सहदेवातें शरत्रयें भेदी,
पांडव ही शत्रूचें नाराचानें उरःस्थळ छेदी. २१
शत्रूवरि सत्तर शर सोडी, सूतावरी हि तो तीन.
जो[10] तो[10] ही जाय म्हणत, 'रिपुजीवन[11] निजमुखांत ओतीन.'
दुःशासन धनु खंडुनि मस्तक वक्ष त्रिसप्तती[12] बाणीं
हाणी[13], तेव्हां घाली पांडव पाणी[14] भयंकरकृपाणीं[15]. २३
सहदेवें मग, गरगर फिरवुनि, जो खड्ग सोडिला बापा!
तो तोडी तत्काळ चि दृढ बाणगुणांसमेत[16] ही चापा. २४
दुसरें धनुष्य घेउनि रिपुचें भेदावयासि उर, गमनीं[17]

१. हत्तींवरील योद्धे २. मुंगसानें. ३. नकुळाच्या हातून. ४. गजयोधी. ५. वज्राघातानें. ६. सेनारूप अरण्यांत. ७. वणव्यासारखा. ८. दुःशासनरूप मेघास. ९. घेरा; समुदाय. १०. प्रत्येक बाण. ११. शत्रूचे प्राण. १२. ऱ्याहत्तर. १३. [सहदेवास] हाणी. १४. हात. १५. भयंकर तलवारीस. १६. बाण व धनुष्याची दोरी यासह. १७. जो शर गमनीं (वेगांत) सुपर्णसा (गरुडसा) [आणि] ज्या उरग (सर्प) मनीं 'नाथ' (आपला राजा–प्राणहरण करण्यांत आपल्याहून अधिक तरबेज) म्हणती तो शर सोडी.

जो शर सुपर्णसा तो सोडी, ज्या म्हणति ' नाथ ' उरग मनीं.
दुःशासनें हि तो शर तोडुनि, फिरवूनि तो चि करवाळ,[१]
त्यजिला सहदेवावरि अरिहननीं जो उदंड अरवाळ.[२] २६
सोडुनि सहदेवावरि कृष्णोरगराजरूप[३] उग्रासी,[४]
धनु सज्य करुनि घे शर, काळ हि ज्या मानवेल उग्रासी.[५] २७
तो सहदेव हि देवा[६]! येतां त्वत्सूनुच्या[७] कृपाणातें[८]
क्षितिवरि पाडी तोडुनि, सोडुनि अत्यंततीव्रबाणातें. २८
तों सहदेवरथावरि सोडी तव पुत्र शर चतुःषष्टि.[९]
पांचांहीं एकैक छेदी माद्रेय,[१०] परि नव्हे कष्टी. २९
वृष्टि करी विशिखांची प्रियनंदन पांडुचा धनुर्वेदी.
एकैका बाणातें तीं तीं बाणीं तुझा सुत छेदी. ३०
करिती प्रवेश दुःशासनशर त्या पांडुसूनुच्या वर्मीं;[११]
भेटों इच्छिति जाणों स्वगुरुदुरुक्ताशुगांसि[१२] हृन्मर्मीं.[१३] ३१
पीडुनि सहदेवातें हाणी सूतासि तीव्र नव[१४] शर, हा[१५]
काय म्हणे, ' यमधर्मा सोडुनि, होउनि नरास, न, वश, रहा.' ३२
तेव्हां सहदेव धरी, हस्तीं खर[१६] बाण अंतकोपम,[१७] हा,
चित्तीं हि सर्परिपुचा जेंवि करायासि अंत, कोप महा. ३३
आकर्ण[१८] चाप ओढुनि, सहदेवें तीव्र सोडिला बाण;
तो कवचतनुक्षितितळ[१९] भेदुनि करि अरिसि मूर्छितप्राण. ३४

१. तरवार. २. हलका. ( जो करवाल हलका असून शत्रुनाश करण्यास पुरेसा होता असा, किंवा, जो शत्रुनाश करण्याच्या कामीं फार हलका—कुचकामी—होता, असा अर्थ ). ३. कृष्णसर्पराजासारखा. ४. भयंकर तलवार. ५. भयंकरासि. ६. राजा! ७. तुझ्या मुलाच्या. ८. खड्गाच्या. ९. चौसष्ट. १०. सहदेव. ११. कवचांत. १२. आपल्याला वडील भावासारख्या असलेल्या [ दुःशासनाच्या वस्त्र-हरणप्रसंगींच्या ] दुरुक्तरूपी बाणांना. १३. हृदयरूपी मर्मावर. १४. नऊ. १५. दुःशासन. १६. तीक्ष्ण. १७. यमासारखा. १८. कानापर्यंत. १९. अंगावरील कवच फाडून शरीरांतून आरपार निघून जमिनींत शिरला.

पडतां मूर्छित, सूतें दुःशासन पळविला; पराभूतें
सैन्यें मारुनि रक्तें तर्पी[1] सहदेव भूवरा[2]! भूतें[3]. ३५
कुरुसेनाभुजगोतें खंडी जों शरनखाननीं[4] नकुळ[5],
त्यातें कर्ण निवारी, केलें [6]जेणें तुझें हि दीन कुळ. ३६
त्या कर्णातें पाहुनि नकुळ म्हणे, 'आजि बहुदिसां दृष्टी,
करुणार्द्रा देवांची, मजवरि पडली महासुधा वृष्टि. ३७
तूं वैरकलहसर्वानर्थांचें मूळ, लोकहानिकर;
हा निकर कौरवांचा मेला: त्वां करविला महा निकर. ३८
राजसभेंत खळा! त्वां आणविली कुळवधू निहीनकुळा!
कृतकृत्यता न, तुज न विमथितां खळजन वधूनि ही नकुळा[10]. ३९
आजि रणीं मारिन तुज रिपुला विपुलापराधबीजाला,
शक्र हि रक्षूं न शके, संहाराया सजेन मीं ज्याला.' ४०
कर्ण म्हणे, 'राजसुता! बहु न वदें, बाहुपौरुष[11] प्रकटीं.
विक्रमरहितें वचनें शोभति न जनीं, जसीं मुखें नकटीं. ४१
अस्मन्मानस[12] तव भुजपौरुष देखावया असे लोलें[13];
बोल[14] प्रहारबोलें, मोल तयाचें नव्हे, दुजें फोलें. ४२
करुनि हि अतुळ पराक्रम न वदति कांहीं च शूर. तूं आधीं
किति वदसी वाचाळा!? मग बोलें, जय पराक्रमें साधीं. ४३
क्षण हि न उरेल नकुळा! कर्णनृसिंहापुढें तुझा दर्प,
सर्पप्राण जसे खगपतिपासीं, शंभुनिकट कंदर्प[15].' ४४
ऐसें वदोनि सोडी वष नाराच त्रिसप्तति[16] क्रोधें.

१. संतुष्ट करी. २. धृतराष्ट्रा! ३. भूतपिशाचें. ४. बाणरूपी नखांनी व मुखांनीं. ५. माद्रीसुत (पक्षीं) मुंगस. ६. ज्या नकुळें. ७. समुदाय. ८. कहर. ९. नीचकुलोत्पन्ना ' १०. मला नकुळाला. ११. बाहुपराक्रम. १२. माझें मन. १३. उत्सुक. १४. कर्ण म्हणतो, "व्यर्थ वाचाळपणा करण्यापेक्षा तुला जें बोलावयाचें तें प्रहाररूपी बोलानें बोल. अशा बोलण्याची किंमत करितां येणार नाहीं. दुजें—तोंडानें बडबड करणें हें—फोल आहे." १५. मदन. १६. त्र्याहत्तर.

ते लागतां चि नकुळें ऐसी शर अर्पिले महायोधें. ४५
चाप छेदुनि विंधी नकुळाला आधिरथि तिसां बाणीं,
कवच विदारुनि सेविति रुधिर, जसे अहि महीतळीं पाणी.
घेउनि धनुष्य दुसरें बाहूनीं भव्यवीर्यसिंधूनीं,
गर्जे सिंहरवें शरसप्ततिनें कर्णकाय विंधूनीं. ४७
सारथिला तीं बाणीं ताडुनि तोडूनि चाप तो नकुळ,
सोडी त्रिशत शर, तिहीं वृष वरिला जेंवि अळिकुळें बकुळ.
नकुळें व्याकुळ केला जेव्हां युद्धांगणांत आधिरथी,
आश्चर्य म्हणति सुरगण, तव सेनेंतील धरिति आधि रथी.
कर्ण दुजें धनु घेउनि मार्गण सप्त स्वकीयशत्रूच्या,
रोवी तो वीरशिरोमणिवर कर्ण, स्थळांत जत्रूच्या. ५०
सप्तशराहीं नकुळ हि पीडुनि कर्णासि, तद्धनुःकोटी
छेदी; तयिं 'साधु! नकुळ! साधु!' म्हणे मर्त्यदेवताकोटी. ५१
अन्य शरासन घेउनि कर्ण शरगणें सुता हि माद्रीच्या
झांकी, वृष्टिसमयें घनपटळें शिखरा जसा हिमाद्रीच्या. ५२
कर्णाचें शरपटळ छेदी तो नकुळ वीर, विशिखांचा,
पाडी घन वृषगिरिवरि, तो ही पाडी महीवरि हि खांचा. ५३
झांकिति अन्योन्यातें बाणपटें, उत्सवीं जसे व्याहीं;
शोभा सुधा चि धीरां, देवां सेव्या, परां न सेव्या हीं. ५४

१. उज्वल पराक्रमाचे समुद्र च अशानीं. २. सत्तर बाणानीं. ३. भ्रमरसमूहानें. ४. मानसिक दुःख. ५. रथांतून लढणारे वीर. ६. बाण. ७. बाहू व कंठ यांच्या संधिभागीं. ८. त्याच्या धनुष्याचें अग्र. ९. नकुळा! शाबास! १०. मनुष्य व देव यांचा समुदाय. ११. धनुष्य. १२. पावसाळा. १३. कर्णरूपी पर्वतावर. १४. तो बाणरूपी मेघ. १५. लग्नादि प्रसंगीं व्याही एकमेकांस वस्त्रें देतात. १६. अन्वय–धीरां शोभा सुधा चि, हीं देवां सेव्या; परां न सेव्या, किंवा, धीरां देवां शोभासुधा चि सेव्या; हीं परां सेव्या न, किंवा, शोभा धीरां सेव्या, हीं परां न; सुधा चि देवां सेव्या.

कर्णाचें शरपातस्थळ[1] सोडुनि, पळति तेधवां दूर
शूर हि सोमक, जैसे दंशांचे[3] संघ लागतां धूर. ५५
पांडव[2]मार्गणपातस्थळ सोडुनि, पळति सर्व तव सैन्यें,
श्रीरामनामकीर्तनरवभीताघें[5] जसीं धरुनि दैन्यें. ५६
नकुळशरगण गमे घन, झांकाया, कर्ण अर्यमा[6], वळला,
वृषविशिखराहुवदनीं पांडवनक्षत्रवर्य[7] मावळला. ५७
अन्योन्यविशिखसदनीं[8] शोभति रत्नप्रदीपसे[9] शुद्ध,
भ्रमरकुलावृत[10] अद्भुत कुसुमित[11] किंशुक[12] चि; करिति ते युद्ध. ५८
नकुळाचे शर वेष्टिति कर्णातें, जेंवि सर्प नकुळातें,
कर्णाचे शर वेष्टिति नकुळातें, जेंवि मधुप बकुळातें. ५९
सुरनरवर म्हणति, 'अहो! सकळां युद्धांत युद्ध हें कळस;
वळसत्त्वसिंधु न धरिति अळस; दिसति जेंवि विकसले पळस.'
मग कर्णें धनु खंडुनि, सारथि पाडूनि मारिले वाजी,
केला रथ शतचूर्ण[13] चि उग्रशरानीं मनुष्यदेवा! जी! ६१
मारूनि चक्ररक्षक[14], चक्र, गदा, खड्ग, चर्म, जें कांहीं
तें खंडिलें चि; युद्धक्रतुचें उपकरण राहिलें नाहीं. ६२
न रिघाला माघारां नकुळ महावीर; शत्रुवरि घाला
परि घालाया उचली तेव्हां अत्यंत घोर परिघाला[15]. ६३
कर्ण शरानीं खंडी त्या नकुळाच्या सुघोर परिघास,
क्षुब्ध कराया टाकी अरिवरि शर, जेंवि अग्न्युपरि घास[16]. ६४
नाहीं शस्त्र, स्यंदन, सहाय, माद्रेय विकवच पळाला,

१. बाणाच्या टप्प्यांतील जागा. २. पांडवाकडील सैन्यविशेष. ३. मधमाशाच. ४. नकुळ. ५. श्रीरामनामाच्या कीर्तनाच्या घोषानें भ्यालेलीं पापें. ६. सूर्य. ७. नकुळरूपी चंद्र. ८. एकमेकांनीं एकमेकांसाठीं निर्मिलेल्या बाणांच्या घरांत. ९. रत्नाच्या दिव्यासारखे. १०. भ्रमरसमुदायानें आच्छादिलेले. ११. फुललेले. १२. पळस. १३. रथाचे शतशः तुकडे केले. १४. रथाच्या चाकाचें रक्षण, करणारे. १५. आयुधविशेषास. १६. गवत.

कर्ण धराया धावे त्या अरिला घालुनि कवं[1] चपळोला[2]. ६५
कर्णाला भिउनि पळे, जैसा हतदर्प[3] सर्प नकुळाला;
पाठीं लागोनि धरी तैसा तो आधिरथि हि नकुळाला. ६६
धांवडिला[4] रथ सूतें, कर्णें, माद्रेय, गांठिला अहितें;
घालुनि धनुष्य कंठीं धरिला, धरि गारुडी जसा अहितें. ६७
हांसत हांसत त्यातें कर्ण म्हणे, 'पांडवा! पहा वरतें.
पहिलें वदलासि वृथा कीं झालें, सत्य भाषण स्मर तें. ६८
हे कुरु गुरु वीरांचे; यांसीं भांडों नको; न लाजावें;
तुल्यांसीं झगडावें; नकुळा! त्वां त्यजुनि भीतिला जावें. ६९
जा निजगृहासि बापा! व्याकुळ झाली असेल माय पृथा,
कीं त्यां कृष्णांपासीं[5] नकुळा! आलासि संगरांत वृथा.' ७०
ऐसें वदोनि सोडी, कुंतीवचन[6] स्मरोनियां न वधी;
अवधीरणा[7] चि करि; तें मानधना दुःख ज्या नसे अवधी. ७१
तेव्हां धर्मरथावरि नकुळ, असा होउनीं पराभूत,
गेला, मांत्रिकनिर्जितशक्ति[8] शरण काय ईश्वरा[9] भूत. ७२
कर्ण हि पांचाळांवरि, हस्तींवरि केसरी तसा गेला.
त्या वीरांचा मध्यंदिनसमयीं[10] नाश फारसा केला. ७३
दुर्योधनें[11] परमेश्वर, वाटे, तो वीरभद्र कर्ण बळी,

१. मिठी. २. पळणाऱ्याला. ३. भग्नगर्व. ४. पळविला, वेगानें चालविला. ५. कृष्णार्जुनाबरोबर. ६. कुंतीला दिलेलें वचन. ( उ० अ० ११।२८ पहा ). ७. अपमान. ८. पचाक्षऱ्यानें जिंकिली आहे शक्ति ज्याची. ९. शंकरास. १०. मध्याह्नकाळीं. ११. एकदां दक्ष कैलासीं गेला असतां योगमग्न शिवानें त्याचा सत्कार केला नाहीं; म्हणून दक्ष रागावला व शिवाचा द्वेष करूं लागला. पुढें त्यानें केलेल्या यज्ञप्रसंगीं शिवास अगर आपल्या मुलीस—सतीस—हि बोलाविलें नाहीं. सती न बोलावतां च पित्याच्या घरीं गेली; पण त्यानें तिचा अपमान करून शिवाची निंदा करितां च तिनें अग्निकुंडांत देहत्याग केला. शिवास हें कळतां च त्यानें आपल्या जटेपासून वीरभद्रास उत्पन्न करून त्यास दक्षयज्ञाचा विध्वंस करण्यास सांगितलें, व त्याप्रमाणें त्यानें केलें, या कथेवरील हें रूपक आहे.

धर्म हि दक्ष, समर मख, ऋत्विज पांचाळ, होय उग्र कळी. ७४
कीं वृष रवि, शर कर, भट उडु[1], शोणितपूर[2] अरुण, भीरु[3] तम,
विजय इनकांत[4], नृप[5] विधु[6], बळप[7] ग्रह, इष्ट[8] पद्म हृष्टतम[9]. ७५

## अध्याय पंधरावा.

धार्मिक[10] धर्मसहाय त्वत्पुत्र युयुत्सु[11] तव चमू पळवी,
स्वविवेक स्वकुमतिला जैसा निजविक्रम स्वयें कळवी. १
शकुनि उलूक[12] म्हणे त्या वीराला 'तिष्ठ[13] तिष्ठ,' तों याणें,
शक्रें वज्रें गिरिसा, मर्मीं तत्काळ ताडिला बाणें. २
तोडुनि धनुष्य ताडी कर्णिशरें[14] शकुनि; तेधवां त्यातें
विंधी युयुत्सु घेउनि चाप नवें षष्टिमार्गणव्रातें[15]. ३
सूतातें तीं बाणीं पीडुनि, बहुशरगणें पुन्हां त्याला
हाणी, न्हाणी त्याच्या रक्तें चि रणऋतूंत न्हात्याला. ४
कोपें उलूक विंशतिबाणाहीं त्या युयुत्सुला ताडी.
छेदूनि कांचनध्वज[16] कनकरथावरुनि भूमिवरि पाडी. ५
हाणी स्तनांतरीं शर पांच शकुनिच्या त्वदंगजनु[17] रागें;
फुल्लपलाशवनाची[18] होय सखी शोणितार्द्रतनु[19] रागें[20]. ६
छेदी उलूक भल्लें[21] सूताचें शिर, तुरंग ही मारी,
मर्मीं पांचा बाणीं हाणी, पीडी युयुत्सुला भारी. ७

१. नक्षत्रें. २. रक्ताचा प्रवाह. ३. भित्रे. ४. सूर्यकांतमणि. ५. राजा (धर्म). ६. चंद्र. ७. सेनापति. ८. दुर्योधनादिक इष्टमित्र. ९. अत्यंत संतुष्ट. १०. धर्माच्या बाजूनें लढणारा. ११. हा धृतराष्ट्रास एका वैश्यकन्येपासून झालेला पुत्र. १२. शकुनिपुत्र. १३. थांब, थांब. १४. बाणविशेषानें. १५. साठ बाणांच्या समुदायानें. १६. सोन्याचा झेंडा. १७. तुझा पुत्र. १८. फुललेल्या पळसाच्या वनाची (?). १९. रक्तानें भिजलेलें शरीर. २०. आरक्तपणानें. २१. बाणविशेषानें.

अन्यरथावरि गेला पुत्र तुझा होउनीं पराभूत,
शकुनि हि पांचाळांवरि धांवे, तेव्हां गमे खरा भूत. ८
युद्ध शतानीकासीं, श्रुतकर्मा तव तनूज, करि भारी;
सूतासह च्यारी ही अश्व निमेषांत शत्रुचे मारी; ९
वीरशतानीक गदा सोडी, मांत्रिक जसी महाकृत्या[1];
ती श्रुतकर्म्यावरि ये, दावी अत्यंत दारुणा कृत्या. १०
सारथितुरगरथांचें भस्म करुनि, मेदिनीस[2] ही फोडी;
पूर्वीं च उडी टाकी श्रुतकर्मा, म्हणुनि त्यास ती सोडी. ११
होउनि विरथ पहाती कोपें अन्योन्य मत्तवृषसम ते,
युद्धांत भग्नदंत द्विरदाधिपसे[3] चि जाहले गमते. १२
संभ्रांत[4] श्रुतकर्मा जाय रथावरि विविंशुच्या पहिला[5],
जातां प्रतिविंध्यरथीं वीर शतानीक कांपवी महिला. १३
सौबळ[6] शकुनि महाबळ सुतसोमातें शरव्रजें व्यापी;
सुतसोम हि शकुनीतें[7] दारुणशरपंजरांतरीं स्थापी. १४
केला विरथ शकुनिनें, परि सुतसोम व्यथा न धरि पोटीं,
क्षितिवरुनि हि विस्तारी शरजाळ सुबळनंदनीं मोटीं. १५
सुतसोमाचे भाते चाप हि, सोडूनि भल्ल बहु तूर्ण[8]
श्यालें तुझ्या नृपाळा! केलें युद्धोपकरण[9] तें चूर्ण. १६
तेव्हां सुतसोमानें खड्ग, स्वीकारिला, नभःश्याम[10],
तेणें चि सौबळाचा केला शतचूर्ण सायकग्राम[11]. १७
मग तो हि खंडिला असि राया! त्वच्छालकें कृतस्पर्धें[12],
परि तोडिलें शकुनिचें, सुतसोमें, सगुणचापें[13], त्या[14] अर्धें[15]. १८
सा पाउलें उडोनि स्वकरींचें खड्गखंड ही बापा!

१. भयंकर भूतविशेष. २. पृथ्वीस. ३. गजश्रेष्ठासारखे. ४. भ्यालेला. ५. शतानीकापूर्वीं. ६. सुबलपुत्र शकुनि. ७. शकुनी हा च शकुनीपक्षी, त्यानें. ८. त्वरित. ९. युद्धसाहित्य. १०. आकाशासारखा श्यामवर्ण. ११. बाणांचा समुदाय. १२. केली स्पर्धा ज्यानें त्या. १३. दोरीसह धनुष्य. १४. त्या तुटलेल्या खड्गानें.

कोपें झुगारिलें तें तोडी तत्काळ शकुनिच्या चापा. १९
श्रुतकीर्तिच्या रथावरि गेला सुतसोम सौबळ हि राया!
त्या धर्मव्यूहावरि जाय, ज्वरसा चि तद्बळ हिराया. २०

---

# अध्याय सोळावा.

धृष्टद्युम्नातें कृप वारी, जैसा हरीस शरभ वनीं,
पडतां चि गांठि, कोंडी त्या द्रोणाच्या अरीस शर-भवनीं. १
प्रेक्षक सुर नर म्हणती, 'वीर कृपाचार्य या रणामाजि,
वधितो चि पार्षतातें, दिसतो अत्युग्र काळसा आजि. २
हा जैसे शर सोडी लघुकर, याचा असे न शर भाचा.
पार्षतसिंह न साहे विक्रम या गौतमोग्रशरभाचा.' ३
पांचाळ कृपाचार्यें मर्मस्थानीं च विंधुनीं खिळिला,
मोहमहाजगरानें पांडुसुतांचा चमूपती गिळिला. ४
न दिसे गुण शर, न चले कर, पोकळ होय मुष्टि इष्वसनीं,
धृष्टद्युम्न भ्रमला, न सुचे कर्तव्य लेश हि व्यसनीं. ५
त्यातें तत्सूत म्हणे, 'आहे कीं क्षेम पार्षता! सांगें;
गौतमबाणगणानें सारीं हीं चुंबिलीं तुझीं आंगें. ६
ऐसी तुझी अवस्था नाहीं म्यां पाहिली कधीं हि. रवी
तिमिरीं भ्रमला! हा! हा! झाली मुखकांति पीवळी हिरवी!
रक्षाया प्राण तुझे पळवीन पळांत; दे मला आज्ञा.
हा निष्कृप कृप दिसतो सर्वावध्य; स्मरें हित प्राज्ञा!' ८

१. त्या धर्माचें सैन्य (पक्षी) शक्ति. २. त्वरित [बाण सोडणारा] हात ज्याचा. ३. अश्वत्थामा. ४. कृपाचार्यरूप भयंकर शरभाचा. ५. धनुष्याची दोरी. ६. बाण सोडण्यांत. ७. सर्वांना अवध्य. ८. युद्धांतून पळून जाणें हें च सांप्रत तुझ्या हिताचें आहे, हें लक्षांत आण.

धृष्टद्युम्न म्हणे, 'रे ! भ्रमतें मन, पावली हि तनु कंपा,
ने विजयापाशीं कीं भीमापाशीं करूनि अनुकंपा. ९
आतां भस्म करील स्पष्ट कृपाकारकृष्णपथ[1] हा कीं !
याच्या दृष्टिपुढें मज तग न निघे. पुससि काय? रथ हाकीं.'
आज्ञा घेउनि सूतें भीमाच्या आश्रयासि रथ नेला.
पळतां पांचाळ, कृपें मागें लागोनि शंखरव[2] केला. ११
युद्ध शिखंडीसह करि कृतवर्मा तें हि सांगतों आतां.
परिसावें सादर मन करुनि भरतवंशभूषणा[3] ! बा ! तां[4]. १२
शर पांच जत्रुदेशीं सर्पांसम झोंबतां चि कृतवर्मा
षष्टिशरांहीं[5] विंधुनि खंडी पांचाळचाप, कृतकर्मा[6]. १३
त्यासि शिखंडी ताडी नवतिशरांहीं[7], धनुष्य ही तोडी;
पुनरपि अशीतिबाणीं[8] सुदृढ हि कवच क्षणामधें फोडी. १४
डसले शरअहि मर्मीं, सर्वांगें रक्तपूर तो वमला,
श्रमला कृतवर्मा बहु, समरीं पुष्पितपलाशसा गमला. १५
मग हार्दिक्य[9] दृढ दुजें, धनु सज्य करूनि, तीव्र शर सोडी;
ते द्रुपदसुतस्कंधीं रक्ताची घेति आदरें गोडी. १६
ते दिसति गैरिकारुण[10], वर्षाकाळीं जसे महाशैल[11];
अन्योन्यातें भेदिति शस्त्रीं, शृंगीं जसे हठी बैल. १७
गरुड जसा भुजगीतें, भोजाची[12] बाणवृष्टि तसि खंडी;
न शिखंडी भी, तांडव करि, जेंवि घनीं[13] प्रमोदित शिखंडी[14].
मग त्या भोजें केला, सोडुनि तीव्रेषु[15], मूर्छित शिखंडी,
जैसा मेघें विद्युत्पातें वृष्टिप्रमोदित शिखंडी. १९

१. कृपाचार्यरूप अग्नि. २. शंखनाद करून स्वतांचा विजय सुचविला. ३. धृतराष्ट्रा ! ४. त्वां. ५. साठ बाणानी. ६. केला आहे पराक्रम ज्यानें. ७. नव्वद बाणानी. ८. ऐंशी बाणानीं. ९. कृतवर्मा. १०. कावेप्रमाणें लाल. ११. मोठे पर्वत. १२. कृतवर्म्याची. १३. मेघानीं. १४. मोर. १५. तीक्ष्ण बाण.

सूतें तो ही धृष्टद्युम्न तसा पळवितां, सपदि[1] सेना
भंगे पांडुसुतांची, जीला त्या संकटीं स्वप[2] दिसेना. २०

# अध्याय सतरावा.



अर्जुनशरगणमारुत तवबळघन[3]तूळराशिला विखरी.
पळवि परि न बहु गज वधि,हरि, त्याला विजय लाज लावि खरी[4].
संसप्तक, नारायणबळ, शाल्व, शिबि, त्रिगर्त, कौरव ही
धांवति धनंजयावरि, तेव्हां पावे उदंड कंप मही. २
नृप सत्यसेन धांवे, दुसरा जो चंद्रदेव जयशाली.
तैसा चि मित्रदेव हि पार्थावरि धांव आग्रहें घाली. ३
वीर रिपुंजय, सौश्रुति दृढधन्वा, चित्रसेन अभिमानी,
जयलुब्ध चित्रवर्मा, पार्थासी गांठि बहु बरी मानी. ४
धांवे त्रिगर्तराज भ्रात्यांपुत्रांसमेत जिष्णुवरी,
त्यां सर्वां स्वीकारी अर्जुन, असुरांसि जेंवि विष्णु वरी. ५
ते एकदा चि वर्षति शस्त्रांचे निकर, जेंवि घन पाणी.
साहे नगसा, ओपी धनपतिसा बाण बाण[5]धनपाणी. ६
शत्रुंजयासि मारुनि, सौश्रुतिच्या तोडुनीं शिरःपद्मा,
पार्थें गौरउनि[6] शिरीं पाठविला चंद्रदेव यमसद्मा[7]. ७
पांचां पांचां बाणीं विंधी इतरांसि त्या सगर्वांत[8],
दावी प्रताप मोटा पृथिवीपति सत्यसेन सर्वांत. ८

१. तत्काळ. २. स्वत्राता. ३. तुझे सैन्य हीच दृढ कापसाची राशि. ४. सिंह पुष्कळ हत्ती पळवितो; पण त्याला ते सर्व एकदम मारता येत नाहीत; अर्जुनानें एकदम हत्तीसारखे अनेक वीर मारल्यामुळें त्यानें सिंहावर हि ताण केली. ५. बाणरूपी द्रव्य हातात असलेला (अर्जुन). ६. शिरीं गौरवुनि=शिर उडवून. ७. यमगृहास. ८. गर्विष्ठांत.

कीं तों तोमर सोडी, तेणें भुजगेंद्रभोगनिभ[1] भव्य,
श्रीकृष्णाचा, राया! त्या समरीं भेदिला चि, भुज सव्य. ९
गळला प्रतोद हस्तापासुनि, ते अश्वरश्मि[2] हि गळाले.
देवी·देव म्हणति, 'हा!' तैं सिद्धांचे स्वधीर हि पळाले. १०
तें पाहतां चि पार्थ प्रभुहूनि उदंड पापताप[3] धरी,
देवासि म्हणे, 'सखया! ने रथ जेथें चि सत्यसेन अरी. ११
लीलेनें चि उडवितों मस्तक रिपुचें पळांत कंसारे!
कौतुक पहा. सहा. भुजरुधिरें भरलासि सुरवंतसा[4] रे!' १२
कृष्णें तैसे चि पुन्हां धरितां रश्मिप्रतोद मोदानें[5],
हय चालवितां, पार्थें केली शरवृष्टि जसि पयोदानें[6]. १३
अतिदारुणभल्लशरें[7] त्या समरीं पार्थ, दिव्यरूपाचें,
खंडी, कुंडलमुकुटालंकृत शिर सत्यसेनभूपाचें. १४
तैसें चि वत्सदंतें[8] आक्षेपुनि[9] चित्रसेनरायाला,
अर्जुन शरवृष्टि करी सहसा संसप्तकां मरायाला. १५
मग मित्रसेन वधिला; भूप सुशर्मा हि जो परम शत्रु
तो ही पार्थें केला, बाणगणें त्या रणीं, व्यथितजत्रु[10]. १६
वेढिति संसप्तक या पांडुसुता, सिंह जेंवि शरभा, ते.
करिति वदान्य[11] जसे निज कोष[12], तसे क्षीण सर्व शर भाते. १७
योजी ऐंद्रास्त्र विजय, तें अमित क्षुधित तापले शर [13]वी.
नभ हि भरे बाणघनीं. न करी सैन्यांसि ताप लेश रवी. १८
त्या बाणव्याघ्राहीं संसप्तकहरिण मारिले प्रांज्य[14].
बहु पेटला धनंजय[15], वरि पडतां शत्रुसैन्य तें आज्य. १९

१. मोठ्या सापाच्या अंगाप्रमाणे लांब व पुष्ट (भुज). २. लगाम. ३. पाप्या-विषयीं संताप. ४. सुरभूषणा! ५. आनदानें. ६. मेघानें. ७. अत्यंत भयंकर अशा भल्ल (चंद्राकृति) बाणानें. ८. बाणविशेषानें. ९. प्रहार करून. १०. घायाळ झाला आहे कंठ व बाहु यांचा संधिभाग ज्याचा. ११. दाते. १२. खजिने. १३. उत्पन्न करी. १४. पुष्कळ. १५. अर्जुन हा च अग्नि.

राजा धर्म महात्मा मर्दी कुरुसैन्य; त्यासि वाराया
ये दुर्योधन, जैसा अंधक[1] रोधावया शिवा, राया! २०
ताडी प्रथम युधिष्ठिर, त्यासि सुयोधन हि मग नवां बाणीं,
भलें मर्मस्थानीं धर्माच्या सारथ्यास ही हाणी. २१
हय-सूतशिर-ध्वज-धनु-खड्गातें सायकाष्टकें[2] खंडी,
पांचांहीं तव तनया दंडी श्रीधर्म मुख्य कोदंडी[3]. २२
त्यजुनि हताश्वरथातें[4] दुर्योधन उतरला महिवरि. तें
व्यसन विलोकुनि धांवति कर्ण, कृप, द्रौणि; वारिती अरितें.
दुर्योधनासि कौरव, पांडव धर्मासि रक्षिती सुचिरें[5].
तें द्वंद्वयुद्ध झालें कुरुपांचाळांत भारता! रुचिर[6]. २४
झालें युद्ध तुमुळ त्या कौरवपांचाळसैनिकांआंत,
केश धरूनि छेदिति शिर, चाविति वीर करकरां दांत. २५
भट मुष्टिनें चि ताडिति, हाणिति रागें उरावरी लत्ता,
झाल्या शोणितगंधें कौरवपांडवचमू महोन्मत्ता. २६
वाधिति स्वपरांस हि ते उठले समरीं कबंध ही शतशा;
रक्तनदी ही वाहति; जननाशा हेतु तूं महीश[7]! तशा. २७

# अध्याय अठरावा.

## ( धर्मदुर्योधनयुद्ध ).

धृतराष्ट्र म्हणे, 'सूता! झाले कौरव्य[8] मृत्युचा वांटा.
वृत्तश्रवणें आला सर्वांगीं आमुच्या पहा कांटा. १
केला विरथ सुयोधन, त्याची गति काय? सांग तें आधीं.

१. अंधकासुर. २. आठ बाणानी. ३. धनुर्धारी. ४. मारिले आहेत घोडे ज्याचे अशा रथास. ५. पुष्कळवेळपर्यंत. ६. रम्य. ७. हे धृतराष्ट्रा! ८. कौरव.

पार्शी व्याघ्र शिरकतां तन्नाशीं करुणता नुठे[1] व्याधीं.[2] २
संजय म्हणेः-सुयोधन, गिरिवरि हरिसा, रथांतरीं[3] चढला;
मानस्नेहकटाह[4] चि तो, परिभवकोपपावकें कढला. ३
सूतासि म्हणे, 'रे रे! मारावा आजि म्यां अरी हा कीं
शीघ्र मरावें. घालीं धर्मासीं गांठि. हूं! हरी[5] हाकीं.' ४
प्रेषी सारथि वेगें रथ धर्माभिमुख जेधवां नीट,
प्रेरी त्यावरि निजरथ धर्माचा सूत ही महाधीट. ५
शरवृष्टि करिति, भरिति क्षणमात्रें विष्णुचें पद[6] भ्रांते.
केवळ त्यांसि न, रविस हि झांकी, शरघनघटा अदभ्रा[7] ते. ६
दुर्योधन धर्माच्या धनुला युद्धांत जेधवां खंडी,
क्षोभे त्यावरि पांडवनृपमति, महिषासुरीं जसी चंडी. ७
धर्म दुजें धनु घेउनि तव पुत्राचें धनु ध्वज हि खंडी.
कुरुसेना बहु कांपे पडतां शरवृष्टि फार जसि थंडी. ८
तेव्हां दुर्योधननृप सज्य करुनि घे धनुलता दुसरी;
तींतुनि शरपंक्ति निघति, शरत्रूआंतुनि जशा महासुसरी. ९
पीडिति अन्योन्यातें, प्राण हरायासि पाहती सवड.
लाजति पक्कफळांनिचित[11], त्यांच्या क्षतशतयुताकृतींस[12], वड. १०
क्षतजें जेव्हां न्हाले तेव्हां पुष्पितपलाशसे गमती.
क्रोधाग्निज्वाळाशा शोणितधारा क्षताननीं वमती. ११
धर्में तीं बाणांहीं दुर्योधन ताडितां चि, तो पांचीं
पीडी कौंतेयातें कर्में उग्र चि त्यां सकोपांचीं. १२
धर्माचें सुमृदु हृदय, जें सर्वत्र हि सदा कृपारस वी.

१. उत्पन्न होत नाहीं. २. पारध्याचे ठायीं. ३. दुसऱ्या रथावर. ४. स्वाभिमानरूप स्नेहास (तेलास) कटाह-(कढई)-रूप च. ५. घोडे. ६. आकाश. ७. धर्म व दुर्योधन. ८. तो बाणरूप मेघांचा समुदाय. ९. मोठा. १०. या गावाच्या नदींतून. ११. पिकलेल्या फळांनीं भरलेले. १२. शेंकडो घावानीं युक्त असलेल्या शरीरास.

तें भेदाया सोडी दुर्योधन शक्ति सर्व पारसवी[1], १३
तीं बाणांहीं तीनें[2] खंडी नृप, जेंवि तार्क्ष्य[3] भुजगीतें.
गौरविले देवानीं धर्माचे ते प्रतापिभुज गीतें. १४
शक्ति छेदुनि पांचा बाणानीं ताडितां चि नृप धर्में,
भेदी नव बाणानीं दुर्योधन पांडुसूनुचीं मर्में. १५
तेव्हां धर्म खवळला, सोडी अत्युग्रबाण, तो यातें[4]
भेदुनि महींत हि शिरे, प्याया पाताळसिंधुतोयातें[5]. १६
त्या काळीं कळहाचा अंत करावा असें मनीं आणी;
धर्मवधार्थ गदा घे, जीच्या स्पर्शें जगेचिना प्राणी. १७
तो दंडहस्त[6] अंतक[7] तैसा, अवलोकिला गदापाणी[8]:
त्यातें धर्मनृप उगी झडकरि अत्युग्रशक्तिनें हाणी. १८
शिरली स्तनांतरीं ती कवच विदारुनि, बिळीं जसी व्याळी;
कुरुराज रथोपस्थीं[9] पडला, मोहे, न देह सांभाळी. १९
रथ धांवडूनि तेव्हां येउनि धर्मासमीप भीम रणीं,
प्रार्थी कर जोडुनि कीं, 'अनृतापासूनि[10] भी, न भी मरणीं. २०
तूं समरयज्ञदीक्षित[11] धर्मात्मा सत्यसंध[12], मीं होता[13]:
अधिकार धार्तराष्ट्राहुतिशतहोमीं[14] मला दिला होता. २१
यजमान पात्र म्हणती ऋत्विक्संचितफळाप्रति[15] ज्ञाते.
ज्याचें त्याच्या हातें हो कर्म, न हो[16] चळो प्रतिज्ञा[17] ते.' २२

१. लाहमयी. २. तीन. ३. गरुड. ४. दुर्योधनास. ५ पाताळगंगेतील पाण्यातें. ६. दंड आहे हातात ज्याच्या असा. ७. यम. ८. गदा हातात असलेला. ९. रथाच्या मध्यभागीं. १०. तू दुर्योधनास मारिल्यास माझी प्रतिज्ञा खोटी होईल, असा भाव. ११. युद्धरूपी यज्ञाचा यजमान. १२. सत्यप्रतिज्ञ. १३. ऋत्विजविशेष. १४. धृतराष्ट्राच्या दुर्योधनादि पुत्राच्या शंभर आहुति अग्नीस अर्पण करण्याच्या कामीं. १५. ऋत्विजांनीं साठविलेल्या फळास. १६. मिथ्या. १७. दुर्योधनाची मांडी गदेने चूर्ण करण्याची प्रतिज्ञा.

भीमें वारण केलें धर्माचें नृपवधीं तसें हो ! तें,
गजगंडदलनसमर्थी सिंहाचें जेंवि [1]त्याचिया पोतें. २३

# अध्याय एकोणिसावा.

---

दुर्योधन रक्षाया आला धावोनि वीर कृतवर्मा,
त्यावरि उठे गदाधर भीम हि रक्षावया नृपा धर्मा. १
कर्णातें करुनि पुढें पुत्र तुझे मुरडले[2] पुन्हां युद्धा;
कौरवपांडवसेना भिडति, व्याघ्री जशा बहुक्रुद्धा. २
अपराह्णीं[3] बहु दारुण रण झाला, फार आटलें कटक,
वृषविजयशरसमूह श्येनें[4] गमति, भट, करी, हरी, चेटक[5]. ३
कर्णानें त्या समर्थी सात्यकि बहु पीडिला शरस्तोमें[6],
दिधले ढेंकर भेरीनादमिषें बाणपूरितव्योमें[7]. ४
सात्यकिचे ही बाणव्रज झाले त्या वृषासि घोळसिते,
जेंवि पिपीलिक[8] भुजगा, किंवा व्याघ्रासि जेंवि कोळसिते[9]. ५
कर्णासि सहाय सुहृद[10] झाले, बहु करुनि भीरुकुत्सा[11], हें
पाहुनि सात्यकिला ही रक्षिति पांचाळवीर उत्साहें. ६
तों संपादुनि आह्निक[12], पूजुनि परमेश्वरा भवा[13] वरदा,
नरनारायण आले, काळ हि पसरुनि मुखा विशालरदा[14]. ७
येतां चि अर्जुनानें वाजविला दिव्य देवदत्तदर,
हगले मुतले हय गज, न तसा त्यां सिंहनाद दत्तदर[15]. . ८

१. बालसिंहानें. २. परतले. ३. दिवसाच्या पांच भागांपैकीं चौथा भाग; दोन प्रहरानंतरचा काळ. ४. ससाणापक्षी. ५. वीर, हत्ती व घोडे हे चिमण्यांसारखे वाटले. ६. बाणसमुदायानें. ७. बाणांनीं [ पोट ] भरलेल्या आकाशानें. ८. मुंगळे. ९. कोळ-सुंदा या नांवाचें जनावर. १०. दुर्योधनादि मित्र. ११. भित्र्यांची निंदा. १२. संध्या-वंदनादि दिनकृत्य. १३. शंकरास. १४. मोठमोठे दांत असलेल्या. १५. भीतिप्रद.

सज्य करुनि गांडीव क्षणमात्रें पार्थ बाणघनें[1] पाडी,
गजगिरि[2] हि क्षोणीवरि[3]; रक्तनद्या सागराकडे धांडी. ९
वधितां निजयूथातें[4] व्याघ्रासि जसा वराह[5], वाराया
धांवे तसा सुयोधन; करि पार्थासीं वराहवा[6] राया! १०
पार्थें छत्र धनु ध्वज खंडुनि, हयसहित मारिला यंता[7];
आठांहीं[8] हें केलें: नववा मग बाण सोडिला अंता. ११
त्या अतितीव्रशरातें खंडी गुरुपुत्र[9] सप्तधा क्षिप्रः
विजयें धनु तोडुनि तो केला गतगर्व तत्क्षणीं विप्र. १२
तों विस्फारुनि[10] कार्मुक सरसावे कृप नृपप्रियाकरितां,
त्याचें हि चाप खंडी पार्थ, गुणासी शिलीमुखा धरितां. १३
कृतवर्म्याचें चाप ध्वज हि छेदूनि मारिले वाजी.
दुर्योधनधनु खंडुनि, जाय वृषासीं करावया आजी. १४
आला अर्जुन ऐसें पाहूनि त्यजुनि सात्यकीसि रणीं,
कर्ण फिरे, तीं बाणीं विंधी, रवि जेंवि नीरदा[11] किरणीं. १५
त्वरित विसां विशिखानीं विंधुनि कृष्णासि, कर्ण विजयातें
ताडी नेकशरांहीं[12]: जाणों दावी प्रताप निज यातें[13]. १६
प्रथम अनादरिला[14] तो सात्यकि कर्णा भटोत्तमा नवती[15],
आधीं, मग, नव, मग शत शर अर्पी, तें समस्त मानवती. १७
धृष्टद्युम्न, शिखंडी, माद्रेय, द्रौपदेय बळशाली,
आले कर्णावरि; तों तेथ युधामन्यु ही उडी घाली. १८
तों चेकितान धांवे, पावे[16] तेव्हां युयुत्सु ही सहसा.
ये वीर उत्तमौजा, सुव्रत नृप धर्म जो पितामहसा[17]. १९

१. बाणाचा पाऊस. २. हत्तीरूपी पर्वत. ३. पृथ्वीवर [ पाडी ]. ( यावरून अर्जुन हा इंद्रासारखा पराक्रमी आहे हे सुचविलें). ४. आपल्या कळपास. ५. डुकर. ६. उग्रयुद्धा. ७. सारथि. ८. सात ठिकाणीं. ९. अश्वत्थामा. १०. टणत्कार करून. ११. मेघास. १२. अनेक बाणांनीं. १३. अर्जुनानें. १४. युद्ध करितां करितां सोडून दिलेला. १५. नव्वद. १६. येऊन पोहोंचे. १७. ब्रह्मदेवाप्रमाणें.

कैकेयचेदिकारुषमत्स्यांचीं हीं जयैकलुब्ध[1] बळें
त्या कर्णावरि आलीं, नानायुधमंडितें अतिप्रबळें. २०
केला निश्चय त्यांहीं कीं मारावा चि कर्ण आजि रणीं.
वर्षति एकामें[2] चि प्राणहरप्रखरनैकशस्त्रगणी. २१
त्या शस्त्रांचीं पटळें त्वरित महास्त्र[3]प्रयोगपटु कर्णें
लीलेनें चि उडविलीं, वातें गगनांत जेंवि तृणपर्णें. २२
न कबंधावांचुनि बळ ठाकों दे कर्ण हा निकट कांहीं,
स्वःस्त्रीक्रीडा[4] वरिली मग, आधीं प्राणहानि कटकांहीं. २३
सुस्नात[5] युद्धशुद्धक्षेत्रीं क्षतजापगांत[6] जे, त्यांतें
आलिंगिति सुरकन्या[7], सौंदर्यें इंदुच्या हि जेत्यांतें. २४
केले भग्नः पराङ्मुख झाले, चित्तीं धरूनि आधि[8], रथीः
चोळिति कर, करकर रद खाती, म्हणती 'असह्य आधिरथी[9]!'
त्या समयीं पार्थानें कर्णाचें अस्त्र वारिलें अस्त्रेंः
केलीं प्रकट अहितशतकोटिमहामदविनाशकें शस्त्रें. २६
कल्पांतमेघसा तो, नर शरधारा नराधिपा[10]! सोडी,
कुरुसेनेवरि पसरी शरपटली जेंवि भव्य पासोडी. २७
रक्त प्राशिति, मूर्छित करिती, वधिती च, लागती ज्यासी
त्याचें तेज हरिति, शर ते ब्रह्मग्रेह[11] चि पार्थतरुवासी. २८
पडले कुरुसेनेवरि शर, लंकेवरि पराक्रमी कपिसे;
झोंबति, खंडिति अंगें, अनिवार्य प्राणहर, जसे च पिसे. २९
विजयापुढें पळाधें हि तेज मिरविलें रणांत न क्षत्रें[12].
झालीं नष्टप्रायें शत्रुबळें, जेंवि उदयिं नक्षत्रें. ३०
पार्थ जयातें पावे, तों रवि ही अस्तगिरिचिया शिखरा.
कर्णपराभवसमयीं रुचला भृगुपात[13] हा तयासि खरा! ३१

---

१. केवळ जयाचा च लोभी. २. एकदम. ३. ब्रह्मास्त्र. ४. देवांगनांशीं क्रीडा. ५. उत्तम रीतीनें स्नान केलेले. ६. रक्तनद्यांत. ७. अप्सरा. ८. चिता. ९. कर्ण. १०. धृतराष्ट्रा! ११. ब्रह्मराक्षस. १२. क्षत्रियानें. १३. कडेलोट.

स्मरतां प्रियसुतगति रवि, होउनियां म्लान, सागरीं बुडतो.
[1]उडुगण तयासि म्हणती, पडतां [2]जलबिंदुवृंद जो उडतो. ३२
प्रथम चि पार्थशरांच्या पटलें तम दाट दाटलें होतें,
रवि मावळतां सहसा काळाचें वदन वाटलें हो! तें. ३३
तें सर्व रात्रियुद्धाप्रति भ्याले मुरडले चि कुरुवीर;
कोणाच्या ही हृदयीं लेश हि नाहीं च राहिला धीर. ३४
[3]दुःसहसायकभिन्नें परिभवखिन्नें [4]धृतप्रकटदैन्यें,
फिरलीं, दुःखनिमग्नें अर्जुनभग्नें समस्त कुरुसैन्यें. ३५
फिरले, [5]हरिहतदंती, तैसे खंती धरूनि जें अहित.
मग परतले कृतार्थ प्रमुदित पार्थ स्वसैनिकांसहित. ३६
धर्मनृपाचे सैनिक वर्णिति विजयाच्युतप्रतापातें,
हांसति सुयोधनातें; सांगावें दुःख काय बापा! तें? ३७
ते रात्रीं शिबिरातें गेले, पावोनि जय, रहायास;
'हा!' या सर्व हि शब्दा पढती कौरव: वृथा महायास. ३८

---

## अध्याय विसावा.

(द्वितीयदिनयुद्ध).

प्रज्ञाचक्षु म्हणे, 'रे! लीलेनें चि स्वशत्रु सितवाहें
वधिले; वधिल हि उरले. तुमजे अद्यापि भावि [6]कितवा हें. १
काळमद हि हरिल रणीं अर्जुन; वांचेल कैंवि [7]तद्राती?

१. नक्षत्राचा समुदाय. २. पाण्याचा बिंदुसमुदाय. (सूर्य अस्तास गेला, ती जणू काय त्याने कर्णपराभवदुःखाने समुद्रात उडी च टाकली! तेव्हा समुद्राचे पाणी उसळून जे असंख्य जलबिंदु उडाले ते लोकास नक्षत्रासारखे वाटले!). ३. असह्य बाणानीं छिन्न झालेली. ४. स्पष्टपणे दैन्य धारण केलेलीं. ५. सिंहानें मारलेला हत्ती. ६. दुष्ट दुर्योधनाला. ७. त्याचा शत्रु.

जी काळीं[1] गज हि गिळी, गिळितां उगळील[2] काय बदरा ती?
बळभद्रप्रियभगिनी कृष्णावरजा[3] बळें चि ज्या वीरें,
शक्रसुधा[4] जसि गरुडें, हरिलि सुभद्रा सती महाधीरें. ३
इच्छाभोजन खांडववन[5] अर्पुनि अग्नि तर्पिला[6], हातीं
धरुनि शरचापचामर[7] शक्रायुधवृष्टिमक्षिकापातीं[8]. ४
जिंकुनि पृथिवी केले सर्व हि नृप करद या चि विजयानें,
वधिले निवातकवच[9] हि, तोषविला शक्र शत्रुविजयानें. ५
जो वीर घोषयात्राकाळीं[10] दुर्योधनादिकां रक्षी,
समयीं[11] पूर्वीं केल्या अपराधांच्या न कोटि ही लक्षी; ६
हें सर्व असो; ज्यातें भीति, सुधा सेविती तदपि, नाकी[12],
तोषविला द्विभुजें[13] दशभुजविभु तो ही यशःपद* पिनाकी; ७
जेणें किरातरूपी भगवान् भव भूतनाथ भुजयुद्धीं
दुष्करतपःकृशें[14] ही पूजियला, जो[15] अदृश्य अविशुद्धीं: ८
ऐसा प्रबळ पृथासुत पाशुपताद्यस्त्रजातहृदयज्ञ[16],
त्याच्या चि बळें सिद्धिसि धर्माचा पावला चि रणयज्ञ. ९
विश्वप्रख्यात असा अर्जुन; त्यासीं करूनि ही कळहा,
धन्य सुयोधन वाटे, कीं भुवनख्यात जाहला खळ हा. १०
प्रभुसीं[17] वैर हि करितां दुष्ट हि पावे प्रसिद्धिला लोकीं;
रामद्वेषी सीतादुःखद दशकंठ खळ जसा तो कीं. ११

१. पार्वतीरूपिणी उग्रदेवता. २. गिळू न शकल्यामुळे तोंडाबाहेर टाकील. ३. कृष्णाची धाकटी बहीण. ४. कथासंदर्भ आदि० अ० ४ मध्ये पहा. ५. आदिपर्व अ० ३८ वा पहा. ६. तृप्त केला. ७. धनुष्यबाणरूप चवरी. ८. इंद्राच्या आयुधवृष्टिरूप माश्यांच्या पतनीं. ९. वन० अ० ५।११६ पहा. १०. वन० अ० ७ गीति ११९० पहा. ११. संकटसमयीं. १२. देव. १३. दोन हात असणाऱ्या अर्जुनानें. (वन० अ० ३।१-३३ पहा). १४. कठिण तपश्चर्येनें कृश झाला असता. १५. जो (शंकर) अविशुद्धी (अपवित्र लोकांत) अदृश्य. १६. पाशुपतादि अस्त्रसमुदायाचें मर्म जाणणारा. १७. समर्थाशीं. * यशाचें स्थान च असा.

मग संजया! स्वशिबिरा येउनि केलें सुयोधनें काय?
काय म्हणे वैकर्तन[1]? तो हि विजयविजितराजसमुदाय?' १२
संजय वदे:—पराभवखिन्ना दुर्योधनासि कर्ण म्हणे,
'कुरुनाथा! धीर धरीं, मारीन समस्त शत्रु राजमणे!. १३
सावध होता अर्जुन, सारथि ही जाहला असे जो गा!
तो गाढ धैर्य देतो, समयीं उपदेश ही जयाजोगा. १४
म्हणुनि अकस्मात् पार्थे आम्हांला आजि [2]वंचिलें प्राज्ञा!
त्यांत दिवस ही सरला. करिन उद्यां सफळ मीं तुझी आज्ञा.'
ऐसें प्राशन केलें कुरुराजें अभयवाक्य कर्णाचें;
अमृत चि तें त्याच्या रिपुं[3]सिंहध्वनिशूलतप्तकर्णाचें. १६
आज्ञा दिली नृपांतें शिबिरा जाया सुयोधनें मानें.
रात्रि क्रमिते झाले विजयार्थी ते सुयोध नेमानें. १७
झाले प्रभातरात्रौ[4] सर्व हि युद्धार्थ सिद्ध. त्या काळीं,
भूपसभा[5] शोभेना कीं नव्हता कर्णसत्तिलक भाळीं. १८
दुर्योधनादिकांचें तेव्हां कर्णाकडे चि मन गेलें.
तें सर्व राजमंडळ निश्चळ निःशब्द चित्रसें [6]ठेलें. १९
कर्णें त्या नृपवृंदा भेटि दिली, जसि कळेवरा[7] जीवें;
करि भटमुखें विकसितें, तो रविचा उदय जेंवि राजीवें[8]! २०
कर्ण म्हणे, 'कुरुनाथा! पार्थासीं संगरांगणामाजि
घालीन गांठि, त्यातें मीं कीं मारील तो मला आजि. २१
कार्यबहुत्वासाठीं गांठि न पडली तयासवें मागें,
त्वां आम्हां दोघांचीं आजि पहावीं बळें महाभागें[9]. २२
मीं जिष्णुतें न वधितां आजि न मागें फिरेन, हे वाचा
साची, असा असावा निश्चय चि तुझा मनुष्यदेवाचा. २३

---

१. कर्ण. २. फसविल, पराभूत केलें. ३. शत्रूंनीं विजयामुळें केलेल्या सिंहनादरूपी शूलानें तापलेल्या कानाचें. ४. पहांट. ५. दुर्योधनाची सभा. ६. स्तब्ध राहिले. ७. शरीरास. ८. कमळें. ९. मोठ्या भाग्यवानानें.

भस्म करुनि वीरबळें ठाकेन[1] प्रलयभास्कराभ[2] यदा[3],
घालील गांठि अर्जुन; कीं जाणे शक्ति[4] ती नसे भयदा. २४
म्या शक्रदत्तशक्ति त्यजिली पूर्वी घटोत्कचावरि, तें
निजवधकारण जालें नष्ट, असें ठावुकें असे अरितें[5]. २५
त्याचें माझें आयुध[6] वीर्य[7] असे सम चि. ज्या गुणें स्पष्ट
मीं अधिक अर्जुनाहुनि, तें ऐकें: स्वगुण बोलणें कष्ट. २६
परकीयशस्त्रनाशन, सत्वरशरमोक्षकुशळता[8], युद्धीं
दूरस्थितलक्ष्याचें[9] भेदन, वाखाणिलें जनीं शुद्धी. २७
उत्साहबळ शरीरीं, अस्त्रीं अभ्यास, आणखी राया !
लक्ष्यासीं बाणाच्या संबंधाच्या हि जाणणें ठायीं[10]. २८
दिधलें गुरुप्रसादप्रभुनें[11] पूर्वोक्तसद्गुणां वतनें,
न विसंवाति क्षणार्ध हि करिती ऐक्यें समस्त ही जतन. २९
मीं अधिक या गुणांहीं; मजसम नाहीं च सव्यसाची हीः
स्वस्तुति नोहे राया !: समर्थी जाणाल उक्ति साची ही. ३०
जें विजयचाप[12], निर्मुनि दे वज्रधरासि विश्वकर्मा, तें
इंद्र रामासि[13] दिलें, तें चि धनूरत्न राम दे मातें. ३१
करि एकवीसवेळा जेणें निःक्षत्रिया धरा राम,
तें आजि धनुष्य तुझा संपूर्ण करील पार्थवधकाम. ३२
आतां अधिक धनंजय मजहुनि ज्या ज्या गुणें असे तो तो
कथितों, श्राव्य[14] स्तव्य[15] हि रिपुगुण हि गुणज्ञमंडळीं होतो. ३३
पार्थाच्या चापाचा गुण दिव्य, ध्वज हि, रथ हि दिव्य असे;

१. धैर्यानें उभा राहीन. २. प्रळयकाळच्या सूर्यासारखा. ३. जेव्हां. ४. इंद्रानें दिलेली शक्ति. ५. अर्जुनातें. ६. शस्त्रास्त्रें. ७. पराक्रम. ८. त्वरित बाण सोडण्याचें कौशल्य. ९. दूर असलेल्या लक्ष्यास (पदार्थास) अचूक निशाण मारणें. १०. अचूक निशाण मारण्यास नेम कसा धरावा हे मर्म. ११. गुरुकृपारूपी राजानें मला या पूर्वोक्त सद्गुणाचें वतन दिले आहे. १२. विजयशाली धनुष्य. १३. परशुरामास. १४. श्रवणीय. १५. स्तुत्य.

ध्वजशिखरीं विस्मयकर कपि ही, नसती जनांत अश्व तसे. ३४
अक्षय भाते बा ! ते, होती कल्पांतिचे हि मेघ रिते,
अरितेजःक्षयकारिते, पूर्ण चि, शरकोटि वर्षती, तरि ते. ३५
हें सर्व असोः जो प्रभु रचितो इच्छेकरूनि विश्वास,
तो विजयाचा सारथि, यच्चरणीं धरिति साधु विश्वास. ३६
आहें इहीं गुणीं त्या पार्थाहुनि हीन मीं नरेशा ! हें
जाणें; तथापि त्यासीं झगडाया इच्छितों चि उत्साहें. ३७
यास्तव पार्थाधिक म्यां व्हावें, तेव्हां घडेल जय बापा !
माझें विजयशरासन आचार्य चि होय जिष्णुच्या चापा. ३८
शरपूर्ण शकट, शतशा स्यंदन ही सिद्ध माझियामागें
चालोत रणीं. त्वां हें साहित्य असें किजे महाभागें. ३९
अश्वांच्या हृदयाचा ज्ञाता, कृष्णासमान कौशल्य
जाणतसे, जरि माझें सारथ्य करील आजि हा शल्य, ४०
तरि मीं धनंजयाधिक होइन तुज जय घडेल अभ्रांत.
मग मज पार्थांत सुकर, जैसा क्षुब्धानिळासि अभ्रांत.' ४१
तेव्हां म्हणे सुयोधन, 'हें आहे सर्व सिद्ध. मीं आंगें
चालेन तुझ्यामागें. मज भक्ताला अभीष्ट तें सांगें.' ४२

## अध्याय एकविसावा.

ऐसें वदोनि गेला विनयें शल्यासमीप मग राजा,
प्रणयेंकरूनि त्यातें प्रार्थी साधावया महाकाजा.

१. आदि० अ० ३८।९६ पहा. २. यशस्वी धनुष्य. ३. गुरु. ४. गाडे. ५. रथ. ६. निःसंशय. ७. पार्थवध. ८. खवळलेल्या वाऱ्यास. ९. मेघांचा नाश. १०. स्वतः. ११. प्रेमाने, विनयाने.

'सत्यव्रता[1]! समर्था! मद्राधीशा! महारथा! साधो!
वंदूनि विनवितों बा! तुझ्या प्रसादें चि कार्य हें साधो. २
पदर पसरिला तुजला रिपुगजपंचानना[2]! नृपांमाजी,
व्हावें प्रसन्न मजला; द्यावा वर एक याचका आजि. ३
वरदा! त्वां कर्णवचन केलें चि श्रवण सुप्रबुद्धा!; तें
सफळ करीं; पार्थासीं व्हावा अंगेंद्र[3] योग्य युद्धातें. ४
बा! वासुदेवसम तूं जाणसि सारथ्यकर्म नरनाथा!
तुजसम पटु अन्य नसे, म्हणवुनि मीं ठेवितों पदीं माथा. ५
ब्रह्मा महेश्वराचा[4] झाला, कीं कृष्ण जेंवि विजयाचा,
सारथि तूं कर्णाचा हो वरदा! हेतु मुख्य विजयाचा. ६
तो कृष्ण संकटीं त्या पार्थातें रक्षितो यथा राया!
तूं कर्णातें रक्षीं, हो सेतु[5] स्वयशतोय[6] थाराया[7]. ७
भीष्म द्रोण द्रौणी कृतवर्मा शकुनि कर्ण कृप तूं मीं,
यांहीं मारावे रिपु, साधावी निश्चयें चि निजभूमी[8]. ८
ऐसा निश्चय पहिला; त्यामध्यें भाग आपुला भीष्में
वधिला, द्रोणें हि बळें आटविल्या वाहिनी[9], जशा ग्रीष्में. ९
रिपुनीं ते वृद्ध रणीं वधिले कपटेंकरूनि, त्यामागें
प्रकट करावा विक्रम या कर्णें, त्वां हि बा! महाभागें. १०
बळ अल्प पांडवांचें, परि त्याहीं फार मर्दिलें सैन्य;
आतां निजपक्षींचे दोघे योद्धे तुम्हीं हरा दैन्य. ११

---

१. आपले वचन पाळण्यासाठीं आपल्या भाच्यास-पांडवांस-सोडून शल्य दुर्योधनास येऊन मिळाला होता; म्हणून येथील 'सत्यव्रता!' हें संबोधन साभिप्राय आहे. २. शत्रुरूप हत्तींस सिंहासारखा. ३. कर्ण. ४. शंकराचा. (आर्याभारत खंड २ रा, पृष्ठांक ४७५ पहा). ५. पूल, बंधारा. ६. स्वकीर्तिरूप पाणी. ('स्व-यश-तोय' हा संस्कृतव्याकरणनियमाप्रमाणें 'स्वयशस्तोय' असा समास व्हावयास पाहिजे). ७. स्थिर राहण्यासाठीं, टिकण्यासाठीं. ८. स्वराज्य. ९. सेना (पक्षीं) नद्या.

अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं विधिंचा[1],
सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्यबळपयोनिधिचा.’ १२
शल्य सुयोधनवाक्यें कोपे, चोळी करें करा, डोळे
आरक्त करी, चावे अधरातें, फार तो मनीं पोळे. १३
मग कुरुराज्यासि म्हणे, “राया! अवमानितोसि [2]बाहूनीं,
म्हणसि, ‘ धरीं, सोडुनि धनुशर, [3]हयरश्मि-प्रतोद बाहूनीं.’ १४
करिसी बहु प्रशंसा या नरवरमंडळांत कर्णाची,
सांगसि सारथ्याची पदवी मजलागि हीनवर्णाची. १५
जो [4]राजर्षिकुलोद्भव राजा [5]मूर्धाभिषिक्त, या कामीं
योग्य कसा? धर्मच्युत होतां पावेन केंवि नाका मीं? १६
सिंहासनोचिताला मज सारथ्याधिकार हा नीच;
इच्छिसि नृपा! कराया मत्तेजाची जनांत हानी च. १७
युद्धीं दुर्बळ मीं हें गमलें तुज, म्हणउनीं च भूपा हें
सारथ्य योजिलें, तरि दे दावुनि भाग, शक्ति तूं पाहें. १८
सांग मला भाग, तया जिंकुनि जाईन आपुल्या देशा;
अथवा एक चि मीं रिपुबळ मर्दिन, दे मला [6]रणादेशा. १९
माझे भुज [7]भुजगप्रभ, वज्रासम कठिन, [8]जानुवरि लांब,
[9]धनुर्गुणघातांकित, हे [10]विजयप्रासादहेतु, शुभ खांब. २०
राया! प्रसंग पडतां [11]कृत्या ही हात जोडितील [12]गदे,
माझे शरसर्प, पहा, रिपुहृदयांचे चि तोडिती [13]लगदे. २१
माझा, पहा, महारथ कांचनमणिखचित, अश्व ही [14]जवन,

---

१. प्रारब्धाचा. २. बोलावून. ३. लगाम. ४. श्रेष्ठ राजाच्या कुळांत जन्मलेला. ५. ज्याच्या मस्तकावर अभिषेक झाला आहे असा. (अभिषिक्त राजांनां सूताचें काम करणें गैर आहे; कृष्ण मूर्धाभिषिक्त राजा नसल्यानें सारथि झाला, असें शल्य ध्वनित करित आहे). ६. युद्धाची आज्ञा. ७. सर्पासारखे. ८. गुडघ्यापर्यंत. ९. धनुष्याची दोरी ओढिल्यानें घट्टे पडलेले. १०. विजयरूप राजवाड्यास आधारभूत असे. ११. तामस देवता. १२. माझ्या गदेस. १३. मांसाचे गोळे. १४. वेगवान्.

भवन श्रीधैर्यांचें[1] यांचें वपु, यां 'सखे' म्हणे पवन. २२
भूमि विदारीन शरें, तेजें शोषीन वारिराशि, खरी
गोष्टि तुला काथितों, मीं पिष्ट करिन कौरवेश्वरा! शिखरी.[2] २३
ऐसा मीं, त्या मजला नीचाची काय सांगसी सेवा?
नीचोच्चवैपरीत्यें[3] पापाला पात्र होसि कां देवा[4]! २४
ब्रह्मक्षत्रांचे हे परिचारक[5] सूत, धर्म हा उघडा;
क्षत्रिय सूताज्ञेतें करिल कसें युक्त हें नृपा सुघडा[6]! २५
हे दास सूत बंदी, यांहीं आम्हां नृपांसि वानावें,
सारथि होउनि उच्चें, जो नीच रथीं तदुक्त मानावें? २६
'हो' म्हणसी 'सूताचा सूत,' भला गा! भला मला पदवी
देसी हे, 'सीमा चि न सुज्ञपणातें त्रि' हें असें वदवी. २७
जातों गृहासि, झालों कृतकृत्य प्राप्तमोक्षसम यज्ञ
प्रेक्षुनि घालों कीं तूं धृतराष्ट्रसुता! गुणज्ञ समयज्ञ." २८
ऐसें वदोनि मग नृप वीरसमाज त्यजूनि करि गमन,
आटोपेना त्याचें त्यास हि अपमानकोपकरिग[10] मन. २९
तेव्हां धांवे कुरुवर, दीर्घदृढप्रेमबाहुपाशांतें
पसरोनि शीघ्र कवळी, नमुनि म्हणे, "न करिं वंध्य आशांतें.
ऋत सत्य, अयन आश्रय ज्यांसि, नृपा! ते ऋतायन[11] ख्यात,
तद्गोत्रज म्हणवुनि तूं आर्तायनि[12] नाम विश्वविख्यात. ३१
शत्रूंच्या हृदयीं तूं शल्य[13] म्हणुनि 'शल्य' म्हणति तुज राया!
कुब्जोसि कृष्णसा तूं पटु मज्जयसिद्धिलागि उजराया[14]. ३२

१. शोभा व धैर्य याचे. २. पवत. ३. नीचास उच्च व उच्चास नीच करून. ४. दुर्योधना! ५. सेवक. ६. शहाण्या! ७. 'तुझ्या शहाणपणाला मर्यादा च नाहीं,' असे हें तुझे करणें मला वदवी, असा अर्थ. ८. मिळाला आहे मोक्ष ज्यातें, त्यासारखा. ९. युद्धयज्ञ. १०. अपमानजन्यक्रोधरूप हत्तीप्रमाणें स्वैरगमन करणारें. ११. ऋत (सत्य, शिलोछवृत्ति) आहे अयन (आश्रय, आधार) ज्याला तो ऋतायन. १२. ऋतायनपुत्र. (शल्य). १३. बाणाग्र. १४. नीट करण्यास.

बहु विक्रम कर्णाचा, न्यून पराक्रम तुझा असें न मनीं;
असतें जरि तरि माजें शिर होतें सिद्ध हें कसें नमनीं? ३३
कर्णाहुनि मजहुनि तूं अधिक, अधिक यादवाधिपाहूनीं,
व्हावें प्रभो! वरप्रद, मज आजि पराभवाधि पाहूनीं. ३४
पार्थाहुनि कर्णाला, कृष्णाहुनि अधिक जाणतों तुजला;
जयवांछा पुरवीं; हो सारथि; हा जन न पाहिजे सुजला. ३५
हयहृदय कृष्ण जाणे, त्याहुनि तूं द्विगुण जाणसी माम्या!
भुजयुद्धीं हि परिसिला न बळासि, तुझी च आण, सीमा, म्या.
पार्थाधिक कर्ण तसा कृष्णाधिक तूं, म्हणोनि सार थिता,
सुगुण न लोपी, प्रकटी; वरिली विधिनें हि शंभुसारथिता."
शल्य म्हणे, "राया! मज राजसमूहांत हात जोडूनि,
म्हणसी 'कृष्णाधिक,' हें दुर्लभ यश; जात नाहिं सोडूनीं. ३८
झालों प्रसन्न तुज, मीं वर देतों, घे, करीन सारथ्य;
पथ्यअपथ्य न म्हणतां परि सोसावें मदुक्त हें तथ्य. ३९
सारथि होतों परि मीं प्रभु सूतातें म्हणेन कां 'हां! जी!'
गांजीन परि सहावें; म्हणिजे वैद्यें दिली सुधा कांजी." ४०
कर्ण-सुयोधन म्हणती, 'केलें मान्य त्वदुक्त बापा! हें;
अंगीकृतकार्याच्या निर्वाहीं सुयश, तूं हि बा! पाहें.' ४१
शल्यें सारथ्याचा केला स्वीकार, तेधवां यास
कुरुपति कथि इतिहास त्रिपुराचा, चित्त हृष्टवायास. ४२
विश्रुतविभव, वरप्रद, विभु, वेदावास, विश्व जो रचितो,

१. कृष्णाहून. २. पराभवरूप चिंता. ३. मी दुर्योधन. ४. अप्राप्त वस्तूविषयीं अत्यतामक्त न व्हावा. (इच्छित पदार्थ खाण्यास न मिळाल्यास बेबीजवळ सूज येते व तो खावयास मिळाला म्हणजे ती उतरते, अशी समजूत आहे). ५. सारभूत सुगुण थिता (अल्प) [म्हणून] न लोपी. ६. चांगले वाईट; हितप्रद अहितप्रद. ७. दिलेली पेज. ८. तडीस नेण्यात. ९. आर्या० खंड २ रा पृष्ठ ४७५-टीप १ ली पहा. १०. विख्यात आहे वैभव ज्याचें. ११. वेदांचे स्थान च असा.

सुरकार्यगौरवास्तव[1] हरसारथि होय; तदपि थोर चि तो[2]. ४३
गाया, श्रवण कराया, योग्य, परि ग्रंथविस्तराकरितां
इतिहास गाळिला हा; झाला श्रम मज हि चित्त आवरितां. ४४
सांगोनि त्रिपुरदहनइतिहास प्रथम, मग दुजा राया
कथि, 'अकुलज[3] कर्ण' अशा शल्याच्या संशयासि वाराया. ४५
"माझ्या तातापासीं ब्राह्मण इतिहास सांगता झाला,
मद्रेश्वरा! परिस तूं, ज्यातें ऐकोनि मातपिता धाला. ४६

## अध्याय बाविसावा.



"भृगुवंशीं जमदग्नी मुनि झाला; त्यासि होय सुत रामः
तो करि रुद्राराधन, अस्त्रांचा धरुनि मानसीं काम. १
त्याच्या विशुद्धभावें होउनि संतुष्ट भेटला भर्ग[4],
ज्या प्रभुच्या भक्तांचें दास्य करिति सिद्धिकिंकरीवर्ग[5]. २
भगवान् महेश्वर म्हणे, 'रामा! झालों प्रसन्न मीं दाता;
कळलें वांछित, होसिल शुचि तें येईल वर तुज्या हाता. ३
शुद्ध करावा आत्मा; अस्त्रें देईन शुद्धि पाहोनि;
भद्र[6] न करिति अपात्रीं[7], होति अहित तीं मनांत राहोनीं.' ४
मस्तक ठेउनि चरणीं राम म्हणे, 'भक्तवत्सळा! देवा!
जाणोनि पवित्र मला द्या अस्त्रें, तों करीन मीं सेवा. ५
होईन योग्य जेव्हां वरदगुरो[8]! अस्त्रधारणीं हा मीं,
तेव्हां तुम्हीं च देवा! सर्वज्ञा! अस्त्रदान द्या स्वामी!" ६
ऐसें विनउनि भावें बहु वर्षें ईश्वरासि आराधी;

१. देवांच्या कार्याचे महत्व जाणून. २. ब्रह्मदेव. ३. असत्कुलोत्पन्न. ४. शंकर. ५. अणिमादि, 'सिद्धि' नांवाच्या दासी. ६. कल्याण. ७. अयोग्य मनुष्याचे ठायीं. ८. वरदश्रेष्ठा!

त्याची, जाय न पळ ही सोडुनि त्या वे[1]दशास्त्रसारा, धी[2]. ७
देव प्रसन्न होउनि सुरपितरांच्यासमक्ष रामातें
[3]स्त्रीपाशीं वाखाणी कीं, 'वाटे राम बहु बरा मातें. ८
गौरि! प्रणताभयदे! देवि! असो; साधु [4]यांअसा हा ची.
भक्ति [5]दृढव्रत करितो चातकखग जेंवि [6]वारिवाहाची.' ९
ऐसें असतां देवांदैत्यांसीं युद्ध होय, तों खळ ते
करिति पराभव, तेव्हां सर्व हि सुरवीर जाहले पळते. १०
आले शरण प्रभुला सुर, म्हणती, 'ईश्वरा! [7]स्मरराते!
दैत्य न मरती, हरिती [8]युष्मद्दत्ताधिकार सारा, ते.' ११
भगवान् भूतेश म्हणे, 'भ्यालां कां भागलां? भलें कळलें.
आलां धांवत, कथिलें मज, आतां सर्व विघ्न तें टळलें.' १२
प्रभुनें असी प्रतिज्ञा केली, मग राम बाहिला जवळी;
तो येउनि सद्भावें स्वउरीं प्रभुपादपंकजें कवळी. १३
शंभु म्हणे, 'रामा! हे सुर असुरानीं जिकोनि पळवीले,
यांहीं मज निजताप स्वमुखें येऊनि सर्व कळवीले. १४
यास्तव लोकहितार्थ त्वरित चि होवूनि सिद्ध, दैत्यांतें
तूं मत्प्रियार्थ नाशीं, चं[9]डकर जसा समस्त शै[10]त्यातें.' १५
राम म्हणे, 'देवेशा! अस्त्रज्ञप्रबळदैत्यखळदमनीं
[11]अकृतास्त्रा मज कैंची शक्ति? पहा तूं चि भ[12]द्रबळद मनीं.' १६
शर्व म्हणे, 'वत्सा! तूं जा माथां धरुनियां मदाज्ञा ते;
रिपु वधिशील; मदुक्तीं धरिती विश्वास दृढ सदा ज्ञाते.' १७
अभयवराशीर्वादें गौरवितां प्रभुपदीं करी नमना,

१. वेदशास्त्रास सारभूत असणाऱ्या (शंकराला). २. बुद्धि. ३. पार्वतीजवळ. ४. याच्यासारखा. ५. दृढ आहे व्रत (नियम) ज्याचें असा. ६. मेघाची. ७. मदनशत्रो शंकरा! ८. तुम्ही दिलेला अधिकार. ९. चंड (प्रखर) आहेत किरण ज्याचे असा सूर्य. १०. थंडीस. ११. अस्त्ररहित अशा. १२. मंगल व बळ देणारा.

राम कृतस्वस्त्ययन[1] त्वरित निघे दैत्यवाहिनीदमना.[2] १८
भार्गव जाउनि गांठी दैत्यांतें, रण करावया बाहे,
गर्जोनि म्हणे, 'प्रभुनें तुमच्या मथनार्थ धाडिलें आहे.' १९
भार्गववचनें झाले ते दुर्मद[3] दैत्यदानव क्रुद्ध,
करिती त्या एकासीं उग्रायुधवृष्टि सोडुनीं युद्ध. २०
तो राम त्यां खळांतें वज्रसमस्पर्शबाणनिकरानें[4]
ताडुनि विकळ करि रणीं, ते ही पीडिति तयासि निकरानें.
दानवशस्त्रक्षततनु तो रक्तस्नात राम जों झाला,
तत्काळ तेथ भगवान् भव भक्तभवांतक[5] स्वयें आला. २२
स्पर्शी पिनाकपाणी[6] परमेश्वर पूतपाणिपद्मानें,[7]
त्या रामासि विलोकी नयनयुगें सुप्रसादसद्मानें.[8] २३
पावनपाणिस्पर्शें केला तत्काळ दिव्यतनु राम,
परमेश्वरें पुरविले पदपद्मपरागपूतजनकाम.[9] २४
भगवंत म्हणे, 'वत्सा! शस्त्रनिपातें[10] कळेवरीं[11] पीडा
झाली तुज चि न, मज ही, बापा मच्चित्तहंससन्नीडा![12] २५
करुनि मदाज्ञा, धैर्यें दुःसहशस्त्रप्रहार साहोनि,
मानुषकर्मापासुनि[13] सुटलासि भवांतरा[14] न पाहोनि. २६
सर्ववरास्त्रग्रहणीं[15] आतां झालासि योग्य, घे, साधो!
आधोरण[16] शत्रुगजीं हो, वत्सा! भवदभीष्ट[17] तें साधो.' २७

१. पुण्याहवाचनादि केलेला. २. दैत्यसैन्याच्या नाशास. ३. अत्यंत गर्विष्ठ ४. वज्रासारखा स्पर्श असलेल्या बाणसमूहानें. ५. भक्तजनांच्या संसाराचा नाश करणारा शंकर. ६. पिनाक नांवाचें धनुष्य हातीं असलेला शिव. ७. पवित्र हस्तकमळानें. ८. मोठ्या कृपेचें माहेरघर असलेल्या (नयनद्वयानें). ९. पदकमलधूलीनें पवित्र झालेल्या जनांचे मनोरथ. १०. शस्त्राच्या माऱ्यानें. ११. शरीरास १२. माझ्या चित्तरूपी हंसाच्या उत्तम घरट्या! १३. मानवयोनींस कारण असलेल्या कर्मांपासून. १४. जन्मांतरा. (परशुराम चिरंजीव आहे). १५. सर्व श्रेष्ठ अस्त्रें स्वीकारण्यास. १६. माहूत. १७. तुझें इच्छित.

ऍवं[1] प्रसन्न झाला रामावरि सर्वलोकगुरु शर्व,
दे सर्वास्त्रें त्यातें वरदर्षभ[2] तो अभीष्टवर सर्व. २८
चरणीं वाहुनि मस्तकपद्म पुन्हां तत्प्रसाद घे नमुनीं,
आज्ञा प्रभुची होतां येता झाला निजाश्रमास मुनी[3]." २९
ऋषि[4] हे ऐसी सांगे तातासि[5] कथा. असा शिवच्छात्र
भार्गव, तेणें केला स्वधनुर्वेदासि कर्ण हा पात्र. ३०
तिळमात्र हि जरि पातक असतें तरि सर्वथा भृगूत्तम तो
या[6]कारणें न देता दिव्यास्त्रें, यावरूनि शुचि गमतो. ३१
सूतकुळीं हि न झाला, मज वाटे देवपुत्र[7] हा कर्णः
क्षत्रकुळीं च उपजला, हें याचा स्पष्ट सूचवी वर्ण. ३२
लोकांत प्रकट न हो कुळ, कारण एक हें चि सत्य, जिला
झाला तिणें उपजतां बाळपणीं करुनि साहस[8] त्यजिला. ३३
हा दीर्घभुज सकुंडलकवच उपजतां चि बाळ भास्करसा,
प्रसवे न यासि राधा. प्रसवेल सुधाकरासि[9] काय रसा[10]? ३४
अजि[11]! सिंधुशुक्तिगर्भी[12] मौक्तिक उपजेः नदींत ही असती
पुष्कळ सिंप्या, परि तीं त्यांच्या उदरीं न मौक्तिकें वसती. ३५
राधा धात्री[13] च गमे, कर्णाच्या न जननी शरीरा या;
सांगा जी! व्याघ्रासि प्रसवेल मृगी कधीं तरी राया!? ३६
याचें विशाल वक्षःपीठ[14] पहावें बरें तुवां निपुणें,
भुज दीर्घ वृत्त पीन[15] त्रिदशकरिकरापरीस[16] पूज्य गुणें. ३७
हा प्राकृत[17] पुरुष नव्हे. सांगावें काय म्यां तुला कविला?
कर्णाच्या तेजें बहुवीरांकरवीं स्वगर्व टाकविला. ३८

१. या रीतीने. २. वर देणाऱ्यात श्रेष्ठ. ३. परशुराम. ४. धर्मप्रवीण नांवाचा ब्राह्मण. ५. धृतराष्ट्रास. ६. या कर्णाप्रत. ७. कोणत्या तरी देवाचा अंशज. ८. अविचार. ९. चंद्रास. १०. पृथ्वी. ११. अहो! १२. समुद्रातील शिंपीच्या पोटांत. १३. दाई. १४. उरःस्थल. १५. लांब, वाटोळे व बळकट. १६. देवांच्या हत्तीच्या (ऐरावताच्या) सोंडेपेक्षा हि. १७. सामान्य.

सारथि होय पितामह[1] रुद्राचा, तेंवि तूं हि कर्णाचा,
लाजो तुज रवि[2]रथहयगुणधर तो बंधु[3] ही सुपर्णाचा. ३९
सारथि अधिक रथीहुनि असतां चि घडे जय प्रजापाळा[4]!
पाळा कर्णासि तुम्हीं, घालो कंठांत कीर्ति मणिमाळा." ४०

---

## अध्याय तेविसावा.

शल्य म्हणे, "इतिहास श्रुत आहे सन्मुखें मला सारा,
कृष्णास हि विदित असे, अमृतरसाहूनि हे कथा सारा. १
जाणे सर्व म्हणोनि चि म्हणती 'सर्वज्ञ' सर्व ही त्याला,
जेंवि शिवाचा ब्रह्मा, पार्थाचा कृष्ण सारथी झाला. २
कर्ण कदाचिज्जरि वध पार्थाचा करिल, तरि तुझीं कटकें
हरि संहरील आंगें, हें तूं मानूं नको नृपा! लटकें. ३
कोपेल कृष्ण तेव्हां राया! त्याच्यापुढें न काल टिके.
ज्याला सहाय भगवान् त्याच्या नाशीं प्रयास कां लटिके?" ४
दुर्योधन त्यासि म्हणे, " राया! कर्णावमान कां करिसी?
हा चि वधी त्या तैशा रजनीयुद्धीं घटोत्कचा अरिसी. ५
याणें वृकोदराच्या[10] कंठीं जिंकोनि घातिलें चाप,
मांत्रिक मंत्रें मोहुनि धरितो जैसा पराक्रमें साप. ६
मूर्खा पोटभरूला बोलावें बोलिला तसें भीमा,
तेव्हां मज कळलें, कीं या कर्णाच्या बळा नसे सीमा, ७
माद्रीपुत्रांतें हीं जिंकुनि हा जीवदान दे, सोडी;

---

१. ब्रह्मदेव. २. सूर्याच्या रथाच्या घोड्याच्या दोऱ्या धरणारा. ( सूर्याचा सारथि ). ३. गरुडाचा भाऊ अरुण. ४. राजा शल्या! ५. चांगली, श्रेष्ठ. ६. कृष्णाला. ७. स्वतः. ८. व्यर्थ. ९. [ जयद्रथवधसमयी झालेल्या ] रात्रियुद्धांत. १०. भीमाच्या.

या एकानें चि रणीं त्या सात्यकिची हि मोडिली खोडी. ८
धृष्टद्युम्नादिक तों केले बहुवार संगरीं भग्न.
अर्जुन वदन न दावी, झाला भयसागरांतरीं मग्न. ९
या कर्णाला समरीं पांडव देखावया न शकतील;
काय पराभववार्ता? प्राणद्यूतीं[1] हि ते चि ठकतील. १०
मारील कोपतां हा कर्ण कुलिशपाणिला[2] हि अमरांत,
त्या या वीरासि कसे पांडव ते जिंकितील समरांत? ११
भुजयुद्धीं तुजसम ही क्षितिवरि नाहीं च अन्य बळशाली;
तूं दुःसह शत्रुजना, शल्याख्या[3] यामुळें जगीं झाली. १२
अर्जुन मरतां कृष्णें अभिमानें बळ धरूनि झगडावें,
कर्णविनाशीं राया! तें तुजपासूनि काय न घडावें? १३
'सारथ्य चि करिन' असी कळवी लोकत्रया प्रतिज्ञा, ते
करिल मृषा[6] तरि म्हणतिल मग काय 'भला' तयाप्रति ज्ञाते?
कृष्ण वळें अभिमानें अन्यायें जरि वधील बळ हातें,
सत्यप्रतिज्ञ तूं प्रभु अभिमानी न चुकसील कळहातें. १५
कृष्ण वधील निजबळें माझीं कटकें, तरि स्वयें कां गा!
न वधाल तुम्हीं राया! पांडवकटकें रणीं? मला सांगा. १६
मेले रणीं सहायक्षितिपति[10] बंधू हि जे मदीय नृपा!
होईन अनृण[11] त्यांचा, जरि करिसिल आजि तूं चि पूर्ण कृपा[12]."
शल्य म्हणे, 'कृष्णाहुनि मज म्हणसि विशिष्ट[13]. जाहलों तुष्ट.
सारथि होतों; परि मन तुमचें मद्भाषणें न हो रुष्ट.' १८
कर्णासह दुर्योधन 'आम्हांला मान्य हें' असें बोले.

१. युद्धात. (युद्धात प्राणाची च पैज असते). २. वज्र हातात धारण करणाऱ्या इंद्रास. ३. 'शल्य' हे नाव. ४. कर्ण मरता. ५. कृष्णासारखे भांडणें. ६. खोटी. ७. उगीच च. ८. सैन्य. ९. आमचा अभिमान धरणारा. १०. सहायास आलेले राजे. ११. ऋणमुक्त; उतराई. १२. सारथ्यकर्म स्वीकारण्याची कृपा. १३. श्रेष्ठ.

त्या काळीं आनंदें सर्व हि नरशक्रचक्र[1] ही डोले. १९
दुर्योधन कर्णातें भेटोनि म्हणे, 'सख्या! पृथाजाचा[2]
उतरीं मद, प्रताप प्रकट असे या जनीं वृथा ज्याचा.' २०
कर्ण म्हणे, 'राया! मज गमतो मद्रेश नातिहृष्टमना[3].
मधुरोक्तिं तूं पुनरपि बोल नृपासीं मनोव्यथाशमना.' २१
शल्यासि म्हणे कुरुपति, 'पार्थाचा सचिव[4] कृष्ण तो जेवीं,
तैसा तूं कर्णाचा हो, देवा! अभयकर शिरीं ठेवीं. २२
पार्थातें कृष्ण तसा, कर्णातें तूं हि संगरीं रक्षीं.
त्वां मारुतें[5] करावा कर्णबळाग्नि[6] प्रदीप्त रिपुकक्षीं[7].' २३
'हर्षें सुयोधनातें भेटे मद्रेश, तो म्हणे, 'युक्तः[8]
त्वत्प्रिय करितों; परि बा! सोसावें आमुचें तुम्हीं उक्त.' २४
कर्ण म्हणे, 'शंभुहितीं विधि, पार्थहितीं मुरारि[9] युक्त[10] सदा.
माझ्या हितीं तसा तूं हो युक्तः न हो मनीं उदास कदा.' २५
शल्य म्हणे, 'निजनिंदास्तुति परनिंदास्तुति प्रशस्त नसेः
सद्वृत्त[11] चतुर्विध हें आर्यांचें सज्जनासि मान्य असे. २६
मीं सुरनाथाचें ही सारथ्य करावयासि योग्य असें.
जाणें कौशल्य अतुळ, जाणे तो मातलि[12] प्रसिद्ध जसें. २७
ऐसें[13] जाणतसें; कीं, आर्यांहीं साधु[14] शिक्षिला आहें.
आत्मस्तुतियुक्त हि मीं बोलेन तुझ्या हितार्थ, तें साहें. २८
करितां रण पार्थासीं कर्णा! मीं चालवीन हय नीटः
तूं चित्तीं विज्वर[15] होः आहें युद्धांगणांत बहु धीट.' २९
तेव्हां सुयोधन म्हणे, 'कर्णा! मातलि जसा चि शक्राचा,

---

१. नरद्रमटळ. २. अर्जुनाचा. ३. फारसें आनंदित नाहीं मन ज्याचें. ४. साह्यकर्ता, मंत्री. ५. वायूनें. ६. कर्णाचा सामर्थ्यरूप अग्नि. ७. शत्रुरूप गवतात. ८. ठीक आहे. ९. मुरारिपु कृष्ण. १०. तत्पर. ११. उत्तम वर्तन. १२. इंद्राचा सारथि. १३. इतकें उत्तम. १४. चांगल्या प्रकारें. १५. निश्चिंत. * जेवि.

सारथि तसा तुझा हा शल्य नृप हि शल्य शत्रुचक्राचा.' ३०
शल्यासि म्हणे, 'राया! कर्णातें रक्षिसील, जरि वाजी
चालविशील, तरि रणीं जिंकील धनंजयासि हा आजि.' ३१
शल्य 'अवश्य' म्हणे, तों कर्ण म्हणे, 'तरि यथोक्त रथ कल्पीं;
मद्रपते! निजवूं दे सत्वर भीमानुजासि शरतल्पीं.' ३२
शास्त्रप्रोक्तविधानें रथ कल्पुनि शीघ्र आणिला शल्यें,
जेंवि मनोरथ साक्षात् केला देवें चि सिद्ध वात्सल्यें. ३३

## अध्याय चोविसावा.

कर्ण प्रदक्षिणा त्या जैत्ररथातें करूनियां भावें
सूर्योपस्थान करी, कीं, युद्धीं प्राप्त शुद्ध यश व्हावें. १
मग कर्ण म्हणे, 'संध्याचंद्रद्युतिरंजितांबरीं च ढगा,
रणशोभा जिंको, तूं मद्रेशा! प्रथम यावरी चढ गा!' २
शल्य बसे, मग बैसे वैकर्तन, निजरथीं जसा तरणीः
पाहुनि शोभा मानिति जन कीं, केला चि पार्थघात रणीं. ३
विप्र म्हणाति, 'विजयातें पाव रणींः कीर्ति हो जगीं शुद्धाः

१. शत्रुमंडळास बाणाग्रासारखा ( तापकर ). २. [ युद्धशास्त्रात ] सांगितल्या-प्रमाणे. ३. योजी; सिद्ध कर. ४. अर्जुनास. ५. बाणशय्येवर. ६. शास्त्रात सांगितलेल्या नियमानुसार. ७. प्रेमानें ८. विजयी रथास. ९. सूर्याची उपासना. १०. सायंकाळच्या चंद्रकांतीनें शोभिवंत केलेल्या आकाशांत. ११. 'चंद्रकिरणांनीं व्यापिलेल्या आकाशांत ढग विशेष शोभतो, त्या शोभेला रथाची शोभा जिंको. नीलमेघाप्रमाणें शोभण्यासाठीं तूं आधीं रथावर चढ' असें किंवा, 'चंद्राजवळ असलेले ढग जसे चंद्रकिरणाच्या परावर्तनानें शोभतात, तसें तूं सारथ्य स्वीकारून-विजयप्रस्थान केलेल्या तुझ्या तेजानें प्राप्त झालेली रथाची कांति आकाशांतील मेघकांतीस जिंको,' असें कर्ण म्हणाला. १२. कर्ण. १३. सूर्य.

कुरुराजमनोरथसहकारवसंता[1]! विशंक जा युद्धा.' ४
देती आशीर्वाद द्विज, बंदीसूतमागध[2] स्तविती,
सानंद वाद्यवादक दुंदुभिमुख[3] वाद्यजात[4] वाजविती. ५
राजा कर्णासि म्हणे, 'वीरवरा! मित्रवत्सळा! आजि
असुरांत शक्रसा हो विजयी पांचाळपांडवांमाजि. ६
भीष्मद्रोणांहीं जें कर्म न केलें, स्वयें करीं बा! तें,
भंगावी रिपुसेना त्वां जैसी घनघटा[5] महावातें. ७
धर्म धरावा किंवा मारावा पार्थ, वर मला दे हा,
अथवा पांच हि मारीं, विजयश्रीशुद्धकीर्तिच्या[6] गेहा! ८
स्वजयाविषयीं मानस हें न दुज्याचा धरी भरवसा, हो!
'नरसिंहा! न तवाद्भुतचापमुखींचा[7] अरिभ[8] रव[9] साहो.' ९
ऐसें वदे जयार्थी नृप, त्यासि म्हणे 'अवश्य' तो कर्ण:
झाला सिद्ध महात्मा वाराया सर्व आप्तलोकर्ण[10]. १०
हर्षें शल्यासि म्हणे, 'मद्राधीशा! वरप्रतापा[11]! हूं!
प्रेरीं वाजी; आजि त्वद्दर्शितयानशीघ्रता[12] पाहूं. ११
धर्म वृकोदर अर्जुन जेथें, तेथें चि ने रथा, वेगा
दावीं, दावीं[13] अनळा[14] मारुतसा[15]. आजि ते मथावे गा! १२
माझ्या बाहूंचें बळ पाहो तो आजि आजिमाजि[16] अरी,
तो हीं, जो हित[17] त्याचा, ज्याच्या हस्तीं वसे सदैव अरी[18]. १३
मारीन पांडव रणीं शल्या! निश्चय चि जाण; ते जितकीं
शस्त्रें धरितिल खंडिन: माझे अति तीव्र बाण तेजित[19] कीं. १४

१. दुर्योधनाच्या इच्छारूपी आम्रवृक्षास वसंतकालासारख्या कर्णा! २. ह्या तीन भाटाच्या जाति आहेत. ३. नौबद आदिकरून वाद्यें. ४. एकूणएक वाद्यें. ५. मेघसमूह. ६. विजयश्रीपासून मिळालेल्या निर्मळ कीर्तीचें घर च अशा! ७. तुझ्या अद्भुतधनुष्यरूपी मुखांतून निघणाऱ्या बाणांचा. ८. शत्रुरूप हत्ती. ९. ध्वनि. १०. आप्त लोकांचे ऋण. ११. श्रेष्ठ आहे पराक्रम ज्याचा अशा! १२. त्वां दाखविलेली रथाची शीघ्रता (वेग). १३. अरण्यात. १४. अग्नीला. १५. वायुप्रमाणे. १६. युद्धांत. १७. हितकर्ता. १८. सुदर्शनचक्र. १९. पाजळलेले.

आजि कुरुश्रेष्ठाची राज्याशा जाहली च अन[1]पार्था,
माझ्या बाणें मरतां युद्धीं बहु शोचितील जन पार्था. १५
शरवृष्टिनें [2]धनंजय शांतीतें पाववीन मीं थोर
घन, [3]नृत्यरसीं सादर आजि रणीं या करीन [4]कुरुमोर.' १६
शल्य म्हणे, 'सूतसुता! कां गा! अवमानिसी सुभव्य[5]जना?
[6]वंशज हि [7]शूर्प न गुणें लंघी [8]सभ्यादृता [9]शुभव्यजना. १७
वदसील असें न मुखें येतां गांडीवनाद कर्णातें,
[10]अजगवशार्ङ्गांसीं हा स्वबळें [11]सांगेल वाद कर्णा! तें. १८
न विलोकिला धनंजय म्हणउनि ऐसें यथेष्ट बोलवतें.
न लवे [12]वेतसाशिर; परि येतां गुरु पूर तें किं हो! लवतें! १९
अवलोकिसील [13]गजबलदलनीं सिंहासमान भीमासी:
मग न वदसील हें तूं; [14]धूमस्तोमासि कां न भी [15]मासी? २०
बळ कवळितील [16]गहना [17]अनिळानळसे चि नकुळसहदेव,
हें न वदसील तेव्हां, जें म्हणतिल '[18]साधु' [19]जिष्णुसह देव. २१
दृष्टिविष व्याळ तसा, जेव्हां तुज धर्मराज पाहेल,
कर्णा! तुझा अनावर हा तेव्हां चि [20]प्रलाप राहेल. २२
मदभूतग्रस्ता तुज [21]धर्मात्मा [22]सिद्धमंत्र पाहेल,
साधुपुढें मोह तसा, क्षणभरि हि न हा प्रलाप राहेल.' २३

१. सफल २. अर्जुनरूपी अग्नि. ३. नर्तनप्रेमात. ४. दुर्योधनरूपी मोर. ५. पांडवास. ६. एका च कुळात जन्मलेलें. उत्तमकुलोत्पन्न (पक्षीं) वेळूपासून झालेलें. ७. सूप. ८. सभ्यांना स्वीकारिलेल्या. ९. उत्तम पंख्यास. १०. शिवधनुष्य व विष्णुधनुष्य यास. ११. बरोबरी, आह्वान करील. १२. वेताचा शेंडा. १३. गजसेनेचा नाश करण्यात. १४. धुराच्या लोटास. १५. धुराने मधमाशा उडतात हे प्रसिद्ध आहे. १६. अरण्यास. १७. वायु व अग्नि यासारखे. १८. शाबास! १९. इंद्रासह. २०. बडबड. २१. पुण्यशील. २२. मांत्रिक; पंचाक्षरी.

# अध्याय पंचविसावा.

कर्ण अनादरुनि वचन शल्यासि म्हणे, 'सुशीघ्र हय हाकीं.'
आकर्षिला कृतांतें, चुंबकमणिनें चि जेंवि अय, हाँ कीं! १
उत्पात फार झाले, कर्णरथाचे तुरंग ही पडले,
रडले वारणवाजी, अपशकुन अनेक तेधवां घडले. २
क्षयसूचक उत्पात स्पष्ट चि, त्यांतें न मानिती हो! ते.
शास्त्रज्ञ दूरदर्शि हि, दैवें मोहांध जाहले होते. ३
कर्ण म्हणे, "शल्या! गति भीष्माची शत्रुनीं तशी केली:
गुरु हि अधर्में वधिला: विजयश्री ओढुनीं बळें नेली. ४
कळलें यावरुनि मला कीं, होणारापुढें न बळ चाले.
विश्वख्यातें पितामहगुरु पुरुषव्याघ्र मृत्युवश झाले! ५
केलें गुरुचें काळव्याळानें कवळ जेधवां गात्र,
शस्त्रास्त्रशास्त्रमित्रें झालीं न त्राणसद्यशःपात्र. ६
परि मीं चित्तीं निर्भय युद्धोत्सुक सिद्ध जाहलों आहें.
पाहें उत्साह; जगीं निस्तुळ माझें चि धैर्य बापा! हें. ७
पार्थप्रताप साहे आहे मजवेगळा असा कोण?
गंगासुत वृद्ध भला, तो ब्राह्मण ही पुरातन द्रोण. ८
भरतवधूंचीं नेत्रें म्यां चि पुसावीं यशःकरें आजि,
आजी धृतराष्ट्राची सुखवावी करुनि अद्भुता आजि. ९
गुरुमरणें कळलें कीं, मृत्यु चुकेना चि, तो जना आहे;
मग भय धरूनि मागें मद्रेशा कोण जाणता राहे? १०
जेथें धर्म धनंजय भीम यमज वासुदेव सात्यकि, तीं

---

१. यमानें. २. लोहचुंबकानें. ३. लाखंड. ४. कर्ण. ५. हत्ती व घोडे. ६. दूरवर विचार करणारे. ७. जगप्रसिद्ध. ८. भीष्मद्रोण. ९. पुरुषश्रेष्ठ. १०. शरीर. ११. शस्त्रास्त्रशास्त्ररूप मित्र. १२. संरक्षणापासून मिळणाऱ्या चांगल्या यशास पात्र. १३. भरतवंशजांच्या स्त्रियांचीं. १४. गंगा. १५. युद्ध. १६. नकुळसहदेव.

सेना म्यां चि सहावी; उरले धृतराष्ट्रसुत अमात्य किती?[1] ११
वैर स्वैर[2] उगवितां म्हणतिल मज देव 'किंतु[3] रुद्रो?' हें[4]
न घडे तरि गुरुमागें न जगेन; नसे भलें गुरुद्रोहें. १२
माझें प्रिय बहु केलें धृतराष्ट्रसुतें; तदर्थ[5] साधीन.
याविषयीं प्रियभोगांसह जीवित करिन अंतकाधीन. १३
श्रीरामें[6] हा रथ मज दिधला, यावरुनि पार्थ मारीन.
तद्रक्षणासि अंतक आला तरि मीं तयासि वारीन. १४
जऱ्हि सगण सकळ हरि[7]-यम-वरुण-कुबेरादि लोकपति[8] आले,
जिंकीन ते हि, मद्गुरु[9]शक्तिपुढें काळशक्ति हि न चाले." १५
इत्यादि आत्मविक्रम जेव्हां स्वमुखें यथेष्ट कर्ण वदे
शल्य तया उत्तर दे उग्र जसें विष हरासि अर्णव[10] दे. १६
'कर्णा! उगा उगा रे! किति कत्थन[11]? हें न ऐकवे कानें.
त्यजिली[12], निर्मर्यादा अ-सती वाणी तुझी, विवेकानें. १७
नरवर अर्जुन कोठें? पुरुषाधम सूतपुत्र तूं कोठें?
वाचाळा! नाचावें सत्स्तवनीं न स्ववर्णनीं ओठें[13]. १८
इंद्रपुरींतूनि सुधा, यदुनगरींतूनि[14] तसि पृथातनुजें
पुरुषवराची[15] अनुजा[16] हरिली[17], करिजेल काय तें मनुजें? १९
मृगवधकळहीं[18] अर्जुन भांडे परमेश्वरासवें आंगें.
विश्वांत विश्वनाथप्रतिभट[19] दुसरा असेल तरि सांगें? २०

१. त्याचा काय पाड? २. यथेष्ट. ३. रुद्र च की काय? ४. इतकें शौर्य. ५. त्याचा मनोरथ. ६. परशुरामानें. ७. इंद्र. ८. अष्टलोकपाळ. ९. माझ्या अचाट शक्तीपुढें. १०. समुद्र. ११. बडबड. १२. तुझ्या असभ्य व मर्यादारहित भाषणात विवेक मुळी च नाही. १३. हीं करणीं तृतीया. (सज्जनाची मनमुराद स्तुति करावी; पण आत्मस्तुति करू नये). १४. द्वारकेतून. १५. पुरुषोत्तमाची—कृष्णाची. १६. धाकटी बहीण—सुभद्रा. १७. [गरुडाप्रमाणे पराक्रमानें] हरण केली. १८. कथासंदर्भ वन० अ० ११ वा पहा. १९. शंकराचा प्रतिस्पर्धी योद्धा.

पांडव[1] [2]खांडववनहवि अर्पुनि तर्पी यथेष्ट अग्नीतें.
अद्यापि वर्णिजेतें यश देवीं पार्थबाणभग्नीं तें. २१
तुज नित्य घोषयात्रास्मरण असावें; परंतु हा मद तों
आहे चि विस्मृतीचें बीज, म्हणुनि लेशमात्र मीं वदतों. २२
कलहप्रिय अंधात्मज दुर्योधन, योग्य तूं हि त्यास गडी.
चिंतेची पेटविली पांडवहृत्पंकजीं तुम्हीं [3]सेगडी. २३
कपटद्यूतें हरिलें राज्य, वना धाडिले, तदपि [4]डावा
धरुनि वधाया गेलां; कीं, दुष्टमतें [5]क्षेमास्पद पिडावा. २४
विपिनांत [6]घोषयात्राव्याजें गेलां धरूनियां गर्व;
दुर्योधनासि मागीं कलहीं जिंकूनि धरिति गंधर्व. २५
तूं प्रथम पळालासि प्राणक्षयभय धरूनि मनिं, [7]मागें
जिंकोनि बद्ध केला दुर्योधन [8]खचरनायकें रागें. २६
बंधविमुक्त सुयोधन तेव्हां त्वां कीं धनंजयें केला?
राधेय अन्य तूं; तो अन्य चि, जाणों, पळोनि जो गेला! २७
त्या [9]गोग्रहप्रसंगीं भीष्मद्रोणादि सर्व एकानें
केले भग्नः दशा ते तुमची क्षण आयकों नये कानें! २८
तेव्हां त्वां तो अर्जुन राधेया! कां न जिंकिला? शस्त्रें,
अस्त्रें गेलीं होतीं कोठें, नेलीं हरोनि जें [10]वस्त्रें? २९
झालें युद्ध उपस्थित आजि, पळनासि तरि तुला पार्थ
मारील निश्चयें. हें कर्म करिसि निजवधू[11]विलापार्थ.' ३०
ऐसें सज्जनसंमत हित सत्य [12]श्राव्य जें वदे शल्य,
कर्णाच्या कर्णा दे दुःख, तसें तप्त ही न दे [13]शल्य. ३१

१ अर्जुन. २. खाडववनरूप नप. ३. शेगडी. ४. वैर; दश. ५. दयेचे स्थान न असा धर्म. ६. घोषयात्रेच्या मिषाने. ७. तुझ्यामागें. ८. आकाशगामी गधर्वाधीश चित्रसेनाने. ९. उत्तरगोग्रहणसमयीं. १०. विराट० अ० ६।२८ पहा. ११. आपल्या स्त्रीला शोक देण्याकरिता. १२. ऐकण्यास योग्य. १३. बाणाग्र.

# अध्याय सव्विसावा.

कर्ण म्हणे, 'गा! शल्या! मागील कथा कशास? जरि आजि
मज जिंकील तरि खरें तव कत्थन: शीघ्र चालवीं वाजी.' १
शल्य म्हणे, 'बहु बरवें; पार्थासीं गांठि घालितों तूर्ण.[1]
ईश्वरवरानुकूळें[2] दैवें होताति कामना पूर्ण.' २
यापरि बोलत जातां पांडवपृतना[3] विलोकिली दूर.
'कोठें अर्जुन?' ऐसें सादर ज्या त्यासि तो पुसे शूर. ३
कर्ण म्हणे, "सुखवावा भूपसखा[4] करुनि शत्रुचें निधन:
सांगेल पार्थ मज जो, देइन मागेल तें तयासि धन. ४
मानील धन दिलें तें अल्प तरि तयासि आणखी प्रकट,[5]
देईन मीं स्वतोषें[6] सद्रत्नाहीं भरूनियां शकट.[7] ५
थोडें म्हणेल हें तरि, देती अवलोकितां चि ज्या शुभ, त्या,
मीं, कांस्यदोहना[8] शत गाई देईन, ज्या भल्या दुभत्या. ६
हें अल्प पार्थदर्शक मानील तरी तयासि सुग्राम
शत देइन, कीं, महुरु याचकचातकवरांबुमुग्राम.[9] ७
अंजननिभ[10] कच ज्यांचे, वर्णें ज्या क्षीरगौर[11] अश्वतरी,[12]
तद्युक्त रथ तया मीं देईन, म्हणेल तें हि अल्प तरी. ८
ज्यासि वहाती गज सा तो अर्जुनदर्शकासि रथ वाहो,
रुचिरचतुर[13]सालंकृतयुवतिशतविलासपात्र अथवा हो. ९

---

१. लवकर. २. ईश्वराच्या वरानें अनुकूळ अशा. ईश्वर=परमेश्वर (पक्षीं) शिव. श्लेषानें शंकराचा वर अर्जुनास अनुकूल आहे हे सूचविलें. ३. पांडवांचें सैन्य. ४. दुर्योधन. ५. स्पष्ट. ६. खुषीनें. ७. गाडे. ८. काश्याचे भांडे भरून [प्रमाण काय?] दूध देणाऱ्या. ९. याचकरूपी चातकास मोठा मेघ च असा राम. (सर्व पृथ्वी जिंकून ब्राह्मणांस अर्पण करणाऱ्या परशुरामाचें दातृत्व अलौकिक च होय). १०. काजळासारखे काळेभोर. ११. दुधासारख्या शुभ्र. १२. खेचरी. १३. सुंदर, चतुर व सालंकृत अशा शंभर स्त्रियांचें विलासस्थान असा.

गज शत, सुग्राम हि शत, कांचनरथ[१] शत, दहा सहस्र हय
अर्पीन, अर्जुना जो दावील तयाः न आवरीन शय[२]. १०
शिक्षित[३] साधु[३] सुगति[४] हय शत देइन, कुशळ[५] रथ वहायाचे,
अत्युत्तमजातीचे प्रबळ[६]क्षतशल्यभर सहायाचे. ११
तुष्ट न होतां कांचनशृंगी[७] धेनू तयासि शत चारी[८]
देइन, पंचशत कनकभूषित धवलाश्व तदभिमतचारी[९]. १२
मुदित न होतां देइन अणखी मीं दांतें[१०] अश्व अठरा याः
कांबोजयुक्त[११] शुभ्रस्यंदन[१२] हीं; चालवीन हठ[१३], राया! १३
पश्चिमकच्छीं[१४] झाले, हस्तिपकांहीं[१५] विनीत[१६] जे केले,
कांचनमंडित षट्शत गज देइन, कीं न[१७] ते वृथा[१७] गेले. १४
जेथ विपुळ जळ, खळबळ तिळ हि नसे, वस्तु बहु समर्घ[१८] विके,
वैश्यग्राम[१९] चतुर्दश ओपीन, जयांत सर्व धान्य पिके. १५
देईन निष्ककंठी[२०] तरुणी शत एक मागधीदासी[२१].
विनवूनि पुसेन, जसा शिष्य म्हणे 'इष्ट माग' धीदासीं[२२]. १६
हें सर्व तुच्छ ऐसें जरि गणिलें पार्थदर्शकें चित्तें,
देइन सुत हि स्त्री हीं, जीं जीं असतील संग्रहीं वित्तें. १७
जो दाखवील मजला कृष्णार्जुन तो न लोक सामान्य,
पूर्वोक्ताल्पधनाच्या दाना होईल तो कसा मान्य? १८

---

१. सोन्याचे रथ. २. हात. ३. चांगले शिकवलेले. ४. चांगली चाल असलेले ५. रथ वाहून नेण्यांत कुशल. ६. अति भयंकर घाव व बाणाग्रें यांचा भर सहन करण्यास समर्थ असे. ७. सोन्याने मढविलेली शिंगे असणाऱ्या. ८. चारशे. ९. त्याच्या इच्छेप्रमाणे चालणारे. १०. शिकविलेले. ११. कांबोजदेशांतील घोड्यांसह. १२. पांढरे रथ. १३. हट्ट पुरवीन. १४. पश्चिमकच्छप्रांतांत निर्माण झालेले. १५. महातांनीं. १६. शिक्षित. १७. मूळपाठ–**सुहृत्करीं**. (जिवलग मित्राच्या हातीं). १८. सवंग. १९. व्यापारी असलेले गांव. ( सर्वसमृद्ध असें गांव ). २०. सुवर्णपदकें गळ्यांत असलेल्या. २१. मगधदेशांतील दासी. २२. ज्ञान देणाऱ्या गुरूस.

मारीन कृष्ण दोघे, तन्मणि[1] धन सर्व हरुनि आणीन,
मग तेणें मीं प्रेमें त्या परमप्रियकरासि न्हाणीन. १९
कृष्णार्जुनदर्शक जरि तेणें हि न होय सुप्रसन्नमना,
बहु[2] काय? काय हा, यश जोडुनि, वाहीन, करुनि सन्नमना."
ऐसें वदोनि कर्णें वाजविला कंबु[3] अंबुदध्वान,
त्याच्या प्रतिध्वनीतें पुरे असा होय दिविषद्ध्वा न. २१
दुर्योधन कर्णोक्तिश्रवणें हर्षोनि करि दरस्फुरण,
वाजविति शंख सैनिक, ये सर्वांला हि सत्वर स्फुरण. २२
शल्य म्हणे, "राधेया! वांटिसि कां धन कुबेरसा? अज्ञा!
पार्थ पहासील सुखें. व्ययवेत्ते वित्त वेचिती यज्ञा. २३
नेणसि अपात्रदानीं दोष, धनत्याग मूढसा करिसी;
कार्य अयत्नें होतां, धन वेचुनि अयश-पाप कां वरिसी? २४
'त्या दोघां कृष्णांतें' म्हणसी 'मारीन,' मोह हा. कवणें
'वधिले सिंह शृगाळें' ऐसें लोकांत ऐकिलें श्रवणें? २५
इच्छिसि न इच्छिजे तें, संसारीं तुज नसे चि हित मित्र;
पडसी पतंगसा जरि धनंजयीं, वारिती न, हें चित्रें[10]! २६
कार्याकार्य न जाणसि; अश्राव्य अवाच्य वदसि बहु, एणें
काळग्रस्त गमसि; कलि[11] करिजे हरिसीं न सावधें एणें[12]. २७
कंठीं बांधोनि शिळा बाहुबळें जेंवि सागरीं तरण,
कीं भृगुपतन[13], तसें हें, जें तूं करणार त्या अरींत रण. २८
व्यूह रचोनि सकळनृपबंधुसुतसुयोधनादिकीं सहित,
पार्थासीं युद्ध करीं, जरि म्हणसि 'स्वजय हो, न हो अहित.'
कुरुपतिचें अहित न हो, हो हित चि, म्हणोनि वाहिनीपा[14]! हें

---

१. त्याजवळ असलेलीं रत्नें. २. फार काय सांगू? ३. शंख. ४. मेघासारखा शब्द करणारा. ५. देवाचा मार्ग; आकाश. ६. शंखनाद. ७. अनायासें. ८. खर्च केव्हा व कसा करावा हे जाणणार. ९. कोल्ह्यानें. १०. आश्चर्य. ११. भांडण. १२. हरिणानें. १३. कडेलोट. १४. सेनापते!

कथितों. श्रद्धा धरिं, जरि जगणें आहे; विचारुनीं[1] पाहें." ३०
कर्ण म्हणे, 'शल्या! मीं स्वभुजबळें प्रार्थितों रणीं पार्था;
हे प्रभु[2] सहाय असतां साधीना कर्ण कोणत्या स्वार्था[3]? ३१
तूं निश्चित हितशत्रु[4]; स्तविसी घडिघडि सधर्मभीमातें,
साच्युतधनंजयातें; कीं, देवूं पाहतोसि भी[5] मातें. ३२
या दृढमद्भिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला;
मर्त्यांची[6] काय कथा? प्राकृतसा[7] काय कर्ण हा गमला?' ३३

---

## अध्याय सत्ताविसावा.

शल्य म्हणे, "राधेया! जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मातें
अर्जुन तीव्रशरानीं समरीं भेदील सर्व मर्मातें, १
तेव्हां पश्चात्तापा बापा! तूं पावसील पापानें;
सापानें धरिला प्लव[8] न जगे; वडवडसि तूं जसा पानें[9]. २
विजयें वाजवितां तव कर्णां कर्णा! रुचेल कंबु कसा?
पळसील, भ्रमसील चि, आइकतां सिंहनाद, जंबुकसा. ३
अंबांकस्थित[10] शिशु शशिमंडळ कवळावया जसा पाहे,
तूं विजयासि वधाया वांछिसि हें कोण जाणता साहे? ४
पाचारिजे मृगाधिप बाळमृगें धरुनि युद्धकाम रणा,
विजयासीं कळि तैसा; न वरिसि तूं अप्रबुद्ध कां मरणा? ५
शवमांसमत्त[11] जंबुक तूं, गजमुक्ताश[12] सिंह तो जिष्णु;
तूं शशक, पार्थ गजपति; कीं दानव तूं, सिताश्व तो विष्णु. ६
स्वबिलस्थकृष्णसर्पा काष्ठें टोंचोनि खवळिसी कां गा!?

---

१. विचार करून. २. हे समर्थ भुज–पंत. ३. स्वकार्यास. ४. दिसावयास मित्र पण वस्तुतः शत्रु. ५. भीति. ६. मरणाधीन मनुष्याची. ७. क्षुल्लक मनुष्याप्रमाणें. ८. बेडूक. ९. दारु पिऊन. १०. आईच्या मांडीवर बसलेला. ११. प्रेतांचें मांस खाऊन माजलेला. १२. हत्तीच्या गंडस्थळांतील मुक्ताफळें खाणारा.

तीव्र[1]त्रिशूळवदनें तूं खाजवितोसि आपुल्या आंगा. ७
तूं सर्प दर्प[2]परवश युद्धा पाचारितोसि पक्षीना[3]:’
मग तो कां निजदैवोपस्थित[4] योग्य स्वभक्ष्य भक्षीना? ८
पार्थ-पयोधर[5] गर्जे, स्पर्धा[6] मंडूक[7] तूं वृथा धरिसी,
त्याच्यापुढें ‘टुरु टुरुरु टरीं टरीं’ शब्द हे किती करिसी? ९
श्वान स्वपोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे,
जिकडे वनांत गर्जे शार्दूळ[8] तया दिशेकडे पाहे. १०
भुंके बळें यथेष्ट, व्यथित करी निकटवर्तिजनकर्णा[9],
अर्जुनदृष्टि न पडली तों चि तसा भुंकतोसि तूं कर्णा! ११
शशमंडळींत कोल्हा म्हणतो ‘मीं सिंह,’ वल्गना करितो,
जोंवरि न पाहिला गजगंडपललकवळभक्षिता[10] हरि तो. १२
आखु[11] विडाल[12], श्वान व्याघ्र, शृगाळ[13] द्विपारि[14], शशक करी,
विष अमृत, सत्य अनृत हि, तूं पार्थ, तयां तुम्हां नसे चि सरी.’
कर्ण म्हणे, “गुणवद्गुण[15] जाणे गुणवंत, अगुण नेणे चि,
प्रसवे ती च अभिज्ञा[16] शल्या! तसी न वांज वेणेची. १४
तूं गुणहीन गुणागुण केसा गा! जाणसील? अंधानें
कैसें नाट्य पहावें? कीं स्वर्गी सुख असत्यसंधानें[17]? १५
शस्त्रांतें अस्त्रांतें, जिष्णूच्या त्या हि दिव्यचापातें[18],
क्रोधातें, वीर्यातें, शल्या! मीं जाणतों प्रतापातें. १६
रिपुनृपसर्पसुपर्णा[19] कर्णास हि एक जाणतों मीं च,

१. तीक्ष्ण शूलाच्या टोकानें. २. गर्वानें परवश झालेला. ३. गरुडास. ४. आपल्या सुदैवानें जवळ आलेल्या. ५. मेघ. ६. बरोबरी; वैर. ७. बेडूक. ८. वाघ. ९. जवळ असणाऱ्या मनुष्याच्या कानास. १०. हत्तीच्या गंडस्थळांतील मास खाणारा. ११. उंदीर. १२. मांजर. १३. कोल्हा. १४. हत्तीचा शत्रु; सिंह. १५. गुणवानाचे गुण. १६. प्रसववेदना जाणणारी. १७. असत्यप्रतिज्ञानें. १८. त्याच्या गांडीवधनुष्यास. १९. शत्रुनृपरूपी सर्पास गरुडासारख्या अशा.

विंध्यासि मेरु, मेरुसि विंध्य चि जाणे, न अन्य नग नीच. १७
मीं आपणासि जाणें, जाणें त्या जिष्णुला हि तत्वानें,
तैसें न जाणिजे त्वां, इतरें वा तत्वहीन सत्वानें. १८
जाणें निजवीर्यातें, तद्वीर्यातें रणीं, म्हणोनी च
विजयीं बाहें, बा! हें नेणुनि मज 'साहसी' म्हणो नीच. १९
पार्थवधाचें साधन आहे तें सांगतों तुला, जेणें
आजि द्विरथयुद्धीं विजयाचे प्राण निश्चयें घेणें. २०
आहे अहिमय सायक मृदुचंदनचूर्णपूर्णभात्यांत,
त्यावांचुनि शर दुसरा नाहीं च क्षोणिवल्लभा! त्यांत. २१
शत्रुशिर छेदाया समयीं सोडीन त्या चि आहेया,
माझ्या शरा निवारी ऐसा यिश्वांत कोण आहे या? २२
तो आहेय शरोत्तम सोडुनि, मीं मेरुतें हि फोडीन,
कवचाची काय कथा? पार्थी कीं केशवीं च सोडीन. २३
दुःसहसर्पशरबळें पार्थासीं आजि लावितां झगडा,
पेंगडा पाडीन जगीं, शरटंकें करिन चूर्ण त्या दगडा. २४
सर्वां यदुवीरांची श्री त्या कृष्णीं प्रतिष्ठिता आहे;
सकळां पांडुसुतांचा जय त्या एकीं धनंजयीं राहे. २५
त्या दोघांसीं पडतां गांठि, स्वहितेच्छु कोण परतेल?
भुवनीं प्रसरत असतां यश सहज चि, जेंवि वारिवर तेल. २६
येतील कृष्ण दोघे मज एकावरि; जगांत मीं धन्य;
लोकत्रयीं सुजन्मा मत्सम माझ्या मतें नसे अन्य. २७
गांडीवसुदर्शनधर कपिपक्षिपकेतु कृष्ण ते दोघे

१. पवन. २. यथार्थपणें. ३. शक्तिहीन प्राण्यानें. ४. अर्जुनास. ५. अविचारी. ६. दोघा रथ्याच्या युद्धात. ७. सर्परूप. ८ मृदुचंदनाच्या चूर्णानें पूर्ण भरलेल्या भात्यात. ९. सर्परूपी बाणाला. १०. पगडा पाडीन=मी आपली श्रेष्ठता स्थापीन. ११. बाणरूप टांकीनें. १२. दगडाप्रमाणें कठिण अशा अर्जुनास. १३. पाण्यावर. १४. कृतार्थजन्मा. १५. मारुती व गरुड ज्यांच्या ध्वजावर आहेत असे.

मज हर्षप्रद समरीं; त्यांपासुनि भीति, भीरु जो, तो घे. २८
तूं झालासि कुदेशीं; संगरपांडित्य काय तुज ठावें?
शल्या! कल्याणगुणा पात्र जगीं पुण्यसंग्रहें व्हावें. २९
भ्यालासि मूढबुद्धे! बडबडसी, फार वानिसी अरिला;
भाव तुझा मज कळला, धीर तुझा मृत्युच्या भयें हरिला. ३०
यावरि उगा चि राहें, पाहें मत्कर्म नीट, सावध हो;
*त्या दोघांचा जैसा, न तुझा ही मत्करें तसा वध हो. ३१
हितशत्रुत्व न दे सुख, नाहीं च विचार लेश ही अधर्मीं,
पाहसि मज भिववाया, परि करिन अशा गुणें तुझा वध मीं.
ते मारितील मज कीं त्यांला मारीन मीं, स्वबळ जाणें;
कृष्णांला कर्ण न भीः तनु टाकुनि एकदा असे जाणें. ३३
दोघांची काय कथा? जरि कृष्णार्जुन सहस्र येतील,
तरि माझे शर त्यांच्या प्राणधनातें हरूनि घेतील. ३४
तूं उपजलासि जेथें, सकळां देशांत देश तो खोटा,
जेथें स्त्रीपुरुषांच्या व्यवहारीं पातकां नसे तोटा. ३५
सेविति गोमांसादिक मांस, व्यभिचार, मद्य जन सर्व,
जेथें जन्म तुझें तें राष्ट्र महापापवृद्धिचें पर्व. ३६
म्यां धृतराष्ट्रापासीं विप्रमुखें मद्रदेशवृत्त असें,
शल्या! बहु आयकिलें. सुब्राह्मण अनृत बोलतील कसें? ३७
मिथ्याभाषण, मित्रद्रोह, व्यभिचार, वैर आमरण,
इत्यादि दोष पुष्कळ मद्रीं. झालें तुझ्या गुणें स्मरण. ३८
जे जे ब्रह्मद्वेषी त्यांसि पराभव परोपरी घडती,
तैसें चि मद्रकांसीं संगत करितां चि नारकीं पडती. ३९

१. युद्धपांडित्य. २. कल्याणप्रद सद्गुणास. ३. कृष्णार्जुन. ४. पुण्यदिवस. (पर्वदिनीं पुण्यकर्म केल्यानें पापाचा क्षय होतो. पण तुझें–शल्याचें–राष्ट्र पापवृद्धीचें च पर्व आहे). ५. मरेपर्यंत. ६. मद्रदेशांत अगर तेथील रहिवाशांत. ७. परमात्मा, वेद व ब्राह्मण यांचा द्वेष करणार. ८. नेहमीं. ९. नरकांत. * कृष्णार्जुनांचा.

मद्रकदेशीं संगत नाहीं च, यथार्थ हें असेल जरी,
रे वृश्चिका! तुझा विषपावक[1] पावो विनाश शीघ्र तरी.' ४०
हा अर्थ ज्यांत ऐसा आथर्वण[2] सिद्धमंत्र[3] अद्भुत रे!
या मंत्रें अतिसत्वर वृश्चिकविषवीर्यवेदना उतरे. ४१
थोर चमत्कार असे! प्रत्यय आला मला चि मंत्राचा,
वृश्चिकविषवीर्याच्या निःशेषप्रशमनीं स्वतंत्राचा[4]. ४२
निर्लज्जा अपवित्रा मदिरारस सेविति स्त्रिया अ-सती,
असती तशा न कोठें, हगती मुतती उभ्या, न त्या बसती. ४३
त्यांचा सुत तूं शल्या! ठावें तुज धर्मतत्व तें काय?
मज उपदेश कराया ते मात्र समर्थ रामगुरुपाय. ४४
शरशयनीं च निजावें हा क्षत्रियधर्म मुख्य बहु शुद्ध,
बहुजन्मार्जितपुष्कळनिर्मळपुण्यद्रुमैकफळ[5] युद्ध. ४५
माझा सखा सुयोधनः हो धनकायव्यय[6] प्रियनृपार्थी.
तूं काय मूढ? मज रणविमुख कराया पराक्रम न पार्थी. ४६
तुज भेदिलें[7] परानीं स्पष्ट, म्हणुनि बोलसी असें खोटें,
सर्वा पापांमध्यें हें मित्रद्रोहपाप बहु मोटें. ४७
मज वाराया तुजसम शत जरि करितील यत्न न वळेन,
रिपुबळवर्णन करितां अधिक चि मीं कर्ण आजि खवळेन. ४८
प्रतिभटगजमथनोद्यतनागनिवारण[8] करील काय ससा?
शक्य नसे तुजला हें; समरीं होईल विमुख कर्ण कसा? ४९
नास्तिकवचनें धर्मी विमुख न होईल धर्मसमयज्ञ[9].
आम्हां वीरांसि नसे सुगतिप्रद अन्य युद्धसम यज्ञ. ५०

१. विषरूप अग्नि. २. अथर्ववेदांतील. (सर्प, विंचू, भूतपिशाच्चे इत्यादिकाचे मत्र या वेदांत आहेत). ३. कार्य सिद्धिस नेणारा. ४. स्वसमर्थ असलेल्या मंत्राचा ५. पुण्यरूपी वृक्षाचे अद्वितीय फळ. ६. द्रव्य व शरीर ही खर्ची पडोत. ७. फितुर केलें. ८. शत्रुरूप गजाच्या मथनास उद्युक्त असलेल्या गजाचे निवारण. ९. धर्माचे नियम जाणणारा.

करितां विलाप शल्या! व्याकुळ होसील, कंठ दाटेल.
असती तव उक्ति, इला धर्मात्मा कर्ण हा न भाळेल. ५१
समरीं तनु टाकिति त्यां नरसिंहांची सुनिर्मळा सुगती
रामें कथिली, तीतें स्मरतां मद्भुजभुजंग हे फुगती. ५२
माराया अहितांतें, धृतराष्ट्राचे कुमार रक्षाया,
रुचलें पुरूरव्याचें वृत्त, प्रख्यात युद्धदक्षा या. ५३
मज युद्धाभिप्रायापासुनि मागें वळ चि फिरवील
ऐसें भूत नसे चि त्रिजगीं, जें या यशासि मिरवील. ५४
त्यावें निजमित्राचें अर्जुनवधकार्य सिद्धिला वहिलें;
जें सख्य सत्यसंधें त्यां अंगीकारिलें असे पहिलें. ५५
हें कारण एकः दुजें चित्तीं लोकापवादभय मोटें,
'शल्य तपस्वी कर्णें वधिला,' म्हणतील लोक तें खोटें. ५६
सहजा क्षमा हि तिसरें कारणः या कारणत्रयें हात
धरिला माझा, म्हणउनि शल्या! केला नसे तुझा घात. ५७
नाहीं तरि गृध्रशिवाकाकशृगालोदरांत जातासः
माझ्या सर्वप्राणिप्रियदानव्रत असे चि हातास. ५८
पुनरपि जरि तूं ऐसें मच्छ्रवणमनश्रमभ्रमदशील
कुवचन, दुराग्रहानें शल्या! माझ्यासमीप वदशील, ५९
तरि घालील तव शिरीं हा प्रभु माझा महाभुज गदेतें;
कीं, त्वद्वचाहुनि उणें तापद विष, जें महाभुजग दे, तें." ६०

१ वटवट. २. खोटा, नारिणी. ३. इंद्राच्या शत्रूचा–दानवाचा–संहार करणाऱ्या पुरूरव्याचें वृत्त. ४ मला ५. युद्ध करण्याच्या निश्चयापासून. ६. प्राणी. ७. त्वरित. ८. कटु भाषण केले असता हि तला न मारण्याचे कारण ९. सज्जन. १०. गिधाड, भालू (कोल्हाविशेष) कावळे व कोल्हे यांच्या पोटांत. ११. सर्व प्राण्यांस प्रियवस्तूचें दान करण्याचें व्रत. १२ माझ्या कानांस श्रम व मनास भ्रम देण्याचा धर्म असणारें असें.

इत्यादि बहु वदे, मग कर्ण म्हणे त्यासि, 'चाल गा! चाल.'
कवि हो! निंधाल पुढती, जरि शल्याची सदुक्ति वाचाल. ६१

# अध्याय अट्ठाविसावा



(हंसकाकीयाख्यान).

मग मद्राधीश म्हणे, "कर्णा! जे धर्मनीतिचें वतन,
गोब्राह्मणशरणागत ज्यांहीं केलें चि सर्वथा जतन. १
संग्रामीं न पळाले, यज्वे, मूर्धाभिषिक्त जे राजे,
ज्यांच्या शुद्धयशासीं तुळितां क्षण हीं न चंद्रमा साजे: २
त्या राजर्षिवरांच्या वंशीं झालों, स्वधर्मपथगामी:
सूत नव्हे, वर देउनि चालवितां हा त्वदीय रथ गा! मीं. ३
त्या मज हीं हित कथितां म्हणसी 'हितशत्रु:' मत्तसा वदसी:
तुज मति मलिना चि रुचे, चोरा जसि कृष्णपक्षि चावदसी.
तूं या महाप्रमादें व्यसनीं बुडसी, म्हणोनियां हित मीं
कथिन पुन्हां हि तुज, भले भ्रमतां पथ दाविती खळा हि तमीं.
काककथा कथितों, ती ऐकावी, मग यथेष्ट वर्तावें;
पडतां गिरिशिखरच्युतबृहदुपळें कीं खळें न पर्तावें. ६
कां अपराध न करितां मज मारूं पाहतोसि अनघातें?
होइल कल्याण कसें धर्मज्ञहितेच्छुसाधुजनघातें? ७
अंधासि डोळसानें सांगावें 'काढ पाय, हा खळगा.',
व्यसनीं स्वजनोपेक्षा मद्रेश करील? काय हा खळ गा!? ८
सारथिनें रक्षावा स्वरथी, राजा जसा अमात्यानें:

१. शहाणे लोक हो! २. सतोपाल; नम्र व्हाल. ३. यज्ञ करणारे. ४. स्वधर्ममार्गानें चालणारा. ५. चतुर्दशी. ६. पर्वताच्या शिखरावरून पडलेल्या मोठ्या दगडानें. ७. किंवा. ८. निष्पापास. ९. आपण ज्याचें सारथ्य करितो तो रथी.

मानावे पितरांसम त्या हितकर्त्या सुहृत्तमा त्याते. ९
सांभाळितो कुटुंबी स्वकुटुंब, तसा चि सारथी रथिला,
व्हावें तव भद्र बरें, मद्रवरें म्हणुनि नय भला कथिला. १०
स्पर्धा साधुजनासीं लाविसि, नेणोनि आत्मशक्ति मदें:
तुज पथ्यें तथ्य वचनें गुरुचीं नीचासि भासति अभदें. ११
दृष्टांत सांगतों तुज याविषयीं, श्रवण नीट दे कर्णा!
मन आटोपूनि धरीं, जन्हि सुहृदुपदेश वीट दे कर्णा. १२
पूर्वीं सागरतीरीं साधुनृपाच्या पुरांत एक धनी
सन्मान्य वैश्य होता, नांदे ज्याच्या स्वधर्मनीति मनीं. १३
त्या धनिका वैश्याचे होते बहु पुत्र-पौत्र गुणवंत:
त्यांतें आशीर्वादें गौरविती सर्वदा सदय संत. १४
त्या वैश्यकुमारांचें भक्षी उच्छिष्ट एक काक सदा,
बाळक उदारमति ते न वदति वाणी कदापि साध्वसदा. १५
देती वैश्यकुमारक मांसौदन सेवया वडे मांडे,
मधु घृत पायस वायस खाय सदा, पक्षिपांसवें भांडे. १६
सागरतीरीं तेथें आले दैवें कदाचित मराळ,
जे मुक्ताफळभोजन करिती, बिसतंतु भक्षुनि फराळ. १७
पाहुनि हंसांतें ते बाळ स्वोच्छिष्टपिंडपुष्टातें
म्हणती, 'तूं चि विहंगा! सर्वखगश्रेष्ठ' त्या सुदुष्टातें. १८
करिति प्रतारणा असि काकाची अल्पबुद्धि ते बाळ:
तों तो फुगे, कुगेहद्वारीं मूत्रें हि जेंवि जंबाळ. १९
गर्वें मूर्खपणें तो मानी बाळोक्त सर्व साचार,

१. कल्याण. २. हितकर. ३. खरा. ४. दुःख देणारा. ५. धनवान. ६. भय देणारा. ('खुड खुट' असा शब्द). ७ मांसमिश्रित भात, पुलावा. ८. खार. ९. पक्षिश्रेष्ठाबरोबर. १०. हंस. ११. मोती. १२. कमळाच्या देठातील ततु. १३. आपल्या उष्ट्या अन्नाने पुष्ट झालेल्यास. १४. फसवणूक; थट्टा. १५. वाईट घराच्या दारात, शौचकूपांत. १६. चिखल. १७. खरें.

अधिक चि.माजे स्तवनें, न विचार करी मलीमसाचार[1]. २०
गेला उडोनि गगनीं मग नीच सगर्व काक तो त्यांत[2],
साधूंत खळ जसा कीं काचमणी परमशुद्ध मोत्यांत. २१
जाणे त्या हंसांत श्रेष्ठ जयालागि त्यासि तो काक,
'दोघे उडों, तुझें बळ पाहों दे, मत्समीप ये ठाक.' २२
ऐसें वायस वदतां हांसति ते हंस त्या खगापसदा[3],
कीं, शुद्धासीं मत्सर मूर्ख करी, ज्यांत ताप-पाप सदा. २३
म्हणती हंस तयातें, 'गर्वभरें करिसि वायसा! चार[4],
आम्ही मानसवासी[5], सर्व खगांचे हि राय साचार. २४
आम्हीं सुदूरपाती[6] हंस खगांमाजि पूज्य खगनीच्या!
क्षीराब्धितीरविहारी[7], जलकेलि[8] करूं नदींत गगनींच्या[9]. २५
करिसी बरोबरी तूं हंसाची काय? वायसापसदा!
करितो घात तुझा मद; मारील चि जो गृहांत साप सदा. २६
रे बलिपुष्टा! दुष्टा! कैसें हंसांसमेत उडशील?
साहस करितां सहसा स्पष्ट व्यसनार्णवांत बुडशील.' २७
वायस बहु हंसांच्या हितवचनाची करूनि कुत्सा[10], हें
वदता झाला त्यांसी पुनरपि तो गर्वराशि उत्साहें. २८
'शतपात[11] जाणतों मी, उडेन एकैकपात[12] शतगावें;
मजसीं उडतां अन्यां खगमांचें पक्षवीर्य[13] न तगावें. २९
उड्डीन[14] एक, दुसरें अवडीन, तिजें प्रडीन, संडीन,
इत्यादि पात शत मीं दावूनि विपक्षगर्व[15] खंडीन. ३०
गति शत दावीन, तुम्हां तेव्हां माजें कळेल बळ साचें;

१. मलीमस+आचार=दुर्वर्तनी. २ हंसांत. ३ पक्ष्यात नीच अशा कावळ्यास. ४. चेष्टा. ५. मानससरोवरात राहणारे. ६. फार दूर उडणारे. ७. क्षीरसागरतीरीं विहार करणारे. ८. जलक्रीडा. ९. स्वर्गातील मंदाकिनीत. १०. तिरस्कार, अनादर. ११. शंभर प्रकारचें उड्डाण. १२. चारशें कोस. १३. पंखांचा शक्ति. १४. हे सर्व उड्डाणाचे प्रकार आहेत. १५. शत्रूचा गर्व.

निवडे निकट[1] चि; वर्णें दूर[2] सम चि पद्म पुष्प मळसाचें. ३१
गगनीं तुम्हांत एका भेटल्यासीं[3] मीं उडेन हो! खग! ती
सांगावी जी माने; किंवा म्यां दाविजे शत स्वगती?' ३२
ऐसें पुष्कळ बोले, दावी बहु गर्व मूढ तो करट[4].
स्तनमान[5] काय पावे, जरि हि उगीं वृद्धि पावलें करट? ३३
हांसोनि एक हंस ध्वांक्षासि म्हणे, 'तुझ्या गती शतशः
आम्हीं हंस समस्त हि एक चि गति जाणतों, तुझ्या न तशा.
जाणें एका गतिला, त्या चि गतीनें उडेन आकाशीं:
मानें तीनें उड तूं,' बोले ऐसें मराळ[6] काकासीं. ३५
तों बहु हांसति जे की आले होते मिळोनि तज्ज्ञाती,
शतविधगतिहुनि अधिका, परि तुच्छा भासली अंतज्ञां ती. ३६
'शतपातपंडितासीं या अस्मन्मित्रबंधुकाकासीं,
हा एकपातमात्रज्ञाता कैसा उडेल आकाशीं? ३७
एका पातांत चि यां हंसांला हा स्वबंधु हारवितो,'
ऐसें हांसति वायसखद्योत[11], परी करि क्षमा रवि[12] तो. ३८
हंस उडे तों त्यासीं स्पर्धेनें कावळा उडे व्योमीं[13]:
शतपात पातकालय[14] दावी, सांगों प्रकार किति तो मीं? ३९
उड्डीनप्रमुखें जीं होतीं शतसंख्य ठाउकीं पतितें[16],
तीं सारीं दाखविलीं हंसप्रवरापुढें चि त्या पतितें. ४०
स्वज्ञातिश्रेष्ठाचें गतितांडव[17] पाहतां चि, काकानीं
हर्षभरें नभ भरिलें, 'का का का का' अशा स्वहाकानीं. ४१
अप्रिय बोलति पुष्कळ, हांसति बहु हेळसोनि[18] हंसांतें,

१. जवळ २. दुरून सारखें च. ३ वाटेल त्याबरोबर. ४. कावळा ५. स्तनाची योग्यता. ६ गरुड़. ७. कावळ्यास. ८ आवडेल त्या गतीनें. ९. त्या कावळ्याचे ज्ञातिबांधव. १० मखास. ११. काकरूपी काजवे. १२. हंसरूप रवि. १३. आकाशांत. १४. पापाचें केवळ घर च असा कावळा. १५. शल्य. १६. उडणी—पंत. १७ गतिरूप नृत्य. १८. हेळणा करून.

अवमानिती, अमंगळ खळ ते खगकुळशिरोवतंसातें[1]. ४२
मृदुपातें[2] हंस उडे, काकाहुनि हीनशक्तिसा भासे.
ऐसें मुहुर्तभरि तो दावी, तों काकमंडळी हासे. ४३
हंसांसि काक म्हणती, 'हां! हारविला चि कीं भवज्ज्ञाती[3].'
आयकिली दूरुनि त्या सर्वमराळोत्तमें अवज्ञा ती. ४४
मग पश्चिमदिग्देशीं शीघ्र शिरे हंस, काक ही मळधी[4],
जिकडे होता कर्णा! गंभीर अपार, खालता[5], जळधी. ४५
मागें धांवे वायस, हंस पुढें, सोडिला जसा तीर[6].
स्पर्धेंत काक नेणे कीं केवळ दूर राहिलें तीर. ४६
पक्षांचें बळ सरलें, गर्व मनींचा मनांत चि जिराला:
घे धाक काक, सागर सर्वत्र दिसे, निराश्रय, विराला[7]. ४७
न दिसे अग नग[8], मग नग[9] गगनीं खग नीच काय काढील?
चित्तीं म्हणे, 'समय हा मज काळाच्या मुखांत वाढील.' ४८
जावूनि दूर आला किंवा नाहीं असें, फिरे, पाहे,
राहे, न करि उपेक्षा, हंस खळाची हि काळजी वाहे. ४९
आला हंसापासीं प्रतिक्षणक्षीणशक्ति[11] करटपती[12],
आतां पडेल ऐसें जाणुनि ज्या खावया मकर टपती. ५०
अवलोकिला मराळें अंत्यंतासन्नपतन[13] पामर तो.
मग आणिलें मनीं कीं, 'यावरि म्यां न करितां कृपा मरतो.
रक्षावा चि, उपेक्षा व्यसनीं अरिची हि न करिती संत.
पाहों नये चि आंगीं बळ असतां दीनजंतुचा अंत.' ५२
ऐसें सत्पुरुषव्रत आठविलें, मग म्हणे मराळ, 'अगा
बहुगतिचतुरा! पतितें शत कथिलीं त्वां स्वयें चि, काकखगा!

१. पक्षिकुलभूषण अशा हंसास. २. हलक्या गतीनें. ३ तुमचा ज्ञानभाई. ४. दुष्टबुद्धि. ५. खालच्या बाजला. ६. बाण. ७. विरघळून गेला. ८. वृक्ष. ९. पर्वत. १०. टिकाव. ११. क्षणोक्षणीं कमी होत आहे शक्ति ज्याची असा. १२. कावळा. १३. अगदीं पडावयास झालेला असा.

परि जें निजगुह्यपतित[1] आम्हांसि न सांगसी च कां गा ! तें ?
झालें सख्य परस्पर, दूर उडालों नभांत सांगातें[2]. ५४
तुंडाग्रें[3] पक्षयुगें[4] शिवसी काका ! क्षणक्षण जळाला.
या गतिचें नाम कथीं, दे टाकुनि सर्व संशय, जळाला[5]. ५५
वद काय नाम काका ! या पाताचें ? शतीं असे हा कीं
त्याहूनि वेगळा चि ? स्पष्ट कथीं, मौन एकदा टाकीं. ५६
ये ये झडकरि, हा मी हंस तुझी वाट पाहतों करटा !
या लक्षयोजनांबुधिपरतीरीं[6] आमुचा असे घरटा.' ५७
नेत्रीं नाकीं कानीं क्षारोदक[7], पक्ष जाहले ओले;
केवळ विव्हळ दुर्बळ तो खळ आर्तस्वरें[8] असें बोले:- '५८
"'का' 'का' शब्द करूनि भ्रमतीं, त्यांच्या कुळांत मीं झालों;
प्राणोपायन[9] घेउनि तो आतां शरण मीं तुला आलों. ५९
ने मज सागरतीरीं हंसा ! दे प्राणदान दीनातें;
उडतां व्याकुळ झालों, भ्यालों या दुस्तरा नदीनातें[10]." ६०
ऐसें वदतां पडला सिंधुजळीं काक धाक पावोनी;
त्याच्यासमीप गेला सदयजनोत्तंस[11] हंस धावोनि. ६१
हंस म्हणे, "रे काका ! सांगत होतासि 'पात शत जाणें;'
आत्मश्लाघा[12] ज्यांत, स्मर, तें ज्ञातिप्रमोदकर[13] गाणें. ६२
मजहूनि अधिक तूं कीं ! इतुक्यांत चि भागलासि ? सांग मला,
शतपातपंडिता ! तुज हा श्रम अल्पा पथीं च[14] कां गमला ? ६३
कीं पर्व[15] अपूर्व असे, जें परमोदार द्यावया सुख गा ! ?

१. आपले गुप्त ठेवलेले उड्डाण. २. सोबतीनें. ३. चोचीनें. ४. दोन्ही पखांनी. ५. जळून गेला, पार नाहीसा झाला. ६. लक्ष योजनें विस्तीर्ण असलेल्या समुद्राच्या तीरावर. ७. खारें पाणी. ८. करुणस्वरें. ९. प्राणरूप नजराणा, भेट. १०. नदीपतीस (समुद्रास). ११. सदय जनांस भूषण असलेला. १२. आत्मस्तुति. १३. जातिबांधवांस खुष करणारे. १४. थोड्या वाटेवर च. १५. पर्वणी.

म्हणउनि मज्जन[1] करिसी? वद, झाले कर्ण हे पिपासु[2] खगा!"
काक म्हणे, 'मीं भक्षुनि उच्छिष्टें फार मातलों बा! गा!
कीं आपणासि मानीं गरुड चि हंसोत्तमा! महाभागा! ६५
म्यां काक अन्य खग ही पुष्कळ अवमानिले अदभ्र[3] मदें.
ऐकविलीं बा! तुज ही दुर्वाक्यें सज्जनश्रुतिश्रमदें[4]. ६६
केली तुजसी स्पर्धा, तत्फळ हें व्यसन पावलों सद्य[5]:
शरणागतासि रक्षीं, हो कीर्ति तुझी जनांत अनवद्या[6]. ६७
हो[7] बेट, भेट, हंसा! अससी तूं दक्ष रक्षणीं आंगें:
पाळिति संत व्यसनीं दीन मुके बधिर आंधळे पांगे. ६८
सदया! निजदेशाप्रति जरि मज नेसील तरि विभो! मग मीं
शैलभीं[8] हि नम्र होइन, बा! सांगों काय मदधिकीं खगमीं?'
ऐसें वदे, रडे बहु, खाय गटकळ्या जळांत, करि का का.
धांवे मराळ, चरणीं कवळुनि काढी क्षणांत वरि काका. ७०
वाहे त्या दीनातें पृष्ठीं तो ब्रह्मवाहन[9] हि हंस:
घेउनि गेला सागरतीरातें सर्वसज्जनवतंस. ७१
हंस यथागत[10] गेला दावुनि माहात्म्य साधुसंगाचें,
स्थापुनि पूर्वस्थानीं, आश्वासन करुनि त्या विहंगाचें[11]. ७२
काक, मराळद्वेषें होतां बळसर्वगर्वहानि[12], वळे;
कर्णा! असा असाधु, त्यजुनि श्रमदा दुराग्रहा, निवळे. ७३
जैसे ते वैश्यात्मज उच्छिष्टें करिति पुष्ट बलिपुष्टा[13],
तैसे चि धार्तराष्ट्र[14] स्वोच्छिष्टें पोषितात तुज दुष्टा! ७४
स्वसमांतें[15] अधिकांतें अवमानी दुष्ट काक, तूं हि तसा:

१. स्नान. २. तृषार्त. ३. अत्यंत. ४. सज्जनाच्या कानास श्रम देणारें. ५. तत्काल. ६. निर्दोष. ७. समुद्रात बेटाप्रमाणे आधार दे. ८. टोळापुढे दर्वाल. ९. ब्रह्मदेवाचें वाहन हंस आहे, हें प्रसिद्ध आहे. १०. आला तसा. ११. त्या कावळ्याला धीर देऊन. १२. सर्व शक्ति व गर्व याचा नाश. १३. काकबलीनें माजलेल्याला. १४. कौरव. १५. आपल्या बरोबरीच्यांना.

तो बहुमत वैश्यसुतां, धृतराष्ट्राच्या सुतांसि तूं हितसा.[१] ७५
भीष्म द्रोण द्रौणी कृप नृप होते सहाय तुज सारे,
उत्तरगोग्रहणीं, त्वां न निवटिला[२] तो धनंजय कसा रे!? ७६
पार्थें भ्राता वधितां कुरुवीरांदेखतां पळालासि;
त्या हि महाद्वैतवनीं[३] गंधर्वभयें कसा गळालासी? ७७
गंधर्व चित्रसेनप्रमुख रणीं जिंकिले चि सितवाहें,
बद्ध सदार सुयोधन सोडविलाः विसरलासि कितवा! हें? ७८
कथिला सभेंत रामें[६] कृष्णकिरीटिप्रभाव जो पहिलाः
भीष्मद्रोण हि वदले, 'सुख देतिल हरुनि भार हे महिला.' ७९
सकळां भूतांहूनि ब्राह्मणसा, पार्थ तुजहुनी अधिक,
तो सिंधु, तूं सरोवर; सामर्थ्य तुझें प्रसिद्ध सावधिक. ८०
आतां चि सूतपुत्रा! येईल प्रत्ययासि वाचाळा!
वेंडावेल चि रसना. न करी सिंहापुढें शिवा[११] चाळा. ८१
व्यसनीं वायस वांचे जैसा जातां मराळपा[१२] शरण,
जा तूं हीः न तव गळां घालु यमाचा कराळ[१३] पाश रण. ८२
तव दर्प, सर्पसम शर हाणोनि उरीं, हरील जिष्णु रणीं,
तें उमजसीलः न उरे व्याघ्रवें वीर्य लेश हीं उरणीं.[१४] ८३
लोकप्रसिद्ध सन्मत तेजस्वी कृष्ण चंद्रसूर्य तसे;
खद्योत प्राकृत तूं; ते त्वत्तेजांत लोपतील कसे? ८४
नरसिंह केशवार्जुन; जरि मिळतिल तुजसमान कोटि ससे,
त्यांचा नसे पराभव; गरुडासि सदर्प[१५] सर्प काय डसे? ८५
ऐसें जाणोनि वृषा! आटोपीं परम चंचळा जिभली,
कर्णा! सावध सावध सावध! रे!; गति नसे चि आजि भली."

१. हितप्रद असा [भासतोस]. २. ठार केला. ३. घोषयात्राप्रसगीं. ४. स्त्रियासह. ५. दुष्टा! ६. परशुरामाने. (आर्या० उ० अ० ८ गीति २३–४७ पद्य). ७. गतजन्मांचा. ८. मर्यादित, अल्प. ९. जड होईल. १०. जिह्वा. ११. भालू. १२. हंसश्रेष्ठास. १३. भयंकर. १४. मेंढ्यांत. १५. उग्र.

# अध्याय एकुणतिसावा.



कर्ण म्हणे, "शल्या! मीं तुजहुनि बहु केशवार्जुनां जाणें.
तद्यश कथिसि मज, जसें बाळाचें नारदापुढें गाणें. १
जरि ते शस्त्रज्ञगुरू सुगुणनिधी शत्रुमांसबक, लेश
भय मज नाहीं, जरि ते, जाणें, दोघे समर्थ सकलेश. २
त्यांसीं युद्ध करीन चि, जरि असती दोन विप्रगुरुशाप.
कां परि कांप रिपुभयें पावेन? न दे चि मृत्यु मज ताप. ३
शल्या! संपादावें दिव्यास्त्र असा धरूनियां काम,
म्यां विप्रच्छद्मानें जेव्हां पूर्वीं उपासिला राम, ४
पार्थहितार्थीं वज्री विघ्न करी; होय उग्रतनु कीट;
माझी मांडी फोडी; परि नाहीं कांपलों चि मीं धीट. ५
ती दुःसह पीडा म्यां बहु धैर्यें साहिली च, कीं, गुरु हा
जागा न हो, मदंकीं निजला ठेउनि सुखें शिरोंबुरुहा. ६
मांडीस कीट खालें भेदी, भित्तीस जेंवि आखुपती.
निश्चळ तसा चि होतों, जरि हि दुःसह दांत ते मला खुपती. ७
पुष्कळ रक्त निघालें, उठतां रामें विलोकिलें बा! तें;
'हें काय? कसें झालें?' ऐसें शल्या! विचारिलें मातें. ८
कथितां वृत्त म्हणे गुरु, 'तूं विप्र न होसि, कोण तूं? सांग.
धैर्य अतुळ निश्चळ हें कीटें आतृप्त भक्षितां आंग!' ९
मग मीं सत्य चि वदलों. कपटास्तव कोप तन्मन व्यापी.

१. नारद व तुंबरु हे गाण्याविषयीं प्रसिद्ध आहेत. २. शस्त्रविद्या जाणणाऱ्यांचे गुरु. ३. शत्रुरूप मांसास बगळ्यासारखे. ४. सर्वांचे स्वामी. ५. ब्राह्मणाचा व गुरूचा असे दोन शाप. ६. ब्राह्मणाच्या मिषानें. ७. इंद्र. ८. शिरकमळास. ९. मोठा उदार. १०. तृप्त होईपर्यंत. ११. ब्राह्मणेतरास ब्रह्मास्त्रविद्या शिकवावयाची नाहीं, ह्या परशुरामाच्या नियमाचा कर्णानें कपटानें भंग केला म्हणून.

‘अस्त्रस्मृति[1], प्रतिज्ञारक्षण समयीं [2]नसो’ असें शापी. १०
‘ब्रह्मास्त्र न स्फुरो तुज युद्धीं येईल जेधवां मरण.’
ऐसें राम म्हणे तें सत्य चि; न [3]ब्राह्म देइल स्मरण. ११
तोडीन अर्जुनाचें शिर, तो सोडीन पन्नगाशुग[4] मीं.
बहुगुरुकार्याविषयीं[5] योग्य ब्रह्मास्त्र तें, न या [6]सुगमीं. १२
पार्थपराक्रमपाथोनिधिचा[7] परमोग्र वेग हेळेनें[8]
शल्या! निवारिजेल प्रबळविजयचापवल्लिवेळेनें[9]. १३
नृपभूषण, तेजस्वी, दृढ, धरि उदरांत जेंवि भूमि हिरा,
प्रसवे पृथा जया की जेसी अदिती तया विभू[10]मिहिरा, १४
त्या पार्थासि, नयाच्या त्या हि सहायोत्तमा[11]च्युतासि पणें
मारिन, खेळेन रणीं रिपुरक्तांचें करूनियां सिंपणें. १५
मारीन त्यासि अथवा त्याच्या चक्रें मरेन; हो [12]भावि.
कोणा तरि प्रकारें, सत्कीर्ति जगत्रयांत शोभावी. १६
तूं भीरु मूर्ख निष्ठुर हितशत्रु क्षुद्र मद्रदेशमळा[13]!
निंदिसि, करिसी तेजोभंग, मज तुझा कुसंग दे शमळा[14]. १७
स्नेह करी, हृष्ट करी, तर्पी, रक्षी, सदैव संमानी[15],
पावे सुखें सुख हि, तें मित्र असें म्हणति सर्व हि ज्ञानी. १८
तें सर्व मित्रलक्षण माझाठायीं च नित्य नांदे, हें
जाण दुर्योधन हीं. साधूं तत्कार्य मीं न कां [16]देहें? १९

१. अमक्या अस्त्राचा अमक वेळा उपयोग करण्याची आठवण. २. ह्या दुसऱ्या शापामुळें च, इंद्रदत्तशक्ति अर्जुनावर सोडण्याची प्रतिज्ञा असता कर्णानें ती घटोत्कचावर सोडली. ३. ब्रह्मास्त्र. ४. सर्परूप बाण. ५. फार मोठ्या कार्याविषयां. ६. या सोप्या [अर्जुनवधकार्यास] ७ समुद्राचा. ८. लीलेनें. ९ प्रबल व विजयशील अशी माझी धनुष्यवल्ली हा च मर्यादा–समुद्रकिनारा तिनें १०. सर्व-व्यापी सूर्यास. ११. मित्रश्रेष्ठ अच्युतास. १२. होणार तें होवो. १३. मद्रदेशाच्या मळा (उकिरड्या!). १४. पापास. १५. मान देई. १६. शरीर अर्पण करून

खंडी,[1] दंडी, करि कृश, मारी, पढवी[2] हि उष्ण सुसकारे,
कष्टवि, तो शत्रु; तुवां हा सूचविला स्वभाव असका[3] रे! २०
मीं शुद्धयुद्धधर्में पूजाया ईश्वरासि, त्या अरितें
गांठीन: भीत नाहीं गांडीवा, शौरिच्या हि त्या अरितें.[4] २१
दंडगदापाशाशनिधर[5] काळ कुबेर कीं वरुण शक्र,
यांचें हि भय नसे मज, जरि हि श्वभ्रीं[6] पडेल रथचक्र. २२
गुरुशाप एक कथिला: विप्राचा शाप ही दुजा परिस.
अरिस स्वमर्म कथितो, अधिक नसे धैर्य अन्य यापरिस. २३
अस्त्रार्थ फिरत असतां एका समयीं नृपा! असें घडलें,
शापव्यसन अकस्माद्दैवबळें आमच्या गळां पडलें. २४
संधानलाघवार्थें[7] सोडित होतों वनांत मी बाण,
द्विजहोमधेनुच्या[8] तो वत्साचे एक शर हरी प्राण. २५
अज्ञानें[9] वत्साचा वध घडला; विप्र कोपला: शापी
कीं, 'रे! असावधाना! पात्र चि दंडासि तूं असा पापी. २६
दुस्तर भयांत युद्धीं रथचक्र तुझें पडो महाश्वभ्रीं,
जेंवि महाकल्पातीं रविमंडळ निश्चयें बुडे अभ्रीं.[10]' २७
दशशत धेनू, षट्शत वृष देतां हि द्विज क्षमा न करी.
स्वीकारीना शल्या! सतशत क्षोणिधरसंमान[11] करी.[12] २८
बहु दासीदासशतें देतां हि न विप्र तो बधे,[13] नुगळे:[14]
मीं तद्भयें गळालों, व्याघ्रभयें जेंवि काय धेनु गळे. २९
जें बहुकामसंमृद्ध[15] स्वगृह, स्वद्रव्य सर्व ही होतें,

१. निरुत्साह करितो. २. दुःख करावयास लावी. ३. सर्व, संपूर्ण. ४. सुदर्शनचक्रास. ५. दंड, गदा, पाश व वज्र हे अनुक्रमाने धारण करणारे. ६. भगर्भी, खळग्यांत. ७. निशाण मारण्यात पटाईत व्हावें म्हणून. ८. एका ब्राह्मणाच्या यज्ञोपयोगी गाईच्या. ९. न कळत. १०. आकाशात. ११. पर्वतासारखे. १२. हत्ती. १३. वळे. १४. वश न होई. १५. पुष्कळ इच्छित वस्तूंनी पूर्ण असें.

प्रार्थूनि देत असतां, इच्छीना धन अखर्व[1] ही हो! तें. ३०
जातां मज विप्र म्हणे, अनृत नव्हे तो अमोघशापरवा,[2]
'धनदाची[3] हि नसे, मग अन्याची काय निःस्पृहा परवा?' ३१
हे शाप सुहृद्भावें[4] कथिले, कीं, मज तुझा नसे लेखा;
मत्क्रोधअहि न खवळे तों चि[5] खळाखो[6]! सुकीर्तिसेले[7] खा. ३२
भ्याडासि भेडसावीं; मीं भ्याया उपजलों नसें कांहीं;
विक्रमयश साधाया झालोंसें, चाल, पथ पुढ पांहीं. ३३
आहे सहाय समर्थी मज मीं चि सहस्रशल्यतुल्य गुणें.
तुज रक्षिलें क्षमेनें. वधितां माझें पडेल काय उणें?" ३४
शल्य म्हणे, 'रे सूता! बडबड करितोसि फार मद्यपसा.
गुरुसागर[8] बहु गर्जे, परि मुनिचा[9] एक ही भरे न पसा. ३५
कर्णसहस्रें हि न जें कार्य घडे तें घडेल शल्यकरें.
एकें अमृतकरें[10] चि व्योम[11] धवळतें, न तें उडुप्रकरें.[12]' ३६
कर्ण म्हणे, "बैस उगा. शुद्धासि अशुद्ध निंदिसी उलटा,
साधुसभास्तुतसाध्वीशुचिशीळाला[13] हि हांसती कुलटा. ३७
जो पापचाराचें केवळ माहेर मद्रदेश, तशा
राष्ट्रीं षड्भागग्रहकर्ता[14] तूं, जोडिती अघें शतशा. ३८
'म्लेच्छ मनुष्यांचा मळ, त्या म्लेच्छाचा मळ स्वयें तेली,
त्या तेल्यांचा मळ ते, ज्यांची पुंप्रकृति[15] संक्षया गेली: ३९
त्यांचा हि राजयाजक,[16] याज्य[17] तयांचा हि मद्रकांचा[18] ही

१. सर्व; होते नव्हते तेवढ. २. न चुकणारा शापशब्द ज्याचा असा. ३. कुबेराची. ४. स्नेहभावानें. ५. पर्वा. ६. नीच मूषका! ७. उत्तमकीर्तिरूप शेले. ८. मोठा समुद्र. ९. अगस्तिऋषीचा. १०. चंद्रानें. ११. आकाश. १२. नक्षत्रसमूहानें. १३. सज्जनांच्या सभेंत जिची स्तुति केली जाते व जिचें वर्तन फार पवित्र आहे अशा पवित्र वर्तनाच्या स्त्रियेस. १४. कररूपानें सहावा भाग घेणारा. (राजा). १५. पुरुषत्व. १६. राजाचा पुरोहित. (याजक=धनादि लाभाच्या आशेनें दुसऱ्यासाठीं यज्ञ करणारा). १७. ऋत्विजविशेष. १८. मद्रदेशस्थ जनांचा.

मळ तुज हो,' हें म्हणतां लागलिया राक्षसासि बहु दाहो. ४०
या शापापांसुनि बहु घेती राक्षस हि पाप वित्रास,
पळती सोडुनि शल्या! जेंवि अघें हरियशःपवित्रास." ४१
शल्य म्हणे, 'रे कर्णा! आतां पितरांसि ही तुझ्या अंगीं
त्यागिति, विकिति स्त्री सुत, अंगेशाच्या हि पाप हें अंगीं. ४२
रथ अतिरथ कथितां जे भीष्में तुज दाविले तुझे दोष,
ते आठवीं स्वचित्तीं; हित वदतां येतसे तुला रोष. ४३
सर्वत्र भले ब्राह्मण सुक्षत्रिय वैश्य शूद्र ही असती;
वसती सर्वत्र सती; केवळ सर्वत्र दुष्कृती नसती. ४४
हास्य-विनोद-क्रीडा आहे सर्वत्र, धर्म ही आहे.
दुष्ट परच्छिद्र जसें पाहे तैसें न आपुलें पाहे. ४५
सर्वत्र धर्मरक्षक राजे आहेत, लाविती वाटे,
दंडिति खळांसि; धार्मिक असती सर्वत्र; तुज न हें वाटे. ४६
जरि हि पापदेशवासी तरि हि न करी पाप सर्व जन कांहीं;
नित्य खळांत चि असतां साधु खळांच्या गुणा शिकत नाही.
पंकांत पद्म न मळे, काकांच्या दुर्गुणा शिके न पिक,
चंदन परगंध न घे, होय तृणांमाजि तृण चि काय पिक? ४८
मद्देशीं जन असती तैसे नसतील सुर हि वरशील.
यावरि वडवड करितां माझ्या हातें क्षणांत मरशील.' ४९
तेव्हां दुर्योधननृप निजकार्याचा न व्हावया घात,
कर्णासि मित्रभावें वारी, शल्यासि जोडुनीं हात. ५०

---

१. हा अवतरणांकित मंत्र म्हणतां च तो अंगास शिरलेल्या राक्षसास भाजू लागतो. तात्पर्य, राक्षसास हि ज्याच्या नामोच्चारणानें भीति वाटते अशा, अर्थात् अत्यंत नीच अशा लोकांचा तूं राजा आहेस. २ विशेष भय. ३. श्रीहरीच्या यशानें पावन झालेल्यास. ४. अंगदेशांत. ५. पापी. ६. दुसऱ्याचें मर्म. ७. चांगल्या मार्गास लावितात ८. चिखलांत. ९. कोकिळ. १०. धान्याचें पीक. ११. श्रेष्ठ शील (सद्वृत्त) ज्याचें. * आर्या० उ० अ० १२ पहा.

नृप[1]बहुमानें झाले अतिवाद त्यजुनि उपशमा[2] वरिते[3]:
मग, हरिवर करिवरसे, गेले दोघे नरोत्तमावरि[4] ते. ५१

---

# अध्याय तिसावा.

---

कर्ण त्रिदश[5]गुरुमतें रचुनि महाव्यूह तन्मुखीं ठाके.
बार्हस्पत्य[6]व्यूहा पाहुनि बहु धर्मराज तो धाके[7]. १
धर्म म्हणे विजयाला, 'हा व्यूह प्रेक्षितां कि भय वाटे.
न करी कर्ण पराभव ऐसें योजीं, धरूनि नयवाटे[8].' २
अर्जुन म्हणे, 'नृपाळा! या व्यूहाचा प्रधान[9]वध घात:
कर्ण प्रधान त्यातें ध्वंसीन, जसा पयोधरा[10] वात.' ३
भूप म्हणे, 'तूं चि करीं कर्णासीं युद्ध, उद्धरीं[11] कांटा.
भांडो सुयोधनासीं भीम. तयाचा चि तो असे वांटा. ४
सहदेव सौबळासीं[12], वृषसेनासीं हि नकुळ बळशाली
घालोत गांठि; पुष्कळ रिपुरक्तें पाहिजे धरा धाली. ५
समर शतानीक करो दुष्टा दुःशासनासवें आजि:
सात्यकि हार्दिक्यासीं[13], द्रौणीसीं पांड्य ही करू आजि[14]. ६
झगडेन मीं कृपासीं, असती धृतराष्ट्रपुत्र जे शिष्ट[15]
त्यांसीं गांठि शिखंडी घालो, ते द्रौपदेय ही शिष्ट[16].' ७
अमृतरसाची धारा धर्माची श्वेतवाह आज्ञा पी.
होय पुढें, सैन्यांतें 'ऐसें वर्ता' म्हणोनि आज्ञापी. ८

१. दुर्योधनाने केलेल्या गौरवाने. २. शांतीला. ३. स्वीकारित. ४. पुरुषश्रेष्ठ अर्जुनावर. ५. देवगुरु जो बृहस्पति त्याच्या मताप्रमाणे. ६. बृहस्पतीने सांगितलेल्या व्यूहास. ७. भय पावे. ८. न्यायमार्गाला. ९. मुख्याचा (कर्णाचा) वध हा च या व्यूहाचा नाश होय. १०. मेघास. ११. उपटून काढ. १२. शकुनीशीं. १३. कृतवर्म्याशीं. १४. युद्ध. १५. उरलेले; शेष. १६. श्रेष्ठ.

होउनि वाजी वाहे वह्नि जया, ज्यावरि स्वयें पहिला[1]
ब्रह्मा रुद्र हरि वरुण बैसे, रथ तो चि उतरला महिला. ९
त्या दिव्यरथीं बसले, जे पूर्वी[2] बदरिकाश्रमीं वसले;
नरनारायण दिसले, ज्यांचें यश खळमनीं अनादि सले. १०
शल्य म्हणे, 'राधेया! तो येतो जिष्णु विष्णुसमशील,
गरुडीं काळिय तैसा ज्यांवरि तूं कोपगरळ वमशील. ११
कर्णा! पुससी ज्याला आला तो पार्थ दावपावकसा[3];
वधितो मृगांसि हरिसा; सोसिल परांसि तत्प्रभाव कसा? १२
तो ध्वजशिखरीं दिसतो वानरवर शत्रुधैर्यघनवात[4];
न नवा तत्सम झाला लोकीं कपि; करि रवें[5] चि बळघात[6]. १३
चक्रगदाशार्ङ्गदर[7] प्रेक्षीं, तो कृष्णकंठिचा झळके
श्रीकौस्तुभमणि, ज्याच्या दीप्तिपुढें चंद्रसूर्य ही मळके. १४
त्रिजगत्पूजित कूजित[8] गांडीवाचें हि हें शिरे कानीं.
बळ मथिलें बाणानीं दर्शितवज्राहिपातिरेकानीं[9]. १५
वीरशिरप्रकर[10] पहा, कंदुकवृंदाअसा[11] नभीं गमतो;
वरिचेवरि झेलाया तो गृध्रश्येनसंघ ही भ्रमतो. १६
ते भुजदंड सहायुध भूवरि गगनीं उडोनियां गळती;
भुजगभ्रमें भुजांतें कवळुनि घारी हळूहळू पळती. १७
अर्जुनशरप्रहारें गज, वज्रध्वस्तनग तसे, खचले.
पार्थापुढें तसें बळ कर्मविपाकापुढें[12] जसें न चले. १८
खचतो विमानतुल्य स्यंदन कर्णा! पहा अहाहा! रे!
झटती भट तीव्रशरी[13], परि दुर्जय विजय कीं न हा हारे. १९

१. आदिब्रह्मा. २. पूर्वीपासून. ३. वणव्यासारखा. ४. शत्रुधैर्यरूपी मेघाम वायुसारखा. ५. शब्दानें. ६. सैन्याचा नाश. ७. सुदर्शनचक्र, कौमोदकी गदा शार्ङ्गधनुष्य व पांचजन्यशंख. ८. आवाज, शब्द. ९. दाखविले आहे वज्रापेक्षा व शेषापेक्षां आधिक्य ज्यानीं. १०. वीरांच्या शिरांचा ढीग. ११. चेंडूंच्या समुदाया-सारखा. १२. कृतकर्मांच्या परिणामापुढें. १३. तीव्र शर ज्यांजवळ आहेत असे.

सिंहें मृगयूथ तसें व्याकुळ तव सैन्य अर्जुनें केलें.
वाटे पार्थें चि सदा दृढनियमें शंभु पूजिला वेलें. २०
कुरुवीरघनघटांत[1] स्पष्ट विजयभानु लोपला घटिका;
तो ध्वज मात्र दिसतसे; गर्जति, जय मानिती कुरु लटिका.
तो शरपटलपट[2] लया नेउनियां पार्थ जाहला दृश्य.
नाग[3] न शकती तेथें हरिसि कसे कोंडितील हो! ऋश्य[4]? २२
तुजसीं धनंजयासीं गांठि पडाया नको चि बहु वेळ.
पाहीन मीं तयाचा आणि तुझा ही रणांगणीं खेळ. २३
वधिसलि जिष्णुला तरि कर्णा! होसील आमुचा राजा.
परि हें दुर्घट इंद्रा, जरि काय सहाय आणिला आजा[5]. २४
तो आह्वानध्वानें[6] अर्जुन संसप्तकांकडे गेला.
निजनाशार्थ करिकुळें चीत्कार[7] करूनि सिंहसा नेला. २५
दुःसह दुर्जय शिरला, अपथ्यशीळांत[8] रोगसा, पार्थ
संसप्तकांत; करितो क्रीडा त्यांच्या चि घाततापार्थ.' २६
कर्ण म्हणे, 'मद्रेशा! नीट पहा पार्थकेतुचा सेंडा
संसप्तकांत झाला मग्न, जसा सागरोदरीं भेंडा[9]. २७
अज्ञ तपस्वी शिरला[10] विषयांत[11] तपोबळें कधीं न तरे.
संसप्तकांत वांचो, जरि त्यां होईल निजवधीं[12] नत रे!' २८
शल्य म्हणे, "वरुणातें[13] कोण समुद्रोदकांत बुडवील?
विझवील तृणें दहना? अनिळाला करुनि बद्ध तुडवील? २९
प्राशील सप्तसागर[14] कोण? तम्हा अर्जुनासि साहेल

१. कौरववीररूपी मेघसमुदायात. २. बाणसमूहरूप पडदा. ३. हत्ती. ४. काळवीट. (हरिणविशेष). ५. आजेदेव. ६. निमंत्रणशब्दानें. ७ हत्तींचा शब्द. ८. कुपथ्य करणाऱ्यांत. ९. मातीचें ढेंकूळ. १०. शिरलेला. ११. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पंचविषयात. १२. आपला वध करितांना. १३. वरुण हा समुद्राधिपती आहे. १४. क्षार, इक्षु, सुरा, सर्पि ( घृत ), दधि, क्षीर व जल असे सात समुद्र.

ऐसा कोणही नाहीं. काळ हि पार्थाकडे न पाहेल. ३०
क्षिति उचलील भुजांहीं, कांपे जाळील जो प्रजा सर्व,
पाडील देव भूवरि, जिंकील नयासि एक तो शर्व.[१] ३१
तो भीमदहन, व्हावें ज्यांत शलभ आमुच्या अनीकानीं.
अद्यापि असति भरलीं ज्याच्या *तीं दुर्वचें[२] मनीं कानीं. ३२
तो धर्मराज साक्षाद्धर्म पहा रे! पहा महातेजा,
'धन्य' म्हणति राजर्षि ब्रह्मर्षि हि सत्पथीं रहाते ज्या. ३३
[३]अनिळानळसे दुर्जय, माद्रीचे पुत्र नकुळसहदेव,
ते दिसति, ज्यांसि समरीं साहों न समर्थ जिष्णुसह[४] देव. ३४
ते द्रौपदेय दुसरे पांच युवे[५] पांडव प्रतापरवी.
[६]वरवीरमान्य शिक्षा[७] ज्यांची चापश्रुतीमधें[८] बरवी. ३५
तो [९]गुरुशिरःसरोरुहकर्तनपरमोग्रकर्मपटुबाहु
द्रुपदकुमार पुरःसर[१०] धृष्टद्युम्न स्वशत्रुशशिराहु[११]. ३६
जो पार्थधनुःश्रुतिवाग्देवीवरपाणिनिष्ठकीर[१२] चि तो
दिसतो पहा महात्मा स्वजयार्थ व्यूह सात्यकी रचितो." ३७
ऐसें जों कर्णासीं शल्य वदे तों चि शीघ्र त्या सेना
मिळती, मारणमरणाहूनि दुजें अधिक ज्यांसि भासेना. ३८
कुरुपांडवसेनांसीं होतां संग्राम, रामशिष्यमणी
गजयूथावरि हरिसा धांवे, मारी अनेक वीर रणीं. ३९
वधिले प्रभद्रकांचे वीर रणीं सप्तसप्तति[१३] क्रोधें,

१. शिव २. दुर्भाषण. ३. वायु व अग्नि यासारखे. ४. इंद्राग्रह, ५. तरुण ६. श्रेष्ठवीरास मान्य. ७. शिक्षण. ८. धनुर्वेदांत. ९. गुरूचें शिरकमल कापण्याचें अत्यंत भयंकर कर्म करण्यांत कुशल आहे बाहु ज्याचा असा १०. [पांडवसेनेचा] पुढारी. ११. स्वशत्रुरूप चंद्रास राहूसारखा. १२. अर्जुनाच्या धनुर्वेदरूप सरस्वतीच्या मुख्य हस्तावर बसलेला पोपट. १३. सत्याहत्तर.
* द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगीचीं.

दुर्जय संस्कारें जसे विषयांचे आत्मतत्वसद्बोधें. ४०
मग कर्ण पंचविंशति पांड्यभटांचीं शिरोंबुजें छेदी,
भेदी नाराचांहीं हृदयीं, मारी सहस्रशा चेदी. ४१
पांचाळ पाच पाहेल, मग दश वाधल रणांत कर्णानें.
विषवह्निकुंडतुंडव्याळ जसे नखमुखें सुपर्णानें. ४२
रथचक्ररक्षक तयीं कर्णसुत सुषेण सत्यसेन बळी,
वृषसेन पृष्ठगोप्ता शत्रूंची फोडिती क्षणांत फळी. ४३
धृष्टद्युम्न शिखंडी सात्यकि यम भीम चेदि पांचाळ,
पंच प्रतिविंध्यादिक, अन्य हि केकेय मत्स्य भूपाळ; ४४
हे सर्व हि विविधायुधवृष्टि करिति कर्णवीररथरक्षीं,
जेंसे गिरिवरि वर्षति घन, जनमन अनवनज्ञ चि सॅपक्षीं. ४५
तेव्हां सुषेण तोडी भीमाचें चाप बाप रक्षाया,
विंधी सप्तशरांनीं मर्मस्थानीं च युद्धदक्षा या. ४६
भीम इतर धनु सज्युनि, खंडुनि धनु, मार्गणांचिया दशकें
ताडी त्यासि. भिडावें पक्षबळें विपतिसीं कसें मशकें? ४७
कर्णाप्रति त्रिसप्तति बाणांहीं भीम तत्क्षणीं ताडी;
आश्चर्यांत प्रेक्षकसुरमुनिगंधर्वमानसें पाडी. ४८
सोडी दुःसह तापद शर शारदभानुभानुसे, नाचे,
तो भीम प्राण हरी कर्णप्रियसूनुभानुसेनाचे. ४९
चापें खंडुनि भीमें कृप कृतवर्मा हि पीडिला रागें,
दुःशासनासि शासन केलें बाणत्रयें महाभागें. ५०
शकुनि-उलूक-पतत्री दाविति बळ नुरवि भीमपत्री तें,

१. इंद्रियजन्य ज्ञानानें मनावर झालेले परिणाम. २. परमात्म्याच्या स्वरूपज्ञानानें. ३. विषरूप अग्नीचें कुंड हें च ज्यांचें तोंड असे साप. ४. पाठिराखा. ५. नकुळ व सहदेव. ६. सामान्य लोकाचें मन (चित्तवृत्ति). ७. शत्रूंचे ठिकाणीं रक्षण करणें न जाणणारे असे. ८. गरुडाशीं. ९. त्र्याहत्तर. १०. शरदृतूंतील सूर्याच्या किरणांसारखे. ११. पुत्र. १२. या नावाचे वीर (पक्षी) पक्षी. १३. भीमरूप ससाणापक्षी.

ऐसा कोणही नाहीं. काळ हि पार्थाकडे न पाहेल. ३०
क्षिति उचलील भुजांहीं, कोपें जाळील जो प्रजा सर्व,
पाडील देव भूवरि, जिंकील नयासि एक तो शर्व.[1] ३१
तो भीमदहन, व्हावें ज्यांत शलभ आमुच्या अनीकानीं.
अद्यापि असति भरलीं ज्याच्या *तीं दुर्वचें[2] मनीं कानीं. ३२
तो धर्मराज साक्षाद्धर्म पहा रे! पहा महातेजा,
'धन्य' म्हणति राजर्षि ब्रह्मर्षि हि सत्पथीं रहाते ज्या. ३३
[3]अनिळानळसे दुर्जय, माद्रीचे पुत्र नकुळसहदेव,
ते दिसति, ज्यांसि समरीं साहों न समर्थ जिष्णुसह[4] देव. ३४
ते द्रौपदेय दुसरे पांच युवे[5] पांडव प्रतापरवी.
[6]वरवीरमान्य शिक्षा[7] ज्यांची चापश्रुतीमधें[8] बरवी. ३५
तो गुरुशिरःसरोरुहकर्तनपरमोग्रकर्मपटुबाहु[9]
द्रुपदकुमार पुरःसर[10] धृष्टद्युम्न स्वशत्रुशशिराहु.[11] ३६
जो पार्थधनुःश्रुतिवाग्देवीवरपाणिनिष्ठकीर[12] चि तो
दिसतो पहा महात्मा स्वजयार्थ व्यूह सात्यकी रचितो." ३७
ऐसें जों कर्णासीं शल्य वदे तों चि शीघ्र त्या सेना
मिळती, मारणमरणाहूनि दुजें अधिक ज्यांसि भासेना. ३८
कुरुपांडवसेनांसीं होतां संग्राम, रामशिष्यमणी
गजयूथावरि हरिसा धांवे, मारी अनेक वीर रणीं. ३९
वधिले प्रभद्रकांचे वीर रणीं सप्तसप्तति[13] क्रोधें,

१. शिव. २. दुर्भाषणें. ३. वायु व अग्नि यांसारखे. ४. इंद्रासह. ५. तरुण. ६. श्रेष्ठवीरांस मान्य. ७. शिक्षण. ८. धनुर्वेदांत. ९. गुरूचें शिरकमळ कापण्याचें अत्यंत भयंकर कर्म करण्यांत कुशळ आहे बाहु ज्याचा असा १०. [पांडवसेनेचा] पुढारी. ११. स्वशत्रुरूप चंद्रास राहूसारखा. १२. अर्जुनाच्या धनुर्वेदरूप सरस्वतीच्या मुख्य हस्तावर बसलेला पोपट. १३. सत्याहत्तर.
* द्रौपदीवस्त्रहरणप्रसंगींचीं.

दुर्जय संस्कारें[1] जसे विषयांचे आत्मतत्त्वसद्बोधें[2]. ४०
मग कर्ण पंचविंशति पांड्यभटांचीं शिरेंवुजें छेदी,
भेदी नाराचांहीं हृदयीं, मारी सहस्रशा चेदी. ४१
पांचाळ पांच पहिले, मग दश वधिले रणांत कर्णानें.
विषवह्निकुंडतुंडव्याळ[3] जसे नखमुखें सुपर्णानें. ४२
रथचक्ररक्षक तयीं कर्णसुत सुषेण सत्यसेन वळी,
वृषसेन पृष्ठगोप्ता[4] शत्रूंची फोडिती क्षणांत फळी. ४३
धृष्टद्युम्न शिखंडी सात्यकि यम[5] भीम चेदि पांचाळ,
पंच प्रतिविंध्यादिक, अन्य हि कैकेय मत्स्य भूपाळ; ४४
हे सर्व हि विविधायुधवृष्टि करिति कर्णवीररथरक्षीं,
जेंवि गिरिवरि वर्षति घन, जनमन[6] अनवनज्ञ चि सँपक्षीं. ४५
तेव्हां सुषेण तोडी भीमाचें चाप वाप रक्षाया,
विंधी सप्तशरानीं मर्मस्थानीं च युद्धदक्षा या. ४६
भीम इतर धनु सज्युनि, खंडुनि धनु, मार्गणांचिया दशकें
ताडी त्यासि. भिडावें पक्षवळें विपतिसीं[8] कसें मशकें? ४७
कर्णाप्रति त्रिसप्तति[9] बाणाही भीम तत्क्षणीं ताडी;
आश्चर्यांत प्रेक्षकसुरमुनिगंधर्वमानसें पाडी. ४८
सोडी दुःसह तापद शर शारदभानुभानुसे[10], नाचे,
तो भीम प्राण हरी कर्णप्रियसूनु[11]भानुसेनाचे. ४९
चापें खंडुनि भीमें कृप कृतवर्मा हि पीडिला रागें,
दुःशासनासि शासन केलें बाणत्रयें महाभागें. ५०
शकुनि-उलूक[12]-पतत्री दाविति बळ तुरवि भीमपत्री[13] तें,

१. इंद्रियजन्य ज्ञानानें मनावर झालेले परिणाम. २. परमात्म्याच्या स्वरूपज्ञानानें. ३. विषरूप अग्नीचें कुंड हें च ज्याचें तोंड असे साप. ४. पाठिराखा. ५. नकुळ व सहदेव. ६. सामान्य लोकांचें मन (चित्तवृत्ति). ७. शत्रूचे ठिकाणीं रक्षण करणें न जाणणारे असे. ८. गरुडाशीं. ९. त्र्याहत्तर. १०. शरदृतूंतील सूर्याच्या किरणांसारखे. ११. पुत्र. १२. या नावाचे वीर (पक्षी) पक्षी. १३. भीमरूप ससाणापक्षी.

त्यजि न पराभूति खळा, जसि अनसूया[1] त्यजी न अत्रीतें[2]. ५१
भीम 'सुषेण ! हतोऽसि; स्थैर्यं कुरु'[3] हें वदोनि शर सोडी,
तों कर्ण तूर्ण[4] पुत्रप्राणत्राणार्थ बाण तो तोडी. ५२
भीमें पाठविला शर दुसरा हि सुषेणजीवनाचमना,[5]
कर्ण तयास हि खंडी, ये मार्गणफळविघात[6] हा च मना. ५३
वैकर्तन त्रिसप्तति बाणांहीं त्या वृकोदरासि रणीं
व्यापी, अचळासि जसा ग्रीष्मीं रवि तापदायकीं किरणीं. ५४
इतुक्यांत सुषेण बळी सहसा सजुनि स्वचाप नकुळाला
हाणी तीव्रशरानीं, जैसा विषमत्त साप नकुळाला. ५५
कर्णसुताचें प्रेक्षकजनलोचनतृषितभृंगतोयजसें,[7]
युद्ध नकुळसहदेवांसह, देवांदानवांत होय जसें. ५६
सात्यकि वृषसेनाच्या सूतासि वधी, धनुष्य ही मोडी,
घोडी च्यारी मारी, एका चि शरें ध्वजासि ही तोडी. ५७
बाणानीं उर ताडी, मूर्छित पाडी मुहूर्त[8] वृषसेना,
भी सात्यकिला कौरवसेना, व्याघ्रासि जेवि वृषसेना. ५८
सावध होतां धांवे सात्यकिवरि धरुनि शीघ्र तरवारी,
परि खड्गचर्म तोडुनि शैनेय तयासि शीघ्रतर वारी. ५९
विरथा वृषसेनातें दुःशासन आपुल्या रथावरि घे,
मागें पळे जिजीविषु,[9] बाहुबळें क्षुब्धसागरी न रिघे. ६०
अन्यरथीं बैसे, ये वृषसेन पुन्हां सजोनि नाग[10] जसा;
मर्दी पांडवसैन्या, चूर्ण करी वारिरुहवना[11] गजसा. ६१

१. कर्दमऋषी व देवहूति यांची कन्या व अत्रिऋषींची पत्नी. २ ब्रह्मदेवाचा मानसपुत्र. ३. मेलास बघ ! धीटपणानें उभा रहा. ४. त्वरित. ५. सुषेणाच्या प्राणरूप उदकाचें आचमन करण्यासाठीं. ६. बाणापासून होणाऱ्या फलाचा नाश (पक्षीं) भिक्षुकाच्या फळाचा (मनोरथाचा) नाश. ७. पाहणाऱ्या लोकांचे नेत्र हे च तान्हेलेले भ्रमर त्यांस कमळासारखें (युद्ध). ८. दोन घटका. ९. जगण्याची इच्छा करणारा. १०. साप. ११. कमळाच्या वनास.

टाकी शर त्रिसप्तति कृष्णापुत्रांवरि व्यथाकारी;
शर षष्टि भीमसेना, सहदेवाला हि पांच शर मारी. ६२
शर सप्त शतानीका, सात्यकिला पांच, तीस नकुळाला,
अर्पी शिखंडिला दश, शत धर्माला बुधाळिबकुळाला. ६३
यापरि अरिवरि करि वरि खरतरशरवृष्टि, दृष्टि हरि त्यांची;
रक्षी पृष्ठ पित्याचें, रीति मिरवि शुद्धयुद्धकरित्यांची. ६४
दुःशासनासि तेव्हां सात्यकि करि विरथ, आणि आभाळीं
केतू तीन तसे, शर तीन चि रोवी तयाचिया भाळीं. ६५
अन्यरथावरि बैसुनि आला, केला जऱ्ही पराभूत;
दुःशासन न वृषाला सोडी, निधिला जसा बरा भूत. ६६
तेव्हां भीम शिखंडी यम धृष्टद्युम्न सात्यकी धर्म
द्रौपद्यात्मज अन्य हि ताडिति कर्णासि लक्षुनीं मर्म. ६७
एकामें चि अनेकप्राणहरद्वेषिशरमहावृष्टि
कर्णानिळें उडविली, रक्षामंत्रें जसी कुजनदृष्टि. ६८
दशशतबाणानीं तो एकैकातें रणांगणीं हाणी,
न करी च पंक्तिभेद श्रीकर्णाचा उदारवरपाणी. ६९
अरि एक बाण हाणी तों हाणी कर्ण शर तया तिपट;
निपट प्रत्युपकृतिपटु झांकी रिपु पसरुनि स्वहेतिपट. ७०
काढी जोडी ओढी सोडी शर कर्ण, लाघवास्तव तें
न दिसे, दिसे शरासनमंडळ हतशत्रुबळ हि त्याभवतें. ७१
वाडववह्नि अविंधन मग काय अंपांपतींत पोसेना?

१. द्रौपदीच्या पुत्रावर २. साठ. ३ नकुळद्रौपदीपुत्र. ४. सज्जनरूप भ्रमरांस बकुळपुष्पासारख्या अशा. ५. पिछाडी. ६. कर्णाचे. ७. शेंडनक्षत्र. ८. पुरलेल्या द्रव्यास; ठेव्यास. ९. एकदम. १०. कर्णरूप वायुने. ११. रामरक्षादि मंत्राने. १२. फार उदार असा हात. १३. केवळ. १४. आपलें शस्त्ररूपी (बाणरूपी) वस्त्र. १५. चापल्यास्तव. १६. धनुष्यचक्र. १७. मृतशत्रुसैन्य. १८. समुद्रांतील अग्नि. १९. उदक च आहे इंधन (सरपण) ज्याचें तो. २०. समुद्रांत.

सोसेना महि न क्षण. तापवि तेजस्विवर्य तो[1] सेना. ७२
व्यूहीं न शिरों द्यावा म्हणउनि होतीं बळें उभीं दाट,
परि वणव्यासि तृणेंसीं कटकें कर्णासि ओपिती वाट. ७३
सायकघनें[2] खचति रथ, दवदहनें जळति कुंज[3] रानीं कीं
नग अशनिनें विखरिले, जइं शिरला कर्ण कुंजरानीकीं[4]. ७४
वधिले चेदींचे रथ तीनशत क्रूरविक्रमें कर्णें,
शस्त्रें जसीं विखरिलीं न तसीं वर्षांत[5] ही घनें अर्णें[6]. ७५
हरि करिपतिवरि तैसा धर्मावरि कर्ण धांवला; तंव ते
सात्यकिभीमशिखंडिप्रमुख सुभट ठाकले नृपाभवतें[7]. ७६
पांडवभट धर्मातें, कौरवभट रक्षिति स्वबळपातें,
दापिति अन्योन्य बळें वीर, जसे व्याघ्र धेनुकळपातें. ७७
वीरांसि कर्णमार्गण जैसे मल्लांसि मल्ल लोळविती,
प्रियसखसे यमनगरीप्रति रक्तें रंगवूनि वोळविती. ७८
वीर शतसहस्त्रायुत वधिले कर्णें, तथापि कटकांहीं
तो कर्ण रोधिला चि, न जावूं दिधला नृपानिकट कांहीं. ७९
मंत्रौषधक्रियातिग[8] रोग जर्‍हीं रोधिला तर्‍हीं खवळे,
तैसा कर्ण महाबळ रोधूं म्हणती तथापि तो न वळे. ८०
पांचाळपांडुकैकयवीरांनीं रोधिला चमूपाळ[9],
लंघावया शकेना त्यांसि जसा ब्रह्मविज्ञां[10] काळ. ८१
निजबळरुद्धवृषाप्रति धर्म वदे रुक्षः तें तसें चि घडे;
पंजररुद्धव्याघ्राप्रति लोक विशंक मारितात खडे. ८२
धर्म म्हणे, 'रे कर्णा! राधेया! भारताश्रितापसदा[11]!

१. कर्ण. २. बाणरूपी घणांनीं. ३. वेलींची जाळी. ४. गजसमुदायांत. ५. पावसाळ्यांत. ६. उदकें. ७. आपल्या सेनापतीस. ८. मंत्र व औषधक्रिया यांचें उल्लंघन करणारा. ९. [कौरवांचा] सेनापति कर्ण. १०. ब्रह्म जाणणाऱ्या लोकांस. ११. भरतकुलोत्पन्न दुर्योधनाच्या आश्रितांतील नीचा!

जोडिसि निज[1]धर्माश्रयनयलयकर दुर्मतें चि पाप सदा. ८३
स्पर्धा धनंजयासीं करिसी, आम्हासि पीडिसि, छळिसी,
मंद[2]सुयोधनदुर्मतिविषवल्लीसेकमूळ तूं कोळिसी[3]. ८४
दावीं स्वबळपराक्रम, पौरुष पाहों, रहा उभा नीट;
युद्धश्रद्धा हरितों आतां चि रणांगणांत: हो धीट.' ८५
ऐसें वदोनि धर्में शरदशकें कर्ण ताडिला कोपें;
तितुक्यां चि मार्गणांहीं धर्म हि कर्णें कृतार्हतालोपें[4]. ८६
हांसे कर्ण, अवगणी: ते युद्धीं उमजतां निजावज्ञा,
क्षणभरि ही साहेना त्या धर्मात्म्या हि सर्वभावज्ञा. ८७
मग जो तेजें पविरविसम[5], समर्यी शापसापसा[6] परहा[7],
शर सोडिला नृपें, तो गर्जे, जाणों म्हणे 'सपाप रहा[8].' ८८
तो बाण सव्यपार्श्वी[9] कर्णाच्या लागला जसा गोळा*,
मूर्छित पडतां कंठीं तत्पंचप्राण जाहले गोळा. ८९
कर्णाचें तनुधनुसह जेव्हां बळ, अतुळ धैर्य, रक्त, गळे,
प्रियजननयनापासुनि अश्रु हि; झाले चि बाष्परुद्ध[10] गळे. ९०
कौरवकटकीं 'हा! हा!' पांडवसैन्यांत सिंहनाद रणीं,
वृष सावधान झाला क्रुद्ध[11] हि निजशक्तिच्या अनादरणीं[12]. ९१

१. स्वधर्मास (सूतधर्मास) अनुसरून असणाऱ्या नीतीचा नाश करणाऱ्या. २. मंदसुयोधनदुर्मतिरूप विषवल्लीचें सिंचन करण्यास कारण. ३. लहान घागर. ४. धर्मानें आपणावर बाण सोडून दिलेल्या मोठेपणाचा लोप न होऊं देतां, असा भावार्थ. ५. वज्र व रवि यासारखा. ६. शाप व साप यासारखा. ७. शत्रूस मारणारा ८. आपल्या पापासह विश्रांति घे; परलोकास जा. ९. डाव्या बरगडींत. १०. गहिवरानें दाटले. ११. क्रुद्ध हि [झाला]. १२. अपमानाने. * तोफेचा.

# अध्याय एकतिसावा

( कर्णधर्मयुद्ध ).

धर्म वधावा ऐसें चित्तीं चिंतूनि, चाप आकर्ण
ओढी भास्करतनुजनु[1] मनुजवर कृती महामना कर्ण. १
सोडी बाणगण, रणीं झांकी धर्मा, दिवाकरा घनसाः
धर्मशरीरीं जडले शर, कंटक जेंवि सर्वथा पनसा. २
पांचाल्य[2] चंद्रदेव प्रबळ, कुशळ दंडधार दुसरा, हे
प्रख्यात चक्ररक्षक धर्माचे, कर्ण त्यांकडे पाहे. ३
धर्माच्या दों पार्श्वीं दोघे, पूर्णेंदुच्या पुनर्वसुसे[3].
शोभत होते शक्रोभयभागीं संगरीं सखे वसुसे[4]. ४
ते दोघेहीं कर्णें वधिले तेव्हां पृथासुत क्षोभे,
कनकविकृत[5] शर सोडी, दुःसहतेजा खरांशुसा[6] शोभे. ५
त्या कर्णाच्या आंगीं खोवी आपुंख[7] धर्म शर तीस,
परि कर्णशक्ति न दमे; कलहीं कुलटा अजिंक गरतीस. ६
शर ओपिले नृपाळें त्या कर्णा वीरसत्तमा नवती[8],
शल्यास हि त्रिसप्तति[9], तें साधुगुणज्ञ लोक मानवती. ७
कर्णाचे सुत दोघे सुषेण अणि सत्यसेन जे त्यांतें,
नृप तीं तीं विशिखानीं ताडी, प्रबळारिच्या हि जेत्यांतें. ८
कर्णाच्या गोप्त्यांतें[10] प्रत्येक शरत्रयेंचि तो हाणी,
तों तों हांसे गर्वें धर्माला कर्ण सद्धनुष्पाणी[11]. ९
आधीं भल्लें भेदी, षष्टि शरांहीं मग क्षमापाळीं[12];
गर्जे वृष तों चि मिळे पांडूंचा त्यासभोंवता पाळा. १०

१. सूर्यपुत्र कर्ण. २. पांचालदेशाचा. ३. पुनर्वसुनक्षत्रासारखे. ४. अष्टवसूंसारखे. ५. सुवर्णमय. ६. सूर्याप्रमाणें. ७. मुळापर्यंत. ८. नव्वद. ९. ब्याहत्तर. १०. रक्षकांतें. ११. उत्तम धनुष्य आहे हातांत ज्याच्या. १२. धर्मास.

धृष्टद्युम्न शिखंडी सात्यकि यम भीम चेकितान कृती,
शिशुपाळसुत युयुत्सु हि पांड्य द्रुपदात्मजात्मज[1] हि सुकृती;
कारूष मत्स्य कैकय कोशल काशि प्रभद्रक क्षुब्ध
झाले सागरसे, वृषनिधनीं हि, धनीं दरिद्रसे, लुब्ध. १२
पांचाल्यवीर जनमेजयनामा, हे समस्त ही योध
क्रोधनें[2] वृषासि हाणिति; जाणों भट मत्तवृषभ, तो रोध[3]. १३
नाराच[4] वत्सदंत क्षुरप्र नालीक दुःसह विपाट,
मार्गण वराह कर्ण हि वर्षति, न दिसे चि रवि असे दाट. १४
त्या समयीं ब्रह्मास्त्रें सर्वांसि पराभवी अमिततेजा;
पांडव वनांत पेटे दावानळसा चि, कक्ष[5] रिपु ते ज्या. १५
करुनि सहायभटदलन हांसे तो कर्ण, चाप आकर्षी,
सोडी बहु दारुण शर, तेव्हां 'हाहे'[6]ति वदति नाकर्षी[7]. १६
धर्माचें धनु एकें, नवति शरानीं हि तोडिलें कवच,
तेव्हां गगनीं क्षितिवरि न उठे 'हा'वर्णवंध्य[8] एक वच. १७
गळतां कवच नृप दिसे अनिळें घनपटळ उडवितां रविसा;
क्षतकंचुक[9] लेववितो बाणांच्या त्यांसि साध्र[10] च्यार विसां. १८
गळतां कवच नृपति बहु शोभे, अहि जेंवि कंचुकापगमीं[11];
मानीं कल्पांतदहनदग्धवन[12] स्वर्णमय[13] चि तो नग[13] मीं. १९
धर्में पाठविली रिपुमथना सर्वायसी[14] महाशक्ति.
ती जाय जसी कृत्या भृत्यांची[15] सफळ व्हावया भक्ती. २०
कुंतीनंदन चंदन, झाली तत्खंडनक्षणीं[16] जागी,

१. द्रौपदीपुत्र. २. क्रोधाविष्ट. ३. डगर; तट. ४. ह्या सर्व बाणाच्या जाती. ५. गवत. ६. 'हाय हाय' असें. ७. स्वर्गींचे ऋषि. ८. 'हा'वर्णरहित; 'हाय हाय' शब्दाशिवाय. ९. व्रणरूप वस्त्र. १०. अर्धयुक्त चार विसा म्हणजे नव्वद. ११. कात टाकिली असतां. १२. प्रलयकालच्या अग्नीनें दग्ध आहे अरण्य ज्यावरील असा. १३. मेरूपर्वत. १४. लोहमयी. १५. सेवकाची. १६. त्या चंदनवृक्षाचें खडण होतां च.

धावे कर्णावरि भुजशाखेपासूनि, शक्ति ते नागी. २१
तीतें अर्धपथीं च छेदिति शर सूर्यसूनुचे सप्त;
निजशक्ति खंडितां बहु कोपें तो धर्म जाहला तप्त. २२
तोमरचतुष्टयें मग भाळीं बाहुद्वयीं उरीं रिपुला
ताडी पांडव, कोपें, करि समरामाजि गर्जना विपुला. २३
कर्ण क्षतजें न्हाला, त्या काळीं तरुण[1] अरुणसा[1] साजे;
घनसिक्त[2] सनिर्झर[3] पविहत[4] गैरिकें[5] नग न कां तया लाजे? २४
क्रुद्धव्याळप्रतिमें कर्णें ध्वज धर्मसूनुचा[6] भल्लें
भंगुनि, शीघ्र रिचविला, मल्ल चि[7] रंगीं जसा महामल्लें. २५
विंधुनि तीं बाणानीं भूपति, भाते हि तोडिले तूर्ण,
हाणोनि बाण दारुण केला रथ त्या रणांगणीं चूर्ण. २६
गजदंतगर्भवर्णप्रजवसबळकाळवाळहययुक्तीं[8]
स्वरथीं चढोनि राजा धर्म पळे, जो प्रशंसिला मुक्तीं[9]. २७
धाकें धर्म पळाला हरि[10] हरिनें, शंभु कीं वृकें[11] पिटिला;
कर्ण धराया धावे, जेंवि हिरण्याक्ष[12] त्या महाकिटिला. २८
गांठुनि धर्म, स्कंधीं स्पर्शे निजशुद्धिकाम[13] कर्ण करें
मत्स्यध्वजकूर्मांबुजवज्रच्छत्रांकुशादिलक्ष्मधरें[14]. २९
इच्छी धरावया तों कर्णमनातें पृथोक्त[15] आठव दे,

---

१. बालरवीप्रमाणे (लाल). २. मेघांनीं सिंचन केलेला. ३. झरे वाहत असलेला. ४. वज्रानें हनन पावलेला ५. कावेचा. ६. यमधर्मपुत्राचा. ७. तालिमखान्यात. ८. हस्तिदंताच्या गाभ्यासारखे शुभ्र, वेगवान, बळकट व काळ्या केसांचे असे घोडे ज्या रथास आहेत अशा. ९. जीवन्मुक्तांनीं, १०. पारिजातहरणप्रसंगीं झालेल्या युद्धात कृष्णानें इंद्र पिटाळून लाविला होता. ११ वृकासुरानें. (भस्मासुरानें). १२. हा हिरण्यकशिपूचा भाऊ पृथ्वीला पीडा देऊं लागला असता विष्णूनें वराहावतार घेऊन त्याला मारिले. १३. [धर्मस्पर्शानें] आपली शुद्धि करूं इच्छिणारा. १४. इत्यादि चिन्हें धारण करणाऱ्या (करानें). १५. कुंतीचें भाषण. ( आर्या० उद्योग० अ० ११ वा पहा ).

शल्य हि समयोचितहितधर्म, नया नार्पितां चि पाठ, वदे. ३०
' कर्णा ! सावध सावध, हा वध रोंव धरितां तुझा करितो,
बा ! घात, हात हा तव, व्हाया, चक्षुर्विषाहिला धरितो. ३१
तीव्रतपोनिधि राजा, हा जाळील क्षणांत राधेया !
आधेयां[3] तूळाला[4] शुचिसा[5], तुजला[6], न काळ बाधे यां[6]. ३२
उग्र तपोनिधि राजा त्र्यंबकसा[7], कामसाम्य तुज आहे,
स्त्रीस हि तुझ्या रतीचें, जरि कोपें तुजकडे नृपति पाहे.' ३३
हांसत हांसत तो वृष बोले, 'जन्मोनि शुद्धसंतानीं[9],
कोण पळेल क्षत्रिय, धर्मी शिक्षित असोनि संतांनीं[10] ? ३४
कां पळसी मरणभयें ? होतां हांसें कशास वांचावें ?
सांचावें लज्जेचें ओझें माथां, सदैव कांचावें[11] ? ३५
युद्धीं परमार्थ[12] मिळे निश्चित मरणें, पलायनें तोटा;
हें जाणोनि पळे तो मातेच्या रोग पातला पोटा. ३६
न क्षत्रधर्मकुशळ, ब्राह्मणधर्मप्रवीण तूं सौम्य;
वाटे पढवी उचित स्वाध्याय[13] मखक्रिया[14] चि तो धौम्य[15]. ३७
कुंतीसुता ! इतःपर युद्ध करायासि गांठि वीरांसीं
घालूं नको नको चि ! स्पर्धा हि करूं नको चि धीरांसीं. ३८
आम्हां वीरांप्रति तूं यावरि अप्रिय वदों नको लेश,
वनकोलयूथनाथें[16] जिंकावा केंवि यज्ञकोलेश[17] ? ३९
यावें महारणाप्रति न पुन्हां, हा रंग वीरमल्लांचा;

१. नीतीला पाठ न दाखविता; न्यायानें. २. हा धर्मराज. ३. वर ठेविलेल्या. ४. कापसाला. ५. अग्नीप्रमाणे ६. काळ तुजला बाधे, या (धर्मास) न बाधे. ७. त्रिनेत्र शिवासारखा. ८ मदनाची बरोबरी. ९. उत्तम वंशात. १० [द्रोण, धौम्य कृप इत्यादि] सज्जनांनी स्वधर्माचे शिक्षण दिले असून. ११. भीतीने कृश व्हावें. १२. मोक्ष. १३. वेद. १४. यज्ञयागादि क्रिया. १५. पांडवांचा पुरोहित. १६. रानडुकराच्या कळपाच्या पुढाऱ्यानें. १७. यज्ञवराह.

येथें न कुश[1] स्रुक्[2] स्रुव[3]; संभार[4] असे गदासिभल्लांचा.[5] ४०
जा, गा मद्दानगुणा[6]; दिधलें तुज जीवदान; जा, जा, गा!.
जागा दारुनि केल्या हरि, वांचाया नसे गजा जागा.' ४१
ऐसें वदोनि कर्णें सांपडला धर्म सोडिला राया!
मग पांडिली तयाची सेना पूर्वीं जसी च तज्जाया[7]. ४२
अरिहरिपासुनि सुटतां करि करिभूपति[8] पलायन त्वरित;
स्मरलें सुरांसि तेव्हां काळयवनभीतशौरिचें[9] चरित. ४३
राज्यामागें सात्यकि यम[10] भीम द्रौपदेय ही पळती,
जाणों कर्णदवशरज्वालावलयांत[11] ते करी जळती! ४४
'श्रुतकीर्तिच्या रथावरि धर्म चढे; मग म्हणे स्ववीरांतें,
'मागें फिरा फिरा हो! उचित पलायन नव्हे चि धीरांतें. ४५
आला कीं कर्ण बळी, जैसा अनिवार्य कर्मपरिपाक,[12]
कोठें पळाल? अरि हरि होती, पळणार होति करिपाक[13]. ४६
आलीं कौरवकटकें, आला राधेय हा पहा पाठीं,
पिटितो आम्हांसि, जसा गोप पशूतें धरूनियां काठी. ४७
सारे मिळोनि मारा कर्णातें. काय पाहतां? मुरडा[14].
भाजा प्रतापदहनीं, खळबळ हो घस्मरांतका[15] हुरडा.' ४८
भीमप्रमुख महारथ मग मागें मुरडले प्रकंपनसे[16];

१. दर्भ. २. होमकुंडांत तूप ओतण्याचें पात्र. ३. तूप घेण्याचें पात्र. ४. समूह. ५. गदा, खड्ग व बाण यांचा. ६. जीवदान दिल्याच्या माझ्या दातृत्वगुणास गा. ७. त्याची स्त्री; द्रौपदी. ८. गजसमान राजा धर्म. ९. काळयवनास भ्यालेल्या कृष्णाचें. (काळयवन हा यादवावर चालून आला असता, याचा युक्तिबलाने च नाश केला पाहिजे असें जाणून कृष्ण पळत सुटला व एका पर्वतदरींत मुचकुंदराजा निजला होता त्याचे अंगावर आपलें उपवस्त्र टाकून आपण लपून बसला; पाठलाग करीत आलेल्या यवनानें कृष्ण च समजून मुचुकुंदाला लाथ मारली असतां तो जागा झाला व त्याने कोपानें नेत्र उघडल्यामुळे यवन भस्म झाला). १०. नकुलसहदेव. ११. कर्णरूपी दवाग्नीच्या शररूप ज्वालांच्या घेऱ्यांत. १२. केल्या कर्माचा परिणाम. १३. गजशावक. १४. परत फिरा. १५. खादाड काळास. १६. महावातासारखे.

घनसे कौरव झाले, मरणभयें एक ही सकंप नसे. ४९
विहरति ते कृतवैर स्वैर रिपुवळीं, शिखी[1] जसे विजनीं[2],
नाचति भटनट, कटकेंट[3] कटकयुगीं[4] होय हो! यशस्विजनीं. ५०
सांगावें काय? किती? झालें मोटें चि त्या रणीं खणकें[5].
उठलीं बहुत कबंधें; गणिले मृतवीर काळसद्गणकें[6]. ५१
अभिमुखहतांसि[7] घेती स्वविमानीं अप्सरा सरागमती[8];
तें पाहुनि भट झटती मरणीं च; रणीं वश स्मरा[9] गमती! ५२
हतनरतुरगगजांच्या रक्ताची गुरुतरंगिणी[10] वाहे,
साक्षात् सरस्वती[11] ती, स्वर्ग जन जिच्या निमज्जनें लाहे. ५३
रक्तनदीच्या स्नानें पानें गंधें हि वीर ते भुलले,
दिसती वसंतसमयीं किंशुकतरु[12] कटककाननीं फुलले. ५४
कौरवकटक पराङ्मुख केलें भीमादिकीं, पळे, न टिके:
झाले भग्न रणीं *ते, जैसे न्यायीं खऱ्यापुढें लटिके. ५५
जरि हि दुर्योधन वारी, न फिरति मागें भयाकुळें कटकें.
उपदेशें कार्य नव्हे, घडतें काळें चि कार्य तें घटकें[13]. ५६

# अध्याय बत्तिसावा.

## ( भीमकर्णयुद्ध ).

सौबळ शकुनि महाबळ कौरवभट दंडताडिताहि[14] तसे[14]
रागें मागें फिरले, भासति दुर्योधनासि जे हितसे. १

१. मोर. २. एकांतस्थळीं. ३. शस्त्रध्वनि. ४. उभय सैन्यांत. ५. तुमुल युद्ध. ६. मृत्युरूपी चांगल्या मोजणाराने. (मोठा संहार झाला. असा भाव). ७. शत्रुस तोंड देऊन लढत असतां मेलेल्यास. ८. प्रीतियुक्त बुद्धि ज्यांची अशा. ९. मदनास. १०. मोठी नदी. ११. ह्या नदीचा वर्ण तांबडा असल्यामुळे उपमेय. १२. पळसाचे वृक्ष. १३. घडवून आणणाऱ्या. १४. काठीने डवचलेल्या सर्पाप्रमाणे. * ते कौरववीर (?).

भीमावरि कौरवभट उठतां प्रेरी वृष स्वसूतातें,[1]
जैसा पुरदहनोद्यत[2] हर हरिनाभ्यंबुजप्रसूतातें.[3] २
राधेय आपणावरि येतो जाणोनि, भीम रायाचें
रक्षण सात्यकिधृष्टद्युम्नां सांगे रणीं करायाचें. ३
'पूर्वीं शिवप्रसादें काळापासूनि विप्र[4] तो सुटला;
संप्रति कर्णापासुनि नृपें.[5] नवल घट न महोपळीं[6] फुटला. ४
न्यां रक्षाया दिधला तुमच्या हातीं युधिष्ठिरन्यास,[7]
कर्ण-दरवडा न पडो: भीना मीं तस्करा तदन्यास. ५
मारीन आजि कर्णा किंवा मारील तो रणांत मला:
आम्हीं देखत असतां अस्मद्गुरु धर्म दीनसा गमला. ६
एवं वदोनि सात्यकिधृष्टद्युम्नांसि धर्म तो निरवी.
भीम वृषाप्रति गेला, तुहिननगाप्रति[9] जसा तपोनि रवी. ७
शल्य म्हणे, 'आला रे! आला कालानलप्रबळ[10] भीम;
भी मन काळाचें ही; यास प्रतिमल्ल[11] एक बळभीम.[12] ८
बहुकाळसंचितोग्रक्रोधगरळ[13] तुजवरी च ओकाया
हा भीमभुजग आला; सावध हो; देख तेजओका[14] या.' ९
कर्ण म्हणे, 'मद्रेशा! सत्य चि वदतोसि, भीम हा साचा
घेईल सूड समरीं, आम्हीं केल्या महोपहासाचा.[15] १०
हा वीर धीर कोपी प्रबळ, नसे यासि चाड देहाची.
चौघांहूनि शतगुण[16] प्रीति द्रुपदात्मजेसि दे हा चि. ११

१. आपल्या सारथ्यास; शल्यास. २. त्रिपुराचा नाश करण्यास उद्युक्त झालेला. ३. हरीच्या नाभिकमलापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवास. ४. मार्कंडेय. ५. धर्म ६. मोठ्या दगडावर. ७. धर्मरूप ठेवा. ८. स्वाधीन करी. ९. हिमाचलास. १०. प्रलयकालीन अग्नीप्रमाणें बलवान्-भयंकर. ११. जोडीदार; जोड. १२ मारुति. १३. पुष्कळ काळपर्यंत सांठवून ठेविलेलें भयंकर कोपरूप विष. १४ तेजसां ओको-निवासस्तेजस्वी-**पंत.** १५. अत्यंत उपमर्दाचा. १६. शंभरपट.

कीचकं नीच कलुषमतिरत शतं,[1] न तसें अशोभन[2] गरांत,[3]
अज्ञातवास करितां येणें वधिले विराटनगरांत. १२
खळबककिर्मीरजरासंधहिडिंबघ्न हा, न भी मरणीं;
हा दंडधरयमासीं भांडेल गदा धरूनि भीम रणीं. १३
याला वधीन किंवा विरथ तरी मीं करीन कोपार्थ:[4]
याच्या कैवारें तरि मजसीं घालील गांठि तो पार्थ.' १४
शल्य म्हणे, 'न वदें बहु, आधीं भीमासि चाल वाराया.'[5]
कर्ण म्हणे, 'तुज सागर भासे, मज भीम कालवा राया! १५
स्नेहें[6] लालन[7] केलें, माथां धरिला[8] हि मलिन[9] वक्र[10] कच.[11]
तव शब्द तसा भेदी हृदय, न दारुण असा नव क्रकच.[12] १६
कर्णें रणी धनंजय कीं कर्ण धनंजयें वधावा, हे
आहे खरी प्रतिज्ञा; न फिरे; उलटी न निम्नगा[13] वाहे. १७
युद्धीं च मन असों दे; सत्वर रथ ने वृकोदरानिकट,
चाल, पहा होइल तें; त्यास चि सधना धनाधिसा[14] चिकट.' १८
पांडवकर्णसमागमसमयीं बहुसाल[15] वाजलीं तूर्यें;[16]
न[17] दिसे, जाणों निजमुख शरपटलपटें[18] चि झांकिलें सूर्यें. १९
भीमातें नाराचें ताडी कर्ण स्तनांतरीं आधीं;
मग बुडवि शरसमुद्रीं, कपि[19] गिरितें[20] जेंवि दुस्तरागाधीं.[21] २०

१. कीचक व उपकीचक मिळून. २. वाईट. ३. विषात. ४. [अर्जुनास] राग आणण्यासाठी. ५. निवारण्यास. ६. प्रेमानें (पक्षी) तेलानें. ७. सगोपन. ८. डोक्यावर वाढविला (पक्षी) फार गौरविला. ९. काळा (पक्षी) पापी. १०. वाकडा (पक्षी) कुटिलस्वभावाचा. ११. केश. (श्लेषानें हे गीत्यर्ध शल्यास लागू पडतें). १२. करवत. १३. नदी. १४. द्रव्याचे चिंतप्रमाणें. १५. नानाप्रकारचीं. १६. वाद्यें. १७. मूळांत या चरणापुढें च १९ चा आकडा घालून पुढील पाठांतर लिहिलें आहे—**शरपटळें न दिसे कीं स्वमुख पटें भिउनि झांकिलें सूर्यें! १९.** १८. बाणरूप वस्त्राच्या पडद्यानें. १९. मारुति. २०. मैनाकपर्वतास. २१. तरण्यास अशक्य अशा समुद्रांत.'

भीम हि ह्मांकीं कर्णा बाणपटें, तत्तनूंत[1] नव रोप
खोवी; तो वीरमणी स्वमनीं तेव्हां धरी अमित कोप. २१
तोडुनि धनु, भीमाच्या खर नाराच स्तनांतरीं हाणी;
वल्मीकांत भुजगसा, शिरला तो तूर्ण तत्तनुत्राणीं. २२
दुसरें सुदृढ शरासन घेउनि करि सज्य भीम मग राया!
ताडी बहु बाणांहीं उग्रा कुरुवाहिनीस्थमगरा[2] या. २३
भीमासि पंचविंशति बाणांहीं तेधवां अशुल्कांहीं[3]
ताडी राधेय, जसा मदमत्तद्विपपतीस[4] उल्कांहीं[5]. २४
जोडी भीम धनुगुणीं, कर्णवधेच्छा धरूनि मनिं, रोप;
[6]अर्जुनभाग स्मरतां भंगार्थ[7] चि दे, वधार्थ न, निरोप. २५
गुण, शर, कर[8] हे गेले धर्मज्ञ गुरूक्तिसेवनप्रवणा[9],
[10]स्वप्रभुसंकल्पद्वयसिद्धांत पुसावयास चि, श्रवणा. २६
जो वध तो चि पराभव, रिपुभंगें प्रभुनियोगसिद्धि[11] घडे,
ऐसें बहुधा कर्णें[12] कथितां कर्णी विशंक बाण पडे. २७
तो शर शिरे शरीरीं सारीच्या[13] शिखरिच्या[14] जसा अशनी[15],
न शनि क्रूर अहिपति[16] हि, रत ते स्नेहामृतीं[17] न असृगशनीं[18]. २८
झाला वृष तनुभंगें हततेज न हें[19] नृपा! गमो; त्यातें
शररचितक्षत[20] भूषणहेतु, जसा रंध्रयोगें[21] मोत्यातें. २९

---

१. त्या भीमाच्या कवचांत. २. कौरवरूप नदींत भ्रमणाऱ्या सुसरीस. ३ अमूल्य अशा. ४. मदानें माजलेल्या हस्तिश्रेष्ठास. ५. ज्वालांनीं, मशालींनीं. ६. कर्ण हा अर्जुनाचा वाटा आहे हें. ७. पराभव करण्यासाठीं. ८. धनुष्याची दोरी, बाण आणि हात. ९. [आपला] स्वामी जो भीम त्याचें वचन ऐकण्याविषयीं तत्पर अशा कर्णास. १०. कर्णाचा पराभव करणें किंवा त्याला मारणें या भीमाच्या संकल्पद्वयापैकीं निश्चित विचार कोणता हें. ११. [आपला] प्रभु भीम त्याच्या आज्ञेची सिद्धि. १२. कानानें. १३. कर्णाच्या. १४. पर्वताचा. १५. वज्र. १६. वासुकी. १७. तेल (पक्षीं) अमृत याचे ठायीं. १८. रक्तपानीं. १९. असें. २०. शरांनीं केलेलें क्षत. २१. रंध्राची (वेजाची) प्राप्ति.

पळवी शल्यः इतरथा[1] होता तेव्हां चि कर्ण मरत रणीं;'
तरणी[2] तमांत[3] झाला संज्ञन[4], न पिता[5] सहस्रकर तरणी. ३०
नसतां गोप[6] जसा दे व्याघ्र पशूंच्या भयास कळपाला,
कीं वायु ने दिगंतीं वृक्षच्युत वाळला सकळ पाला, ३१
तैसा भीम कुरुबळ त्रासी, मार्गी, दिगंतरीं पळवी,
ऐसें असुरबळमथन शक्रें केलें असें जना कळवी. ३२
भीमा वागाया कुरुपति धाडी बंधु पंधराः ज्याला
भी गज, हरिला शश किति? दे सुत सुतशोक अंधराज्याला.
नंदोपनंद, विकट, क्राथसह विवित्सु मारिले सा हेः
उरले नव हि पळाले; यमदंडा कोण हो! वळी साहे? ३४
सावध होतां कर्ण हि गांठी भीमासि तधवाः त्यांहीं[7]
शरवृष्टिहीं उडविलीं वळें, तृणें जेंवि उग्रवात्याहीं[8]. ३५
लोक म्हणति, 'दारुण रणः नेणों होईल आजि काय कसें?
दोघे ही प्रबळ, हठीः दिसतें हें युद्ध भीतिदायकसें.' ३६
झांकी भीम वृषातें, रवितें घन जेंवि आपुल्या पटळें;
भीमासि कर्ण ताडी नव भल्लांहीं म्हणे, 'रणीं न टळें[9].' ३७
विंधी सप्त शरानीं त्यासि पुन्हां भीम, तो हि भीमातें,
आच्छादी बाणपटें भीम हि त्याः न धरि युद्ध सीमा तें. ३८
मग कंकपत्रदशकें[10] ताडुनि पार्था[11], तदीय कोदंड
कर्ण छेदी भल्लें, तें भासे मृत्युचा चि तो दंड. ३९
तेव्हां कोपें कार्तस्वरपट्टविभूषितोग्रपरिघातें[12]

---

१. नाहीं तर. २. नौका. ३. सकटान—संकटसागरात ४. शल्य. ५ पिता सहस्रकर (सूर्य) [नावाचा] तरणी; [पण] तरणी—नौका झाला नाही. ६. गुराखा. ७. कर्णभीमानी. ८. प्रचंड वावटळीनीं. ९. पळून जाऊं नको १०. कंकपक्ष्याच्या पिसानीं युक्त असलेल्या दहा बाणानीं. ११. भीमा. १२. सुवर्णाच्या पट्ट्यानीं शोभिवंत अशा भयंकर परिघास.

भीम प्रेषी, व्हाया पांचाळीशोकशांति[1] अरिघातें.[2] ४०
कर्ण प्रखरतरशरव्रातें छेदी पळांत परिघास;
आलीकडे चि रक्षा होय, न पडतां हि वह्निवरि घास.[3] ४१
केलें सज्य दुजें धनु मनुजेंद्रें,[4] तीव्र शर शरामागें
सोडूनि भीमसेनें वृष वृषभस्कंध झांकिला रागें. ४२
मग कर्ण कर्णमूळीं ताडी बाणत्रयें पृथाज्याला,
करितां प्रतिकारा जो समरीं भागेल तो वृथा ज्याला.[5] ४३
पांडव सोडी खर शर शरदर्ककरप्रभ[6] स्वरिपुघाता;
वातासम जँव[7] दावी, समर्यी यमसा चि जाहला जाता. ४४
तो कर्णाचें आर्धी कवच शरीर हि सुपुंख[8] शर महिला
भेदीः भोगवतीप्रति जाय चि जाणों भजोनि परमहिला[9]! ४५
जेव्हां असें महाबळ भीम शरें दिनकरांगजा[10] ताडी.
तद्वेदना वृषातें क्षणभरि मोही, जसी गजा ताडी.[11] ४६
क्षितिकंपें[12] पर्वतसा, स्वल्प चि तो प्रथम पांडुसुतरोपें
कांपे कर्ण महाबळ, मग पुष्कळ आलिया प्रबळकोपें. ४७
नाराच पंचविंशति कर्णें, काळें स्वकीय सेवकसे,
भीमाप्रति पाठवितां सुर भीति, न भीति मर्त्यदेव[13] कसे? ४८
बाणामागुनि बाण प्रेषी, करि रिक्त कर्ण शत भाते;
अद्भुत शोभा पावे रविची तत्सुतशरोपहत[14] भा[15] ते. ४९
शर सोडिले त्वरेनें समरीं वृषकेतुच्या[16] असे तातें;
झांकिति भीमा देवद्विजप्रिया, शलभ जेंवि सेतातें. ५०

१. द्रौपदीदुःखनिवारण. २. शत्रूच्या (कर्णाच्या) नाशानें. ३. गवत. ४. मानवश्रेष्ठ भीमानें. ५. जगला. ६. शरदृतूंतील सूर्यकिरणाप्रमाणें कांतियुक्त. ७. वेग. ८. चांगल्या मुळाचा ९. परस्त्री. (पृथ्वीरूप परस्त्रीस बाणानें स्पर्श केल्यामुळें त्या पापक्षालनार्थ तो जणु काय पातालगंगेंत स्नानास च गेला). १०. सूर्यपुत्र कर्ण. ११. मद्यविशेष. १२. भूकंपानें. १३. नरदेव, राजे. १४. त्या सूर्यपुत्राच्या शरानी नाश पावलेली अशी. १५. ती कांति. १६. या नांवाच्या कर्णपुत्राच्या.

छेदी एकैकशरें ध्वज, सारथिमूर्ध[1], चाप तो कर्ण,
विरथ करी भीमातें, होय रणीं 'जय महेश गोकर्णे!'[2] ५१
हांसे भीम मनिं म्हणे, 'जरि नसता कर्ण जिष्णुचा वांटा,
कां टाकितों सुयश? कां गुरुहृदयांतिल[3] न काढितों कांटा?
या कुरुसेनापतिच्यादेखत मर्दीन आजि कुरुसेना,
दयिता[4] प्रसन्न होइल मजवरि अणि जिष्णुचें धनु रुसेना.' ५३

---

# अध्याय तेतिसावा.

(अर्जुनसंसप्तकयुद्ध).

ऐसें मनांत आणुनि पांडव टाकी उडी रथावरुनीं,
दयितेची, मूर्तिमती, कुरुहननाशा[5], गदा करी धरुनीं. १
त्या श्रीमद्भीमाची हृत करि हरिभटमर्दा[6] गदाचंडी,
खंडी बळ बहु कांपवि; पडली जाणों सुदुःसहा थंडी. २
कुरुसेनेसीं घाली जेव्हां समरांगणीं गदा फुगडी,
तें काळदृष्टि झडकरि पक्ष्मकपाटें[7] पहावया उघडी. ३
गज सार्धसप्तशत[8] त्या समरीं वधिले वृकोदरें सगदें[9];
नग देवेंवरें[10] वज्रें मथिले, कीं गद[11] चिकित्सकें[12] अगदें[13]. ४
मारुतिनें[14] रथ शतशा, शतशा सादी[15] हि, पत्ति ही शतशा
मारुनि, रक्तें तटिनी भरिल्या; उदकें हि वारिदें[16] न तशा. ५
तापविलें बळ सूर्यें भीमें हि, जसें हुताशनीं[17] चर्म;

---

१. सारथ्याचे मस्तक. २. 'हर हर महादेव!' असा जयशब्द झाला. ३. धर्मराजाच्या मनांतील. ४. भार्या, द्रौपदी. ५. कौरवाना ठार मारण्याची आशा. ६. सिंहाप्रमाणे शूर असलेल्या वीराच्या गर्वास. ७. पापण्यारूप कवाडें. ८. साडेसातशे. ९. गदायुक्त अशा. १०. इंद्रानें. ११. रोग. १२. वैद्यानें. १३. औषधानें. १४. भीमानें. १५. घोडेस्वार. १६. मेघानें. १७. अग्नीमध्यें.

पावे संकोच तसें, भक्तिज्ञानोदयीं जसें कर्म. ६
अनिळें जलदपटळसें, भीमबळें शत्रुसैन्य तें वितुळे;
एका ही सिंहासीं मदमत्त हि हस्तियूथ कैंवि तुळे? ७
भंगुनि खळबळ, चढला मग भीम रथीं वृषाकडे जाया;
तों कर्ण हि, गजपतिला हरिसा, गांठी युधिष्ठिरा राया! ८
बाणांहीं धर्मातें झांकी, हयरश्मिचाळका मारी,
भीम वृषावरि ये, विधिवरि जैसा भूतपाळ कामारी. ९
मागूनि भीम हाणी बाणानीं कर्ण तेधवां परते;
शर तेजस्वी सोडी; पडती पार्थीं बहु व्यथाकर ते. १०
भीमासीं वृष झगडे, तों सात्यकि त्यासि शरगणें ताडी;
तन्हि तो कर्ण न मुरडे; बहु सायकवृष्टि पांडवीं पाडी. ११
कृतवर्मा कृप शकुनि द्रोणात्मज हे वृषासि रक्षाया
रण करिति पांडवांसीं, जैसे हरि करिवरांसि भक्षाया. १२
प्रवरभट परतले हें कळतां कुरुसैन्य ही पुन्हां परते;
देवासुरसे करिती कुरुपांडव युद्ध कीर्तितत्पर ते. १३
उठलीं अमित कबंधें, रक्ताच्या वाहिल्या असीम नद्या;
तन्हि भट म्हणति परस्पर 'हूं! हाणा; घ्या; यशोरसीं मन द्या.'
कौसुंभरंगरंजितवस्त्रानें शोभती जसी महिला.
हतकटकरक्तरंगें आली शोभा तसी रणी महिला. १५
संसप्तकवीरांचे पावति सु-गति-द-रणांत असु शर्मा;
पार्थहरिपुढें गमला शशासम, परि धरि भयासि न सुशर्मा. १६
वधी दश बाणानीं पार्थाला, तदनु तत्सहायाला,

१. कर्मठपण. २. बरोबरी पावे. ३. ब्रह्मदेवानें सरस्वती उत्पन्न केल्यानंतर ब्रह्मदेवाला च तिच्याविषयीं पापवासना उत्पन्न झाली; या बाबतींत शंकरांनीं ब्रह्मदेवाचा मोड करून त्रिशूळानें त्याचें एक शिर छेदून टाकिलें व त्याला चतुर्मुख केलें, अशी कथा आहे. ४. मोठे योद्धे. ५. कुसुंब्याच्या रंगानें रंगविलेल्या (तांबड्या) वस्त्रानें. ६. स्त्री. ७. संसप्तकविशेष. ८ त्यानंतर. ९. कृष्णाला.

दक्षभुजीं तीं बाणीं ताडी; प्रभु भील कां सहायाला? १७
एकें भल्लें ताडी केतूतें तेधवां कपी कोपे,
गर्जे: त्या नादानें सेनेची स्मृति महाभयें लोपे. १८
ती सेना निश्चेष्टा होय, न धृति मानसीं टिके कांहीं;
कपिच्या हाकांहीं भी, जसि भुजगी मत्तकेकिकेकांहीं. १९
कपिरवराहूपशमीं सावध तेजस्विवीररवि झाले,
जेंवि घनाच्या सरिनें क्षण शमले दाववह्नि न विझाले. २०
तो एकदा चि कोपें संसप्तकयोधसंघ करि लगट,
जाणों बळकल्पांतोदधि विजयाचळवरासि करिल गट! २१
भस्म चि करि, परि पडती ज्वलदनलावरि पतंगसे भट.ते,
झाले यक्षहतकृपणसम शरहत निधिसमार्जुना झटते. २२
कोण्ही ईषा, कोण्हीं हयरथचक्रें, मुकुंदभुज धरिती:
बुडतां भवांत तारकगुरुसेत्ववलंब साधु ते करिती. २३
कोण्ही वीर रथावरि चढले, जडले चि, ओढिती तनुतें,
धनुतें घ्याया झोंबति, परि भय धरिलें न भूतिकांतनुतें. २४
सुगतिद वदान्यवर नरनारायण दीनबंधु सांपडले;
म्हणउनि काय तयांच्या ते सद्गतिकाम भट गळां पडले! २५
चावावा दहनाचा आत्मविनाशार्थ गांधिलीं काय.
शशकें कधीं तरी हरिमांसें पुष्ट्यर्थ रांधिलीं काय? २६
निजनाशार्थ चि पडले भट कृष्णांच्या गळां, न तन्नाशा:

१. उजव्या बाहुवर. २. ध्वजास. ३. मारुति. ४. मत्तमयूरशब्दांनीं. ५. कपिध्वनिरूप राहूचें उपशमन झाल्यावर. ६. सैन्यरूपी कल्पान्तसमुद्र. ७. अर्जुन हा च कोणी पर्वतश्रेष्ठ त्यास. ८. ज्वालायुक्त अशा अग्नीवर. ९. द्रव्यावरील सर्पापासून मार खाल्लेल्या कृपणासारखे. १०. धुरी. ११. तारणाऱ्या मोठ्या सेतूचा आश्रय. १२. भिडले १३. लक्ष्मीकांतानें स्तुति केली आहे ज्याची अशा अर्जुनाने. १४. सद्गति इच्छिणारे. १५. गांधिलमाशांनीं. १६. देह. १७. शिजविलीं.

मरांते ज्वरार्त, न जगति, पूरवितां दुग्धसर्पिरन्नाशा. २७
जैसा मत्तमतंगज झाडुनियां देह हस्तिपक पाडी,
तैसा कृष्ण हि निजभुजसक्त सुभट पाडितां स्वभुज झाडी.
निजभुंज झाडुनि उडवी संसप्तक शूरसूनुसुत दूर,
वाटे नक्र तटीं तो टाकी क्षुब्धार्ककन्यकापूर. २९
पार्थ हि रथातळीं निजतेजें सकळ स्वशत्रुभट लोटी,
स्वर्गाखालें ढकली शक्र जसा वेचतां सुकृतकोटी. ३०
ज्याचा नामोच्चारणनादप्रतिशब्द नागपां शासी,
कैसा वश होइल तो गरुड महाभाग नागपाशासी? ३१
जाळिति धनंजयाच्या शस्त्रज्वाळा अरातिकक्षातें;
रिपुबळ जिंकील कसें परमेश्वरमान्ययुद्धदक्षातें? ३२
जरि होति कोळसे परि धनंजयीं पडति डोळसेना कीं:
येथें रजीं रक्तीं वपु, तदधिक सुरतांत घोळसे नाकीं. ३३
संसप्तक भट वधिले असिनालीकादिकीं च जवळील:
दूरील हि दव कवळी, जवळील तृणांसि कां न कवळील? ३४
पार्थ म्हणे, 'कृष्णा! हा ऐसा रथबंध कोण साहेल?
दारुणकर्मखळबळव्यसनीं जीवंत कोण राहेल? ३५
तुझिया प्रसादपात्रें पार्थें चि स्वयश रक्षिलें आजि,
शक्र हि, गमे, श्रमेल चि करितां संसप्तकांसवें आजि. ३६
वधिले बहु; परि मागें पद हि न ठेविति, जसे वनीं डांस;
झोंबति तुझ्या भुज्यांस हि योगिमनोराजहंसनीडांस.' ३७

१. दूध व तूप यानीं युक्त असलेल्या अन्नाची इच्छा. २. महात. ३. शरीचा मुलगा जो वसुदेव त्याचा पुत्र श्रीकृष्ण. ४. खवळलेली सूर्यकन्या जी यमुनानदी तिचा पूर. ५. शेषास. ६. शासन करी. ७. शत्रुरूप गवतास. ८. शंकरास मान्य असणाऱ्या रणनिपुण अर्जुनास. ९. टोळसेना (?). १०. युद्धांत. ११. धुळींत. १२. अप्सरांच्या. १३. बाणविशेषानीं. १४. रथाचा कोंडमारा. १५. भयंकर कर्म करणाऱ्या दुष्ट सैन्यात. १६. योगिमनोरूपी राजहंसाच्या घरट्यांस.

ऐसें वदोनि पार्थें त्या समयीं देवदत्त वाजविला;
कृष्णें हि पांचजन्यध्वनिनें ब्रह्मांडगोळ गाजविला. ३८
त्यां शंखांच्या नादें, जेंवि अयश्चुंबकाचळें लोह,
हरिलें संसप्तकबळधैर्य, सकल सैन्य पावलें मोह. ३९
रिपुवीरपाद्बंधन करि नर योजूनि नागपाशास्त्र;
समयीं स्फुरे चि गुरुनें जें कथिलें, करुनियां कृपा, शास्त्र. ४०
खळसेना निश्चेष्टा केली बांधोनियां तिचे पायः
काय यशःपय द्याया बांधियली फार मारकी गाय! ४१
अहिपाशें रिपुसेना बांधुनि विवशा करी असी तोः हें
उचित चि; कीं, कर्मफळद परमेश्वर सृष्टि बांधितो मोहें. ४२
तो पादबंध उचित चिः कीं, निर्मर्याद रिपु गळां पडती.
जाणों स्वाधर्माची देती येथें चि वीर ते झडती! ४३
बांधोनि पाय पांडव हाणी रिपुवाहिनीसि बाणकशा;
जाणों म्हणे, 'पुराणा गुरुसि बळें आजि झोंबलांत कशा?' ४४
तेव्हां वीर सुशर्मा सौपर्णास्त्रें करूनि शर भारी,
सोडी, तों अमित गरुड झाले अहिपाशनाशकर भारी. ४५
गेले गरुडत्रासें भुजग दिगंतीं पळोनि वेगानें,

१. लोहचुंबकाच्या पर्वताने. २. यशोरूप दूध. ३. या आर्येवरील पुढील पाठांतर कवीनें मूळात च–बहुधा नजरचुकीने–धावता क्रमाक टाकून लिहिले आहे.

खळसेना निश्चेष्टा केली च यशोर्थ बांधुनीं पाय,
दुग्धार्थ बद्ध करिजे गोपें जासि फार मारकी गाय. ४२

४. या हि आर्येवरील पाठांतर धावताच क्रमांक घालून लिहिले आहे.

दारुण कर्म, अहितबळ अहिपाशें दृढ निबद्ध करितो, हें.
विश्व जसें कर्मफलद परमेश्वर बांधितो सुदृढ मोहें. ४४

५. शत्रुसेनेस. ६. बाणरूपी चाबुक. ७. पुराणपुरुष श्रीकृष्णास. ८. गरुडास्त्रानें. ९. अभिमंत्रित करी. १०. प्रभाहर–पंत.

मरति ज्वरार्त, न जगति, पूरवितां दुग्ध[1]सर्पिरन्नाशा. २७
जैसा मत्तमतंगज झाडुनियां देह हस्तिपक[2] पाडी,
तैसा कृष्ण हि निजभुजसक्त सुभट पाडितां स्वभुज झाडी.
निजभुज झाडुनि उडवी संसप्तक शूर[3]सूनुसुत दूर,
वाटे नक्र तटीं तो टाकी क्षुब्धा[4]र्ककन्यकापूर. २९
पार्थ हि रथातळीं निजतेजें सकळ स्वशत्रुभट लोटी,
स्वर्गाखालें ढकली शक्र जसा वेचतां सुकृतकोटी. ३०
ज्याचा नामोच्चारणनादप्रतिशब्द नागपां[5] शासी,[6]
कैसा वश होइल तो गरुड महाभाग नागपाशासी? ३१
जाळिति धनंजयाच्या शस्त्रज्वाळा अरातिकक्षातें[7]:
रिपुबळ जिंकील कसें परमेश्वरमान्ययुद्धदक्षातें[8]? ३२
जरि होति कोळसे परि धनंजयीं पडति डोळसेना[9] कीं:
येथें[10] रजीं[11] रक्तीं वपु, तदधिक सुरतांत[12] घोळसे नाकीं. ३३
संसप्तक भट वधिले असिनालीकादिकीं[13] च जवळील:
दूरील हि दव कवळी, जवळील तृणांसि कां न कवळील? ३४
पार्थ म्हणे, 'कृष्णा! हा ऐसा रथबंध[14] कोण साहेल?
दारुणकर्मखळबळव्यसनीं[15] जीवंत कोण राहेल? ३५
तुझिया प्रसादपात्रें पार्थें चि स्वयश रक्षिलें आजि,
शक्र हि, गमे, श्रमेल चि करितां संसप्तकांसवें आजि. ३६
वधिले बहु; परि मागें पद हि न ठेविति, जसे वनीं डांस;
झोंबति तुज्या भुज्यांस हि योगिमनोराजहंसनीडांस[16].' ३७

१. दुध व तूप यानीं युक्त असलेल्या अन्नाची इच्छा. २. महात. ३. शूराचा मुलगा जो वसुदेव त्याचा पुत्र श्रीकृष्ण. ४. खवळलेली सूर्यकन्या जी यमुनानदी तिचा पूर. ५. शेषास. ६. शासन करी. ७. शत्रुरूप गवतास. ८. शंकरास मान्य असणाऱ्या रणनिपुण अर्जुनास. ९. टोळसेना (?). १०. युद्धांत. ११. धुळींत. १२. अप्सरांच्या. १३. बाणविशेषानीं. १४. रथाचा कोंडमारा. १५. भयंकर कर्म करणाऱ्या दुष्ट सैन्यात. १६. योगिमनोरूपी राजहंसांच्या घरट्यांस.

ऐसें वदोनि पार्थें त्या समयीं देवदत्त वाजविला;
कृष्णें हि पांचजन्यध्वनिनें ब्रह्मांडगोळ गाजविला. ३८
त्यां शंखांच्या नादें, जेंवि अयश्चुंबकाचळें[1] लोह,
हरिलें संसप्तकबळधैर्य, सकल सैन्य पावलें मोह. ३९
रिपुवीरपादबंधन करि नर योजूनि नागपाशास्त्र;
समयीं स्फुरे चि गुरुनें जें कथिलें, करुनियां कृपा, शास्त्र. ४०
खळसेना निश्चेष्टा केली बांधोनियां तिचे पायः
काय यशःपय[2] घ्याया बांधियली फार मारकी गाय[3]! ४१
अहिपाशें[4] रिपुसेना बांधुनि विवशा करी असी तो; हें
उचित चि; कीं, कर्मफळद परमेश्वर सृष्टि बांधितो मोहें.' ४२
तो पादबंध उचित चिः कीं, निर्मर्याद रिपु गळां पडती.
जाणों स्वाधर्माची देती येथें चि वीर ते झडती! ४३
बांधोनि पाय पांडव हाणी रिपुवाहिनींसि[5] बाणकशा[6];
जाणों म्हणे, 'पुराणा गुरुसि[7] बळें आजि झोंबलांत कशा?' ४४
तेव्हां वीर सुशर्मा सौपर्णास्त्रें[8] करूनि[9] शर भारी,
सोडी, तों अमित गरुड झाले अहिपाशनाशकर[10] भारी. ४५
गेले गरुडत्रासें भुजग दिगंतीं पळोनि वेगानें,

१. लोहचुंबकाच्या पर्वताने. २. यशोरूप दूध. ३. या आर्येवरील पुढील पाठांतर कवीने मूळात च—बहुधा नजरचुकीने—धावता क्रमाक टाकून लिहिले आहे.

**खळसेना निश्चेष्टा केली च यशोर्थ बांधुनीं पाय,**
**दुग्धार्थ बद्ध करिजे गोपें जासि फार मारकी गाय. ४२**

४. या हि आर्येवरील पाठांतर धावताच क्रमांक घालून लिहिले आहे.

**दारुण कर्म, अहितबळ अहिपाशें दृढ निबद्ध करितो, हें.**
**विश्व जसें कर्मफलद परमेश्वर बांधितो सुदृढ मोहें. ४४**

५. शत्रुसेनेस. ६. बाणरूपी चाबुक. ७. पुराणपुरुष श्रीकृष्णास. ८. गरुडास्त्रानें. ९. अभिमंत्रित करी. १०. प्रभाकर—पंत.

अहिकृतताप जसा भवताप अजित[1]कीर्तिच्या निवे गानें. ४६
भक्षिति गरुड, पळति अहि, महि[2]सहित हि अहित[3] कांपती धाकें,
पक्षिपपक्षपवनरयें[4] भय दे, 'जय देव!' म्हणितलें नाकें[5]. ४७
गेले नाग हि, गरुड हि, संसप्तकसैन्य जाहलें मुक्त;
होय पुन्हा नरनारायण जिंकायासि संगरोद्युक्त. ४८
झांकी संसप्तककृतनानाविधशस्त्रवृष्टि वासविला,
भासविला हाकानीं जय, तरि भीना चि वाघ आसविला. ४९
नेदी आंगा लागों, छेदी शस्त्रें, उरःस्थळीं भेदी,
ते दीन श्रांत म्हणुनि दे दीर्घस्वाप[6] नर धनुर्वेदी. ५०
तेव्हां वीर सुशर्मा हाणी शर जिष्णुच्या सकवचोरा[7];
पार्थाचें मन त्याला लाभे जैसें निधानें[8] नव चोरा. ५१
सुदृढा हि उरा फाडी तीक्ष्णेषु, जसी महोपळा[9] टांकी;
दुःसहशर[10]प्रहारव्यथितमना पार्थ लोचनें झांकी. ५२
'मेला अर्जुन! मेला! झाला जय!' म्हणति, गर्जती कटकें;
वाद्यें वाजविति सुखें; न गमे स्वप्नांत जोडिलें लटकें. ५३
अर्जुन सावध झाला संसप्तकवाद्यसिंहनादानीं;
कीं हरि करिनादानीं खवळे, पन्नग[11] जसा धनादानीं[12]. ५४
ऐंद्रास्त्रातें ऐंद्रि[13] प्रकट करी, तों असंख्य शर वीतें;
तें सर्व हि कर[14] जिंकी; भी बाणाश्रित तमिस्र[15] न रवीतें. ५५
चवदा सहस्र सादी[16], गज तीन सहस्र, रथ सहस्र दश,
वधिले पार्थें; तेव्हां म्हणति तयाला 'भला! भला!' त्रिदश[17].
तरिहि पार्थासि न सेना त्यजिति, मधुहरासि जेंवि सरघाली[18],

---

१. विष्णूच्या नामसंकीर्तनानें. २. पृथ्वीसहित. ३. दुष्ट लोक. ४. गरुडाच्या पंखाच्या वायूचा वेग. ५. स्वर्गस्थानीं. ६. दीर्घनिद्रा. ( मृत्यु ). ७. कवचासह उराला. ८. नवीन ठेवा. ९. मोठ्या दगडास. १०. हे पार्थाचें विशेषण. ११. भुजंग. १२. द्रव्य काढतेवेळीं. १३. इंद्रपुत्र अर्जुन. १४. किरण. १५. अंधकार. १६. घोडेस्वार. १७. देव. १८. मधमाशांचा समुदाय.

जो तो विजयीं सायकवृष्टि, नगीं मेघ जेंवि क्रूर घाली. ५७
शकुनि-उलूक-सुयोधन-कृतवर्मा-द्रौणि-कर्ण-कृप-योध
संसप्तकसेनेला बळ देति. जसे नदीस सुपयोद[1]. ५८

# अध्याय चौतिसावा.

सृंजय वधितां, केला विरथ शिखंडी कृपें सचर्मासि[2]:
धांवे आचार्यावरि[3] तो आपुलिया स्मरोनि धर्मासि[4]. १
मंत्रें भूत तसा तो त्या विप्रें सायकोत्करें[5] खिळिला,
झाला निश्चेष्ट, जसा क्षुधिताजगरें बळाढ्य ही गिळिला[6]. २
धृष्टद्युम्न कृपावरि धांवे, हार्दिक्य[7] तो तया[8] अडवी:
सायकजाळामध्यें कृतवर्मा त्या महारथा दडवी. ३
पार्षत कृतवर्म्याचें छेदुनि शरजाळ, सारथी वधुनी,
कुरुबळ मथितां निर्मी रक्ताची, ती भरे अतीव, धुनी[9]. ४
मग चित्रकेतुचा सुत वीर सुकेतु स्वयें कृपाचार्या
वारी; पळे शिखंडी; आला प्राणांत्ययीं[10] भला कार्या. ५
वधिला सुकेतु विप्रें[11], भग्नगजसहाय[12] गज जसा हरिनें,
अरि नेले चि दिगंतीं आचार्यें, दैत्यभट जसे हरिनें. ६
धर्म कृपावरि उठला, त्यावरि गुरुपुत्र धांवला यमसा,
सेना नृपा न सोडी, जेंवि प्राचेतसाश्रमा[13] तमसा[14]. ७
करि शरवितान[15] गगनीं; कोण न त्या द्रौणिलाघवा[16] लाजे?

१. चांगला मेघ. २. ढालतरवार जवळ असलेला. ३. कृपाचार्यावर. ४. क्षत्रियधर्मास. ५. बाणसमूहानें. ६. गिळिलेला. ७. कृतवर्मा. ८. धृष्टद्युम्न. ९. नदी. १०. मरणकालीं. ११. कृपाचार्यानें. १२. पराभूत झालेल्या हत्तीच्या सहायास आलेला. १३. वाल्मीकीच्या आश्रमास. १४. तमसानदी. १५. बाणांचें छत. १६. अश्वत्थाम्याच्या हस्तकौशल्यास.

'धन्य' म्हणति सुरमुनिजन, धाले पाहोनि राघवाला जे. ८
सात्यकि युधिष्ठिरप्रभु पांचाळ द्रौपदेय हे, त्यातें,
पीडिति शस्त्रांहीं, निजवीर्यें आप्तांसि तापदे त्यातें. ९
शैनेयादिभटांतें ताडुनि तो द्रौणि धन्व धर्माचें
तोडी, सोडी बहु शर, करि भेदन कवचगुप्तमर्माचें. १०
तों अश्वत्थाम्याचें सात्यकिनें चाप खंडिलें क्षिप्र,
तेव्हां शैनेयाच्या सूताला शक्तिनें वधी विप्र. ११
घेउनि धनुष्य दुसरें, सोडुनि शर सात्यकीस झांकि रणीं,
मध्याह्नीं सूर्य जसा प्रळयीं रविकांतसन्नगा किरणीं. १२
सात्यकि धीर धरी, परि हरि धरिति न धीर एक ही पळ ते;
पावे अंता यंता म्हणउनियां स्वैर जाहले पळते. १३
धर्माज्ञेनें धावति धर्माचे त्या द्विजावरि पुरोग;
परि न गणिले चि तेणें, पथ्यैकपरें जसे स्वरिपु रोग. १४
नाचे अश्वत्थामा, धर्मपुरोगांसि पाहतां हांसे;
टाकी त्यावरि असुहर शर, यम जैसे गतायुवरि फांसे. १५
प्रेरिति शरगण धृतिहृतिदक्ष पृथासूनुचे पुरोगम जे,
झाले विफळ गुरुसुतीं, रंभेचे श्रीशुकीं जसे गमजे. १६
द्रौणिप्रतापतपनें तापविलें सैन्य दैन्य घे, न धजे;
कांपति भट, हटकोनि क्षम हरिचा ही करावया वध जे. १७
बळ झांकिलें समस्त हि धर्माचें द्रौणिनें शरवितानीं,
द्विजविशिखवृष्टिनीं भट वरिले, हरिहर जसे सुकवितानीं. १८
हयरथगजांवरूनि क्षितिवरि बळशालि वीर बहु खचले;

१. चिलखतानें आच्छादिलेल्या मर्मस्थानाचें. २. आयुधविशेषानें. ३. सूर्यकांताच्या चांगल्या पर्वतास. ४. घोडे. ५. सारथि. ६. अग्रेसर. ७. पथ्यानें च राहणारानें. ८. प्राण हरण करणारे. ९. आयुष्य संपलेल्यावर. १०. धैर्य हरण करण्यांत दक्ष. ११. धर्मराजाचे. १२. तापविलेलें. १३. समर्थ. १४. हरीचा. १५. अश्वत्थाम्याच्या शरवृष्टीनीं. १६. वश केले.

द्रौणिपुढें धर्माचें बळ, सबळा[1] विधिंपुढें तसें न चले. १९
द्रोणप्रियशिष्य नृप क्षोभोनि द्रौणिला म्हणे, "गुरुजा[2] !
कुरु ज्या दुर्मतिला वश तूं हि तिला, बरि न हे, जसी कुरुजा[3].
तुज 'गुरु' म्हणतों आम्हीं, परि तूं अस्नेह अकृप अकृतज्ञ.
गुरुमत जतन करिति जे त्यांला चि 'सुपुत्र' म्हणति जन तज्ज्ञ.
मजला चि वधूं पाहसि पुरुषव्याघ्रा ! स्वसिक्तशुचितरुची[4]
शास्त्रज्ञमता रक्षा बरि, न, प्राकृतमतें[5], न उचितरुची. २२
अध्ययन दान तप हें विप्राचें कर्म वेदसिद्ध; रणीं
लववावें धनु, धर्में रक्षावी क्षत्रियें सदा धरणी. २३
तें निजकर्म त्यजिलें, धरिलें त्वां चाप पाप जोडाया,
तूं ब्राह्मणब्रुव[6] ध्रुव[7], वर्तसि सुखहेतुसेतु मोडाया. २४
परधर्मस्वीकारें, तूं निजधर्माचिया परित्यागें,
मज विप्राधम गमसी, प्रणतजनपराभवें[8] हि अत्यागें. २५
तूं ब्रह्मबंधु[9] धर्मभ्रष्ट कसें रक्षिसील पाहेन,
मारीन कौरवांतें, तुजदेखत मीं जयासि लाहेन[10]." २६
धर्माचें वचन असें परिसे गुरुपुत्र साधुमानद तो,
चित्तांत म्हणे, 'सत्य चि धर्मज्ञ अजातशत्रु हा वदतो.' २७
उत्तर न दे चि, करि शरवृष्टि यथापूर्व, जीन्हि[11] खिजे पार्थ[12];
वृष्टि करी च, न राहे, प्रावृड्घन[13] जेंवि जरि भिजे सार्थ[14]. २८

१. बलवत्तर दैवापुढें. २. गुरुपुत्रा ! ३. वाईट रोग. ४. स्वसिक्तशुचितरुची ( आपण सिंचन करून पोसलेल्या चांगल्या वृक्षाची ) शास्त्रज्ञमता ( पंडितास संमत अशी ) रक्षा ( रक्षण ) बरी; प्राकृतमतें [ जी ] रक्षा ( राख-भस्म ) [ ती ] न-ते-संस्कृतसंधिनियमाप्रमाणे 'ते' चा 'त' झाला-( तुला ) उचितरुचि ( अभिलाष करण्यास योग्य ) न. ५. भस्मासि रक्षा म्हणतात-**पंत.** ६. नावाचा ब्राह्मण. ७. खरोखर. ८. मोठ्या अपराधानें. ९. ब्राह्मणाधम. १०. पावेन. ११ चिडे. १२. धर्म. १३. पावसाळ्यांतील मेघ. १४. व्यापाऱ्यांचा समुदाय.

असुहरखरतरशरधरगुरुपुत्रा धर्म पाठि दे, चुकवी;
दे, फटकाळा काळा टाळा, पाळावया नया, सुकवी. २९
कुरुपतिहित गुरुसुत करि परिभव, परि नृप न कुरुकटक रक्षी,
गृहरक्षणा विझवितां उदकें स्नेहाग्नि जेंवि गृह भक्षी. ३०
पांचाळचेदिकेकयबळवेष्टित भीम वारिला कर्णें,
शर सोडिले तयावरि गिरिवरि जैसीं पयोधरें अर्णें. ३१
कर्णापुढोनि तेव्हां समर न करितां चि वीर भीम निघे;
त्यजि जिष्णुभाग म्हणउनि, म्हणति अतत्त्वज्ञ लोक 'भी मनिं घे.'
कुरुकटकांत वृकोदर शिरला संसप्तकांत तो जिष्णु,
पांचाळांत वृष, जसा दितिकुळजांत स्वयें महाविष्णु. ३३
क्षत्रियहरिणकुळांवरि हननार्थ चि ते चित्तें सकोप निघे
सोडूनि, हतशतातें सेवाया काय काळ तो पति घे! ३४
कुरुपति यमासि पीडी, पीडिति कुरुपतिसि यम हि, तें वारी
धृष्टद्युम्न नृपाला, माद्रेयांचा समर्थ कैवारी. ३५
केला विरथ सुयोधन, तें पळवी दंडधार नृप त्याला;
पार्षतभग्नसुयोधन मांत्रिकपरिभूतभूतसम झाला. ३६
तो पांचाळावरि नृप धांवे, अहिवरि सकोप मुंगससा;
भी बळ परिसुनि वृषधनुनाद जसा सिंहनाद तुंग ससा. ३७
पार्षतकर्णसमागम उग्रग्रहसंगमासम चि वाटे,
कुरुपांडुवाहिनीशतजीवन बहुतेक तेधवां आटे. ३८

१. दुष्ट अश्वा. २. नीतीला. (धोरणाला). ३. तेलानें उत्पन्न झालेला अग्नि. (पेटलेलें तेल विझविण्यासाठीं पाणी ओतलें असतां अधिक च भडका होतो). ४. उदकें. ५. दैत्यकुळांत. ६. चित्तें. ७. तो काळपति ( यम ) तें निघे चित्तें सोडूनि हतशतातें सेवाया घे काय [ असें वाटे ]. ८. नकुळसहदेवास. ९. धृष्टद्युम्नाकडून पराभव पावलेला दुर्योधन. १०. कर्णधनुष्याचा शब्द. ११. उच्च; मोठा. १२. सामना. १३ क्रूर ग्रहांच्या युतीप्रमाणें. १४. कौरवपांडवसेनारूपी शेंकडों नद्यांचे पाणी.

वृषचापाचे नाद चि दुःसह: जो भटसमूह ऐके यां
तो मोहे चि: न मोहिति शर कां पांचाळचेदिकेकयां? ३९
गुरु कुरुपितामह नृप हि बहु होते वीरवर, परंतु तिहीं
केलें न वृष जसें करि कर्म, स्तुत तें सुरासुरस्तुतिहीं.' ४०
भीमें कुरुबळ मथिलें जऱ्हि केलें गुरुसुतादिकीं जतनः
हत नष्ट रुद्ररोपें होय जसें दक्षमखमहायतन. ४१

## अध्याय पस्तिसावा.

संसप्तकांत तेज प्रकट करिति जिष्णुचे हि बहुत भुजः
समरीं भटांसि तेसें मृगांसि उर्वी वनांत न हुतभुज. १
पार्थ मुकुंदासि म्हणे, 'संसप्तक मारिले पहा कृष्णा!
कृष्णादेवीची जसि तसि पुरवाया स्वभूमिची तृष्णा. २
शतशाहतशात्रवनवरक्तासवपान करुनि महि माजो,
देवसभा ही सेउनि तव दासाचा विचित्र महिमा जो. ३
यमदूत, दोष, विघ्न त्वत्कीर्तनरवभयें जसे पळती,
तेसे चि मद्धनुर्ध्वनिभीत भट क्षिप्र पळति, तो गळती. ४
कर्णाचा गजकक्षध्वज दिसतो आमुच्या बळांत चि तो,
पुरुषव्याघ्रप्राया वीरांचे राशि संगरीं रचितो. ५
चाल सख्या! हरि! सत्वर तेथें ने तन्निवारणार्थ मलाः
यम लाजो तव दासा, वाटे वृष काळ पांडवां गमला. ६
विधिहत राज्यच्युत जऱ्हि तऱ्हि केले त्वां चि सत्य पांडवसेः

१. द्रोण. २. भीष्म. ३. दक्षप्रजापतीच्या यज्ञाचें मोठें स्थान. ४. अग्नि. ५. द्रौपदीची. ६. इच्छा ७. शेकडों मरण पावलेल्या शत्रुसमुदायाचें नूतनरक्तरूपी मद्याचें प्राशन. ८. स्वर्ग. ९. माझ्या धनुष्याच्या टणत्कारानें भ्यालेले. १०. हत्तींच्या सांखळदंडाच्या चिन्हानें युक्त असा ध्वज. ११. दैवहीन.

काय अशक्य तुज विभो!? सत्तेंत तुझ्या त्रि सत्यपांड वसे. ७
कर्णातें साहेसा न दुजा मजवेगळा तुला कळतें.
अद्भुत तेज जयाचें, भस्म चि केलें असेल गा! बळ तें. ८
वर्जुनि वृषासि मज निजकटकीं च प्रथम ने. प्रभो! अथवा
माने तें करि; यूथप तूं यूथशिवज्ञ, तज्ञ मीं, न थवा.' ९
सुस्मितमुख सुखसागर कृष्ण म्हणे, 'प्रथम कौरवांत शिरें:
कांपों दे देवांचीं त्वद्भुजगुणगानगौरवांत शिरें.' १०
ऐसें वदोनि हरिनें हरिवर ते प्रेरिले अरिबळांत;
वायूनीं घन तैसे अश्वानीं उधळिले रिपु पळांत. ११
दीपपथ जसा तिमिरें, सोडिति कटकें रथप्रवेशपथः
न टिकति रिपु जिष्णुपुढें, जसे दिव्यापुढें कुडे शपथ. १२
तो दुष्प्रेक्ष्य स्यंदन अहितां, घूकद्विजां जसा तरणी.
शर ते किरणसम, गमति, तमसम रिपुः होय तद्विघात रणीं.
दुर्योधन पुनरपि ते संसप्तक अर्जुनावरि प्रेषी,
धांवति हरिप्रियावरि, यज्ञावरि जेंवि निर्जरद्वेषी. १४
चौदा सहस्र सादी, रथ एक सहस्र, तीनशें हत्ती,
श्रीमत्पार्थरथावरि दोनशत सहस्र धांवले पत्ती. १५
त्यांहीं शरवृष्टि तशी केली गोवर्धनीं हि न घनाहीं:
परि शस्त्रवर्ष पार्थीं आत्मज्ञीं जेंवि होय अघ नाहीं. १६
रिपुसेनाशर विजयीं जयद चि आशीःप्रयुक्तअक्षतसे,
मोहिति न उर्वशीचे जेंवि कटाक्ष प्रमोहदक्ष तसे. १७

१. ब्रह्मांड. २. मोडून. ३. तुला वाटेल ते. ४. समूहाचा स्वामी. ५ समूहाचे हित कशात आहे हे जाणणारा. ६. मी ते जाणणारा आहे, पण हा सर्व समूह तसा नाहीं. ७. डोलू दे. ८. श्रेष्ठ घोडे. ९. तप्त तेलात टाकलेले पदार्थ काढणे वगैरे दिव्य करण्याचे वेळीं. १०. खोट्या शपथा. ११. पाहण्यास कठिण असा. १२. घुबडपक्ष्यास १३. देवाचा द्वेष करणारे. १४. शस्त्राचा पाऊस. १५. आत्मस्वरूप जाणणाऱ्याच्या ठायीं. १६. आशीर्वादयुक्त मंत्राक्षतेप्रमाणे. १७. मोह पाडण्यात प्रवीण.

दक्षकृतगर्हणा[1] जसि गिरिशें तसि अर्जुनें स्वरिपुसेना
उग्रा हि साहिली; कीं, सद्यश धृति टाकिल्यावरि पुसेना. १८
हरिनामबळें न गणि प्रह्लाद विपत्तिला, अरिचमूला
गांडीवबळें पार्थ हि; पावे ती च स्वयें लय समूला[2]. १९
तों द्रौणि अर्जुनावरि हरिवरि हरि जेंवि ये रण कराया;
सोडी शर, तद्गणनीं कुशळ नसे गर्ग[3] ही गणक राया! २०
विप्रव्याघ्रभयें ती पांडवपृतना पळे जसी हरिणी;
हें ही स्वल्प चि तच्छरहरिलक्षें[4] लक्षिली चमूकरिणी[5]. २१
निश्चेष्ट कृष्ण केले, मेलेसे लेखिले चि लेखगणें[6]:
न नगे ज्ञानिमनीं त्या धैर्यें प्राकृतजनीं कसे तगणें? २२
गोप्ते[7] चराचराचे गिळिले गुरुसुतशरव्रजाजगरें:
बहु मोह पावले, सुर असुर नर हि जेंवि सर्पराजगरें[8]. २३
'हा! हा!' म्हणति मुनीश हि, महि कांपे, भूमि होय हततेजा;
तो तो भ्रमे चि, दिसले जेंवि रवींदु ग्रहास्यगत[9] ते ज्या. २४
गुरुसुत खरशरपूरीं बुडवुनि गांडीवपाणि[10] अरिपाणी[11],
अरिवदनींचें तें किति? सुरवदनींचें हि सर्व हरि पाणीं*. २५
वर्णूं शरवृष्टि कशी? पाडी बहुदाट अंधकारा ती,
वाटे न द्विज, करि, तो, विश्वासि सपाट, अंधकाराती. २६
कृष्ण म्हणे, 'तापवितो प्रळयीं लोका जसा रवि, प्रबळ
पार्थ तसा चि अरिजना, परि दिसतें आज सार[12] विप्रबळ[13].' २७
द्विज वर्धमान[14] केवळ पार्थसखा हीयमान[15] हें पाहे,

१. दक्षप्रजापतीनें केलेली निंदा. २ संपूर्ण. ३ ज्योतिषशास्त्रज्ञ ऋषि. ४. त्याचे बाणरूपी सिंहाच्या लक्षानें—लक्षावधिसिंहांनीं. ५. सेनारूप हस्तिनी. ६. देवगणांनीं. ७. रक्षक. ८. शेषाच्या विषानें. (समुद्रमथनाचे वेळीं). ९ ग्रहाच्या (केतु-राहूच्या) मुखांत गेलेले. १०. अर्जुन. ११. चक्रपाणि, कृष्ण १२. उत्तम, श्रेष्ठ. १३. अश्वत्थाम्याचें बळ. १४. वाढत आहे तेज ज्याचें. १५. तेज कमी होत आहे ज्याचें असा. * पाणी

क्षोभे स्वभक्तवत्सळ देव, न निजदासदुर्दशा साहे. २८
पाहे त्या विप्रा प्रभु जैसा कीं पुष्पसायका पुरहाः
तेव्हां वाटे होइल देवदृगग्नींत काय कापुरु हा! २९.
विजयास हि क्षणक्षण पाहे प्रणयें. खिजे, मुरारि पुसे,
'पार्था! गमतों आम्ही प्रिय किंवा या धरासुरा रिपुसे? ३०
खेळसि कीं तूं भांडसि? आहे बळ तव भुजांत कीं नाहीं?
चाप असे कीं त्यजिलें बाहूंनीं शक्तिधैर्यहीनाहीं? ३१
आहेसि कीं रथावरि? निजला नाहींस कीं? रणाजिर हें,
न गृहः न पर्यंक हि, हा रथः सुख येथें निजेंचिया विरहें. ३२
गुरुसुत म्हणोनि मानिसि, करिसि उपेक्षाः परंतु हा काळ
नोहे चि उपेक्षेचाः बंधु न हा, क्षोभला महाकाळ.' ३३
पार्थ प्रताप दावि स्वीकारुनि विष्णुचा सुबोध मनें.
जाणों प्रदीप्त केला पवमानें मंद वह्नि तो धमनें. ३४
धनु खंडी, ध्वज तोडी, छत्र छेदी सुवत्सदंतानीं:
मग शत्रु जत्रुदेशीं ताडी, गाया प्रताप संतानीं. ३५
मूर्छित होय द्रौणी, ध्वजयष्टि धरी, म्हणोनि सूतानें
विप्र क्षिप्र पळविला, मंत्रक्षत जेंवि भूत भूतानें. ३६
करि हरिसख मखदमनासम समरीं कर्म, गुरुसुता पळवी,
पळ वीर धीर न धरिति, तुरंति तृणें ज्यांत शुचि इनोपळ वी.
भीमें कौरव मथिले, संसप्तक मारिले नरें अजितें,
वधिले पांचाळ नृप, वीरनिधन मज न सांगवे अजि! तें. ३८

१. मदनास. २. शंकर. ३. कृष्णाच्या दृष्टिरूप अग्नींत. ४. चिडे. ५. ब्राह्मणास. (अश्वत्थाम्यास). ६. रणांगण. ७. वायूनें. ८. फुंकण्यानें. ९. वत्सदंत नावाच्या उत्तम बाणांनीं. १०. गळा व बाहु यामधील भागीं. ११. मंत्रानें पछाडि-लेल्या. १२. शंकरासारखे. १३. अन्वयार्थ—ज्यांत इनोपळ (सूर्यकांतमणी) शुचि (अग्नि) वी (उत्पन्न करी) [तीं] तृणें तुरंति. १४. अजिंक्य अशा अर्जुनें.

नाचति रणीं कबंध, कीं 'सार्थक जाहलें भलें' म्हणती,
हांसति मुखें सुखें; त्या तद्भाग्या, त्यांस हीं नसे गणती. ३९
धर्म क्षतार्त होउनि माघारा एक कोस तो सरला,
जैसा वृष्टि करुनियां आणाया तोय मेघ ओसरला. ४०
त्या काळीं दुर्योधन कर्णप्रमुखस्ववीरसंघाला
प्रार्थुनि म्हणे, 'हरिसें अरिसेनेवरि, उठा, उड्या घाला. ४१
स्वर्गद्वार उघडलें हें दुर्लभ पुण्यपर्व: कां मरणीं
भ्यावें? त्यजितां नश्वरवपु, साधति नित्य सर्व काम, रणीं. ४२
मारुनि पांडवांतें मजसह सेवाल सर्व हे वसुधा:
मेल्या हि वीरलोकीं प्याल चि होऊनि दिव्य देव सुधा.' ४३
तें हृष्ट वीर गर्जति, तो चि कृपाचा स्वयें वदे भाचा,
'धृष्टद्युम्नाचा वध करिन पण, हरि जसा मदेभाचा. ४४
जेणें न्यस्तायुध गुरु वधिला त्याचा करीन जरि वध मीं,
तरि उतरीन कवच हें, नमनें हीं न द्रवेल मन अधमीं. ४५
होतां वृथा प्रतिज्ञा सद्गति न घडो मला, घडो पतन:
भीमासि, अर्जुनास हि, मारीन, करील त्यासि जो जतन.' ४६
करितां गुरुप्रतिज्ञा गुरुपुत्रें, भारती चमू खवळे:
धांवे धर्मचमूवरि: जयगतिकीर्त्यर्थ ती हि कां न वळे? ४७
सैनिक जे निकरानें भांडति ते चालती न रविवाह;
वाटे रंग खेळति, समर न तो, भाग्यवत्नरविवाह. ४८
शीतळ मंद सुगंध श्रमशमन श्वसन संगरीं वाहे,
सुरजन सहाप्सराजन मन देउनि शुद्ध युद्ध तें पाहे. ४९
शीतसुगंधद्रव्यद्रव सिंचिति भटमहानटांवरि त्या,
कंठीं माळा घालिति, मरणापूर्वीं च जाहल्या वरित्या. ५०

१. पाणी. २. रिकामा होऊन गेला ३. मदोन्मत्त हत्तीचा. ४. शस्त्रत्याग केला आहे ज्याने असा. ५. मोठा प्रतिज्ञा. ६. कौरवसेना. ७. पाडवसेना हो—**पंत.** ८. सूर्याच्या रथाचे घोडे. ९. श्रम नाहीसे करणारा वायु.

वीरवरातें सेवी कल्पुनि सुव्यंजन अंचळाला जे,
त्या अप्सरेसि, जाणों, अवलोकुनि फार चंचळा लाजे! ५१
वरि तळपति, पळ पतिता न उपेक्षिति, झेलिती सती अमरी.
पद्मवनासि विकासापूर्वी हि क्षण न सोडिती भ्रमरी. ५२
त्या भटमणिवरि करिति छत्र निजा अंचळा चि अच्छा या
देवी, छत्रें तुटलीं ज्यांचीं, ज्यांवरि रणांत न छाया. ५३
मंदाकिनीसरोरुहमकरंदनिषेकशीतळें पदरें
वीरांचें मुख पुसिती, वीजिति, यन्मन धरी न कंप दरें. ५४
मृति वरि भटकटकाला, दुर्लभरसपानकामुकाला हे
अमृतप्रपा चि आजि: स्वःस्त्रीचा जन निका मुका लाहे. ५५
भीमार्जुनकर्णांच्या बाणांनीं जे रणांगणीं मेले,
ते झेलिले सुरींहीं सुरपुष्पांचे जसे नवे झेले. ५६
गुरुपुत्रादि महारथ जिंकुनि अर्जुन म्हणे सख्या हरिला.
"देवा! पहा स्वसेनामद कर्णें आजि सर्व संहरिला. ५७
तें पळतें धर्माचें कटक, जसें हस्तियूथ भी हरिला:
भ्यालें केवळ देवा! त्या उग्रा सूतनंदना अरिला. ५८
धर्म दिसेना, त्याचा ध्वज हि दिसेना, असे दिवस थोडा,
तिसरा वांटा उरला; चाला, हे शवमयी धरा सोडा. ५९
वधिले वीर, पळविले, मजसीं कोणीं न येति भांडाया,
स्यां न वधावे पळतां; चाला; मारूनि काय रांडा या? ६०

१. उत्तम पक्वा. २. पदराला. ३. वीज. ४. आकाशात. ५. युद्धांत पडलेल्यास. ६. अप्सरा. ७. स्वच्छ ८. आकाशगंगेतील कमळपुष्पाच्या रसाने भिजलेल्या शीतळ अशा. ९. वारा घालिती. १०. भीतीनें. ११. अन्वयार्थ—भटकटकाला मृति (मरण) वरि; हे आजि (युद्ध) दुर्लभरसपानकामुकाला (दुर्लभ असें अप्सरांचे अधरामृत पिण्यास हपापलेल्या) लोकास अमृतप्रपा चि (अमृताची पोई च); [कारण या युद्धामुळें] जन स्वःस्त्रीचा (अप्सरांचा) निका (खरा) मुका लाहे. १२. दिवसाचा तिसरा भाग. १३. प्रेतांनीं व्याप्त अशी.

आर्धीं राजा पाहूं; बा! 'हूं!' म्हण, चाल गा!, लगाम ढिले
नेदीं, स्वरुण[1] दिसति शय[2] कां रश्मिसुवर्णतंतुनीं[3] मढिले. ६१
सानुज राजा कुशली प्रथम विलोकुनि करीन मग युद्ध;
आर्धीं धर्म पहावा, कीं गुरु, तद्रहित कर्म न विशुद्ध." ६२

# अध्याय छत्तिसावा.

---

## ( अश्वत्थामाधृष्टद्युम्नयुद्ध ).

विजयाच्या वचनें प्रभु रथ फिरवी, युद्धभूमिला वर्णी:
केशव ते शवनिकर प्रेक्षी, स्तवि, पार्थवीर आकर्णी. १
वर्णी केशव जे शवदेश, वर[6] त्रिभुवनांत ते पूत,
भू तद्योगें शुद्धा, तेथ न येती च मृत्युचे दूत. २
औदार्य नीरदाचें वनिं जेंवि मयूरराय केकानीं,
नारायण क्षणक्षण रण वर्णी, जिष्णु आयके कानीं. ३
पार्थ म्हणे कृष्णातें, 'चाल सख्या! धर्मराज पाहों दे;
आहों देवा! तुज वश, तव यश हें तव पदीं च वाहों दे.' ४
मग शीघ्र दूर जाउनि कृष्ण म्हणे, 'धांवले नृपावरि ते
कौरव; भीमें पिटिले; पळति पहा: भग्न जाहले अरि ते. ५
तो भग्नकुरुबळातें ज्वलनप्रभ[10] कर्ण रोधितो[11] पळतां.
पार्था! ओळखिला कीं गजकक्षाकेतुनें[12] महाबळ तां[13]. ६
तो विप्रसिंह[14] आला बाहेरि त्यजुनि कुरुचमूस्वदरी[15];

१. अत्यंत आरक्त; लाल. २. हात. ३. लगामावरील सोन्याच्या दोऱ्यांनी (सरीने). ४. प्रेतसमूह. ५. ऐके. ६. श्रेष्ठ. ७. मेघाचे. ८. [आपल्या] शब्दांनी. ९. धर्मावर. १०. अग्नीसारखा तेजस्वी. ११. अडवितो. १२. हत्तीच्या साखळदंडाचें चिन्ह असलेल्या निशाणावरून. १३. त्वां. १४. अश्वत्थामा. १५. कौरवसेनारूप आपली गुहा.

तो धृष्टद्युम्न पहा, त्यावरि खवळोनि चालिला तदरी.' ७
ऐसें दूरुनि दावी हरि, हाकी हंसवर्ण हयरत्नें;
ते रथ जिकडे कौरवपांडव विजयार्थ करिति रण यत्नें. ८
इकडोनि जाय अर्जुन, तों तिकडे विजयशालि कर्णासीं
भांडे धृष्टद्युम्न, प्लवगेश्वर जेंवि कुंभकर्णासीं. ९
कर्णातें तो पार्षत, कर्ण हि त्या पार्षतासि, माराया
दारुण संगर करितीः त्यांच्या धैर्या नसे सिमा राया! १०
पार्षतवधार्थ कर्णें शर एक, यम स्वदूतसा, पिटिलाः
पळतां नीट म्हणेल चि 'मंदा! मागें रहा' महाकिटिला. ११
बहु धांव घेतली, कीं सत्वर मारूं खळा, भरों पानें
रक्ताच्या पोट, असें चिंतुनि काळानळाभरोपानें. १२
त्या उग्रा बाणातें, नागवरातें जयापरि शिखंडी,
सात्यकि, रक्षाया बळपति, मोडाया वृषा अरिसि खंडी. १३
भागहरावरि जेंवि व्याघ्र फिरे कर्ण सात्यकीवरि तोः
जाणों संग्राम वळी स्वर्गार्थ स्वपतीसवें करितो. १४
तो गाठी पांचाळा द्रौणि, जसा क्षुधित सिंह रंकुशता,
ज्याच्या तीव्रशरांनीं धरिली अरिकरिकुळांत अंकुशता. १५
द्रौणि म्हणे, 'रे अधमा! रे ब्रह्मघ्ना! रहा रहा पापा!'
जैसा गरुड दटावी भागहरा कालियाह्वया सापा. १६

---

१. त्याचा शत्रु. २. वानराधिपति सुग्रीव. ३. वेगानें पाठविला. ४ मोठ्या रानडुकराला. ५ प्रलयकालीन अग्निप्रमाणें तेजस्वी अशा बाणानें. ६ सपक्षघ्नास. ७. मोर. ८. धृष्टद्युम्न. ९. आपले भक्ष्य हिरावून नेणाऱ्यावर. १०. दैत्यांचा राजा. ११. इंद्राबरोबर. १२. धृष्टद्युम्नास. १३. हरिणशतास. १४. ब्राह्मणाचा वध करणाऱ्या! १५. कालिय नावाच्या. (रमणकद्वीपांतील सर्पांनीं गरुडास नियमित भक्ष्य देण्याचें कबूल केल्यावरून गरुड तें खाऊन जाऊं लागला. एकदा कालियानें त्याचें भक्ष्य भक्षिल्यामुळें गरुडानें कालियाशीं युद्ध करून त्याचा पराभव केला).

'मजपासुनि जीवंत ब्रह्मघ्ना! आजि तूं न सुटसील;
शर[1]मुद्गरप्रहारें तूं आयु[2]र्मद्यकुंभ फुटसील.' १७
[3]यासि जसा पाहुनि गुरु[4], गुरुपुत्रास हि शिखिप्रतिम[5] हा ही
होय [6]अनतिहृष्टमना, जेंवि विलोकुनि शिखी[7]प्रति महाही. १८
समरीं अवध्य शस्त्रें आपण, जाणे असें, न भी मरणा[8];
द्रोणसुतावरि पार्षत जाय, मनि म्हणे. 'करीन भीमरणा[9].' १९
व्याघ्र व्याघ्रावरि ये द्रौणिवरि द्रोणशत्रु तो नीट;
दोघे ही अन्योन्यक्षयकाम क्रूर विक्रमी धीट. २०
आच्छादुनि बाणपटें द्रौणि म्हणे, 'जा यमाकडे आधीं.
मी पाठवितों तुज, जा; घे प्रायश्चित्त शुद्धिला साधीं. २१
रे पांचाळापसदा! गुरुवधपाप स्मरोनि रडसील,
धारातीर्थी मग्न न होतां नरकांत तूं चि पडसील. २२
जरि न पळसील, जरि तुज विजय न रक्षील तरि, तुझी आण,
हा मंदसि काळपाश स्वगळां पडला चि, हें मनीं आण.' २३
धृष्टद्युम्न म्हणे, 'रे वाचाळा! तें च तें च किति वदसि?
जें पित्यासि दिधलें उत्तर देईल तो चि तुज मंदसी. २४
द्रोण जसा विप्राधम, तत्सुत तैसा चि तूं हि; जरि त्यातें,
वदसि, मदसि वधि, ऐसें, वधिल न कां तुज कुकर्मकरित्यातें?'
ऐसें वदोनि पार्षत ताडी द्रौणीस मार्गणें [12]निशितें.
द्विजशरगण हि तयातें, द्याया गृध्रादिकांसि [13]तत्पिशितें. २६

१. बाणरूप मुद्गराच्या प्रहारानें. २ आयुष्यरूप मद्याचें मडकें. ३. धृष्टद्युम्नास ४. द्रोण. ५ अग्निसमान (तेजस्वी) असा हा धृष्टद्युम्न हि. ६. फारसें प्रसन्न नाहीं मन ज्याचें असा. ७. मोराला. ८. अश्वत्थाम्याला पाहतां च जरी प्रथम धृष्टद्युम्नाला काहींशी भीति वाटली, तरी आपण समरांत शस्त्रानें अवध्य आहों हें लक्षांत येतां च तो भीनासा झाला. ९. भयंकर युद्धास. १०. माझें खड्ग. ११. यमाचा पाश. १२. तीक्ष्ण अशा. १३. त्याचें मांस.

अन्योन्यातें झांकिति बाणानीं द्रौणिपार्षत क्रोधी,
पांचाळपांडवांतें तेव्हां राधेय एकला रोधी. २७
तों पांचालाखंडल[1] खंडी कोदंडदंड[2] गुरुज्याचा,
पांचाळवधीं धरिती फार भरवसा समस्त कुरु ज्याचा. २८
द्विज जें सज्य दुजें करि, भासे त्या सुप्रचंड कोदंडें,
गुरुघातपातकहता[3] हाणितसे काय काळ तो दंडें! २९
खंडी धनु-शक्ति-ध्वज-हय-सूत-रथादि, विरथ करि अरिला,
तों पांचाळें द्रोणग्रीवारक्ताक्त[4] खड्ग करिं धरिला. ३०
द्रौणिवधार्थ विरथ ही पार्षत उठला करीं धरुनि असिला:
खवळे चि पीडकावरि पन्नग भोगार्धशेष[5] जरि असिला[6]. ३१
इच्छी करावया जों गुरुबंधुप्राणघातें[7], करवाळी[8]
पार्षत उतरों[9] पाहे, जैसा सुग्रीवघातकर वाळी, ३२
खड्ग[10] छेदुनि निकरें[11] शरनिकरें पार्षतासि तो तासी.
द्रौणि म्हणे, 'करिन असें झाला होतासि कीं न होतासि!' ३३
द्विज खरतरशरनिकरें निकरें करि अरिशरीरतक्षण[12] ही:
न मरे पार्षत, न पडे, होय न मोहीं तरी रत क्षण ही. ३४
टाकी चापलता, मग यानाखालें[13] उडी हि तो विप्र:
अहिवरि गरुड तसा द्विज धांवे त्या पार्षतावरि क्षिप्र. ३५
सिंह जसा द्विरदातें, द्रौणि रथस्था अरीस आकर्षी:
इतुक्यांत धांवला तो, ज्यातें गाती सदैव नाकर्षी. ३६
तो भगवान् कृष्ण म्हणे, ' रे रे पार्था! पहा पहा गा! तो,
सिंहें गजसा, पार्षत गुरुपुत्रें क्षिप्र मारिला जातो. ३७

१. पाचालेंद्र धृष्टद्युम्न. २. धनुष्यदंड. ३. गुरुघाताच्या पापानें मृतप्राय झालेल्यास. ४. द्रोणाच्या मानेंतील रक्तानें माखलेला. ५. अर्धें शरीर तुटलें आहे ज्याचें असा साप. ६. असला. ७. अश्वत्थाम्याचा प्राणनाश. ८. खड्गधारी. ९. रथांतून. १०. 'तो' असा अध्याहार करावा. ११. आणीबाणीनें. १२. शत्रूच्या शरीराचें तासणें. १३. रथाखालीं.

घेईल पार्षताचे गुरुपुत्र प्राण, हाण बाणगणीं;
हूं ! ऐक व्यसनार्तत्राण चि सद्धर्म; हें प्रमाण गणीं.' ३८
भगवद्वचनाकरणीं[1] ज्ञानी ज्ञान हि गणी अपार्थकसें[2];
वदला दास ' करिष्ये वचनं तव,'[3] तो करी न पार्थ कसें ? ३९
पार्षतताप हराया, जाणों संपूर्ण नाथ रजनीचे[4]
हय, हाकी हा कीर्तिश्रीनीतिनिवास, वासवजनीचे[5]. ४०
आले प्रभु[6] हें कळतां अश्वत्थामा करि त्वरा विपुला,
कालज्ञ[7] मुनि भवाला[8], नाशायाला तसा झटे रिपुला. ४१
नक्रें सरोवरीं गज, विप्रें हि तसा विकृष्यमाण[9] रणीं
पार्षत रक्षाया, नरनारायण तूर्ण धांवले मरणीं. ४२
सोडुनि शर गुरुपुत्रा ताडी कौंतेयः ते यशस्विवर
शिवरक्तप[10] त्यासि कसे साहति, करणार मेरुला विवर[11] ? ४३
पार्थाचा धैर्य न दे रिपुदमनी त्या तदा शर थिराया[12]:
तेव्हां मज आठवला वालिवधख्यात दाशरथि राया ! ४४
द्व्यंगुळ हि गुरुसुताच्या अक्षत ठेवी न पार्थ कायासः
अशुभावहविधिसा[13] करि सहसा समयीं अपार्थकायास[14]. ४५
मंत्रहत[15] ब्रह्मग्रह[16] जेंवि धृतें[17] त्यजुनि जाय दूरवर,
तैसा पार्षत सोडुनि जिष्णुशरप्रहत[18] विप्र शूरवर. ४६
द्रौणि स्वरथीं चढला, कढला कोपानळें, धरी धनुला;
सोडुनि बहु शर झांकी, घन रविला तेंवि त्या पृथाजनुला. ४७

---

१. भगवताचे वचन न केल्यास. २. व्यर्थ. ३. तुझ्या म्हणण्याप्रमाणे करीन. ४. पूर्णचंद्रासारखे शुभ्र. ५. अर्जुनाचे. ६. कृष्णार्जुन. ७ काल (मृत्युकाल) जाणणारा. ८. मसाराला. ९. ओढला जाणारा. १०. शंकराचे रक्त पिणारे (बाण). ११. छिद्र, भोंक. १२. स्थिर उभे राहण्यास. १३. प्रतिकूल दैवाप्रमाणे. १४. व्यर्थ आयास. १५. मंत्रानें नाश पावलेला. १६. ब्रह्मराक्षस. १७. धरिलेले, १८. अर्जुनाच्या बाणानें विद्ध झालेला.

पळवी सहदेव रथीं वाहुनि त्या सैन्यनायका ईयाला;[1]
मृत्युपुढें अभिमानें तो ही खोवील पाय काशाला? ४८
युद्धीं गुरुपुत्रास हि पार्थाचा बाण मोह दे भारी,
म्हणुनि पळविला सूतें, तों खवळे वृष जसा मदेभारी.[2] ४९

## अध्याय सदतिसावा.



पार्थासि पार्थवचनें नेतां संसप्तकांकडे हरि तो,
युद्धें दूरुनि दावी, जो जेथें कर्म जें जसें करितो. १
"पार्था! तो धर्म पहा, तीं कुरुकटकें तयाकडे जातीः
ते पांचाळ नृपातें रक्षाया धांवले कृतख्याती.[3] २
तो सानुज दुर्योधन राज्याप्रति धांवला, जसा रत्ना
संपादाया अर्थी धांवे, लोभें करी महायत्ना. ३
सात्यतभीमांहीं ते रिपु धर्मनृपापहार करणारे
रोधियले जेंवि हरिज्वलनांहीं दैत्य अमृत हरणारे. ४
जन्हि रोधिले नृपाप्रति गेले चि समूह ते कुरुबळांचे,
जैसे वर्षाकाळीं सिंधुप्रति ओघ दुर्धर जळांचे. ५
कौरवबळ काळवदन, सांपडला त्यांत धर्मराज पहा;
'रघुराम!' असें म्हण गा!; विजयावह संकटीं बरा जप हा. ६
दुर्योधनकर्णकृपद्रौणिशर छेदितील पर्वत रे!
यांच्या समरसमुद्रीं शक्र हि न मनीं धरूनि गर्व तरे. ७
तो धर्म विमुख केला कर्णानें; कोण त्यासि साहेल?
क्रुद्धा राधेयाच्या काळ हि वदनाकडे न पाहेल. ८

१. मेहण्याला. ( धृष्टद्युम्नाला ). २. गजाचा शत्रु; सिंह. ३. ख्याति केलेले. ४. धनेच्छु. ५. धर्मराजाचे हरण. ६. विष्णु व अग्नि यानीं. ७. समुद्राकडे. ८. धरून ठेवितां न येणारे. ९. विजयप्रद.

उपवासांनीं[1] केवळ धर्माचें[6] मृदु शरीर शुष्क, रसें
रहित, प्रतप्त दुःसह आधीनें, ग्रीष्मकाळपुष्करसें[2].　　९
आहे ब्राह्मबळें[3] बहु, क्षात्रबळ श्रीयुधिष्ठिरीं नाहीं;
कर्णासीं गाठि रणीं, मजला भासे बरें नसे कांहीं.　　१०
बहु गर्जति कुरुकुंजर; भीम पुरुषसिंह कां मुका साहे?
कौरव मरोत, पांडव वांचोत शिवा! जगन्निवासा! हे.　　११
ते प्रेषिले वृषें भट कीं, 'रिपुनृपजीवितापहारा[4] जा,'
गांधर्वास्त्रें केला झांकुनि संजाततापा[5] हा राजा.　　१२
ते पांचाळ मुरडले, रक्षाया, करुनि युद्ध, रायासी,
गज जेंवि यूथपतिला पंकह्रदांतूनि[7] उद्धरायासी.　　१३
हा! हा! ध्वज कां न दिसे? राहो देईल दुष्ट कर्ण कसा?
ध्वज त्यापुढें न वांचे क्षुधितव्याघ्रासमोर तर्णकसा[8].　　१४
सात्यकि[9]शिखंडिपार्षतयमभीमांच्यासमक्ष कर्ण कसे
सैनिक पहा पळवितो, व्याघ्र महोक्षांसमक्ष[10] तर्णकसे.　　१५
तो भीमावरि गेला, शरवर्षी कर्ण वर्णनीयमहाः[11]
अतिदुःसहप्रहार[12]क्रूरपुरुषसिंहवर्णनीं यम हा.　　१६
ते पांचाळ पळविले, ते कौरव सिंहनाद करितात,
पांडवसृंजयचेदिप्रमुखांचें सर्व धैर्य हरितात.　　१७
'मारा सृंजय सारे' ऐसें सांगोनि लाविले मागें
कौरवभट; आपण ही ताडितसे तीव्रशरगणें रागें.　　१८

१. धर्माचे नियम विधियुक्त पाळताना धर्मास पुष्कळ उपास करावे लागत. २. ग्रीष्मऋतूंतील म्लानकमलाप्रमाणे. ३. ब्राह्मणाचा गुणविशेष. (ब्रह्मचिंतन). ४. शत्रुकडील राजाच्या जीविताचा अपहार करण्यास. ५. उत्पन्न झाला आहे ताप ज्याला असा. ६. धर्म. ७. चिखल असलेल्या डोहांतून. ८. गाईच्या वासराप्रमाणे. ९. सात्यकी. १०. मोठ्या (बलिष्ठ) बैलासमोर. ११. ज्याचे तेज वर्णन करण्यास योग्य आहे असा. १२. अत्यंत असह्य प्रहार ज्यांचे अशा क्रूरपुरुषश्रेष्ठांच्या वर्णनांत.

वृषवचनें पांचाळांपाठीं लागति वधार्थ खळ हे, 'छू'
व्याधें म्हणतां चि जसे हरिणामागें श्वसंघ कळहेच्छु. १९

पार्था! पहा, पहातो कर्ण कटाक्षें तुला चि कपिकेतो!
चिरपुष्टकामतरु[1] जो या सुक्षेत्रांत[2] केंवि न पिके तो? २०

कपिकेतु विलोकुनि वृष फिरला, तुजसीं करील शुद्धरण,
धर्महृदयशल्याचें[3] चतुरा! करिशील तूं हि उद्धरण. २१

तुजवरि येणें त्याचें, शलभाचें जेंवि वह्निवरि जाणें;
ज्याचा[4] तुझ्या शिरीं कर त्याचें माहात्म्य मीं च हरि जाणें. २२

धर्मोच्छेदीं जैसा पाखंडाला सहाय कळिकाळ,
कर्णासि तसा चि पहा झाला सानुज सहाय कुरुपाळ. २३

आपण किरातरूपिप्रभुवरकरुणाकटाक्षसत्पात्र,
गुरुधर्माहित[5] वृष, हें स्मर; उरलें कार्य एव्हडें मात्र. २४

गेला पांचाळांवरि कर्ण, पहा केतुमात्र तो झळके;
वैकर्तनशरहतगज[6] दिसति, ग्रीष्मीं जसे गिरी जळके. २५

पार्षतकेतुसमीप चि कर्णाचा केतु तो प्रकाशतसे;
ते पांचाळबळीं शर शिरले, कक्षांत[7] आश्रयाश[8] तसे. २६

परमप्रिय तुज कथितों; आहे सुखरूप भूप[9] हा[10] काळ;
धृतराष्ट्रसुतशताचा फिरला खवळोनि[11] तो, पहा, काळ. २७

ते गतगौरव कौरव रौरवपौरें[12] वचकोनि पळतात,
तन्हि भीमशर न सोडिति; मृग पळतां ही दवांत जळतात.
पांचाळ चमू उठली भीमबळें कौरवांवरि पुन्हां ती.

१. फार दिवसापासून वाढलेला इच्छारूपी वृक्ष. २. चांगल्या जमिनीत (पक्षीं) युद्धक्षेत्रांत. ३. धर्माचे हृदयास बाणाप्रमाणें टोंचणाऱ्या (कर्णाचे). ४. ज्या शंकराचा. ५. धर्माचा मोठा शत्रु. ६. कर्ण. ७. गवतांत. ८. अग्नि. ९. धर्म. १०. ह्या वेळेपर्यंत. ११. भीम. १२. रौरवनरकाचे रहिवासी.

गंगेंत गतीच्छु[1] तसे, ते रक्तनदीह्रदांत[2] रिपु न्हाती. २९
तो जेंवि वीरभद्रें केला विध्वस्त दक्षमखवाट,[3]
भीमें रिपुसंघ तसा, तद्बाणांला पुरे चि न खवाट.[4] ३०
भीमावरि नैषादी[5] जातो उचलोनि भुज सतोमर[6] तो;
अन्यासि काळ, भीमा ज्वलनाला शलभ भासतो, मरतो. ३१
तोडुनि सतोमरभुज द्विरदवराखालता[7] पहा गा! तो,
रिपु लोळवितां सुरजन भीमभुजा निजजयावहा गातो. ३२
भासति कुरुभटवररथ दवदहनग्रस्त कुंज[8] रानीं कीं[9]
कपिहत[10]लंकागृह; ते भीमशर हरी च कुंजरानीकीं.[11] ३३
भीमें भस्म चि केले पत्ती, सादी,[12] शतांग[13] सतुरंग,[13]
मदमत्तमतंगज हीं; झालें हत शत्रुसैन्य चतुरंग. ३४
भीमें एकैकशरें वधिले हाणोनि सप्त सप्त करी;
भीमशरव्रात तसा प्रळयार्ककरौघ[14] हीं न तप्त करी. ३५
दवसा तव साध्वग्रज[15] कवळितसे शत्रुगजबळा यवसा;[16]
भवसा[17] भीम महाबळ भूतांच्या आजि पावला नवसा. ३६
अक्षौहिणीत्रयाचें वारण एकें वृकोदरें केलें;
खवळे अधिक चि मारुति शात्रवशस्त्रें,[18] शिखी[19] जसा तेलें." ३७
ऐसा भक्तपराक्रम वर्णी भगवान् स्वयें चि अत्यर्थ;[20]
कीं स्वजनमनीं सकरुण, निष्ठुर वरि मात्र साधुगत्यर्थ.[21] ३८

१. सद्गति इच्छिणारे. २. रक्तनदीच्या डोहात. ३. दक्षाचे यज्ञस्थान. ४. आकाशमार्ग. ५. निषादराजा. ६. तोमरयुक्त असा भुज. ७. गजश्रेष्ठाखाली. ८. लतांची जाळी. ९. किंवा. १०. मारुतीने जाळून टाकलेली लंकेतील घरे. ११. गजसमुदायात. १२. अश्वारूढ किंवा गजारूढ वीर. १३. घोड्यासह रथ. १४. प्रलयकालीन सूर्यकिरणाचा लोट. १५. सज्जन असा वडिल बंधु भीम. १६. तृणाला. १७. शंकरासारखा. १८. शत्रूच्या शस्त्रांनी. १९. अग्नि. २०. अतिशय. २१. चांगली गति व्हावयासाठी.

# अध्याय अडतिसावा.

संसप्तकबळ भंगुनि पार्थ हि त्या दुष्टबुद्धि[1]कुर्वरितें
होय सहाय महात्माः मारी कौरवबळें चि उर्वरितें[2]. १
भीमभयें पळति तयां कर्ण म्हणे, "यश बुडे अमोल, टिका[3].
'जंतु अकाळीं न मरे,' हा उपदेश न मना गमो लटिका. २
जन्मापासुनि केलें शोभन[4] तें सर्व हो न मोघ[5]; टिका.
समरमखीं जी जाती इतर घट्यांसम[6] न ती गमो घटिका." ३
ऐसें बोधुनि फिरवी बळ वृष, धांवे जसा महामकर,
अरिकटकाब्धींत शिरे; भीनाः कीं, त्यासि वरद रामकर. ४
त्यावरि उठले पांडववीर, तईं युद्ध जाहलें भारी;
पडतां महारथांसीं गांठि म्हणे त्यांसि 'धन्य' जंभारी[7]. ५
येतां वृकोदरावरि रोधी कर्णासि बळपति शिखंडी;
तो कर्णाच्या, कर्ण हि त्याच्या, युद्धांत, शरततिस[8] खंडी. ६
विरथ विशस्त्र क्षततनु करुनि बळें कर्ण तो पळवि पत्ती[9];
स्वःसुखहेतु[10] परि न त्या सोसे ती एक ही पळ विपत्ती. ७
दुःशासनें हि केला धृष्टद्युम्न क्षतार्त हतदर्प,
जेसा सिंहें गजपति किंवा गरुडें चि दृष्टिविषसर्प, ८
पांचाळ वीर तेव्हां बहु झटले पार्षताच्या अवनीं[11];
कांपे असकृत्क्षतजस्नाता[12], वृष्टींत धेनुसी, अवनी[13]. ९
नकुळासीं अद्भुत रण वृषसेन करी; तशांत तत्तातें
कर्णें फिरतां नकुळ त्याजि त्यातें*, प्राज्ञ जेंवि मत्तातें. १०
माद्रेय कौरवांवरि जाय अनादर करूनि कर्णाचा,

१. दुष्टबुद्धि कौरवाच्या शत्रूस–भीमास. २. उरलेलें. ३. धैर्यानें उभे रहा. ४. चांगलें. ५. व्यर्थ. ६. घटकासारखी. ७. इंद्र. ८. बाणसमूहास. ९. तो पादचारी शिखंडी. १०. स्वर्गसुखाला कारणीभूत. ११. रक्षणीं. १२. पुष्कळ वेळां रक्तानें न्हालेली. १३. पृथ्वी. * वृषसेनातें.

जैसा भुजंग सोडी लोचनपथ[1] दुःसहा सुपर्णाचा. ११
सहदेवसूर्यशरकर[2] साहे तें बहु उलूक[3]; भंगे तें
न बहु, जसें बहु सिकतासेतु[4] जरि क्षण धरील गंगेतें. १२
सात्यकिसीं भांडे, परि शकुनी च पळे; न जयकथा पिशुनीं[5].
सिंही नव्हे चि यद्यपि बाळनृपसुसत्कृता[6] तथापि शुनी[7]. १३
करि दुर्दशा अधर्में धर्माची जी स्मरे हि शकुनी ती;
धर्मानुरक्त[8] सात्यकि भंगार्थ पुढें धजे चि; न कुनीती. १४
भीमासीं दुर्योधन[9] भांडे, भंगे रणीं; पळायास
गज हय रथ हि नसे परि पायीं च पळे सुनिष्फळायास. १५
न ग्रामसिंहतेस्तव[10] भग्न हरिसि वा गजासि करिल सुणा[11];
येना अमृतरसतुळा म्हणति 'महौषध' असें हि जरि लसुणा.
युद्ध कृपाचार्यासीं करिता झाला वळी युधामन्यु,
छेदी चाप म्हणुनि ये फार चि तत्काळ त्या बुधा मन्यु[12]. १७
छत्रध्वजसूतमथन करिती, बहु ये तदायुधा[13] मन्यु;
प्राणत्राण कराया पळता झाला तदा युधामन्यु. १८
पांचाल्य उत्तमौजा हार्दिक्यें[14] ताडिला उरीं बाणें,
त्यातें सारथि पळवी; युक्त चि मोहीं पळोनि जें जाणें. १९
भीमें कुरुबळ मथितां, दुःशासन शकुनि नागकटकातें[15]
प्रेरिति त्यावरि, जैसे खगनाथपराभवार्थ चटकांतें[16]. २०
भीम वधी परवारण[17], परवा रणपंडिता तया नाहीं;

१. दृष्टिमार्ग. २. सहदेवरूपी सूर्याचे बाणरूपी किरण. ३. शकुनिपुत्र (पक्षी) घुबड. ४. वाळूचा पूल. ५. दुष्टाचे ठायीं. ६. राजकुमारानी प्रेमाने वाढविलेली. ७. कुत्री. ८. धार्मिक (पक्षी) धर्मराजाचा अनुयायी. ९. अत्यंत निष्फळ आहे श्रम ज्याचा असा दुर्योधन. १०. 'ग्रामसिंह' हे नांव असल्यामुळे. ११. श्वा—पंत. १२. राग. १३. त्याच्या शस्त्रास. १४. कृतवर्म्यानें. १५. गजसेनेस.. १६. चिमण्यांस. १७. शत्रूचे हत्ती.

गजरक्तांच्या सरिता भरिता झाला, न भागला कांहीं. २१
वारंवार परिशिले पांडवपंचाननध्वनी[1] कानीं,
धैर्य त्यजिलें चि समंदमातंगांच्या[2] हि त्या अनीकानीं[3]. २२
एकाचा हि अभग्न न भीमशरें पाद दंत कट[4] कर[5] वा;
करि कौरवनागांचें युद्धीं पावोनि अंत कटक रवा[6]. २३
वातें घन भग्न जसे भीमें केले महेभ सर्व तसे.
अल्प पळाले; क्षितिवरि पडले बहु वज्रभग्नपर्वतसे. २४
दुःसह भय भीमाचा कोदंडज्यानिनाद[7] दे; हगती,
मुतती, चळती, पळती, गळती, भ्रमले सकंपदेहगती[8]. २५
भीम गजांतें मर्दी, कल्पांतीं रुद्र जेंवि भूतांतें;
भीमाचें यश लाजवि सुरभीक्षीराचिया[9] हि ऊतांतें. २६
संसप्तकबळ मारुनि केलें पार्थें हि भग्न कुरुसैन्य,
आधीं च भीमकर्मा भीम हि दे ज्यासि उग्रभयदैन्य. २७
अहि जेंवि पुच्छभंगें, खवळे कुरुराज फार बळभंगें.
धांवे, गांठी, भांडे धर्मासीं; मुखर[10] जेंवि मुनिसंगें[11]. २८
भांडति निकरें दोघे नृप बंधु, म्हणोनि धांवले आप्त,
तों कर्णानें केले भीमादिकशत्रु शरगणीं व्याप्त. २९
कर्णापुढें न चाले बळ; सर्व हि लोपले शरावरणीं:
रक्ताचे ह्रद भरले; काळाचे काय ते शराव[12] रणीं! ३०
सहदेव मात्र कामा आला, करि विक्रम प्रकाम[13] रणीं;
वारी सुयोधनाला, हरिचें नाम चि जसें यमा मरणीं. ३१
सहदेवशर नृपाला[14] तन्मित्रा सैन्यनायकाला ही
देती दुःसह ताप, क्रूर तयांहूनि काय कालाही[15]? ३२

---

१. भीमरूपी सिंहाचे शब्द. २. मदोन्मत्त हत्तींच्या. ३. सैन्यांनीं. ४. गंडस्थळ. ५. सोंड. ६. चीत्काराला ७. धनुष्याच्या दोरीचा शब्द (टणत्कार). ८. थरथर कांपत आहे शरीर ज्याचें. ९. कामधेनूच्या दुधाच्या. १०. वाचाळ. ११. सज्जनाबरोबर. १२. परळ. १३. फार. १४. दुर्योधनाला. १५. कृष्णसर्प.

प्रियसखतापें तापे कर्ण, ग्रीष्मीं हि तेंवि न रवि; खरी
वृद्धीं[1] शक्ति उणी, बहु तरुणीं; कीं, तो असंख्य शर विखरी. ३३
म्हणविति उदार जीवनदानीं[2] घनरूप कर्णशर, ठकिती.[3]
समरूप परि परशर क्षुद्र चि; मकरांसमोर शरठ[4] किती? ३४
गगनीं बाणगणांच्या संघर्षे ज्वलन दुःसह चि पेटे;
वर्धिति शरवृष्टि वह्नि हि, जेंवि व्याघ्री हि तत्सह चि पेटे.[5] ३५
परमास्त्राच्या[6] तेजें अरिबळ पळवूनि कर्ण त्या पार्था[7]
गांठी, धनशकटांला[8] तस्करवर जेंवि भंगुनीं सार्था.[9] ३६
कर्णाचे शर सोसी तो सीरधरानुजाश्रयामळधी;[10]
पांडव मग बहु खवळे, कल्पांतीं मारुतें जसा जळधी. ३७
धर्में न एक कर्ण चि, सर्व हि त्याचा सहाय कांपविला.
शस्त्रें किति? मुख्य तपस्तेज चि. भीना दशास्य[11] कां पविला?
जिकडे जिकडे क्षेपी[12] अशनीसी[13] क्रोधदुष्ट दृष्टि रणीं,
तिकडे भंगे रिपुबळ, पेचककुळ[14] जेंवि भानुच्या किरणीं. ३९
कौरव 'हा! हा!' म्हणति; प्रतिहत[15] झाले चि शस्त्रवृष्टीनें,
दृष्टीनें हि नृपाच्या जेंवि गरळनयनभुजगदृष्टीनें. ४०
शिरले उरीं च तीन व्याळप्रतिमल्ल[16] भल्ल, वावरुनीं
यममनिं[17] आले कीं ते आळि विषतरुपुष्पपल्लवावरुनीं. ४१
भल्लाघातविकळमति नृप,[18] अक्षम जाहला वदाया ही;

१. म्हातान्याच्या ठायीं. (मयं म्हातारा व त्याचा पुत्र कर्ण तरुण). २. प्राणदानी (पक्षी) जलदानी. ३. ठकविती. ४. सरड. ५. व्याघ्राचीं पिलें. ६. एका प्रचंड अस्त्राच्या तेजानें. ७. धर्माला. ८. धनाने भरलेल्या गाडीला. ९. व्यापाऱ्याच्या ताफ्याला. १०. हळधराच्या बंधूच्या (कृष्णाच्या) आश्रयाने शुद्ध बुद्धि झाली आहे ज्याची असा धर्म. ११. रावण. (तपोबलाने च रावणानें इंद्रास जुमानलें नाही). १२. सोडी. १३. वज्रासारखे. १४. घुबडाची जात. १५. कुंठित. १६. सर्पाशीं बरोबरी करणारे. १७. यमाचे मनात वावरून आले किंवा ते विषतरूवरचे भ्रमर आले, असा अर्थ; तात्पर्य, अत्यंत उग्र असे ते बाण होते. १८. धर्म.

धैर्ये बहु प्रयासें निजसूताला म्हणे तदा 'याहि.' ४२
मागें परते, ठेउनि चित्तीं कर्णापराध राजा तो;
तेव्हां कौरव म्हणती, 'काय पहातां? धरा, धरा, जातो.' ४३
'घ्या, घ्या; धरा धरा नृप,' ऐसें गर्जोनि धांवले च वरी;
पांचाळचमू त्यांतें वारी, दंशांम्हि जसि वनीं चवरी. ४४
तेव्हां कर्णें केला पांचाळरथक्षय स्वशरनिकरें;
निकरें हाणी, न दिसे सोडी शर केधवां चि धरुनि करें! ४५
दुःसहवृषरविशरकरतप्ताखिलभूपवीरवरपक्षी,
त्यांतें संश्रिततापापह सुखकर भीमदेवतरु रक्षी. ४६
सहदेव नकुळ दोघे दों भागीं त्यांत धर्मरथ चाले;
भासति जाणों क्षितिवरि पूर्णेंदुसमेत शुक्र गुरु आले! ४७
सांभाळिति दों पार्श्वीं दोघेजण कर्णभल्लभिन्नातें,
ते माद्रेय नृपातें नेती मागें हळू च खिन्नातें. ४८
तों कर्ण सकळरक्षकभटभंग करूनियां महाबाहु,
त्या धर्मावरि धांवे, पूर्णसुधारश्मिवरि जसा राहु. ४९
वेधी तीं बाणानीं उर त्याचें कर्ण मित्रहितकामी,
चित्तीं म्हणे, 'करीन चि वधसमपरिभव घडेल तितका मीं.'
धर्म हि तीं बाणानीं त्या कर्णातें स्तनांतरीं हाणी;
मर्महतव्याघ्र जसा अविषह्या वेदना मनीं नाणी. ५१
वेधी कर्णहयांतें तो राजा आपुल्या हि माम्यातें,
अद्भुत तेज निरखिलें धर्मात्म्याचें नृपोत्तमा! म्यां तें. ५२

१. चल. २. माशास. ३. असह्य अशा कर्णसूर्याचे किरणरूपी बाणानीं तापलेले जे धर्माकडील सर्व वीरश्रेष्ठ हे च कोणी पक्षी त्यांते. ४. आश्रिताचा ताप घालविणारा. ५. भीम हा च कल्पवृक्ष. ६. पूर्णचंद्रासह. ७. येथें मूळांत पंतांच्या हातून 'नृपाप्ते' असा हस्तदोष झाला आहे. ८. पूर्णचंद्रावर. ९. असह्य. १०. शल्यास.

मर्मक्षतार्त राजव्याघ्राचे तों समर्थ यम पेटे,
कर्णव्याध विदारिति शरनखरीं; तो दवाग्निसा पेटे. ५३
जेंवि पिपीलिक नागांवरि, दुःसह बाण त्यां हि वरि सोडी;
राधेय त्यां यमांतें, वृक्षांतें चक्रवातसा, झोडी. ५४
मग कालवाल जे रदनिभ हय त्यांचे हरूनियां प्राण,
बाणवरें एकें वृष पाडी त्या नृपतिचें शिरस्त्राण. ५५
नकुळास हि विरथ करी तो कर्ण हरि क्षणांत तेज गती;
धर्मविनाशभयें थरथर कांपे त्या रणांत ते जगती. ५६
नकुळयुधिष्ठिर चढले सहदेवरथीं बहुव्रणितकाय,
शललखचित शल्य तसे शरखचित चि ते; क्षतां गणित काय?
मद्रेश विकळ पाहे परमप्रियभक्त कंजनाभाचे,
जे पटु विश्वाच्या हि, न आपुलिया मात्र, रंजना, भाचे. ५८
अवलोकितां चि नयनें पावलि जे व्रणितधर्मतनु कंपा,
भरती नदींत तैसी, दाटे मद्रपमतींत अनुकंपा. ५९
शल्य म्हणे, 'कर्णा! त्वां भांडावें जिष्णुसीं; वृथा यासीं
झगडसि कोपें; आतां चाल, पुरे; पडसि कां वृथायासीं? ६०
आधीं च रणीं धर्म क्षीणरणोपकरण क्षतशरीर,
जेंवि वसंतीं जीवितशेष हतच्छदनवैभव करीर. ६१
पीडिसि उग्रशरांहीं तूं हि पृथासूनुच्या शरीरासी,
सर्वप्राणिभयप्रद दव दाही जेंवि त्या करीरासी. ६२
या कर्में उपहासास्पद तूं होसील, शील सांभाळीं;
स्वकरें चि अयशकज्जळ राधेया! लावितोसि कां भाळीं?' ६३

१. नकुळसहदेव. २. मुगळे. ३. वावटळीसारखा. ४. काळे केश ज्याचे असे. ५. दांतासारखे शुभ्र. ६. पृथ्वी. ७. साळिसारखी व्याप्त. ८. सालु, सायाळ. ९. कृष्णाचे. १०. शल्याचे मनात. ११. व्यर्थ श्रमांत. १२. क्षीण झाले आहे युद्धाचें साहित्य ज्याचे असा. १३. जीवमात्र शेष राहिला आहे ज्याचा असा. १४. नष्ट आहे पर्णशोभा ज्याची असें नेर्माचें झाड. १५. वणवा. १६. जाळी.

ऐसें शल्य वदे, परि कर्ण करी घाबिरे चि असु यांचे:
मर्मीं टोंची बाण, स्पर्श तसे ताविल्या हि न सुयांचे. ६४

शल्य पुन्हा हि म्हणे, ‘ गा कर्णा ! तुज धार्तराष्ट्र मानितसे,
ज्या[1] अर्थें, आप्तजनीं तुझिया चि गुणांसि नित्य वानितसे, ६५

तो अर्थ सिद्धिला ने. जिष्णुवधाकारणें वृषा ! चाल,
नृप मारुनि काय तुला? न सितेची[2] सुज्ञ काढिती साल. ६६

प्रावृट्[3]घनसा गाजे पार्थाचा, विष्णुचा हि दर वाजे,
लागति उघडति दैत्यांदेवांचे यद्रवें चि दरवाजे. ६७

हा आला पार्थ पहा; कुरुपतिसैन्यास या समग्रास
ग्रासितसे, विश्वाचा प्रळयीं करितो जसा यम ग्रास. ६८

तो एक उत्तमौजा, वीर युधामन्यु तो दुजा शूर:
ते पृष्ठरक्ष[4] दोघे जिष्णुरथातें न सोडिती दूर. ६९

उत्तररथचक्राचें रक्षण तो सात्यकी पहा करितो,
दक्षिणरथचक्रावन करितो द्रोणद्विजातिचा[5] अरि तो. ७०

सिंहें गजसा भीमें प्राणहरें गांठिला[6] धरावर[7] तो
वांचो, चाल, विलोकुनि तुजला, सिंहासि सिंहसा, परतो. ७१

आम्हांसमक्ष भीमें पाडावा न नृप, जेंवि तरु वातें:
जाळील निकटवर्ती प्रज्वलित ज्वलन केंवि न रुवातें[8]? ७२

काळमुखीं नृप पडला, त्यासि उपेक्षूनि काय करिशील?
प्रभु मरतां व्यर्थ चि जरि सानुजधर्मासु[9] आजि हरिशील. ७३

वांचेल आजि नृप तरि अत्यद्भुत, हें नवें चि जन्म रणीं:
पावावें चि कृतज्ञें, जे प्रभुमित्राप्तबंधु[10], तन्मरणीं.’ ७४

परिसोनि शल्यभाषण माघारां अंगराज जों पाहे,

---

१. ज्या [ अर्जुनवधाच्या ] उद्देशानें. २. साखरेची. ३. वर्षाकालीन मेघासारखा. ४. पाठिराखे. ५. द्रोणब्राह्मणाचा शत्रु धृष्टद्युम्न. ६. गाठलेला. ७. राजा दुर्योधन. ८. कापसास. ९. बंधुसहवर्तमान धर्माचे प्राण. १०. यजमान, मित्र व आप्त.

तों दुर्योधन खगपति[1]दृष्टाहिदशेसि पावला आहे. ७५
कौंतेयातें सोडुनि कर्ण म्हणे, 'मद्रनायका! जळतें
गृह आधीं रक्षावें. अयशाहुनि अधिक काय काजळ तें?' ७६
हाकी हयांसि मद्रप, भद्र परम मानुनि स्वरथ फिरवी;
भगणीं[2] अनूरु[3] रविला, कर्णाला तेंवि अरिबळीं शिरवी. ७७

---

## अध्याय एकोणचाळिसावा.

जातां कर्ण, पराभवखिन्न क्षतकाय राय[4] 'हाय!' म्हणे,
'खावविले चावविले लोहाचे शत्रुनें प्रतप्त चणे.'
प्रेक्षकमूर्छाप्रद जे न करिति विगतासु[5] घाय ते ज्यातें[6]
त्या धीरमुकुटमणिच्या वर्णील कवी हि काय तेज्यातें?
धर्मच्युति[7] नोहे, जरि गेला परतोनि धर्म शिबिरा,[9] हे,
ज्याच्या कीर्तिश्रवणें स्वर्गीं होउनि सलज्ज [8]शिबि राहे.
वस्त्रप्रासादीं शुभशयनीं जातां चि भागला पहुडे[10];
तें धर्मदुर्ग[11] खचलें; जाणों उरले चहूंत दोन हुडे[12].
अतिनिष्ठुर वैकर्तन निशित[13]शरांहीं यथेष्ट चाचावी[14],
तेंवि न कधीं च उग्रग्रह राहु हि काय इंदुचा चावी.
पल्यंकावरि[15] पडला, पांडुपृथापुत्र पावला पीडा,

१. गरुडाने पाहिलेल्या सापाच्या स्थितीला (गर्भगळितपणाला). २. नक्षत्रगणांत. ३. ज्याला मांड्या नाहींत तो (अरुण). ४. धर्म. ५. प्राणविहीन. ६. ज्या धर्मातें. ७. क्षत्रियधर्मापासून च्युति. ८. या नांवाचा एक दानशूर राजा. ९. डेऱ्यांत, तंबूत. १०. निजे. ११. तो धर्मरूपी किल्ला. १२. [नकुलसहदेवरूपी] बुरूज. (भीमार्जुन या वेळीं धर्माजवळ नसल्यामुळें त्याचा धीर खचला होता, यावर कवीनें ही उत्प्रेक्षा केली आहे). १३. तीक्ष्ण बाणांनीं. १४. जखमा करी. १५. पलंगावर.

वैरिविजित[1] विक्षतवपु विमुखत्वें[2] वीरवर वरी व्रीडा[3]. ६
माद्रेयांसि म्हणे नृप, 'भीमाचे सिंहनाद हे परिसा;
शत्रूंसीं भांडतसे बाहुबळें करिकुळांसवें हरिसा. ७
जा तेथें त्यापासीं, जैसे मारुत[4] सहाय दावांतें,
भावातें भेटा, जें प्रेम बळ कौर्य शौर्य दावा तें.' ८
धर्माज्ञेनें गेले, भीमासि सहाय जाहले यम ते;
श्रम तेजस्वी गणिते तरि, मर्त्यत्वीं[6] अमर्त्य[7] कां गमते? ९
द्रौणि पुन्हा पार्थासीं युद्ध करायासि आदरें आला;
पथिक[8] क्षुधित ब्राह्मण दातृगृहा जेंथ फारदा धाला. १०
कृष्णातें बाणानीं झांकी, आश्चर्य दाखवी मोटें:
मर्त्य किति? अमर्त्यानीं तेव्हां तोंडांत घातलीं बोटें. ११
जें अस्त्र पार्थ सोडी तें वारि द्रौणि, लेश आटेना:
कोण्हीं तदन्य आहे काळ असें त्या रणांत वाटेना. १२
तेणें तीं बाणानीं दक्षिणभुज वेधिला अरिकराचा[10];
बहु मानिला प्रताप क्रुद्धें हि धनंजयें अरिकराचा[11]. १३
पार्थ शरौघें गुरुसुतबळ, मारुत जलदपटलसें दूर
पळवी; तदस्रकणगण[12] गगनिं गमे उधळिला चि सेंदूर! १४
भूतांचे संघ म्हणति, 'सद्यःस्रुतशोणितापगा[13] वाहो;
तें चि करि भूतपतिच्या प्रिय[14]; कोणीं तत्प्रताप गावा हो!?' १५
रथिसारथितुरगशतें वधिलीं, हतशेष पळविले पर ते;
एका द्रौणिहुनि दुजा कोण्हीं हि न जिष्णुवरि रणीं परते. १६
द्रौणि पविप्रतिमशरें उर ताडी जिष्णुचें, तऱ्हीं उर तें

१. शत्रूकडून पराजित. २. युद्धात पराङ्मुख झाल्यामुळें. ३. लाज. ४. वायु. ५. वणव्यास. ६. मनुष्यपणीं. ७. देव. ८. पांथस्थ. ९. तृप्त झाला. १०. चक्रपाणी कृष्णाचा. ११. शत्रूच्या हाताचा. १२. त्या सैन्याच्या रक्तबिंदूंचा समुदाय. १३. तत्काळीं च वाहिलेल्या रक्ताची नदी. १४. शंकराचा भक्त, अर्जुन.

चूर्ण न होय शिवोरःस्पर्शें चि; न लव हि अन्यथा उरतें. १७
पार्थ छेदी द्विजधनुः होय रविकरा हि ज्यांमधें न रिघ,
करि घनशरपटल असें, तों टाकी क्रुद्ध विप्र तो परिघ. १८
परिघ अरिघनसमीरें पार्थें पविहतनगापरि छिन्न
करितां, तो विप्र दिसे त्रिपुरहर क्षोभला परिच्छिन्न. १९
स्वशरसमूहसमीरें उडउनि रिपुरचितशरजवनिकेला,
तेजःप्रकाश विप्रें, जेंवि दवें तृण गिळोनि वनि, केला. २०
'रे! मीं अश्वत्थामा आहें, आलों पहा, सहा बाण,'
ऐसें गर्जे, हाणी शर शत त्या जो प्रभू जगत्प्राण. २१
मग तीन शत शरानीं ताडी पार्थासि विप्रसिंह रणीं,
तेव्हां जिष्णु क्षोभे जेंवि श्रीरुद्र विश्वसंहरणीं. २२
मर्मीं गुरुपुत्रातें हाणी, तन्सूनजीवना शोषी.
रोषी पार्थ कृपीसुतपरिभवकामें प्रताप बहु पोषी. २३
तेव्हां अभ्रांतमना तो परमोदार विप्र वाहांतें,
प्रबळांतें ही आवरि, वेळा जसि वारिधिप्रवाहांतें. २४
अश्व हि आवरि, करि शरसंधान हि विप्रसिंह निकरानें,
झांकी पार्था. जेंवि क्षेत्रा दुष्काळ शलभनिकरानें. २५
त्या कर्मातें पाहुनि सर्व म्हणति, 'साधु! साधु! बापा! हो
संतुष्ट, तुज तुझा सप्रेम स्वर्गस्थ देव बा पाहो.' २६
त्या समयीं मधुरिपुसख हांसे, क्षिप्र क्षुरप्रशर सोडी,
द्रोणीच्या अश्वांचे सर्व हि रश्मि क्षणांमधें तोडी. २७
रश्मि छेदुनि दाविति अश्वांला पार्थशरकशा सरणीः

१. शकराच्या उर.स्पर्शानें. २. आयुधविशेष. ३. शत्रुरूप मेघास वाऱ्यासारख्या. ४. स्पष्ट ५. अर्जुनानें केलेल्या बाणाच्छादनाला. ६. सहन कर. ७. श्रीकृष्ण. ८. प्रलयकालीं. ९. आकर्षून घेई. (ठार करी). १०. रागीट. ११. अश्वत्थामा. १२. वाढवी. १३. निःशंक मनाचा. १४. घोड्यास. १५. समुद्रकिनारा. १६. शेतास. १७. टोळधाडीनें. १८. अर्जुन. १९. अर्जुनाचे बाणरूप चाबक. २०. मार्ग.

सद्गुरुहरिसखजितखळगुरुहरि टिकतील हो! कशास रणीं ?
असतां विद्या प्रज्ञा धैर्य सुदीर्घायु तूणचाप शुची,
अश्व पळाले; झाला परिभव; संगति न भद्रदा पशुची. २९
जयशरसमूहपवनें उन्मथिली कुरुचमू-महामळकी;
भट-आंमळक विखुरले; होय तयांची मुखप्रभा मळकी. ३०
मागें पांडवभटहरि, पळति पुढें अरिसमूहमृगकळप;
तैं प्रार्थिला कुरुवरें रक्षाया कटक कर्ण कुरुवळप. ३१
प्रकट करी त्या समयीं वैकर्तन भार्गवास्त्रतेजातें,
दीपासि पतंग तसे, स्वात्मार्पण करिति शत्रु ते ज्यातें. ३२
तत्काळ शत सहस्र प्रयुतार्बुद कोटि अस्त्रसंभूतें
शरवृंदें वीरशिरें हरिति, वहायासि काय शंभूतें! ३३
वृष भार्गवास्त्रतेजें करि शत्रुबळीं, जसें हर त्रिपुरीं.
युद्ध किती वर्णावें? तैं रक्तांच्या, भरे धरित्रि, पुरीं. ३४
कृष्णातें पार्थातें कर्णहत समस्त वीर बोभाती:
जन्हि दुर्दशा चि, तन्हि हरि आठवतां दुर्दशा न शोभा ती. ३५
वणवा वनास लागे त्यांत जसे भाजतां गज भ्रमती,
न मतीस उपाय सुचे, अस्त्रानळदग्ध सैनिक श्रमती. ३६
पार्थ म्हणे, 'श्रीकृष्णा! भृगुरामें भार्गवास्त्र जें कथिलें,
त्याचा प्रयोग केला कर्णानें; सैन्य आमुचें मथिलें. ३७
या अस्त्राचें वारण मज तों वाटे अशक्य अत्यंत;
केला चि सूतपुत्रें रथिसादिगजाधिरोहपर्यंत. ३८
वारंवार मजकडे पाहतसे कर्ण उग्र अंतकसा,
माझ्या हातें याचा युद्धीं होईल आजि अंत कसा? ३९

१. सद्गुरु जो श्रीकृष्ण त्याच्या मित्रानें (अर्जुनानें) जिंकलेले दुष्टाचे मोठे घोडे. २. भाते व शर. ३. कल्याणदायक. ४. मोठें आंवळ्याचें झाड. ५. आंवळे. ६. कौरवसेनाधिपति. ७. परशुरामानें दिलेल्या अस्त्राच्या तेजास. ८. दहा लक्ष व दहा कोटी. ९. अस्त्रापासून निघालेली. १०. हाका मारती.

कर्णापुढें पळावें हें तों मरणापरीस फटकाळ[1];
ठाकावें[2] तरि संप्रति वाटे मज हा करील गट काळ. ४०
असतां जीवंत पुरुष जय ही पावे, पराजय हि पावे;
मरतां भंग चि; कैंचा जय? हे सारे विचार तुज ठावे.' ४१
कृष्ण म्हणे, 'कर्णानें राजा[3] बहु पीडिला, तया आधीं,
चाल, पहा, आश्वासीं[4]; मग कर्णातें वधूनि जय साधीं.' ४२
ऐसें वदोनि कृष्णें हय चालविले नृपाकडे जाया,
पार्थ म्हणे प्रभुसि, 'पहा वीरमणींच्या विचित्र सेजा[5] या. ४३
घोर[6] नसे सावध; पँळभुग्भुक्त[7] हि धीर भुलविलेसे जे,
युद्धश्रांत[8] भटमणी अस्वप्नसुखार्थ[9] पहुडले सेजे. ४४
हत हय गज नर शतशः क्षतजनद्या मांसकर्दम हि झाले,
चाले यांत हि अविहतगति[10] तव रथ, पोटिंचें न जळ हाले. ४५
समरसरीं[11] फुलले भटपद्म नवे, अप्सरा महामधुपी[12],
स्वर्गोचित वपु अभिनव जें त्यांचें कोणती न तें मधु[13] पी? ४६
हर! हर! नरवर खरतरशरनिकरीं ओंविले पहा शतशा;
या माळा क्षितिस जशा, मणिमाळा शोभविति कधीं न तशा!'
प्रभुसीं बोलत बोलत, रण देखत, निजनृपासि शोधीत
भीमापासीं पावे, धैर्यें धर्माधिवेग[14] रोधीत. ४८
'आर्या[15]! राजा कोठें? बाधे तद्दर्शनें[16] चि भी मातें,'
ऐसें पुसे धनंजय जातां चि महारणांत भीमातें. ४९

---

१. लाजिरवाणें. २. समोर उभे रहावें. ३. धर्म. ४. धीर दे. ५. शय्या. ६. शवमास खाण्यात गर्क झाल्यामुळें कोल्हा सावध नव्हता. ७. मास खाणाऱ्या कोल्ह्यानी खाल्लें आहे ज्यांस असे. ८. युद्ध करून दमलेले. ९. स्वप्नसुखाप्रमाणें क्षणिक सुखासाठीं नव्हे, तर शाश्वत अशा [स्वर्ग] सुखासाठीं. १०. अकुंठित गति. ११. रणरूप सरोवरांत. १२. मोठ्या भ्रमरी. १३. शरीररूप. १४. धर्म न दिसल्यामुळें होणाऱ्या मानासिक दुःखाचा वेग. १५. श्रेष्ठा! १६. त्याच्या न दिसण्यानें.

भीम म्हणे, 'ज्या दुःसह शाळींचा मृदु हि कोंबलेश तशा
धर्माच्या देहाला कर्णशरव्याळ झोंबले शतशा. ५०
झाला बहु खंडिततनु, जैसा शरणागतार्थ शिबिराजा;
गेला फिरोनि भाग्यें जीवंत. असोः पहा, स्वशिबिरा जा.' ५१
पार्थ म्हणे, 'आर्या! त्वां शीघ्र पहावा नृपाळ तो, जावें;
तिमिरेलयीं विधुतें रवि, तेंवि मज रिपुक्षयीं नियोजावें.' ५२
भीम म्हणे, "मी मागें एक हि पद या रणांत नेदीन,
मज रिपु म्हणतिल 'भ्याला,' अयशें हि मळोनि, काळें ने, दीन.
वत्सा महानुभावा! जा तूं चि, करू नको चि आग्रह रे!
ने याला; हय हाकीं, वांच सख्या! वर्षशतक साग्र हरे!" ५४
पार्थ म्हणे, 'संसप्तकवीरांचें न करितां रणीं दमन,
आर्या! अशक्य दिसतें माझें मनुजेश्वराकडे गमन.' ५५
भीम म्हणे, 'संसप्तक कौरव मज सर्व पावले, जा गा!
आहे निकट निजगदा, जगदाद्य दयाळु देव ही जागा.' ५६
पार्थ म्हणे, 'गोविंदा! आर्यकिलें कीं? समग्रकार्याचा
भर घेतला; पहा हो! अद्भुत बाहुप्रताप आर्याचा.' ५७
हर्षें असें म्हणे त्या विजयाला देव कृष्ण, 'पथकरितों
युक्त चि हें; हो घनवन परि त्यांत भस्म कृष्णपथ करितो.'
भगवान् भीमासि म्हणे, 'दुष्कर कांहीं च बा! नसे तूतें;
रक्षो परमेश्वर तुज आमुचिया रणसमुद्रसेतूतें.' ५९
ऐसें वदोनि हाकी नाकीशध्येयपाद वाहांतें,
जाय नृपीं सोडाया निजकरुणामृतरसप्रवाहांतें. ६०
शिबिरासि शीघ्र जाउनि कृष्ण रथावरुनि उतरले क्षिप्र,

१. अधकाराच्या नाशाविषयीं. २. योजना करावी. ३. न देईन. ४. महापराक्रमी अर्जुना! ५. हे वाक्य कृष्णास उद्देशून आहे. ६. सपूर्ण. ७. माझ्याकडे लागले. ८. भीमाचा. ९. स्वीकारतो. १०. दाट अरण्य. ११. अग्नि. १२. इंद्रादिदेवांनीं ध्यान करण्यास योग्य आहेत पाय ज्याचे असा कृष्ण. * काळ कठतो.

गेले हळूहळु नृपापासीं, धनमानमति जसे विप्र. ६१
नमिले आधीं कृष्णें मग पार्थें वंद्य पाय रायाचे;
धर्में आदरिले ते प्राणांहुनि अधिक आदरायाचे. ६२
रवि अश्विनीकुमारां, इंद्रोपेंद्रांसि कश्यपमहर्षी,
भेटे कृष्णांतें नृपः न दुजा त्यासम, न त्यां हि सम हर्षी. ६३

## अध्याय चाळिसावा.

(धर्मार्जुनसंवाद).

वाटे धर्मासि असें कीं, मारुनि कर्ण, विजय कळवाया
आले नृसिंह दोघे, मनिचा तद्भयमहेभ पळवाया. १
त्यांतें प्रमोदगद्गदवाचेनें गौरवी, नव रचील
विधि अमृत तरि 'तयासम भूपोक्ति' म्हणेन, तुच्छ वरचील.
"या कृष्णा! या पार्था! वांचा वत्सर शतोपरि क्षेमीं.
वधिला कर्ण, बहु बरें. न वदा, परि जाणतों परिक्षे मीं. ३
रामाचा प्रियशिष्य, प्रख्यात प्रबळ, उग्र अंतकसा,
कुरुपतिशुकपविपंजर, त्याचा केला रणांत अंत कसा? ४
सुरतरु अर्थिजनांचा, निजमित्रचकोरचंद्र, अहितांचा
यम आम्हां सकळांचा, केकयपांचाळचेदिसहितांचा, ५
कर्ण कसा हो! वधिला? आलां क्षेमीः भले भले कवि हो!;
सोमान्वयप्रताप प्रेक्षुनियां दिवससोमसा रवि हो. ६

१. धन व मान मिळविण्याची बुद्धि असलेले. २. आदर करण्यास योग्य असे. ३. हे सूर्याचे पुत्र. ४. देवदानवाचा बाप. (कश्यपास अदितीपासून इंद्र व उपेंद्र –वामन–असे पुत्र झाले). ५. कर्णापासून प्राप्त झालेले भय हा च कोणी मोठा हत्ती. ६. आनंदभरित वाणीने. ७. धर्माचे भाषण. ८. वरकड, इतर सर्व पदार्थ. ९. कुशल. १०. खुणेस. ११. दुर्योधनरूप पोपटाला वज्राच्या पिंजऱ्यासारखा असा (कर्ण). १२. शत्रूंचा. १३. चंद्रवंशाचा प्रताप. १४. दिवसाच्या चंद्रासारखा. (तेजोहीन).

सांगों काय? पहा हें वपु कर्णें तासिलें कसें अकृपें;
भीष्में न, द्रोणें न, द्रौणीनें न, न नृपें, असें न कृपें. ७
बहु धैर्य धरुनि त्यासीं म्यां केलें शुद्ध युद्ध जरि, तरि तें
असम चि तैसें, जैसें समरीं पाचारिलें गजें हरितें. ८
युयुधानादि समस्त हि जिंकुनि करि विरथ मज रणीं कर्ण;
जालें जें तच्छ्रवणें माझे चि कढोत, न तुमचे, कर्ण. ९
युद्धांत वांचलों हा भीमाचा चि प्रभाव; भावानें
भावानें[1] युद्धीं वपु भागविलें मत्परस्वभावानें[2]. १०
मरतों तरि यश होतें: मरणीं धाकें पळे तया पशुची
गति घडली मज; पापी मीं तापास्पद[3]: सदा अताप[4] शुची[5]. ११
तें चि वृषीं आलें जें होतें अत्युग्र तेज बा! रामीं,
न भयें निजलों, वत्सर हा एक, वनांत ते हि बारा, मीं. १२
विश्व ब्रह्ममय बुधा, कर्णमय मला हि: अब्द[6] तेरा मीं
तप्त चि राक्षससा[6]: परि मेले झाले चि राम ते रामीं[6]. १३
शयनासनाशनस्थितिगति[7] जें जें कर्म कर्ण तो यांत
दिसतो; बहु काय वदों? पाहुनि होतों विवर्ण[8] तोयांत. १४
तेणें केली माझी, अरिची हि न, दुर्दशा, अहा! बा! हो.
वधिला असा हि दारुण; धन्य त्रिजगांत तूं महाबाहो! १५
सांग कसा वधिला? त्वां धरिला संकोच फार कां? टाकीं;
वांचविलें, उद्धरिला मद्धृदयांतील कर्णकांटा कीं. १६
अस्त्रीं राम चि, साक्षाच्छक्र बळीं, यम चि विक्रमीं कर्ण,

१. श्रद्धेनें. २. मत्परायण स्वभाव ज्याचा अशा भीमानें. ३. दुःखास पात्र. ४. तापरहित. ५. निष्पाप. ६. श्रीरामामुळे ज्याप्रमाणें राक्षस त्याप्रमाणे कर्णामुळे मी तेरा वर्षे तप्त आहे. तथापि ते राक्षस अखेर रामाच्या हातून मरून रामरूप तरी झाले. पण मी मात्र कर्णाच्या हातून न मरतां तसा च उरलो आहे. ७. निजणें, बसणें, जेवणें, स्वस्थ असणें, हालचाल करणे वगैरे जें जे कर्मे [ मी करितों ] यांत तो कर्ण [ मला ] दिसतो. ८. निस्तेज.

वधिला कैसा, वद; त्या वृत्तसुधेनें भरीन मीं कर्ण. १७
मारील अर्जुनाला जयशाली हा सुयोध नेमानें,
या भावें सर्वस्वें पूजियला जो सुयोधनें मानें; १८
धृतराष्ट्र हि ज्या मानी पुत्र चि, न निजा सुसंगरहिताला[1];
दे अंगदेशराज्य हि राधेयाला सुसंगर-हिताला[2]. १९
त्याचें मुकुटालंकृत शिर तत्सुहृदांसमक्ष समरांत
छेदुनि झालासि कसा विजयी, वृत्रघ्न[3] जेंवि अमरांत? २०
'अर्जुन दाविल त्याला देइन गज षट् गवादि जें इष्ट,'
ऐसें म्हणे, रणीं तो केला कीं त्वां शरोत्करें[4] पिष्ट! २१
'मीं पार्थ वधीन' म्हणे, दे नित्य सुयोधनासि सुखराशी;
वधिलें कीं धर्ममृगव्याधा[5] राधासुतासि मुखरासी[6]. २२
'पादौ न धावयिष्ये पार्थे जीवत्यहं कदापीति[7]'
ज्याची व्रतप्रतिज्ञा[8] दुर्जन मानुनि सुधा सदा पीती. २३
कृष्णेसि सभेंत म्हणे, 'या दुर्बळपतितसत्वहीनांतें,
दीनांतें त्यजिसि न कां दृढदुःखव्यसनजाळमीनांतें[9]?' २४
तेव्हां आम्हीं गमलों ज्या मदपात्रास दास, दासी ते:
ऐकवि वाणी जो, दशमुख जैसा त्रासदा सदा सीते. २५
'अर्जुन वधिल्यावांचुनि मीं मागें न परतेन' असि वाचा
जो वदला, वत्सा! त्वां वध केला कीं तया चि अशिवाचा[10]! २६
वामाक्षिभुजस्फुरणें[11] संकट कळलें असेल तरि च रणीं
धावोनि कर्ण वधिला; बहु सावध तूं चि आर्यपरिचरणीं[12]. २७

१. साधुसगतिरहित दुर्योधनाला. २. समरांगणी हितकर्त्या अशा कर्णाला. ३. वृत्रासुरहंता इंद्र. ४. शरसमूहाने. ५. धर्मरूपी मृगाचा पारधी जो कर्ण त्यास. ६. वाचाळास. ७. पार्थ जीवत आहे तोपर्यंत मी कदापि पाय धुणार नाही अशी. ८. पादधावन न करण्याच्या व्रतासंबंधाची प्रतिज्ञा. ९. अत्यंत दुःख ज्यात अशा संकटरूपी जाळ्यांतील मासे च अशांस. १०. अशुभप्रद अशा कर्णाचा. ११. डाव्या डोळ्याच्या व बाहूच्या स्फुरणाने. १२. वडिलांच्या सेवेविषयीं.

त्या संकटीं तुझें म्यां स्मरण प्रभुचें गजें तसें केलें,
बा कृष्णा! भीरुकृत हि सफळ चि, न ध्यान तें वृथा गेलें. २८
जो [१]सर्वगर्वपर्वत, हरि! आम्हां '[२]षंढतिल' म्हणे, हांसे,
कंठांत घातले कीं त्याच्या काळें तुझ्या बळें फांसे! २९
कुरुगुरुशांतनवप्रभु 'अर्धरथ' म्हणे, म्हणोनि जो त्यासीं
स्पर्धा करि, हंसासीं बकसा, कीं जेंवि काच मोत्यासीं. ३०
मज दुःसह [३]दीप्तहृदयकुंडींचा कोपवह्नि कंपा दे;
याचा [४]उपशम वृषवधवृत्तांतजळाविना न संपादे." ३१
इत्यादि धर्मवाक्यें ऐकोनि म्हणे [५]जय, "प्रभो! परिसा.
संसप्तकांसि मारित असतां दैत्यांसि संगरीं हरिसा, ३२
तों ये द्रौणि महात्मा, मज कृष्णाला हि घावरें चि करी,
मग म्यां तो हि पळविला, सिंह [६]विक्षत करूनि जेंवि करी. ३३
द्रौणिपराभवकाळीं म्यां कौरवसैन्य फार आटविलें,
दुर्योधनादिकांला 'सर्व हि मेलों' असें चि वाटविलें. ३४
स्वबळक्षय अवलोकुनि मजवरि ये कर्ण कोपला [७]भवसा;
अस्त्राग्नीनें जाळी अस्मत्कटका, जसा [८]शिखी [९]यवसा. ३५
प्रथम तुज द्रौणीनें मग कर्णें पीडिलें असें कळलें;
बहु पाहतां हि न तव ध्वजचिन्ह रणांगणांत आढळलें. ३६
त्वद्दर्शनार्थ झालें मन बहु उद्विग्न आमुचें, न टिके;
प्रभुकुशळवृत्त न कळे; वाटे, करितों प्रयास कां लटिके. ३७
कर्ण हि महास्त्रतेजें दुःसह [१०]कल्पार्कसा पहावेना;
रुद्रापुढें टिकों ये, परि पळभरि त्यापुढें रहावेना. ३८
मज कर्ण अशुभदर्शन, [११]पथिका अहि जेंवि सुप्रकट काळा;
टाळा म्यां त्यासि दिला, [१२]काळा बुध देति जेंवि [१२]फटकाळा. ३९

१. अत्यंत गर्विष्ठ. २. पोचट तीळ. (नपुसक). ३. पेटलेल्या हृदयरूपी कुंडांतील ४. शांति. ५. अर्जुन. ६. फार घायाळ. ७. शिवासारखा. ८. अग्नि. ९. गवतास १०. प्रळयकालीन सूर्याप्रमाणें. ११. वाटसरूस. १२. दुर्धर अशा यमास.

आर्या! आधीं आलों अवलोकाया तुझीं पदांबुरुहें[1];
सर्वां कार्यांमध्यें प्रथम उचित कार्य सेवकां गुरु[2] हें. ४०
यावरि गांठि पडावी, मारीन चि त्या तशा हि उग्रास.
क्षुधित मदीयशरभुजग मिळतां गिळितील कां न सुग्रास?
चाल, रथीं बैस, विभो! ये [3]अभिनववृत्रवध पहायास;
गुरु [4]संनिधान असतां नलगे तन्मारणीं महायास. ४२
आजि सपुत्र सबांधव कर्ण न वधितां घडो [5]अधःपतन;
जतन करीं पण आशीर्वादें, बुध रक्षिती जसें वतन. ४३
आर्या! आज्ञा मज दे; ठेवूं दे स्वपदपंकजीं माथा;
न रिपुपिपीलिककटकें भक्षावा भीमभुजग भूनाथा!” ४४
कर्ण असें, हें कळतां, जिष्णुकडे वक्रदृष्टिनें पाहे;
[6]क्षतजप्रतिमाक्ष क्षितिनाथ क्षण न [7]क्षमावशीं राहे. ४५
राजा म्हणे, “अहा! रे बापा! या पाददर्शनाकरितां
व्यसनीं भीम त्यजिला, सांपडला ही उपेक्षिला अरि [8]तां. ४६
व्यसनीं बंधु त्यजिला, वृथा पृथाकुक्षिमाजि आलासी;
राधेयातें पाहुनि विमुख क्लीबा! रणांत झालासी. ४७
‘कर्ण वधीन’ असा त्वां द्वैतवनीं मजसमीप पण केला;
तो आजि [9]आजिमाजि त्यजितां पुरुषार्थ तव वृथा गेला. ४८
भ्यालासि आधिरथिला, सिंहाला मृग तसा, पळालासी,
पंचममासीं च न कां पृथोदरांतूनि तूं गळालासि? ४९
जरि म्हणसील ‘असा म्यां कार्याचा घेतला चि न पथकर,’
तरि [10]सर्वस्वप्राणाधिकदयितमुकुंदपादशपथ कर. ५०
पण न करितासि तरि कां शिरतों या संकटांत? घात कसा

१. पदकमलें. २. मुख्य. ३. [कर्णरूपी] नवीन वृत्रासुराचा वध. ४. समीप. ५. नरकवास. ६. रक्तासारखे लाल डोळे झालेला. ७. क्षमेच्या अधीन. ८. त्वा. ९. युद्धांत. १०. सर्व वैभव व प्राण यांहून अधिक प्रिय अशा कृष्णाच्या पायाची शपथ.

केलासि बहु भरवसा देउनि? हा ! न कळलासि घातकसा.
विश्वासघात केला, त्यजिलें आणूनि शत्रुभूपांत;
त्वां दोर कापिला कीं आम्हां घालूनि अंधकूपांत ! ५२
होता फार भरवसा तेरा वर्षें तुझा चि, कीं अहितें
कर्णें छळिलें, त्यातें वधिशील रणीं शिखी जसा अहितें. ५३
तें सकळ विफळ झालें, कीं, वंध्यद्रुम[1] उपासिला; चुकलों;
थुकलों न राज्यरुचिवरि[2]; विषयप्रेमें[3] महासुखा मुकलों. ५४
जेव्हां शतशृंगनगीं[4] प्रसवलि तुज पांडुची पृथा राणी,
तेव्हां सप्तमदिवसीं झाली उच्चैस्तरां[5] नभोवाणी. ५५
"देवि पृथे ! तव सुत हा सूर[6], इतर सर्व शूर नक्षत्रें;
यांचा क्षण हि पराभव करिजेल रणीं कदापि न क्षत्रें[7]. ५६
हा पांडव खांडववनदाहीं जिंकील देवसैन्यांतें;
याच्या द्वेषें सर्व हि भूतें वरितील दीर्घदैन्यांतें. ५७
केकयमद्रकलिंगप्रमुखांचें यश हरील; कुरुनिधन[8]
हा चि करिल; जतन करीं, बहु रक्षीं कृपण जेंवि पुरुनि धन.
'यासम हा चि धनुर्धर' म्हणतां उपमन्युसुरतरु[9] रुसेना.
रण विसरतिल रिपुचमू, जेंवि हरिसमक्ष सुरत रुरुसेना[10]. ५९
इच्छील तरि समस्तां भूतांतें वश करील हा निखळ[11];
याच्या सख्यें वरितिल सुख बुध, वैरें स्वभद्र[12]हानि खळ. ६०
कांतिगुणें चंद्रासीं, वेगगुणें हा समान वातासीं,
होईल अतुळशौर्यें तुल्य महात्मा जयंततातासीं[13]. ६१
राज्ञि ! क्षमागुणें हा त्वत्सुत तुळितां तुळेल धरणीसीं,

१. फळ न येणारा वृक्ष. २. राज्याकांक्षेवर. ३. ऐहिकसुखाच्या इच्छेने. ४. शंभर शिखरें असलेल्या 'शतशृंग' नांवाच्या पर्वतावर. (आर्या० आदि० अ० १८ वा पद्य). ५. फार मोठ्याने. ६. सूर्य. ७. क्षत्रियाने. ८. कौरवांचा संहार. ९. उपमन्यूचा कल्पवृक्ष जो शिव तो. १०. हरिणाचा कळप. ११. निखालस. १२. कल्याण. १३. इंद्राशीं.

स्पर्धा करूं शकेल चि अद्भुततेजःप्रतापतरणीसीं. ६२
[1]घांसाघांसि न करितां करिल चि लक्ष्मीकरूनि धन[1]दासीं;
औदार्यगुणें यातें प्रार्थुनि कवि जोडितील[2] वन[2]दासीं. ६३
भस्म करिल अहितकटक, जैसा दवदहन निबिडतम[3] कक्ष[3];
ज्ञाते म्हणतिल भुजबळ पाहुनि 'हा चक्रपाणिसम[4]कक्ष.' " ६४
असि वाणी शतशृंगीं झाली, सन्मुनिजनें हि आयकिली;
[5]पळतां सत्य कसी ती न कळे? [6]चुकली असेल काय [6]किली?
कर्णभयास्तव पळतां झाली च नभःसरस्वती फोलः
नवल गमे, नर चि न हे, ते देव हि अनृत बोलती बोल! ६६
मुनिवर सदा स्तविति तुज, तद्वचनाचा हि धरुनि विश्वास
न सुयोधनासि लवलों, झालों उपहास्य आजि विश्वास. ६७
[7]त्वष्ट्यानें रथ रचिला, केतुशिरीं कपिवर, प्रबळ घोडे,
गांडीव चाप, भाते अक्षय, उपमेसि सागर हि थोडे. ६८
[8]अशनीस हि न वळेसी कांचनपट्टावनद्ध खड्गलता,
प्रभु सूत, असें असतां, काळासी ही करील रण भलतां[10]. ६९
भीरो! धीरोचित हें साहित्य असें असोनि जें पळणें?
मरण रुचे वीरांला, न रुचे क्षणमात्र अपयशें मळणें. ७०
होतासि सूत जरि तूं गांडीव [11]गदाधरासि देतासि,
कर्णासि मारिता प्रभु, माझ्या करिता चि पूर्ण हे[12]तासि. ७१
अद्यापि तरि करीं हें [13]निजसंधासागरांत तरसील.

---

१. हा सपत्नाच्या योगाने अगदी सहज कुबेराशी [स्पर्धा] करिल च. २. मेघाच्या बरोबरीचा मानतील. ३. अतिदाट असे अरण्यातील वाळलेले गवत. ४. विष्णूसारखी आहे योग्यता ज्याची असा. ५. [कर्णाला भिऊन] पळून येत असतां. ६. ती आकाशवाणी ज्या पुरुषाविषयीं झाली तो पुरुष अर्जुन नसावा की काय? ७. देवांच्या सुताराने. ८. वज्रास. ९. जिला सोन्याचा म्याना आहे अशी. १०. दुसरा एखादा. ११. कृष्णास. १२. हेतूस. १३. आपल्या प्रतिज्ञारूप समुद्रांत.

परि न करीं हें, समरीं कर्णासि विलोकितां चि मरशील ! ७२
शस्त्रास्त्रज्ञ स्वाधिक कटकीं कोणी असेल जो राजा,
गांडीव त्यासि दे हें, क्लीबा ! हो शीघ्र पाठिमोरा, जा. ७३
क्लीब[2]करीं ही असतां बहुत चि केला प्रताप चापानें,
अघनाश रामनामें जैसा जपतां हि घोरपापानें[3]. ७४
भीम चि धीर, तया दे धनु, तो कर्णादि शत्रु मारील;
व्यसननरकमग्नांतें आम्हांतें तो चि वीर तारील. ७५
शिरतासि न कुंत्युदरीं किंवा च्यवतासि[4] पांचव्या मासीं,
तें चि श्रेय तुज, न हें. वीरांसीं क्रीडनें न रामांसीं[5]. ७६
विरथ विशस्त्र न होतां, कर्ण शर न झोंबतां हि अंत्रांसीं[6]
केलें अपयान कसें ? झालासि कसा निमग्न संत्रांसीं ?" ७७

# अध्याय एकेचाळिसावा.

ऐसीं वचनें वमला धर्म, पयोनिधि[10] जसीं विषें[11] असितें;
तेव्हां त्यासि वधाया क्षुब्धमना श्वेतवाह घे असितें[12]. १
झाला क्रुद्ध धनंजय, 'मारीन' म्हणे मर्नी, न लेश वदे;
तें समजे स्वाश्रितजनतारक, भलतें घडों न, केशव, दे. २
कृष्ण म्हणे, 'पार्था ! हें काय ? करीं घेतला कशास असी ?

१. धमराज म्हणतो, " गांडीव कृष्णाला दे व तू त्याचा सूत हो असें मी म्हटलें खरें; पण असे हि करू नको; कारण, तू सूत होऊन कृष्णाबरोबर रणांगणात गेलास आणि तेथें कर्णाला पाहतां च मेलास तर ! २. उत्तरगोग्रहणप्रसंगीं बृहन्नडारूपी तुझ्या हातीं. ३. मोठ्या पातक्यानें. ४. गळून पडतास. ५. वीरांबरोबर [युद्धरूपी] क्रीडनानें [श्रेय होय]; स्त्रियांबरोबर [शृंगाररूपी] क्रीडनानें न. ६. आंतड्यास. ७. पलायन. ८. अत्यंत भयांत. ९. ओकला. ( बोलला ). १०. क्षीरसमुद्र. ११. काळीं. १२ खड्गास.

योद्धव्य[१] मीं न पाहें; दिसती तव दृष्टि कां नवीच्च असी? ३
ज्यांवरि असि उचलावा, जे तापाचे महाउरग[२] दाते,
भीमाची समरसखी[३] त्यांचें फोडित असे उर गदा ते. ४
बहु दूर युद्धचत्वर[४], तेथें ते धार्तराष्ट्र बा! पाहें;
आलासि नृप पहाया; हा राजाः शिबिर होय बापा! हें. ५
कुशली विलोकिला नृप, हर्षाचा समय, यांत हें काय?
नसतां वध्य कशाला असि? हा आम्हांपुढें असे राय. ६
श्वेताश्वा! तूं कोणावरि करणार प्रहार? काशाला
नग्न करिसि असिला, वदः उपसावा खड्ग शत्रुनाशाला. ७
भ्रमलासि काय वेड्या!? गुरुसुत केव्हां चि पळविला बा! तां;
शिबिरा आर्य[५] पहाया आला आहेसि पांडवा! आतां.' ८
अर्जुन म्हणे, "मुकुंदा! न भ्रमलों, सावधानचित्त असें;
असिधारणप्रयोजन पुससी, तरि तें असे मनांत असें. ९
जो 'गांडीव[६]शरासन दे अन्याकारणें' म्हणेल मला,
मारावा चि, असो तो प्रिय, अप्रियः सुज्ञ, मूर्ख; दुष्ट, भला. १०
माझें गुप्त व्रत हें गांडीवप्राप्तिपासुनीं आहे;
राजा तसें चि वदला; सत्यच्युतिला न दास हा साहे. ११
यास्तव मीं धर्मशिरश्छेद करीन, स्वसत्य रक्षीन;
संरक्षितां प्रतिज्ञा दुर्गतिदुष्कीर्तिला न लक्षीन. १२
म्हणती बुध, 'प्रतिज्ञावचन करावें चि जतन. नर कां तें
स्वहित न करितिल? जावें कां हो! पावोनि पतन नरकांतें?'
मज तों संमत ऐसें; तुज कैसें यांत वाटतें विहित[७]?
धर्मज्ञा! तूं चि करीं, अंधा दावूनि वाट, तेंवि हित." १४
'शिव! शिव! हर! हर!' ऐसें बोलोनि प्रभु म्हणे तयासि, "कवी[८]
नाहीं उपासिले त्वां, धर्माचें तत्व यद्द्या सिकवी. १५

१. युद्ध करण्यास योग्य असा. (शत्रु). २. मोठे साप. ३. युद्धांतील मैत्रीण (गदा). ४. रणांगण. ५. धर्म. ६. गांडीव धनुष्य. ७. योग्य. ८. साधु.

हें आतां चि समजलें तुज वृद्धोपासना[1] नसे घडली,
तरि च तव विचारनयनहीना[2] मति या भ्रमावर्टी[3] पडली. १६
धर्मज्ञ पुरुष न असें करिल, जसें करिसि जाल्मलीला[4] हे.
न लघु.सुगुणः न गुरु अगुणः तुळसीची सरि न शाल्मली[5] लाहे.
'सत्य चि धर्म' म्हणसिः तत्त्यागीं भीसी हि तूंः परंतु भला
पंडित न गमसि जरि बहु पांडित्य हि करिसिःदिससि बाळ[6] मला.
धर्मविनिश्चय नेणे, जो करि भलतें चि, अधम तो वेड्या !
अविवेकें दृढ बांधिति, तुटति विवेकें दृढ क्रियाबेड्यां[7]. १९
सत्यानृततत्त्वाचे जे ज्ञाते[8] ते चि सर्वधर्मज्ञः
निजनिश्चय कथिति जया होय जनीं तो चि कर्ममर्मज्ञ. २०
कार्याकार्यांचा तों निश्चय पार्था ! असे महागूढः
नेणसि. असा चि मोहे जन कार्याकार्यनिश्चयीं मूढ. २१
गुरुला शरण न जातां, अध्ययनश्रम न भोगितां, शास्त्र
कैंचें ? कार्याकार्यज्ञाना शास्त्राविना नव्हे पात्र. २२
तें शास्त्र तुज न ठावें, रक्षाया इच्छितोसि धर्मातें !
कर्मातें करिसि अशा जेणें होतोसि पदं[9] अधर्मातें. २३
प्राणिवध अधर्म असें न कळे तुज धार्मिका कसें ? न तरे
येणें जन. गुरुधर्म[10] प्राण्यवध[11] चि, हें चि आमुचें मत रे! २४
अनृत हि वचन वदावें, परि कोणास हि कधीं हि न वधावें:
सरस अहिंसा, न सुधा; एक हि सेउनि तिचा चि लवें[12] धावें[13].
ऐसें असतां भ्राता, तो हि स्वज्येष्ठ[14], त्यांत ही राजा,
तत्रापि[15] धर्मकोविद[16], बहु मानी ज्यासि शांतनव आजा. २६

१. ज्ञानवृद्धांची सेवा. २. सारासारविचाररूपी डोळे नाहींत जिला अशी. ३. भ्रांतिरूप खळग्यांत. ४. पामरजनाच्या चेष्टा. ५. सावरीचा वृक्ष. ६. मूर्ख ७. कर्में ह्या च कोणी बळकट बेड्या. ८. पूर्वोक्त 'ज्ञाते' हा कर्ता. ९. स्थान. १०. श्रेष्ठ धर्म. ११. प्राणि+अवध=अहिंसा. १२. बिंदु; कण. १३. तृप्त व्हावें. १४. आपल्याहून वडील. १५. त्यांत हि. १६. धर्मवेत्ता.

पांडुसमातें त्यातें धर्मज्ञा! मारितोसि पामरसा.
रोदन[1] करील येणें विसरविला आठवूनि राम रसा. २७
जो युद्धपराङ्मुख, जो शत्रु नव्हे, जो कृतांजळी[2], ज्याला,
पळतो, प्रमत्त[3], शरणागत ही जो, न वधिती भले त्याला. २८
तें सर्व हि कीं या तव गुरुचा ठायीं पहा, पहा नीट.
वीट न ये पापाचा; मारूं म्हणसो, असा कसा धीट? २९
ऐसें व्रत जें केलें तें बाळपणें चि, न प्रबुद्धपणें;
शुद्ध पणें लोकद्वय जिंकिति धीर, न अशा अशुद्ध पणें. ३०
धर्माची गति सूक्ष्मा, केवळ तूं स्थूळदृष्टि मुग्धा[4]! तें
व्रत रक्ष्य! वध्य हा गुरु! फुंकिसि तक्र त्यजूनि दुग्धातें! ३१
मीं[5] येथें नसतों तरि गुरुला वधितासि की! अहा! देवा!
न बुडों दिला स्वदास व्यसनीं त्वां चि प्रभो! महादेवा! ३२
धर्मरहस्य तुला मी देतों: हो भवगद[6] प्रशांत; नवें
न, प्राचीन, रसायनसें जें द्यावें स्वयें चि शांतनवें. ३३
कीं धर्मज्ञप्रवरें धर्में कीं पंडितोत्तमें विदुरें
तुज पढवावीं तत्वें धर्माचीं मोहभूमिभृद्भिदुरें[7]. ३४[8]
तुज अथवा[9] त्या आत्याबाईनें कळवळोनि जेंवि हित
सांगावें, भावें[10] त्या कथितों ऐकावयासि जें विहित. ३५
जो सत्याचा वक्ता साधु चि तो, यांत संशय चि नाहीं;

---

१. धर्म मेला तर, त्यानें विसर पाडलेल्या श्रीरामाला पुन्हा आठवून पृथ्वी दुःख करित बसेल. २. हात जोडलेला. ३. ज्याची विचारशक्ति गेली आहे असा. ४ मूर्खा! ५. (मी) कृष्ण. (अर्जुन असा हि अर्थ संभवेल). ६. संसाररूप रोग. ७. मोहरूप पर्वतास वज्रासारखीं. ८. कवीनें या आर्येवरील पाठांतर मुळांत च धावता क्रमांक टाकून लिहिलं आहे, तें असें:–

कीं धर्मज्ञप्रवरें धर्में संमोहभूमिभृद्भिदुरें
तत्वें धर्माचीं तुज पढवावीं कीं सुपंडितें विदुरें. ३५

९. अथवा तुज–असा अन्वय. १०. प्रेमानें (मातृप्रेमानें).

बहु पूज्य सत्यवादी त्रिजगीं उपमान त्या नसे कांहीं. ३६
परि जें कीं सत्य असें केवळ दुर्ज्ञेय दीर्घबाहो ! तें
कोठें सत्य चि परमाधर्मफळाकारणें चि बा ! होतें. ३७
वदतां सत्य अधर्म चि घडतो, वदतां असत्य धर्म घडे;
आजन्म सत्यवादी त्या हि सुपुरुषा असा प्रसंग पडे. ३८
तेव्हां तशा प्रसंगीं शुचि हृत्प्रिय सत्य जरि गळां चि जडे,
पर्वीं जैसें दयितारत्न तसें कविसि सोडणें चि पडे. ३९
नित्य अशुचि अनृत तरी, समयविशेषीं सुधींसि तें होय
धर्मार्थ सेव्य, जैसें पर्वीं च क्षारसिंधुचें तोय. ४०
लग्न, रति, प्राणक्षय, सर्वस्वविनाश, विप्रकार्य, अशा
पांचां ठायीं अनृत हि बोलावें; तें करी न नाश यशा. ४१
जोडे धर्म बरा तरि अनृत हि बोलोनि धर्म जोडावा;
जोडे अधर्म सत्यें तरि सत्याचा हि संग सोडावा. ४२
सत्यानृततत्वज्ञ चि धर्मज्ञ; तदन्य मूढ फार चि तो;
धर्मरहस्य न जाणे, कर्मभर शिरीं कशास बा ! रचितो? ४३
जातीनें अधम असो, घातक हि असो, असो महाघोर;
जो काय कृतप्रज्ञ प्राज्ञमतें पुरुष तो जगीं थोर. ४४
काय नवल अंधवधें बहु पुण्यातें बलाक जरि पावे;
आश्चर्य त्यांसि वाटो, ज्यांसि कृतप्रज्ञतागुण न ठावे. ४५
तें ही काय नवल, जो तटिनींच्या संगमीं वसे विप्र,
तो धर्मकाम कौशिक मूढ बुडाला अघीं जरि क्षिप्र?" ४६
ऐसें केशववाक्य श्रवण करुनि जय म्हणे, 'महाभागा !
देवा ! तद्वृत्त वदा; पुरवाया दासकाम हा भागा.' ४७
कृष्ण म्हणे, "प्राचीना शुद्ध कथा ऐक साधुधीरा ! हे.

१. अमावास्यादि पर्वदिवशीं. (स्त्रीगमनास वर्ज्य अशा दिवशीं). २. शाहण्या मनुष्यास. ३. कार्याकार्य जाणणारा. ४. अंधमृगाच्या वधानें. ५. या नांवाचा एक मुख्य व्याध. ६. नद्यांच्या. ७. तसदी घ्या. ८. साधुश्रेष्ठा !

पूर्वी एक बलाकव्याध वनामाजि साधुश्री राहे. ४८
स्त्रीपुत्रपोषणार्थे मृग मारी, परि करी न बहु हिंसा;
कीं व्हावा बहु दुःसह जठरानळताप भलतसा हिंसा[1]. ४९
वृद्ध पिता, माता ही वृद्धा त्यांतें स्ववृत्तिनें रक्षी;
आश्रितजनासि अर्पुनि जें राहे तें चि तो सदा भक्षी. ५०
कोणाला हि न दूषी, सत्य मधुर हित वदे, न दे ताप,
निजधर्मपथ न सोडी, जोडी दाटूनि न स्वयें पाप. ५१
तो साधु व्याधपती एका दिवशीं वनांत मृग धुंडी;
दैवें एक हि न मिळे जेथ मृगांच्या सदैव बहु झुंडी. ५२
भ्रमला, श्रमला, 'शम[2] लाज मेला न मेलाब्धिला[3]' म्हणे, हांसे;
स्वकुटुंबपोषणार्थ चि धांवे घेऊनि शर, धनू, फांसे. ५३
फिरतां फिरतां गेला कोणा एका वनीं धनुष्पाणी,
तों तेथ पीत होता एक श्वापद विचित्रसा पाणी. ५४
तो घ्राण[4]चक्षु अंध श्वापद दुरूनि जेधवां पाहे,
व्याध म्हणे, 'हें अद्भुत कोठूनि अरिष्ट पातलें आहे? ५५
ऐसा न पाहिला म्यां, आयकिला ही नसे असा जंतु*;
हिंसास्वधर्मनिरता मज कैसा दुष्टमारणीं मंतु?' ५६
ऐसें बहुधा चिंतुनि तेणें मर्मी च हाणिला बाण;
प्राण क्षणांत गेले; व्याधासि विमान ये, तुझी आण. ५७
आलें विमान सुंदर, आले गंधर्व, अप्सरा आल्या,
झालें सुकुसुमवर्ष[6] हि, झाले वाद्यध्वनी, स्तुती झाल्या. ५८
'झालें असें कसें' जरि म्हणसी तरि ऐक; भूत* तें दुष्ट
पूर्वी उग्र तप करी, त्यासाठीं होय आत्मभू[7] तुष्ट. ५९
'वर माग' असें म्हणतां, तें भूत म्हणे, 'क्षुधातुरा तर्पी[8];

१. हिंवसा, हिंवाच्या तापाप्रमाणें थड, शांत. २. शांति. ३. मला पापसमुद्राला ४. नाक च आहे डोळा ज्याचा. (वासावरून ओळखणारा). ५. अपराध. ६. वृष्टि. ७. ब्रह्मदेव. ८. तृप्त कर. * प्राणी.

देवा! समस्त भूतें म्यां भक्षावीं असा चि वर अर्पी.' ६०
ब्रह्मा म्हणे, 'दिलें, जा; परि तूं होसील सर्वथा अंध;
तुज चक्षु घ्राण असो, कळवील पदार्थ घेउनी गंध.' ६१
तें सर्वभूतनाशीं कृतनिश्चय[1] भूत मारितां, व्याधा
भूताभयदान घडे; कीं, सर्वांचो निवारिली बाधा. ६२
अंध प्राणी वधितां नीच मृगव्याध लाधला सुगती;
दुर्ज्ञेय धर्म पार्था! ज्ञानमदें साधुलोक कां फुगती? ६३
हिंसक तरे विचारें, बहु सत्कृत जाहला असा नाकीं;
सत्यें विप्र बुडे तें कथिन; परि व्यग्रधी[2] असाना कीं. ६४
कौशिकविप्र तपस्वीश्रेष्ठ बहुश्रुत असे, वसे उटजीं;
जाणे भूतहितान्यज्ञानें[3], स्वपरांसि करिति हिंपुट जीं. ६५
ग्रामाबाहेरि, न बहु दूर, नदीसंगमीं असे उटज,
जेथें बकुल तमाल न्यग्रोध[4] रसाल[5] शाल्मली[6] कुटज[7]. ६६
सत्य सदा बोलावें तप मुख्य नसे चि या तपापरतें,
ऐसें धरिलें होतें सत्यव्रत कौशिकें अपापरतें. ६७
सत्यव्रतनिष्ठ असा विप्र असे; तो पहा कसें झालें;
यावें स्वर्गफळ जया सत्यव्रततरुसि नरकफळ आलें! ६८
तस्करभयें पळाले जे काय धनी, घनीं[8] वनीं क्षिप्र
जीवनधन रक्षाया शिरले, जाणे तयांसि तो विप्र. ६९
मागूनि चोर आले, पुसती सत्यव्रतासि ते लोभी;
सांगे धनी वनींचे[9]; कीं, बहु सत्य त्यजावया तो भी. ७०
'वनिं धनिक निकट' कटका दस्यूंच्या कथि, वदे मृषा न मुनी;

१. सर्व प्राणिमात्राचा नाश करण्याविषयीं केला आहे निश्चय ज्यानें. २. 'सत्यें विप्र बुडे' हें ऐकून उद्विग्नचित्त होऊं नकोस. ३. जीं स्वेतरज्ञानास तुच्छ लेखतात अशीं प्राणिमात्राचें कल्याण करणारीं शिवायकरून सर्व ज्ञानें त्याला अवगत होतीं. ४. वटवृक्ष. ५. आम्रवृक्ष. ६. सावरीचा वृक्ष. ७. कुड्याचें झाड. ८. निबिड अशा. ९. वनांत लपून राहिलेले.

ते दुष्ट तुष्ट होउनि गेले त्या सत्यशिववृषा[1] नमुनीं. ७१
वदलों 'सत्य शिव' असें युक्त चि; परि तो न वृषतुळापात्र;
शिववृष विश्वनमस्कृत, त्यातें 'पशु' म्हणति अज्ञजन मात्र.
धन फार तस्करानीं रानीं संपादिलें वधूनि धनीं;
दुर्गति पडे मुनिगळां, जसि दयितगळां[2] सतीवधू निधनीं[3]. ७३
धर्माची अतिसूक्ष्मा गति, सू[4] क्ष्माकुक्षिमाजि[5] तसि आहे;
लाहे गुरुप्रसादज्ञानांजन जो सुदृष्टि तो पाहे. ७४
म्हणुनि उपासावे जे शांत सदय तत्वबोधचंचु[6] कवी;
ते चि ज्ञानप्रसवीं[7] क्षमः सर्पातें न सर्पकंचुक[8] वी. ७५
न विचारितां तराया जो घालील स्वयें चि नर कास,
तो धर्मरत हि तत्व न कळतां जाईल उग्र नरकास. ७६
सद्धर्मबोध विनता सच्छिष्या, सिद्धरस[9] जसा कथिला,
कीं लोहा स्पर्शमणी, होय तसा जो गुरूत्तमें कथिला. ७७
धर्मी अधर्म हि असे, धर्म अधर्मी हि; म्हणुनि सत्तर्क[10]
श्रुति अनुमान हि पार्था! धर्महृदयपद्मबोधकर अर्क[11]. ७८
जीवांचा प्रभव[12] जया कर्मे तें कर्म धर्म बा! समज;
तो धर्म जी अहिंसा; हें चि कळे तत्व केशवास मज. ७९
जे हिंसक उग्र तयां धर्म अहिंसा चि मुख्य कथिलाहे;
कोण्ही हि असो प्राणी, पुष्कळ कल्याण या चि पथिं लाहे. ८०
करितो धारण यास्तव 'धर्म' म्हणावें, प्रजांसि जो धरितो[13];

१. सत्यरूपी शिवाच्या नंदीबैलाला. २. नवऱ्याच्या गळ्यात. ३. मरणकाळी. ४. मही. ५. पृथ्वीच्या पोटांत. ६. तत्वज्ञाननिपुण. ७. ज्ञानोत्पत्ति करण्याच्या—ज्ञानप्राप्ति करून देण्याच्या—कामीं. ८. सापाची कात. ९. पारा. १०. शास्त्राला धरून असलेला तर्क. ११. धर्माच्या हृदयरूपी पद्माचा विकास करणारा (धर्माचें रहस्य उघड करून दाखविणारा) सूर्य. १२. उत्पत्ति. (उत्कर्ष). १३. पतन व नाश यांपासून संरक्षण करितो.

धारण[१]संयुक्त असा धर्म स्वोपासकांसि उद्धरितो. ८१
'[२]प्राज्ञस्तोषं जनयेत्तदेव शिवपूजनं' अशा [३]उक्ति
दाखविति, [४]पारदार्यादिक म्हणती धर्म, मृत्युला मुक्ती. ८२
स्थापिति [५]पाखंड [६]कवी वेदोक्तिविरुद्ध धर्म मोक्ष असें.
त्यांसीं बोलों हि नये, त्या दुष्टमतीं न धर्म लेश असे. ८३
वेदोक्तीसीं नसतां विरुद्ध जें प्राणि[७]शर्मकर कर्म,
त्यातें म्हणतों [८]आम्हीं सांदीपनिसिंधुजीवनद 'धर्म.' ८४
'धर्माच्या संदेहीं [९]निर्णायक वेदशब्द ही नाहीं;
तेंवी च [१०]लौकिकीं ही युक्ति पहातां असे चि ना कांहीं; ८५
तेथें काय करावें' म्हणसी तरि ऐक सांगतों मित्रा!
धर्माची बहु सूक्ष्मा गति आहे आणिखी [११]महाचित्रा. ८६
विप्रें चोरी केली, तें कळलें कर्म आपणा साचें;
याचा संदेह तया झाला, नेलें समस्त धन ज्याचें. ८७
कथितां घात [१२]स्तेनां विप्राचा, न कथितां हि धनिकाचा;
तेथें मौन धरावें. हा धर्म म्हणों नको चि मनिं काचा. ८८
मौनें हि सिद्धि नसतां, स्पष्ट वदाव्या विचारितां आणा,
अनृत नव्हे तें, सत्य चि, भावोजी! तुम्हि असें मनीं आणा.
व्रत घेउनि कर्म विहित न करी तो स्वीकृतव्रतफळाला
पावेना चि कधीं ही; दांभिक फटकाळ केवळ [१३]जळाला. ९०
मरणीं, विवाहकाळीं, [१४]ज्ञातिवधीं, मर्मभेदनावसरीं,

---

१. पाळला जाणारा. २. शहाण्यानें संतोष उत्पन्न करावा (सुखाभिवृद्धि करावी) हें च शिवपूजन. ३. वचनें. ४. परस्त्रीगमनादिक. ५. नास्तिक. ६. बुद्धिकुशल. ७. जीवांना कल्याणकारक. ८. सांदीपनी (श्रीकृष्णाचा गुरु) हा च समुद्र, त्यास मिळणारे जीवरूपी नद जे आम्ही. ९. निर्णय करणारा. १०. सामान्य जनाच्या युक्तिवादांत. ११. अतिविचित्र. १२. चोर अशा. १३. नाश पावला. १४. कुलाचा नाश होत असतां.

ज्ञात्या मृषोक्ति तारी; न बुडवि वरुणासि[1] भग्ननाव सरीं. ९१
जो रानीं चोरानीं धरिला तेणें घडावया मुक्ति[2]
लेश विचार न करितां बोलाव्या तेथ शत मृषा उक्ति. ९२
असतां शक्य न द्यावें धन चोरांला, मृषा हि बोलावें:
राहे धन, पुण्य घडे अनृतें, तरि कां सुखें न डोलावें? ९३
अनृतें वांचत असतां अनृत न बोलेल, वित्त चोरासी
देईल त्यासि तें धन शापील: पहा पुसोनि थोरांसी. ९४
तस्माद्धर्मार्थ अनृत वदतां सत्यव्रता नसे हानी;
ऐसा चि विचार मनीं धरिला सद्धर्मसद्रसेहानीं[3]. ९५
हें धर्माचें लक्षण, न अतिक्रमितां चि धर्ममर्यादे,
कथिलें म्यां सुहृदें तुज; यासि स्थळ हृदय मित्रवर्या! दे. ९६
तत्व यथामति कथिलें धर्माचें म्यां तुला अतापार्थ:
कीं, मज वाटे, पावो कीर्ति सुधर्मज्ञसंमता पार्थ. ९७
हें सर्व ऐकिलें कीं? इकडे मज मातुलात्मजासि[4] पहा;
बोल विशंक स्वमुखें, जरि तुज वाटेल वध्यसा नृप हा." ९८

## अध्याय बेचाळिसावा.

---

(अर्जुनकृत धर्मनिंदा व स्वस्तुति).

अर्जुन म्हणे, " विशुद्धज्ञानघना! गुरुवरा! हितकरा! या
ऐशा व्यसनसहस्रीं तूं चि क्षम आमुचें हित कराया. १
जैसा हा ऐसा चि स्वाश्रितजन तार. कोप दे शमळें,

१. वरुण हा समुद्र व पर्जन्य यांचा अधिपति; त्यास त्याची नाव सरोवरात फुटली तरी बुडवील कशी? तद्वत च सर्व धर्माधर्मांच्या ज्ञात्याला प्रसगविशेषीं खोटें बोलावें लागलें तरी त्यापासून भय नाहीं. २. सुटका. ३. सद्धर्मरूप सद्रसाची इच्छा करणारानीं. ४. मामाच्या मुलास. ५. पाप.

हें जाणत भुललों; परि नुरवि तुझा तारकोपदेश मळ. २
भवदुपदेशसदंजन ल्याली मति, सर्व मोहपडळ मळ
गेला चि पद्महस्ता! विवेकदृष्टींत लेश न डळमळ. ३
आर्याचें चि न केवळ, माझें हि न, धर्मसेतुचें हि तसें
रक्षण केलें बा! त्वां; तुजविण कोण्ही नसे दुजें हितसें. ४
हें व्रत म्यां चि न केलें, भीमें हि असें चि कीं, 'म्हणेल मला
'तूवरक[1]' असें जो तो जन मारावा, असो असाधु, भला.' ५
तूं माता, तूं चि पिता, दाविसि लाविसि हिता पथा नीचा.
तव उपदेश चि निववी, दे रस पीतां हि ताप थानींचा. ६
गति तूं चि आमुची बा! आश्रय आम्हांसि तूं चि मावासा[2]!
महिमा तुझा नव्हे गा! या ब्रह्मांडोदरांत मावासा[3]. ७
तूं आद्यगुरु समस्तां धर्मज्ञांचा, तुझें चि मत मानें;
बा! भवदुपदेश तसा, दशशतकर[4] ही लयासि न तमा ने. ८
राजा अवध्य कळलें, धर्माधर्माबुदुग्धहंसा[5]! रे!
संसारेभमृगपते[6]! संशय उरला नसे चि कंसारे! ९
वध हि न घडे, प्रतिज्ञारक्षण ही होय, वद असें कांहीं;
देवा! न म्हणावें तव भक्ता 'भग्नप्रतिज्ञ' लोकांहीं. १०
तापें उलतां, सकरुण दीनासि म्हणेल कोण 'न उल' गडी?
संकटपाशनिबद्धप्राणिगणाला त्वदन्य न उकलगडी[7]." ११
"नृप वध्य नव्हे. आतां, 'रक्षीं' म्हणसी जरि 'प्रतिज्ञा[8] ती,'
तरि ऐक; वतन बुडतां न उपेक्षिति[9] बा! अरिप्रति ज्ञाती[10]. १२
मग तूं तों कृष्णाचा प्रियसख सर्वस्व; जें तुला जड तें
मजला चि, सख्या! जैसें मातेस चि दुःख, जें मुला जडतें.

१. खाडू, नपुंसक. २. लक्ष्मीनिवासा! ३. मावण्यासारखा. ४. सहस्रकर सूर्य. ५. धर्म व अधर्मरूपी दूध व पाणी हीं निरानिराळीं करणाऱ्या हंसा! ६. संसाररूप हत्तीच्या सिंहा! ७. सोडवी. ८. कृष्ण म्हणतो. ९. मागें अध्याय ४१ । १० पहा. १०. एककुलोत्पन्न. ( आपसांत वैमनस्य असलेले भाऊबंद ).

हो आमुची प्रतिज्ञा मिथ्या, परि बा! तुझी न व्हो कांहीं,
तें आमुचें चि यश, तुज वर्णावें 'सत्यसंध' लोकांहीं. १४
जीवंत तों असावा धर्म, वधावा न हाणतां असिला,
युक्ति असे, घे; तूं मम सर्वस्वा पात्र, मग न कां असिला? १५
जरि मान्य मान पावे तरि तो जीवंत जीवलोकांत;
तो मानभंग होतां जीवन्मृत, बुडति आप्र शोकांत. १६
भीमादि तुम्हीं भ्राते सर्व हि संमानितां सदा राया;
भजतां विशुद्ध भावें पांडुपृथाबुद्धिनें सदारा या. १७
मान्यातें 'तूं' म्हणतां, करितां अवमान, होय वध; मानीं.
गुरुनिंदा लेश करीं, करिजेते सर्वदा हि अधमानीं. १८
ज्ञानवयोवृद्ध, मुनीश्वर, शूर हि मानिती अशा शुचितें,
त्वां आजि एकवार्वा वचनें जीं खळजनाननीं उचितें. १९
अपमानें गुरूचा वध होतो शस्त्राविणें चि तुंकारें;
हें चि अथर्वांगिरसी श्रुति सांगे 'मान्यघात हुंकारें.' २०
अपमान तुवां करितां स्ववध चि केला असें गमेल नृपा;
मग पंदनमनीं न मनीं कोप प्रभु धरिल, करिल फार कृपा. २१
अनृतापासूनि असा स्वगुरुवधापासुनीं हि हो मुक्त;
या धर्मसंकटीं तों आम्हांला हें चि भासतें युक्त. २२
देईल सकृप नृपवर तुज आशीर्वाद पाद धरितां चि;
करिल क्षमा क्ष्मामाधव: निवतें सुजनमन नमन करितां चि. २३
हें तों अत्यावश्यक कार्य स्वार्यप्रसाद घे आधीं;

१. चक्र घेऊन भीष्मावर धावन जाऊन कृष्णाने भक्तासाठीं आपली प्रतिज्ञा मोडली. २. तर. ३. अशा युक्तीला. ४. जीवत असून मृतवत. ५. पांडू व कुंती यांच्या ठायीं असलेल्या आदरबुद्धीने. ६. स्त्रीसह अशा. ७. केली जाते. ८. 'तू' या वर्णाने. ९. 'हु' या वर्णाने. १०. चरण वंदिल्याने. ११. प्रतिज्ञाभंगरूप खोट्यापासून. १२. धर्माचरणाचे बाबतींत आलेल्या संकटामध्ये. १३. भूपति. १४. आपल्या ज्येष्ठ बंधूचा आशीर्वाद.

मग सगणें[1] कर्ण मारुनि निर्मळ यश शस्त्रिभूषणा[2] ! साधीं." २४
जिष्णु म्हणे धर्मातें, 'राया ! करिसी वृथा चि कुत्सा, हें
तरि शोभतें तुज जरी टिकतासि रणांगणांत उत्साहें. २५
त्यजुनि रण तुज न टिकवे दूर कोशावरी हि, तो[3] मातें
निंदिसि, उच्चपदस्थित शिवशिरधत्तूर[4] जेंवि सोमातें[5]. २६
निंदो तो मज, मर्दी जो शतशः संगरीं गज, गदीश[6],
जैसा कल्पांतींचा रुद्र महात्मा अभंग जगदीश. २७
युद्धीं जो उत्साही साहित्या ही रथादिका न गणी,
गजयूथीं सिंह तसा शिरतो स्वबळें भटप्रधानगणीं[7]; २८
जों बहुबळ रिपु पाहे तों हर्षे फार भीम, शर भाते
विसरे, भुजीं च कवळो. जिंकिति अरिहरि न भीमशरभा ते;
तो त्वदधिक मदधिक मज निंदो, तूं निंदिसी बळें कवणें?
गुडें[8] निंदिजे तदधिकें खंडें[9], परि कोणत्या गुणें लवणें? ३०
जो गांधारीसुतशतघातख्यातव्रत स्वतः[10]क्षम तो
निंदो मज, निजधर्मी त्वदधिक शिक्षाक्रियादिकें[11] गमतो. ३१
खळबळजळधिप्रति मीं वडवानळ[12], तो अगस्त्य[13], तूं वटसा[14]:
भट साचा नससि, दिससि भटसा, चाळविसि या जना नटसा.
गज आजि आठ शत ज्या वीरें घटिकेंत मारिले, जरि तो
निष्ठुर बोलेल तरी बोलो; विक्रम तसा चि तो करितो. ३३
जो भुजबळसंपन्न क्षत्रिय तो चि प्रसिद्ध हें लोकीं,

---

१. सपरिवार. २. शस्त्रधाऱ्याचें भूषण च अशा ( अर्जुना )! ३. अशा प्रकारचा तो न. ४. महादेवाच्या मस्तकावरील धत्तरपुष्प. ५. चंद्रातें. ६. गदाधरश्रेष्ठ भीम. ७. मोठमोठ्या योद्धयाच्या समुदायांत. ८. गूळ. ९. साखरेनें. १०. स्वतां च समर्थ असा. ११. शिक्षण व पराक्रम इत्यादिकांनीं. १२. या नांवाच्या समुद्रशोषक अग्नि. १३. सर्व समुद्र एकदम प्राशन करणारा ऋषि. १४. प्रलयसमुद्राच्या लाटांचे दुःसह आघात बसत असतां हि नष्ट न होणाऱ्या किंवा त्याचा कांहीं प्रतिकार हि न करणाऱ्या अक्षय्यवटासारखा.

वाँग्बळ* तो चि ब्राह्मण; तूं वाग्बळ वेद सर्वदा घोकीं. ३४
ब्राह्मण मृदु, तूं निष्ठुर, निंदिसि मज, तूं चि निंद्य, मीं न जनीं.
सर्वस्व भजतां परि नाहीं सुख पावलों तुझ्या भजनीं. ३५
वेचुनि धन सुतरत्न हि, जीवित संकल्पिलें तुझ्या कार्जी,
तदपि वदसि असें वचनें, न वदावीं शत्रुला, न रंका जीं. ३६
कृष्णातल्पीं[1] बैसुनि अवमानिसि मज महारथघ्नातें.
जें काय स्वहितकरीं निष्ठुरपण साजतें कृतघ्ना तें. ३७
यद्यपि कथिला स्वमुखें स्ववधोपाय हि तुला, तथापि तया
वधिता काय शिखंडी, धृतराष्ट्राच्या महारथा पितया[2]? ३८
पांचाळ रक्षिला म्यां, वधिला म्यां तो[3] हि: काय कापूस[4]
भांडेल ज्वलनासीं? हें त्या चि सुसाधुनायका पूस. ३९
तुज राज्य काय होय द्यूतरता? नेकसी[5] च हितवाचा.
स्वाश्रयसह नरकांत चि बुडतो स्त्रीबंधुवर्ग कितवाचा[6]. ४०
सहदेव द्यूताचे दोष वदे, तुज न सोडवे, गा! तां[7]
केला घात, न शंकसि आम्हांवरि आजि गोंडवे गातां![8] ४१
रिपुबळजळानिधिमाजि हि कोण्ही तरि जन तरेल अक्षत रे?
श्रुत जरि असेल तरि वद, कोण्ही द्यूतीं धरूनि अक्ष[9] तरे? ४२
शिवलासि जेधवां त्या अक्षांला कुरुसभेंत तूं पूज्य,
अस्मत्सुखासि पडलें तेव्हांपासूनि आजिवरि पूज्य. ४३
दोहीं पक्षीं व्हाया वीरक्षय हेतु हे तुझे पाय,
बा! यश भला केला; गावें माहात्म्य बा! तुझें काय? ४४
मेले नृप नृपनंदन, झाल्या विधवा वरस्त्रिया कोटि,

१. द्रौपदीच्या शयनावर. २. पितृतुल्य अशा भीष्मास. ३. भीष्म. ४. भीष्मास. ५. न ऐकसी. ६. जगाऱ्याचा. ७. त्वा. ८. आपण च सर्व घात करूनसवरून आमच्या नांवानें खडे फोडण्याला तुला आज शंका वाटत नाहीं. ('गोंडवे' हा शब्द येथे उपरोधिक योजला आहे). ९. फासे. * वाक्पांडित्य करणारा.

खोटी धरितासि न मति तरि होती हानि कां असी मोटी ?
करि कुशळक्षयदक्षां[1] अक्षां जो स्पर्शे तो चि हा कर कीं,
येणें चि राज्य बुडउनि आम्हां स्ववंशांसि[2] लोटिलें नरकीं. ४६
शब्दप्रतोद[3] टोंचिसि, खोंचिसि, पडतात काळजासि घरे;
खदिरांगारस्पर्शें बहु कठिन हि लोह तापतां विघरे[4]. ४७
आम्हां हतभाग्यांला एक दिलें दुःख, हें चि बहु; देवा!
भोगूं द्या तें आधीं; द्यावें न दुजें: दयाकरा! ठेवा.' ४८
ऐसी गुरुनिंदा करि; परि धरि हरिसख असह्य अनुताप;
तापप्रद होईल चि घडतां भगवज्जनास ही पाप. ४९
भगवदनुमतें केली, संकट जाणोनि धर्म रक्षाया;
तदपि बहु व्याकुळ करि गुरुनिंदा स्वगुरुदास्यदक्षा या. ५०
पुनरपि कपिकेतन घे असि, त्यासि तदा गदाग्रज[5] विचारी:
'कां गा! खड्ग उपसिला? मज भाससि तूं नसा चि अविचारी.'
फाल्गुन म्हणे, ' प्रभो! मीं गुरुनिंदक, मज न दे चि सुख काय;
करितों स्ववध स्वकरें, दावावें म्यां जनांत मुख काय?' ५२
देव म्हणे, ' रे सुज्ञा! गुरुची निंदा करूनि दुःख असें;
हत्या केली असती तरि मग करितासि सांग काय कसें? ५३
यास्तव म्हणतों नाहीं तुज वृद्धांची उपासना घडली;
धर्म न जाणसि कांहीं; भ्रांति तुझ्या बुद्धिच्या गळां पडली.
काय म्हणावें तुजला वेड्या! करितोसि आत्मघात कसा?
पातक सामान्य न हें; निंद्य नसे अन्य आत्मघातकसा. ५५
जातासि घोर नरकीं भ्रातृवधें रक्षितां हि त्या सत्या[6].
अत्याकुळ घोरतरीं नरकीं तुज करिल हे तुझी हत्या. ५६
केलें गुरु गुरुनिंदापातक म्हणवूनि आत्मघात कवी

---

१. कल्याणाचा नाश करण्यात दक्ष असलेल्या. २. तुझ्या आधीन ( आज्ञेत ) असणाऱ्यांस. ३. शब्दरूप टोंचण्याचे साधनविशेष. ४. वितळे. ५. गद ( बलराम ) आहे अग्रज ज्याचा तो, कृष्ण. ६. प्रतिज्ञारूप सत्या.

कोण करिल? तें प्रायश्चित्त कसें, जें अनंत पातक वी? ५७
आम्हां इष्टां मित्रां धर्मादिसहोदरांसि शोकांत
घालूं पाहसि मागुंति[1] आत्मवधें, हें अयुक्त लोकांत. ५८
स्ववध करावा चि असा आग्रह जरि कीं असेल चित्ताचा,
आम्हां तों मान्य नसे, कृपणांसि जसा विनाश वित्ताचा. ५९
आतां असें तरि करीं, न चुके जन चालतां पथें बा! गा!
स्वगुणोदधिच्या स्वमुखें एका, टाकूनि ताप, थेंबा गा. ६०
परनिंदेनें परवध, आत्मस्तवनें हि आत्मवध होतो.
हो तोष या वधें; तो सर्वांचा वध, न आत्मवध हो! तो.' ६१
फाल्गुन म्हणे, 'तथास्तु;' प्रभुच्या वचनें स्वयें स्वगुण वर्णी,
लाजत होता पूर्वी जो निजगुणगीत ऐकतां कर्णीं. ६२
ज्यासि महेश सुदुर्लभपददर्शन, यश हि, करुनि आहव[2], दे,
तो साधु सज्य कार्मुक धरुनि असे स्वगुण शुभ्रवाह वदे. ६३
"राया! एक धनुर्धर मीं कीं तो सद्यशःपद पिनाकी[3].
गाती मज हि प्रेमें प्रभुचे[4] बंदी जऱ्ही तदपि नाकी.[4] ६४
मीं असतां उघडावा तिसरा देवें[5] क्षयार्थ कां डोळा?
मत्सम अन्य धनुर्धर नाहीं लोकत्रयांत, धांडोळा[6]. ६५
हा वीर असा आहे, जरि आज्ञा देव तो करिल याला,
राया! घडी न भरतां नेयील चराचरा तरि लयाला. ६६
केला दिग्विजय, बळें नृपजन चि न धनद[7] ही करद केला,
म्यां राजसूय मखपति अतिदुष्कर तदपि सिद्धिला नेला. ६७
माझ्या तेजें चि मयें[8] येउनि रचिली महीवरि सभा, जी
खळदृष्टिसि, घूकांच्या दृष्टिसि भानुप्रभेपरिस, भाजी. ६८
मीं चापबाणपाणि स्वरथीं समरांत जेंवि शंकरसा;
माझ्या भुजाश्रयें तुज राया धर्मा! भजे विशंक रसा[9]. ६९

१ पश्चात्. २. युद्ध. ३. शंकर. ४. सुकराचे. ५. शंकरानें. ६. शोधा. ७. कुबेर. ८. विशेष खलासा सभा० अ० १।१ तें ७ मध्यें पहा. ९. पृथ्वी.

जे पूर्वदक्षिणोत्तरपश्चिमदेशीय वीर भूप हि म्यां
वधिले, संसप्तक ही, त्रिजगीं माझ्या नसे तुळा महिम्या. ७०
संसप्तक थोडेसे असति, न धरितील ते हि पाप तग,
अन्वर्थ मीं [1]धनंजय, जे माजे शत्रु ते नृपा! [2]पतग. ७१
आल्या होत्या प्रबळा अकरा अक्षौहिणी स्वरिपुसेना;
अर्ध्या म्यां चि विमथिल्या, तरि हि हा नृप मज पहा [3]हरि! पुसेना!
अकरा हि मारितों मीं, किमपि अशक्य न [4]मदाशुगप्रकरा;
स्वकरा आवरिलें म्यां भीमादियशोर्थ, हें [5]मृषा न करा. ७३
भीतासि अभय देतों, अस्त्रज्ञांतें चि मारितों अस्त्रें;
देतों मान स्वजनाः नातरि करितों च भस्म हीं शस्त्रें. ७४
रथ आण, चाल कृष्णा! होवूं कर्णार्णवांत नवनौका,
हो [6]हस्तिनापुरौका धर्म, पुन्हा हो कदापि न [7]वनौकां. ७५
या धर्माच्या तेरा वर्षे हृदयीं सदैव जें सलतें,
चाल सख्या! काढूं दे, मजवांचुनि कोण काढितो [8]सल तें? ७६
वरि जें कद्रू गिळितां गुरुडें निजपुत्र साप, [9]राधा 'तें
दुःख,' म्हणो 'सह्यः' नृपा! वधितां त्या आजि सापराधातें. ७७
काढीन रिपु न वधितां कवच, न वचन मृषा, कृपा मथितों;
धर्मा [10]घर्मार्तशिखीप्रति घनसा तुज सुखार्थ मीं कथितों." ७८
ऐसें वदोनि वंदी, धर्मासि म्हणे, 'क्षमा करा देवा!
ठेवा दुरुक्ति न मनीं, मज आज्ञा द्या करावया सेवा. ७९
मीं ऐसें कां वदलों हें ही समयांतरीं कळेल नृपा!
या दासावरि देवा! तव चरणांची असो सदैव कृपा. ८०

१. धनंजय ( अग्नि ) हे माझे नाव सार्थ आहे. २. पतग. ३. प्रभुप्रति वक्ति—पंत. कृष्णास उद्देशून म्हणतो. ४. माझ्या बाणसमूहास. ५. हें खोटे समजू नका, असा भावार्थ. ६. हस्तिनापुरवासी. ७. वनवासी. ८. बाणादिकाचा अग्रभाग. ९. कर्णमाता. १०. उन्हानें पीडिलेल्या मयूरास.

राया! तव प्रियार्थ चि मम जीवित, सत्य हें तुला वाटो,
तुझिया अजातशत्रो! एक हि लव न क्षमाब्धिचा आटो. ८१
सत्वर मरेल कर्ण प्रभुच्या क्षोभें चि आजि आजींत;
तव तेज चि जयद असे मद्भुजरथचापतूणवाजींत. ८२
आज्ञा दे मज जाया, अहिता राधासुतासि माराया,
समरापासुनि भीमा मुक्त कराया, गुरूत्तमा! राया!' ८३

# अध्याय त्रेचाळिसावा.

जय विनवी, पाय धरी, मागे आज्ञा, अशांत तो धर्म
शयनावरूनि उठला; ये त्याच्या कोप मनिं, मुखीं घर्म. १
धर्म म्हणे, 'म्यां उग्रव्यसनांत तुम्हांसि बुडविलें बापा!
हें शिर खड्गें खंडीं, दंडीं मजला कुळांतका पापा. २
मीं पाप, व्यसनी मीं, मूढ, कठिन, भ्याड, आळसी, खोटा,
मोटा घातक मीं, मज मारीं; स्वहितीं करूं नको तोटा. ३
जातों वनवासा मी, तुमची पीडा समस्त वारो गा!
स्वस्थ सुखी हो बापा! जावूं दे या सुदुःसहा रोगा. ४
मीं राज्यानर्ह, कुधी, क्लीब, विचार न कळे बरा ज्यासी;
भीम महात्मा राजा राज्य करू, योग्य तो चि राज्यासी. ५
मज पाहतां असुख तुज व्हावें कीं म्हणुनि हा नसो. सवती
जैशा, परुषोक्ति तशा या मच्छ्रुतिला तुझ्या न सोसवती. ६
तुज हा कितव, न हित, वनवासोचित होय जो यशा नाशी;
जावा वनासि तरि तो जन, जाईना जरि स्मशानासी.' ७
इत्यादि धर्म वदला, उठला जाया वना तप कराया;

१. तुझ्या—धर्माच्या. २. राज्यास अयोग्य. ३. दुष्टबुद्धि. ४. सपत्नीजन. ५. कठोर वचनें. ६. माझ्या कानाला. ७. मरेना.

जें पद[१] जना अमृत, तें विष चि, न केवळ गमे सपर्क[२] राया. ८
ज्याचे पाय धराया त्यागुनि सर्वस्व होति सन्यासी,
राज्य त्यजितां तो हरि धरि पाय असें न भाग्य अन्यासीं. ९
शयनावरूनि राजा धर्म उसळला सुवृत्त[३] कंदुकसा,
त्याच्या चरणीं जडला हरि करिपतिच्या प्रगाढ[४] अंदुकसा[५]. १०
चरणीं घालूनि मिठी विनवि प्रभु जेंवि पुत्र बापातें;
प्रेमें आकर्णावें[६], वर्णावें यश[७], हरील पापा तें. ११
"राया! क्षमा करूनि श्रवण करीं सत्य सांगतों बा! गा!
रागा न धरीं चित्तीं, जागा तूं शांतिचा महाभागा! १२
असि जिष्णुची प्रतिज्ञा, 'जो 'दे गांडीव चाप अन्यातें,'
ऐसें म्हणेल त्यातें मारावें' बोलिलासि धन्या! तें. १३
हा सत्यसंध संधा रक्षाया बोलिला असें, न मदें;
माझ्या मतें चि केला बा! तव अवमान या खळश्रमदें[८]. १४
जो अवमान गुरूंचा तो चि वध, असें मजप्रति ज्ञातें
सांदीपनिगुरु वदले, तें करउनि रक्षिली प्रतिज्ञा ते. १५
या पार्थें चि न, म्यां ही केला हा तव अतिक्रम[९] व्यक्त,
देवा! क्षमा करावी; आम्हीं चुकलों तऱ्ही तुझे भक्त. १६
दे अभयदान आम्हां दोघां शरणागतां, नतां; वद या
मातुळपुत्रा[१०] 'मा भैर्वत्स[११]!' असें, मागतों तुला सदया. १७
वांछिसि तें चि घडेल चि; कीं, तूं गुरुविप्रभक्त भूपा! हें
न मृषा; राधेयाचें आजि प्राशील रक्त भू, पाहें. १८
तूं ज्याचा वध वांछिसि त्याचें राहेल काय जीवित तें?
अवितथसंकल्पा[१२]! तव न यशें त्रिजगांत काय जी! वितते[१३]?'

१. राज्यपद. २. अरुचिक. ३. गरगरीत वाटोळा ( पक्षीं ) सद्वृत्त. ४. अतिशय बळकट. ५. साखळदंडासारखा. ६. ऐकावें. ७. हरीचें. ८. दुष्टांस दुःख देणाऱ्या ( अर्जुनानें ). ९. अवमान. १०. तुझ्या मामाच्या मुलाला—मला. ११. वत्सा! भिऊं नकोस. १२. सत्यसंकल्पा! १३. विस्तार पावलेलीं अशीं.

ऐसें सांत्वन करि हरि; हरि[1] हरि[2]! हरि! धरुनि पद भजकमोहा[3].
प्रभुच्या मनीं असें कीं लोकीं निजभक्त दीन न गमो हा. २०
प्रभुनें सांत्वन केलें हरिलें सामामृतांशुनें[4] तम[5] तें,
गमतें बहु सुख हरिच्या या चरितें सर्वशांतदांतमतें[6]. २१
धर्म प्रसन्नचित्तें उठउनि भेटे प्रभूसि, कर जोडी,
विनवि, विनयरुचि[7] त्याची वाणी दे तीसि सुधा न दे गोडी.
' वदतोसि सत्य देवा! मदतिक्रमकारण प्रभो! कळलें,
मळलें होतें मन, परि केलें त्वां शुद्ध, तुजकडे वळलें. २३
देवा! हे वाहे वागमृतनदी[8] ज्यावरूनि तो कां गा!
न निवेल? दीनबंधो! निववि ज्योत्स्ना[9] हि लागतां आंगा.२४
सांपडलों होतों कीं कोपा, जसा धनी वनीं मांगा;
या व्यसनीं रक्षीसा कोण दुजा आप्त, कृष्णजी! सांगा. २५
व्यसनसमुद्रीं आम्हां उत्तारक[10] सेतु हे तुझे पाय,
आम्हीं सनाथ कृष्णा! तुजकरितां; फार मीं वदों काय? २६
जननीजनकशताधिक वत्सळ तूं चि; न अगाध अर्णव तो,
महिमा चि अगाध तुझा; चतुरा! चतुरानना[11] न वर्णवतो. २७
आम्हां तुच्छां केलें त्वां पूज्य अगा! प्रभो! दयालो! हें
जाणे जग. वर्णावी स्पर्शमणीची किती दया लोहें?' २८
नृप समजतां[12], म्हणे हरि, " पार्था! ये, बंधुला करीं नमन;
याचें प्रसन्न मजवरि झालें, तुजवरि तसें करीन मन. २९
इतुका संताप तुला झाला, जरि ' तूं ' म्हणोनि अनघातें[13],

१. दूर करी. २. आश्रयोद्धार. ३. भक्ताच्या अज्ञानास. ४. सात्वनपर भाषणरूप चंद्रानें. ५. अज्ञानांधकार. ६. शांत व दांत अशा सर्व जनांना मान्य अशा. ७. विनयाची आहे आवड जिला अशी. ८. हो तुझी भाषणामृताची नदी. ९. चंद्रकांति, चंद्रकिरण. १०. उतरून नेणारा. ११. ब्रह्मदेवाला. १२. धर्माची समजूत पटल्यावर. १३. निष्पाप अशा धर्मातें.

कसि गति होती बापा ! या पार्थिववृंदवंद्यजनघातें[1] ? ३०
झाली कृपा नृपाची, ये, पाय धरीं, हरीं अघा, बरवी
हे युक्ति; कृतावज्ञा[2] पापा गुरुपदनता न घाबरवी." ३१
प्रभुवरवचनें अर्जुन गुरुचरणांवरि शिरःकमळ वाहे,
जळ वाहे नेत्रांचें; कचं[3] म्हणति जळां रजां, 'न मळवा हे.' ३२
'मीं धर्मकामकातर[4] जें वदलों तें क्षमास्पदा[5] ! साहें.
आहे अदेय[6] अन्या तदपि वदान्या ! दिजे स्वदासा हें.' ३३
ऐसें वदे धनंजय, पायीं घाली मिठी, नुठे, विनवीः
धर्म द्रवे दयेनें, शुद्धमनीं अक्षमा न ठेवि नवी. ३४
प्रेमें किरीटिकंठीं घालूनि मिठी रडे नरेश तदाः
पुशिलें पुनःपुन्हां तरि अश्रुजळें नयनयुग भरे शतदा ! ३५
मग धर्म म्हणे, 'वत्सा ! पीडा दे पक्षिराज भुजगां जी,
ती स्वल्पा वाटे मज, कर्णाचा फार आज भुज गांजी. ३६
मरण रणीं तें भाग्य चि. मज कैंचें ? अमित जन्म जे तपले,
ते सुकृती पात्र तया, गुरुवेदाज्ञेसि जे सदा जपले. ३७
मीं काय दुर्दशा तुज सांगों ? त्वां ऐकिली असेल चि ती
झाली प्राप्त मलाः कीं, घडली नाहीं महेश्वरार्पचिती[7]. ३८
जरि तूं आज हि कर्णप्राण न घेसील तरि निजप्राण
सोडीन. जीवितीं या गोडी न, प्रियतमा ! तुझी आण. ३९
बंधुमनोरथपादप[8] सफळ करावा तुवां वसंतानें;
व्यसननिमग्नोद्धारें[9] न्यावें ख्यातीस नाव संतानें[10].' ४०

१. राजसमूहांना वंद्य अशा धर्माच्या घातानें. २. केलेली अवज्ञा. ३. धर्माच्या पायावरील धुराळ्यावर अर्जुनाचे अश्रुबिंदु पडून ते पाय मळले होते; परंतु त्यावर अर्जुन इतका लोळला कीं, त्याच्या केशांनी ते अगदीं निर्मळ झाले, असा भावार्थ. ४. [ प्रतिज्ञापालनरूप ] धर्माच्या इच्छेविषयीं अधीर. ५. क्षमास्थाना ! ६. न देण्याजोगें. ७ शिवपूजा. ८. वृक्ष. ९. संकटांत पडलेल्याचा उद्धार करून. १०. मज्जनानें.

अर्जुन म्हणे, 'प्रभो ! मीं कर्णातें आजि निश्चयें मथितों;
भीमाच्या तुझिया ही पायांचा शपथ सत्य हें कथितों. ४१
शपथ यमांचा करितों, गांडीवाचा हि, मारितों अरिला
कीं मीं मरतों आजिः प्रभुजी ! संकल्प हा मनें वरिला. ४२
कृष्णा ! हा पण आपण सिद्ध करावा; जयद्रथवध रणीं
तेंवि घडो कर्णाचाः तव कीर्ति, तव प्रताप, तव धरणी.' ४३
कृष्ण म्हणे, 'कर्ण वधीं, विजया ! तूं श्रीपुरारिचा भक्तः
व्यक्तप्रतापकीर्ति त्रिजगीं आहेसि तद्वरें शक्त. ४४
त्वां राधेय वधावा, व्हावा जय तुज सख्या ! असा काम
माझा सदैव आहेः चिंतितसें हें चि आठ ही यामें. ४५
हे काळजी तुला चि न, हा शौरि हि नित्य काळजी वाहे;
शिवभक्तिनें न बाधेः नाहीं तरि होय काळ जीवा हे.' ४६
ऐसें वदोनि केशव धर्मासि म्हणे, 'नृपा ! कृपापात्रा !
विजयाला दे आज्ञा, आशीर्वाक्कवच लेववीं गात्रा.' ४७
धर्म म्हणे, 'ये बा ! ये, आलिंगन दे, विशंक हो वीरा !
जें हित वक्तव्य वरें तें चि प्रिय बोलिलासि तूं धीरा ! ४८
न दिला म्यां हि, त्वां ही द्यावा न मनीं दुरुक्तिला जागा,
जा, गायनजनधनयश जोडीं, तूं व्यसनसेतु माजा गा !' ४९
गुरुचरणीं पार्थ जडे, जैसी मधुशर्करारसीं मुंगी.
त्याच्या शिरःसरोजीं, त्यातें भेटोनि, भूप तो हुंगी. ५०
प्राज्याशीर्वादाहीं गौरव पौरवकुळेश करि त्याचा,
मतिताप हरी, दावी गुण मेघाचा धरार्तिहरित्याचा. ५१
जिष्णु म्हणे, 'जसि मंगळहेतु त्रिपुरारिच्या शिरीं गंगा,

१. नकुळसहदेवाचा. २. महशूर आहे पराक्रम व कीर्ति ज्याची. ३. अष्टौप्रहर. ( सतत ). ४. ही काळजी. ५. आशीर्वादवचनरूप कवच. ६. बोलण्यास योग्य. ७. गायकजनांस धनरूप जे यश ते. ८. धर्म. ९. पृथ्वीची पीडा दूर करणाऱ्या मेघाचा. १०. कल्याणाला कारणीभूत.

हे भवदाशीर्द्वैवी माझ्या हि शिरीं तसी च अव्यंगा[1]. ५२
जेणें तुझा पराभव केला त्याचा कधीं न वध राहे;
मारीन आजि अरिला; प्राशिल तच्छोणितासव[2] धरा[3] हे. ५३
कर्णातें मारीन प्रभुजी! सत्यें तुझ्या पदा शिवतों;
मीं दुर्बळ चि परि प्रभु भजदभिमानी[4] असे सदाशिव तों.' ५४
नृपति म्हणे, 'विजयी हो; जा, कर्णातें वधूनि ये तूर्ण;
या श्रीहरिप्रसादें दासांचा आजि काम हो पूर्ण.' ५५
गुरुचा निरोप घेउनि, जिष्णु म्हणे, 'कृष्णजी! उठा, चाला;
आणा सज्य करुनि रथ, जोडूं सद्यश वधोनि नीचाला.' ५६
तेव्हां कृष्णाज्ञेनें दारुक रथ सज्य करुनियां आणी;
त्यावरि चढले दोघे यदुकुरुवर चक्रसद्धनुष्पाणी[5]. ५७
कर्णवधाचा केला पण, पण चिंता करी विजय वाटे[6];
सर्वांगीं घर्म सुटे, वर्म[7] फुटे, मतिस फार भय वाटे. ५८
तें जाणे हृत्साक्षी[8], जो करितां चिंतना भवा खाणी,
तो, धैर्योत्साहार्थ स्वपद्रता[9] पद्मनाभ वाखाणी. ५९
वर्णी ज्या ज्या दावी पूर्वी लीला रणांत वासवि त्या,
तेव्हां सुहृत्प्रताप[10] प्रभु तो प्रतिभट[11] करी नवा सवित्या. ६०
हरिलें भय, दिधलें बळ, वाढविलें तेज जिष्णुचें हरिनें;
भग्नोत्साह न व्हावें म्हणउनि मन बोधिलें परोपरिनें. ६१
होतां भगवदनुग्रह कर्णवधीं कायवाङ्मनें सजला;
प्रभुसि म्हणे, 'भवदंघ्रिस्वस्तरु[12] देयील जय रणीं मजला.' ६२
जाती नरनारायण, तों युद्धीं भीमसेन रणदक्ष

१. सर्वसमर्थ अशी. २. त्याचें रक्तरूप मद्य. ३. पृथ्वी. ४. भक्ताभिमानी. ५. चक्रपाणि कृष्ण व गांडीवपाणि अर्जुन. ६. वाटेने. ७. कवच. ८. अंतःकरणांतील गोष्ट जाणणारा. ९. स्वपदीं लीन झालेल्या अर्जुनास. १०. [ आपल्या ] मित्राचा —अर्जुनाचा—पराक्रम. ११. प्रतिस्पर्धी वीर. ( अर्जुन हा पराक्रमाने सूर्यासारखा तेजस्वी आहे, हा भाव). १२. तुझा चरणकल्पतरु.

बोले असें विशोका निजसारथिला, वधूनि रिपु लक्ष. ६३
'धृतराष्ट्रसुतबळाप्रति रथ ने, त्यांचें करीन मीं कदन;
मद न उरवीन त्यांचा, दावीन तयांसि मृत्युचें सदन.' ६४
दावी विशोक ती गति, ठावी युद्धांत मातलीला जे,
सह्यनदी ही जीतें प्रावृट्काळीं हि मातली लाजे. ६५
भीमरथातें वेढिति पंति अतिखळधार्तराष्ट्रकटकाचे,
झाले, परि हरिवरि करिवर जातां जेंवि तेंवि भट काचे. ६६
आधीं शिरें अरींचीं मग शस्त्रें अर्जुनाग्रज छेदी;
छिन्नभटांहीं रणभू, दर्भांहीं जेंवि झांकिली वेदी. ६७
वेष्टुनि गुडभ्रमानें अंगारातें पिपीलिक जळाले;
उरले ते मग त्यातें सोडुनि बहु दूर तेथुनि पळाले. ६८
भीम म्हणे सूतातें, 'ऐक विशोका! न चित्त भी मरणा.
सोडीना चि कधीं ही हा निर्मळकीर्तिवित्त भीम रणा. ६९
धर्मप्रवृत्ति न कळे म्हणउनि मन फार होतसे कष्टी;
अंधाचें पुष्कळ ही निष्फळ बळ होय सांडतां यष्टी. ७०
पार्थ हि अद्यापि न ये; प्रायः स्वस्थ चि नसेल राजवर;
व्यर्थ चि गेलें यश जें मेळविलें श्रम करूनि आजवर. ७१
जीवंत असति ते कीं नसति कळेनाः अहा! महाकष्ट!
झालों नृपाधिनें मीं व्याकुळ जैसा महाहिनें दष्ट. ७२
आम्हीं जन्मापासुनि बहु दुःख चि भोगिलें न सुख लेश,
जपतो हरावया हा दुर्योधन आमुचे असु खलेश. ७३
हो कांहीं तरि; आधीं करितों मीं आजि ओस खळगेहें,
वाटे खळबळ, सुपथीं कांटे, धोंडे चि, खोल खळगे, हें. ७४

१. संहार. २. इंद्रसारथ्याला. ३. सह्याद्रीतून निघालेली [मोठ्या खळखळाटाची] नदी. ४. माजलेली. ५. प्रमुख वीर. ६. भीम. ७. यज्ञभूमि. ८. गुळाच्या भ्रांतीनें. ९. शुद्ध कीर्ति हें धन ज्याचें. १०. धर्माची बातमी. ११. काठी. १२. बहुतकरून. १३. ज्यास दंश केला आहे असा. १४. दुष्टांची घरें.

सांग विशोका! माजीं शस्त्रें उरलीं किती, पहा नीट;
धीट असें मीं युद्धीं, रगडीन पदें चि रिपु जसे कीट.' ७५
सांगे विशोक, 'षडयुत[1] मार्गण आहेत, पाहिली खूण;
अयुत[2] क्षुरप्र भल्ल हि, भरले आहेत हे तुझे तूण. ७६
नाराच सहस्र युग[3], प्रदर[4] सहस्रत्रय प्रभो! आहे:
तोमर, मुद्गर, शक्ति, प्रास[5] हि आहेत पुष्कळ चि बा! हे. ७७
असुरबळीं काळीसी जी दावी खळबळीं प्रताप गदा
आहे अहितगणा, जसि हरिकीर्तिसुधा समस्तपापगदा[6]. ७८
तूझे सर्वप्रहरणजातशिरींचे[7] अनर्घ्य[8] बाहु मणी,
विजयी सदा असावे; देतिल हे अशनिला हि बा! हुमणी[9]. ७९
शस्त्रें सरलीं ऐसें चित्तीं आणूं नको, प्रभो! भांडें:
करिशिल निर्जीवन[10] खळबळ भंगुनि, जेंवि मातिचें भांडें.' ८०
भीम म्हणे, 'तरि करितों सोडुनि शर खळजनीं चमत्कृतिला;
गातील देव सत्कवि; 'अतुळा' न म्हणोत नीच मत्कृतिला. ८१
मीं सर्वांतें कीं मज सर्व द्वेषी रणांत मथितील;
आबाळवृद्ध माझें सयश सप्रेम नित्य कथितील. ८२
स्वस्थ असावा राजा, यावा जय सयदुनायक, विशोका!
हरिदर्शनें पशु हि सुखमय, मग न त्यजिल काय कवि शोका?
सूता! भूताधिपशरभग्न[11] जसे त्रिपुरदैत्य सहसा रे!
कां झाले हे कौरव भग्न? पहा पळति वीरसह सारे. ८४
जाणों अर्जुन आला; हीं शरजाळें तदन्य न रचील.
धन्वी एक हर, दुजा जिष्णु धनुर्धर, उगे चि वरचील[12]. ८५
येतां सिंह मृगांचें यूथ तसें शत्रुबळ विशोका! हें

---

१. साठ हजार. २. हजार. ३. चार. ४. बाणविशेष. ५. भाला. ६. सर्व पापरूप रोगास. ७. आयुधमात्राचे शिरस्थ मणि च असे. ८. अमूल्य. ९. टक्कर. १०. जीवरहित (पक्षी) जलरहित. ११. शंकराच्या बाणांनीं पराभूत झालेले. १२. वरकड.

झालें भग्न, भयार्त; भ्रमलें सर्वत्र; तूं हि बा! पाहें.' ८६
त्यासि विशोक म्हणे, 'यद्भुजबळनिधिला नसे अवधि राहे,
अहित न यद्दृष्टिपुढें, तद्धनुरव ऐक गा अबधिरा! हे. ८७
झालासि बधिर? कां हे गांडीवाचे न नाद आयिकसी?
आला सार्जुन यादवनाथ. उपेक्षील बाळ आयि कसी? ८८
दिसतो कपि ध्वजाग्रीं, जो तृणसम शत्रुसैनिकां गणितो;
भवदनुजकिरीटींचा दिनमणिसम झळकतो महामणि तो. ८९
प्रभुच्या दक्षिणपार्श्वीं प्रलयतरणिमंडलाभ तें चक्र,
ज्या श्रीसुदर्शनातें स्तवितो जोडूनि कर सदा शक्र. ९०
प्रभुवक्षस्थळवल्लभ कौस्तुभमणि झळकतो पहा गा! तो,
मज्जन कलंकितपना त्यजुनि सदा ज्या सुखावहा गातो. ९१
तो पांचजन्यदरवर हरिपार्श्वी शुद्ध सद्यशःपुंज
तो देवदत्त दिसतो, जो विजयश्रीविलाससत्कुंज. ९२
गज सप्तशत, चतुःशत रथ, पत्ति तुरंग अमित भवदनुजें
मथिलें; सुयोधनें जय जिंकावा, तरि न काय भव दनुजें?' ९३
मारुति म्हणे, 'विशोका! प्रियकथनें पावलों सुविश्राम;
म्यां तुज दिधले विंशति रथ, शत दासी, चतुर्दश ग्राम.' ९४

---

## अध्याय पंचेचाळिसावा.

अर्जुन हरिला सांगे, 'भीमापासीं च शीघ्र रथ ने हा.'
कृष्ण म्हणे, 'बा! नेतों. हो पूर्ण तुझी अरातिमथनेहा.' १

१. मर्यादा. २. साभिप्राय संबोधन. ३. प्रलयकालीन सूर्यमंडलवत् प्रभा ज्याची असे. ४. कृष्णाच्या उरोभागाचा अधिकारी—तेथें असणारा. ५. चंद्रसूर्यांस. ६. कृष्णाच्या बगलेत. ७. विजयलक्ष्मीचें विलास करण्याचें उत्तम लतागृह च असा. ८. शंकर. ९. दैत्यानें. १०. भीम. ११. शत्रुनाशाची इच्छा.

रथ चालवी यदूत्तम जाया भीमाकडे तया काळीं
पार्थें बहु भट वधिले, होता स्वभोग[1] ज्यांचिया भाळीं. २
दुरुनि अनुजपराक्रम पाहे भीम, प्रसन्न होय महा;
आपण हि कटक मर्दी; तें म्हणती लोक 'काय हो! यम हा?'
गज दशसहस्र, शत रथ, हय पंचसहस्र, युद्धभूमिगतें[2]
भीमें हर्षें वधिले; नरवीर हि दोन लक्ष दोन शतें. ४
समरांगणांत भीमें रक्तनदी परमदुस्तरा भरिली;
त्या हि महाभीमेनें[3] जीवन्मृतवीरवरचमू[4] हरिली. ५
दुर्योधन माम्याला सांगे, 'त्वां भीमसेन वारावा.'
वांछी पटहध्वानें[5] लोपाया प्रलयघननवारावा[6]. ६
बहु भांडे परि पडला भीमशरें पसरुनीं भुजा शकुनी,
गरुडापुढें न हंस हि गुण मिरवी; मग कसा दुजा शकुनी[7]? ७
जाला तो शकुनि करुनि रण पात्र जसा वृथा श्रमा, म्यां[8] तें
कथुनि तसें व्हावें कां? नृप पळवी मूर्छिता स्वमाम्यातें. ८
दुर्योधन भीमभयें झाला सोडूनियां मदा विमुख;
तें तच्चमू हि पार्था, सूर्याला रात्रिसी, न दावि मुख. ९
त्या समयीं अपराह्णीं[9] कर्ण क्षोभे वनीं दवानळसा;
तेव्हां भीम हि पावे कलिच्या क्षोभें पराभवा नळसा[10]. १०
कर्णशर क्षोभविती धर्मबळा, जेंवि सागरा मकर,
सुर मुनि म्हणती, 'धन्य! छात्रीं बहु सानुराग रामकर.' ११
तेव्हां सर्व हि म्हणती, 'सूर्य महावीर कर्ण, नक्षत्रें
इतर भट.' असें केलें त्याचें सर्वत्र वर्णन क्षत्रें[11]. १२
भीमादिकां न आटे, कर्ण करी कटककदन कोपानें,

१. स्वर्गसुख. २. रणांगणांत असलेल्यानें. ३. मोठ्या भयंकर अशा त्या रक्तनदीनें. ४. जीवंत असून मृतवत् असलेल्या वीरांची सेना. ५. दुंदुभीच्या शब्दानें. ६. प्रलयमेघाच्या नवीन (भयंकर) ध्वनीस. ७. पक्षी. ८. म्यां संजयानें. ९. मध्याह्न न सायाह्न यांच्यामधील काळीं. १०. नळराजासारखा. ११. क्षत्रियानीं.

सिंहें गोधन मथितां काय करावें झटोनि गोपानें? १३
इतुक्यांत जिष्णु कुरुबळमथन करुनि वाहवूनि रक्तनद्या,
येतां म्हणे, 'मुकुंदा! वृषकाळकरीं स्वभीमभक्त न द्या. १४
तो कर्णकेतु दिसतो, ते भीमप्रभृति करिति रण त्यासीं,
चर्चा करिति जसे यदु एकासीं वेदपाठ म्हणत्यासीं. १५
ते पांचाळ पळाले; त्यांमागें धार्तराष्ट्रनृप[1] आहे;
तच्छुभ्रच्छत्र पहा. जें पूर्णसुधाकरोपमा लाहे. १६
मधुकोशाला[2] सरघा,[3] कृतवर्मा द्रौणि कृप तसे राया
रक्षिति, पहा मुकुंदा! मोटी यांची सुयोधनीं माया. १७
जो सारथि, सुखधामा! तुजसम शूर हि नवांबुदश्यामा!
आला अरिच्या कामा तो राजा शल्य आमुचा मामा. १८
ने रथ तेथें जेथें कर्ण करितसे मदीयबळदमना;
स्मरत असेल वृषदहनदग्धांच्या[4] कृष्णमित्रजळद[5] मना.' १९
हरि हर्षें हरि हाकी, ते हरिणांचा चि न हरिती सर्व,
ते एसे[6] जवन लव न पवनकुमारीं हि उरविती गर्व. २०
शल्य कपिध्वज पाहुनि कर्णासि म्हणे, 'पहा महाबाहो!
आला अर्जुन, सावध आतां युद्धार्थ शीघ्र तूं बा! हो. २१
येतो कसा पहा रथ; पथ सेना सोडिते पहा त्यातें,
सिकतांची[8] भिंत्ति जसी पूरातें निजपथें वहात्यातें. २२
त्वां धर्मभंग केला, भीम हि बहु पीडिला असें कळलें;
त्यांचा कैवारी जय आला यद्यश कधीं नसे मळलें. २३
रक्षक पृष्ठीं पार्श्वीं[9] नाहींत पहा, अहा! महाभागा!
भाग्यें एकाकी जय सांपडला, साधि आपुल्या भागा[10]. २४

१. दुर्योधनराजा. २. मधाच्या पोळ्याला. ३. मधमाशा. ४. कर्णरूप अग्नीनें ध झालेल्या [ माझ्या ] सैनिकांच्या. ५. अर्जुनरूप मेघ. ६. वेगवान्. ७. ार्ताचे ठायीं. ८. वाळूची. ९. बाजूस. १०. अर्जुनास मारण्याचा कार्यभाग.

तूं चि समर्थ जयाला वाराया, सागरा जसी वेळा[1],
हाकूं हय? दे आज्ञा; जयकामा! दुर्लभा असी वेळा. २५

गंधद्वि[2]पदृष्टिपुढें सं[3]मदगजघटा जसी कधीं न टिके,
जिष्णुपुढें तसि सेना वध पावे; वीर येथ कां लटिके? २६

दिग्विजयीं होतें जें तें चि असो धैर्य जें असामान्य;
हा जिष्णु जसा लोकीं, अन्य धनुर्धर नसे असा मान्य.' २७

कर्ण म्हणे, "सत्य वदसि; धैर्याची धरुनि घट्ट कास रहा.
वदलासि यथार्थ नृपा! मज झाला प्राप्त धन्य वासर हा. २८

जो एक[4]वीर, सद्गुणरत्नाकर, शंभुमान्य, हरिसख या
पार्थासीं द्वैरथ[5], हे वर्णूं निजभाग्य कोठवरि सखया!? २९

जो केला सर्वस्वा पाशुपतास्त्रासि पात्र ईशानें,
वरिलें ज्याचें सारथिपण हि हरीनें जगत्त्रयेशानें, ३०

ज्याला दिलीं निजास्त्रें शक्रादि समस्त लोकपाळांनीं,
तो सत्कीर्तिगतिप्रद भेटविला आमुच्या कपाळांनीं[6]. ३१

शल्या! पुराण ऋषि नरनारायण जाणति प्रभूत[7] नय;
सुरकार्यार्थं कुरुयदुनाथांचे जाहले प्रभू तनय. ३२

मीं शुद्ध युद्ध यांसीं निर्भयचित्तें करीन; काम रणीं
होतो पूर्ण; पहावा धर्मज्ञजनें हि दोष कां मरणीं? ३३

ते ही नरनारायण म्हणतिल 'वीरोऽयमेव कौ[8]' शल्या!
श्रीमद्गुरुप्रसादें दावीन अशा सुयुद्धकौशल्या. ३४

भीष्मद्रोणचरित्राहुनि कोणाचें चरित्र सन्महित?
परि तें हि विसरवीन स्वचरित्रें मीं, करीन जन्महित. ३५

मीं घाबरे करीन चि कृष्ण, जऱ्ही त्यांसि देव-सेनानीं

---

१. मर्यादा, किनारा. २. मदोन्मत्त हत्तीच्या दृष्टीसमोर. ३. गर्वयुक्त असा गजसमूह. (?) ४. अद्वितीय वीर. ५. [ दोघा रथ्यांचें ] युद्ध. ६. सुदैवानें. ७. पुष्कळ. ८. कौ अयं एव वीर=पृथ्वीवर हा च एक वीर [ आहे ].

होऊनि युक्त, होइल युद्धांत सहाय, देवसेनानी." ३६
ऐसें वदोनि सांगे नृपकृपकृतवर्मगुरुसुतांसि असें,
'जिष्णु तुम्हीं पीडावा, मीं तुमच्या रक्षणीं समर्थ असें. ३७
वर्षा अस्त्रें शस्त्रें, विकळ करा शत्रुला, उठा वेष्टा;
गर्तांप्रति गजसा, मजप्रति रिपु आणा; करूं नृदेवेष्टा.' ३८
कर्णोक्ते ते जेव्हां शर वर्षति, म्हणति लोक 'नर मेला.'
सुरभीरू म्हणति, 'शिवे! पतिशोक शिवो कदापि न रमेला.'
त्या कौरववीरांतें भंगुनि भीमासि भेटला जिष्णु,
जैसा करुनि पराभव दैत्यांचा देवनायका विष्णु. ४०
'आहे स्वस्थ नृप' असें जातां चि सुवृत्त जेधवां सांगे,
भीम म्हणे, 'राधे! हा स्वपराहितहेतु पाळिला कां गे!?' ४१
भीमें आज्ञा देतां कर्णावरि जिष्णु जाय, तो नयनीं
पाहोनि वेष्टिला दशदुःशासनवीरबंधुनीं अयनीं. ४२
त्यजिले गुरुभाग म्हणुनि, पडले चि गळां मृतीच्छु कीं अरि ते
वधिले पार्थें, सुज्ञ अर्थीजन दवडिले कधीं न रिते. ४३
मग नवतिसंख्य आले संसप्तकवीर त्यांस ही निवटी,
विद्युद्द्युति रवितेजीं लोपे; मिरवील गुण कसी दिवटी? ४४
जातां कर्णाप्रति कुरुभटगण रोधी पथांत धवळाश्वा,
पावे नाश न कां, जो झोंबे हरिच्या समुक्तकवळा श्वा? ४५
झाला मग्न अनुजरथ खळबळजळधींत भीम तें पाहे;
धांवे गदासहाय त्वरित, न तें व्यसन बंधुचें साहे. ४६
मारी अयुत गज रणीं, काळीसी ती करी गदा केली;

---

१. कार्तिकस्वामी. २. खळग्याकडे. ३. दुर्योधनाचे प्रिय. ४. नारायण—कृष्ण—मेल्याने होणारा शोक. ५. मार्गांत. ६. भीमाचा वांटा. ७. याचकजन. ८. नव्वद. ९. ठार मारी. १०. विजेची प्रभा. ११. [हत्तीच्या गंडस्थलांतील] मुक्ताफलयुक्त ग्रासाला. १२. गदा च आहे सहायास ज्याच्या असा. * देवांगना.

रणभूमि दुष्प्रचारा[1] भीमसखीनें क्षणें तदा केली. ४७
पायानीं च अरीतें, अपकार मनांत आठवी, रगडी;
समशील[2] तो गदेचा, रिपुला दावी न पाठ वीर गडी. ४८
खळबळ मथितां शोभे तो भीम पयोनिधींत मंदरसा;
चित्तीं म्हणे, 'पहातो भोगाया अंधपुत्र मंद रसा.' ४९
रिपुकटकांत वृकोदर, जैसा क्षुब्धार्णवीं न भी मकर;
उरवील चंडकर[3]कर जीवन[4] कांहीं तरी, न भीमकर. ५०
चढला रथीं वृकोदर रिपुकटकांचा करूनि घात रणीं;
जिष्णु अरुण, त्यामागें भासे लोकांसि भीम हा तरणी. ५१
झाले, जयशर रिपुभटमर्मीं घाया चिरभ्रमा[5], रुतते;
कौरवसैनिक-भीमार्जुन तेव्हां गमति अभ्र-मारुत ते. ५२
भानुपुढें निबिडें हीं तिमिरें क्षणभरि हि काय हो! टिकणें?
एकें चि पावकाच्या[6] जळतात चि तूळराशिकोटि कणें[6]. ५३
मृत्युत्रस्त प्राणी आश्रय करितात अभयदा धर्मा,
तैसे जे भट कर्णा अवलंबिति ते चि पावती शर्मा. ५४
कर्णें पार्थसहाय प्रोद्भट[7] पांचाळवीर उडवीले,
वायूनें वारिदसे[8]; गमति गजें काय पद्म तुडवीले! ५५
चाप शतानीकाचें सुतसोमाचें हि खंडिलें कर्णें;
तैसीं पांचाळबळें, प्रभंजनें[9] जेंवि उडविलीं पर्णें. ५६
कैकेयसुत विशोक हि वधिला स्वसुतप्रसेनवधकामी[10]:
कैकेय भूमिपति ही मथिला कर्णें क्षणांत संग्रामीं. ५७
वधिला प्रसेन तेणें, ज्याशि शिनीचा तनूज सत्यक वी,
त्या सात्यकिनें, तें सुर म्हणती, 'हा जिष्णुशिष्य[11] सत्य कवी.'

१. संचार करण्यास अशक्य. २. गदेशीं समान शील ज्याचे असा. ३. सर्याचे किरण. ४. पाणी (पक्षीं) प्राण. ५. महामोहास. ६. अग्नीच्या फणगीने. ७. पराक्रमी. ८. मेघासारखे. ९. मोठ्या वाऱ्याने. १०. आपला मुलगा जो प्रसेन त्यास मारूं इच्छिणारा. ११. अर्जुनशिष्य.

कर्ण म्हणे सात्यकिला, 'मेलासि अहा! पहा, महाशर हा
हरि तुज कलभा, शलभा बलभाप्राणांतकरहुताश[1], रहा.' ५९
सोडी कर्ण शरातें युयुधानवधा नवस्वरु[2]निभातें;
त्यासि शिखंडी खंडी; यश विधुला लाजवी हरुनि भा तें. ६०
खंडी कर्ण शिखंडिध्वजधनु, हाणी उरांत सायक सा,
धृष्टद्युम्नसुतातें मारी, भासे परेतनायकसा[3]. ६१
क्रौंचासि[4] शक्तिनें गुह[5], कर्ण विदारी तसा चि सुतसोमा;
भासे तो राहु करिल मुखशिखिकुंडांत[6] त्या चि हुत सोमा[7]. ६२
कृष्ण म्हणे, 'रे पार्था! कर्ण अपांचाळ लोक करितो कीं!
हरि[8] शिरतां आयु पळ हि न टिके करियूथपीं न करितोवगी.'
पार्थ म्हणे, 'हरि! हरि! हरि! हरि हरिदश्वाश्वसे[9] न पळवीसी,
मज दुःसह रिपुकृतनिजजनपरिभवताप मात्र कळवीसी.' ६४
तिकडे नररथ कृष्णें चालविला जेंवि भानुचा अरुणें,
रुद्रांनुकरण[10] जिकडे कर्णें आरंभिलें सुनिष्करुणें. ६५

## अध्याय पंचेचाळिसावा.

तेव्हां कर्णामागें दुःशासन, भीम अर्जुनामागें,
संरक्षणासि होते, ते अन्योन्यासि देखती रागें. १
धांवति अन्योन्यावरि ते दोघे आठवूनि अपकार,
जाणों ते मंदमत्त[11] क्रोधोद्धुर[12] दंपती च अपकार[13]. २
जें वैरशल्य दुःसह हृदयांत, करावया तदुद्धरण,

१. बल, तेज व प्राण याचा नाश करणारा अग्नि. २. वज्र–**पंत.** नूतन वज्रतुल्य अशा. ३. प्रेतनायक यमासारखा. ४. पर्वतविशेषास. ५. कार्तिकस्वामी. ६. मुखरूप अग्निकुंडात. ७. चंद्रास. ८. हे कृष्णा! ९. सूर्याच्या घोड्याप्रमाणें. १०. संहारकर्त्या शिवाचे अनुकरण. ११. गर्वानें अंध झालेले (पक्षी) वाहणाऱ्या मदानें उन्मत्त झालेले. १२. रागाने खवळलेले. १३. पकाररहित दपती=दंती (हत्ती).

अत्यद्भुतबळ,अरि ते करिते झाले हठें विशुद्ध रण. ३
दुःशासनशर मर्मीं लागे नागेशसा असुख रचिता,
मूर्छित करि भीमातें, इतराचे तों पळें असु खरचिता. ४
सावध होउनि भीम, क्षिप्र महाशक्ति शत्रुवरि सोडी.
तीस हि तो दुःशासन दश बाणांहीं पराक्रमें तोडी. ५
तेव्हां गदाप्रहारें भीम ललाटीं स्वशत्रुला ताडी,
क्षितिवरि, हरि वज्राहत गिरिशिखर जसें, तसें तया पाडी. ६
पत्नीचा केशग्रहसमय स्मरला: निजप्रतिज्ञा ते,
आठवि, म्हणे, 'म्हणोत न मिथ्यावादी मजप्रति ज्ञाते.' ७
वृषनृपकृपकृतवर्मद्रोणसुतांतें म्हणे, 'अहो! परिसा;
दुःशासनासि वधितों मीं भीम गजासि धोपलों हरिसा. ८
शक्ति असेल तरि तुम्हीं रक्षा, मीं आपुली प्रतिज्ञा ती
संरक्षितों, कराया स्वर्गीं संतृप्त संप्रति ज्ञाती.' ९
ऐसें गर्जोनि उडी टाकी स्वरथावरूनि कलितासि,
तो भीम भीमकर्मा गांठी त्या रिपुसि भूमिगलितासीं. १०
गरुड जसा गगनांतुनि वेगें उतरोनि पन्नगा झडपी,
तैसा भीम बळानें दुःशासनकंठ अंघ्रिनें दडपी. ११
भीम विदारी खड्गें सहज परमकठिन शत्रुचें उर तें,
वाटे पविपातीं ही त्या साध्वीला न गांजितां, उरतें. १२
अशनिहतशिलातळ जळ, रक्त तसें खड्गभग्न तें उर वी,
तृषित घटोत्कचतात प्राशी शोणितें, न लेश ही उरवी. १३

१. सर्पश्रेष्ठासारखा. २. क्लेश करणारा. ३. हरण करिता. ४. वज्राचा तडाका लागलेले. ५. वेणी धरून सभेत आणिल्याचा प्रसंग. ६. दुःशासनाचे रक्तपानाची आपली प्रतिज्ञा. ७. तृपाक्रांत. ८. खड्गधारी. ९. भूमीवर पडलेल्या. १०. पायानें. ११. वज्रपात झाला असता तरी. १२. वीज ज्यावर पडली आहे असा खडक. १३. रक्तपानासारखें राक्षसी कृत्य भीमानें केले म्हणून 'घटोत्कचतात' असा त्याचा निर्देश केला आहे. १४. रक्त.

मग कंठनाळ चरचर तो सत्य करावया बिरुद[1] कापी,
देउनि मिटक्या मटमट, घटघट त्या स्वाहितासृगुदका[2] पी. १४
'मथित[3]दधि-दुग्ध-घृत-मधु-माध्वीक[4]-सुधारसादि जे अन्य
जें दिव्यसरित्सलिल हि, मातेचें सर्वरसवर स्तन्य[6], १५
जे जे लोकीं असती रस ती त्यांची न माधुरी थोडी,
परि अरिच्या रक्तरसीं मज बहु त्याहूनि लागली गोडी.' १६
ऐसें वदोनि ओष्ठप्रांत जिभेनें पुनःपुन्हां चाटी,
अवलंबी अत्युग्रा भीम अतृप्तद्विपारिची धाटी. १७
रिपु शूर दूर तेथुनि तें दारुण कर्म पाहतां पळती,
किति पडती, किति दडती, कितिएकांचीं धृतायुधें गळती!
जाणों त्या अत्युग्रा मूर्तश्रीनारसिंहमंत्रास
पाहोनि पावले ते रिपुभटभूपाळभूत संत्रास. १९
म्हणति, 'मनुष्य नव्हे हा: राक्षस कीं काळ हा खवळला हो!
कीं आमुची कराया, मूर्त प्रळयाग्नि, राख, वळला, हो!' २०
त्या समयीं युयुधानें कर्णाचा बंधु चित्रसेन रणीं
वधिला कर्णसमक्ष चि; कोणही ही धांवले न तन्मरणीं. २१
भीम पुन्हां दुःशासनरक्तें अंजलि भरोनियां डोले;
मिटक्या देउनि, पाहुनि कर्णसुयोधनमुखाकडे, बोले. २२
"पीतां हें रक्त तुझें: हांसत होतासि मज, जसा भणगा;
दुःशासना! तसा तूं पुनरपि '[11]गौगौः' स्वआननें म्हण गा!
आम्हांसि म्हणत होते जे 'गौगौः' क्षुद्रबुद्धि नाचोनी,
म्हणतों त्यांतें 'गौगौः' स्वभुजबळें संकटांत[12] वांचोनि. २४

१. प्रतिज्ञा. २. आपल्या शत्रूच्या रक्तरूप जलास. ३. घुसळलेलें दही, मठ्ठा. ४. मद्य. ५. भागीरथीचें उदक. ६. अंगावरील दूध. ७. स्वीकारी. ८. तृप्त न झालेल्या सिंहाची. ९. मूर्तिमंत नारसिंह मंत्र च अशा (भीमास). १०. सभा० अ० ७।१३ पहा. ११. 'गाय रे गाय!' 'गरीब रे गरीब!' १२. लाक्षागृह, विषान्न इत्यादि संकटांतन.

मज काळकूटदूषित भोजन दिधलें प्रमाणकोटींत,[1]
मर्मीं सर्प डसविले, काळाच्या घातलें चि ओटींत. २५
आधीं निमग्न केलें ऐसें अतिदुस्तर प्रमोहांत,
बांधोनि बुडविलें मग मज सरितेच्या गभीर डोहांत. २६
जतुगृहदाह, द्यूतीं श्रीस्त्रीवस्त्रापहार, वनवसती,
दुःखें विराटभवनीं जीं बहु कोणीं हि भोगिलीं नसती. २७
कर्णशकुनिदुर्योधनधृतराष्ट्रांच्या कुमंत्रितें[2] दैन्य,
बहु दुःख भोगिलें; हें शस्त्रास्त्राग्नींत होमिलें सैन्य. २८
काय करूं? काळानें अभय दिलें, घेतलासि तूं पदरीं,
दुःशासना! कुळक्षयमूळा! तुज रक्षिता दुजा न दरीं.[3]" २९
ऐसें बोलत हांसत शत्रुरुधिरादिग्धपाणिमुख[4] विकट,[5]
प्रकट महाभैरवसा नाचत गेला जयाच्युतांनिकट. ३०
कृष्णांसि म्हणे, 'केला दुःशासन वधुनि सत्य आज पण,
दुर्योधना हि मारुनि देइन धर्मासि राजराजपण.[6]' ३१
निजबंधुवधामर्षें[7] आले धृतराष्ट्रनृपकुमार दहा,
त्यांचे हि प्राण हरी भीम, महाकाळभोगिचा[8] रद[9] हा. ३२
भीमा भी मानस बहु कर्णाचें, शल्य इंगितें[10] जाणे;
करि उचित बोध समयीं, तो राधासूनुच्या मनीं बाणे.[11] ३३
कर्णात्मज वृषसेन क्रोधें भीमाभिमुख तदा धांवे,
तों त्यावरि नकुळ उठे, भरले[12] दोघे हि संगरीं हांवे.[12] ३४
विरथ विशस्त्र पदाती वृषसेनें नकुळ पळविला मागें;
गेला भीमरथाप्रति, तें पाहुनि जिष्णु धांवला रागें. ३५

१. ह्या नांवाच्या गंगातटीच्या तीर्थांत. २. दुष्ट सल्ल्यानें. ३. भयकाळीं. ४. शत्रूच्या (दुःशासनाच्या) रक्तानें माखलेलें आहेत हात व तोंड ज्याचें असा. ५. भयंकर. ६. सार्वभौमत्व. ७. आपल्या भावाच्या वधाच्या रागानें. ८. अत्यंत घातक अशा सापाचा. ९. दांत. १०. कर्णाच्या मुद्रेवरून. ११. पटला. १२. हट्टास पेटले.

रक्षाया वृषसेना कर्णादि समस्त धांवले बळपें,[1]
ते पिटिले त्या पार्थें, स्वपशूंचे जेंवि बल्लवें[2] कळप. ३६
पिटिले व्याघ्रें वृषसे वृषसेनें शत्रुवीर दर्पानें;
परि जय टिकला. टिकला खगमांचा[3] जिंकिला न सर्पानें. ३७
भ्याले एका पार्थावांचुनि ते सर्व वीर वृषसेना.
एक हरवृष[4] चि निर्भय, धरिल हरिपुढें न धीर वृषसेना. ३८
वृषसेन अर्जुनास प्रभुस हि मर्मीं च तीव्रशर अर्पी;
क्षोभे फार धनंजय, जेंवि धनंजय[5] समर्पितां सर्पी.[6] ३९
अच्युतसारथि[7] कोपें कर्णासि म्हणे, 'वृषा! खरें कथितों;
रक्षीं असेल बळ तरि, मीं वृषसेनासि हा पहा मथितों.' ४०
अभिमन्यु तुम्हीं वधिला मीं नसतां आदरूनि अनयातें;
धर्मे वधितों; हो तूं रक्षाया सावध स्वतनयातें. ४१
जोडीन कीर्ति ससुता तुज मारुनि आजि आजिमाजि भली,
तुजवरि तुझी च फिरली साधुच्छळका नराधमा! जिभली.[8]
तुज मारूनि मळवितों तव मित्राचा मुखेंदु रुदितानें;
जो अस्मद्धृदयाब्जें[9] करि बहु संकोचितें दुरुदितानें. ४३
मेल्यावरि मित्रातें दुर्मंत्रें धीर काय मग देसी?
आर्यांच्या,[10] लव हि नको दुर्योधनमर्दनीं श्रम, गदेसी.' ४४
ऐसें वदोनि दश शर हाणुनि वृषसेन खोंचिला मर्मीं,
वल्मीकीं[11] सर्प तसे शिरले ते बाण शत्रुच्या वर्मीं.[12] ४५
मग च्यार बाण सोडुनि सत्वर तो त्रिजगदेककोदंडी[13]
वृषसेनाचें कार्मुक, भुजयुग, शिर पळ न लागतां खंडी. ४६

---

१. सेनारक्षक. २. गुराख्याने. ३. पक्षितिलक गरुड. ४. नंदी. ५. अग्नि. ६. तूप. ७. अर्जुन. ८. तू दुसऱ्यास जे बोलत होतास ते च आज तुला प्राप्त झालें, असा भावार्थ. ९. दुर्भाषणाने (पक्षी) वाईट अभ्रानी वगैरे आच्छादिलेल्या उदयानें. १०. श्रेष्ठ भीमाच्या. ११. वारुळांत. १२. कवचांत. १३. जगत्त्रयांतील अद्वितीय धनर्धारी.

स्वापत्यवधक्रुद्ध व्याघ्र व्याधा वधावया धांवे,
कर्ण तसा पार्थावरि; मनिं दोघांच्या स्वकाम साधावे. ४७
कृष्ण म्हणे, 'पार्था! हा आला क्रोधांध कर्ण अंतकसा,
मृत्युंजयवरपात्रा! तूं याचा न करिशील अंत कसा? ४८
पांचाळभट पळाले सर्व जसे मृग मृगेश्वरागमनीं,
पुत्रवधास्तव धरिला कर्णानें आजि फार राग मनीं. ४९
याच्या शरासि साहे ऐसा त्रिजगांत तूं चि एक रणीं;
वीर उदंड असति; परि त्यांला पार्था! तुझी न ये करणी. ५०
कर्णातें जिंकाया तूं शक्तः तव प्रताप मीं जाणें.
जाला प्रसन्न तुज तो, जो जाळी त्रिपुर एकलें बाणें. ५१
शक्त सुर असुर मुनि हि न ज्याचीं देखावया पदें शुद्धें,
तो भीम भर्ग[1] भगवान् भूतप आराधिला तुवां युद्धें. ५२
मारीं हरप्रसादें कर्णा, वृत्रा जसा सुनासीर[2],
राधेसह ताडून व्याकुळचित्ता तिच्या सुना सीरें[3].' ५३
पार्थ म्हणे 'कृष्णा! मज जय घडतो आजि निश्चय चि हा कीं.
वा! सर्वलोकगुरु तूं आहेसि बहुप्रसन्न; हय हाकीं. ५४
आजि पहासील सख्या! मच्छरशकलीकृतांगकर्णातें[4],
नदसृक्कणसिक्तातें[5] आकाशातें हि शोणवर्णातें[6]. ५५
मीं त्याचें कीं माझें तो आजि करील निश्चयें हनन;
मन न व्यग्र तुझें हो; रणिं जयमरणार्थ* आमुचें जनन. ५६
ऐसा निश्चय केला आहे, बा भक्तकामकल्पतरो!
सिंधूसि जड तसा या कर्णाला हा हि अश्मकल्प[7] तरो.' ५७

१. शंकराचीं नावें. २. इंद्र. ३. शिर, मस्तक. ४. माझ्या बाणानीं छिन्नभिन्न झालें आहे शरीर ज्याचें अशा कर्णास. ५. त्याच्या रक्ताच्या शिंतोड्यानें भरलेल्या. ६. तांबडा रंग असलेलें असें. ७. पाषाणप्राय. (रामावतारीं जसे दगड समुद्रावर तरले त्याप्रमाणें मी हि कर्णरूपी समुद्रावरून तरून जावो—कर्णावर माझी सरशी व्हावो). * जय किंवा मरण यांसाठीं.

श्रवण करुनि विजयवचन यदुपति अतिचपळ तुरगवर हाकी;
नाकी प्रमुदित निरखिति अतुळ समरकुतुक सहविधिपिनाकी.

## अध्याय शेचाळिसावा.

जिष्णुसि हरि ने धर्मस्वांतींचें[1] उद्धरावया शल्य,
कर्णरथास हि आणी सत्वर समरांगणांत तो शल्य. १
कर्णामागें ठाके दुर्योधन सबळ कठिन[2] जाणोनीं,
पार्थामागें चाले प्रबळ वृकोदर हि सैन्य आणोनीं. २
दोहींकडे हि भेरीप्रमुखें[3] वाद्यें उदंड वाजविती,
गाजविति ब्रह्मांड, स्वध्वानें[4] वारिदांसि लाजविती. ३
उत्साह, तेज, विद्या, शिक्षा, बळ, धैर्य, शौर्य दोघांचें,
तुल्य चि, ज्यापरि गंगायमुनांच्या पावनत्व ओघांचें. ४
सर्प, श्येन, वृष, द्विप हरिसे ते वीर संगरा आले;
दोघे हीं जयशाली धर्मज्ञ कृती न मृत्युला भ्याले. ५
दोघांत जो पहावा तो चि जयश्रीमना, गमे, रुचतो;
अद्भुतमहत्त्वशोभास्थैर्यादिगुणैकपात्र[5] मेरु च तो. ६
सुर, सिद्ध[6], साध्य, विद्याधर[6], मुनि, गंधर्व होति जिष्णुकडे;
अभिमान आधिरथिचा गुह्यकदनुजदितिजराक्षसांसि पडे. ७
इंद्र म्हणे, 'कर्णवधें हो पार्थ स्तोत्रपात्र[7] अमरांत.'
सूर्य म्हणे, 'पार्थवधें संपादू विजय कर्ण समरांत.' ८
शक्र म्हणे, 'विजयातें विजय चि पावेल निश्चयें आजि.'
भानु म्हणे, 'जय कर्ण चि साधील, बळें[8] करूनियां आजि[9].' ९

१. धर्माच्या अंतःकरणातील. २. प्रसंग कठिण आहे हे जाणून. ३. नगारे आदिकरून. ४. आपल्या गर्जनेनें. ५. अपूर्व महत्व, शोभा व स्थैर्य हे गुण मेरु व हे वीरद्वय यांत वसत होते. ६. देवयोनिविशेष. ७. स्तुतीस पात्र. ८. निकरानें. ९. युद्ध.

ऐसे विवाद करिती, मग, ते ज्ञानाचिया महानिधितें,
'होईल कोण विजयी दोघांत?' असें विचारिती, विधितें. १०
ब्रह्मा शक्रासि म्हणे, 'पावेल जयासि विजय, वरदानें
ईशानें गौरविला जो निजपद्भक्त विजयवरदानें. ११
ज्यासि हर वरद, हरि करि ज्याचें सारथ्य आदरें आंगें,
अन्यांचें तेज किती? काळाचें तेज त्यापुढें पांगें[1]. १२
हरिहरपदप्रसादा जो पात्र, जया हि तो चि पात्र सदा:
या देवांच्या दासा रक्षिति नित्य त्रिशूळ-चक्र-गदा. १३
शक्रा! चक्रायुध हा नारायण, पार्थ नर; उभा राहे
यांच्यापुढें न काळ हि; हरितिल सर्वा हि भूमिभारा हे. १४
कर्ण हि समर्थ, परि हा दानवपक्षीं असे; म्हणोनि नया
जय कैंचा? मरण रणीं पावेल, अधोगती, म्हणोनि, न या. १५
भीष्माच्या[2] लोकातें पावो कीं कर्ण नाकलोकातें;
गातील कीर्ति सज्जन; सूर्या! करिशी कशास शोकातें?' १६
ऐसें कौतुक झालें गगनीं, मग नीरदांसि चातकसे,
पाहति कृष्णांसि अमर, कीं, करिती प्रबळशत्रुघात कसे. १७
युद्धारंभीं पार्थध्वजशिखरनिवासि भीमकाय कपी
पी कर्णध्वजतेजा, शिखि[3]तेजा जेंवि दिवसनायक [3]पी. १८
गर्जे, उडे ध्वजाग्रावरुनि, करि त्रस्त सर्व लोक बळी[4]:
कर्णध्वजगजकक्षाभुजगांतें काय गरुड तो कवळी! १९
हरि नयनसायकांहीं ताडी शल्यासि, तो हि त्या हरितें,
[5]जरि तें निरीक्षण चि, त्या मद्रपधैर्यासि जाहलें हरितें. २०
विंधिति नयनशराहीं [6]ते हि रिपुप्राण[7]मीनदाश रथी,
तेथें वृषासि जिंकी पार्थ, जसा रावणासि दाशरथी. २१

१. पांगळे, फिके. २. किंवा भीष्माच्या लोकाते—स्वर्गलोकाते—कर्ण पावो. ३. सूर्य अग्नीचे तेज ज्याप्रमाणें फिकें पाडतो. ४. बलवान मारुती. ५. कृष्णाने शल्याकडे नुसतें पाहतां च त्याचें धैर्य गळालें. ६. कर्णार्जुन. ७. शत्रूंच्या प्राण-रूपी माशाना [ घातकर असे ] कोळी.

कर्ण म्हणे, 'शल्या! जरि मजला मारील आजि पार्थ, कसें
करिशील? सांग, ऐकों, मैत्रीचें ज्यांत होय सार्थकसें.' २२
शल्य म्हणे, 'कर्णा! तें न घडो; दैवें घडेल ही जरि तें,
तरि मीं त्वदर्थ युद्धीं मारीन रणांत जिष्णुतें हरितें.' २३
पार्थ हि हरिस म्हणे, 'जरि अरि मज मारील, काय करिशील?
न पुसावें परि पुसतों, कीं तूं संशय समस्त हरिशील.' २४
ऐकोनि कृष्ण 'शिव! शिव!' ऐसें आधीं म्हणोनि मग हांसे;
कीं, कर्ण काय? न बळी काळाचे हि स्वसेवकीं फांसे. २५
'शुष्क उदधि, शीत अनळ, जऱ्हि होईल प्रभाकरा[1] पात,
तऱ्हि या कर्णापासुनि नाहीं होणार बा! तुझा घात. २६
जरि विपरीत चि होइल तें हि स्मरहरवरप्रदान मृषा,
तरि मीं निजभुजतेजें भस्म करिन मद्रपतिसमेत वृषा.' २७
पार्थ म्हणे, 'विश्वेशा! वांचविला त्वां तसा इभ[2] स्मरणीं[3],
तूं तो सारथि; मग कां न करीन स्वरिपु आजि भस्म रणीं? २८
मर्त्यपतिप्रीति[4] वृषीं, अमर[5]गुरुप्रीति नित्य या दासीं:
कसि सरि करील पल्वलजलजंतु[6] सुधासमुद्रयादासीं?' २९
ऐसा निश्चय केला पार्थें, कर्णें हि मांडिलें समर,
कौतुक पाहति कौरवपांडवपक्षस्थ आणिखी अमर. ३०
पार्थाकडील कटकें कर्णें, कर्णाकडील त्या पार्थें,
केलीं तीव्रशराहीं भग्नें, मग्नें भयीं, ह[7]तस्वार्थें. ३१
कृप, कृतवर्मा, द्रौणी, दुर्योधन, शकुनि हे महासर्प
धांवति निजबळ मथितां; परि हरि तो पार्थगरुड तद्दर्प. ३२
शक[8], यवन तुषार हि बहु वधिले येतां चि त्या सिताश्वानें,
गज हि हरिपुढें न जगति, रक्षितिल कसीं स्वजीविता श्वानें?

१. सूर्याला. २. गजेंद्र. ३. धावा केला असतां. ४. मानवाचा राजा जो दुर्योधन त्याचें प्रेम. ५. देवश्रेष्ठ अशा तुझी प्रीति. ६. डबक्यांतील जीवजंतु. ७. नष्टस्वहित अशीं. ८. म्लेच्छजातिविशेष.

पुत्रें खळबळ मथितां पावे पाहोनि शक्र मुद्राशी[1],
स्मरलें क्षयसमयींचें तांडव पांडवरणांत रुद्राशी. ३४
सुर 'साधु! साधु!' म्हणती, वरि करिती पुष्पवृष्टि हर्षानें,
स्तविती मुनि सुनिपुण जे प्रमुदित सज्जन जयप्रकर्षानें. ३५
त्या विजयविजयसमयीं दुर्योधनभूप कर्ण हे मात्र
मानी, ज्ञानीश्वरसे[2] झाले चि न विस्मयव्यथापात्र. ३६
त्या काळीं द्रौणि म्हणे 'राया दुर्योधना! पुरे झगडा;
हें कर्म तसें, स्वशिरें फोडाया हाणणें जसें दगडा. ३७
जो ब्रह्मसम महात्मा, झाली गति काय त्या तुझ्या गुरुची[3]?
कुरुची श्रीसंतति कां भस्म करिसि? सु-रुचि ही न; हे कु-रुची.
हो आझुनि तरि टाकुनि हे काम, क्रोध, लोभ शांत; नवा
कां शोक ताप जोडिसि? झाली गति काय त्या हि शांतनवा?
मीं कृपमामा दोघे जिष्णुपुढें वांचलों न बाहुबळें;
शोक कपाळीं नसता, असता जरि मृत्यु मारिता चि पळें. ४०
जिष्णु वळेल मदुक्तें, कृष्णा न रुचे विरोध हा नियम,
धर्म सदय, भीम तया वश, करितिल न गुरुवचनहानि यम[4].
राज्यार्ध धर्म पावो, प्रजा हि सुख, सफळ काम हा बा! हो.
तातादि आप्त शोकीं घालिसि दाटूनि कां महाबाहो!? ४२
आतांच्या भीमार्जुनकर्मा लाजेल काळवासवधी[5];
आहे कोण असा प्रभु[6], जो या कृष्णानुजाधवास[7] वधी? ४३
ऐकेल वचन माझें, आवरिल द्वेषिकाळ[8] हात रणीं,
तापद वैरग्रीष्मीं, प्रेमहिमर्तूंत[9] सुखद हा तरणी. ४४

१. आनंदराशि, अत्यानंद. २. ज्ञान्याला हर्षविषादादि कसले च विकार होत नाहीत, तसे कर्णदुर्योधन हे मानी असल्यामुळे अर्जुनाचा पराक्रम पाहून त्यांना हि. झाले नाहींत. ३. द्रोणाची. ४. नकुळसहदेव. ५. यमधर्म व इंद्र यांची मति. ६. समर्थ. ७. सुभद्रापति अर्जुनास. ८. शत्रूचा काळ च असा (अर्जुन). ९. प्रेमरूपी हिवाळ्यांत.

मित्रं[1] सहज एक, दुजें सामें, दानेंकरूनि मित्र तिजें,
चवथें हि तें, प्रतापें मित्र मिळे, सांगताति सन्मति, जें. ४५
तें सर्व पांडवांचा ठाईं आहे चि, गा! नृपा परिसें;
करिजे, घनीं स्वमाथां पडतां भंगार्थ हा, कृपा परिसें. ४६
वंदीं धर्मा गुरुतें, सोडुनि चाप क्षुरप्र, सन्नमनें:
जय सुख हि तसें न इहीं; स्तविति हि न तुला सुर प्रसन्नमनें.
ज्याचा चिंतील क्षण संतापें धर्मराजनाश मनें,
केलें चि निश्चयें निजपाशाहीं बद्ध त्या जना शमनें[3]. ४८
कटु परि हितकर औषध जो रुग्ण हितेच्छु, तो कवि, प्राशी;
मद्वचन तसें सेवीं: घेतां नाशी च शोक विप्राशी[4]. ४९
न सुखद दुराग्रहसखा, हा सर्वानर्थगेह ठक राया!
प्रिय आम्हांहूनि गमे: न चुकेल चि घात हा हठ कराया. ५०
ज्या, ऐसें कळलें कीं, हितशत्रु कृतघ्नराज हठ, कविला,
तो एक महाठक या क्षुद्रें संसृतिपथांत न ठकविला. ५१
हातींचें स्वहित हठें जातें मग चित्त बहुत हळहळतें,
मतिवसुमतीविदारक फार कठिन दुःसह व्यसनहळ तें. ५२
हतशेषीं सकरुण हो, अलि नलिनीं सक्त तेंवि मन सामीं.
अंतरिं शिरोनि वारिन कर्णासि तपातपासि घनसा मीं.' ५३
सुश्राव्य, सेव्य, भव्य[11], व्यसनौषध[12] गुरुसुतोक्त नृप परिसे.

१. पंत बहुधा सस्कृताप्रमाणे नपुसकलिंगी च हा शब्द योजतात. अन्वय—जे सहज मिळे ते एक, जे सामें मिळे तें दुजे, जे दानेकरूनि मिळे तें तिजे मित्र [आणि] जे प्रतापे मिळे ते चवथे हि मित्र, [असे] सन्मति सागताति. २. धनुष्यबाणानीं. ३. यमाने. ४. ब्राह्मणाचा आशीर्वाद. ५. ससारमार्गांत. ६. बुद्धिरूप पृथ्वीचा भेद करणारा. ७. दुराग्रहरूपी नागर. ८. मरून उरलेल्यांच्या ठायीं. ९. पोटांत शिरून, गोड बोलून. १०. उष्णकाळच्या उन्हास. ११. हितकर. १२. संकटावरील औषध च असे.

परि सविना गतायु; स्वहितकर हि शब्द मानिले अरिसे. ५४
मग गुरुपुत्रासि म्हणे, " वदलासि सख्या ! तसें चि तें साचें;
हें[1] अतिशुचि, हित, दुर्लभ, मित्र सुरभिदुग्धसिंधुफेंसाचें. ५५
ऐकावें त्वां सकृपें, मीं स्वगुरुसुता सख्यासि विनवीन;
पिउनि मंदनुजास्त्र[2] अरि क्षत करि हृदयांत आज हि नवीन. ५६
'मारुनि दुर्योधन, शिर उडाविन मीं कंदुकासम पदानें,
भीमासि कुरुक्षेत्रीं श्रेयस्कर कर्म हें, न तप दानें.' ५७
वदला असें वृकोदर, वृक जैसा वधुनि कातराक्ष[3] ससा,
प्याला रक्त घटघटां करुनि मदनुजातघात[4] राक्षससा. ५८
मन्नाशार्थ करिति ते, करितों तन्नाशकाम नवसा मीं;
शम कैंचा गुरुपुत्रा !? कैसें होईल शील[5] नव सामीं? ५९
स्वर्गीं स्वसमागमकर[6] वैर बरें; न हरि शोकें[7] साम हि तें;
जो जीस्तव सर्वस्व हि वेची, सोडील तो कसा महितें? ६०
पार्थांच्या कर्णाच्या, सुतशोकदवार्दितें[8], मनां, देहें,
न रुचति; तयांत सामप्रेम[9] क्षणमात्र ही न नांदे हें. ६१
न चले चि यथागति[10] वृककुळबिळगर्भीं जसा अवि-श्वास[11],
मद्वचनीं पार्थांचा होइल विश्वास तो अविश्वास. ६२
म्हणासि, 'हतशेषवीरस्त्रीगीतस्वीयकीर्ति[12] सामीं प्या;'
अन्यत्र रणमखाहुनि न वरीन क्षण गुरुघ्नसामीप्या[13]. ६३
शुचिमति यति अतियत्नें जें जोडिति, सहज वीर युद्धीं तें;

१. हे तुझे भाषण अति पवित्र, हितकर व दुर्लभ [ असल्यामुळे ] [ जाणो ] ते कामधेनूच्या दुधाच्या समुद्राच्या फेंसाचें मित्र च आहे. २. माझ्या धाकट्या भावाचें रक्त. ३. भयचकित नेत्र ज्याचे असा. ४. माझ्या धाकट्या भावाचा घात. ५. स्वभाव दुस्त्यज-पंत. ६. स्वकीयाची भेट करून देणारें. ७. युद्धहत स्वकीयाविषयींचा. ८. पुत्रशोकरूपी दावानळानें पोळलेलीं. ९. सलोख्याची आवड. १०. नेहमीचे प्रमाणासारखा. ११. मेंढ्यांचा श्वासोच्छ्वास. १२. मरून उरलेल्या वीरांच्या बायकानीं गाइलेली आपली कीर्ति. १३. धृष्टद्युम्नाच्या सान्निध्याला.

रणमखजशुद्धि लाजवि यज्ञव्रततीर्थदानशुद्धींतें. ६४
पावे भव्य रणमखीं, जो शत्रुजना न पाठि दे, वांचे;
वीर मरे जो त्यास हि सत्कारिति सर्व नाथ देवांचे. ६५
अघहर शुभकर तीर्थ, श्रुति, आम्हां क्षत्रियांसि, युद्ध, वदे;
गुरुपुत्रा! अनुमोदन द्यावें, मज हें चि कर्म उद्भव[1] दे." ६६
प्रार्थुनि गुरुपुत्रातें प्रेरी निजसैनिकांसि जिष्णुवरी,
ज्याचें सारथिपण रणयज्ञांत त्रिभुवनेश विष्णु वरी. ६७
अन्योन्यावरि धांवति कर्णार्जुन पाक[2]पाकशासनसे,
प्रेक्षक म्हणती, 'जोडा यांस, तसा यांचिया यशास नसे.' ६८
सोमक[3] म्हणती, 'जिष्णो! तोडावी क्षिप्र कंधरा[4] यांची[5],
इच्छा निष्कंटकनिजसुतराज्याची हि अंधरायाची.' ६९
कौरव म्हणती, 'कर्णा! मारुनियां अर्जुना शरण्यातें[*],
हत[6]राज्याश युधिष्ठिर धाडावा त्वां पुन्हां अरण्यातें.' ७०

# अध्याय सत्तेचाळिसावा.

ताडी दश बाणाहीं राधेय प्रथम त्या, वृथा ज्यातें
पाहुनि गेलीं सुररिपुशस्त्रास्त्रें संगरीं, पृथाज्यातें[7]. १
पार्थ हि दश विशिखाहीं ताडुनि कर्णासि हांसला गा! या.
गिलित[8]गजाजगरगळां पाहे शशमांसघांस लागाया! २

१. उत्साह. २. पाकनामक दैत्य व इंद्र यासारखे. ३. पांडवपक्षीय राजे. ४. मान. ५. कर्णाची. ६. नाहींशी केली आहे राज्याची आशा ज्याची. ७. अर्जुनातें. ( मूळात या पदांतील 'पृ' हें अक्षर दुर्बोध लिहिलें गेल्यामुळें मागून भिन्न शाईनें समासांत शोध दिला आहे; परंतु शोध देतांना 'पृ' ऐवजीं 'वृ' चुकून पडला असावा असें वाटतें. 'वृथाज्यातें' असें पद घेऊन कांहीं अर्थ जमेल असें वाटत नाहीं ). ८. गिळिला आहे हत्ती ज्यानें अशा अजगराचे घशांत. *. रक्षक अशा.

वर्षति अन्योन्यावरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे,
[1]पुरुहूतदूतवातद्युमणिकरां शरगृहांत रीघ नसे. ३
जेंवि दिनांतीं पक्षी व्यापिति वृक्षास रचित[2]नीडास,
तेंवि तयांतें ते शर; भासति अहि घेति धावुनीं डास. ४
कर्णे निष्फळ करितां यतिनें ललनाकटाक्षसे बाण,
आग्नेय अस्त्र योजी पार्थ तयाचे हरावया प्राण. ५
दावानळें जसें वन, अग्न्यस्त्रें सर्व सैन्य होरपळे,
जो तो भट माघारा पाहुनि अस्त्रप्रताप घोर पळे. ६
[3]जाणों न दग्धुकाम, प्रेमें तेजस्विगुरुसुतास रणीं
आलिंगी अग्नि, सदा दे [4]कर ज्या तम हरावया तरणी. ७
[5]मेघीं झाल्या अंकापासुनि पतनें परिभ्रमें रुसल्या,
आलिंगिति अनुरूपोदारा चपळा चि धैर्यमेरुस त्या. ८
साक्षात् प्रलयज्वलनज्वाळाहीं कवळिला चि नग मेरु,
ऐसा कर्ण गमे; मग अन्य जन तयांत काय न गमे रू? ९
कर्ण महात्मा शमवी योजुनि वरुणास्त्र आ[6]ग्नेयाशास्त्र,

---

१. परस्पराच्या शरगृहानें आच्छादित झालेल्या आपल्या मुलाची (कर्णार्जुनाची) कुशलवार्ता समजावी म्हणून सूर्यानें आपले किरण व इंद्रानें आपला दूत वायु यास पाठविले, परंतु उभयतांचा हि त्या शरावरणांत शिरकाव झाला नाहीं, असा गर्भितार्थ. २. बांधिलें आहे घरटें ज्यावर असा. ३. जणु काय, ज्याला सूर्यापासून तेजाची प्राप्ति होते तो अग्नि जाळण्याची इच्छा करणारा न [ होता ] तेजस्विश्रेष्ठ सूर्याच्या पुत्रास—कर्णास—[ सूर्याचे आपल्यावरील उपकार स्मरून ] रणांगणांत प्रेमानें आलिंगिता झाला! आग्नेयास्त्राने कर्णाचा देह पेटला; पण कर्णानें त्या अस्त्राला जुमानलें नाहीं, असा भाव. ४. किरण. ५. मेघांच्या मांडीवरून खालीं घसरल्यामुळे व त्यांच्या [ वायुनिर्मित ] परिभ्रमणामुळे त्यांवर रुसलेल्या विजा [ या हि जात्या चपला—चंचल—च असल्यामुळे ] धीर, कांतीनें अनुरूप व अत्यंत उदार अशा त्या मेरुपर्वतास ( कर्णास ) आलिंगित्या झाल्या. तात्पर्य, आग्नेयास्त्रजन्य ज्वालांनीं कर्णाचा देह व्याप्त झाला. ६. अग्न्यस्त्र.

संपादिलें श्रमें जें व्यसनीं देतें चि आश्रया शास्त्र. १०
जो जन या संसारीं दुःसहतापत्रयें जळे, शास्त्रें
अध्यात्में गुरुलब्धें जेंवि निवे, कर्ण त्या जळेशास्त्रें. ११
पूर्वीं जसि कृष्णावरि शक्रें, तसि जिष्णुवरि महावृष्टि
कुपितें कर्णें केली, कल्पांतीं जेंवि घावरी सृष्टि. १२
गगन व्यापुनि गर्जति घनघन निर्मिति घना चि आंधारा,
देति न कंपा शंपा, परि देती धीरनायकां धारा. १३
चोळुनि कर कोपानें भीम म्हणे, 'अर्जुना! अहाहा! रे!
व्यर्थ म्हणत होतों मीं कीं, मदनुज संगरीं न हा हारे. १४
कर्ण तुझ्या अस्त्रांतें सर्पांतें जेंवि गरुड खंडितसे,
रिपुशर विजयी गमती, द्वैतीं अद्वैतवादि पंडितसे.' १५
कृष्ण म्हणे, 'शंभूसीं ज्या धैर्यें भांडलासि तें विजया!
झालें काय? न जोडिसि कां कर्णासीं भिडोनि तेंवि जया? १६
मारुनि कर्णातें दे धर्मासि धरा, तुझा चि हा वांटा;
त्वां चि सुहृद्धृदयींचा काढावा कुशळसत्तम कांटा.' १७
भीमाच्युतोपदेशें आला अरिचा उदंड राग मना,
स्मरला नारायणसख नर आत्मधराभरापहागमना. १८
योजी ब्रह्मास्त्रातें तों खंडी कर्ण त्यासि, तें भीमा
स्वशिरःखंडन भासे, लंघी तत्क्षोभवारिधी सीमा. १९
कर चोळुनि भीम म्हणे, 'रे जिष्णो! रिपुपयोदवायो! जीं
जाणसि अस्त्रें त्यांतुनि भलतें अरिच्या पराभवा योजीं.' २०
भीमाज्ञेनें योजी सत्वर शस्त्रासि तो किरीटि कवी,

१. [तो] गुरूपासून प्राप्त झालेल्या अध्यात्मशास्त्राने (तद्विषयक ज्ञानाने) जेंवि निवे [तेंवि] कर्ण त्या वारुणास्त्राने निवे. २. [व] जेवि कल्पांतीं [तेंवि] सृष्टि घावरी [केली]. ३. दाट मेघ. ४. विजा. ५. जलधारा (पक्षी) शरधारा. ६. पृथ्वी. ७. पृथ्वीचा भार दूर करण्याकरिता झालेल्या आपल्या अवतारास. ८. शत्रुरूप मेघास वायूसारख्या. ९. कोणतें हि.

अक्षत दंष्ट्रा असतां कंदासि[1] न कोपला किरीटि कवी. २१
अमिताशुग[2] अस्त्रबळें सोडुनियां कर्णरथातिरोधानें,[3]
कौरवबळासि भंगी; जय कैंचा साधुजनविरोधानें? २२
कर्ण हि तैसें चि करी, सोडी बहु बाण, जेंवि घन तोया,
भीमार्जुनकृष्णांतें ताडी, मानी कृतांत जन तो या. २३
भीमाच्युतासि सक्षत[4] पाहुनि बहु जिष्णु तापला. काय
गुरुहुनि सख्याहुनि प्रिय सुजना? तैसा न आपला काय. २४
एकें चि शरें केतु छेदुनि, शल्यासि पीडुनीं चहुनीं,
विंधुनि वृषासि तिहिनीं, वधिला नृपसुत सभापती* बहुनीं. २५
सत्तावीस शर पुन्हां मारुनि वैकर्तनासि, च्यार शतें
वधिलीं मत्तगजांचीं; रिपुनीं ही वर्णिलें तदा यश तें. २६
मथिले सहस्र सादी, आठ सहस्र प्रदानकवि[5] पत्ती
पार्थें वधिले, होऊं दिधली मरणांत लेश न विपत्ती.[6] २७
कर्ण हि मर्दी पांडवपांचाळबळें; रणीं दिशा भुललीं.
तीं सृतशेषें दिसलीं पळसांचीं काननें जसीं फुललीं. २८
तों मंत्रौषधिवीर्यें होवूनि विशल्य[7] धर्म राजमणी
आला, गगनीं जैसा पूर्ण शरत्पर्वरात्रिनाथ,[8] रणीं. २९
धर्म स्वजनांच्या दे मोरांच्या हर्ष जेंवि जळद मना,
करिती पांचाळयुवे उत्साहें वृषसहायबळदमना.[9] ३०
करिती अत्युत्साहें युद्ध त्रिदशग्रहेशसंभव[10] ते.
कौरवपांडवसैनिक पाहति ठाकोनियां तयांभवते. ३१
भेदी अयुतशरांनीं[11] भीमाला, शौरिला हि साठानीं,

१. रानडुक्कर. २. पुष्कळ व त्वरित जाणारी. ३. कर्णाचा रथ झाकिल्यानें. ४. घायाळ झालेले. ५. उच्छेद करण्यांत पटाईत. ६. एक घाव दोन तुकडे केले, असा ध्वन्यर्थ. ७. निघाले आहेत शरीरांतील बाण ज्याच्या असा. ८. शरदृतूंतील पौर्णिमेचा चंद्र. ९. कर्णाच्या सहायकर्त्या सैन्याचा नाश. १०. देवाधिपति (इन्द्र) व ग्रहाधिपति (सूर्य) यांपासून जन्मलेले (अर्जुन व कर्ण). ११. दहा हजार (हजारों) बाणांनी. * हा दुर्योधनपुत्र?

ताडी धनंजयाला मर्मस्थानीं च कर्ण आठानीं. ३२
आच्छादुनि बाणानीं पार्थरथा, सोमकांसि दे वृष भें.
पांचाळकटक तेणें विदारिलें, तट जसें महावृषभें. ३३
पार्थसहाय महाबळ जे युद्धीं धांवले महाशूर,
सिंहें श्वान तसे ते कर्णें पांचाळ पळविले दूर. ३४
दुर्योधनवीरानीं सेनापतिभुजबळप्रकर्षानें
निजजय जाणोनि, तदा केले बहु सिंहनाद हर्षानें. ३५
अर्जुन तेव्हां कोपे क्षाळाया शत्रुदारसिंदूर,
न्हाणाया निजविजयप्रभवाश्रुकरूनि कुळपतींदूर. ३६
वातें जेंवि कसपटें, कुरुकटकें दूर उडविलीं पार्थें,
भुजलीलासंपादितदुर्घटजंभारिमुखनिर्लिपार्थें. ३७
जी बाणवृष्टि केली पार्डी तत्काळ अंधकारा ती;
आम्हीं कां न म्हाणावें 'धन्य' म्हणे ज्यासि अंधकाराती? ३८
गगनाकडे पहातां झाली बहुतां जनांसि अभ्रमती.
तेव्हां पक्षी बाणव्याप्ताकाशोदरांत न भ्रमती. ३९
गगनस्थभूतसंघें मंद सुरभि शीत त्यांउपरि वारा
सोडियला, ते त्याला सेव्य, स्वामी जसे सुपरिवारा. ४०
पार्थें आधीं द्वादश शर मग कर्णासि मारिले सप्त,
न्हाला रक्तें, झाला दंडाहत सर्पपति तसा तप्त. ४१
वृष तीं बाणीं पार्था भेदुनियां, वृष्णिनायकाला ही
भेदाया सोडी शर हयसेनप्रहित पांच कालोंही. ४२

---

१. शत्रूच्या स्त्रियाच्या भागातील शेंदर [ दुःखाश्रूनी ] क्षाळाया=त्याना पतिमरणाचे दुःख द्याया. २. आपल्या यशामुळे उत्पन्न होणाऱ्या प्रेमाश्रूंनीं. ३. कुलाधिपति चद्राचे उर. ४. बाहुप्रतापानें सपादिले आहे इंद्रादिदेवाचे दुर्घट इच्छित ज्यानें अशा. ५. अप्सरादिकानीं. ६. सुगधयुक्त. ७. कर्णार्जुनावर. ८. चागल्या सेवकं जनाना. ९. अश्वसेनाने प्रेरिलेले. (कार्यकारणसबध पुढे ५९–७८ गीतीवरून कळेल) १०. कृष्णसर्परूप.

ते सर्पबाण वेगें पुरुषोत्तमकवचकाय भेदूनीं,
पाताळनदीमध्यें न्हाले घटिका हि होउं नेदूनीं. ४३
त्यां पार्थ दशशरांनीं खंडी, करि पंधरा चि ते तुकडे;
राहति कसे अखंडित, जे फिरले पक्षिनाथकेतुकडे? ४४
सक्षत रुधिरार्द्र वपु प्रभुचें पाहोनि पार्थ तो चित्तीं
क्षोभे बहु, धनलुब्ध क्षति होतां जेंवि आपुल्या वित्तीं. ४५
अर्जुन झाला रविसुतमर्मीं वरबाणपंक्ति शिरकविता,
ती कांपवी तयाचें, रसिकाचें जेंवि काय शिर कविता. ४६
दैवानें धैर्यकरें सांवरिला प्राणसंकटीं कर्ण,
नाहीं तरि गळतें वपु, वृक्षाचें वातहत जसें पर्ण. ४७
जिष्णु वधी कर्णाच्या पार्श्वपुरःपृष्ठचक्रगोपांतें:
शरधारांनीं पीडी कुरुवीरां, जेंवि शक्र गोपांतें. ४८
पार्थ क्षणांत तेव्हां विंशतिशतवीरनायकां मारी,
पळतां कुरुभट म्हणती, 'यापरिस हि उग्र काय कामारी?'
बहु मेले, बहु गेले, जन्हि झालें शून्य युद्धचत्वर तें,
नाहीं गणिलें कांहीं श्रीमत्कर्ण प्रशस्तसत्वरतें. ५०
कौरव फिरोनि आले, अधीर वृषविरह ते सहायास:
शरपातस्थळ सोडुनि दूर उभे ठाकले पहायास. ५१
कर्णवधार्थी पार्थें तेव्हां अत्युग्र योजिलें अस्त्र,
रवि झांकिला शरांनीं; भीतावरि काय घातलें वस्त्र! ५२
तें कर्ण मनीं चिंती गुरुला, हरिला जसा करीश मनीं,

१. त्या सर्पबाणाचा वेग इतका होता की, घटिका हि होऊ न देतां ते पाताळगंगेचें स्नान करून आले! २. सर्पशत्रु गरुड आहे ध्वजीं ज्याच्या त्या कृष्णाकडे. ३. हानि. ४. धैर्यरूप हात देऊन. ५. वाऱ्याच्या तडाक्यात सांपडलेलें. ६. बाजूस, मागें व पुढें राहून रथचक्राचें संरक्षण करणाऱ्यांस. ७. दोन हजार वीरश्रेष्ठांस. ८. रणांगण. ९. मोठ्या धैर्यवान् अशा. १०. बाणांचा टप्पा. ११. कर्णवधेच्छु. १२. परशुरामाला.

आथर्वणें[1], मुदित निजजन, विजयास्त्राचिया, करी, शमनीं. ५३
जें सोडी, तें अशनिप्रभ[2], भीती ज्यासि सर्व; शस्त्रा त्या
शमवी नृप, न नरा; कीं तो कृष्णा रक्ष्य सर्वशस्त्रात्या[3]. ५४
शिक्षोत्साहबळानें[4] कोणी कोणांसि त्यांत आटेना;
देवां विचक्षणांस[5] हि एक उणा एक अधिक वाटेना. ५५
योजिति अस्त्रें शस्त्रें एकाहुनि एक अधिकबळ होतीं;
उभयरता विजयश्री न टिके एकत्र एक पळ हो! ती. ५६
जेव्हां शरजाळानीं पाडिति दोघे हि अंधकारा ते,
भूतें म्हणति, 'अकाळीं प्रलय नसो, पाव अंधकाराते!' ५७
'साधु!' म्हणति त्या दोघां युद्धचमत्कार पाहतां अमर.
कीं नाहीं च कधीं ही त्यांहीं तैसा विलोकिला समर. ५८
खांडवदाहीं[6] उदरीं भरुनि जया वांचवावया माता
गगनपथें पळवी तो पार्थ करी हरुनि शिर तिच्या घाता; ५९
उगवाया तें वैर स्वाहितवधदक्ष[7] तक्षकात्मज या
कर्णाश्रयासि समयीं आला साधावयासि आत्मजया. ६०
आला होउनि योगें शररूप व्याळपाळ[8] दाव्यानें,
ज्या लाभ हानि जेथें, नेतो बांधोनि काळ दाव्यानें. ६१
तक्षकतनूज[9] तूर्णी जेव्हां शिरला तया चि समयांत[11],
सुतवदनघर्म[12] रवि-हरि पुसिति करें; होय ताप सम यांतें[13]. ६२
दिव्याप्सरा तयांतें सिंपिति शीतळसुगंधतोयांहीं,
वीजिति[14] सुव्यंजनांहीं[15]; वरिला सत्कार भव्य तो यांहीं. ६३

१. अथर्वणवेदोक्त अस्त्राने. २. वज्रासारखे किंवा विद्युल्लतेसारखे तेजस्वी. ३. सर्वप्रकारे रक्षण करणाऱ्या. ४. शस्त्राभ्यास आणि उत्साह याच्या बळाने. ५. शाहण्यास. ६. आदि० अ० ३८। १०१ पहा. ७. आपल्या शत्रूच्या वधाविषयीं तत्पर. ८. लबाडीनें. ९. सर्पराज. १०. वैर धरून. ११. त्या च वेळीं. १२. पुत्रांच्या मुखावरील घाम. १३. कर्ण व अर्जुन या उभयतांना ही सारखा च ताप झाला होता. १४. वारा घालीत होत्या. १५. चांगल्या पंख्यांनीं.

आधिक्य प्रथम दिसे, त्यावरि त्या जिष्णुसीं दिसे समता,
स्वोत्कर्ष मग क्षीण प्रतिपद कर्णासि जाहला गमता. ६४
[1]क्षतशतहत [2]पतनोन्मुख वपु झालें, फार पीडिलें अहितें.
कर्ण प्राणविनाशीं आठविता जाहला [3]तया अहितें. ६५
मग तेणें रणरंगीं भस्म कराया सुदुःसहा अरिला.
[4]पाटीरचूर्णपूर्णस्वर्णशरधिशायि सर्पशर धरिला. ६६
चापगुणीं सर्पशर द्युमणिसुतें जोडितां चि कंपातें
पावे क्षिति [5]उल्कांच्या, धारांच्या जंवि गाय, संपातें. ६७
पावे [6]सदिगधिपेंद्र हि पुत्रावरि योजितां शर भयातें,
'हा! हा भक्षील' म्हणे, 'नरसिंहातें जसा शरभ [7]यातें.' ६८
पुत्रस्नेहें झाला व्याकुळ, चिंता करी पिता [8]महती,
'[9]मा भैर्वत्स! जये श्री' एवं वाक्यें हरी [10]पितामहें ती. ६९
शल्य म्हणे, 'रिपुकंठीं हा शर लागेल या न [11]संधानें,
कर्णा! पुन्हां धरावा त्वां लक्षुनि नीट सत्यसंधानें.' ७०
कर्ण म्हणे, 'धरिला तो धरिला; संधान कर्ण फिरवीना;
लोकांत कपटयुद्धें यश [12]मादृश धीरवीर मिरवीना.' ७१
ऐसें वदोनि कर्ण व्याळाशुग सोडितां चि हाकेला
दे, '[13]पार्थ! हतोऽसि!' म्हणे; निश्चय तेव्हां जनें हि हा केला. ७२
रिपुकंठच्छेदार्थ [14]क्षेपी लक्षूनि कर्ण [15]तक्षकज्या.
मारील कोण त्यातें, रक्षक लोकत्रयैकरक्षक ज्या? ७३

१. शेकडो जखमांनी पीडित. २. अगदी पडण्याच्या बेतात आलेले. ३. त्या राखून ठेविलेल्या सर्परूप बाणातें. ४. चंदनचूर्णानें भरलेल्या सुवर्णभात्यांत निजणारा—असणारा. ५. आकाशातून पडणाऱ्या अग्नींच्या लोटानें. ६. दिक्पालांसह इंद्र. ७. हा (बाण) यातें नरसिंहातें (नरश्रेष्ठ अर्जुनास) जसा शरभ [सिंहातें, तसा] भक्षील. ८. मोठी. ९. वत्सा! भिऊं नकोस; अर्जुनाच्या च ठायीं विजयश्री [प्रतिष्ठित आहे]. १०. ब्रह्मदेव. ११. नेमानें. १२. माझ्यासारखा. १३. अर्जुना! मेलास रे! मेलास! १४. सोडी. १५. शररूपधारी अश्वसेनास.

स्वसख्याचें न हरील व्यसन त्राता करेणुचा, कां तें ?
प्रभु तत्काळ रथाच्या बुडवी स्वभरें महीत चाकांतें. ७४
तों कर्णकार्मुकगुणच्युत अहिशर जिष्णुच्या शिरोधीतें
चुकला; स्थान तसें प्रियभुज पावे न पटु ही विरोधी तें. ७५
उडवी किरीट विधिनें जें निर्मुनि यासि वाहिलें होतें,
गरळानळें पळांत चि तूळसम समूळ दाहिलें हो! तें. ७६
अहिचा जसा किरीटीं, नगशिखरीं न प्रहार अशनीचा;
अत्यंत तीव्र म्हणतो, परि तैसा दृष्टिपात न शनीचा. ७७
दिव्यमणिकनकखचित द्युमणिप्रभ तें किरीट रागानें
भस्म क्षणांत केलें आठउनी पूर्ववैर नागानें. ७८
वेष्टुनि शिर सितवस्त्रें बहु पहिल्याहूनि पावला तो भा;
पूर्णेंदुमंडळानें उदयाचळ जेंवि पावतो शोभा! ७९
प्रभुला स्तविती सुर नर रक्षाया स्वाश्रिता असी मरणीं
रचितां युक्ति, वृषास हि म्हणति, 'तुझें बळ हि हें असीम रणीं.'

# अध्याय अठ्ठेचाळिसावा.

विफळप्रयत्न झाला, परि पुनरपि अश्वसेन रविज्याच्या
भात्यांत शिरों पाहे, गाती सत्कीर्ति फार कवि ज्याच्या. १
तूणीं शिरतां पाहे कर्ण, तया अहि म्हणे, 'अगा धीरा!
योजीं मज नीट पुन्हां यावरि, मारीन पांडवा वीरा.' २
कर्ण म्हणे, 'तूं कोण?' व्याळ म्हणे, 'अश्वसेन मीं आहें.

१. गजेंद्राचा. २. कठास. ३. [तो] विरोधी (शत्रु) प्रियभुज (प्रिय आहे वक्रगति ज्यास तो—सर्प) पटु हि (हुषार असून हि) ते तसे स्थान (कठासारखें मर्मस्थान) न पावे. ४. सूर्यासारखें तेजस्वी. ५. शोभा. ६. [शुभ्र व गोल अशा] पूर्णचंद्राच्या योगानें. ७. अर्जुनास.

पार्थें माझी माता वधिली, ठावें असे तुला बा! हें. ३
हें कार्य तुझें चि नव्हे, माझें हिः करीन आजि हानी च,
जन्हि हर्यधिक, जळेल चि माझ्या गरळाग्निमाजि हा नीच.' ४
तेव्हां हास्य करुनि तो रविपुत्र म्हणे तयासि, 'हे भुजगा!
न परबळें विजयार्थीः इच्छिति जय निजबळें चि हे भुज गा!
एका बाणाचें हा कर्ण महासंकटांत ही नागा!
संधान दोनदां तों नाही च करीत, सत्य हें, बा! गा! ६
एक किती? जिष्णु असे शत मारील चि रणीं, न भागे हा.
हें सुख घ्यायासि नभीं जा किंवा त्यजुनियां नभा गेहा.' ७
कर्णोक्तासि न साहे, निजरूप धरुनि विष्णुजननाशा
धांवे व्योमपथें तो पुरवाया मातृशत्रुहननाशा. ८
तेव्हां प्रभुनें सावध पार्थ करुनि वैरमूळ ही कथिलें:
मथिलें अहिला विजयें; रंजतासीं न पविजें तुळा कथिलें. ९
भस्म कराया नलगे दवदहना फार कोप टोळाचें,
तेंवि नरास हिः अहिचें खंडन करि जेंवि तो पंटोळाचें. १०
प्रभुनें मग उद्धरिला भूमग्नचरण रथ स्वबाहूनीं,
ज्यांहीं क्षिति उद्धरिली, लक्ष्मी भुलली जयांसि पाहूनीं. ११
तेव्हां स्वधनुष्याच्या ओढुनि रोषें गुणासि आकर्ण,
ताडी तीव्रतरांहीं पंक्तिशरांहीं पृथासुता कर्ण. १२
जिष्णु हि त्याच्या बारा बाणांनीं ताडुनि स्वकाय, दुज्या

१. इंद्राहून अधिक (बलवान). २. पार्थवधाचें सुख. ३. आकाशात जाऊन पहात बैस. ४. कृष्णभक्त अर्जुनाच्या नाशास. ५. पार्थवधेच्छा. ६. रुप्यार्शी. (रौप्य म्हणजे कर्ण व कथिल म्हणजे तक्षकपुत्र. रुपें काहीं वेळ तरी धनंजयापुढें—अग्नीपुढें टिकतें; पण कथिल तेव्हां च विरघळतें. त्याप्रमाणें धनंजयानें—अर्जुनानें—अश्वसेनास सहज क्षणांत मारिलें; पण कर्णानें मात्र बरा च वेळ टिकाव धरला, असा ध्वन्यर्थ. ७. पडवळाचें. ८. वर काढिला. ९. पृथ्वींत रुतलें आहे पाऊल अर्थात् चक्र ज्याचें असा. १०. दहा बाणांनीं. ११. कर्णाचा स्वतःचा देह.

यम चि अशा नाराचें वेधुनि सुखवी धना स्वक्ता यदुज्या. १३
नाराच रक्त सेउनि शिरला भेदूनि काय महिमाजि,
तन्हि निश्चळ वृष; त्याचा वर्णावा फार काय महिमा जी!? १४
'द्वादश बाणानीं वृष भेदी त्या शाश्वता अभेद्या' या
व्यासोक्ति बहु उदारा आश्चर्योत्कर्ष सत्सभे द्याया.' १५
नवति शरानीं ताडुनि पुनरपि एकें खरें शरें हरिज्या,
मर्मी हाणी, न्हाणी रक्तें भक्तेंद्रतेसि दे हरि ज्या. १६
ऐसें करूनि, गर्जे, हांसे कर्ण प्रताप दावूनीं.
तेणें पार्थ क्षोभे चित्तीं स्वपराभवासि भावूनीं. १७
पार्थ नवति विशिखानीं मर्मी भेदूनि शीघ्र कर्णातें,
चूर्ण करि क्षणमात्रें तन्मुकुटातें हि अर्कवर्णातें. १८
खंडूनि रत्नकुंडलयुग कवचाचे हि खंडखंड करी.
कर्ण व्याकुळ झाला जेसा हरिनखरभग्नगंड करी. १९
मग काळानळदंडप्रतिम शरासि स्तनांतरीं ओपी,
कर्णाच्या रक्तातें कोपी काळाहिपाळसा तो पी. २०
त्या खरशरप्रहारें कश्मळ कर्णासि तत्क्षणीं आलें,
पार्थे कर आवरिला, मन आर्यव्रतविलंघना भ्यालें. २१
तेव्हां कृष्ण म्हणे, 'तुज हित कथितों मीं, अयुक्त न गमो हें;
व्यसनीं रिपु मारावाः भाग्यें हा विकळ धैर्यनग मोहें. २२
धर्मज्ञनीतिनिपुणश्रेष्ठ महेंद्रादि, दारुणा अरितें
व्यसनीं वधूनि करिते झाले लोकांत पावनें चरितें. २३
हा अमर धर्मयुद्धीं. कोणें न कर्णासि मानवे शंखी?

१. स्वकाय धन च अशा कृष्णाला. २. आवनाशा व आवदार्य अशा (कृष्णाला). ३. तीक्ष्ण अशा. ४. इंद्रपुत्र अर्जुनास. ५. भक्तश्रेष्ठतेस. ६. सिंहाच्या नखानीं विदारण केले आहे गंडस्थळ ज्याचें असा. ७. कालसर्पश्रेष्ठासारखा. ८. मूर्छा. ९. मूर्छितावर प्रहार न करणें हे आर्यव्रत. १०. कोणता वीर कर्णाला मान देत नाही?

यासि कसें तरि मारुनि सुखवावी त्वां [1]स्व-मानवेशस्त्री.' २५
शास्त्रीं वर्णिति ज्याच्या [2]धर्मदयाढ्या अनुग्रहासि कवी,
सच्छळकवधार्थ असें साधुसि, जरि हारि अनुग्र हा, सिकवी
धर्मविरुद्ध हि गमलें, परि गुरुवचनासि साधु अनुसरला;
तरि च पुढें जय विजया आलिंगाया धरूनि हनु सरला. २६
[3]भगवत्प्रोक्तें पार्थें मोहांत हि कर्ण तो महानिकरें,
बहु पीडिला शरांच्या निकरें [4]तत्प्राणशक्तिहानिकरें. २७
तरि हि महातेजस्वी तो [5]पीनायतसुवृत्तबाहु निहीं
शमला न, पेटला चि ज्वलन जसा पेटतो घृताहुतिहीं. २८
सावध होउनि कर्ण छेदी तत्काळ बाणजाळातें;
पार्थासि दश शरानीं ताडी, [6]सानीं च विश्वपाळातें. २९
क्षोभे पार्थ महात्मा, भेदाया त्या वृषासि कोपानें
अभिमंत्री घोरशरा, [7]असुरास्रांच्या, अतृप्त जो, पानें. ३०
तों आला वधसमय; [8]द्विजशाप हि भूमुखें चि तो डावें
गिळवी रथचक्र, म्हणे, 'रामास्त्रा! प्रेम त्वां हि तोडावें.' ३१
चक्र क्षितिनें गिळितां, न [9]स्मरतां भार्गवास्त्र, रविज्याला
स्पर्शे विषाद, म्हणती, 'बळतेजोनाशहेतु' कवि [10]ज्याला. ३२
व्यसनीं पडतां, क्षात्रीं धर्मी होवूनि तो विरस 'हाय!'
कर्ण म्हणे, [11]धर्मास हि मानी कीं, 'हा नव्हे [12]चिरसहाय.' ३३
"'[13]धर्मप्रधान जो, त्या,' तज्ज्ञ, 'सदा धर्म रक्षितो,' म्हणती,
म्हणुनि यथाशक्ति तया भजलों भावें करूनियां प्रणती. ३४
परि न व्यसन निवारी, हात न दे आजि आजिमाजि मला

१. आपली राणी द्रौपदी. २. धर्मदयापूर्ण अशा. ३. श्रीकृष्णाच्या भाषणानें. ४ त्याच्या प्राणशक्तींचा ( प्राणाचा ) नाश करणाऱ्या. ५. पुष्ट, दीर्घ व गोल आहेत बाहू ज्याचे. ६. सहा बाणानीं. ७. दैत्यांच्या रक्ताच्या. ८. मागें अ० २९।२७ पहा. ९. मागें अ० २९।१० पहा. १०. ज्या विषादाला. ११. स्वधर्मास. १२. कायमचा सोबती. १३. धर्म हा च आहे श्रेष्ठ ज्याला तो, धर्मपरायण.

यावरुनि, धर्म भक्ता नित्य न रक्षीतसे असा गमला." ३५

यापरि खरतरनरशर सर्प तसे क्रूर झोंबतां मर्मी,
कर्ण व्याकुळ झाला; चित्तीं निंदी पुनःपुन्हा धर्मा. ३६

मग तीं तीं बाणानीं प्रभुचे क्षतजार्द्र करुनियां हात,
कर्णें पार्थशरीरीं शर, भेदुनि कवच, रोंविले सात. ३७

अर्जुन होउनि कोपें तप्त, विशिख सप्त उग्र बरवे घे:
तन्मोक्षीं[1] सुतशोकानळराशिवरि ग्रहप्रवर वेघे. ३८

पीडी नर, रविचा जो बहिश्चरप्राणसा तया, म्यां[2] तें
काय कथावें? हसले क्रौर्यें ते बाण सात याम्यांतें[3]. ३९

विधि फिरतां जरिहि दिधला व्यसनें त्या फार कंप दात्यातें,
परि परिरंभण[4] देउनि होती शुचिसत्वसंपदा[5] त्यातें. ४०

अरिवरि पद्मभवास्त्र[6] द्युमणिसुतें वीरवर्ण्यसत्वरतें[7]
तेव्हां हि[8] योजिलें हो! प्रकटे प्रलयाग्निरूप[9] सत्वर तें. ४१

ऐंद्रास्त्र[10] पार्थ योजी, आपण[11] चि तयाचिया जळें शमनीं,
तेव्हां सुखवी दुखवी स्वहितां अहितांसि कुरुबळेश[12] मनीं. ४२

कृष्ण म्हणे, 'बापा! हूं! बा! पाहूं दे तुझ्या चरित्रास;
अस्त्रांतरासि योजीं, पावोत मनीं जनीं अरि त्रास.' ४३

ब्रह्मास्त्रातें योजुनि अर्जुन रविसूनुला अदभ्रांनीं[13]

---

१. [अर्जुनानें] ते बाण सोडतां च पुत्रशोकरूपी अग्नीच्या राशीवर सूर्य चढला. (सायंकाळीं पश्चिमेकडे आकाश लाल होतें व सूर्य हि अस्तमानीं लालभडक गोळ्यासारखा दिसतो. या वेळीं सायंकाळ झाली होती, हे पर्यायानें सांगितलें). २. संजयानें. ३. यमदूतांना. ४. आलिंगन. ५. शुद्धसत्वशीलतारूप लक्ष्मी. ६. ब्रह्मास्त्र. ७. वीरांनी स्तुति करण्यास योग्य अशा क्षात्रधर्माच्या ठायीं अनुरक्त असलेल्या. ८. अशा कठिण प्रसंगीं हि. ९. प्रलयाग्नीप्रमाणे रूप ज्याचें. १०. पर्जन्यास्त्र. ११. स्वतः तें ऐंद्रास्त्र च. १२. कर्ण. १३. पुष्कळ (शरजालांनी).

शरजालानीं[1] झांकी, वासव रविला जसा सदभ्रानीं. ४४
गांडिवगुणासि तेव्हां तरणितनय तीव्रतरशरें तोडी;
अर्जुन कळों न देतां गांडीवीं सुदृढ अन्य गुण जोडी. ४५
कर्ण म्हणे, 'शर चुकला जो ज्याछेदार्थ[2] सोडिला पहिला,
आश्चर्य थोर जालें! भ्रमला पक्षींद्र खंडितां अहिला!' ४६
दुसरा[3] तिसरा चवथा ऐसे गांडीवगुणशत छेदी,
वरिच्येवरि गुण जोडी, कर्णाला जिष्णु तें कळों नेदी. ४७
गुण जोडितां सुताला बहु कार्मुकवेदपंडितांत रणीं
वर्णी शक्र, तयाहुनि फार शतगुणांसि खंडितां तरणी[4]. ४८
ऐसें न हाणितां ही मर्मीं विषदिग्ध[5] बाण तापार्थ,
भ्रमवी अरिला लाघव दावुनि बहुयुक्तिजाणता पार्थ. ४९
कर्ण म्हणे, 'हा! ऐसें झालें नव्हतें कधीं हि संधानीं!
गुण देखिला न कैसा शतबाणानीं हि जीव[6] अंधानीं?' ५०
मग नगभित्तनयास्त्रें[7] वारुनि वृष 'धन्य' आपणा म्हणवी,
चापगुणझणत्कारें दिग्वारणमस्तकें हि झणझणवी. ५१
राधापुत्र बहु करी बाधा पार्थासि, तेधवां त्याला
राधाहृच्चोर[8] म्हणे, 'वा! धाक प्राप्त कां तुला झाला? ५२
सावध होईं वीरा! पुनरपि अस्त्रासि शीघ्र अभ्यासीं[9].

१. आपला पिता इंद्र ज्याप्रमाणे आपल्या शत्रूच्या–कर्णाच्या–पित्याला –सूर्याला–उत्तम मेघानीं झाकतो त्याप्रमाणे अर्जुनाने कर्णाला बहुत शरजालानीं झाकलें, असा ध्वन्यर्थ. २. धनुष्याची दोरी तोडण्याकरिता. ३. 'गुण' (धनुष्यरज्जु) हा शब्द पुल्लिंगी आहे. दुसरी, तिसरी, चवथी याप्रमाणे गांडीव धनुष्याच्या शंभर दोऱ्या कर्णाने तोडल्या. ४. कर्णपिता सूर्य. ५. विषयुक्त. ६. जणु कांय अंध झालेल्या शंभर बाणानीं सुद्धा धनुष्याची दोरी कशी ती कधीं पाहिली च नाहीं! ७. पर्वताचें भेदन करणाऱ्या इंद्राच्या पुत्राची–अर्जुनाची–अस्त्रें. ८. राधेचें अंतःकरण हरण करणारा (श्रीकृष्ण). ९. एकसारखी योजना कर.

पावेल कोण खळ जय संगर तुजसीं करूनि सभ्यासीं?' ५३
देतां धीर प्रभुनें, पार्थ मनामाजि धरुनि कोपातें,
अभिमंत्रुनि रौद्रास्त्रें[1], हस्तीं घे अहिवरोग्ररोपातें[2]. ५४
तों वृष भूमिग्रस्तस्यंदनचक्रासि उद्धरायातें,
उतरे स्वरथाखालें, करुनि असें तुमुल युद्ध राया! तें. ५५
उद्धरण करूं पाहे कर्ण भुजाहीं धरूनि चक्राचें,
परि पृथिवी सोडीना: जाणों व्रत घेतलें चि नक्राचें[3]! ५६
सप्तद्वीपा[4] पृथ्वी वृष उचली च्यार अंगुळें वरती,
बडिशासि[5] जसी मत्सी, गुगळी चक्रासि, कांपली पर ती. ५७
कर्णेन[6] गीर्णचक्रा सप्तद्वीपा धरा सशैलवना,
चतुरंगुलमुत्क्षिप्तेत्यूचे भगवान्मुनिर्विशुद्धमनाः[7]. ५८
सद्रसना[8] नामातें कीं सोडी बंधुता[9] न दायातें[10],
तैसी क्षिति चक्रातें: श्रम झाला फारसा तदा यातें. ५९
काळवदन कायातें, रथचक्रातें तसें क्षितिश्वभ्र[11]
बहुयत्नें हि न सोडी: कर्ण म्हणे, 'मरण यापुढें दभ्र[12]!' ६०
त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रासि वृष, म्हणे, 'हाय!'

१. पाशुपतास्त्रानें. २. सर्पश्रेष्ठाप्रमाणें भयंकर असलेल्या बाणास. ३. [गजेंद्राचा पाय धरिलेल्या] सुसरीचें. ४. पृथ्वीमध्यें चार, सात, नऊ किंवा तेरा खंड आहेत अशी त्यांच्या नावांसह पुराणग्रंथीं भिन्न मतें आढळतात. ५. गळास. ६. जिनें रथचक्र गिळिलें आहे अशी सप्तद्वीपवती, पर्वत व वनें यांसहवर्तमान असलेली अशी पृथ्वी कर्णानें चार बोटें वर उचलली, असें शुद्ध अंतःकरणाचे भगवान् व्यासमुनि बोलते झाले. ७. ही आर्या ज्या मूळ श्लोकाचें रूपांतर आहे तो पुढील श्लोक कवीनें ह्या आर्येंत च लिहिला आहे.

सप्तद्वीपा वसुमती सशैलवनकानना।
गीर्णचक्रा समुत्क्षिप्ता कर्णेन चतुरंगुलम् ॥

८. साधूची जिह्वा. ९. भाऊबंदकी. १०. हिस्सास. ११. पृथ्वीचें भोक. १२. कमी; तुच्छ.

काय करील? न साहे तें; बहु मर्मीं हि साहिले घाय. ६१
स्ववधोद्यतार्जुनातें कर्ण म्हणे, “बळ तुझें अनंत रहा[1]
स्वस्थ मुहूर्तभरि; रणश्रद्धा[2] पुरवील गा! अनंतर[3] हा. ६२
रक्षावा धर्म बुधें, कुशळांचा धर्म हा निधी; राहें
स्थिर: जें करिसि निरायुधमथन[4] करिल धर्महानि धीरा! हें.
रथचक्र उद्धरूं दे; श्रुतिशास्त्रज्ञा! महारथा! कुळज्या!
साधु न हाणिति अरिला, पाहति अधृतायुध व्यथाकुळ ज्या.
जी कीर्ति पूर्वजांची, वृद्धिमती[5] करिति पुनरपि कवी ती;
यश बुडउनि अयशातें सुकुळक्षेत्रांत कुनर पिकवीती. ६५
सत्पुरुषा! न करावें कापुरुषाचीर्ण[6] कर्म, थांब कसा;
हो राजहंस; होसी मलिनें कर्मेंकरूनि कां बकसा? ६६
वर्णिति तुज युद्धीं त्वां केले जे सायकार्त वीर्यानें,
म्हणती, ‘होउनि केली द्विभुज पृथा माय कार्तवीर्यानें.[7]’ ६७
तूं वेदांतावभृतस्नात[8] ख्यात स्वसत्क्रियायुक्त,[9]
दिव्यास्त्रज्ञा! नाहीं स्वगुरूंचें विसरलासि तूं उक्त.[10] ६८
तूं स्वरथीं क्षितिवरि मीं, तूं सायुध मीं अशस्त्रकवच रणीं,
न वधावें मज, जों मीं रथचरणीं, लाग तूं हि भवचरणीं.[11] ६९
भ्यालों न तुज हरिस हीं; जो न तुला विमुख[12] काय कातर[13] तो?
कथितों यास्तव कीं, जन धर्में भवसिंधु नायका[14]! तरतो.” ७०

१. थाब. २. युद्धाची हौस. ३. रथाचे चाक काढल्यावर. ४. निःशस्त्राचा वध. ५. वाढती. ६. नीच मनुष्याने आचरण्याजोगे. ७. सहस्र बाहू असलेल्या सहस्रार्जुनाने च द्विभुज होऊन या अर्जुनाचे रूपाने कुंतीच्या पोटीं जन्म घेतला. तात्पर्य, या उभयतांचा पराक्रम एकरूप आहे. ८. साग वेदांताध्ययन झाल्याचें दर्शक असे विध्युक्त स्नान केलेला. ९. आपल्या उत्कृष्ट कर्तव्यांत रत असा. १०. उपदेश. ११. [ यशप्राप्तीसाठीं ] शंकराचे चरणी. १२. पराङमुख. १३. भित्रा. १४. सेनापते अर्जुना!

# अध्याय एकुणपन्नासावा.

कृष्ण म्हणे, "राधेया! भला बरा स्मरसि आजि धर्मातें;
नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवासि, न स्वकर्मातें; १
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एकमति झालां,
कैसे कपटद्यूतीं चित्तीं हि न धर्म लंघितां भ्यालां? २
जेव्हां सभेसि नेली पांचाळी, मानिलें मनीं शर्म,
तेव्हां गेला होता कोठें राधासुता! तुझा धर्म? ३
राज्य न देसी, करवुनि वनवासाज्ञातवास ही, जेव्हां,
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना! तेव्हां? ४
केले दग्ध जतुगृहीं त्वां पांडव वाराणावतीं जेव्हां,
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना! तेव्हां? ५
चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले नृपें; असें खोटें
कर्म करवितां, कर्णा! होता तव धर्म तेधवां कोठें? ६
फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग,
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा!? सांग. ७
'शाश्वत नरकीं पडले पति पहिले षंढतिल, वरीं अन्या,'
बोलुनि असें सभेंत द्रुपदाची गांजिली तुवां कन्या. ८
खरदुर्वाक्यशरशतें भेदित होतासि जेधवां मर्म,
तेव्हां गेला होता कोठें राधासुता! तुझा धर्म? ९
अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म,
तेव्हां गेला होता कोठें राधासुता! तुझा धर्म? १०
पूर्वीं धर्म न रुचला, त्यजिला निपटूनि तो जसा कुचला,
आतां चि बरा सुचला? धर्मगृहा, सर्व व्हा परासु, चला. ११
नळ होय धर्मराजा, कळहोत्सुक पुष्कर हि तम्हीं सर्व.

१. कायमच्या. २. तीक्ष्ण. ३. समळ. ४. विषविशेष. ५. यमसदनास. ६. गतप्राण. ७. नलराजाचा भाऊ.

बळ होतें सत्याचें, खळ हो! तुमचा न चालिला गर्व. १२
मागें चि तुम्हीं भजतां धर्माला तरि तुम्हांसि वांचविता.
आतां मरा; न वांचे दीप्तगृहीं[1] जो न तोय सांचविता. १३
मागें चि धर्म करितां, जरि देतां राज्य, धर्म वांचविता.
न जगे तो दुर्भिक्षव्यसनापूर्वीं[2] न धान्य सांचविता. १४
आतां रक्षील कसा धर्म, तुम्हीं वित्तमद्यमत्तानीं
जो लोटिला दहादां स्वहित हि मानूनि अहित लत्तानीं? १५
रक्षावा धर्म असा करिसी उपदेश. तरि असे मान्य.
रक्षितसों धर्मातें[3], आम्हांला धर्म ठाउका नान्य[4]! १६
हा धर्म मूर्तधर्म प्रभु, यातें भजतसों; असा मान्य
लोकांत कोण दुसरा? सामान्य नव्हे चि हा, असामान्य." १७
आश्रितजनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें,
निश्वास वृष लज्जावनतमुखें[5] सोडिला जसा नागें. १८
न वदे कांहीं च, रथीं वेघे, घे सूर्यसूनु चापातें,
सोडी बाण कराया मूर्छित शक्रासि सूनुच्या पातें. १९
तेव्हां परपुरुष[6] म्हणे, 'पार्था! दिव्यास्त्रवात सोडावा,
झोडावा, मोडावा वैरद्रुमकर्ण[7]; बाण जोडावा.' २०
कर्णावरि बहु कोपे पार्थ[8] जई तेधवां अनळसाचा
देह ज्वाळामाली[9] भासे त्या रणमखीं अनळ साचा. २१
त्यावरि करि प्रयोग ब्रह्मास्त्राचा चि कर्ण, वाराया;
तेणें चि पार्थ शमवी; भेटे अर्णव चि अर्णवा राया!! २२
योजी अनळास्त्र विजय, जें भस्मदशेसि दारुणा नेतें;
कर्णानें नाशाप्रति नेलें तत्काळ वारुणानें[10] तें. २३

१. पेटलेल्या घरांत. २. दुष्काळरूपी विपत्तीपूर्वी. ३. धर्मातें (पक्षीं) धर्मराजातें. ४. न अन्य. ५. लज्जेनें खालीं घातलें आहे तोंड ज्यानें अशा कर्णानें. ६. परमात्मा श्रीकृष्ण. ७. वैराचें केवळ झाड च असा कर्ण. ८. आलस्यरहित अर्जुनाचा. ९. ज्वालायुक्त असा अग्नि. १०. पर्जन्यास्त्रानें.

निर्मिति वरुणास्त्रज घन गगन व्यापूनि अंधतमसातें,[1]
तेव्हां झाला पाहुनि डोळस ही लोक अंधतमसा[2] तें. २४
जलदांधकार[3] हरिला पार्थे योजूनि पावना[4] सारा,[5]
भक्तें मोह जसा हरिनामा योजूनि पावना[6] सारा. २५
कर्ण स्वास्त्रविनाशें क्षोभे, काढी महोग्र शर, भाचा
शौरीचा[7] माराया, वेगगुणें जो सखा चि शरभाचा. २६
जन म्हणति, 'पावला या कर्णशरें आजि पार्थ हा हानी.'
त्या काळीं नभ भरिती पांडवपांचाळसार्थ[8] हाहांनीं.[9] २७
शर जोडितां गुणातें सुर हाहाकार अंबरीं करिती,
कांपे अचळा[10] अचळांसह[11] जरि सर्वसहा[12] खरी तरि ती. २८
शर सोडिला रविसुतें, धीरजनें हि स्वधीर, यामागें
जो सोडिला चि नव्हता व्यसनांत कधीं हि, मणि जसा नागें.
तो शर गरधरवरसा,[13] पविसा,[14] रविसा,[15] स्मरारिसायकसा,[16]
पार्थभुजांतरिं शिरला वल्मीकामाजि[17] नागनायकसा. ३०
त्या खरशरप्रहारें विव्हळ झाला महेंद्रसुत राया!
जरि होता निकट कुशळ [18]मंत्री प्रभु बाणसर्प उतराया. ३१

१. गाढ अंधकारास २. अत्यंत अंधासारखा. ३. मेघांनी केलेला अंधकार. ४. वायव्यास्त्रास. ५. सगळा. ६. पवित्र व सारभूत अशा. या पर्वांतील पूर्वीच्या सव पाठांतराप्रमाणे या हि आर्येवरील पाठांतर कवीने धावता क्रमांक टाकून च लिहिले आहे:–

**वरुणास्त्रतिमिर पार्थे हरिलें तत्काळ पावनें सारें,**
**भक्तें अज्ञान जसें हरिनामें विश्वपावनें सारें. २६**

७. वसुदेवाचा. ८. समुदाय. ९. 'हाय! हाय!' अशा दुःखोद्गारांनी. १०. पृथ्वी. ११. पर्वतांसह. १२. सर्व सहन करणारी. १३. सर्पश्रेष्ठासारखा भयंकर. १४. वज्रासारखा दुर्भेद्य. १५. सूर्यासारखा तेजस्वी. १६. शंकराच्या बाणासारखा अमोघ. १७. वारुळामध्यें. १८. मांत्रिक.

तेव्हां 'मीं कोण' असें अर्जुन पावोनि कांप न समजला,
राया! रोमांचित तद्देह न भासेल कां पनस मजला? ३२
हस्तापासूनि सगुण गांडीव हि जिष्णुचें गळोनि पडे,
जाणों आपण अक्षत, पाळक सक्षत, म्हणोनि खेद घडे! ३३
बहुदूरसूक्ष्मदर्शननिपुणें भ्रमलीं परंतु शरपातीं;
जाणों लज्जित नयनें वदन न दाविति करूनि वर पाती! ३४
ऐसा निजभुजविक्रम दावुनि सर्वां भटांसि युद्धरणीं,
उतरे वृष दावाया भूग्रस्तरथांघ्रिच्या हि उद्धरणीं. ३५
बहु यत्न करी, प्रार्थी, परि धरिलें सोडिना चि चाक रसा,
द्विजशाप मान्य पतिसा गुरु, तीस न कर्ण मान्य चाकरसा.
जों वृष करीत होता चक्रोद्धरणप्रयास तापार्थः
राहुविमुक्तार्क तसा झाला गतमोह भासता पार्थ. ३७
देव म्हणे, 'पहिलें गुरुनाम, मग स्वधनु, बाण वरवे घे,
खंडीं शिर, रिपु पुनरपि जों रथरत्नांचिया न वर वेंघे.' ३८
प्रभुची आज्ञा होतां पार्थ प्रखरेषु सोडुनि त्वरित,
रणदक्षा स्वविपक्षा करि कक्षाकेतु खंडुनि ज्वरित. ३९
तुटला ध्वज चि न केवळ, विजयाचा भरवसा हि तुटला हो!
सुहृदश्रुबिंदुसह तो पडला, बळधैर्यसेतु फुटला हो! ४०
केतु छेदुनि पार्थ द्युमणिसुताचे हरावया प्राण,
जोडी गांडीवगुणीं शक्रहरिहरायुधांअसा बाण. ४१
त्यातें पूजित होता पार्थ सदा, कीं, तसी च भा त्यांतः
हरि पंजरीं, करंडीं अहि, वागविला तसा चि भात्यांत. ४२

१. गुणवान असे. २. अत्यंत दूरचा पदार्थ बारकाईनें निरखून पाहण्यांत प्रवीण अशीं. ३. नयनांचें वदन=आंतील भाग. ४. [ निजभुजविक्रम ] दावाया ५. रथांघ्रि=रथचक्र. ६. स्वतःस त्रास देण्यासाठीं च. ७. युद्धपटु अशा आपल्या शत्रूस. ८. रथाच्या बाजूस असलेला ध्वज. ९. पीडित, जर्जर. १०. सैन्याची हिंमत हा च कोणी बधारा.

जो दुर्निवार्य असुरां देवांस हि, ज्या शरा महावेगा
मन हि न पटु लंघाया; गरुड-पवन तुळुनि कां पहावे गा!? ४३
तत्संधानीं कांपे जग, नग, जगती हि; होय यम हर्षी.
'स्वस्त्यस्तु' मात्र म्हणती, उच्चारिति अन्य वर्ण न, महर्षी. ४४
योजुनि महास्त्रमंत्रित शर विजय म्हणे, 'जरि स्वगुरु सर्व
तोषविले असतील, ज्ञानबळाचा नसेल तिळ गर्व, ४५
जरि गीत मृगें किंवा जैसें बाळें क्षुधाकुळें स्तन्य
म्यां सेविलें असेल प्रेमें सुहृदुक्त सोडुनी अन्य, ४६
विधिनें जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें न तप नाशा
तरि या शरें वृष मरो; हरिची च पुरो, पुरो न तपनाशा.' ४७
ऐसें म्हणोनि पार्थें ओढुनियां सगुण बाण कर्णान्त
पाठविला काळें निजदूत तसा व्हावयासि कर्णान्त. ४८
नयनाग्निकील नीलग्रीवाचा मीनकेतुवरि जैसा
अरिवरि सायकनायक जाय कराया क्षय त्वरित तैसा. ४९
तो शर कृत्यानळसा दुर्घटचक्रोत्धृतिक्रियानळसा
गांठी कुरुबळविजयप्रासादाच्या रविप्रभा कळसा. ५०
शाणनिशितमुख बाण प्राणभृदीड्यार्कसूनुच्या अमळा,
खंडी नाळापासुनि कमळा मारुत तसा, शिरःकमळा. ५१
हरितां शरें करुनि बहु गरुडापरिस त्वरा शिर, विझाला
जाणों दीप चि; तें बहु विव्हळ, जरि सत्वराशि, रवि झाला.

१. कल्याण असो. २. अगावरील दंश. ३ शास्त्रोक्त मार्गानें जोडलेल्या तपाचा स्वमुखानें उच्चार करून. ४ इंद्राची ५. [ माझा पराभव व्हावा ही ] सूर्याची आशा. ६. नेत्राग्नीची ज्वाला. ७. शंकराचा. ८. मदनावर. ९. कृत्यारूप अग्नीसारखा. १०. चक्र वर काढण्याच्या दुःसह कामांत आळशी नसलेल्या अशा कर्णास. ११. सूर्यासारख्या सतेज. १२. सहाणेवर घासून तीक्ष्ण केलें आहे टोंक ज्याचें असा. १३. प्राणिमात्रांनीं स्तुति करण्यास योग्य अशा सूर्यपुत्राच्या. १४. निर्मळ. १५. देठापासून. १६. मूळपाठ—**बहुत विकळ.** * सर्व लोक.

[1]साप्ताश्रु शिर वृषाचें प्रथम क्षोणीतळीं गळालें हो !
मग सकुसुमवृष्टि तनूः [2]सधर्मभय शत्रुबळ पळालें हो ! ५३
कर्णशरीरापासुनि तेज निघालें दिवाकरीं [3]शिरलें,
[4]गुरुहृच्छोकतमावरि जाणों [5]सत्पुत्रसत्व तें फिरलें ! ५४
ऐसा केला असतां कृष्णकृपेनें चि कर्णनाश तदा
पांडव-पांचाळ करिति विजयाच्या वीर्यवर्णना शतदा. ५५
बहु सिंहनाद वाद्यध्वनि जयजयकार करिति धर्मबळें,
म्हणति, 'युधिष्ठिर तरला दुस्तरकर्णार्णवासि धर्मबळें.' ५६
जैसें[6] स्वमुखींचें जळ खळबळ पळ, पळ न लागतां, काढी,
मरतां चि कर्ण, चिंता भीति हि शिरली मनामधें गाढी. ५७
बहु भीमसिंह नादें न सुचे पथ रिपुमृगां असें भुलवी:
वज्रें शिळातळेंसीं शत्रूंचीं कठिन काळिजें उलवी. ५८
भग्नरथें शल्य पळे, क्षितिसि म्हणे, 'क्षोभलीस तूं कां गे !?'
दुर्योधनासि भेटे, स्वमुखें कर्णान्तवृत्त तो सांगे. ५९
भूप म्हणे, 'हा ! हा ! असि कसि झाली आजि अंगराजगती ?
स्वर्गश्री साधावी मग, आधीं करुनि संगरा जगती ! ६०
तें विपरीत कसें त्वां केलें ? कर्णा ! सख्या अगा ! धामीं
सुख काय ? तरों कैसा या त्वद्विरहार्णवा अगाधा मीं ? ६१
हा ! दानशूर ! नाहीं शिवलें [7]त्वन्मुखपयोभव नकारा,
[8]द्विजसंकीर्ण न दिसतां वाटत होतें तुला भवन [9]कारा. ६२
करितील [10]जागरव्रतराज्याची आजि पारणा राजे,

१. आप्तजनाच्या अश्रूसह. २. धर्मराजाच्या मनांतील भीतीसह शत्रूचें सैन्य. ३. सूर्यांत. ४. पित्याच्या अंतःकरणांतील शोकरूप अंधकारावर. ५. सत्पुत्राचें वीर्य (तेज). ६. कर्ण मरतां च, ज्याप्रमाणें आपल्या तोंडावरील पाण्यानें तत्काल पळ काढला त्याप्रमाणें त्या दुष्ट सैन्यानें हि पळ काढला. ७. तुझें मुखकमल. ८. ब्राह्मणांनीं भरलेलें. ९. कारागृह. १०. [ तुझ्या भीतीनें घडणाऱ्या ] जागरणरूप श्रेष्ठ व्रताची.

सुचिर जया आचरले तुज मारायासि मार्गणभरा जे.' ६३
ऐसे विलाप करितां शल्यें समजाविला; पुन्हां परते;
स्वभटांसि म्हणे, "परता, मजला न विलंघितील हो! पर ते.
कर्णे कृष्ण[1] सुजर्जर केले आहेत, कां वृथा पळतां?
'मरण न सुटे चि' असें कळतां कां अपयशांजनें[2] मळतां? ६५
कर्णाच्या उतरायी व्हाया वधितों रिपूसि, या, परता.
कैंचा जयलाभ खळा अशस्त्रकर[3]वीरघातपापरता?" ६६
कितिएक म्हणति, 'कैसें जावें सोडूनि राय होकरितां[4]?'
किति म्हणति, 'वृप हि मेला तेथें परतोनि काय हो! करितां?'
किति म्हणति, 'हा न चुकला प्रियबांधवकर्णकाय होमाया,
पार्थदहनिं सर्वांस हि होमील चि, यासि काय हो! माया?' ६८
साधु स्वधर्म म्हणउनि, वीर धरुनि धीर परतले मागें.
त्यांवरि भीमधनंजयधृष्टद्युम्नादि धांवले रागें. ६९
स्वरथावरूनि उतरुनि कोपावेशें तदा गदापाणी[5]
कुरुकटकांत मिसळला तो हि धनंजय धनंजयावाणी[*]. ७०
कुरुवीर पंचविंशति[6]संख्यसहस्र प्रचंड भीम वधी;
पार्थें हि फार वधिले; नाहीं च तयाचिया बळा अवधी[7]. ७१
दुर्योधनें हि तेव्हां केलें निःसीम युद्ध, परि सेना
रक्तें न्हाली, भ्याली, झाली विमुख, प्रभूक्त परिसेना. ७२
तें शल्य म्हणे, 'राया! जातो अस्तचळासि हा तरणी,
जावें शिबिरासि; जयें[8] दिधला अहितांसि आजि हात रणीं. ७३
बहु वधिले पार्थानें, धरिला पोटांत धाक कटकानीं;
वाटे हा तो चि प्रभु, जो केला श्रवण कल्पनट[9] कानीं. ७४
आतां सर्वमतें हें कीं, जावें स्वशिबिरा रहायास;

१. कृष्णार्जुन. २. अपकीर्तिरूप काजळानें. ३. निःशस्त्र वीराचा नाश केल्याचें पापात रममाण झालेल्यास. ४. बोलावीत असतां. ५. भीम. ६. पंचवीस हजार. ७. सीमा. ८. विजयश्रीनें. ९. प्रलयकाली नाचणारा (रुद्र). * अग्नी सारखा.

यापूर्वीं तों ऐसा झाला नाही कधीं महायास. ७५
प्रातःकाळीं च पुन्हां शत्रूंत जयी, गजांत हरिसा, हो:
वृष जेणें मारविला मित्रक्षयताप तो हि हरि साहो.' ७६
शल्य म्हणे, 'परतावें:' म्हणति द्रोणात्मजादि हि तसें च.
संकोचें मान्य करी मानुनि अपयान तें हि हितसें च. ७७
माघारा नृप फिरतां बळ परते अब्धिचें जसें अंबु,
कृष्णानीं वाजविले तेव्हां अरिधैर्यभंगिते कंबु. ७८
शिरला कर्णीं ज्यांच्या नरनारायणदरस्वर क्षण ही
त्यांसि पळतां सख्यांचें कैचें, पतनीं नव्हे स्वरक्षण ही? ७९
दूरुनि कपिकेतु दिसे, शंखरवश्रवण होय जोंवरि तों:
भट पळति, म्हणति, 'हा! जरि नक्षेत्रा वरितां, दशा कशा वरितां?'
खळबळपळ पळ पाहत चित्र तसा कार्मुकी शरीं राहे,
निश्चळ जिष्णु हरि हि. मग देखति बाणाचिता शरीरा हे. ८१

## अध्याय पन्नासावा.



आलिंगिलें स्वयें जें स्वाश्रुसुधाबिंदुसिक्त गौरीशें
त्या सुहृदंगांतुनि वृषशर काढी सानुकंप शौरी शें. १
जिष्णु हि शनैः शनैः शर शरणांगांतूनि साश्रु आकर्षी
'ब्रह्म अभेद्य' म्हणे त्या श्रुतिसि म्हणति 'तें नमोऽस्तु' नाकर्षी.
भेटोनि म्हणे ऐसें हृष्ट हृषीकेश त्या गुडाकेशा

१. अर्जुनाच्या नाशाचे दुःख. २. पलायन. ३. पाणी. ४. शंख. ५. तारा, नक्षत्र. ६. शत्रुसैन्याची पळापळ. ७. धनुष्यबाणधारी जिष्णु (अर्जुन). ८. हरि हि निश्चळ [राहे]. ९. बाणांनी भरलेल्या [आपल्या] शरीरा. १०. हळू-हळु. ११. त्राता जो श्रीकृष्ण त्याच्या अंगांतून. १२. तुला नमस्कार असो. (हे म्हणणें उपरोधिक आहे). १३. कृष्ण. १४. अर्जुन.

"तुझिया ढका न लागो साधुपिपीलिकचमूगुडा! केशा. ३
वृत्रवध कर्णवध हे अद्भुत: गातील यांसि कविराजे.
परि बा! त्वद्बाहुपुढें वज्रधराचा हि बाहु न विराजे. ४०
तो वृत्र वासवानें वज्रें वधिला, विचित्र तें काय?
त्याचा हीरगिरिसें ही भंगिल बाळें हि घालितां घाय. ५
त्वां कर्णकंठकृंतन केलें विशिखें विचित्र हें वाटे:
माझा तों आजि गळा त्वद्दोर्दंडासि वर्णितां दाटे! ६
काय सहावें तवशरमारुतवेगासि कर्णघनदानें?
शंभुप्रसादपात्रा! जिंकावा केंवि अर्णव नदानें? ७
हें, चाल, सांग गुरुला: तुज जरि संकोच, मीं निवेदीन:'
राजा निवेल वृषवधवृत्तें, निधिनें जसा निवे दीन. ८
आला होता राजा तुमच्या संगरमखा पहायासी:
परि माघारा गेला, क्षतबाधा न शकला सहायासी. ९
वृषवधकथनोपायन अर्पूं, वंदूनि अनृण सांगातें
होवूं, म्हणेल धर्म, 'श्रोत्रामृत फिरफिरोनि सांगा तें.'" १०
ऐसें वदोनि हरि अरि वाराया काळरुद्रभीमातें,
स्थापी सात्यकि धृष्टद्युम्नप्रमुखांसमेत, भीमातें. ११
कटक स्थापुनि मागें, घेउनि पार्थासि जाय शिबिरा हो!
मुनि म्हणति, 'शरण्य प्रभु याहुनि तो श्रेष्ठ काय शिबि? राहो.'
शिबिरीं कांचनशयनीं पडला होता क्षतार्त नरनाथ,
तच्चरणीं शिर ठेवी ससख शिवशिरीं यदीयपदपाथ. १३
नरनारायण करितां पाय धरुनि त्या नरोत्तमा प्रणती,

१. साधुरूपी मुंगळ्याच्या समुदायाला गुळासारख्या अशा. (सज्जनप्रिय अशा). २. हिऱ्याच्या पर्वतास. ३. छेदन. ४. तुझ्या प्रबल बाहूस. ५. कर्णरूप मेघानें. ६. कर्णवधाचें निवेदन हीच भेट. ७. उतराई. ८ बरोबर च. ९. प्रलयकाळच्या रुद्रासारख्या भयंकर (भीमातें). १०. त्राता. ११. ज्याच्या चरणाचें उदक (गंगा) शिवशिरीं तो—श्रीकृष्ण.

'आम्ही यादव पांडव कृष्ण तुला वंदितों' असें म्हणती. १४
नेत्रें उघडुनि त्यांच्या लक्षुनि हर्षासि, मारिलें अरितें,
ऐसें समजे राजा. तर्क खरा चित्त साधुचें करितें. १५
नृप हर्षे गहिवरला, उठला त्यजुनि स्वयें चि तल्पातें,
कृष्णांसि भेटलाः हो ! स्पर्शसुख जगीं अलभ्य अल्पा तें. १६
अंजलि करुनि म्हणे प्रभु, ' देवा ! सुखहेतु वृत्त परिसा हो !
स्वर्गीतविषय युष्मद्विक्रम निहतोग्रशत्रु हरिसा हो. १७
अतुळप्रताप दुःसह वृत्र जसा अदिति[6]सूनुच्या पविनें
वधिला, कर्ण तसा या तुझिया प्रियबंधुनें महाकविनें. १८
तुमची आज्ञादेवी निजहस्तगतार्जुनायुधें आजि
कर्णमहिष मारुनियां विजयातें पावली रणामाजि. १९
त्वां इंद्रें प्रेरितसितवाहाशनिनें वृषाद्रिचें पिष्ट
केलें, हें यश देवा ! गातील तुझें सदा महाशिष्ट. २०
तूं नरसिंह महात्मा, बीभत्सु तुझा नखप्रकर[11] देवा !
वृष कनककशिपु, महिमा प्रह्लाद, तुझी च ज्या रुचे सेवा. २१
तूं रुद्र, तुझें तिसरें लोचन हें बंधुरत्न, वृष कामः
तूं राम, कर्ण हा भव, अर्जुनभुजतेज हें तुझें नाम. २२
कृष्णेसि हांसला जो दुर्द्यूतीं[12] दाखवूनि सितदंत[13]
केला त्वत्क्षोभानें, जरि तो दुर्जय बलाब्धि हि, तदंत. २३
कर्णाच्या रक्ताचें करित्ये गोडी पहात पान रसा[14],
या कर्में हर होसी, दिससि जना तूं महातपा ! नरसा. २४
जगलां तिघे पृथेचे सुत, दोघे साधु ते हि माद्रीचे;

---

१. कृष्णार्जुन. २. शल्येस. ३. क्षुद्रजनास. ४. धर्मराजा ! ५. मारिला आहे भयंकर शत्रु ज्याने असा तुमचा पराक्रम इंद्राप्रमाणे स्वर्गी गाण्याचा विषय होवो ६. इंद्राच्या. ७. आपल्या हातीं असलेल्या अर्जुनरूप शस्त्रानें. ८. योजिलेल्या अर्जुनरूप वज्रानें. ९. कर्णरूप पर्वताचें. १०. अर्जुन. ११. नखाचा समुदाय. १२. कपटद्यूतांत. १३. पांढरे दांत. १४. पृथ्वी.

लंघावे दवदहनें कूट[1] कसे निजबळें हिमाद्रीचे? २५
वीरक्षयांत उरले स्वप्राण तुम्हां महाप्रभावांचे;
दुर्व्यसनराहुगिलिता पुण्यें सज्जनरविप्रभा वांचे. २६
चाल, पहा कर्ण, नयन निववीं, नरलोकनायका! पूर
अमृताचा हि नयनहित[2] न तसा, गतसार काय कापूर?' २७
धर्म म्हणे, " सुरभीच्या प्राप्त असे नित्य[3] भव्य नव्य सुता.
अमृतनदीमीनाला स्पर्शे संप्रार्थितां हि न व्यसुता[4]. २८
कल्पद्रुमनिजनीडीं[5] नेणे क्षुत्ताप[6] अलस[7] ही पक्षी;
तैसा त्वच्चरणाश्रित जन न वुडे, इच्छिलें पुढें लक्षी. २९
आम्हांसि तारिलें त्वां, देसी दीना जनासि थोरपण;
इतरांचे वहुविध पण, परि लघु ते; हा तुझा चि थोर पण[8]. ३०
स्वपदाश्रितजनकामप्रमुखाहितषट्कनाशका[9] देवा!
वृषवध काय कठिन तुज? हरिणाचा हरिपुढें किती केवा? ३१
प्याला सिंधुप्रति जो त्यासि श्रम काय कूपजळपानें?
शश किति सिंहीं, व्हावें हस्तींच्या भस्म ज्यांत कळपानें? ३२
कथिलें 'नरनारायण तुम्हीं' असें नारदें मला कानीं[10];
हरिलें सदुक्तिनीं, ढंकतम[11] वैद्यानें जसें शलाकानीं[12]. ३३
'त्वद्वेणुगीतिसि[13] जसी यदुक्तिला चित्तवृत्ति वेधावी,'
वदला असें चि तो हि ज्ञानीश व्यास साधु मेधावी[14]. ३४
अर्जुन तुझ्या प्रसादें तेजस्वी; त्वां चि तेज निज यातें

१. शिखरें. (हिमालय हा आपल्या नावाप्रमाणे बर्फाचा पर्वत असल्यामुळे वणवा विझून च जाईल) २. दृष्टीला समाधान देणारा ३. नित्य नवें वैभव. ४. मरण. ५. कल्पवृक्षावर बांधिलेल्या आपल्या घरट्यांत. ६. भुकेची बाधा. ७. आळशी. ८. 'दीना जनासि थोरपण' देण्याचा. ९. आपल्या चरणाचा आश्रय केलेल्या जनांच्या कामादि षड्रिपूंचा नाश करणाऱ्या. १०. एकांतांत. ११. डोळ्यांतील अधार–सारा–(पक्षी) दृष्टीवरील मोहपटल. १२. डोळ्यांत औषध घालण्याच्या सळइने. १३. तुझ्या मुरलीच्या गायनाला. १४. तत्त्ववेत्ता.

दिधलें, ज्वलनासि जसें रविनें पावावयासि विजयातें. ३५
दहनाचा वात सखा, सारथि तूं जिष्णुचा तसा आर्या !
वायुविणें अग्नि जसा, जिष्णु हि असमर्थ तुजविणें कार्या. ३६
बसलासि रथीं ज्याच्या चक्रधरा! धरुनियां प्रतोदास
परमेश्वरा! अरिवधें पावेल न कां जयासि तो दास?" ३७
ऐसें बोलत धर्म स्वरथीं बैसे, निघे पहायास,
तों गेला सुतशोकाकुळ दिनकर सागरीं नहायास. ३८
मग उजळिल्या सुगंधस्नेहें मणिदंड दीपिका शतशा,
भानुप्रभा जशा त्या करिती तम नाशुनि प्रकाश तशा. ३९
गेला सबळ सहरि नृप निजपरकंटका हता पहात रणीं.
वाटे भूवरि आला सुतवधसंजाततापहा तरणी! ४०
धर्मासि दाखवी प्रभु शरचितभूशायिकर्णदेहातें,
जेंसें तृषार्तपथिका सज्जन दावूनि अर्ण दे हातें. ४१
शरचितवृषवपु केसरनिकरवृतकदंबकुसुमसें गमलें
भरतकुळप्रवराचें तेथें क्षण नयनमधुपयुग रमलें! ४२
तेजस्विपणें सहजें कर्ण द्युमणिप्रभा गमे त्याला,
पाहे पुनःपुन्हां त्या तो राजा भूरिभाग मेल्याला. ४३
वाटे धर्माला तो तेजस्विप्रवरकर्णपात रणीं,
सुकृतक्षयें गळाला क्षितिवरि साक्षान्महातपा तरणी! ४४
चोळी पावोनि महासाधु अजातारि ताप हातानें,
'धन्य' म्हणे चित्तीं, जो देव गजा तारिता, पहातां तें. ४५
मृदुहृदय साधु राजा धर्म म्हणे, 'हंत! हा!' तदा त्यातें,

१. मयास्त झाला. २. पेटविल्या. ३. सुगंधी तेलांनीं. ४. रत्नखचित दांड्याच्या. ५. मशाली. ६. पुत्रवधामुळे झाला आहे शोक ज्यास असा. ७. बाणांना भरलेल्या व भूमीवर पडलेल्या. ८. पाणी. ९. परागाच्या समुदायानें वेष्टिलेल्या कदंबाच्या फुलासारखें. १०. धर्माचे. ११. नेत्ररूपी भ्रमरद्वय. १२. महाभाग्यवान्. १३. हाय! हाय!

'हे गति शिवली, पसरित होते ज्या संत हात'दात्यातें!' ४६
नृप हळहळे, म्हणे, 'रे कर्णा! केलें बळें चि हें काय?
त्यजिला महार्ह[1]शयनोचित धूळींत चि दुराग्रहें[2] काय. ४७
विद्याभाग्यबळमदें अनयें नयरतजनासि गांजावें,
देउनि शोक स्वजना, जोडूनि जगीं अकीर्ति, कां जावें? ४८
भीष्मद्रोणव्यासप्रमुखांचे सर्वजनहितीं लोल
बोल परम खोल, जयां मोल नसे, मानिले तुवां फोल. ४९
हा परमेश्वर हि तुम्हां गेला होता प्रियेष्ट सांगाया,
खळ हो! सजलां सारे दुष्ट कराया निबद्ध कां गा! या? ५०
हरि! हरि! विधवा केल्या स्वपरांच्या कोटिश[3] स्त्रिया लोकीं!
कर्णा! स्वयें बुडालां बुडउनि आम्हा जनासि हीं शोकीं! ५१
आकृति तुझी निरुपमा, सर्वां रुचिराकृतींत रुचिरा[4] हे,
प्राणरहिता हि शोभे: कोठें हि शवीं न लेश रुचि राहे. ५२
होतासि दानशूर, ब्रह्मण्य[5]: गुणज्ञ वर्णितील गुणा.
सांकं[6] म्हणोनि अमृतकर, दे ताप म्हणोनि मित्र[7] काय उणा?'
ऐसें वदोनि मग तो धर्म प्रभुला म्हणे, "अगा कवचा[8]!
'नश्यति न मे जनो'[9] या बोल न लागों दिला तुवां स्ववचा.
झालों आजि नृपति मीं, केलें त्वां स्वाश्रितामरद्रो[10]! हें.
पावेल विजय कोण श्वापद पंचास्यशावकद्रोहें[11]? ५५
दहनासि वायु जैसा, प्रियसख वृष त्या सहाय कितवा[12] हा[13].
राज्य हरणार होता या दिव्याख्रें[14] वधूनि सितवाहा. ५६
आजि निराश सुयोधन, गतमद हीं जेंवि नाग हतदंत[15].

१. फार मोल्यवान अशा पलंगावर निजण्यास योग्य असा २. उत्सुक. ३. कोटिशः, कोट्यवधि. ४. सुंदर. ५. ब्राह्मणाविषयीं दयाळु. ६ कलंकी. ७. सूर्य. ८. हे कवचरूपा श्रीकृष्णा' ९. माझा भक्त नाश पावत नाहीं. १०. स्वाश्रितकल्पवृक्षा! ११. सिंहाच्या बच्चांचा द्वेष करून. १२. त्या दुष्ट दुर्योधनाला. १३. हा प्रियमित्र कर्ण. १४. कर्णरूपी. १५. ज्याचे दांत पाडले आहेत असा.

जो उत्खातखररदननखरनिकर[1] हरि, अशक्य न तदंत. ५७
होता सुयोधनाचा या राज्यफळीं[2] सहाय हा यजनीं[2],
म्हणत असेल सगद्गद आठउनीं यास 'हाय! हाय!' जनीं.
कृष्णा! सुयोधनाची अतुळा लोकत्रयांत बालिशता;
हा बहु मान्य कविमतें दशकंठशता तथैव बालिशता. ५९
सुग्रीवा राम तसा, आम्हां व्यसनाब्धिसेतु तूं देवा!
परि, इच्छिली नसे चि प्रत्युपकृतिरूपिणी तुवां सेवा. ६०
त्वां जिष्णु धन्य केला, यश वाढविलें, दिली मला धरणी,
वदला होतासि, 'यश लाध[3] रणीं, अपयश न लाध रणीं.'
जो प्रभु सीमा अश्वत्थाम्याचा गुरु पिता महत्वांची
तो अनुभाविला, तो हि प्रौढ कृती कुरुपितामह त्वां[4] ची. ६२
'धरवीन चि शस्त्र' असा केला, झाला चि सिद्ध पण ज्याचा,
कोणासि साहता या प्रतिविंध्याच्या[5] प्रताप पणज्याचा? ६३
या कर्णभयें क्रमिले म्यां तेरा जागरें चि हायन[6] हो!
मजला झाला होता ताप असा शत्रुला हि हाय! न हो. ६४
होतो व्याकुळ तैसा मृग हि हरिगुहामुखीं न घोरतमीं[7].
आजि तुझिया प्रसादें बा! बहु दिवसां निजेन घोरत मीं. ६५
हें माझ्या हृदयींचें लीलेनें काढिलें महाशल्य.
वर्णूं काय प्रभुजी! मीं त्वत्करुणाकटाक्षकौशल्य.[8]" ६६
ऐसी करी प्रशंसा धर्म नृपति त्या महाप्रभावाची,

---

१. उपटला आहे तीक्ष्ण दात आणि नखें याचा समूह ज्याचा. २. राज्य हे च फल ज्याचे अशा [युद्ध-] यज्ञात. ३. मिळव. ४. अन्वयार्थ—जो अश्वत्थाम्याचा पिता, [आमचा] गुरु, प्रभु (समर्थ) [व] महत्वांची [केवळ] सीमा तो (द्रोणाचार्य) [आणि] तो हि प्रौढ, कृती [असा] कुरुपितामह (भीष्म) त्वां चि अनुभविला. (या उभयतांच्या प्रौढप्रतापाची साक्ष तुला च पटली, असा भाव). ५. धर्मद्रौपदीपुत्र. ६. वर्षें. ७. अत्यंत भयंकर अशा. ८. तुझ्या कृपादृष्टीची कुशलता.

तसि च जया सुर-दानव-मानव [1]मानवति त्या [2]स्वभावाची. ६७
धृष्टद्युम्न-वृकोदर-सात्यकि-माद्रेय म्हणति, '[3]हा नृप या
संश्रितजनकल्पतरोर्जयतितरां यदुशिरोमणेः कृपया.' ६८
पांडव मग शिबिराप्रति गेले, जैसे [4]स्वगह्वरांसि हरी.
कौरव तैसे झाले, [5]यूथप वधितां जसे भयार्त करी. ६९
संजय म्हणे, 'नृपाळा! झाले भट सर्व सत्य भाट तसे;
वृत्रवधमुदितसुर[6]नुतशतमखसम मज वृषारि वाटतसे.' ७०
गेली धृतराष्ट्राच्या संजयवदनेंकरूनि कर्णपथा
संताप द्यावयाला हे पार्थहतप्रवीरकर्णकथा. ७१
[7]जनमेजयश्रुतिप्रति वैशंपायनमुखें चि हे गेली.
मग सूतमुखें शौनकमुख्यमुनि[8]श्रोत्रमंदिरीं टेली. ७२
श्रीमत्सदाशिवात्मज [9]बाबूजी नायक प्रभु ज्ञानी,
'धन्य' म्हणावें ज्याला [10]शुद्धगुणश्रवणतृप्तसुज्ञानीं. ७३
दाता वक्ता योद्धा तेजस्वी मानधन असामान्य
अतुळ पितृप्रसादें मंडित [11]देवव्रतासा मान्य. ७४
या [12]साधुसंगमुदिरें [13]मुदितें [13]श्रीरामसुतमयूर [14]कृती,
[15]नरनारायणविजयग्रंथ करी व्हावया सुखी [16]सुकृती. ७५

इति श्रीमन्महाभारते कर्णपर्वणि श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिते पंचाशत्तमोऽध्यायः ॥

श्रीरामचंद्रचरणार्पितमस्तु । श्रीकृष्णार्पणमस्तु । श्रीलक्ष्मीनृसिंहोजयति ।

१. मान डोलावतात. २. अर्जुनाची. ३. या आश्रितांना कल्पवृक्षाप्रमाणे असणाऱ्या यदुश्रेष्ठाच्या कृपेने हा धर्मराज उत्कर्षेकरून वर्ततो. (हे संस्कृतप्राकृत वाक्य चित्य आहे). ४. आपल्या गुहास. ५. कळपाचा पुढारी. ६. स्तुत. ७. जनमेजयाच्या कानावर. ८. कर्णरूपी मंदिरात. ९. बावजी नाईक बारामतीकर; हे पंतांचे आश्रयदाते. १०. उज्वल गुणांच्या श्रवणानें संतुष्ट झालेल्या शहाण्यांनीं. ११. भीष्माचार्यासारखा. १२. सज्जन जो बाबूराय त्याच्या समागमरूप मेघानें. १३. आनंदित झालेला रामचंद्राचा पुत्र मोरोपंत हा च मयूर. १४. कुशल असा. १५. ज्यांत कृष्णार्जुनांचा विजय [वर्णिला] आहे असा [कर्णपर्वरूपी] ग्रंथ, १६. पुण्यवान्.

# शल्यपर्व.

## अध्याय पहिला.

गरुडध्वजचरणाश्रितचरितश्रवण त्रिताप संहरितें,
भगवत्प्रेम वसाया करितें हृदयासि पिटुनि अंह रितें. १
संजय पुरासि आला साश्रु कुरुक्षेत्रभूमि सोडून,
'दुर्योधन मेला' हे सांगे अंधासि हात जोडून. २
'तिकडिल सात्यकि केशव पांडव इतुके चि राहिले सातः
कृप कृतवर्मा गुरुसुत इकडिलः झाला असा महाघात.' ३
घेतां चि परम दुःसह विषरससा उग्र शब्द तो कानें,
मूर्छित पडला मृतसा राजा धृतराष्ट्र पुत्रशोकानें. ४
पुत्रव्यसनें व्याकुळमति. विदुर हि 'हाय!' म्हणुनि बहु रडला,
पडला मूर्छित, वाटे, वातें तो पात पादपा घडला. ५
गांधारीतें मूर्छा ग्रासीः न धवा न देवरा खाया
चुकली, तीपासुनि तिस पावावा कोण देव राखाया? ६
नवसुनि गौरीस म्हणत होत्या 'अहितांसि परिसुंना सासु,'
धर्मक्षोभें मग्ना शोकीं झाल्या चि परि सुना सासु. ७
दैवें यत्नें उठला नृपः विदुर, स्त्रीसमूह, तो हि रडे,

१. गरुड आहे ध्वजावर ज्याच्या अशा विष्णुच्या चरणाचा आश्रय करणाऱ्या लोकाचें चरित्रश्रवण. २. आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक असे तीन प्रकारचे ताप. ३. पिटाळून. ४. पाप. ५. हस्तिनापुरास. ६. अश्रु ढाळीत, रडत. ७. पुत्रशोकानें. ८. वृक्षास. ९. पतीस (धृतराष्ट्रास). १०. दिरास (विदुरास). ११. त्या मूर्छेपासून. १२. गांधारीस. १३. शत्रूस. १४. ऐकूं नये. १५. जीवंत. १६. तो विदुर हि.

ते स्त्रीविलाप दुःसह भूपा, अतिसारिया जसे हिरडे. ८
सांगुनि विदुरासि नृपें स्त्रीजन तेथूनि सर्व काढविला,
मग तेथें बहु तेणें, म्यां न ग्रंथीं, विलाप वाढविला. ९
राजा विदुरासि म्हणे, ‘ हतभाग्यें म्यां हि घात हा केला:
बा ! हाणिली सुरभिला जेंवि, तुज्या तेंवि लात हाकेलीं. १०
न शिके त्याच्या बोल न बाला; मंदार सावरिल काय
पतनेच्छुचा न, न वरिल बाला मंदा; रसा वरिल काय ? ११
शत सुत सोडुनि गेले मज विदुरा ! तूं चि गति, दुजी नाहीं;
म्यां बुडविलें, मिळविलें बहु सुख यश बाल्हिकादि जनींहीं.’
ऐसें वदतां पाडी बहु खवळुनि मोह पुनरपि तयातें:
केवळ धीर उपेक्षी बहुविकळा, जेंवि कुनर पितयातें. १३
किति म्हणती,‘आप्तजन,’ किति म्हणती,‘फळसमूह सांचविला
तो भोगुनि साराया, तत्प्रारब्ध चि वृद्ध वांचविला.’ १४
सावध दीन हि होउनि अंध म्हणे, “ संजया ! कसें साहूं ?
राहूं परवश होउनि कैसा ? कोणासि, सांग, मीं वाहूं ? १५
पांच न मेले, मेले त्यांहुनि बहु सकरवाळ वीसपट,
या चिंतेस मदात्मा सांपडला सकर वाळवीस पट. १६
जे अल्प अल्पबळ रिपु, जाले जयपात्र ते च उरफाटे,
शतसुतशोकें न तसें, पांडवकुशळें चि फार उर फाटे. १७

१. जो अतिसारी त्यास हिरडे अधिक अतिसार होय असे करितात: तसे च स्त्रियाचे विलाप शोकमग्नयां ऐकत्याचा शोक अधिक चि वाढवितात–**पंत.** २. कवीनें. ३. उपदेशास–असा तात्पर्यार्थ. ४. बापाला. ५. कल्पवृक्ष. ६. पडण्याची इच्छा करणाऱ्याचा. ७. सोळा वर्षांची (अप्रौढ) स्त्री. ८. मूर्खास. ९. [ प्रौढ ] पृथ्वी. १०. वृद्धांनीं. ११. [ त्या ] बहुविकळा धीर केवळ उपेक्षी (अगदी सोडी). १२. कर्मफलसमूह. १३. खड्गधारी. १४. ‘कर’ सहित असा पट=पटकर. ‘पटकर’ हा शब्द तुच्छतेनें कांबळ्याला लावतात. इतर वस्त्रांपेक्षा कांबळ्याला वाळवी लागण्याचा संभव अधिक असतो. * मिळविलेलें.

दैव महाबळ, जेणें केली वंध्या चि नीति कणिकाची,
सुतघातकभीमनुति[1] न सोसेल मला, शिवी हि अणिकाची. १८
अंधपण वरें, अरिच्या[5] केव्हां तरि पाहतों चि तोंडास
घेता चि काळिजाचा हतशतसुतशोकसर्प तों डास[2], १९
मज अजिनें[3] जीर्णवल्कल बहुमत, या शत्रुचें नव न वास[4]:
वनवास बहु बरा, या दुष्टांचा पळ नको भवनवास. २०
'आहों समर्थ समरीं एकाएकास वीस घेराया,
कर्णाद्यखिळ वधाया प्रबळ म्हणुनि वीसवीस[6] घेराया. २१
कोठें सात तशा त्या, कोठें अक्षौहिणी अशा अकरा!
न करा चिंता; दुर्जय मीं शत्रुजना जसा स-कर अ-करा. २२
तन्मातुळ[7], तत्पितृसख[8] भगदत्त, द्रोण, भीष्म, कृप, कर्ण,
बहुत मजकडे, वेदा बुधसे, मज देति[9] सर्व नृप कर्ण.' २३
असकृत् प्रयाणसमयीं[10] मत्सुत ऐसी करूनि संधा[11], तें
सर्व विसरला, गेला सोडुनि कैसा वनांत अंधातें? २४
हा पुत्रा! ऐश्वर्यें शोभत होतास तूं हरिसमान[12],
मानिशिरोमणि नाकीं कैसा लवविशिल त्या हरिस मान? २५
हुरहुर बहु खोटी, रे उर[13]! उरें[14] न क्षण हि, काळजा! तडक[15].
असु हो! निघा चि, न चुको पुत्रप्रस्थानकाळ[16], जा तडक. २६
हतभाग्यास मज मरण कैंचें? धात्या! अगा दयाळो! हें
ऐसें करणें होतें तरि घडिलें उर कशास बा! लोहें. २७
बा संजया! सविस्तर सांग, असा कठिनहृदय हा आहे,

१. नुति=स्तुति. २. चावा. ३. मृगचर्म. ४. वस्त्र. ५. अर्जुनास. ६. सर्व अर्जुनवधीं योजितों हा अर्थ–**पंत.** ७. त्याचा ( अर्जुनाचा ) मामा ( शल्य ). ८. अर्जुनपिता इंद्र त्याचा मित्र. (द्रोण० अ० २।७८ पहा). ९. आदराने ऐकती, मान देती. १०. युद्धास निघतेवेळी. ११. प्रतिज्ञा. १२. इंद्रासारखा. १३. हे उरा! १४. राहूं नकोस. १५. फूट. १६. दुर्योधनाबरोबर [ परलोकीं ] जाण्याची वेळ.

ऐकेल सहस्त्रमरण, लागे शोकाग्निची न या आहे." २८
सूत म्हणेः–कर्णवधीं झाला हेतदंष्ट्र सर्पसा कुरुप,
हतशेष बळ पळालें, नाहीं कोणांत राहिली हुरुप. २९
परभीति बळोत्साहा, बा! वात्या जेंवि हरि सकळ पाला,
वाटे यूथपनिधनीं पळ सुटला भिउनि हरिस कळपाला. ३०
तेव्हां सकृप कृप म्हणे, 'राया! झालें असें तुझें बळ हें,
केले प्रबळ हि भीष्मद्रोणादि सुवीर भस्म या कळहें. ३१
साधुच्छळफळ कळलें, सावध आझुनि तरी नरवरा! हो.
धर्मासीं सख्य करीं, अपकीर्तीचा जगीं न रव राहो. ३२
सुज्ञास आत्मरक्षण गुरुवचनग्रहण होय अविरुद्ध,
अरिकटकरुद्ध होइल अर्जुन तरि, जरि मृगेंद्र अविरुद्ध. ३३
धृतराष्ट्रवचन कृष्णा धर्मा, भीमा हि, मान्य, धर्माचें,
संसारीं सुवचाचें ग्रहण, जसें संगरांत वर्माचें. ३४
वसविल कृष्ण तुज तुज्या राज्यपदीं जेंवि उग्रसेनातें,
जें धर्मनीति करिन्ये राजाहित, करी न उग्र सेना तें.' ३५
भूप म्हणे, " आचार्या! साधु तुम्हीं गुरु सुरांचिया तरुचे,
हित हि तव वचन मजला, औषद जैसें मुमूर्षुला न रुचे. ३६
म्हणसी परि, तो राजा माजा कैसा धरील विश्वास?
राज्य प्रांज्य द्यूतें हरिलें, हें वृत्त विदित विश्वास. ३७
जो अग्रभाक् सदा नवनवनुतिबहुमानसुखविलासाचा,
झाला दूत स्नेहें, परि आम्हीं कृष्ण दुखविला साचा. ३८
केली सभेंत तैसी कृष्णेची दुर्दशा असीमा जी,

१. ज्वाला. २. पाडल्या आहेत दाढा ज्याच्या असा. ३. दुर्योधन. ४. वावटळ. ५ शब्द. (डाग). ६. नीतीस व धर्मास विरुद्ध नसलेले. ७. मेंढ्यांनीं कोंडलेला ८. भीमा हि धर्माचें वचन मान्य. ९. चिलखताचें. १०. हा कंसाचा बाप. कृष्णानें कंसवध करून् ह्याला पुन्हां गादीवर बसविले, अशी कथा आहे. ११. कृपाचार्या! १२. मृत्यूची इच्छा करणारास. १३. धर्म. १४. अवाढव्य. १५. शिखरास पोंचलेला.

ती 'हा!' ज्या[3] म्हणवी, तो ऐकेल प्रार्थना कसी माजी? ३९
हर्ष अमृतलाभाचा न तसा शक्रास न पविलाभाचा,
ऐसा ज्यास्तव[2] कृष्णा, तो त्याचा प्राण खपविला भाचा. ४०
नव चि सुभद्रेच्या हीं दिधला निःसीम भर विलापाला,
हा अपकार क्रोधा, जेंवि दवाग्नीस भरविला पाला. ४१
अस्मत्क्षयार्थ कृष्णा स्थंडिलशयनादि[3] करितसे तप ती,
जपती सदा सुभद्रा तद्दास्या, आठवे जिला न पती. ४२
भीम निवेल गदेनें चूर्ण न करितां अरातिवक्ष[4] कसा?
जो अत्युग्रप्रकृति द्विट्कुललयदक्ष[5] लक्षतक्षकसा. ४३
न शमातल, पाठ करितिल ते सुत धर्माकडे हि माद्रीचे,
त्यजितिल काय स्वगुण[6] प्रेक्षुनि घर्मा[7] कडे हिमाद्रीचे? ४४
छळिल्या[8] कृष्णेनें परदारांच्या काय हो! विलापार्थ
शतदा नसेल मरणोद्योगीं भाकेसि गोविला पार्थ? ४५
या वैरा शमवाया आतां न शकेल भारतीशमती[9],
दिसतें असें विचारें कीं, हे उरली हि भारती[10] शमती. ४६
हा सार्वभौम होवुनि कैसा भोगील अल्पविषयातें[11]?
स्वजनधनमानहानिस्तव होइल अन्न तल्प[12] विष यातें. ४७
होइल कसा पराचा, खपउनि गुरु बंधु सुत सखे, दास?
या, हा अपकर्ष[13] करिल शोकज्वलनांत हुत, सखेदास. ४८
तपलों[14] बहु प्रतापें सर्वांत, जसा रवि ग्रहांमाजी,
परतेजें काय दडूं? मानी मति सार[15] विग्रहा[16] माजी. ४९
घन चातकासि वनसा[17], धन होता देत याचकाला जो,

१. धर्माला. २. ज्या अभिमन्युस्तव. ३. भुईवर निजणें इत्यादि. ४. शत्रूचें वक्षस्थळ. ५. शत्रुकुलाचा नाश करण्यांत तत्पर असा. ६. थडपणा. ७. उष्म्याला. ८. छळिलेल्या. ९. गुरु–**पंत.** बृहस्पतीची बुद्धि. १०. सेना–**पंत.** ११. लहानं देशास. १२. शय्या. १३. हीनावस्था. १४. देदीप्यमान झालों. १५. श्रेष्ठ. १६. युद्धास. १७. पाण्याप्रमाणें.

तो हा कर [1]अत्यल्पद्रविणवितरणें न याचका लाजो ? ५०
भोग त्याग[2] हि घडले, होतों देवूनि अरिशिरीं पाय,
ऋण [3]सर्व फेडिलें, हा वेचावा या [4]रणाध्वरीं काय. ५१
[5]ध्रुव सुख नसे चि; कैंचा जय? कैंचें राज्य? कीर्ति जोडावी;
ती तों युद्धें चि मिळे, म्हणुनि तनु रणीं, गृहीं न, सोडावी.
तो बहु निंद्य क्षत्रिय, देवुनि जो पाठ [6]जडतम रणातें,
पावे, सदा [7]गदार्दित होउनि रडवीत, रडत, मरणातें. ५३
लागे अंतीं हगवण, मग वणवासा ज्वर प्रबळ पेटे,
नेटे बहु कफ, मोहीं होय [8]गरक, नरकयातना भेटे. ५४
कटु [9]गृहमृति त्या, समजे सुगति समर वरिलियास्तव नरा ज्या;
अंतीं सुशस्त्रनिधनें होईल प्राप्त या स्तवन राज्या. ५५
वांचेन भोगलोभें तरि जन निंदील मज, न वंदील.
वंदी[10] लज्जित होतिल, साजेल न [11]कटक, पदक, मंदील. ५६
बहु गेले शोभउनि, स्वर्गाचा मार्ग [12]गगनतळ मळला;
प्रियजनसमागम जया घडला तो पांथ मग न तळमळला. ५७
समर करूनि मरावें, जावें स्वर्गासि हें चि परम हित,
आम्हीं सुरांत होवूं, मागें होवुत नरांत [13]परं, [14]महित." ५८
दुर्योधनवचन असें परिसुनि हतशेष वीर मानवले,
बहु '[15]साधु! साधु!' वदले, ते काळाच्या पुढील कानवले. ५९
तेथुनि [16]हिमवत्प्रस्थीं, मग गेले दोन योजनें दूर
[17]अरुणासरस्वतीचें जळ सेवुनि रात्रि कंठिती शूर. ६०

१. फार थोडें धन देण्यानें. २. दान. ३. देव, ऋषि व पितर यांचें. ४. रणयज्ञांत. ५. शाश्वत. ६. अतिमंद. ७. रोगानें पीडिलेला. ८. मूर्छित. ९. घरांत पडून मरणें. १०. स्तुतिपाठक. ११. कडें. १२. गगनतळ शोभवुनि स्वर्गमार्ग मळला; चालता झाला; कां कीं, बहु भीष्म, द्रोण, भगदत्त, जयद्रथ, कर्ण असे महातेजस्वी बहु गेले–**पंत.** १३. पांडव–**पंत.** १४. पूज्य. १५. योग्य! योग्य! १६. हिमालयाच्या शिखरावर. १७. ह्या नांवाच्या नदीचें.

ते भट म्हणति, 'नृपा! पट्टुपतिविण[1] पर[2] धरिल या न सेनेला,
कोणें समरीं सनयें[3] सोत्साहें अरि लया नसे नेला? ६१
गुणनिधि अयोनिजोद्भवभवसम[4] समरप्रवीण गुरुतनय,
कविवृंदमानसींचा हंस, जयाचें सुसेव्य सुरुतनय.'[5] ६२
त्यातें कुरुराज म्हणे, "गुरुपुत्रा! तूं चि आमुची सुगती,[6]
न तुजपुढें चि परांचे गर्वभरें गाल बा! लव हि फुगती. ६३
तुज करुनि पुढें आम्हीं म्हणतों बा! 'सर्व हीं पर वधूं' तें
सफळ करीं; सेनापति योजीं[7] रडवावया परवधूंतें." ६४
द्रौणि म्हणे, 'कुरुनाथा! सेनापति योग्य शल्य गुहसा हो,
सुहसा[8] हो सेना, या न दंवा[9] परकंटकवारिरुह[10] साहो.' ६५
कार्यार्थी समयज्ञ क्षितिपति तत्काळ मानें[11] रथ सोडी,
जोडी हस्त रथस्था शल्याः दासीं हि रीति ती थोडी. ६६
'जें मिळविलें गुहें यश, साधावें त्वां हि सुरस मामा! तें,
हो सेनापति, द्याया हा वर तूं योग्य सुरसमा! मातें.' ६७
या नृपविनयें बोले होवुनि बहु सुप्रसन्न मद्रमणी,[12]
'सीता राघवरमणी, आजि जयश्री तसी च मद्रमणी.' ६८
अभिषेक करुनि केला सेनापति कार्तिकेयसा शल्य;
वाटे काढिल कुरुपतिहृदयांतिल वीरतिलक हा शल्य. ६९
तेव्हांचा वाद्यध्वनि ऐकुनियां धर्म केशवास वदे,
'शरणागतांसि देसी बा! तूं तैसें न लेश वासव दे. ७०
बहुधा केला सेनापति मद्रेश्वर सुयोधनें आजि

१. सेनापतिहून अन्य–**पंत.** २. आवरील. ३. सेनापति असावा हा नय–राजनीति–यास मान देणारा [तो] सनय–**पंत.** ४. ब्रह्मदेव व शंकर यासारखा. ५. नयरूप ज्याचें बोलणें–**पंत.** ६. चांगले आश्रयस्थान. ७. सेनापतीची योजना कर. ८. योग्यपतिलाभानंदें सुहास्या होव–**पंत.** ९. दाहिवरास. १०. शत्रुसैन्यरूप कमल. ११. आपण राजा हा मान एकीकडे ठेवून रथावरून खालीं उतरला. १२. मद्रपति शल्य.

आजिप्रवीण[1] बहु तो, भ्याली त्याला मति प्रभो! माजी.' ७१
कृष्ण म्हणे, "मज ठावा तो भीष्मद्रोणकर्णसम राया!
स्पष्ट म्हणेल सुरांस हि, 'सोडूनि असूंसि अर्ण[2] समरा या.' ७२
पार्षत सात्यकि अर्जुन भीम, बळी शल्य यांपरिस भारी;
भारी[3] परांहिशत[4] हा मंत्री; नरसिंहसा अरिसभारी[5]. ७३
कुपित हि शतमख[6] चापीं न चढविल हरावयासि मंद्रा[7] ज्या[8],
त्वन्मातुळ मज पितृसम, बहुधा अभयद म्हणोनि मंद्राज्या[9].
तुझिया वीरांसि रणीं न भिडों देईल हा निकट कांहीं;
संकट ओडवलें! कसि चुकवावी प्राणहानि कटकांहीं? ७५
कल्युपुढें घनमाळा तसि होइल यापुढें संपदि[10] सेना,
मज भवदितरीं[11] वीरीं या भस्म करी असें तप दिसेना. ७६
आप्त म्हणावा देतां[12] घेउनि जरि चाप हांक[12] सादास[12];
कैंचा मातुळ? वैरी झाला अरिचा पहा कसा दास. ७७
झाला असेल लज्जित बा भारतनायका! यम हि माम्या,
त्या कंसा; तो त्याचा वर्णावा काय काय महिमा म्यां? ७८
केवळ खळाश्रयत्वें, निष्करुणत्वें, तया[13] चि सम हा हीं;
संबंधी ही घातक, समणि[14] हि रक्षार्ह जेंवि न महाहीं. ७९
शल्य नव्हे पहिला, त्वां मानावा नव्यसा[15] चि समयज्ञा!
गुरु न[16] म्हणोनि करीं तूं अहिताच्या सव्यसाचिसम यज्ञा[17]. ८०
याच्या क्षयें सकळपरकटकक्षय, म्हणुनि वधुनि मद्रप हा,
जें पाहिलें महेंद्रें वृत्रवधें तें चि तूं हि भद्र पहा." ८१

१. युद्धप्रवीण. २. जळ–**पंत.** ३. मारून टाकतों. ४. शत्रुरूप सर्पांचे शत. ५. शत्रुसमाजकाळ–**पंत.** ६. इंद्र. ७. शल्यदेशा–**पंत.** ८. गुण–**पंत.** धनुष्याची दोरी. ९. माझ्या ( कृष्णाच्या ) राज्यास. १०. तत्काळ. ११. तुझ्याहून दुसऱ्या. १२. हाकेस हाक देता=तुझ्या विनंतीप्रमाणें तुझ्या पक्षास मिळता. १३. कंसासारखा. १४. डोक्यावर मूल्यवान मणि असलेला असा हि. १५. अपरिचितासारखा. १६. न माननां. १७. जसा भीष्म पाडिला–**पंत.**

ऐसें प्रार्थुनि घेउनि आज्ञा प्रभु जाय मग निजायास,
भक्ताचा नग मानी, तिळ तो श्रितकल्पनग निजायास. ८२
धर्म हि निरोप देउनि भीमप्रमुखस्वबंधुवर्गातें,
राधेयवधें होउनि निश्चित निजे नमूनि भर्गातें. ८३

---

# अध्याय दुसरा.

प्रातःकाळीं झाला दुर्योधन सिद्ध, परिस राया! तें,
गमलीं कटकें जैसीं सगराचीं सिद्धपरिसरायातें. १
क्षोभे धर्म कुरुबळीं, भस्म करायासि जेंवि कपिल हरी,
न गणि तव चमू, जैसा जलधीच्या वातजात, कपि, लहरी.
आशा वेडी राया! जरि भीष्म द्रोण कर्ण ही खपला,
तरि हि शल्याला कुरुपति जय साधिल म्हणुनि बहु रणीं जपला.
आम्हांकडील होते रथ रुद्रसहस्र, दोन लक्ष हरी,
पादात तीन कोटी, सप्तशताधिक दहा सहस्र करी. ४
रथ सा सहस्र, गज हीं, पत्ति शतसहस्र, अयुतमित वाजी,

---

१. तो श्रितकल्पनग ( भक्तकामकल्पतरु श्रीकृष्ण ) भक्ताचा [ आयास ] नग ( पवन ) मानी [ व ] निजायास तिळ मानी. २. शंकराने. ३. कपिल-पंत. कपिलमुनींच्या समीपभागीं आलेलीं. ( सगरराजाने आपला शंभरावा यज्ञ चालू असतां दिग्विजयार्थ घोडा सोडला. त्यामागे साठ हजार सगरपुत्रांचें सैन्य होतें. इंद्रानें हा घोडा चोरून, जेथें भुयारांत कपिलमुनि तपश्चर्या करित होते तेथे नेऊन बांधला; सगरपुत्रांनीं संशयावरून भुयारापर्यंत खणले तेंव्हां त्यांना तेथें घोडा दिसला. मुनीनें च घोडा चोरला अशा समजुतीनें सर्वजण तेथें दंगा करूं लागले असतां ऋषीनीं डोळे उघडून पाहतां च सर्व भस्म झाले, अशी कथा आहे ). ४. कपिल हा च विष्णु. ५. वायूपासून झालेल्या लाटा. ६. मारुति. ७. अकरा हजार. ८. पायदळ. ९. दहा हजार.

इतुकी च धर्मसेना दुर्लंघ्या सिंधुसी च कितवा[1] जी. ५
शल्यें युद्धारंभीं जो रचिला व्यूह सर्वतोभद्र[2]
आम्हां ऐसा गमला कीं, आजि करील सर्व तो भद्र[*]. ६
शल्य पुढें, मध्यें नृप, मागें गुरुपुत्र, शकुनि कृप दक्षीं[3]
त्या व्यूहाच्या वामीं[4] कृतवर्मा वीर राहिला पक्षीं[4]. ७
धर्म उठे शल्यावरि, हार्दिक्यावरि[5] सिताश्व बा राया!
भीम कृपावरि, माद्रीपुत्र शकुनिवरि रणांत माराया. ८
जैसा सुरासुरांचा समर तुज तसा चि तो गमो त्यांचा:
रक्तनदी जलधीसीं वाटे करणार योग मोत्यांचा[6]. ९
त्यां समरीं भीमार्जुन ते इंद्रोपेंद्रसे नृपा गमले;
श्रमले, शमले, वमले रुधिर, असुरसे चि कुरुभट भ्रमले. १०
शल्य रथातें कोपें धर्मावरि भंगतां चमू ढकली;
होय अनरि[7]-मद्रप-रण जयभंगद[8] जेंवि सुज्ञमूढकली[9]. ११
वधिला कर्णाचा सुत नामें जो चित्रसेन तो नकुळें,
मग सत्यसेन[10], राया! त्याउपरि सुषेण[10], अहि जसा नकुळें. १२
धृष्टद्युम्न, शिखंडी, यम[11], सात्यकि, भीम रक्षिती धर्मा;
तैसे चि तुझे योद्धे यत्नें मद्रेश्वरा[12] निजा वर्मा[12]. १३
संसप्तक मथुनि जय हि साहित्य करी जपोनि धर्माचें;
कार्यशत[13]व्यापृत हा सुमति जसा साधुपुण्यकर्मांचें[14]. १४
शल्य विशिखपटळानें क्षितिवरि धर्मासि, रविसि वारि, लपवी,

१. दुर्योधनास–**पंत.** २. चोहोंबाजूंनी दरवाजे असलेल्या घराच्या आवारास 'सर्वतोभद्र' असें म्हणतात; त्याप्रमाणें केलेली सैन्यरचना. ३. उजव्या (बाजूस). ४. डाव्या बाजूस. ५. कृतवर्म्यावर. ६. वीराच्या अंगावरील किंवा भग्नगजरथस्थळांतील? ७. अजातरिपु–**पंत.** ८. जयापजय देणारें. ९. शहाणा व मूर्ख यांचें भांडण. १०. हे हि कर्णपुत्र च. ११. नकुळसहदेव. १२. आपलें चिलखत च अशा शल्याला. १३. शेंकडो कार्यांत गुंतलेला. १४. साधूचें जें पुण्यकर्म–**पंत.** * कल्याण.

खपवी बहु बळ, वाटे तदिषुपुढें निपट हार[1] वरिल पवि. १५
तेव्हां झाले बहुशत दारुण उत्पात भूमिकंपादि;
अमरकटक मथुनि नमुचि[2] जेंवि यश तसें चि शल्य संपादी.
निजहय वधितां भोजें[3], मारुति घेउनि गदा तळीं उतरे,
त्याला पाहुनि भ्याले, परभट पंचानना[4] जसे कुतरे. १७
तों भीमसमक्ष चि सहदेवाचे अश्व मर्दिले शल्यें,
सहदेवें तत्सुतशिर हरिलें असिनें पळांत कौशल्यें. १८
कृपधृष्टद्युम्नांसीं होय महायुद्ध बा! तुझा अनयें,
दश दश बाणांहीं सुत कृष्णेचे ताडिले कृपीतनयें[5]. १९
मोहाया परसेना ज्या[6], जसि रंभा शुकासि, न शहाणी[7],
तो शल्य धर्मराया शर मर्मी, व्हावयासि यश, हाणी. २०
कोपे भीम, गदेनें त्या मामाचे वधी सकळ वाजी,
वदला असेल, 'धर्मघ्न न वांचे हें स्वधीस[8] कळवा जी!' २१
भेदी कवच, करी क्षत वक्षीं[9] हाणोनि भीमें[10] तोमर तो;
मेला न विषें दहनें जो, तेणें काय भीम तो मरतो? २२
त्या तोमरें चि भेदुनि उर, पाडी भीम शल्यसूतातें,
न तदुग्रत्व[11] यमा ये, त्याच्या येईल काय दूता तें? २३
शल्य गदा घे, पाहे, क्रोधें सोडुनि धनुष्य, शर, भाच्या.
आवेशा मानवले बहु[12] त्या नरहरि[13]मनुष्यशरभाच्या. २४
भिडले, भिड लेश मनीं न धरुनि, ते शल्य-वायुज गदीश,
पडले मूर्छित; त्यांचे हित वदले, 'देउ आयु जगदीश.' २५
शल्यातें पळवी कृप, कृपण धनातें तसें चि रक्षी बा!

१. माघार. २. दैत्यविशेष. ३. कृतवर्म्याने. ४. सिंहास. ५. अश्वत्थाम्याने. ६. शल्यास. ७. समर्थ. ८. आपल्या बुद्धीस. ९. वक्षस्थलावर. १०. भयंकर. ११. भीमाचा उग्रपणा. १२. नरसुरगंधर्वादि-पंत. १३. मनुष्यरूपी (भीमरूपी) सिंहाने युक्त अशा मनुष्यरूपी (शल्यरूपी) शरभाच्या.

शीघ्र उठे[1] परि दृग्युग[2] नुघडे भीमा जसें चिर[3] क्षीबा[4]. २६
प्रासें[5] हृदय विदारुनि मारी कुरुराज चेकितानातें[6],
तद्गर्जना[7] परां भय देती, जें काय केकिताना[8], तें. २७
कृप शकुनि भोज जपती शल्या, पाखंड जन जसे बुद्धा,
धर्मातें जिंकाया करिती क्रोधें पुनःपुन्हां युद्धा. २८
अश्वत्थामा, त्यजुनि प्रियसखता[9] विप्रता, परविरोधी[10]
होयः रणीं विजया तो[11] बहुबळ दावि प्रतापरवि रोधी. २९
धृष्टद्युम्ना राजा[11] रोधी, विंध्याख्यनग जसा मिहिरा[12].
धर्म प्रवाह गमला, कुरुवीरांचा समूह तो विहिरा[13]. ३०
शल्यें धर्मकटक बहु, धर्में ही शल्यकटक आटविलें,
अवलोकनकरित्यांला देवासुरयुद्धसें चि वाटविलें. ३१
अपमानें शल्य कढे, छेदी जेव्हां नृप ध्वजाग्रास;
प्रभुचा तिसरा डोळा जेंवि कराया झषध्वजा[14] ग्रास. ३२
मारुति, सात्यकि, माद्रीनंदन करिती पुन्हां हि शरवृष्टी,
ती निरसूनि निववली देवांची मद्रवासवें[15] दृष्टी. ३३
छेदी सहदेवाच्या, अहिस गरुडसा चि, शल्य चापातें;
तत्सूतातें मारी सहदेवः विचित्र युद्ध बापा! तें. ३४
पुनरपि सहदेव पवनसुत सात्यकि धर्म वर्षती बाण.
बा! निःशंक[16] सतीचें घेवूनि सती च हर्षती वाण. ३५

---

१. [भीम] उठे. २. दोन्ही नेत्र. ३. पुष्कळवेळपर्यंत. ४. उठता हि मद्यमत्ताचे चिरकाळ नयन उघडत नाहीं—**पंत.** ५. भाल्यानें. ६. या पांडवपक्षीय यादववीरास. ७. दुर्योधनाची गर्जना. ८. मयूरशब्द—**पंत.** ९. प्रियमित्रत्व. १०. मोटा विरोधी—**पंत.** ११. दुर्योधन. १२. सूर्यास. (कथासंदर्भ भीष्म० अ०१।६२ पहा). १३. झरा. १४. मीनकेतु मदनास. १५. मद्रदेशाधिपति शल्यानें. १६. सहगमन करितांना स्त्रिया जें वाण देतात तें घेण्याचा अधिकार स्वतःवर तसा प्रसंग ओढवला असतां सहगमन करण्याची तयारी असलेल्या स्त्रियांना च असतो.

रक्तें न्हाला झाला फुलल्या पळसासमान तो[१] लाल,
बोलाल 'धन्य धन्य चि शल्य,' यशें[२] जिष्णुसीं[३] च तोलाल. ३६
शर पांच[४] पांच हाणुनि मर्मीं सर्वांचिया हि कोपानें,
खंडी युधिष्ठिराच्या पुनरपि चापासि शल्य रोपानें. ३७
चाप पुन्हां सज्य करुनि झांकी शल्यासि धर्म सुशरानीं,
त्यांतें तो भस्म करी, जैसा दावाग्नि शुष्ककुश[५] रानीं. ३८
सत्वर दश बाणाहीं भेदुनि कवचासमेत मर्मातें,
धर्मातें बहु पीडुनि दे बहु दुर्योधनासि शर्मातें. ३९
सहदेवधर्मधनुसें[६] मद्रप सात्यकिधनुष्य ही तोडी,
त्यांवरि सात्वत तोमर, भीम हि नाराच सर्पसा सोडी. ४०
नकुळ हि शक्ति क्रोधें, सहदेव गदा तदा बळें हाणी,
धर्म शतघ्नी[७] टाकी, ती नुरवी त्वत्सुताननीं पाणी. ४१
त्या तोमरादि पांचां शस्त्रांतें शल्य खंडुनि क्षोभे,
तो, भेदुनि गजगंडस्थळ गर्जे हरि जसा, तसा शोभे. ४२
एकैकाला हाणी खरतर शर शल्य धरुनि रोष दहा,
जाला सुयोधनाला, शक्राला स्कंदसा[८] चि, तोषद हा. ४३
मध्याह्नीं भानुकडे तसें शल्याकडे पहावेना,
रवितेज जेंवि घूकां तसें तत्तेज तें सहावेना. ४४
धर्म म्हणे, 'कृष्णाचा होइल आतां खरा कसा बोल?
हा मामा मारुतसा[९], माजें बळ सर्व यापुढें फोल.' ४५
सर्व हि मिळोनि झटले भट, लेख[१०] जसे वधावया जंभा[११],
परि तच्छक्ति न शकली मोहाया त्या, शुका जसी रंभा. ४६

---

१. शल्य. २. एकाल बरे युद्ध तरि–**पंत.** ३. इद्राशी. ४. मूळांत 'पाच' असें एक च पद असून त्यावर '२' चा आकडा घालून त्या पदाची द्विरावृत्ति सुचविली आहे. ५. वाळलेले दर्भ. ६. सहदेव व धर्म यांचीं धनुष्ये तोडलीं तसें. ७. एकदम शेकडो योद्धयांना मारणारें आयुधविशेष. ८. देवांचा सेनापति जो कार्तिकस्वामी त्यासारखा. ९. वायुप्रमाणें. १०. देव. ११. जंभासुरास.

शरवृष्टि करुनि पाडुनि तम मोही शल्य धर्मकटकांतें,
दूरग[1] शूरगणास हि दे त्रास श्येनें[2] जेंवि चटकांतें[3]. ४७
करिति रिते विजयरणीं[4] शत गुरुपुत्र त्रिगर्तरथ[5] भाते,
झाकिति मेघ शरौघें[6] रविची त्याची तसी च रथभा ते. ४८
वधिले दोन सहस्र श्रीकृष्णसखें त्रिगर्तभट निकरें:
लीलाताण्डवपंडित[7] हरिला जाईल काय नटनिकरें[8]? ४९
हरि करिकुळीं, परबळीं करि तो अतुळप्रभाव कवि धूमः
तैसा होय, चराचर जाळुनि जैसा चि पावक विधूम[9]. ५०
द्रौणि करी तुमुल समर, हाणी प्रभुला हि उग्र रोप दहा,
मणिहर[10] अहिला तैसा जाला विजयासि परम कोपद हा. ५१
बहु खवळुनि पार्थ म्हणे, 'जों जों गुरुसुत म्हणोनि सोसावें;
तों तों याणें, तातें[11] बाळकसें, उद्धतत्व पोसावें. ५२
धरितां क्षमा, कराया पाहे जैसा बळें चि हानि खळ,
विश्वगुरुस[12] ही गुरुसुत लंघितसे कीं मदांध हा निखळ!' ५३
ऐसें म्हणोनि मारी सूतातें, मग समस्त तुरगांतें,
सोडी अशा शरांतें, जे स्वपदीं लवविताल उरगांतें[13]. ५४
द्रौणि कराया प्रेषी क्रोधभरें चूर्ण तूर्ण[14] मुशळातें,
त्यास हि तोडी अर्जुन; कैसें पावेल सुजड[15] कुशळा तें? ५५
त्यावरि टाकी गुरुसुत यमदंडसमप्रचंडपरिघातें,
तो काय त्यापुढें, जो जय दे पविपाणिला[16] हि अरिघातें. ५६
वेधी शरत्रयें गुरुपुत्रास, छिन्न करुनि परिघास,

१. दूर असणाऱ्या. २. ससाणा. ३. चिमण्यास. ४. अर्जुनाबरोबर चाललेल्या युद्धांत. ५. त्रिगर्तराजाचे रथा योद्धे. ६. पाण्याच्या (पक्षीं) बाणांच्या ओघें. ७. विलासनृत्यनिपुण असा शिव. ८. [ सामान्य ] नर्तक मंडळीकडून. ९. धूमरहित. १०. शिरस्थ मणी हरण करणारा. ११. बापानें बालक पोसावें तसें. १२. अखिल विश्वाचा गुरु जो श्रीकृष्ण त्यास देखील. १३. सापांस. १४. त्वरित. १५ अत्यंत जड (पक्षीं) मूर्ख. १६. इंद्रास.

बा! परशस्त्र तसें त्या वासविवरि, जेंवि अग्निवरि घांस. ५७
ब्राह्मण, सखा, गुरुतनय, शांतीला वरुनि हा तपो, मरणीं
काय अधिक या भावें, रक्षी, आवरुनि हात, पोमें रणीं. ५८
तों जाला विरथ असें जाणुनि, पांचाल्यें सुरथें ये, राया!
गुरुसुत एकें चि शरें ताडी पाडी पळांत येरा या. ५९
त्याच्या चि रथीं बैसे तो श्रीमान् द्रोणसुत अतिक्रुद्ध,
बुद्ध क्रतुनिष्ठासीं, तेंवि पुन्हां जिष्णुसीं करी युद्ध. ६०
धृष्टद्युम्न सुयोधन यांसीं संग्राम जाहला भारी,
राजा पीडित होतां रक्षी, धावोनि कुरुचमू सारी. ६१
कृप कृतवर्मा यांसीं युद्ध करी घ्यावया यश शिखंडी,
शल्य हि महारथांतें पीडी, जैसा पशूंसि शशिखंडी. ६२
शल्य छेदी सहसा नकुळाच्या ही वधार्थ चापातें,
तों तो तत्काळ करी सज्य दुजें, जों लवे न बा! पातें. ६३
नाणी मनांत नातें, हाणी मामास तीव्र शर भाचा,
गमला निपट चि निष्ठुर संगर तो, जेंवि सिंहशरभाचा. ६४
जो समरसमर्थ, दुजा अर्जुन, तो वीर सात्यकि हि, राज्या!
केला विरथ, दिसेना भेद विखरितां शरौघ मिहिरा ज्या. ६५
धर्म म्हणे, 'मारील चि निर्दय हा अंतकाम हे भाचे,
सात्यकिस हि जड; नुपडिल मग हरिच्या दंत कां महेभाचे?
भ्यावें भ्यां धर्मज्ञें पांडुसुतें पण करूनि कां मरणा?
सुक्षत्रिय आदरिती स्वर्गपदाचा धरूनि काम रणा. ६७

१. [अश्वत्थाम्याचा] आव. २. पांचाळदेशाच्या राजाचा पुत्र सुरथ. ३. [अर्जुनाहून] इतर अशा. ४. पाखंडधर्मप्रवर्तक. ५. यज्ञयागादिकांवर निष्ठा असणाऱ्याशीं. ६. चंद्र आहे मस्तकीं ज्याच्या असा शंकर [प्रलयकालीं] सर्व चराचर प्राणिमात्रास जैसा पीडी. ७. सूर्यास. ८. शल्यास. (सूर्य जसे किरण विखरतो तसे शल्यानें बाण विखरिले). ९. नाश इच्छिणारा. १०. भारी—**पंत.** ११. ऐरावताचे. * गवत.

रथ सिद्ध करा, अर्जुन हो माजा पृष्ठगोप[1], रथचक्र
दक्षिण रक्षो सात्यकि, उत्तर जो द्रोणहस्तिचा नक्र[2]. ६८
भीम चि असो पुरःसर[3], होइन मद्राधिपाधिक अशानें[4],
मेलों तर्हि बाधेल न नाकीं सुतशोक पांडुस यशानें.' ६९
धर्म गमे राम, करिति तें रणसाहित्य काय कपि, नाकी
कीं ते पुरदाहोद्यत[5], तो साक्षात् विश्वनायक पिनाकी. ७०
अंधकवधार्थ हरसा, मद्रेशवधार्थ धर्मराज सजे,
त्यावरि उठले दुर्योधन शल्य त्यक्तधर्म[6] राजस[7] जे. ७१
दुर्योधन भीमाच्या पाडी छेदूनि केतुतें धनुतें,
भीम उरीं शर हाणुनि पाडी मूर्छित तुज्या तनूजनुतें[8]. ७२
मग तत्सूतशिरातें, दावाया काळपुरपथासि[9], हरी,
तेव्हां स्वैर पळाले घेउनि ते तूर्ण त्या रथासि हरी[10]. ७३
कृप कृतवर्मा अश्वत्थामा हे धांवले तयामागें,
त्यांचे अनुग[11] बहु जयें मथिले, परगज जसे महानागें[12]. ७४
होता धर्म परममृदुदांतप्रकृति[13] प्रसिद्ध जो पहिला,
तो झाला बहुदारुण, न तसें उग्रत्व तक्षका अहिला. ७५
जिकडे जिकडे पाहे तिकडे तिकडे भयें चमू फाटे,
आटे बहु कुरुबळ, बा! तो धर्म प्रलयरुद्रसा वाटे. ७६
धर्मावरि शल्य बळें, शल्यावरि धर्मराज करि लगट;
त्यांला[14] मद्रप, वाटे, आम्हां कौंतेय, आज करिल गट. ७७
गमले दोघे हरिसे, मग भुलले[15] पळ ससे समर-सिकत;

१. पाठिराखा. २. द्रोणाचार्यरूप गजेंद्राचा [शत्रु] मगर (धृष्टद्युम्न). ३. पुढे चालणारा. ४. अशा व्यवस्थेनें. ५. त्रिपुराचें दहन करण्यास उद्युक्त झालेले देव. ६. टाकला आहे धर्म ज्यानीं. ७. रजोगुणी. ८. पुत्रास. (दुर्योधनास). ९. यमनगरीच्या मार्गास. १०. घोडे. ११. पाठीमागे जाणारे. १२. मोठ्या हत्तीनें. १३. अत्यंत मृदु व निग्रही स्वभाव ज्याचा असा. १४. धर्मप्रभृतींना. १५. शल्य हरि तेव्हां धर्म पळभरि ससा गमला; धर्म हरिसा पळभरि शल्य ससा, पळभरि शल्य सिकवितो, धर्म सिकतो, धर्म सिकवितां शल्य सिकतो, असें गमलें—पंत.

रक्तें न्हाले, झाले बहु फुलले पळससे, [1]सम रसिक ते. ७८
शल्याकडे निरखितां वाटे निवटील हा चि धर्मातें,
धर्माकडे पहातां भासे पावेल हा चि [2]शर्मातें. ७९
धर्माचें धनु शल्य छेदी, तों पांडुनंदन नव [3]सजी,
धनु खंडुनि [4]विरथ करी, करुनि महेशासि वंदन नवस [5]जी!
अश्वत्थामा स्वरथीं वाहुनि शल्यासि तत्क्षणीं पळवी,
तेव्हां धर्म दरातें वाजवुनि स्वजय निजबळीं कळवी. ८१
मद्रप मुहूर्तमात्रें चढुनि नवरथीं पुन्हां करी लगट,
वाटे काळ खवळला सबळा [6]धर्मात्मजा करील गट. ८२
[7]गजवीरशवकुशानीं झांकी त्या रणमखीं [8]अवनिवेदी,
समरांगण-ताट भरुनि काळाला [9]मद्रभूधव [10]निवेदी. ८३
नरवर [11]गरधरखरतरशर करकर दांत खावुनी सोडी,
फोडी कवच उरस्थळ; वाटे तो वात त्या द्रुमा झोडी. ८४
त्या ताडी धर्म हि मग; झांकी जैसा [12]परासु नयनातें,
[13]सावध होउनि सोडी, लक्षुनि तो त्या परा सुनय, नातें. ८५
बाणाहीं शल्याचें भेदी वक्षस्थ कवच कनकाचें;
मन काचें न करी; बा! धर्माचें ज्ञान जें चि [14]जनकाचें. ८६
शल्य पुन्हा धनु त्याचें तोडी ज्या म्हणति सर्व तापस 'जी!'
साप सजीव दुखविला तैंवि गमे धर्म, अन्य चाप [3]सजी. ८७

१. [ युद्धाविपर्या ] सारखे च रसिक असे ते. २. कल्याणास; विजयास. ३. सज्ज करी. ४. शल्यास—**पंत.** ५. धृतराष्ट्रा! ६. धर्मराजास. ७. हत्तीवरून लढणाऱ्या वीरांची प्रेतें हे च कोर्णा दर्भ त्यानीं. ८. भूमि ही च वेदी (होमद्रव्यें ठेवण्याची जागा). ९. मद्रदेशाधिपति शल्य. १०. समर्पण करी. ११. सर्पाप्रमाणें अत्यंत तीव्र असा बाण. १२. गतप्राण. १३. तो सुनय [ शल्य ] सावध होउनि त्या (धर्मा) परा लक्षुनि ( शत्रु असें मानून ) नातें सोडी (आप्तसंबंध विसरला). १४. विदेही जनकाचें. ( शल्य आपला मामा; त्याच्यावर बाण कसे सोडावे, असा मोह धर्मराज हा ज्ञानी असल्यामुळें त्याला पडला नाही).

धर्म शराहीं वेधी शल्याला हरि[1] जसा नमुचितें[2] हो !
तें पाहुनि सुर म्हणती, 'ख्यात जगीं या यशें समुचितें[3] हो.' ८८
सेनापति धर्मांच्या खंडी भीमाचिया हि वर्मातें,
दोघांचे हि भुज करी दुर्बळ, भेदुनि पळांत मर्मातें. ८९
अहितें जेंवि शिखंडी खंडी धर्माचिया धनुष्यातें,
त्याचें तेज सुरास हि दुःसह केवळ नव्हे मनुष्या तें. ९०
कृप ही पाडी हाणुनि तत्सूता[4] स्वामिजयपरा शर सा,
हय मारुनि मद्रप दे सर्वां खचरांसि[5] भय पराशरसा[6]. ९१
विप्रा वेदाचासा, भीमास न भंग तो पहावे गा !
धनु सूतशिर हि तोडी सोडुनियां शरयुगा[7] महावेगा. ९२
मग ताडी विशिखशतें, सहदेव हि मातुळासि बहु ताडी,
भीम[8] तयाच्या तुकडे कवचाचे खंडुनि क्षणें पाडी. ९३
घेउनि असि-चर्म, उडी टाकी मद्रप रथावरुनि तूर्ण,
धांवे सुयोधनमनोरथ धर्मवधें करावया पूर्ण. ९४
नकुळरथेषा[9] तोडुनि धर्मावरि शीघ्र धांवला नीट,
करिवरि हरिसा किंवा हरिवरि अत्युग्र शरभसा धीट. ९५
धृष्टद्युम्न शिखंडी शैनेय द्रौपदेय हे राया !
वेष्टिति धर्मप्रभुला, काळ हि न शके जयासि हेराया. ९६
भीम तयाच्या छेदी दश विशिखांहीं क्षणांत चर्मातें
असितें मुठींत भल्लें[10] तोडुनि दे अमित तोष धर्मातें. ९७
तन्हि धर्मावरि धांवे घ्याया सुयश स्वबाहुपरिघातें[11],
अशनि[12] कराया हरितें, कुरुपतितें तेंवि तुष्ट अरिघातें. ९८

---

१. इंद्र. २. एतन्नामक राक्षसास. ३. योग्य अशा. ४. धर्माच्या सारथ्यास. ५. देवांस (पक्षीं) राक्षसांस. ६. राक्षससत्र करणाऱ्या या नांवाच्या वसिष्ठपौत्रासारखा. ७. दोन बाणांस. ८. [भीम] ताडी. ९. ईषा=ज्यावर जू ठेवतात तो दांडा. १०. बाणविशेषानें. ११. आपल्या परिघतुल्य बाहूनें. (परिघ=अडसर). १२. [जेंवि] अशनि (वज्र) अरिघातें हरितें तुष्ट कराया धांवे.

धर्म तयावरि योजी शक्तिसि, सुर[1]शिल्पपति जिचा घटक,
कटक त्रस्त करी ती, कोठें हि जिला कधीं नसे अटक. ९९
निजशक्ति ईश्वरें[2] ती असुरावरि योजिली असें वाटे,
[3]क्रौंचाद्रि तसा चि उरीं होतां शक्तिप्रहार तो[4] फाटे. १००
वक्ष विदारुनि शक्ति क्षोणींत[5] शिरे बिळीं जसी उरगी[6],
कुरुंगी[7] 'हा! हा!' ऐसी प्रकटे बहु, 'साधु[8]! जय' असी सुरगी.
मद्र महीपति गमला, तो निजला धरुनि पोटिसीं महिला[9]
त्या व्यसुलां[10] हि न सोडी श्री, पतिला जसि पतिव्रता महिला.
वधिला धर्में सकटक मग शल्यानुज[11] विचित्रकवच[11] रणीं,
बा! काय अशक्य तया, जो नम्र महाविभूतिधवचरणीं[12]? १०३
भ्यालें कुरुकटक, तया सात्यकि बा भरतनायका! मारी,
तेव्हां वाटे वधितो देवारिबळासि काय कामारी. १०४
सात्यकिसीं कृतवर्मा हरिसीं हरिसा भिडे महाकोपें,
तीं तीं बाणांहीं हय वेधुनि, तोडी धनुष्य ही रोपें. १०५
जिंकाया न शकावे शक्रप्रमुख हि सुर प्रभो! ज्यातें[13],
सात्यकि विरथ करि उरीं हाणोनि दश क्षुरप्र भोजातें. १०६
कृतवर्मा वीर विरथ होतां, द्रुत पळविलें कृपानें त्या,
बळ सर्व भंगलें हो! त्यजुनि पळालें रणीं नृपा! नेत्यां[14]. १०७
एक सुयोधन वारी धृष्टद्युम्नादि सर्व परकटकें,
समयीं मार्गणदानें[15] जैसा शोभे तसा न कर कंटकें[16]. १०८

१. देवाचा श्रेष्ठ कारागीर (विश्वकर्मा). २. शंकरें. ३. क्रौंच नावाचा पर्वत. (हा कार्तिकस्वामीनें फोडला अशी कथा आहे). ४. शल्य. ५. पृथ्वींत. ६. नागीण. ७. कौरवांची वाणी. ८. शाबास! विजय असो. ९. पृथ्वीला (पृथ्वी ही राजाची स्त्री च होय). १०. गतप्राण शल्यास. ११. विचित्र कवच धारण करणारा शल्याचा धाकटा भाऊ. १२. अणिमागरिमादि अष्टविध ऐश्वर्यांचा अधिपति जो विष्णु त्याच्या चरणीं. १३. कृतवर्म्यास. १४. पुढाऱ्यास. १५. बाण मारण्यानें (पक्षी) याचकास दान दिल्यानें. १६. कंकणानें, कड्यानें.

बहु कुरुपतिप्रसादें केलें नवमांसभोजन वयानीं,
झाला सहाय त्याला, आला बैसोनि भोज नवयानीं. १०९
येतां चि तदश्व वधुनि धर्मे खिळिला पळांत गौतम हीं,
वाटे युधिष्ठिर प्रभु करिल चि पररक्तपूरधौत मही. ११०
अश्वत्थाम्यानें तो कृतवर्मा बा! पुन्हां पळविला हो!
तुमच्या चि अधर्मास्तव भोज हि या दुर्यशें मळविला हो! १११
धर्माप्रति प्रशंसिति वृत्रवधीं जेंवि देव मघव्याला;
जो सुप्रजा न, वंध्य चि तो पुरुष, न पुत्र, मूर्त अघ, ज्याला. ११२

---

## अध्याय तिसरा.

त्या शल्याचे उरले होते जे सप्तशत रथी मागें,
धर्मातें माराया ते एकामें चि धांवले रागें. १
तेव्हां वसला होता दुर्योधन शक्रसा गजावरता,
तो त्या वीरांसि म्हणे, 'थांवा, ऐका विचार, या, परता.' २
ते प्रभुवचन विलंघुनि गेले चि युधिष्ठिरासि माराया,
वाराया त्यांसि पुढें झाले भीमादि सर्व बा राया! ३
'कोठें धर्म वृकोदर अर्जुन यम सात्यकी?' असें पुसती,
ज्यांची 'व्हावें पांडव वधुनि अनृण' हे चि कामना नुसती. ४
अर्जुन धावुनि आला धर्मातें, अरि वधूनि, रक्षाया;
शकुनि म्हणे कुरुपतिला, 'योग्य न तूं स्वबळघात लक्षाया.'
कुरुप म्हणे, "वदलों मीं 'पावेल यशासि मद्र, थांबा हो!
करुनि विचार रण करूं, मजपासीं द्रुत मद्रथां बाहो.' ६

१. दुर्योधनाच्या कृपाप्रसादानें! २. खगानां—पंत. ३. नवीन रथात. ४. गौतमकुलोत्पन्न कृपाचार्य. ५. शत्रूच्या रक्ताच्या पुरानें धुतलेली अशी. ६. चांगली संतति आहे ज्याला असा. ७. एकदम, जुटीनें. ८. ऋणमुक्त. ९. मद्रदेश. (अर्थात् तेथील योद्धे). १०. माझ्या रथ्यांस.

लंघुनि मदुक्त गेले, जावूं द्या, ते मरोत मारुते[1] हो!"
शकुनि म्हणे, 'न उपेक्षीं तूं त्यां दहनां सहाय मारुत हो. ७
समरीं प्रकुपित वीर प्रभुशासन[2] लंघिती न तो दोष,
तोष प्रभुला व्हावा, यावा न कदापि भटहठें रोष. ८
त्यांहीं आम्हां आम्हीं त्यांला रणसंकटांत राखावें,
इतरें निजप्रजेला मृगराज म्हणेल काय गा! खावें?' ९
काय कथावें काळग्रस्तानें[3] आनें[4]? नीच मूढ कळीं[5]
सुचउनि उरली ती ही काळाच्या आननीं चमू ढकली. १०
धावे कुरुपति तेव्हां राया! संग्राम होय बळकट, कीं,
सप्तशत हि रथ मेले, उरलें नाहीं च सत्वबळ[6] कटकीं. ११
भीमाला बळ चळचळ कांपे, सोडी कळा[7] चि राया! तें;
शीघ्र पळे तें, जैसें बकरें येतां गळा चिरायातें. १२
भीमार्जुन यम सात्यकि पांचाळ द्रौपदेय हे मागें,
रागें धर्म हि धांवे; काळ म्हणे, 'तूं[8] हि पाठिला लागें.' १३
भीष्मवधीं द्रोणवधीं कर्णवधीं तें चि दुःख शल्यवधीं;
जें अनुभविलें आम्हीं कोण्हीं हीं ऐकिलें नसेल कधीं. १४
पाठीस लागले ते पांडवपांचाळभट असें म्हणती,
"आजि नृपोत्तम झाला धर्म, सकळ यासि करितिल प्रणती[9].
आजि सुयोधन सुपदभ्रष्टनहुषसा[10] स्वदुर्गुणें झाला,
याला पाहुनि निश्चित यमधर्म म्हणेल, 'नारकीं[11] घाला.' १६
आजि विदुरवचन रडत शतदा घटिकेंत आठविल अंध;
गंध नसे ज्ञानाचा, दाटुनि कीं हो! बळाविला[12] बंध! १७
जें साधूंसि दिलें तें आपण भोगील दुःख आमरण,

१. मारोत. २. स्वामीची आज्ञा. ३. काळग्रस्त शकुनीनें. ४. [युद्धावाचून] दुसरें. ५. युद्ध. ६. धैर्य. ७. तेज. ८. तूं धर्म. ९. नमस्कार. १०. उद्योग०, अ० २१२३ ते ६३ पद्य. ११. नरकांत. १२. बळकट केला.

उदकीं पक्के[1] घटासीं सुघटित[2] हि करील काय आम[3] रण? १८
लोभ धरुनि केला जो विषदानादि प्रयोग अनयांचा,
येइल त्याचा प्रत्यय, अत्यय[4] परिसोनि सर्व तनयांचा. १९
जीवनहीना दीना मीनापरि बहु बरा तळमळेल;
भिजविल आम घट तसा नित्याश्रुभरें धरातळ: मळेल[5]. २०
होतिल सत्य समस्त हि वदले विदुरादि कृष्णमहिमा ते,
अंध म्हणेल, 'मला घे पोटीं देवूनि विवर महिमाते[6]!'" २१
ऐसें बहुत चि बोलत परभट पाठीस[*] लागले क्रोधें,
कुरुपतिवांचुनि मागें एकें हि न वदन फिरविलें योधें. २२
सूतासि म्हणे राजा, 'पावेल न सैन्य भद्र[7] थारा[8] हें,
या पळत्या सेनेच्या जघनीं[9] स्थापूनि मद्रथा राहें. २३
वेळेसि[10] सिंधुसा जय हि न लंघिल मद्वनुष्यवल्लीला,
हरिलीलासी च रणीं माजी, नोहे मनुष्यवल्लीला[11].' २४
एकविस सहस्र[17] विविध देशींचे यानहीन[12] कवि पत्ती
म्हणति, 'मरोनि वरूं या स्वःसुखसंपत्ति[13], युक्त न विपत्ती.' २५
त्यांहीं भीमाचा रथ मरणार्थ बळें चि वेढिला कोपें,
भीमें न लेखिले ते प्रबळ हि पशु जेंवि जाणत्या गोपें[14]. २६
स्वरथावरूनि उतरे धरुनि करीं तो महाभुज गदेतें,
त्यांला देता झाला, क्षुद्रां भेकां[15] महाभुजग दे[16] तें. २७
भीम सहस्राधिक ते अयुतद्वय पत्ति करुनियां चूर्ण,
पूर्ण कराया संधा धावे स्वरथीं बसोनियां तूर्ण. २८
होय सुयोधन वेळा, पांडवबळसिंधु बा! थबकला गा!

१. पक्के भाजलेल्या. २. चागलें घडलेलें. ३. कच्चे. ४. नाश. ५. मलिनकीर्ति होईल. ६. हे भूमाते! ७. कल्याण. ८. आश्रय. ९. मध्यभागी. १०. किनाऱ्यास, मर्यादेस. ११. मनुष्याप्रमाणें कृति. १२. वाहनाविरहित असे. १३. स्वर्गलोकींचे सुख हीच संपत्ति. १४. गुराख्यानें. १५. बेडकांस. १६. मरण. १७. वीस हजार. * पाठीस

पाहे झष[1] कवळाया जेंवि करुनि जवळ पाथ[2] बक लागा[*]. २९
स्वभटांसि म्हणे कुरुपति, 'मरण चुकेना कधीं असें कळतां
पळतां, धर्मापासुनि[3] चळतां, अयशोंकरूनि कां मळतां? ३०
भीमा आजि पुढें ही निमिष हि चुकवुनि यमा न वांचाल,
ज्या जन्म, मरण त्या; हे ठावी कोणां न मानवां चाल? ३१
झाले आहेत क्षत दोघे ही कृष्ण, सर्व या, परता,
युद्धें जय कीं स्वर्गः श्रेष्ठ जगीं लाभ कोण यापरता?' ३२
या बोधें ते सैनिक सर्व परतले करावया युद्ध,
शाल्व[4] शिरे धर्मबळीं असुरबळीं जेंवि वासव क्रुद्ध. ३३
बहु भ्याले त्या, प्रेरी कोपें तो शाल्व सिंधुरवरा[5] ज्या;
परबळरव[6] होय जसा तो मंदरमथितसिंधुरव[7] राज्या! ३४
धृष्टद्युम्नाचा रथ केला तत्काळ पीठ आपटुनीं,
त्या करिभयें पलायन वरिलें समरीं म्हणोनि 'हा!' पटुनीं[8].
भीम शिखंडी सात्यकि रोधिति त्या शाल्वकुंजरा; ज्या जी
युक्ति सुचे तो करि ती; ते दाव[9] चि, तो हि कुंजें[10] राज्याजी! ३६
तो गज गदाप्रहारें धृष्टद्युम्नें झटोनि लोळविला,
छेदुनि शिर सात्यकिनें शीघ्र स्वर्गासि शाल्व बोळविला. ३७
वृत्रवधीं असुर तसे शाल्ववधीं त्रासले तुझे वीर,
पुनरपि पळतां त्यांतें कृतवर्मा मात्र एक दे धीर. ३८
आम्हीं कृतवर्म्याचा, सात्यकिचा भरवसा तिहीं[11] धरिला,
झालें युद्ध सुदारुण, तो संगरदेश शवशतें भरिला. ३९
मग युयुधानें[12] केला कृतवर्मा विरथ, काय सांगावें?
भुजबळ देतें जय, तरि कविनीं नयधर्मबळ चि कां गावें? ४०

---

१. मासा. २. पाणी. ३. आपल्या क्षात्रधर्मापासून. ४. शाल्वदेशाचा राजा. ५. मोठ्या हत्तीस. ६. शत्रुसैन्याचा शब्द. ७. मंदरपर्वताने घुसळलेल्या समुद्राचा शब्द. ८. शूर योद्ध्यांनी. ९. दावाग्निवेष्टित कुंज—पंत. १०. वेलींची जाळी. ११. पांडवपक्षीयांना. १२. सात्यकीने. * लागा पाहे=साधि पाहतो.

तो कृतवर्मा [2]स्वरथीं वाहुनि तत्काळ पळविला स[1]कृपें,
वीरश्रीचा चि सदा वरिला दुसरा न पळ विलास, कृपें. ४१
हार्दिक्याच्या भंगें पुनरपि कुरुकटक भंगलें सर्व;
गडबडला न सुयोधन मात्र, सुरपराभवीं जसा शर्व. ४२
यम भीम धर्म सात्यकि पांचाळ द्रौपदेय भट अन्य
सर्व हि निवारिले बा! केलें दुर्योधनें महा[3]जन्य. ४३
कौरववीर परतले; करिते झाले महासमर रा[4]जे:
बहु, अभिमुख मेले हो! स्वर्गाच्या उघडणार अ[5]ररा जे. ४४
विरथ युधिष्ठिर केला त्या समरीं शकुनिनें अगा राया!
जेणें कपटें स[6]च्छ्री सीतासी आणिली अगारा या. ४५
धर्में शकुनि पळविला, मग कृतवर्मा नृपा! विरथ केला:[7]
तो शूर दूर तेथुनि पळउनि सकृप पृथासुतें नेला. ४६
कोपे [8]मानाहीचा तो पेटारा पृथासुतद्वे[9]षी
करितां युद्ध कृपासीं, धर्मावरि सप्तशत रथ प्रेषी. ४७
शस्त्रांची वृष्टि तिहीं केली जी मुख्य पांडवावरि ती
गिरिवरि घनवृष्टि चः तव पुत्र नृप शिखी च तांडवा वरिती.
शीघ्र शिखंडिप्रमुख प्रबळ [10]प्रतिकूळवातसे सुटले,
फुटले सर्व हि त्यांचे भुज मस्तक, चाप तटतटां तुटले. ४९
शकुनि म्हणे, 'हूं! मारा. फिरवूं चि नका तुम्हीं रणीं वदन;

१. सदय अशा (कृपाचार्याने). २. कृतवर्म्याचे. ३. घोर युद्ध. ४. धर्म-दुर्योधन-**पंत.** ५. कपाटानें-**पंत.** ६. साधूंची (पांडवांची) संपत्ति. ७. 'पृथासुतें' असें कवीच्या लेखणींतून चुकून पडलें असावें; कारण, मूळांत अश्वत्थाम्यानें आपल्या रथांत घालून कृतवर्म्याला पळविला असें आहे. (कुंभकोणची आवृत्ति शल्यपर्व अ० २२। ८ पहा). यावरून **पं**तांचा उद्दिष्ट पाठ 'कृपीसुतें' असा असावा असें अनुमान केल्यास तें त्यांच्या अनुप्रासप्रवृत्तीला हि अनुसरून च होईल. ( मागें अ० १।३१ 'सकृप कृप' हा अनुप्रास पहा ). ८. अभिमानरूपी सर्पाचा. ९. दुर्योधन-**पंत.** १०. उलट्या वाऱ्याप्रमाणें.

मागुनि करितो घेउनि अयुतमित स्वाश्वसैन्य मीं कदन. ५०
शिरतां शकुनि अकस्मात् कटकीं कदनार्थ धर्मराज, घनीं,
परिसे महाकलकला, तालवनीं जेंवि मर्मरा, जघनीं. ५१
सहदेवासि म्हणे, ' घे हे पांच द्रौपदेय, घे बळ हें,
मथुनि शकुनितें सत्वर संपादीं शुद्ध कीर्तितें केळहें.' ५२
धांवे सहदेव पुढें पुत्र करुनि, तें उलूकजनकबळ
गांठी, वाटे मृगकुळ तो पंचानन करावया कबळ. ५३
वधिली सेना, शकला संरक्षायासि न शकुनी तीतें:
वंध्येतें भजतां जरि फळ, तरि येईल यश कुनीतीतें. ५४
वधिले च्यार सहस्र, व्याघ्रवृकांहीं वनीं जसे मेष,
उरले दहा सहस्रांमध्यें सैनिक सहस्र सा शेष. ५५
शकुनि सरे मागें मग कृष्णासुत मातुळाकडे गेले;
मेले उदंड, उरले ते परतुनियां गजांत गज ठेले. ५६
सहदेव हि शकुनिकडे गेला तों खवळला पुन्हा शकुनी,
धृष्टद्युम्ना गांठुनि बळ बुडवी, तदवना न तो शकुनी. ५७
पार्षत समरीं मेले बहु, उरले सप्तशत हयारोह,
तान्हि तुमजे श्याल तुजा; कीं, सरतां आयु होतसे मोह. ५८
त्यांस हि ' हूं! घ्या चि ' म्हणे; जें न नदी करिल करिलें तें भुंडकी?
मग ' नृप कोठें? ' ऐसें स्वभटांसि शकुनि पुसे, स्वयें हुडकी.
कोणीं कथिलें, ' भ्रम महिवरि हिमकर उतरला असा करितें

१. पिछाडीकडून. २. सख्येने दहा हजार. ३. सहार. ४. दाट अशा ताडाच्या वनात. ५. पर्णध्वनि–**पंत.** ६. घनीं जघनीं कलकला परिसे, तालवनी जेंवि मर्मरा–**पंत.** जघन=पृष्ठभाग. ७. युद्धाने. ८. उलूकाच्या पित्याचे (शकुनीचे) सैन्य. ९. धृष्टद्युम्नाकडे. १०. त्या सैन्याच्या रक्षणास. ११. जवळचे लोक. १२. घोडेस्वार. १३. उरलेल्यांस. १४. मूळपाठ–**घनघटा करील.** १५. लहानशी विहीर, नदीच्या किंवा ओढ्याच्या कांठचीं विहीर. १६. अन्वयार्थ–[ जे स्वकीयाना ] महिवरि हिमकर (चंद्र) उतरला असा भ्रम करितें; [परंतु] अरिते रविमंडळसें [ गमतें ] तें छत्र सुयोधनावरि झळकतें [ पहा ].

अरितें रविमंडळसें छत्र झळकतें सुयोधनावरि तें.' ६०
धांवे तेव्हां वाटे छत्र[1] विधु, शकुनि चकोरसम राया!
भेटे, बळ[2] दे; असदुपदेश बहु, दुजा[3] नको रस मराया. ६१
शकुनि म्हणे, 'म्यां वधिले धर्माचे सर्व संगरीं घोडे,
थोडे उरले रथ गज, धांवा; श्रमल्याविना न जय जोडे.' ६२
या वचनें बहु हर्षे आवास[4] क्रोधकामलोभाचा,
धांवे युधिष्ठिरावरि गतमति मामा तसा चि तो भाचा. ६३
बहु गर्जना करित रथसमुदय धांवे अजातशत्रुकडे,
म्हणती, 'युधिष्ठिराचे आजि तिळायेव्हडे करूं तुकडे.' ६४
तें पाहुनि पार्थ म्हणे, "प्रभुचा परिभव करील अरि हा कीं!
श्रीकृष्णा! माजा रथ ने परसेनार्णवांत, हरि हाकीं. ६५
देवा! संग्रामाला झाले कीं आजि दिवस अठरा या,
हठ राया[5] बुडवितसे, हा योग्य पदीं[6] कुबुद्धि न ठराया. ६६
जो कुरुसेनासागर गोष्पद होवूनि आजि उरला हो!
निःशेष करूं द्या हो! कुरुपतिचें अश्रुहार[7] उर लाहो. ६७
जन्हि साम भीष्मपतनीं करिता, शिव भूमिपाळकां होतें,
करिल क्रूर कुमति कुरुकुळकीर्तिकलंक काळ[8] कां हो! तें? ६८
न च केलें भीष्में शरतल्पीं हि पडोनि जें विहित कथिलें,
कर्णवचें हित मानीं, त्यजुनि कनक बाळ जेंवि हित कथिलें.
तो प्रभु पडल्यावरि ही पुनरपि कां हें प्रवर्तलें युद्ध?
कारण नुमजे, माजें ज्ञान जरि गुरुप्रसादज[9] नु शुद्ध. ७०
तैसा हि प्रभु पडला, तन्हि अविवेकी पहा कसा अरि तो
करितो अद्यापि समर, जय साधाया धनुष्यशर धरितो. ७१

१. [ दुर्योधनाचें ]. छत्र हा च चंद्र. २. दुर्योधनास कलह करायास–**पंत.** ३. हाळाहळादि–**पंत.** ४. वसतिस्थान. ५. दुर्योधनास. ६. राज्यपदावर. ७. अश्रुबिंदूंचा हार. ८. काळस्वरूपी, नाशकर्ता. ९. गुरुप्रसादापासून उत्पन्न झालेलें.

मेला ब्रह्मविदुत्तम[1] आचार्य द्रोण तऱ्हि सख्या कृष्णा!
नुमजे खळ किमपि, पहा; न सुरा भुलवी जना जसी तृष्णा[2].
भूरिश्रवा जयद्रथ बाल्हिक भगदत्तराय कवि कर्ण
तपले जपले खपले, मेला हितवादिनायक[3] विकर्ण. ७३
जऱ्हि भरला धूळीनें दुःशासन पंकपूर्ण खळगा तो,
जें प्रथम गात होता गाणें अद्यापि तें चि खळ गातो. ७४
आर्यें भीम मथिले भ्राते अक्षौहिणीपति हि मानी,
तऱ्हि न द्रवे खळाची बहुतापें ही, पहा, मतिहिमानी[4]. ७५
सन्मन म्हणेल देतां चिंतामणिचा डबा, 'वळेना मीं;'
कीं, झालें धरुनि तुझ्या प्रेमाची चाड बावळें नामीं. ७६
त्या त्वां विश्वगुरुवरें हित कथिलें परि न मानिलें कांहीं,
यांहीं हे वरिली जसि तसि संगराच्या न हानि लेंकांहीं. ७७
होणार चूर म्हणउनि म्हणतें पापोर बा! 'वळेना' गा!
हें झोंबतें हिराया सन्मणिला पोर बावळें नागा. ७८
भीष्म द्रोण विदुर कवि यांचा मंदारवंद्य उपदेश
घेता, जरि काय कुळीं असता होणार मान्य सुपदेश. ७९
घेइल कोणाचें, ज्या न तुझें ही सेव्य भव्य जनकवच,
म्हणतात ज्यासि नारदवाल्मीकिप्रमुख भव्यजन 'कवच'?
मेल्याविना न देइल आलें जें भव्य राज्य पंदरा तें,
पावे लोभी परधनहर, जेंवि ज्वरित आज्यप, दरातें. ८१
वदला विदुर, 'न देइल राज्य असे जों सजीव हा नीच,'
तें चि खरें; आहे या खळभाळीं स्वपरजीवहानी च. ८२

१. ब्रह्मज्ञश्रेष्ठ. २. आशा, लोभ. ३. हितोपदेश करणाऱ्यांत श्रेष्ठ. (सभा० अ० ५।४४ ते ५५ पहा). ४. बुद्धिरूप बर्फाचा ढीग. ५. मागे अ० २।१ पहा. ६. स्वयं च मेलें—**पंत.** ७. पाप्याचें वक्षस्थळ. ८. कल्पवृक्षास हि वंद्य. ९. चागल्या राज्यपदाचा अधिपति. १०. कल्याणकारक. ११. ताब्यांत. १२. तूप पिणारा. १३. भीतीस, नाशास.

देवा! भस्म करूं दे अंधसुतसहाय राहिले थोडे;
जोडे जय तव तेजें, हाक, परबळीं [1]धसोत हे घोडे." ८३
विजयरथासि अजित [2]अज करवाया, भस्म तव चमू, ढकली;
वेढुनि धनंजयातें करिति धरुनि शस्त्र-कवच मूढ कली. ८४
लज्जा बहु दे, [3]गहनीं शिरल्या, अभिमन्युजनक, वणव्याला;
त्रिजगीं विजया जिंकी ऐसा पुत्रासि जन कवण व्याला? ८५
गांडीव कुपिततापसवच कीं भृगुरामधन्व अथवा तें
[4]हरचक्षु परां दुःसह; [5]जय जेणें जेंवि कृष्णपथ वातें. ८६
न नरीं तुरगीं नागीं भीमानुज दुसरिया शरा योजी;
गमला यमलार्जुनभित्[6]सूत पलाशांत रामसा तो जी! ८७
त्या प्रलयांत[7] सुयोधन धृष्टद्युम्नें नृपा विरथ केला,
अश्वीं चढोनि तेथुनि शकुनिकडे प्राणसंकटीं गेला. ८८
[8]सर्वरथानीकक्षय झाला, उरले सहस्र तीन करी,
[9]हतशेषा पृतना [10]मृतिचिंतीं जैसी महासती न करी. ८९
तो गजसमूह सहसा पांचां ही पांडवांसि वेढी गा!
त्या जयशरनिकर, जसा तृणतूलांच्या [11]शिखी शिवे ढीगा. ९०
जीच्या निजदंष्ट्र्यधिक उग्रत्वें होतसे सखेद शनी,
त्या स्वगदेनें भीमें वधिले ते मृत्युचे सखे [12]दशनी. ९१
एकें चि गदाघातें भीम जसें लोळवी परकरींतें,
कौतुक पार्थ हि हाणुनि एक चि एकीं गजीं शर करी तें. ९२
एक मरे तों त्यां नरसिंहांवरि ये [12]रदी नवा राया!

१. वेधडक शिरोन. २. श्रीकृष्ण. ३. अरण्यात. ४. शंकराचा [ तिसरा ] डोळा ५. वाऱ्यामुळें ज्याप्रमाणे अग्नि अनिवार होतो त्याप्रमाणें ज्या गांडीवामुळें अर्जुन होतो. ६. यमलार्जुन नांवाच्या वृक्षास मोडणारा (कृष्ण) आहे सारथि ज्याचा असा (अर्जुन). (कर्ण० अ० १०।१८ पहा). ७. घोर युद्धांत. ८. रथांत बसून लढणाऱ्या सर्व सैन्याचा नाश. ९. मरून बाकी राहिलेली सेना. १०. मरणाची काळजी. ११. अग्नि. १२. दंती–**पंत.** हत्ती.

भ्रमले दिगिभें[1] न शकते; मग किति ते येर दीन वाराया? ९३

बहु गज धर्में नकुळें सहदेवें मारिले नृपा! 'पविनें
नग भेदिले' म्हणावें पाहुनि दूरूनि निश्चयें कविनें. ९४

धांवे नृप[2] विरथ करुनि धृष्टद्युम्न हि, उदंड मथन करी;
भ्रमले श्रमले, समरीं पळ हि धरी धर[3] न हरि, न रथ, न करी.

कृपकृतवर्माद्रौणि स्वरथानीकीं नृपा न पाहूनीं,
बहु शोध करुनि पुसती समरीं स्वक्षत्रियांसि बाहूनीं. ९६

म्हणति 'न जाणों' किति, किति म्हणती, 'अभिमान धरुनि आजिवरि
मरतां सारथि गेला शकुनिकडे नृप चढोनि वाजिवरी.' ९७

कोणी म्हणति, 'हुडकितां पुसतां कां? जरि असेल, देखाल.
लेखाल ध्रुव[4] वपु तरि धर्मासि चुकाल, कोटंगे[5] खाल. ९८

हे आले परभट कीं याया सुखयश जनांत शुद्ध करा,
क्रुद्धकरालतमांतकसम[6] भीम स्मरुनि शीघ्र युद्ध करा.' ९९

परिसुनि ऐसें द्रौणि द्वार करी द्रुपदपुत्रबळ वधुनीं,
स्वधुनी[7] त्यजुनि मकरसे शीघ्र निघाले तिघे[8] चमूमधुनी. १००

कांहीं मीं[9] हि झगडलों स्थापुनि कुरुबळ मुहूर्तपर्यंत,
दैवें करीं न धरितां, कोण भुजबळें करील अयंत? १०१

त्या श्रांतवाह[10]धृष्टद्युम्नापासूनि होउनीं भग्न
बा! मीं यथाकथंचित्[11] सुटलों, झालों भयार्णवीं मग्न. १०२

तों च्यारिशतरथांसह सहसा सात्यकि रणांत आढळला,
मजवरि नीट चि आला, अद्रि[12]वरुनि उपळ[13] जेंवि बा! ढळला.
केलें म्यां सात्यकिसीं युद्ध प्रभुजी! मुहूर्त दारुण हो!

१. दिग्गज. २. दुर्योधन. ३. तग, टिकाव. ४. शाश्वत. ५. गोते (?). ६. रागावलेल्या व भयकर अशा यमासारखा. ७. आपली नदी. ८. कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा. ९. संजय. १०. थकले आहेत घोडे ज्याचे अशा. ११. मोठ्या कष्टानें; माराकुटीनें. १२. पर्वतावरून. १३. धोंडा.

अजिताश्रितापुढें[1] बहु दुर्बळ हो ऐंद्र[2] याम्य वारुण[2] हो. १०४
पार्थाचा शिष्य सखा तो सात्यकि काय[3]! सूत मीं काय[3]!
पडलों मूर्छित होउनि; झाला मर्मक्षतार्त हा काय. १०५
सात्यकिसीं रण करितां प्राप्त न होईल कां पतन यास[4]?
बा! सुर हि सत्यकाच्या पाहुनि पावेल कांप तनयास. १०६
धरिलें मज युयुधानें जैसें झडपुनि हरूनि दर्पाला,
पक्षीश्वरें धरावें लीला[5]लेशें पळांत सर्पाला. १०७

# अध्याय चवथा.

दुर्मर्षणादि अकरा तव सुत भीमासि गांठिती कोपें,
वधिले प्रायः[6] प्रभुजी! दश एकैकें चि दारुणें रोपें. १
छेदी धनुः[*] श्रुतर्वा समरपटु त्वत्तनूज अकरावा,
भीम हि तच्छिर तोडी, बा! अभिमुख[7]निहतशोक न करावा.
अत्युग्रा भीमातें प्रेषाया शीघ्र काळसदनातें,
हतशेष सर्व वेढिति कोपें, पाहुनि कुमार[8]कदनातें. ३
तेव्हां पन्नास रथी, पत्ति अयुत, सप्तशत करी मथिले,
अष्टशत तुरग भीमें, म्यां हे मोजूनि वरबळें[9] कथिले. ४
किंचि[10]च्छेष कुरुकटक भीमें ठोकूनि बाहु भिववीलें,
प्रेक्षकसुरजनलोचनकोटीसह धर्महृदय निववीलें. ५
दोघे शतांत उरले सुत, दुर्योधन सुदर्श हे मात्र,
गात्रें[11] क्षतशतपीडित ज्यांचें, जे शोकदुर्यशःपात्र. ६

१. कृष्णाश्रितापुढें. २. इंद्र, यम व वरुण यांचे आश्रित. ३. या पदांनीं योग्यतेसंबंधीं महदंतर सुचविलें. ४. मला. ५. सहज. ६. बहुतेक. ७. शत्रुसमोर लढत असतां मेलेल्याचा. ८. [तुझ्या] कुमाराचा. ९. [व्यासाच्या] वरसामर्थ्यानें. १०. थोडें उरलेलें. ११. शरीर. * धनतें. (हें संस्कृत रूप आहे).

दूरुनि धवल[1]च्छत्रें वाह[2]समूहीं तयांसि पाहूनीं,
केशव म्हणे, 'प्रतिज्ञा सफळा केली च भीमबाहूनीं.' ७
हर्षुनि म्हणे, "सख्या ! रिपु उरले अत्यल्प, मारिले बहुतः
परशस्त्रास्त्रज्वलनीं ज्ञातीं होवूं दिले रणीं न हुत. ८
तो धरुनि संजयातें घेउनि येतो तुजा प्रिय छात्र,[3]
ते वेगळे तिघे कृप कृतवर्मा द्रौणि दुर्यशःपात्र. ९
हा पार्षत[4] इकडे कुरुपतिचें बळ मथुनियां उभा आहे,
तो[5] त्या हयांत दिसला, तुमचा उत्कर्ष खळ न जो साहे. १०
जाले श्रांत नकुळसहदेव खळांसीं करूनि कळहांतें,
त्वां चि मथावें उरलें हें अरिचें अरिसमेत बळ हातें. ११
तों गांठावे पाहुनि तुज न पळाले भिवूनि सहसा जों,
मीं तूं जयें जगीं या बा ! त्या मातलि[6]बलारिसह साजों. १२
कोणी पुरुष प्रेषुनि तो पार्षत तूर्ण आणवा, हूं ! 'न'
कां म्हणसि? राम[7] होसिल, वदतों हें सत्य आण वाहून. १३
सैन्य स्वल्प चि आहे, तें हि परिश्रांत, तूं अशामाजी
मारीं सुयोधनातें, वांछितसे मति तुज्या यशा माजी. १४
'मारुनि सकळ बळ तुम्हां अजितांतें जिंकिलें' असें म्हणतो,
शेष कुरुकटक मथितां खळ तुजसीं करिल निश्चयें रण तो." १५
अर्जुन म्हणे, 'अनंता ! तो चि बळी आजि बोळविल याला,
त्या दोघे किति, नेले अष्टनवति दुष्ट टोळ विलयाला? १६
नेले नदीज कुरुगुरु वैकर्तन शल्य हे असे विलया,
तेथें, ज्या पापा शुं[10]चि हा[11]किति, हा किति? मही न सेविल यो[12].

१. [दुर्योधनाच्या] पाढऱ्या छत्राच्या खुणेवरून. २. अश्वसमूहात. ३. शिष्य. (सात्यकि). ४. धृष्टद्युम्न. ५. दुर्योधन. ६. इंद्रसारथि व इंद्र याच्याप्रमाणें. ('सह' हा शब्द सादृश्यवाचक हि आहे). ७. रामसा जयें विश्वमान्य-**पंत.** ८. बलवान् भीम. ९. अठ्याण्णव. १०. ज्ञाते-**पंत.** ११. धिक्कारितात-**पंत.** १२. दुर्योधनास-**पंत.**

उरले साग्रशत[1] करी, पंच शतें अश्व, रथ हि दोन शतें,
तीन सहस्र पदाती, खळबळ साधील काय हो ! यश तें ? १८
हरिला हरिण तसे मज कोणी सोडूनि जरि न झुरतील,
चुरतील, मच्छरांसि न पुरतील क्षण हि पर न उरतील. १९
तूं हि प्रसन्न, तो ही पी रक्षाया प्रजा गराला जो,
आजि ध्वांतहर[3] मला, हरितां धर्मप्रजागरा[4], लाजो. २०
परतोनि आणितों श्री मारुनि त्या परमनीचकितवातें[5],
मद्रिपूंच्या, केले सुरवर, उडउनि पर, मनीं चाकित, वातें. २१
आजि कुरुवधू पुष्कळ रडतिल पतिपुत्रघात परिसून,
निंदिल गांधारीतें, होती जोडीतें[6] हात परि सून.' २२
ऐसें म्हणोनि विजयें प्रभुकरवीं स्वरथ शीघ्र हाकविला.
केले वश हरिहर; पर तन्महिमा वर्णवे न हा कविला. २३
सांगों काय, वृकोदर सहदेव हि धांव हेति घेती, तें ?
जी कुरुसेना होती, गांठिति तत्काळ हे तिघे तीतें. २४
वधिला जयें त्रिगर्ताधिपति सुशर्मा सबंधुसुतसैन्य,
भीमें सुदर्शन, नृपा ! तें पाहुनि ये सुयोधना दैन्य. २५
गांधारकटक मर्दुनि सहदेवानें उलूक खपवीला,
त्या दुःसहसुतशोकें शकुनिविवेकप्रताप लपवीला. २६
स्मरला विदुरकविवचन शतदा तो रडुनियां खळखळां तें,
न रडेल कसा, सिकवी साधुच्छळयुक्ति जो खळ खळांतें?
शोकें आधीं पुष्कळ अश्रु, क्रोधें महेषु मग सोडी,
त्यांतें चापातें ही बा ! तो सहदेव वीरवर तोडी. २८

१. बरोबर शंभर. २. विषाला. ३. अंधकाराचा नाश करणारा (सूर्य). ४. सूर्याचा धर्म प्रजागर ( जागृत ) करण्याचा व अर्जुन तर धर्माच्या प्रजागराचा लोप करून त्याला स्वस्थ झोंप घेऊं देणार. अर्थात च यामुळें सूर्याचा पाडाव होऊन तो अर्जुनाला लाजेल, असा भावार्थ. ५. शकुनीस. ६. धन्य कुरवा म्हणोनि–पंत. ७. श्रेष्ठ असा.

त्याउपरि ओंठ चाउनि शकुनि प्रेषी कराल[1] करवाल,
त्यातें तोडूनि म्हणे[2], 'रण न तुम्हीं, छळ कराल, करवाल.' २९
मग टाकिली गुरुगदा[3], करि तो तीच्या हि खंडना कीं जी
शक्ति हि सोडी, पाडायाची उत्साह थंड नाकीं जी. ३०
भ्याला सौबळ[4], झाला कुरुवीरसमूह विमुख बा रांया!
वाराया मृत्यु निघे; धांवे सहदेव त्यासि माराया. ३१
हरिसा गर्जोनि म्हणे, 'कां रे! झालासि अक्षम रणातें?
घे फळ पदरीं, तुजला देतात तुझेचि अक्ष[5] मरणातें. ३२
हांसविले जे तेव्हां द्यूतें सवस्व हरुनि पशु[6] भाचे,
मेले; उरलां दोघे मात्र तुम्हीं मंद कंद[7] अशुभाचे. ३३
हरितो तुझें शिर शरें, तरुचें फळ निपुण[8] जेंवि हरि लगुडें[9];
हरिन यशें सन्मन मीं; नच तूं; अमृतें तसें न हरिलें[10] गुडें.' ३४
ऐसें दापुनि खंडी छत्र, ध्वज, धनु; करी विरथ, हांसे.
विधूनि म्हणे, 'मामा! काढा कीं जे तुम्हां जयद फांसे!' ३५
क्रोधें घालूनि उडी, घेउनि तो निपट अच्छवि[11] प्रास[12],
सहदेवास वधाया धांवे, ग्रह[13] जेंवि अच्छविप्रास[14]. ३६
तीं बाणानीं तोडी प्रास, भुजद्वय, पळांत हो राज्या!
त्या काय, जयास उणें प्राप्त मुकुंदप्रसादहोरा[15] ज्या? ३७
मग त्या विजयानंद[16]स्मितभरविकसितमनोज्ञतरगल्ले

---

१. भयंकर खड्ग. २. [सहदेव] म्हणे. ३. अन्वयार्थ—मग जी गुरुगदा (प्रचंड गदा) टाकिली तिच्या हि की (आणि?) जी नाकी (स्वर्गातील -देवातील—) ह्यां उत्साह थंड पाडायाची शक्ति सोडी तिच्या हि खंडना तो (सहदेव) करि. ४. शकुनि. ५. फासे. ६. पशुतुल्य, मूर्ख. ७. अनर्थांचें गड्डु च असे. ८. चतुर पुरुष. ९. काठीनें. १०. हरण होईल. ११. निस्तेज असा शकुनि. १२. भाला. १३. पिशाच. १४. निर्मल—पवित्र—ब्राह्मणास. १५. कृष्णकृपारूपी मुहूर्त. १६. जय प्राप्त झाल्यामुळें हास्याच्या अतिशयानें प्रफुल्लित व अधिक सुंदर झाले आहेत गाल ज्याचे त्या.

[१]ऋतसंधें सहदेवें शकुनिशिरःपद्म उडविलें भल्लें. ३८
पडतां शकुनिकळेवर कुरुबळ होउनि भयाकुळ गळालें,
सिंहें यूथप वधितां करियूथ तसें समस्त हि पळालें. ३९
धर्माद्यखिळ सुखविती सहदेवातें स्तवें बहु [*]समुचितें,
सुर जैसे शक्रातें वधितां सर्वासुराधम नमुचितें. ४०
शेष शकुनिबळ धांवे वेढुनि नकुळानुजासि माराया,
वाराया त्यासि करी प्रभु[२]सारथि विशिखवृष्टि बा राया ! ४१
सहदेवातें रक्षी, पार्थ करी भस्म शकुनिपृतनेतें;
आपण चि लया जातें कीं ज्वलनाला लयासि घृत नेतें? ४२
शकुनिबळक्षय होतां खवळे कलिसा चि [३]सज्जनद्वेषी,
हतशेष पत्तिहयगज जे होते ते समस्त हि प्रेषी. ४३
'पांचाळांतें मारा, पांडव [४]परमापदर्णवीं बुडवा.
धावा नरकुंजर हो ! [५]परबळनळवन समस्त ही तुडवा.' ४४
या आज्ञेतें वाहुनि माथां ते सर्व ही निघाले हो !
भीमार्जुनादिशस्त्रज्वलनांत पतंगसे रिघाले हो ! ४५
अत्यंत दुरभिमानें बुडउनि अक्षौहिणी तशा अकरा,
बा ! एकला तळावरि उरला नृप, वृकवनीं जसा बकरा. ४६
जाला क्षतविकळ, हय हि मेला, कोणी नसे रणसहाय,
[६]तत्कंटकितकळेवर पाहुनि म्हणता चि बा ! फणस 'हाय !'
मग [७]अपयान करावें ऐसें दुर्योधना नृपा सुचलें,
रुचलें मनासि, जरि अभिमान म्हणे [८]तत्पदां 'रहा, नुचलें.'
अंध म्हणे "या पुत्रव्यसनें पोटांत फार भडभडतें,
गडबडतें मन वेडें, माणुस 'मीं मीं' म्हणोनि बडबडतें ! ४९
पांडवबळ किति उरलें ? कर्म सुताला पुढें घडे काय?

---

१. सत्यप्रतिज्ञ अशा. २. अर्जुन. ३. दुर्योधन. ४. मोठ्या संकटसमुद्रात. ५. शत्रुसेनारूपी देवनळाचे वन. ६. त्याचा रोमांचित देह. ७. पलायन. ८. त्याच्या पावलास. * योग्य अशा.

वद, ऐकों दे, कोंदे शोकें जो शीघ्र तो पडे काय." ५०
सूत म्हणे:-बा ! उरले रथ दोन सहस्र, सप्तशत नाग,
पांच सहस्र हय, अयुत पत्ति; पुढें आयकावया लाग. ५१
तेथुनि पदाति[1] तो नृप डोहाचिकडे गदासहाय,[2] करी
तैसा, निघे बुडाया पावुनि परिभवगदास,[3] 'हाय !' करी. ५२
लागे स्मरुनि अनादृत[4] विदुरवचन मानसा खरखरा[5] हो !
हळहळुनि म्हणे, 'तुच्छा कां भसितसमा[6] न साखर खरा[7] हो?'
तों त्या सात्वतधृष्टद्युम्नांसीं भेटि उपरमीं[8] घडली,
दृष्टि मृगावरि हरिची, मजवरि[9] गुरुमृत्युची[10] तसी पडली. ५४
पार्षत हांसुनि वदला सात्यकिला, 'हा कशास हो ! धरिला?
मारावें चि, न द्यावें सुझें, अहिला तसें, अभय अरिला.' ५५
आलें मना, न केला सात्यकिच्या निमिष हीं विलंब करें,
खड्ग उपसिला, गमलों बा ! मीं देवीपुढें जसें बकरें ! ५६
तों व्यास गुरु स्वामी प्रकटुनि असुदान देववी राज्या !
वारी त्या सात्यकिला, वारूं शकते न देव वीरा ज्या. ५७
जें सामर्थ्य गुरुपदीं तें कैंचें पारिजातकीं अगमीं ?
जालों मुक्त, निघालों बा ! सत्वर नागपुरपथें[11] मग मीं. ५८
एका कोसावरि मज दुर्योधन भेटला गदापाणी,
आलें डोळ्याला बहु वर्षाकाळीं जसें नदा पाणी. ५९
दुर्योधनराज्याचा मज पाहुनि दीन बहु गळा दाटे;

१. पायीं चालणारा. २. गदा सहाय ज्यास. (गदा हातांत घेऊन). ३. पराभवरूप रोगास. ४. पूर्वी न स्वीकारिलेलें. ५. चटपट. ६. राखेसारखी. ७. गाढवास. ८. लढाई थांबल्यावर. ९. मज संजयावर. १०. धृष्टद्युम्नाची. ११. हस्तिनापुराच्या मार्गानें. (येथें पंतांच्या हातून 'नागपथपुरें' असे लिहिलें गेलें आहे ! परंतु मुकट्याऐवजीं 'मुटका' असें लिहिलें किंवा बोललें जाणे हा दोष जसा संभवतो, तसें च हें आहे असें म्हटलें पाहिजे ).

आटे कासार[1], तया[2] अवघड झषदर्शनें[3] तसें वाटे. ६०
सात्यकि मारित होता, व्यासें प्रकटोनि शीघ्र वांचविलें,
हें निजदुःख उपसिलें[4] म्यां जें होतें मनांत सांचविलें. ६१
भ्रात्यांची सैन्यांची गति पुसतां स्पष्ट म्यां असें कथिलें,
कृप कृतवर्मा गुरुसुत उरले, मग[5] सर्व शत्रुनीं मथिलें.' ६२
स्पर्शुनि करें मज म्हणे, " व्यासदयापात्र तूं न मरशील,
वरकड सकळ हि पडले या रणकाळानें[6] समरशील[7]. ६३
पांडव ससहाय रणीं मीं एकाकी क्षतार्त असहाय,
वांचेल कोण मादृश[8]? मज न म्हणों दे चि वीररस 'हाय !' ६४
राज्याला[9] सांग असें, सर्वसुहृद्बंधुपुत्रबळहीन
पुत्र क्षतार्त झाला, श्रमला, निजला ह्रदीं जसा मीन." ६५
इतुकें बोलुनि शिरला कुरुपति डोहांत कालियाहि[10] तसा,
तो ह्रद पोटांत स्थळ दे, व्यसनीं शरण आलिया हितसा[11]. ६६
मायेनें[12] करुनि जळस्तंभ नृप गृहीं तसा ह्रदीं राहे,
तों शोध करित आले कृप भोज द्रौणि भेटले बा ! हे. ६७
चुकला स्वनिधि पुसावा दैवज्ञवर्गासि जेंवि दीनाहीं,
त्याहीं पुसिला मजला 'आहे राजा सजीव कीं नाहीं ?' ६८
म्यां कथिलें, 'कुशली प्रभु आहे; सांगुनि असा निरोप मला,
श्रमला शिरला डोहीं त्या[13] गरुडत्रस्त नागसा[14] गमला.' ६९
ऐसें ऐकुनि रडला वत्सल आचार्यपुत्र बाळकसा,
" 'आपण असहाय' म्हणे, नेणुनि आम्हांसि भूमिपाळ कसा? ७०
शत्रूंसि तिघे आम्हीं आहों समरीं समर्थ माराया,
कां नहुषभीत हरिपरि[15] वरिला अज्ञातवास हा राया !?" ७१

१. सरोवर. २. त्या कासाराला. ३. माशास पाहून. ४. बाहेर काढिले. ५. बाकीचे. ६. युद्धरूप मृत्यूच्या मुखात. ७. युद्धशील. ८. माझ्यासारखा. ९. धृतराष्ट्रास. १०. कालिया नावाचा सर्प. ११. मित्रासारखा. १२. जलस्तंभनविद्येने. १३. त्या डोहीं असें म्हणोनि दाखविला—**पंत.** १४. कालियासारखा. १५. इंद्राप्रमाणें.

चिरकाळ करित होते ते स्नेहेंकरुनि बहु विळाप तिथे,
कीं, रडुनि दडुनि डोहीं तस्करसा दीनता इलापति[1] घे. ७२
त्यावरि पांडुसुतांतें दूरुनि पाहुनि भयें गळाले हो!
वाहुनि मला कृपरथीं सत्वर शिबिराकडे पळाले हो! ७३
पाहुनि शिबिरांत रथत्रय, तवसुतसंक्षय श्रवण करुनीं,
जन लागले पळाया सूर्यास्तीं भीमपार्थभय धरुनीं. ७४
राजस्त्रीतद्रक्षकसचिवजनाचा न ताप तो कथवे;
नगराकडे पळाले लोकांचे बहुभयें सशोक थवे. ७५
न निरखिल्या ज्योत्स्नाशा[2] शुद्धा रविनें हि राजदारा ज्या,
त्या पाहिल्या प्रसिद्ध[3] प्राकृतलोकें[4] पथांत बा राज्या! ७६
त्या व्यसनीं कृष्णातें धर्मातें प्रार्थुनीं युयुत्सु[5] कवी
चुकवी उपद्रव पथीं, माळाकार[6] न जसीं फुलें सुकवी. ७७
सांभाळुनि सर्वांतें आला घेउनि पुरांत, तों वाटे
पाहुनि विदुरासि गळा बहुत गहिवरें युयुत्सुचा दाटे. ७८
विदुर पुसे, 'प्रभुवांचुनि[7] वत्सा! जालें कसें तुजें येणें?
येणें अवघड वाटे, बा! यूथप[8] सोडिला कसा एणें[9]?' ७९
वैश्यापुत्र म्हणे, 'बा! शल्य शकुनि मरण पावले सबळ,
कोणी उरला नाहीं जीवंत सहाय नृपतिच्याजवळ. ८०
बा! नित्य पावले ज्यापासुनि पूजा सुयोध नवि, पत्ती[10]
प्राङ्मुख[11] पळोनि गेला, वदवेना ती सुयोधनविपत्ती. ८१
हें वर्तमान ऐकुनि शिबिरापासुनि ससाध्वस सशोक
सर्वस्वत्याग करुनि सकळ पळाया चि लागले लोक. ८२
कृष्णातें धर्मातें आज्ञा मागोनि, राजभार्यांतें,

१. पृथ्वीपति दुर्योधन. २. चंद्रिकेसारख्या. ३. प्रसिद्धपणे. ४. सामान्य लोकांनीं. ५. पाडवपक्षीय धृतराष्ट्रपुत्र. ६. माळी. ७. धर्मराजावांचून. ८. कळपांतील मुख्य हरीण. ९. मृग–**पंत.** १०. पायीं. ११. पूर्वाभिमुख.

रक्षुनि घेउनि आलों, कीं, लागावा न दोष आर्यांतें.[1]' ८३
विदुर म्हणे, 'उरलासि प्रलयीं, यावरुनि पुण्य अंधानें
वाटे कांहीं केलें; वधिले कीं शत हि सत्यसंधानें![2] ८४
बा! वांचलासि भाग्यें वत्सा! तूं अंधयष्टि,[3] जा गेहा:
किति सांगों? कामादिस्तेनवनीं[4] तव पिता न जागे हा[5]. ८५
मारविले भूदुर्गप्रीत्यर्थ स्वसुत टोणगे हातें,
अत्यविवेकी[6] हा बा! लावील ज्वलन कोण गेहातें? ८६
धर्माकडे उद्यां जा, आजि सुहृत्कामना[7] पुरीव, रहा:
जातों मीं राजगृहीं, बुडतो शोकांत कीं पुरीवर हा.[8]' ८७
विदुराज्ञेनें गेला: करिल कसा तो प्रियंवद[9] नकारा?
शोकें शुचि सुखद रुचिर परि होय युयुत्सुला सदन कारा.[10] ८८
श्रीमद्रामपदीं हें[11] तुलसीदळ वाहिलें सुरस, मोर
जाले प्रेमें, ज्याच्या,[12] ब्रह्मादि समस्त ही सुर, समोर.[12] ८९

इति श्रीमदार्याभिरचिते भारते श्रीरामनंदनमयूरेश्वरकृतौ
शल्यपर्व समाप्तम ॥ श्रीमद्रामचंद्रचरणार्पितमस्तु ॥

१. श्रेष्ठास–तुम्हांस. २. सत्यप्रतिज्ञ भीमानें. ३. अंधाची (धृतराष्ट्राची) काठी ४. कामादि (षड्रिपुरूपी) चोराच्या वनांत. ५. धृतराष्ट्र. ६. अतिशय अविचारी ७. इष्टमित्रांची इच्छा. ८. हस्तिनापुराधिपति धृतराष्ट्र. ९. गोड बोलणारा. १०. तुरुंग. ११. शल्यपर्वरूप. १२. ज्याच्यासमोर.

(शल्यपर्वांतर्गत)

# गदापर्व.

## अध्याय पहिला.

वारणपुरपाळ म्हणे, 'सांग पुढें संजया! कसें झालें?
चवघां अवशिष्टांच्या हृदयीं कर्तव्य कोणतें आलें?' १
संजय म्हणेः–नृपाळा! शिबिरस्थ जनासि पळ भयें सुटला,
फुटला तडाग वाटे, धैर सर्वांचा हि जेधवां तुटला. २
गेले त्या द्वैपायननामा डोहाकडे तिघे योध,
पांडव करीत होते कुरुराज्याचा चहूंकडे शोध. ३
ते गुरुपुत्रादि म्हणति, 'ऊठ त्यागुनि सुयोधना! डोहा,
धर्मासीं युद्ध करीं, होवूत परासु योध, नाडो हा. ४
आहों सहाय आम्हीं कृप, भोज, द्रौणि हे तिघे राया!
आहेत संग्रहीं बहु या पांडुसुतांसि होति घेराया. ५
उरलें क्षतार्त थोडें परबळ, साहेल तव न वेगातें,
घेत चि आलें तटिनीतटसें आघात नवनवे गा! तें. ६
कासारीं मकर न हो; कुरुपद घे करुनि शत्रुकदना कीं
अभिमुख मरोनि समरीं साधावें दिव्यभोगपद नाकीं.' ७
भूप म्हणे, 'उरलां या कल्पांतीं वीर हो! बरें झालें,

१. पंतांनीं मूळभारतांत शल्यपर्वांतर्गत असलेलें गदापर्व स्वतंत्र करून व त्याला 'मौसिक' आणि 'ऐषीक' या जोडपर्वांची जोड देऊन **आर्याभारता**चें दहावें पर्व केलें आहे. २. हस्तिनापुराधीश धृतराष्ट्र. ३. अश्वत्थामा, कृपाचार्य, कृतवर्मा व दुर्योधन या. ४. सरोवर. ५. धीर. ६. नाडला जावो. ७. धर्म. ८. शस्त्रें. ९. नदीतीरामारखें.

आलें मनासि, कर्णद्वय तुमच्या हितवचोमृतें धालें. ८
आजि विसांवा घेवूं, श्रम शमल्यावरि सुखें उद्यां झगडूं,
सर्व परांसि चतुर्भुजभुजसे[1] आम्ही तुम्ही रणीं रगडूं.' ९
द्रौणि म्हणे, 'ऊठ नृपा! शपथ करुनि सत्य तुजपुढें कथितों,
मीं सर्व सोमकांतें[2] आजि निशा[*] हे न लोटतां मथितों. १०
सोमकमांसें पुष्कळ गृध्रशिवावायसांसि वाढीन,
तेव्हां चि कौरवेंद्रा! हें आंगांतील कवच काढीन.' ११
जें भाषण पावाया केलें व्यसनाब्धिपार धीरांनीं,
तें ऐकति भीमाचे आले जे भ्रमुनि पारधी रानीं. १२
होते[3] मांसभरपरिश्रांत परि व्याध न पळ ही ठेले,
ते तूर्ण पारितोषिक[4]धनलोभें पांडवांकडे गेले. १३
साधुसि हि सुखविति कथुनि परघाताची कथा पिशुन[5] कांहीं,
सुचवुनि तस्कर द्यावी तुष्टि न द्यावी तथापि शुनकांहीं[6]. १४
प्रिय परिसुनि भीम भुले, न गणी पात्रादिनीतिपथ[7] कांहीं:
व्याधांनीं मेळविलें, न तसें सुतसोमजन्मकथकांहीं[8]. १५
आले गर्जत धांवत ते पांडव त्या ह्रदाकडे तूर्ण,
वदले पांचाळ, 'मनोरथ होतो आजि अनरिचा[9] पूर्ण.' १६
परिसुनि परबळकलकल पुसुनि निघाले कृपादि कुरुपतितें,
केलें अकीर्तिभाजन[10] ज्या मित्रसुहृत्सनाभिगुरु[11] पतितें. १७
जावुनि दूर उतरले वटमूळीं ते हयांसि सोडून,

१. विष्णूच्या चार बाहूंसारखे. २. पांचालांस. ३. मांसाच्या ओझ्यानें थकलेले. ४. बक्षीस. ५. चहाडखोर. ६. कुत्र्यांनीं [ नेहमीं भुंकून ] तुष्टि न द्यावी; तथापि तस्कर सुचवुनि द्यावी. ( चोर आला आहे अशा वेळचें च कुत्र्याचें भुंकणें मनुष्याला आवडतें, असा भाव ). ७. सत्पात्रीं दान करण्याविषयींचा नीतिमार्ग. ८. सुतसोमाच्या ( भीमद्रौपदीपुत्राच्या ) जन्माची वार्ता सांगणारांनीं. ९. अजातरिपु धर्माचा. १०. अपकीर्तीस पात्र. ११. मित्र, जिवलग स्नेही, ज्ञाति व वडील. * रात्र.

चिंता करीत बसले खळसंगतिनें अकीर्ति जोडून. १८
कृष्णपुरःसर पांडव आले हाकीत हय कडक डोहा,
धिक्कारिति किति कीं, 'यो बाहिर सोडूनि भय, कडकडो हा.'
धर्म म्हणे, 'श्रीकृष्णा! होता सुखभोग कालि याला जो,
तो कैंचा आजि? अहा! या कालिय हा हि कालिया लाजो.' २०
कृष्ण म्हणे, 'न अशाची माया तुज भरतसत्तमा! यावी.
मायेनें चि वधावा, जो खळ ऐश्वर्यमत्त मायावी.' २१
धर्म म्हणे, 'गांधारे! धर्मपरित्यागकर्म न घडो हें,
तातस्नेह तैसें द्यावें तुजला न अयश अघ डोहें. २२
निजलासि काय सर्व क्षत्र स्वकुळ हि रणांत मारवुनी?
जीवित असें कसें तुज रुचलें सर्व स्वकीर्ति हारवुनी? २३
होता भजत सदा ग्रह मसणा की वारुळा जसा सर्प,
कोठें सोडुनि गेला तुजला तो मान आणि तो दर्प? २४
मागें वरुण पुढें हरि, उजवा यम आणि यो धनद डावा,
किंबहुना क्षोभो जग, मानधनकुलीनयोध न दडावा. २५
उठ रे, सुयोधना! ये बाहिर, कर संगरासि उत्साहें;
लपणें, पळणें न भलें, लोकांत तुझी करील कुत्सा हें. २६
मारुनि आम्हांसि रणीं जोडुनि जय तूं चि आजि हो राजा,
की दिव्यवीरलोकाप्रति साधुनि शीघ्र आजिहोरां जा.' २७

१. कृष्ण आहे पुढारी ज्याचा असे पांडव. २. तापट. ३. खवळो. ४. काल. ५. स्वकुळनाशकत्व-**पंत.** ६. भगवत्प्रसादपात्रत्व-**पंत.** गरुडाच्या भीतीने कालिया नाग यमुनाडोहात दडून राहिला होता, त्यामुळे त्याच्या विषाने यमुनाजळ कलुषित होऊन जीवाना पीडा होऊ लागली. तेव्हा श्रीकृष्णाने डोहात उडी घेतली व त्याचा प्रतिकार करून तो त्याच्या मस्तकी उभा राहिला. भगवताची पावले मस्तकावर उमटल्यामुळे कालिया निर्भय झाला व कृष्णाच्या आज्ञेप्रमाणे त्याने तो डोह सोडला. ७. क्षात्रधर्म. ८. पिशाच. ९. इंद्र. १०. युद्धरूपी सुमुहूर्त.

कुरुराज म्हणे, 'धर्मा ! प्राणिमनीं भय शिरे न हें चित्र,
तेजस्वी हि व्यसना सांपडतो जेंवि राहुला मित्र. २८
भ्यालों नाहीं कांहीं क्षतविग्रह[1] विरथ केवळ श्रमलों,
विश्रामाकरितां मीं डोहीं शिरलों असें, नसें भ्रमलों. २९
होतों स्वस्थ विसावा घेउनि मीं, स्वस्थ तूं हि हो पहिला;
युद्ध करींन, तुम्हांला मथुनि भयें कांपवीन या महिला.' ३०
धर्म म्हणे, 'आश्वस्त[2] चि आहों आम्हीं समस्त ही योध,
करितों चिरकाळ तुझा युद्ध कराया सुयोधना! शोध. ३१
निजलासि काय डोहीं? पहुडाया रम्यमंचकीं आधीं
मारुनि रणांत आम्हां सर्वांतें प्राज्यें[3] राज्यपद साधीं. ३२
वधितील पांडुनंदन तुजला युद्धाध्वरांत[4] अथवा हे,
रथवाहेभसमागम[5] आहे, जा धडक, नाकपथ वाहे.' ३३
कुरुराज म्हणे, "धर्मा ! ज्यांकरितां प्राज्य राज्य जोडावें,
ते बंधु मारिले त्वां; आतां म्यां कां न शस्त्र सोडावें ? ३४
मेले क्षत्रियपुंगव[6], ज्यांस्तव सौभाग्य नैकविध[7] वाहे[8],
भोगूं काय इला मीं क्षीणाखिलरत्नकांति विधवा हे ? ३५
मधुपें नीरजसें म्यां त्यजिलें हृतसर्वसार[10] हें पद तों,
केवळ युद्धोत्साहें जिंकीन तुम्हांसि मीं असें वदतों. ३६
भीष्म गुरु वृष हि मेला, भ्यावा ज्या वीरनायका यम ही,
नसतां सहाय हे, मजकरवीं म्हणविल न 'हाय!' काय मही?
जातों तपोवनातें, जोडीन करूनि सुतप सन्महिम्या,
आतां नलगे चि मला, घे तूं चि, दिली तुला चि मन्महि[11] म्या." ३८

१. जखमांनीं युक्त आहे देह ज्याचा. २. स्वस्थ. ३. मोठें. ४. युद्धयज्ञांत. ५ रथ घोडे व हत्ती यावरून युद्ध करणाऱ्यांची सोबत. ६. क्षत्रियश्रेष्ठ. ७. नानाप्रकारचें. ८. [ पृथ्वी ] वाहते, धारण करिते. ९. पृथ्वी. १०. हरण केला आहे सर्व सारभाग—मध—( पक्षीं ) सारभूत अंश ज्यांतील अशा. ११. माझी (!) पृथ्वी.

धर्म म्हणे, "देसी परि न च घ्यावी, हित दिसो[1] असीम हि म्यां;
उत्क्रांतिधेनुसी[2] बहु मिळविल घेतां मही असी महिम्या? ३९
देसी कसा अनीश्वर[3] तूं? हा धर्म हि कसा अविप्र[4] भजो?
घेइल भूदान कसें तो, क्षत्रिय जाणता अविप्रभ[5] जो.? ४०
कुलकल्याणाकरितां कृष्णप्रभु शंभुसम हि मागाया
आला, तेव्हां न दिली, केला सुकवींस न महिमा गाया. ४१
अतितीक्ष्णें सूच्यग्रें भेदे तितुकी हि मेदिनी भारी;
वेड्या सुयोधना! तूं आतां देतोसि ती कसी सारी? ४२
द्यावी न मला अरिला त्वां सूच्यग्रीं हि लागली मृत्स्ना[8],
देतोसि कसा मूढा! मेल्यावांचूनि मेदिनी कृत्स्ना[9]? ४३
न च वांचसील आतां आम्हां अर्पूनियां हि अवनीतें[10],
तुज साधुबाधकाला साधेल कधीं हि सुतप न वनीं तें. ४४
जें जीवन मरण तुजें हें आजि मदीयमानसाधीन[11];
संपादीन तुज वधुनि निजराज्य, न दीयमान[12] साधीन. ४५
वांचवितों, परि योग्य न तूं; देतों अभयदान अनघातें[13].
प्रायश्चित्त तुज वध चि; कीं, बहु मळलासि साधुजनघातें. ४६
चारुनि गरळ बुडविलें बांधुनि डोहांत, डसविले साप,
दहनप्रयत्न केला, धन हरिलें, दुर्वचें दिला ताप. ४७
केलें कृष्णाकर्षण[14], सुतशोकाब्धींत बुडविला बाप[15],
हें देहान्तप्रायश्चित्ताविण वारतें कसें पाप? ४८
बसला[16] वृषभ कधीं ही आपण न म्हणे चि जेंवि 'मूठ[17] कसा[18],'

१. मर्यादारहित; अत्यंत. २. मरणकाळीं दान दिलेल्या गायीसारखा. ३. धनी नसलेला. ४. ब्राह्मण नसलेला क्षत्रिय. ५. मयासारखा तेजस्वी-पराक्रमी. ६. सुईच्या टोकानें. ७. जास्त. ८. माती. ९. सर्व. १०. पृथ्वीस. ११. माझ्या मर्जीवर अवलंबून असलेलें. १२. दिलें जाणारें. १३. निष्पापास. १४. द्रौपदीचें आकर्षण-सभेंत ओढणें. १५. अर्जुन. १६. [ थकून ] बसलेला. १७. बैलाच्या पाठीवर टाकण्याची मठ. १८. बांधा.

तैसा सुयोधना! तूं आतां होवूं नको चि, ऊठ कसा." ४९
धृतराष्ट्र म्हणे, "कैसा झाला संतर्ज्यमान मत्तनय,
न च गणिला अरिजनसा जेणें होवूनि मानमत्त नय? ५०
प्रकृतिक्रोधन, मानी, तेजस्वी राजराज कीं सुत तो,
विषकंटकसा तर्जनशब्द कुलजमानधनमनीं रुततो. ५१
वंदुनि बद्धकर म्हणत होते 'जी! जी!' समस्त ही यवन,
ज्याचा दृक्पात परमदुःसह अहिता, घना जसा पवन. ५२
जैसें करीस हरिनीं, अरिनीं कीं वेढिलें सुता गानीं,
किंवा चंदनतरुला तुकडे पाडावया सुतारानीं. ५३
वद संजया! कटुवच्च श्रवण करुनि पुत्र बोलिला काय,
ज्याचा शत्रुजनाच्या शस्त्रांहीं सर्व सोलिला काय?" ५४
संजय म्हणेः–तळमळे, सोडी बहु दीर्घ उष्ण निश्वासः
त्या तर्जनोक्ति राज्या! जेंवि कशा लागल्या सदश्वास. ५५
मग त्या डोहांतुनि तो कुरुराज म्हणे, 'युधिष्ठिरा! परिसः
अरिसमुदायास न मीं भ्यालों, बाहन संगरीं अरिस. ५६
परि विरथ एकला मी, बहु सरथ सशस्त्र अरि तुम्हीं क्रुद्ध,
युद्ध करावें बहुनीं एकासीं धर्म हा नव्हे शुद्ध. ५७
मजसीं युद्ध करावें एकेंएकें चि सन्मतें धर्मे,
कीं मी असहाय क्षतविकळ, रहित आयुधें रथें वर्मे. ५८
धर्मे कराल रण तरि ऐसा ही मीं तुम्हां न आटेन,
लोपाल सर्व तेजें, परनक्षत्रांत तपन वाटेन. ५९
धर्मन्यायें करिसिल रण तरि तुज सानुजासि मारीन,
जे जे मदर्थ मेले त्यां त्यांचें ऋण अशेष वारीन.' ६०

१. निर्भत्सना केलेला. २. स्वभावतः रागीट. ३. सार्वभौम. ४. निर्भर्त्सनेचा शब्द. ५. हात जोडलले. ६. दुर्योधनास. ७. चाबूक. ८. चांगल्या घोड्यास. ९. सुदर्शनास–पंत. १०. युद्धधर्माने. ११. शत्रुरूप नक्षत्रांत. १२. सूर्य.

धर्म म्हणे, 'बा! जाणसि तूं हि बरा क्षत्रधर्म हा राया!
जालासि बरा योद्धा आम्हां सर्वांसि सिद्ध माराया. ६१
एकासीं च रण करीं, घे जें मानेल आयुध रणीं तें,
सोडाया योग्य नव्हे मानधन असोनि आयु धरणीतें. ६२
युद्ध करिल तुज संमत तो चि, प्रेक्षक समस्त वरचील[1],
धरिसिल सत्व[2] तरि अरि हि परिपालित[3]कविसम स्तव रचील.
घे हा हि कामवर[4], जरि हि पांचांचा ही घडेल न वध रणीं:
राया सुयोधना! हे हो एकाच्या वधें चि तव धरणी. ६४
कुरुराज म्हणे, 'आहे बळभद्रें शिकविली मज गदा[5] ती.
मजसीं युद्ध कराया यावा योद्धा गदाधर पदाती. ६५
झालीं रथगजयुद्धें, हो अद्भुत राहिलें गदायुद्ध.
यश जोडीन गदेनें मथुनि समस्तांसि आजि मी शुद्ध. ६६
धर्म म्हणे, "गांधारे! मजसीं च गदा धरून ये भीड.
मरसील सत्य कथितो: कीं, व्यवहारीं धरूं नये भीड. ६७
होइल पवि धरुनि करीं आजि तुज जरि स्वयें हरि सहाय,
पावुनि अयश म्हणेल चि तो केवळ दुर्बळापरिस 'हाय!'" ६८
हें वचन न साहे, मग आला घेउनि गदेसि बाहेर.
वाहे रक्त, गमे तें धृतिचें कुरुराजदेह माहेर. ६९
निर्भय परमभयंकर गमला तो दंडपाणि अंतकसा.
वाटे करितिल याचा पांडवपांचाळवीर अंत कसा? ७०
कुरुपतिच्या अवलोकुनि दुःसहसंकटदशेंत[6] आस्यातें,
करिते झाले राया! पांडवपांचाळयोध हास्यातें. ७१
कोपुनि त्यांसि म्हणे, 'रे! घ्या फळ आतां चि मदुपहासाचें,
धर्मा! तुझ्या परिचयें शिकला साधुत्व यदुप[7] हा साचें. ७२

१. वरकड, बाकीचे. २. धैर्य-पराक्रम-दार्ढ्यविशाल. ३. आश्रय देऊन ठेविलेल्या कविप्रमाणें. ४. इच्छित वर. ५. ती गदायुद्धविद्या. ६. मुखास. ७. श्रीकृष्ण.

युद्ध करावें मजसीं एकें एकें युधिष्ठिरा! परिसीं,
न भिडावें बहुतानीं व्यसनीं गांठूनि एकल्या अरिसीं.' ७३
धर्म म्हणे, 'गांधारे! अत्यंत क्षत्रधर्म हा क्रूर;
मारिति एकातें ही करुनि व्याकुळ रणीं महाशूर. ७४
ऐसी ही धर्मांची[1] नसती जरि भूमिपाळका! सरणी[2],
कां बहुवीरांकरवीं तूं मारवितासि बाळकास[3] रणीं? ७५
बहुतांहीं न वधावा एक, असा धर्म, तरि कसा सद्रे[4]!
तो एक अनेकांहीं वधिला सौभद्र तव मतें वद रे!? ७६
सर्व हि नीच प्राणीं[5] धर्मातें संकटीं बरें पाहे,
वाहे अनयस्रोतें[6] भलतेचिकडे सुखीं, असें आहे. ७७
टोप कवच घाल, बरे बांध विखुरले सुयोधना! केश,
घे जें व्हावें तें तूं, सत्त्वें होतो सुयोध नाकेश[7]. ७८
देतों हा काम[8] पुन्हा एक तुला, जेंवि अग्निला आज्य,
आम्हां पांचांमध्यें वधिसिल एकासि तरि तुजें राज्य. ७९
जीवनदानावांचुनि काय तुजें प्रिय करूं कळिव राया!
स्वपरक्षयार्थ आम्हां त्वां चि बळें गोविलें कलि[9]वरा या.' ८०
कनकशिरस्त्राणकवच[10] धरुनि रणोत्साह तेज बहु ल्याला,
नृप शोभला अधिष्ठुनि रणरंगा, सुवर[11] जेंवि बहुल्याला[12]. ८१
होउनि सिद्ध नृप म्हणे, 'पांचांतुनि एकजण गदी भलता[13]
यावा, न च ठेवावा तो हेत, असेल जो मनीं सलता[14]. ८२
माजी करील धर्मन्यायें तों सर्वशत्रुहानि गदा;
चातक जेंवि घनकणा[15], जपला गुरुच्या[16] तसा चि हा निगदा[17].

१. युद्धधर्मांची. २. पद्धति. ३. अभिमन्यस. ४. सज्जनशत्रो दुर्योधना! ५. प्राण संकटीं. ६. अनीतीच्या ओघानें. ७. स्वर्गाधिपति. ८. वर. ९. कलह. १०. सोन्याचा टोप व चिलखत. ११. चांगला नवरा मुलगा. १२. बोहल्यावर [ चढून ]. १३. वाटेल तो. १४. सलणारा. १५. मेघोदकास. १६. बळरामाच्या. १७. वचनास.

करितां वैरान्त उपक्रमुनि[1] स्वजयावहा गदासमरा,
सर्व तुम्हीं बळें[2] द्याया कुंतीहृद्रुङ्[3]महागदास मरा.' ८४
श्रीकृष्ण म्हणे, "धर्मा! काय म्हणावें तुला अगा बापा!?
'एकवधें राज्य तुझें' वदलासि असें कसें अशा पापा? ८५
स्पष्ट गदायुद्धें बळ याचें कोणा हि नावरायाचें.
बा! 'धर्मराज' ऐसें पडलें न उगें चि नाव रायाचें! ८६
तुज कीं विजया, नकुळा, सहदेवा हा गदारणीं वरिता,
हरिता तेज पळांत चि, वीर कवण धीर यापुढें धरिता? ८७
नित्य गदाभ्यास करित आला वर्षें समग्र हा तेरा,
या शत्रुपुढें भीमावांचूनि धरील कोण हातेरा? ८८
मारुति[5] हि गदायुद्धीं न बहुकृतश्रम[6] जसा सुयोधन गा!
वासव जेंवि अशनिनें, स्वगदेनें चुरिल हा सुयोध नगा. ८९
आरंभिलें पुन्हां हें त्वां जेंवि द्यूत विषम राया! तें,
दाटुनि वांटुनि घाटुनि चाटुनि पीतोसि विष मरायातें. ९०
भीम बळी च, सुयोधन राजा आहे बळी कृती हि महाः
कांपविल प्रबळास हि; होय गदासमर पौष बा! हिम हा. ९१
'अधिक बळीहूनि कृती' म्हणति असें सर्व सुज्ञ तुजसम जे,
बापा अजातशत्रो! स्वार्थ परार्थापुढें न तुज समजे. ९२
पोढुनि अहि कुशळाच्या त्वां, मानुनि गरिब, लाविला वाटे,
कीं आपणासि खाया मुक्त करुनि हरि बलाविला वाटे. ९३
ज्यांहीं[11] 'अरिवरि हि दया करिजे' हें वचन घातलें कानीं,
केला त्यांहीं च नृपा! धृतराष्ट्राच्या न घात लेकानीं. ९४

---

१. आरंभून. २. जोर. ३. कुंतीच्या [पुत्रविषयक] मोठ्या हृद्रोगास. ४. तुजे-**पंत.**
५. भीम. ६. [गदायुद्ध शिकण्यासाठीं] बहुत केले आहेत श्रम ज्यानें असा.
७. कुशल, पटाईत. ८. पौषमहिन्यांतील थंडीसारखा. ९. सुखरूपतेच्या मार्गास लाविला. (जीवंत सोडला). १०. पिंजऱ्यांतून. ११. ज्या कोणी.

हित शत्रुचें करावें, संकट आम्हां श्रितांसि[1] ओपावें[2]?
कोपावें न, विभो! या बंधुजनास प्रसन्न हो. पावें. ९५
सकळ रिपु वधुनि एकाकरवीं बा! तूं चि राज्य हारविता,
नक्षत्रत्व समस्तां देइल आतां, धरील हा रविता. ९६
बहुधा हे पांडुपृथासंतति अधिराज्य[3]भागिनी नोहे,
वनवासभैक्ष्ययोग्या; तरि च कळत कळत हितपथीं मोहे." ९७
भीम म्हणे, 'श्रीकृष्णा! हृदयांत धरूं नको विषादास,
हा किति? मत्क्रोध करिल, जिंकुनि हालाहला विषा, दास.
माजी सुयोधनगदेपरिस दिढीनें गदा अधिक आहे,
बा! हे साक्षात्प्रलयक्षुब्धमहोरग[4]विषाग्निची आ[5]हे. ९९
माजे दिग्गज[6]करमदहर मांसल[7] दीर्घ हे पहा भुज गा!
चुरितिल सुखें चि वज्रा इक्षुसम, पटोळ[8]सम महाभुजगा. १००
व्हा प्रेक्षक सर्व, जयश्री वरिल मज गदासहायास;
अवळ त्रिलोक[9]सिकतासेतु वृकोदरनदा सहायास.' १०१
ऐसें युद्धोत्साहें गर्जे, हांसे, पिटी भुज गदीनें[10],
बा! ज्यापुढें बकादिक, जैसे गरुडापुढें भुजग दीन. १०२
होउनि हृष्ट हरि म्हणे, 'बा! दृष्टि तुज्या भुजा न लागावी,
सत्कविनीं कीर्ति तुजी भीमा! खळवनदवानला[11]! गावी. १०३
त्वां वधिला नागायुत[12]बळ दुष्ट हिडिंब, तद्द्विगुण बक रे!
किर्मीर तच्चतुर्गुण, खळ सकळ हि तुज, वृका जसे बकरे. १०४
मणिभद्रप्रमुख तुवां वधिले बहु यक्ष राक्षस क्रूर,
शूर विलोकुनि तुजला समरीं गेले पळोनि बहु दूर. १०५
तो हि तुवां वधिला, जो खळगणनीं प्रथम कीचक लिहावा;

१. आमच्यासारख्या आश्रितांना. २. द्यावें. ३. सार्वभौम राज्य भोगणारी. ४. शेष. ५. ज्वाला. ६. दिग्गजांच्या सोंडेचा गर्व हरणारे. ७. पुष्ट. ८. पडवळा-सारखे. ९. त्रैलोक्यरूप वाळूचा बधारा. १०. गदाधरश्रेष्ठ (भीम). ११. दुष्टरूप अरण्याच्या वणव्या! १२. दहा हजार हत्तींचें बळ असलेला.

अंधज अंधक हर हो, तूं पुण्यश्लोक नीच कलि हा वा.' १०६
धर्म म्हणे, 'अरिच्या हा करिल चि यदुनंदना! गदी नाशा;
कीं, सफळा करितो तवचरणाश्रय नंदनाग दीनाशा. १०७
मारिल तुज्या चि तेजें भीम गदेनें सुयोधना सत्य,
बहु मन्मनोव्यथांला वा! झाला हा सुयोध नासत्य. १०८
भुजग करुनि गरुडाचें अप्रिय सुखरूप सुचिर राहेल;
परि भीमाचें विप्रिय करिता कोणी हि शिवं न पाहेल.' १०९
सात्यकि म्हणे, 'प्रभो! हा भीम गदासंगरीं असामान्य,
लोकत्रयीं नसेल चि रामावांचुनि गदी असा मान्य. ११०
चुरिल नगांसि गदेनें, तेथें या शत्रुची कथा काय?
न गणील चि भीमाचा शतवज्राघातजव्यथा काय. १११
हय रथ गज हि उडविले कंदुकसे आमुच्यासमक्ष महा,
न गदी जगदीशा! यासम कोणी, ईश्वरासम क्षम हा.' ११२
त्या मारुतिचें बहुनीं केलें याचें हि तेंवि वर्णन हो!
की त्रासें कारुण्यें कृतपण भीमास्य तें विवर्ण न हो. ११३
देती बहु तेज स्तव, सद्धेयें योजिले जसे काढे;
पर्वीं पाथोधि जळें, भीम स्तवनीं बळें तसा वाढे. ११४
प्रभुसि म्हणे तो, 'वमतों चिरकाळ क्रोधगरळ सांचविलें,
धर्माच्या संकोचें आजिवरि महाखळासि वांचविलें. ११५
धर्माच्या हृदयांतिल काढितसें मीं समूळ कांटा हो!

१. दुर्योधन हा अंधकासुर आणि तूं शिव हो. २. नलराजा. ३. तवचरणाश्रय कीं नंदनाग (कल्पवृक्ष) दीनाशा सफळ करितो. ४. अश्विनीकुमार. ५. चिरकाल. ६. कल्याण. ७. बळरामावाचून. ८. आंजनेय मारुतीला त्याच्या पराक्रमाचे स्मरण करून द्यावे लागे, असे वर्णन आहे. ९. कृपेने न वधिता ही प्रतिज्ञाभंग मुख मळेल–**पंत.** १०. [दुर्योधनास मारण्याचा] केला आहे पण ज्याने. ११. भीमाचे मुख. १२. निस्तेज. १३. प्रशंसा बहु तेज देतात. १४. पौर्णिमा किंवा अमावास्या या दिवशीं. १५. समुद्र.

भक्तमयूराचा तूं करुणाब्द अव्हेरिसील कां टाहो ?' १९६
देव म्हणे, 'बा ! विजयश्रीच्या घे, करुनि आजि, हारा, जा,
वज्रें हरिसा केला त्वां हतरिपु धन्य आजि हा [1]राजा. १९७
गांधारवीर, मागध, कालिंग, प्राच्य भूप बुडविले;
तुडवीले बहु हय रथ, कंदुकसे त्वां महेभ उडवीले. १९८
मानित होते स्वाधिक अचळत्वें न शिखरीप्रति [2]ज्ञाती,
मथुनि तसे केली हरि[3]दुःसाध्या काशि खरी प्रतिज्ञा ती ? १९९
अरि मुख्य एक उरला याचा ही [4]ऊरुभंग करिशील,
हरिशील [5]पदोपद्रव, बा ! तूं [6]हरिशील शत्रु करिशील. १२०
आहे कृती सुयोधन, यासीं यत्नेंकरूनि युद्ध करीं;
आलें चि तुज्या हें यश [7]दुग्धोदधिफेनपुंजशुद्ध करीं. १२१
धर्मासि धरा साधुनि द्यावी त्वां, करुनि यश निज गदीशें,
जासि इंद्रासि [8]उपेंद्रें दिधली लाजवुनि [9]अशनि जगदीशें.' १२२
प्रभुनें प्रमुदित केला भीम म्हणे अग्रजासि, 'बा राया !
द्यावी आज्ञा मज हा निजसर्वस्वहर चोर माराया. १२३
संकोचली खळहृता राज्यश्री फार, तीस [10]पालवितों,
घालवितों हार गळां, [11]शासन पहिलें तसें चि चालवितों.' १२४
ऐसें बोलोनि गदा घेउनियां भीम तो अरिस बाहे;
धृति धरुनि शंभराव्या सुतमरणाची कथा परिस बा ! हे. १२५
भीमावरि दुर्योधन आला पाचारितां चि उत्साहें,
वरकड सर्व असो बा ! लेश हि साहे न शौर्य कुत्सा हें. १२६

१. धर्म. २. भाऊबंद, कौरव. ३. इंद्राला हि साधण्यास कठिण. ४. मांडीचा भंग. ५. राज्यपदोपद्रव—**पंत.** ६. सिंहासारखा स्वभाव आहे ज्याचा. ७. क्षीरसमुद्राच्या फेनसमूहासारखें स्वच्छ. ८. वामनानें. ( येथें बलिकृत अश्वमेधाची कथा अनुसंधेय आहे). ९. आपल्या मदतीवांचून इंद्राला धरा मिळाली म्हणून वज्राला लाज वाटणार. १०. बोलावितों. ११. आज्ञा. ( राजकर्म ).

# अध्याय दुसरा.

भीम म्हणे, " रे अधमा! केलें त्वां आणि जें तुज्या तातें,
चित्तांत आठवावें पदरीं फळ घ्यावया कुजाता[1]! तें. १
विष चारिलें बुडविलें डोहांत, करावयासि, वध मातें;
स्मर वारणावतींचें[2] जतुसद्मच्छद्मकर्म[3] अधमा! तें. २
कपटद्यूतें हरिलें सर्वस्व पुढें करून कितवातें[4],
नेली सभेंत साध्वी, व्हावें शिवतां जिला चकित[5] वातें. ३
त्वां नागवी करविली सुगुणांची प्रीतिहेतु[6] जी वसती[7],
छळिली परोपरि खळा! अस्मत्सर्वस्वकीर्ति जीव सती. ४
ऐसीं अनेक पापें केलीं त्वां भरतकुळकळंका रे!
तूं जेंवि दुर्गुणाहीं, न असा दशतुंड[8] ही अळंकारे[9]. ५
भीष्मप्रभु शरतल्पीं पडला दुष्टा! तुज्या चि पापानें,
त्वां बहु कुळें बुडविलीं, घननादाच्या[10] असीं न बापानें. ६
गुरु, कर्ण, शल्य वधिले भगदत्तादिक अनेकशत राजे,
मथिले त्वदनुज हि, म्हणत होते आम्हां 'रणांत न[11] तरा' जे. ७
जेणें कपटद्यूतें करुनि दिली हे तुला वश कु[12] निखिळा[13],
मदुरांत[14] पुन्हा परिभवतापाचा हेतु लाव शकुनि-खिळा[15]! ८
क्षम सज्जनच्छळास चि सर्व तुम्हीं पाप, अक्षम रणाला;
पांडव न हेतु तुमच्या, हे फिरले ते चि अक्ष[16], मरणाला. ९

---

१. निंद्य जन्म ज्याचें. २. हस्तिनापुरांचे. ३. लाक्षागृहांत घालून जाळावयाचे कपटकर्म. ४. जुगाऱ्या शकुनीस. ५. भयभीत. ६. प्रीतीला कारणीभूत. ७. निवासस्थान. ८. रावण. ९. अलंकृत झाला नव्हता. १०. इंद्रजिताच्या. ११. युद्धात बुडा, मरा. १२. पृथ्वी. १३. सर्व. १४. माझ्या उरात. १५. शकुनि हा च खिळा. ('तुझ्या शकुनीला हि आम्हीं मारलें' हे येथे खोचून सांगितलें). १६. फांसे.

उरलासि एक, सोदर[1] गेले तिकडे तुला हि पाठवितों,
तुज देयें[2] फळ दिलें किति, किति उरलें हें मनांत आठवितों."
कुरुराज म्हणे, " मंदा! मेळविलें बहुविकत्थनें[3] काय?
'हाय!' म्हणवितों युद्धश्रद्धेसह[4] भंगितों तुजा काय. ११
न्यायें शत्रु मज गदायुद्धीं जिंकी असा असे कोण?
तूं महिष तो चि, जो चि न शोणगदाशक्तिदृष्टिचा[5] कोणं[6]. १२
न्यायें मज जिंकाया न समर्थ गदारणीं सुनासीरें[7]:
ये भूमींत[8], वितिलकां[9] व्हाया त्या पांडुच्या सुना, सीर. १३
वदलासि दुर्विचेष्टित[10] माजें जें जें खरें च भीमा! तें:
मंदा! न तदेकप्रतिकृत[11] घडलें म्हणुनि लाज भी मातें. १४
ग्यां करुनि तुम्हां वल्कलधर दीन, सुचिर वनोवन फिरविलें:
अज्ञातवास, दास्य हि करउनि, निजतेज दुःसह मिरविलें. १५
तुज लाविलें स्वतेजें ग्यां च कढीभातवरण घाटाया,
वाटाया प्राज्य पुरण, पापड पोळ्या प्रभूत[12] लाटाया. १६
माजे तुजे हि मेले आप्त बहु; क्षय समान दोघांचा
काळें, जैसा घटजें त्या पूर्वापरसरस्वदोघांचा[13]. १७
भाग्यें घडेल जरि तरि मज परमश्लाघ्य संगरीं पतन;
जतन क्षत्रिय न करिति, जोडिति नाकीं तनुव्ययें[14] वतन. १८
अद्यापि मला कोणी धर्में जिंकी असा असे न गदी,
छद्में वधितां तुमची होइल अपकीर्ति, विष चि ती अंगदी[15].
कौंतेया! त्वां शारदवारिधरापरि[16] वृथा न गर्जावें,
बळ असल्या दावावें प्रथम, विकत्थन समग्र वर्जावें." २०

---

१. बधु. २. द्यावयाचें. ३. फार बडबडण्यानें. ४. युद्धाच्या उमेदीसह. ५. गदारूप देवांच्या आरक्त दृष्टीचा. ६. कोपरा. (कटाक्ष). ७. इंद्र. ८. गदाप्रहारें भूमींत सीर-पंत. ९. कुंकुमरहित. १०. दुराचरण. ११. त्यापैकीं एकाचा हि प्रतिकार. १२. पुष्कळ. १३. पूर्वपश्चिमसमुद्राच्या ओघाचा. १४. देह खर्ची घालून. १५. सारी-पंत. १६. शरदृतूंतील [ फुसक्या ] मेघाप्रमाणें.

त्या वचनातें पूजिति पांडव पांचाळ सर्व बा गाया !
कुरुपतिला हर्षविती, कीं, ते जपले तयासि माराया. २१
तों बळभद्र अकस्मात् शिष्यगदारण पहावया आला,
ज्याला धर्म बहु मनीं, तो सत्पति[1] म्हणुनि हृष्ट ही झाला. २२
स्नेहकर, तापहर, करि, बहु धरुनि विशुद्ध देह, लीला जो,
तेणें यदुसंततिला कां दीपवती[2] न देहली लाजो ? २३
तो प्रभु युधिष्ठिरानें प्रेमें आलिंगिला उरीं सुचिरः
त्यांचा समागम गमे हिमहेमनगेंद्रसंगसा[3] रुचिर. २४
कृष्णार्जुन माद्रीसुत सात्यकि पांचाळ भेटले नमुनी,
गाती ज्याचें सद्यश निर्जितशरदिंदुदुग्धफेन मुनी. २५
पूजुनि युधिष्ठिर म्हणे, ' रामा यदुवंशभूषणा बा ! हें
शिष्यगदायुद्ध स्थिर बैसोनि मुहूर्त आसनीं पाहें.' २६
प्रोद्यतगद युद्धोत्सुक भीम सुयोधन हि करुनियां प्रणती,
'गुरुजी ! शिष्यकृत गदायुद्ध पहावें तुम्हीं ' असें म्हणती. २७
आला सरस्वतीची संपादुनि राम तीर्थयात्रा हो !
कीं, हे श्रोतृजनाच्या भवरोगाला स्वकीर्ति मात्रा हो. २८
राम म्हणे, ' धर्मा ! या सुकुरुक्षेत्रीं च उत्तम स्थान

---

१. सज्जनाचा पालनकर्ता. २. दीपयुक्त देहली ( उंबरठा ) व बलरामरूपी दीपानें युक्त अशी यदुकुलरूपी देहली यांची तुलना. जशी दीपयुक्त देहली आतबाहेर प्रकाश पाडते, तसें बलरामयुक्त यदुकुल हि भूतभावि संतति उज्वलित करितें; परंतु पहिलीच्या ठिकाणी असलेले दीप मात्र दुसरीच्या ठिकाणीं नाहींत. देहली ज्या दीपानें युक्त असते तो दीप स्नेह ( तेल ) हरण करणारा, ताप करणारा व मस्तकावर कज्जल धारण करणारा असल्यामुळे मलिनदेह असा असतो; परंतु बलरामरूपी दीप स्नेह ( प्रेम ) करणारा, तापहर व विशुद्ध ( शुभ्र ) देह धारण करणारा आहे. अर्थात् दीपवती देहली यदुसंततीला लाजणार च. ३. हिमालय व मेरुपर्वत यांच्या भेटी सारखा. ४. जिंकिला आहे शरदृतूतील चंद्र व दुधाचा फेस ज्याने असें. ५. उगारली आहे गदा ज्यांनी असे.

आहे समंतपंचक, देतें वीरांसि सुगतिचें दान. २९
जरि मानेल तरि चला, व्हावें तेथें चि हें गदायुद्ध;
कीं, बहु समंतपंचकमृतवीरां लोक होतसे[1] शुद्ध.' ३०
रामानुमतें गेले बैसुनि ते सर्व ही नृपा! यानीं,
बा! यांनीं बहु कथिलें परि गेला त्वत्तनूज पायानीं. ३१
कुरुपति धर्मासि म्हणे जावूनि समंतपंचकस्थानीं,
'निरखावें युद्ध तुम्हीं सर्वांनीं न्यायमंचकस्थानीं[2].' ३२
मध्यें[3] स्वमंडळीं बळ बैसविला शिष्ययुद्ध देखाया,
बसला धर्म, गमे भुज काळव्याळाननांत दे खाया. ३३

# अध्याय तिसरा.

कौरववर कोपानें करिपतिला केसरी तसा पाहे,
राहे निष्कंप पुढें, शक्रा वळसा[4] मरुत्सुता बाहे. १
तेव्हां परमभयंकर झाले उत्पात भूमिकंपादि,
शंपा[5] दीर्घध्वानें[6] बहु यश, देवीं[7] तसें चि संपादी. २
भीम म्हणे धर्माला, 'रामापासूनि जेंवि पामर तो,
मजपासुनि हा दुर्मति दुर्योधन तेंवि भूमिपा! मरतो.' ३
दुर्योधनाप्रति म्हणे, "केलें अघकर्म आठिव रिपो! तें,
जें घेतलें बुडाया बहु ओझें, जेंवि पाठिवरि पोतें[9]. ४
विदुर म्हणत होता तुज, 'भाग्यमदें नें[10] कुरुसत्तमा! मातें;'
अनुसरलासि, अव्हेरुनि त्याला, तूं परममत्त मामातें. ५
जेणें दुर्मंत्र कथित होतासि विलोचना[11] इलापा तें

१. [ प्राप्त ] होतसे. २. न्यायासनावर बसलेल्या अशा. ३. स्वमंडळीमध्ये. ४. बकासुरासारखा. ५. वीज. ६. मोठ्या शब्दाने. ७. सर्वलोकभयंकर रव देवांचा, तसा च विजेचा, झाला—**पंत.** ८. रावण. ९. शिशु अथवा नौकाविशेष—**पंत.** १०. माजू नकोस. ११. दृष्टिहीन भूपतीला (धृतराष्ट्राला).

हें तोंड करील तुजें आजि रजें भरुनियां विलापातें. ६
वाट पहातात सखा मातुळ जे बंधु मंद नवनवति[१],
दूषिलि जिहीं कुरुश्री अहिनीं जसि भूमि चंदनवनवती[२]. ७
माजी गदा भवानी साक्षात्तूं दुष्ट कंसरासुरसा[३],
काय निपीताब्धि मुनि प्राशील न अल्पका सरा सुरसा." ८
नृपति म्हणे, 'बोलें चि न होतो जन विप्रताप शोभित रे!
भिवविशि कोणा? जाले न कुरु वरुनि विप्रता पशो! भितरे.
चिरकाळ मनीं होतें व्हावें तुजसीं भलें गदायुद्ध,
नवसासि पावले सुर, कीं, माजा भाव समजला शुद्ध. १०
मज मार नेयें आधीं, मग वद; मंदा! न हो अलीकवचा;
त्याउनि विकत्थना तव वाणी तनु शोभली भली कवचा!' ११
वाग्युद्ध करुनि, करिती अतुल गदायुद्ध ते गदीश, तदा
वाहे बहु रक्त, गमे तन्मूर्ति[११] सरस्वतीनदी शतदा. १२
अत्यद्भुत करिती ते युद्ध, नृपा! होय वायु पंगु, लिही
तेव्हां न चित्रगुप्त हि, राहे मुनिची उगी च अंगुलि ही. १३
गमलीं साक्षाच्चित्रें प्रेक्षककटकें समस्त बापा! तीं,
लवलीं न पाहतां त्यां[१३] स्वतुळगदायुद्धकौतुका पातीं. १४
दाउनि पद करितो प्रभु सादर जो दिव्यदेह लीनातें,
तो सादर पाहे कीं, शिष्य असें त्यांसि दे हली[१५] नातें. १५
दुर्योधनें गदेनें पार्श्वीं[१६] च प्रथम ताडिला रागें,

१. नव्याण्णव. २. चंदनवनानें युक्त असलेली. ३. महिषासुरासारखा. ४. प्राशन केला आहे समुद्र ज्यानें. ५. गोड पाण्याच्या (सरोवरास). ६. महापराक्रमी. ७. न्यायानें. ८. अनृतवचन-**पंत**. ९. अन्वय-तव वाणी विकत्थना त्याउनि [आणि] तनु कवचा त्याउनि भली शोभली! १०. उपहास-**पंत.** ११. ही नदी रक्तवर्णा आहे. १२. नारद न वाजवी वीणा-**पंत.** १३. त्यांची स्वतःची च आहे तुला-तुलना-ज्याला असें गदायुद्धकौतुक ज्याचें अशा त्या (**भीम**-दुर्योधनांस). १४. जो दिव्यदेह प्रभु-**पंत.** १५. बलराम. १६. बरगडींत.

परि तो प्रहार नाहीं गणिला कुंतीसुतें महाभागें. १६
तदनंतर कुरुराजें केला आघात मस्तकीं क्रोधें,
बोधें भोग तसा तो धैर्यें त्या साहिला महायोधें. १७
शूर[1] सकार शकारीं व्हाया दे द्विषदुरांत फटकारा,
भट[3] भीमेतर असता तरि तेव्हां रक्षिता न च टकारा. १८
मग भीमें हि क्रोधें पार्श्वीं च गदाप्रहार वा! केला,
पडला गुढघे टेंकुनि तों दे मुदितारिसैन्य हाकेला. १९
कुरुसिंहाच्या नाकीं झाली पांचाळगर्जना काडी.
धावोनि शंखदेशीं अत्यावेशें वृकोदरा ताडी. २०
चंळला न अचळसा, वरि भरला रक्तें मनांत रागानें:
खवळे शिवला पायें जाणों हरि कीं खगेंद्र नागानें. २१
कुरुपतिस दिला भीमें उग्र गदेचा असा रपाटा कीं,
त्याँ वपु म्हणे, 'भरवसा माजा राज्या! असारपा! टाकीं.' २२
भीमगदाघातें तो नृप पडला जेंवि शालतरु वातें,
स्वल्प सभास्तरणीं जो गणि हस्तमिता हि चालित रुवातें. २३
नृपपतनीं मोठ्यानें पांडव पांचाळ हांसले सहसा,
जालें तसें चि, कोणें त्यांसि म्हणावें 'उगे रहा, न हसा'? २४
डोहांतुनि गजसा नृप मोहांतुनि निघुनि दे तडाखा तो,
भीम हि पडला, गमला पविपातें देशीं तो तंडा खातो. २५
हरिसा गर्जे राजा, तत्सत्वें देव पावले हर्ष,
व्योमीं जयध्वनि उठे, सुरकुसुमांचें पडे शिरीं वर्ष. २६

१. शूर दुर्योधन तो मरं म्हणजे रवि–**पंत**. २. शत्रूच्या उरात. ३. भ म्हणजे नक्षत्र–**पंत.** भीमेतर भट दुर्योधनरूपी मर्यापुढे भ झाला असता, म्हणजे निस्तेज पडला असता. ४. आनंदित झालेले शत्रूचे (पांडवांचे) सैन्य. ५. आखावर. ६. गजाने (पक्षी) सापाने. ७. दुर्योधनास–**पंत.** ८. असारपाळका–**पंत.** ९. दिवाणखान्यातील बिछायतीवर. १०. चालत असतां हस्तमित रुवातें ही स्वल्प गणी–**पंत.** हस्तमित रुवातें=हातभर उंचीच्या कापसाला. ११. भूप्रदेश. १२. चिरतो, भंग पावतो.

धर्म म्हणे, 'हा! अमृतोदधिचा[1] हि सरोग दास मरतो हो!'
अत्यद्भुत म्हणुनि म्हणे नारद[2], 'न सरे गदासमर तो, हो.' २७
आप्तमनीं बहु, मारुति पतनीं गमतां परासु, धाक सिरे,
म्हणती, 'हा! हा! दैवा! जाली खलता परा सुधा कसि रे!?'
उठला भीम मुहूर्तें, धरुनि पुन्हां आयुधा, रणाला हो!
पर म्हणति, 'विधे! हा नव सदयेक्षण[3] आयुधारणा लाहो.'
पार्थ म्हणे, 'वद देवा! यांत अधिक कोण बळगुणें काय?
सम असम कसे दिसती? आहे कवणांत बा! उणें काय'? ३०
श्रीकृष्ण म्हणे, "विजया! गुरुचा दोघांसि तुल्य उपदेश,
जेणें दोघानीं ही व्हावें चि वरुनि कीर्ति सुपदेश. ३१
बळवत्तर भीम असे, यत्नपर कृती वळी सुयोधन गा!
बा! धर्मन्यायें तों युद्धीं शतकोटि हा सुयोध नगा[6]. ३२
धर्में भीम न यातें, स्पष्ट अधर्में रणांत मारील;
वारील व्यसनातें अनय चि, आम्हांसि आजि तारील. ३३
सुरराजें मायेनें वधिले वृत्रादि बहुत मायावी,
या सुमलिना[7] मळवित्या अवलोकुनि लाज बहु तमा यावी. ३४
'भंगिन ऊरु[8] गदेनें' केली जी यापरि प्रतिज्ञा ती
संरक्षाया भीमें प्रेयावा हा हरि[9]प्रति ज्ञाती. ३५
प्रभुनें[10] पुन्हां बुडविलें एकजयपणें[11] हि संकटामाजि,
बुद्धि अधर्मावांचुनि पाहे इतरा न कंकटा[12] माजी. ३६
जरि ऊरुभंग भीम न करिल, हरिल तरि लवांत पद[13] पर हा;

१ न व्हावें ते होतें-**पंत.** २. कलिप्रिय, सज्जयज्ञ-**पंत.** सज्जयज्ञ=खरा जय [कोणाचा हें] जाणणारा. ३. कृपादृष्टि. ४ वज्र. ५. दुर्योधन. ६. उत्तम योद्धारूप पर्वतास. ७. तम कज्जळापरि मळवित नाहीं; खळ सबंधें काजळापरीस मळवितो, प्रक्षाळनें ही मळ जात नाहीं-**पंत.** ८. माझ्या. ९. यमाकडे. १०. धर्मानें. ११. एकाचा हि पराभव केल्यानें. १२., कवचातें-**पंत.**
१३. राज्यपद.

धर्मे चि करा, पुन्हां जा, जोडा आश्रय द[1]वांत पद[2]पे रहा. ३७
कळिव बळिवरा भीमा, आहे कीं सावधान मन पार्था!
व्हावी अष्टादशदिनकृतरणमखधर्मसु[3]कृति अन[4]पार्था." ३८
कार्यव्यग्रा माता सू[5]नुकडे जेंवि दाइला धाडी,
भी[6]मदया तसि दर्शिसि, तों जय सव्योरुतें करें ताडी. ३९
संज्ञेतें धरुनि मनीं तो निजसंधेसि आठवी राज्या!
क्रोधांधा न दिसावे दिग्गज दिक्पाळ आठ वीरा ज्या. ४०
हाणिति चुकविति हि ब[8]ळें दावुनि, लागावया गदा, विवर[9]ः
करणें प्रहार माथां ज्याच्या त्या तो गदा न दावि वर. ४१
बसतां गदा गदेवरि कि[10]टाळें बहु उसळतीः अहा! त्यांचीं
तेजें जसीं विजांचीः झांकिति नयनें नृपा! पहात्यांचीं. ४२
चुकवावया प्रहार [11]व्योमीं उडतां चि ऊरुवरि ताडी,
मांड्या मोडुनि मारुति महिवरि सहसा सुयोधना पाडी. ४३
देवाश्रुबिंदुसह बा! तव पडला ज्येष्ठसुतः पतन याचें
कांपवि भूतें, [12]स्तविलें या पांडूच्या चि सुतप तनयाचें. ४४
दुर्योधननृपपतनीं झाले उत्पात नैकविध, वाहे
[13]खर पवन, रक्त वर्षे, कांपे होवूनि भूमि विधवा हे. ४५

## अध्याय चवथा.

पांचाळ मुदित झाले, जैसे होतां चि वृत्रहानि सुर,
होय वृकोदर मारुनि कुरुपतितें जेंवि वृत्रहा नि[14]सुर. १

१. वनात-**पंत.** २. पादप-**पंत.** वृक्ष. ३. शोभनक्रिया-**पंत.** ४ सफला-**पंत.** ५. आत्मज-पक्षी-अनुज-**पंत.** ६. पाठांतर-**रति तसी.** *-प्रीति-**पंत.** ७. अर्जुनानें डावी मांडी थोपटून संकेत केला. ८. मुद्दाम. ९ छिद्र; मर्म. १०. ठिणग्या. ११. अनरावीं. १२. परंतु-**पंत.** (अन्वयाकरितां अध्याहार). १३. तीव्र; झोंबणारा. १४. निश्चित.

दशमुखवधें कपिनिकर कीं कंसवधें नृपा! जसा नंद,
सासुयोधनहननें होय तसा धर्मराज सानंद. २
पतितातें भीम म्हणे, "रे कुर्वधमा! कुबुद्धिच्या कंदा!
'गौगौं' म्हणोनि हांसत होतास सतीस तूं च कीं मंदा! ३
दुःशासनासि सांगुनि करवित होतासि तूं च कीं नग्ना,
कृष्णाकपिला केली क्रूरा! त्वां कष्टकर्दमीं मग्ना. ४
त्या कर्माचें घे फळ," ऐसें गर्जोनि वामपादानें
शिर तुडवी, ईश्वरसा दे भीम कृतानुरूप बा! दानें. ५
'गौगौं' म्हणोनि हांसत नाचत होते यथेष्ट जे दुष्ट,
आम्हीं तसे चि 'गौगौं' म्हणतों, हांसोनि नाचतों तुष्ट. ६
जिंकाया शत्रूंतें विष वह्नि द्यूत वंचना कांहीं,
निजबाहुबळावांचुनि आम्हांसि उपाय ठावुका नाहीं. ७
वस्त्र सतीचें फाडित होते छळुनि प्रभूत पापिष्ट,
तीच्या चि तपें झाले हे देवा! सर्वभूतपा! पिष्ट. ८
कृष्णा! धर्मा! विजया! माद्रीसुत हो! समस्त परिसा रे!
'षंढतिल' म्हणत होते ते म्यां वधिले रणांत अरि सारे. ९
जो 'गौगौः षंढतिला!' इत्याद्युपहास करुनियां हांसे,
तो हा दुर्जन, याच्या पडले कंठांत मृत्युचे फांसे." १०
ऐसें गर्जुनि मस्तक मर्दी चरणें पुन्हां हि कोपानें,
तें साहिलें परोपरि परपादाक्रमण जेंवि सोपानें. ११
त्यासि अजातारि म्हणे, "केली वा! त्वां खरी प्रतिज्ञा तीः
मूर्धाभिषिक्त कीं हा संमत शौर्यें हरिप्रति ज्ञाती! १२
जालासि निपट वश तूं कोपाला उचित काय बापा! हें?
लिंग पदच्युत भग्न हि लंघ्य नव्हे, साधुनीतिला पाहें. १३
सद्ब्राह्मणाभिमंत्रित शततीर्थजलाभिषिक्त कीं शिर हें!

१. गाय रे गाय! २. द्रौपदीरूपी गाय. ३. कर्मानुरूप. ४. फार. ५. दुसऱ्यांचे पायानें तुडविलें जाणें. ६. जिन्यानें. ७. केवळ. ८. महादेवाचें लिंग. ९. स्थानभ्रष्ट.

अर्घार्ह नव्हे काय ग्रहणीं रविमंडळ प्रभाविरहें? १४
सर्व जन म्हणति, 'धार्मिक भीम' असें यश तुवां न बुडवावें:
चरणें राजोत्तमशिर बहुमत शतपत्रसें न तुडवावें." १५
वदुनि असें गहिंवरला महिवर लावूनि बोल भावास,
मग जावुनि जवळ म्हणे पतिता अतितापदप्रभावास. १६
'बापा सुयोधना! तूं आतां कांहीं करूं नको शोक;
जो कर्म जसें करितो, तेसें सुखदुःख भोगितो लोक. १७
बा! बहु अपराध करुनि बुडवुनियां स्वपर बहु बुडालास,
सुमतांतुनि तूं तोयाआंतूनि अलाबुसा उडालास. १८
रणमखहतासि तुज सुख देतिल आदित्य, रुद्र, वसु नाकीं:
मज दुःख चि, राज्याच्या करितिल सविलाप उद्रव सुना की!
गुरुबंधुसुतस्वजनावांचुनि सुखभोग ते नरक सारे,
बा! वर्तेल अवीराशतधिक्कृत मजअसा नर कसा रे!? २०
त्या म्यां कशा पहाव्या, जाल्या तुमच्या वधू अवीरा ज्या?
त्वां दुस्तरा मज पराभूति दिली हे सदा नवी राज्या!' २१
यापरि विलाप बहुत चि करिता जाला नृपा! अजातारी,
समजावी मधुपासुनि जो देव करुनि कृपा अजा तारी. २२

---

## अध्याय पांचवा.

वृद्ध म्हणे, 'रे सूता! स्पष्ट गदायुद्धधर्म सोडून
नृप पाडिला महीवरि भीमानें ऊरुयुग्म मोडून. १
ती धर्ममर्यादा सोसावी सर्वथा न रामासी,
जागृदवस्थेंत जशी नासाग्रीं बैसली नरा मासी. २

१. पूजेस योग्य. २. कमलासारखें. ३. भूपति धर्म. ४. भोपळ्यासारखा. ५. मोठा रडण्याचा शब्द. ६. निष्पतिसुता—**पंत.** पतिपुत्र हीन अशा शेकडो स्त्रियांनी धिक्कृत असा. ७. दैत्यविशेषापासून. ८. ब्रह्मदेवास. ९. बळरामास.

तेव्हां रामें केलें काय कसें सांग संजया! आधीं.
भीमीं अधर्म निष्कृपपण पुष्कळ जेंवि पामरीं व्याधीं.' ३
सूत वदेः–क्षोभे प्रभु भीमीं बहु, केसरी जसा नागीं;
धिक्कारूनि म्हणे, 'कां केला आघात [1]नाभ्यधोभागीं? ४
मज गुरुसमक्ष कैसा शास्त्रातिक्रम कळोनि हा केला?
रे उद्धता सुधृष्टा! प्रभुच्या ही गणिसि तूं न [2]हाकेला. ५
हाणी भलते स्थानीं खळ, नांगी जेंवि मातला विंचु,
नांगर [3]कां गरज [3]करी? [4]सच्छिष्या शत्रुशोणितें सिंचु.' ६
ऐसें गर्जे, धांवे, भीम वधायासि घे [5]हळ [6]हळबळा,
तऱ्हि [*]कोपे बहु लागे त्या शिष्याची मनीं हळहळ बळा. ७
कृष्ण बळास बळानें धरुनि प्रेमें म्हणे, "अगा रामा!
सोडीना तव हृदया करुणा जसि विष्णुच्या अगारा मा. ८
[7]कौंतेय सहजमित्रः यांची ती वृद्धि आपुली आर्या!
आम्हां बहु मानावी पितृभगिनी पांडुनृपतिची भार्या. ९
द्यूतीं द्रुपदसुतेतें 'मांडीवरि बैस ये' म्हणे खळ हा,
खिजवुनि सभेंत काढित होता उकरुनि पुनःपुन्हां कळहा. १०
तेव्हां चि, 'बसेल गदा मांडीवरि आमुची तुज्या पापा!'
केली असी प्रतिज्ञा या भीमें साधुपाळका बापा! ११
[8]शाप हि मैत्रेयाचा जाला ऐसा चि यासि बा! मागें,
रागें न भरावें त्वां या भीमा साधुवरि महाभागें. १२
केली खरी प्रतिज्ञा शिष्यानें, काय याकडे दोष?
तोष धरावा चित्तीं, न धरावा सर्वथा तुवां रोष. १३
म्हणसी तें हि खरें, मन दुःखित देखुनि मुलास कळकळतें,
कलियुग हि जवळि आलें, किंबहुना बा! तुला सकळ कळतें."

१. बेंबीच्या खालीं. २. धर्मशास्त्रकाराच्या सांगण्याला. ३. उपेक्षा, हयगय कां करील? ४. दुर्योधनास. ५. नागर. ६. नांगराच्या ठिकाणी सामर्थ्य ज्याचें तो. ७. पांडव. ८. वन० अ० १।७१ ते ८५ पहा. * कोपे तऱ्हि.

हळ ठेउनि खळशासन बळभद्र प्रभु म्हणे, ‘ बरें बापा !
मापा[1]! यत्न तुजपुढें नाहीं कांहीं च पार्थशरचापा[1]! १५
भीमासि ‘ जिह्मयोधी[2] ’ म्हणतिल जन, शाप यासि हा माजा;
पावेल सुगतिला ऋजुयोधी[3] धृतराष्ट्रपुत्र हा राजा.’ १६
ऐसें बोलोनि रथीं बसुनि बळ द्वारकेसि गेला जी !
नेली कृष्णें, ज्याची स्वपदाश्रितकामना सिगेला[4] जी. १७
होता दीन अधोमुख चिंताशोकार्त जो अजातारी,
त्यासि म्हणे तो भगवान्, प्राणव्यसनांत जो गजा तारी. १८
‘ तुझें त्वां अनुमोदन देऊं चि नये कधीं अधर्मातें,
भीमें पद राजशिरीं देतां कां वारिलें न धर्मा ! तें.’ १९
धर्म म्हणे, ‘ देवा ! हें प्रिय न-मला वाटलें, तुजी आण;
जाण खरें, हर्ष नसे कुरुकुळनाशें, बरें मनीं आण. २०
बहु दुःख दिलें देवा ! या दायादें वृकोदरा चंडा,
दंडाहतिनें[6] जैसें तक्षकभुजगा, हरूनियां अंडा. २१
धर्माधर्में कैसा तरि पुरवुनि काम पांडव शमो, हें
चिंतुनि उपेक्षिलें बा ! केलें माजें न चित्त वश मोहें.’ २२
परमाधर्मास हि अनुमोदन भीमप्रियार्थ केशव दे;
प्रभुतें प्रसादकामानुगसा अप्रिय मुखें न लेश वदे. २३
कर जोडुनि भीम म्हणे, “ स्वीकारीं राजसत्तमा ! महिला,
आली तुजी तुजकडे, त्या प्रभुची प्रभुकडे जसी महिला. २४
जो खळ म्हणे, ‘ पृथेची, सांगुनि दासींस, कोंडवा सून,’
तो पडला सिंहनिहतमत्तद्विपसा[11] चि तोंड वासून. २५
तो ही मेला, केला जेणें सोडुनि बळें निरी हास,

१. अर्जुनरूप बाणाचें धनुष्य च जशा लक्ष्मीपते श्रीकृष्णा ! २. कपटानें युद्ध करणारा. ३. धर्मयुद्ध करणारा ४. शेवटास, पूर्णतेस. ५. अत्यन्त रागिट. ६. काठीच्या तडाक्यानें. ७. धन्याम. ८. प्रसन्नता इच्छिणाऱ्या सेवकाप्रमाणें. ९. श्रीरामाची. १०. स्त्री. (सीता). ११. सिंहानें मारलेल्या माजलेल्या हत्तीप्रमाणें.

आम्हांस चि न रडविलें केवळ साध्विच्छळें निरीहास[1]. २६
मेळा वृष हि, शमों दे क्षण ही जौ वैर न जितकाशी[2] तें;
अरिला दिला तव तपें, दीनाला कंप न जितका शीतें[3]. २७
सुटता, अघनाशक तप घडतें, परि जाहला न शकुनि यती,
प्रभुजी! कुटिल जनाला जोडूं देइल कसें यश कुनियती[4]? २८
जप करिल ज्येष्ठपिता घेउनि शतपुत्रशोकमणिमाळा,
असते नव पुत्र अधिक, घडतें विध्युक्त[5] कर्म भूपाळा." २९
धर्म म्हणे, 'वा! केलें त्वां जें दुःसाध्य सत्यसंधा! तें,
कांहीं म्हणों नको वा! झालें अत्यंत दुःख अंधातें. ३०
वा! फेडिलें पृथेचें कोपाचें, कष्टवूनि देह, रिणः
कीं कृष्णमतासि दिलें त्वां मन, गीतासि जेंवि दे हरिण. ३१
हंता सुयोधनातें तूं चि क्षम, शक्र जेंवि पाकातें;
तें चि तव भुजीं भोगवि जीवांला तेज[6] जें विपाकातें.' ३२

## अध्याय सहावा.

धृतराष्ट्र म्हणे, 'पतनीं भरलें धूळींत सूनुचें आंग,
पांचाळाहीं केलें काय, कसें वाटलें तयां, सांग.' १
सूत म्हणेः- कविगुरुच्या[7] जैसें रसिकांसि वाटलें कवनीं,
कीं उगवतां अदितिचा[8] पांथां जायास वाट लेंक वनीं. २
किंवा जसें सुकंठप्लवंगांला[9] वाटलें कपींद्रवधीं[10],

१. निरीच्छाम. (निर्विकार अशा साधूस). २. जयाने शोभणारा. ३. दुर्दैव. ४. यथाशास्त्र. (जपमाळेचे मणि १०९ असतात). ५. ह्या नावाच्या दैत्यास. ६. ईश्वरतेज, कर्मविपाक-**पंत.** ७. वाल्मीकि-**पंत.** ८. रात्रौ वाट चुकल्या पाथास वाट दाखवूनि द्यायास अदितिचा लेंक-रवि-उगवतां जसे सुख वाटले-**पंत.** ९. सुग्रीवादि वानरांस. १०. वानरश्रेष्ठ वालीच्या वधाचे वेळीं.

वेननिधनीं[1] प्रजांला, त्या पांचाळादिकां तसें च तधीं. ३
बहु हर्षले नृपाळा ! वर्णी भट सर्व ही, जसा बंदी;
भीमातें आलिंगी जो तो परमादरें पदीं वंदी. ४
बोलुनि पुनःपुन्हां तीं तीं विषदानाद्यशेष दुष्कर्में,
धिक्कारशतशरांहीं पुत्राचीं भेदिती तुज्या मर्में. ५
केशव म्हणे, 'सुभट हो ! मृतमारण हें तुम्हां नव्हे युक्त,
मेला तें च, गुरूंचें जव्हां याणें विलंघिलें उक्त. ६
मित्र नव्हे, शत्रु नव्हे, आतां बोलोनि काय या खोडा[2]?
सोडा मृतपापकथा[3], शीघ्र चला, दिवस राहिला थोडा. ७
मेला दुर्जन, झालें बहु बरवें, सर्व वारली पीडा;
खळ साधुपदा भोगित होता, बक जेंवि हंसखगनीडा[4].' ८
या स्वाधिक्षेपें[5] तो नृप उठला धरुनियां मनीं राग,
आगस्करघातार्थी[6] पुच्छच्छेदार्तधी[7] जसा नाग. ९
तनु विकळा परि उठवी टेंकुनि भुज आणि तो टिगी तीतें,
न गणी च वेदना, त्यां स्तविना कां वीरकोटि रीतीतें[8]? १०
कोपें कृष्णासि म्हणे, " आइक रे कंसदासदायादा[9] !
निर्लज्जा ! कपटा तव हृदया तासि गांठि जसि नदा यादा. ११
या फाल्गुनासि सांगुनि कपट, हळु च खूण दावबुनि भीमा,
त्वां मोडविल्या माज्या मांड्या त्वत्कैतवा[10] नसे सीमा. १२
कपटोपायें मारुनि ऋजुसंगर[11] बहु सहस्र कवि राजे,
लज्जा, दया नसे तुज; सुभटांत त्वत्पटुत्व न विराजे. १३

१. वेनराजाच्या मरणसमयीं. २. वठलेल्या झाडाच्या खोडासारख्या दुर्योधनाला. ३. मृतवत अशा दुर्योधनाच्या पापाचाराच्या गोष्टी. ४. घरट्याला. ५. आपल्या धिक्कारानें. ६. अपराध करणाऱ्याचा नाश करूं इच्छिणारा. ७. शेपट तुटल्यानें पीडित झाली आहे बुद्धि ज्याची. ८. [ दुर्योधनाच्या ] त्या आवेशयुक्त वागणुकीस. ९. कंसाच्या दासाच्या ( वसुदेवाच्या ) पुत्रा ! १०. तुझ्या कपटास. ११. सत्यानें ( धर्मानें ) युद्ध करणारे.

जो धर्मयुद्धदुर्जय वरुणा, धनदा, द्युपा[1], यमा, रविला,
त्वां स्त्रीपूर्व शिखंडी करुनि पुढें आपगेय[2] मारविला. १४
शिकवुनि धर्मा 'अश्वत्थामा मेला' असें अलीक[3] रणीं
गुरुघातार्थ वदविलें त्वां स्पष्टः तुझी नव्हे भली करणी. १५
प्रियसुतशोकीं बुडवुनि करवुनि समरांत आयुधन्यास,
त्वां मरणोन्मुख केलें, असतां सामर्थ्य आयु धन्यास[4]. १६
द्रुपदसुत प्रायगतब्राह्मणशिर[5] तुजसमक्ष जो कापी,
ब्रह्मण्य[6] कसा रे! तूं? कैसा तो त्वां न वारिला पापी? १७
कर्णें स्वकवचकुंडलधनदानें शक्ति संग्रहीं केली,
जी अर्जुनी पडावी ती त्वां तुच्छी घटोत्कचीं नेली. १८
भूरिश्रवा महात्मा त्याचा त्वां दक्ष[7] बाहु तोडविला,
शिर खंडितां न सात्यकिपासुनि तो प्रायगत हि सोडविला.
तैसा चि अश्वसेनव्याळशर छद्म करुनि चुकवीला,
मारविलें त्वां चक्रव्यसनीं कर्णा अशा हि सुकवीला. २०
भीष्मासी कर्णासी गुरुसी मजसीं न कपट करितास,
हरितास क्षितिसि न तूं, वाढविसि कुटिळपणें चि चरितास.
आम्हांअसें बुडविलें त्वां बहु निजधर्मनिरत कपटानें,
झांकिल कसें अनार्या! स्ववदन यदु सुरसभेंत न पटानें?"
देव म्हणे, "गांधारे! मेलासि सपुत्रबंधु तूं दुरितें,
सच्छळकर्म, सुदारुण वज्र तसें, बहु दृढास[8] ही चुरितें. २३
भीष्म द्रोण सुदुर्जय परि मेले हे तुज्या चि पापानें,
ज्यां प्रबळां जोडावे हात जयंताचिया हि बापानें. २४
होता सुरासुरनरोरगदुर्जय[9] कर्ण ही जसा रुद्र,

---

१. स्वर्गपाळकाला—पंत. २. भीष्म. ३. खोटें. ४. धन्य अशा द्रोणाचार्यास. ५. प्रायोपवेशन (मरणाच्या निश्चयानें सर्व शरीरव्यापार वर्ज्य करून एकेजागी बसणे) करून बसलेल्या द्रोणाचे मस्तक. ६. ब्राह्मणाचे रक्षण करणारा. ७. उजवा. ८. दृढानें. ९. देव, दानव, मनुष्ये व सर्प या सर्वांना जिंकला जाण्यास कठिण.

व्यसनीं पडोनि मेला; कीं, तवशीलानुवर्तक क्षुद्र. २५
म्यां विनविलें परोपरि परि भाग खळा ! न देववे, नाकीं
तुजहुनि भला शतगुणें वदले शक्रादि देव वेना कीं ! २६
कविजन हितै-महित म्हणुनि बहु न मनुनि याग देशिकां गातो,
तदतिक्रम केला त्वां, कोपविल न या गदेसि कां गा ! तो ? २७
त्वां भीमासि विष दिलें, तुज योग्य न काय पतन गरदा हें ?
मेळविलें अघ पांडवदाहें बहु जेंवि शतनगरदाहें. २८
दुःशासन केश धरुनि कृष्णेसि जधीं सुयोधना ! कर्षी,
म्यां तेव्हां चि वधुनि तुज हृष्ट करावे सुयोध नाकर्षी. २९
कितव शकुनि करुनि पुढें धर्मात्मा धर्मराज नागविला,
जागविला चिंतेनें तेरा वर्षें सदैव भागविला. ३०
कृष्णा जयद्रथानें हरिली, जसि रावणें अनादि सती;
जी साक्षाज्जगदंबा शुद्धा अप्राकृता जना दिसती. ३१
बहुतानीं विरथ करुनि वधिला अभिमन्यु एकला बाळ,
तें अघ करिल तुझी, जसि वृद्धाची निर्धनत्व, आबाळ. ३२
'केला घात अधर्में,' असि मजवरि घालितोसि कां आळ ?
व्याळसम पोषिला जो तो त्वद्धर्म चि खळा ! तुझा काळ.
वृद्ध न उपासिले, गुरुशुक्रांचे ऐकिले न उपदेश,
तृष्णांध मूढ लोभी खळ तूं होसील केंवि सुपदेश ?" ३४
राजा म्हणे, " विसरलों मीं, सांगा करुनि पाठ वेदा, न;
पात्रीं न दिलें पैसें एक हि मजला न आठवे दान. ३५
अखिळा हि भोगिली म्यां पृथ्वी, परमस्तकीं दिला पाय,
स्वंततर कवण मजहुनि ? आतां कर्तव्य राहिलें काय ? ३६

१. तुझ्या दुर्वृत्ताप्रमाणें चालणारा. २. या नांवाच्या दुष्ट राजाला. ३. हित-कर्त्यांत पूज्य (श्रेष्ठ). ४. मानुनि. ५. यज्ञ. ६. गुरूंना. ७. विष देणाऱ्या तुला. ८. बृहस्पतिनीति व शुक्रनीति यांतील उपदेश. ९. [ सदा ] अंगांसहित वेदांस. १०. ज्याचा अंत अधिक चांगला झाला आहे असा.

अभिमुख शस्त्राघातें समरमखामाजि वेंचिला काय;
स्वंततर कवण मजहुनि? आतां कर्तव्य राहिलें काय? ३७
मद्भोग मदैश्वर्य प्रेक्षुनि वदले समस्त अरि, 'हाय!'
स्वंततर कवण मजहुनि? आतां कर्तव्य राहिलें काय? ३८
सत्कारील सुरांचा [1]ससुहृत्सुतसोदरा मला राय;
स्वंततर कवण मजहुनि? आतां कर्तव्य राहिलें काय? ३९
ज्या [2]वीरसू तयांला झाली मान्या जगत्त्रयीं माय;
स्वंततर कवण मजहुनि? आतां कर्तव्य राहिलें काय? ४०
[3]प्रविहतसंकल्प तुम्हीं झालां, सर्व हि बुडाल शोकांत,
सकळ सहायांसह मीं प्रमुदित होईन वीरलोकांत." ४१
या वाक्याच्या, झाली कुरुपतिवरि पुष्पवृष्टि, [4]अवसानीं,
सुर झाले हृष्ट, जसे जन होतां काम पूर्ण नवसानीं. ४२
गंधर्वानीं सुस्वर वाद्यें वाजवुनि गायिलें यश हो!
आलें धन्यत्व जगीं, [5]तुमचीं मोहासि न च सुधी वश हो. ४३
बहु अप्सरा हि गगनीं यश गावुनि नाचल्या नृपा! न मला
झाला शोक, क्षणभरि सुविवाहोत्सव चि तो मना गमला. ४४
बहु 'साधु! साधु!' वदले सिद्ध, [6]सुरभि शीत मृदु पवन वाहे;
ऐकत होतें राजस्तव पर, मत्कर्ण ही नवनवा हे. ४५
नृपपूजेनें झाले लज्जित धर्मादि सर्व ही राज्या!
[7]शोणमणि अदाह्यत्वें गुरु न, अभेद्यत्वगर्व हीरा ज्या. ४६
घडतां अधर्म पश्चात्तापें सच्चित्त कां न कोंडे हो!?
धर्मादि सर्व झाले दीन, अधोवदन, [8]कानकोंडे हो! ४७

१. मित्र, पुत्र व बंधु यांसह असणाऱ्या मला. २. वीरमाता. ३. नाहींसे झाले आहेत मनोरथ ज्यांचे असे. ४. शेवटीं. ५. धृतराष्ट्र व गांधारी यांची. ६. सुगंधी. ७. अग्निदिव्यांत उतरतो (उरतो?) म्हणोनि माणिक्यमणि च गुरु, अग्नित उरत नाहीं म्हणोनि घनाभेद्य ही हीरकमणि गुरु नव्हे—पंत. ८. लज्जित.

त्यांसि म्हणे कृष्ण, "वचन माजें धर्मादि सर्व परिसा हो!
मन तुमचें खेदातें धैर्यें, जरि हीन, खर्व परि, साहो. ४८
'ज्याचा शंकरसा सुखकर शंतनुनाम बाप गावा,' हे
[3]म्हणतात जन, सुरांची ज्याला पोटांत आपगा वाहे, ४९
जो शरशयनीं निजला भीष्म महाराज एक; हा दुसरा
कुरुगुरु, ज्याला भजलां सर्व, जसे हंस मानसा सु-सरा; ५०
तिसरा कर्ण श्रीमान् ज्याचें उघडें कवाड, वर हात,
आले यत्सदनीं, सुश्वशुरगृहींसे च वाडव रहात; ५१
चवथा श्रीस्मरहरवरभव नवनवसवमहोत्सवशतरत
भूरिश्रवा महात्मा, आले बहु यत्सुशीलवश तरत; ५२
बहु मान्य वेदसे हे चवघे अवघे अलंघ्य अर्णवसे,
अजित चतुर्भुजभुजसे, यांचें यश भरुनि साधुकर्ण वसे. ५३
ऋजुयुद्धें सुपुरुष हे समरीं न कदापि पावते पतन.
मायायोगें वधिले म्यां चि तुम्हांला करावया जतन. ५४
म्हणता हा हि गदाधर दंडधरा अंतका हि 'मार्ग हो:'
हरुनि प्रताप, द्यावा कंप समस्ता हि, या हिमार्ग हो! ५५
म्यां, बुडतें सर्वस्व स्पष्ट, अनृत एक वांचविल यातें,
योजुनि असें अधर्में नेर्वावलें प्रबळ पांच विलयातें. ५६
संकट पडतां कपटें वधिले वृत्रादि शत्रु शक्रानें,
श्रीशें छळें महाखळ [13]वृक वधिला जो अवध्य चक्रानें. ५७
केलें धर्मज्ञानीं जें दुस्तर संकटीं तरायास,
तें चि करावें, व्हाया अवकेशी भलतसा परायास. ५८

१. हानि. २. अल्प. ३. मळपाठ—**लोक सारे.** ४. गंगा. ५. ज्यांच्या दाराशीं याचकांना मुक्तद्वार होतें. ६. दान देण्यास तत्पर. ७. ब्राह्मण. ८. शंकराच्या वरापासून उत्पन्न झालेला. ९. नव्या नव्या शेकडो यज्ञमहोत्सवामध्यें रत असलेला. १०. याची कीर्ति साधु निरंतर ऐकतात. ११. सर्वस्वातें. १२. कपटानें. १३. एक शिववरोन्मत्त राक्षस. १४. वध्य—**पंत.** १५. शत्रुचा उद्योग.

संकोचलां वृथा कां? बैसा यानीं, उठा, निघा, चाला;
झाला जय, प्रहर्षें गर्जा; जावूं सुखें निवासाला." ५९

---

## अध्याय सातवा.

श्रीकृष्णाच्या वचनें पांडव पांचाळ हर्षले सर्व,
वा! त्यांसि आपणाहुनि उत्कर्षें मेरु वाटला खर्व[1]. १
गाजत वाजत जावुनि कुरुपतिशिबिरासि पावले हर्षें,
ते निजविजयोत्कर्षें सर्व निवाले जसे सुधावर्षें. २
'हा शिबिर[2]संनिवेश स्वर्ग चि भोगूं सुयोधनाचा, या,'
ऐसें वदोनि शिरले, न च आळसले सुयोध नाचाया. ३
शिबिरप्रवेशसमयीं देव म्हणे, 'सर्व उतरले शूर,
घेवुनि धनु शरधि[3] सख्या! तूं हि रथावरुनि उतर, हो दूर.' ४
'ज्यासि सकळ खळविघ्न त्रासति कंठीरवां[4] जसे कुतरे,
वदतो आजि असें कां?' ऐसें अर्जुन मनीं म्हणत उतरे. ५
पार्थ उतरला आधीं मग भगवान् साधुचा हित उतरला,
ज्याचा पदाश्रित, भवीं असुनि हि मदनेषुनीं[5] तितउ[6], तरला. ६
प्रभु उतरतां चि झाला गुप्त ध्वजसहित दिव्यकाय कपी[7],
त्या साश्वरथासि शिखी, जेंवि त्रिपुरासि रुद्रसायक, पी[8]. ७
सर्व हि विस्मित झाले सहसा त्या स्यंदनाचिया दाहें,
जिष्णु म्हणे, 'सांग असें कां घडलें श्रितसुरद्रुपादा[9]! हें?' ८
देव म्हणे, 'द्रोणाच्या, कर्णाच्या आणिखां हि धीरांच्या
पूर्वीं च महास्त्रांहीं झाला होता प्रदग्ध वीरांच्या. ९
पेटों न दिला रथ तुज द्याया रक्षूनि विजय अनघाला[10],

१. ठेंगणा. २. सैन्याचा तळ ३. भाता. ४. सिंहास. ५. कामबाणानीं. ६. बहुछिद्र–**पंत.** ७. ध्वजस्थ मारुति. ८. अग्नि ग्रासून टाकी. ९. आश्रितांना कल्पवृक्षाप्रमाणें आहेत पाय ज्याचे अशा श्रीकृष्णा! १०. निष्पापास.

घालूं द्यावा कैसा चोरांसि हरावया स्वधन घाला? १०
जरि मीं नसतों, करिते कर्णब्रह्मास्त्रभल्ल[1] भस्म रणीं,
सादर असली तूं हि श्रीगौरीप्राणवल्लभस्मरणीं.' ११
भेटुनि धर्मासि म्हणे, "जय झाला पुण्यकीर्तिसदना ! कीं,
मेले सर्व अरि, यशें केलें तुझिया ध्रुव स्वपद नाकीं. १२
या दारुणतरवीरप्रळयापासूनि होवुनीं मुक्त,
झालां राज्यश्रीसीं भ्राते पांच हि पुन्हां तुम्हीं युक्त. १३
झाली सफळा, केली होती विजयावनार्थ[2] आज्ञा, ती
त्वत्सुकृतें चि;म्हणतिल स्तवन करुनि 'धन्य' मज हि वा! ज्ञाती."
प्रभुवचनें रोमांचित होय, युधिष्ठिर म्हणे, " अगा धात्या[3] !
तरलों तव प्रसादें, कपि जैसे सेतुनें अगाधा[4] त्या. १५
गुरुवृषविद्धयस्त्रातें[5] भीता वज्रीः कसा नर सहाता?
माज्या येता जय तुजविण, शक्राच्या जसा न रसं[6], हाता. १६
जालों होतों बलिहृतपद[7] शक्र तसा च पुष्कराक्षा ! मीं,
बा ! पुष्टि तुष्टि तुजला जसि अमृतरसा न दुष्करा क्षामीं[8]. १७
संसप्तकादियुद्धीं विमुख न होवूं दिला विजय दास,
स्वसम चि केला अजित, स्वस्ति[9] असो तुज सदा विजयदास.
स्पष्ट उपप्लव्यांत[10] व्यासें कथिलें, 'मुकुंद ज्या पक्षीं,
तिकडे जय, भय न धरीं, रक्षीं निजधर्म, कृष्णपद लक्षीं.' १९
त्वद्यश गातिल नारदमुख कवि, शक्रादि देव, सुस्वर गा !
तुज 'दे दास्य' म्हणावें, हतभाग्य म्हणोत 'दे वसु[11]' स्वरगा[12]."

१. कर्णाचे ब्रह्मास्त्राभिमंत्रित बाण. २. अर्जुनरक्षणार्थ. ३. त्रात्या (श्रीकृष्णा)' ४. समुद्राला. ५. द्रोणाचार्य व कर्ण याच्या ब्रह्मास्त्रास. ६. अमृत. ७. बळीनें हरण केलें आहे पद (स्थान) ज्याचें तो इंद्र. ८. कृश–**पंत.** कृश झालेल्यास पुष्टि तुष्टि [ देणें ] जसि अमृतरसा दुष्करा न [ तसी ] तुजला न. ९. कल्याण. १०. नगरविशेषीं. ११. संपत्ति. १२. कल्पवृक्षास.

ऐसें बोलुनि धर्म श्रीकृष्णातें करीं धरुनि तोषें,
शिबिरीं शिरे निधिगृहीं[1], ईश्वरसह धनद जेंवि, जयघोषें. २१
तव कोषाधिकृताहीं[2] रत्नाचे राशि विविध वस्त्रांचे,
रजतांचे कनकांचे दाखविले बहु अमूल्य शस्त्रांचे. . २२
वाटे बिभीषण चि दशवदनाची सर्व संपदा पावे,
जीच्या बळें धनिक जन सकळ हि, देवूनि कंप, दापावे. २३
गर्जुनि भीम म्हणे, 'गे श्री! बुडवुनि दुर्जनास आलीस;
आली[3] समान[4]शीलव्यसना तूं जानकीस जालीस.' २४
हय सोडविले, झाले सानंद स्वस्थ सर्व जितकाशी[5],
ती शिबिरभूमि वाटे त्यांसि, मुमुक्षूंसि जेंवि हित काशी. २५
सात्यकिपांडुसुतांतें देव म्हणे, 'सूक्ति आयका माझी;
सोडूनि शिबिर राहों बाहेर चि मंगळार्थ[6] या आजी.' २६
युयुधान पांडुपुत्र प्रभुसह सत्वर निघोनियां गेले,
नेले शिबिराबाहिर ते ओघवतीनदीतटीं[7] ठेले. २७

## अध्याय आठवा.

तेथें धर्मप्रभुनें कल्याणाचा उपाय आठविला.
प्रार्थुनि नागपुरा[8]प्रति वशवर्ती[9] वासुदेव पाठविला. १
जनमेजय भूप म्हणे, 'कां पाठविला मुकुंद, सांग मला.
मन विटल्यावरि हि विभुसि उचित कुरुपुरप्रवेश कां गमला?'
प्रश्नातें बहु मानुनि वैशंपायन म्हणे, 'नृपा! परिस,

१. खजिन्यात. २. खजिन्यावरील अधिकाऱ्यांनी. ३. सखी. ४. समान आहे वर्तन व संकट जीचे अशी (राज्यश्री). ५. जयाने शोभणारे. ६. संग्रामसमाप्तीनंतर करावयाच्या मंगलविधींसाठी. ७. 'ओघवती' हे गुणवाचक विशेषनाम की काय? ८. हस्तिनापुरास. ९. ताब्यात राहणारा.

गांधारीधृतराष्ट्रक्रोधप्रशमार्थ धाडिलें हरिस.' ३
धर्म म्हणे देवातें, 'शरणागतदीनवत्सला बा! जें
होतें दुस्तर संकट तें त्वां सर्व हि निवारिलें माजें. ४
वधिला छळें[1] सुयोधन हें गांधारी सती न साहेल.
तीच्या उष्णश्वासें बा! अस्मद्भस्म ही न राहेल. ५
अत्यंत दुःसहा जसि कपिलाची दृष्टि[2] सगरसंततिस,
तसि पांडुसंततिस हे, स्तविती वहु इस हि जेंवि संत तिस.
त्या दवदहनापासुनि[3] ते जैसे रक्षिले सखे गोप,
हे हि तसे रक्षावे गांधारीचा हरूनियां कोप. ७
शीघ्र करावें, मानुनि गांधारी ती पृथा, प्रसादन[4] हो!
केला जो आजिवरि प्रभुजी! तो हा वृथा प्रसाद न हो.' ८
कृष्ण म्हणे, 'स्वस्थ रहा, हा मीं जातों, तुजी च तुज आजि
रक्षील साधुता; या सिद्धिपुढें उक्ति युक्ति किति माजी? ९
पुण्यश्लोका धर्मा! त्वत्कीर्ति सखी सुरापगेला हो,'
वदुनि असें वसुनि रथीं कुरुनगरा तो दुराप[6] गेला हो! १०
होता धृतराष्ट्रनिकट सद्विद्याकीर्तिशांतिसदन मुनी
श्रीव्यासदेव, देवें[7] केला समुदश्रु[8] साश्रु पद नमुनी. ११
वंदुनि धृतराष्ट्रातें, गांधारीतें मुकुंद मग वंदी;
सस्वर रडे दयानिधि तो, ज्याचे वेद देव मुनि बंदी. १२
केलें शोकसमुद्भवबाष्पविमोक्षण[10] मुहूर्तभरि अजितें;
अजि! तें प्रभुवात्सल्य चि वत्सळपण पितृजनीं[11] नवें सजितें[12].

१. कपटें. २. मागें पृष्ठांक २६३, तिसरी टीप पहा. ३. एके वेळीं वणव्यांत सापडलेल्या गायी व गोपाळ यांचें—तो वणवा योगसामर्थ्यानें गिळून—कृष्णानें रक्षण केल्याची कथा आहे. ४. प्रसन्न होण्याचा उपाय. ५. गंगेला. ६ [तपश्चर्येनें हि] दुर्लभ असा. ७. श्रीकृष्णानें. ८. आनंदाश्रुयुक्त. ९. मोठ्या स्वरानें. १०. शोकानें उत्पन्न होणाऱ्या दुःखाश्रूंचा त्याग. ११. वडिलांच्या (धृतराष्ट्र व गांधारी यांच्या) ठायीं. १२. उत्पन्न करितें.

मग नयनें प्रक्षाळुनि शुद्धजळें करुनि सविधि आचमन,
प्रभु करि सांत्वोपक्रम[1], नृपकोपाचें करावया शमन. १४
'देवा! वेदीं शास्त्रीं कांहीं अविदित पदार्थ तुज नाहीं;
जाणसि काळगतिः तुजें स्तविलें सुज्ञत्व सर्वसुजनाहीं. १५
व्हावा न स्वकुळक्षय, न क्षत्रक्षय, म्हणोनि वहु केला
पांडुसुतानीं यत्न, प्रभुजी! तो सर्व हीं वृथा गेला. १६
विपदाहद्यूतच्छळवनवासाज्ञातवास साहूनीं
आले शरण तुज, समय[2] न विलंघुनि शासनांत[3] राहूनीं. १७
जेंवि वहु अशक्तांहीं भोगावे क्लेश, तेंवि शक्तांहीं
बा! भोगिले निरंतर पांडुसुतांहीं त्वदंघ्रिभक्तांहीं. १८
द्यावें राज्य मदुक्तें, द्यावीं पांचां न पांच कां गावें?
मति मारिली तुझी हीं. विधिच्चें[4] सामर्थ्य काय सांगावें! १९
भीष्म, द्रोण, कृप. विदुर यांचें वच तुज न मानलें कांहीं,
केला या मुनिचा[5] हीं कथितां हितगुज न मान लेकांहीं. २०
अणु हि अतिक्रम नाहीं पांडुसुतांचा, प्रभो! न कोपावें.
निजयष्टि अनुजसंतति हे हातींची त्यजूं नको, पावें. २१
असि हि दुःखित देखुनि धर्ममन जसें मुलास कळकळतें,
रडतो अजातरिपु वा!, शीळ तयाचें तुला सकळ कळतें. २२
त्वां पांडव रक्षावे, हित धर्मा आणि या वयाला जें:
यावा पाय धराया, परि राजा! धर्म यावया लाजे. २३
पांच तयांचीं नमनें, बा! माजें हें तुला नमन सावें,
धर्मज्ञा सर्वज्ञा व्याससुता! त्वन्मनीं तम[6] नसावें.' २४
मग गांधारीस म्हणे, "देवि! महामति! बुडों नको शोकीं,
सति! सुव्रते! तुजसमा दुसरी सीमंतिनी[7] नसे लोकीं. २५
दुःसह सुतशोक तुला शिवला जैसा दवाग्नि कदलीसः

१. सांत्वनास प्रारंभ. २. करार. ३. आज्ञेत. ४. देवाचें. ५. व्यासाचा. ६. मोह; अज्ञान. ७. स्त्री.

करिसील काय ? तूं तों श्रुतिसी कवि[1]माहित विहित वदलीस. २६
न तुझी सुयोधनानें धर्मार्थमयी सदुक्ति आयकिली,
रक्षील धनद[2]दत्ता निधिसदना[3]ची अभाग्य काय किली ? २७
देवि ! मुमूर्षु[4]जन न घे ओखद, न करी च सर्वथा पथ्य;
वदलीस 'धर्म जिकडे तिकडे जय,' तें चि जाहलें तथ्य. २८
न धरावी पार्थांची[5] त्वां सति ! सोडुनि दया विनाशमती,
दैवप्राप्तें दुःखें न च सुविवेकोदयाविना शमती. २९
उग्र तप, तुझें करिसिल भस्म चि उघडूनि नयन वसुधेतें:
विषशक्तितें[6] तसि च तव दृक् देती नित्य भय नव सुधेतें. ३०
सति ! पुत्रपंचक, अतुळ शुचि निजतप ही, करीं जतन यांतें,
तनयांतें देवि ! विसर, आतां शोचूं नको, गतनयातें.[7]" ३१
गांधारी प्रभुसि म्हणे, 'चळली होती मति स्वसुतपातें,
बा ! कोप भस्म करिता सानुज धर्मासह स्व-सु-तपातें. ३२
कालिय दवडुनि शांता केली जसि दक्षजातनयदुहिता[8],
तसि हे हि कोप निरसुनि; बा ! त्वदधिक आप्त[9] तात[10] न यदुहिता !
या वृद्धा अंधा हतपुत्रा राज्यास पांडुसुतसहित
तूं चि गति, दीनबंधो ! बहु केलें आठवूं नको अहित.' ३४
ऐसें बोलोनि रडे राज्ञी झांकूनि वदन पदरानें,
द्रवला देव, उरविला ज्याच्या ध्रुवबुद्धिमोह न दरानें[11]. ३५
प्रभुनें बहु प्रकारें सांत्वुनि, केला उणा विलाप तिचा;
जीणें रडोनि सस्वर[12] सुतशोकज्वर दुणाविला पतिचा. ३६

१. शहाण्या लोकास मान्य असे. २. कुबेराने दिलेला. ३. भांडाराचा. ४. मरणाची इच्छा करणारा. ५. पांडवांची. ६. [कोपकाली] विषशक्तीते तसि च [प्रसादकाली] नवसुधेते लाजवी. ७. गेली आहे नीति ज्यापासून अशा तनयाते. ८. अदितिपुत्राची (सूर्याची) कन्या यमुना. (कथासदर्भ मागे पृष्ठांक २०५, टीप सहावी पहा). ९. इष्टमित्र. १०. बाप. ११. शखाने. (ध्रुवबाळाची कथा प्रसिद्ध च आहे). १२. मोठ्या सुराने.

व्यासाला, राज्याला, गांधारीला नमूनि झडकरि तो,
उठला भक्तमयूरांवरि जो करुणामृताब्द [1]झड करितो. ३७
वदला देव, ‘ कुरुवरा ! त्वां न करावा चि शोक या प्राज्ञा !
उठलों सत्वर पांडव संरक्षायासि, दे मला आज्ञा. . ३८
द्रोणसुताचा, पांडव मारावे मारिला जिहीं बाप,
पाप अभिप्राय असा कळला: तो दुखविला जसा साप.’ ३९
भूप म्हणे, ‘ कृष्णा ! जा, [2]वत्सांला व्यसन हें न बाधावें.’
देवी हि म्हणे, ‘ करिवररक्षार्थ जसा तसा चि बा ! धावें.’ ४०
भगवान् भक्तभय हरुनि जाय स्वरथीं बसोनि वेगानें,
ज्याच्या शुद्ध यशाच्या, ताप कसा तरि असो निवे, गानें. ४१
कर्णद्वारें व्यासप्रभु बोधसुधा [3]परी सुता पाजी,
जीतें लाजे [4]ती ही जिववुनि हरिती परासु तापा [5]जी. ४२

## अध्याय नववा.

धृतराष्ट्र म्हणे, ‘ सूता ! भीमानें मस्तकीं दिला पाय,
[6]भग्नोरु [7]पांडवाहित मानी मत्पुत्र बोलिला काय ?’ १
सूत म्हणे:-काय पुससि ? ज्याचें न कधीं हि पादतळ मळलें,
तें राजरत्न तैसें, जैसें धूळींत याद तळमळलें ! २
ज्याच्या आंगीं अयुतद्विपबळ ऐसा समर्थ लोकेश,
जो [8]परशतनियमनपटु [9]नियमी कष्टकरूनि तो केश. ३
रडत मजकडे पाहुनि, निंदुनि धर्मासि, सोडुनि श्वास,
वदला भूप असें कीं, “ न धरावा साधुचा हि विश्वास. ४

१. सततवर्षाव. २. पांडवांना. ३. श्रेष्ठ अशा. ४. धृतराष्ट्रास. ५. जी परासु (मृत) जिववुनि (जीवत करून) तापा हारिती ती ही (प्रसिद्ध सुधा). ६. मोडल्या आहेत मांड्या ज्याच्या असा. ७. पांडवांचा शत्रु. ८. शेकडों शत्रूंना कह्यांत ठेवण्यास समर्थ. ९. बांधी.

भीष्म, द्रोण, जयद्रथ, मद्रप, भूरिश्रवा, कृपाचार्य,
शकुनी, अश्वत्थामा, कृतवर्मा, कर्ण, वीरवर आर्य, ५
हे सर्व नाथ होते, तरि हि अवस्था पहा कसी झाली?
'दुरतिक्रम काळ' असी वृद्धोक्ति, तिची प्रतीति मज आली.
एकादशसेनापति मीं या कुदशेसि पावलों आजिः
काळापुढें तृण चि तो, शक्रशतासीं हि करिल जो आजि. ७
लंघुनि समय गदेनें भीमें केलें मदूरुयुगमथन,
असतील वांचले जे त्यांसि करावें असें तुवां कथन. ८
कपटें श्रीभीष्मप्रभु, गुरु हि, जयद्रथ हि पांडुतनयांहीं,
भूरिश्रवा हि कर्ण हि मथिला बहु साधु शूरजन यांहीं. ९
मोडुनि मदूरु, पाडुनि मज, माजें मर्दिलें शिर पदानें,
यापरिस चित्र दुसरें काय करावें अधार्मिकमदानें? १०
तातातें मातेतें नमुनि असें सांग संजया वा! कीं,
'केलें राज्य अकंटक, पुष्कळ सुख भोगिलें जसें नाकीं. ११
विष्णुपदीं पिंड तसा शत्रुशिरीं देय पाय जो डावा,
तो म्यां दिला, अधिक याहुनि जन्मुनि अर्थ काय जोडावा?
होउनि पराजित परप्रेष्य न मीं जाहलों, न हें थोडें;
अरिहृतपदोपजीवन खाजविजे जेंवि आपुलें घोडें. १३
हें बहु बरवें, मजवरि असतां मीं श्री कधीं न रागेलीः
देती लाज तसी हे, त्यागुनियां स्त्री जसी नरा गेली. १४
आमरण पांडवांसीं माजा निर्विघ्न चालिला दावा,
दैवें सुपुरुषपुंगव अभिमानभरें असा चि लादावा. १५
सुक्षत्रियांसि जी गति बहुमान्या ती च हे मला घडली,

१. सामर्थ्यवान. २. अकरा [अक्षौहिणी] सेनेचा अधिपति असा. ३. नियम. ४. माझ्या दोन्ही मांड्यांचा भग. ५. आश्चर्यकारक. ६. देण्यास योग्य. ७. शत्रूंचा सेवक. ८. अरिहृत आपुलें घोडें आपण जसें खाजवावें तसें स्वपद अरिहृत जालें असतां तदुपजीवन अत्यनुचित—**पंत.**

तनु मनुपूत[1] घृताहुति मखशिखिकुंडीं[2] तसी रणीं पडली. १६
शस्त्रें विषें वधावा जैसा सुप्त प्रमत्त अनयानें,
वधिला तसा अधर्में हा तेजस्वींद्र पांडुतनयानें. १७
या छळवधें परांचें दुर्यश, माजें जगीं सुयश जालें:
आजन्मसदाचारें यावें तें सुफळ सेवटीं आलें.' १८
कृप, कृतवर्मा, अश्वत्थामा यांतें निरोप सांग असा,
'पांडव खळ छळबळें वध करितिल, फार सावधान असा. १९
गुरु, सुत, बंधु, सुहृज्जन गेले स्वर्गासि सर्व हि नीट,
मी हि निघालों, आला प्रांतविरस[3] विषय[4] समजतां वीट.' २०
व्याकुळ होइल माता तात सुतांच्या सदा विलापानें.
शोकें बहु, न विषाच्या बहु ताप त्रास दाविला पानें. २१
पतिबंधुलयें दीना होइल धीरा परें स्वसा[6] माजी,
मज मायसी म्हणे बा! 'कर गा! देउनि परस्व[7] सामा' जी. २२
होईल लक्ष्मणाची बहुधा पृथुलोचना[8] प्रसू[9] नाहीं[10],
वज्रप्रहार सोसिल कासि, व्हावी मूर्छिता प्रसूनाहीं[11]? २३
जरि काय वाग्विशारद[12] येता चार्वाक[13], बहु बरें होतें:
करिता अपचिति[14] माजी: दुःसाध्य हि कार्य साधिता तो तें."
ऐसे विलाप बहुविध केले सांगों नृपा! किती काय?
बहु जन ऐकुनि रडले, पडले शोकांत, बोलिले 'हाय!' २५
सचराचरा धरा ही त्या समयीं कांपली नरवरा! हे,
लोक पळे मृग हि खग हि ऐकुनि तन्निकट तो न रव राहे. २६

१. मन्त्राने पवित्र. २. यज्ञांतील अग्निकुंडात. ३. अंतीं कंटाळवाणा. ४. राज्योपभोगादि. ५. परत. ६. भगिनी, दुःशला. (जयद्रथस्त्री). ७. शत्रूचे द्रव्य (राज्यं). ८. विशाललोचना. ९. माता. १०. मरून जाईल. ११. 'पुष्पांच्या योगाने.' १२. भाषणांत चतुर. १३. चार्वाक नावाचा दुर्योधनपक्षीय राक्षस. १४. पूजा.

अश्वत्थाम्यातें तो युद्धव्यवहार त्या जनें कथिला
कीं, 'भीमें ऊरुद्वय भंगूनि गदायुधें नृपति मथिला.' २७

# अध्याय दहावा.

भोज, कृप, द्रौणि तिघे आले धांवोनि शोणित वहात,
मनिं म्हणति, 'खळा भीमा! कैसा धरिला न कोणि तव हात?'
धांवडिले सूतांहीं त्या वीरांचे महाजवन वाजी,
होतें क्षतार्त परि ते दाखविती प्रतिपदीं जव नवा जी! २
येउनि विलोकिला कुरुराज तिहीं प्रमथितोरु पतित रणीं,
हरिहत गज कीं राहुग्रस्त समस्तग्रहाधिपति तरणी. ३
भूतक्रव्यादांहीं परिवृत सर्वत्र उग्रकृत्यांहीं,
तो दुर्योधन, भूपतिसत्तम जैसा धनार्थिभृत्यांहीं. ४
मोह तिघांस हि झाला, त्यां ती कष्टा दशा पहावेना;
सर्वस्वहानि सोसे, प्रभुहानि कुलजमना सहावेना. ५
उतरुनि रथावरुनि ते बसले कुरुपतिसमीप वीर तिघे,
तन्मति तसी जसी पतिदाहीं दुःसह दशा नवी रति घे. ६
वसतां समीप आला त्यां धीरांला हि हुंडका राज्या!
तो ताप काय सांगों, जोडी कर अग्निकुंडकारा ज्या? ७
द्रौणि म्हणे, "हा! किमपि न यश आलें आमुच्या धनुष्यांतें,
बहुधा सहाय होउनि यश द्यावें हें नव्हे मनुष्यांतें. ८
नसतें असें तरि तुजी होती राज्या! असी दशा कां गा!?
लागावी कस्तूरी पुष्कळ त्या धूळि लागली आंगा! ९

१. रक्त. २. मोडल्या आहेत मांड्या ज्याच्या असा. ३. वेढलेला. ४. भयकर कृत्यें करणाऱ्यानीं. भूतानीं व राक्षसानीं. ५. द्रव्येच्छु सेवकानीं. ६. अग्निकुंडरूप कारागृह. ७. बहुतप्रकारें सहाय करून हि यश देणें हें मनुष्याच्या हातून होणारें नाहीं. * शंकरानीं मदन जाळून टाकला तेव्हां.

त्यास क्रव्याद् जपति, होते बहु जपत ज्या सदा ज्ञाती;
गेली कोठें गा! ती शक्राचीसी तुझी सदाज्ञा ती? १०
दुःशासनादि सोदर कोठें, कोठें तुजा सखा कर्ण,
कोठें शकुनि जयद्रथ, ज्यां भाग्य तुजें जसें झषां अर्ण? ११
कोठें छत्र तुजें तें? बा! केलीं आजि काय तीं चवरें?
गमति उतरलीं विधिंच्या जीं गगनांतूनि आयतीं च वरें. १२
'चपळा श्री' हें सत्यः प्रत्यय आला मनास, न च खोटा;
रविसा कवि साधुमहित दाटुनि लावील दोष न चखोटा." १३
नेत्र पुसुनि सर्वांतें भूप म्हणे, "शोक काय हो! याचा?
मर्त्यांचा केव्हां तरि भस्म चि विपदोक काय होयाचा. १४
तरि होता घात, जरि व्यसनीं सांभाळितों न टेंकेला,
मानी हांसुनि म्हणते मज, 'वीराभिनय या नटें केला.' १५
पडला शात्रवशस्त्रें समरांत समंतपंचकीं काय,
कां करितां शोक उगे? पडलों रोगार्त मंचकीं काय? १६
पावे अनंतसुकृतें क्षत्रिय समरांत कायहानि बरा,
होइल वांचोनि सुचिर रुचिरगृहीं लाभ काय हा निबरा? १७
उरलें तेजें, अधर्में वधिला धार्मिक परें, बरें जालें;
आलें मनास माज्या, तीक्ष्ण हि परि पथ्य हें जसें आलें. १८
मेलों बहुभाग्याचा मीं निहतज्ञातिबांधव स्पष्ट,
उरतों, शोकें झुरतों; स्वजनवियोगाअसा नसे कष्ट. १९
धर्मभ्रष्ट न झालों, हा कृष्णाचा प्रभाव, न दुज्याचा,
पूर्वज वसिष्ठनामा सन्महितयशा तसा चि यदु ज्याचा. २०
उरलां प्रळयांत तिघे, जालें प्रिय परम आजि हें माजें,

१ मोठी सत्ता. २. माशास. ३. पाणी. ४. ब्रह्मदेवाच्या वराने. ५. चांगल्यास. ६. विपत्तिगृह–पंत. ७. धैर्यास. ८. वीराचा आविर्भाव, बतावणी. ९. शत्रूच्या शस्त्रानें. १०. या नांवाच्या क्षेत्रात. ११. म्हाताऱ्यास. १२. कीर्ति, १३. मूळांत ह्या वसिष्ठाचा उल्लेख नाहीं; मग हा कोण?

द्याया अशक्य सदमृतरसपाना मेरुतुल्यहेमा जें[1]. २१
मज जय जोडुनि द्याया यत्न तुम्हीं साधुनीं भला केला,
'दुरतिक्रमा[2] नियति[3] जनकृतिला[4]' मुनिदृष्टि[5] जसि बलाकेला.
न करावा शोक तुम्हीं अवलोकुनि हे असी दशा माजी,
वेद प्रमाण जरि तरि म्यां अक्षय लोक जिंकिले आजि." २३
ऐसी वदोनि वाणी आणी पाणी नृपाळ नयनांत,
लोळे रजांत, निजता[6] मृदुलपयःफेनशुभ्रशयनांत[7]. २४
द्रौणि बहु रडोनि म्हणे, 'मज लोकांला न दाखवे वदन,
दे आज्ञा त्या सकळां पांचाळांचें करावया कदन. २५
वधिला कपट करुनि गुरुवर्य त्रैलोक्यमान्य अधमानीं,
ऋजुयोधी तूं हि प्रभु जालासि तसा चि लब्धवध[8] मानी. २६
धर्में वधितें तरि मज न तुजा[9] बहु शोक बाणता पातें,
देता शिरोनि हृदयीं न असा विषदिग्ध[10] बाण तापातें. २७
न तसा स्वतातघातें जालों मीं तप्त, जेंवि तव घातें:
शिशुसख्य[11] आमुचें जें जाणे क्षितिवरिल लोक अवघा तें. २८
कृष्णसमक्ष परांतें प्रेषीन प्रेतराज[12]भवना मीं,
अरिलयबळ मच्छस्त्रीं, अघलयसामर्थ्य जेंवि भवनामीं[13]. २९
आहेसि योग्य आज्ञा द्याया, ऋण आजि सर्व वारीन;
त्या तातघातकांतें[14] मीं सर्व उपाय करुनि मारीन.' ३०

---

१. प्रिय. २ अलघनीय. ३. दैव. ४. यत्नाला–**पंत.** ५. कौशिकदृष्ट्या बलाका दग्धा–**पंत.** कौशिकनामक एक तपस्वी ब्राह्मण एका झाडाखाली वेदपठन करीत बसला असता त्याच्या मस्तकावर वरून एका बगळीने पुरीषोत्सर्ग केला; यामुळे ब्राह्मणाने क्रुद्ध होऊन तिजकडे अनिष्टचिंतनपूर्वक पाहिले तो ती मरून पडली. ( महाभारत–वनपर्व अध्याय २०५ कलकत्ता-प्रत ). ६. निजत आला–**पंत.** ७. मऊ व दुधाच्या फेसासारख्या पांढऱ्या शयनावर. ८. प्राप्त जाला आहे वध ज्यांला. ९. तुझ्या–दुर्योधनाच्या–मरणानें. १०. विषयुक्त. ११. बालमैत्री. १२. यमनगरास. १३. शंकराच्या नावांत. १४. पांडवांनी.

गुरुपुत्रपणश्रवणें बहुत चि तो मानिवर्य सुख पावे;
आलें मनास. कोण व्यसनीं न म्हणेल 'अर्यसु खपावे'? ३१
नृप कृपमुखाकडे अवलोकुनि म्हणे, 'अहो! उठा तूर्ण
आचार्य तुम्हीं, येथें आणावा कलश करुनि जलपूर्ण.' ३२
जलपूर्ण कलश घेउनि येतां त्यातें म्हणे नृप, "प्राज्ञा!
अभिषेक द्रौणिशिरीं शीघ्र करीं, म्यां दिली तुला आज्ञा. ३३
मत्प्रिय इच्छित अससिल तरि आग्रह या करूं नको कार्या,
अभिषेक करुनि सेनापति तूर्ण द्रौणिला करीं आर्या! ३४
'राजनियोगें विप्रें युद्ध करावें धरूनि चापातें,'
वेदज्ञ असें वदती, जाणसि तूं हीं समग्र बापा! तें." ३५
अभिषेचिला कृपानें दुर्योधनचित्तरंजना भाचा,
पावकितें अभिषेची पूर्वी सुत जेंवि कंजनाभाचा. ३६
अभिषिक्त द्रौणि नृपा! आलिंगुनियां सुयोधना सिद्ध
होय, निघे गर्जुनि, तृण भस्म कराया शिखी जसा इद्ध. ३७
गेले तिघे हि देउनि आपुलिया लाज तळमळ तपातें,
धूळींत मीनसा बहु होता कुरुराज तळमळत पातें. ३८
हर्षाति पावोनि जसे साधु-रसि-कवि प्रयागदा पर्वा,
निवतील तसे पाहुनि साधु रसिक विप्र या गदापर्वा. ३९
हें पर्वपुष्प वाहे श्रीरामपदीं मयूर तो भावें,
शोभावें साधुशिरीं, यासि रसिकमधुपवृंद लोभावें. ४०

इति श्रीमहाभारते श्रीरामनंदनमयूरविरचिते गदापर्व समाप्तम्॥ श्रीकृष्णार्पणमस्तु॥
श्रीराम जय राम जय जय राम॥

१. शत्रूचे प्राण. २. नकारार्थी. ३. राजाज्ञेने. ४. कार्तिकेयास. ५. कमलनाभ विष्णूचा पुत्र ब्रह्मदेव. ६. अग्नि. ७. प्रदीप्त. ८. चांगले रसिक असे विद्वान् लोक. ९. प्रयागफल देणाऱ्या. १०. रसिकरूप भ्रमराचा समुदाय.

# सौप्तिकपर्व[1].

## अध्याय पहिला.

वाडववीर[2] गुरुतनय, कृप, कृतवर्मा निघोनियां[3] गेले,
शिबिरासमीप[4] जावुनि रात्रिमुखीं[5] ते मुहूर्तभरि[6] ठेले.
शिबिरीं पांडवकटकध्वनितें परिसोनि, आपणावरि ते
येतात असें मानुनि जाले तेथुनि पलायना करिते.
धावुनि वनांत जावुनि पाहुनि तेथें विशाळ एक वट,
उतरोनि[7] करुनि संध्या बसले चिंता करीत एकवट.
अत्यंत श्रांत क्षतदेह[8] क्षतजें[9] सचैल[10] ते भिजले,
जरि वरशयनोचित[11] तरि कृपकृतवर्मा धरातळीं निजले.
होता तसा चि जागा द्रौणि ज्वरदग्धकायसा[12] राती[13],
वटवासिवायसांतें मारी तों एक वायसाराती[14].
काकांचें कदन करी कौशिक[15] होऊनि रात्रिबळमत्त[16]
त्या नीचापासुनि हीं गुण घे गुरुपुत्र जेंवि मुनि दत्त[17].

१. भारतीयुद्धाच्या शेवटच्या दिवशीं रात्रीं धृष्टद्युम्नादि पांडववीर शिबिरांत सुप्त ( निद्रित ) असतां अश्वत्थाम्यानें छापा घालून त्यांस ठार केलें, असा कथाभाग असल्यामुळें ह्या पर्वास **सौप्तिकपर्व** हें नांव आहे. २. ब्राह्मणयोद्धा. ( हें गुरुतनय व कृप यांचें विशेषण ). ३. समरभूमीवर दुर्योधन पडला होता तेथून. ४. [ आपल्या ] छावणीजवळ. ५. संध्याकाळीं. ६. दोन घटका. ( कांहीं वेळ ). ७. रथांतून. ८. शरीरास जखमा झालेले. ९. रक्तानें. १०. वस्त्रासहित. ११. चांगल्या बिछान्यावर निजण्यास योग्य. १२. तापानें पोळत आहे शरीर ज्याचें. १३. रात्रीं. १४. कावळ्यांचा शत्रु; घुबड. १५. घुबड. १६. रात्रीच्या वेळीं बळानें माजलेला. १७. दत्तात्रेयानें चोवीस गुरु केले; त्यांत सर्प, कपोत इत्यादि तिर्यक् योनींतील प्राण्यांपासून हि उपदेश घेतला.

उठवुनि त्यांसि[1] म्हणे, 'हो! कार्य परोच्छेद; यांत मन घाला;
घाला घालूं त्यांवरि, ज्यांहीं वधिलें छळूनि अनघाला[2].' ७
कृप त्यास म्हणे, 'बापा! सुप्तांचा वध करू नये रातीं,
योग्या न तुज मनोरथसिद्धि अधर्मेंकरून; येरा ती. ८
होवूं स्वस्थ प्रातःकाळीं च करूं परांसवें युद्ध;
क्रुद्ध पुरुष अंध, तया यश साधेना चि साहसें शुद्ध.' ९
द्रौणि म्हणे, "वध केले त्यांहीं धर्में चि काय हो मामा!?
म्हणतां मजला चि तुम्हीं कां, करितां शत्रुकायहोमा, 'मा[3]'? १०
छळवृत्तें मत्प्राण व्याकुळ होतात; घातलें कानें
आंत विष चि; सोसावा कैसा हो! तातघात लेंकानें? ११
कैसें निवेल तातघ्नवधावांचूनि[4] आज हें मन गा!?
मच्छोकनगगुरुत्वें[5] जाली च असेल लाज हेमनगा[6]. १२
कुरुपतिच्या करुनि तशा त्या करुणविलापपंक्तिचें[7] श्रवण,
कवण द्रवे न ऐसा कठिन? जळीं काय न द्रवे लवण? १३
घालूं नको कसा पितृघातकघाता असोनि नर[8] कास?
सुप्तहननदुरितें[9] मीं भोगीन सुखें वसोनि नरकास." १४
योधा[10] या रोधाया बोधें शकला न मातुळ, न भोज;
ते दोघे घन गमले अनिवार्य द्रोणनंदन नभोज[11]. १५
एकांतीं स्वरथातें सिद्ध करी, त्यासि भोज कृप पुसती,
'बा! काय योजिलें त्वां? संगति सोडूं नये जसी सुसती. १६
वर्तों एकविचारें त्यजितोसि प्रीति, रीति कां गा! ती?

---

१. कृपाचार्य व कृतवर्मा यांस. २. निष्पाप अशा (द्रोणास). ३. नको. ४. प्रारंभीं हा चरण 'तातघ्नवधावांचूनि कैसें निवेल आज हें मन गा!' असा लिहिला गेला होता, तो अक्षरांक घालून कवीनें सदरप्रमाणें दुरुस्त केला आहे. ५. माझ्या शोकरूप पर्वताच्या मोठेपणानें. ६. मेरुपर्वतास. ७. हृदयद्रावक अशा अनेक शोकवचनांचें. ८. पुरुषासारखा पुरुष असून. ९. झोपीं गेलेल्यांच्या वधाच्या पापानें. १०. योद्धयास. ११. वायु—पंत.

आम्हीं समसुखदुःख व्यसनीं आहों तुजे चि सांगाती.' १७
द्रौणि म्हणे, " पितरांचें जों ऋण, सुखकीर्तिचें पद न ये तों,
यास्तव 'हो सिद्धि' म्हणा, सज्य असा, करुनि अरिकदन येतों."
ऐसें सांगोनि निघे, [1]विधि, [2]शिबिरीं, क्षोभतां, तडक राया!
शिकवी काम हि कोप हि तिसरा ही लोभ तांतड कराया.
कृप भोज सिद्ध होउनि गेले गुण कार्मुकासि जोडूनीं,
करितील काय तैशा त्या व्यसनीं गुरुसुतासि सोडूनीं? २०
अश्वत्थामा जावुनि जों त्या शिबिरीं शिरावया पाहे
तों एक अपूर्व [3]महद्भूत द्वारापुढें उभें आहे. २१
[4]बहुशतचंद्रार्कद्युति बहुशतभुज बहुशताक्ष बहुरूप
कनकनग हि विघरावा यत्तेजें, पावकें जसें तृप. २२
बहुशस्त्रव्याघ्राजिनधर उग्र [5]प्रोच्च जेंवि [6]विंध्यधर
[7]नागमयांगद-कुंडल-हार-कटक-मध्य-यज्ञसूत्र-धर. २३
तत्सर्वांगांतूनि ज्वाळा प्रलयाग्निच्या तशा निघती,
[8]विद्युन्कोटिसपत्नी तैशा त्या दशदिगंतरीं रिघती. २४
त्याच्या तेजःकिरणांपासुनि सहसा [9]गदासरोजकर
बहुशतसहस्र जाले प्रकट [10]हृषीकेश शंखचक्रधर. २५
अत्यद्भुत भूतातें भ्याला न द्रौणि, तो महाधीट
योजी शस्त्रें अस्त्रें राहुनियां त्यापुढें उभा नीट. २६
गिळिला चि महद्भूतें [11]शस्त्रास्त्रप्रकर जेंवि सुग्रास,
तन्हि हाणी शक्तिगदाखड्गांहीं धरुनि धैर्य उग्रास. २७

१. दैव फिरल्यामुळे. (विपरीत बुद्धि हीं दैव फिरल्याचे चिन्ह). २. पाडवांच्या ३. मोठा प्राणी. ४. शेंकडों चद्रसूर्यांप्रमाणे तेजस्वी. ५. अति उच्च. ६. विंध्यपर्वत. ७. सर्पांचीं केलेली बाहुभूषणें, कर्णभूषणे, हार, कडीं, कटिदोरा व यज्ञोपवीत हीं धारण करणारा. ८. कोट्यवधि विजांसारख्या (तेजस्वी). ९. गदा व कमळें हातांत असणारे. १०. इंद्रियांचा नियंता. (कृष्ण). ११. समुदाय.

त्यांतें हि महद्भूत ग्रासी, ज्वलनास्य[1] दर्भकवळांतें[2],
किंवा क्षुधिततर गरुडमुख जेंवि फणाभृद्दर्भकवळांतें[3]. २८
शस्त्रें सरलीं, कैसे रक्षितिल दमुनि दवा वना काशें[4]?
पाहे जनार्दनाहीं जाला आकाश तो अनाकाश[5]. २९
द्रौणि म्हणे, 'ज्ञानार्थ श्रीगुरुचरणांसि आदरें भजलों,
तन्हि मीं जड जाणुनि बहुदारुण पातक करावया सजलों. ३०
पापें मति बहु मळली, न मज महद्भूत कोण हें समजे;
ते ज्ञानी, धार्मिक गुरुवत्सळ सर्वत्र सर्वदा सम जे. ३१
जावें शरण शिवाला, जो या ब्रह्मोपपदवदंडातें[6]
आश्रय वरद प्रभु, या तो चि निवारील दैवदंडातें[7].' ३२
हें योजुनि उतरे धृतसत्व[8] रथावरुनि, जोडुनि करातें
स्तवुनि म्हणे, 'सोमप्रभु[9] सत्वर थांवरु[10] निजोडुनिकरातें[11]. ३३
वरदेश्वरा! शरण्या! तारीं शरणागता पहा देवा!
मीं सर्वभूतरूपें उपहारें[12] यजिन तुज महादेवा!' ३४
जाउनि शरण मनोगत जेव्हां तो वीर वाडव निवेदी,
सत्व पहाया प्रभुनें तत्काळ प्रकटिली कनकवेदी[13]. ३५
त्या कांचनवेदींत प्रकटे भगवान् शिखी[14] महाकील[15],
वाटे, याला पाहिल तरि रवि हरि[16] शीघ्र कां न हाकील? ३६
प्रभुपार्षद[17] प्रथमगण[18] नानाकार प्रचंड बहु आले;
भ्यावे शक्राचे हि, न परि डोळे द्रौणिचे तयां भ्याले. ३७

१. अग्निमुख. २. दर्भाच्या जुडींस. ३. बालभर्पांच्या समूहास. ४. तृणविशेष. ५. अनवकाश. (सर्व आकाश भरून गेलें) ६. 'ब्रह्म' या उपपदानें युक्त अशा अंडास=ब्रह्मांडास. ७. देवानें केलेल्या शिक्षेस. ८. धैर्यवत. ९. सोमप्रभु (सांबशिव) हा च सोमप्रभु (चंद्र). १०. स्थिर करो. ११. [आकाशांत प्रकट झालेल्या हजारों हर्षाकेशरूपी] आपल्या नक्षत्रसमुदायास. १२. पंचमहाभूतात्मक देहाचा बली देऊन. १३. सुवर्णमय यज्ञभूमि. १४. अग्नि. १५. प्रज्वलित. १६. घोडे. १७. शंकराचे सेवक. १८. गणविशेष.

द्रौणि म्हणे, 'श्रीरुद्रा! आत्मार्पण करुनि तुज [1]निवे दीन,
[2]आत्मोपहार आजि ब्राह्मण [3]आंगिरस मीं [4]निवेदीन: ३८

मज हे [5]अशक्य अरि जरि, तरि घे मातें, [6]दहांत यश राहो;
म्यां ब्राह्मणें वदावें बहु काय? तुज्या सदा जय शरा हो.' ३९

ऐसें वदोनि कांचनवेदींत हुताशनीं शिरोनि हि, तें
[7]ब्रह्म बसुनि चिंती, जें शोभित दोषाकरें [8]शिरोनिहितें. ४०

होय प्रसन्न पाहुनि देव तया द्रोणसंभवा [9][10]हविते:
प्रेम, प्रवाहपतिता सर्वांस हि जेंवि अं[11]भें, वाहवितें. ४१

श्रीशंभु म्हणे, 'द्रौणे! सत्यतपःप्रमुखगुणगणें [12]सजला
भजला कृष्ण बहु; असा प्रियपुरुष जगत्त्रयीं नसे मजला. ४२

[13]आर्जव, शौच, त्याग, क्षांति, नियम, बुद्धि, भक्ति, धृति यांहीं
केलें सदा मदाराधन कृष्णें, न पडलें उणें कांहीं. ४३

यदुपतिसंमाना[14]र्थ त्वत्सत्वपरीक्षणार्थ बहुधा या
माया केल्या, रक्षुनि पांचाळ, यशें स्वभक्त बहु [15]धाया. ४४

पांचाळादिशिबिरगत काळाचें सकळ जाहले [16]कवळ,
आयुष्य आजि सरलें सर्वांचें, समय पातला जवळ. ४५

षडरि करिति जनजीवितहानि, जसें [17]कलशतोयहानि [18]घरे:
जा, हो निमित्त, घे असि स्थिर; साक्षात् काळ होय हा, निघ रे!'

ऐसें वदोनि दिधला प्रभुनें असि विजयजनक विप्रकरीं,
सूचविलें सकळमनोरथपूरक निजयजन [19]कविप्रकरीं. ४७

१. समाधान पावले. २. आत्माहुति. ३. अंगिरसकुलोत्पन्न. (ब्रह्मदेव—अंगिरस—बृहस्पति—द्रोण—अश्वत्थामा). ४. अर्पण करीन. ५. [जिंकिले जाणे] अशक्य. ६. दहा लोकांत, जनांत. ७. शिवरूप ब्रह्म. ८. चंद्रानें. ९. मस्तकावर असलेल्या. १०. अश्वत्थामारूप होमद्रव्यास. ११. पाणी. १२. सजलेला (कृष्ण). १३. सरळपणा. १४. श्रीकृष्णास मान देण्याकरितां. १५. संतुष्ट होण्यास. १६. घास. १७. घागरींतील पाण्याचा नाश. १८. छिद्रें—पंत. १९. ज्ञानी लोकांत.

देउनि करवाळ[1] करीं, करुनि शरीरीं प्रवेश हि क्षिप्र
विप्रत्यूहें[2] परवधीं केला अतुळें अनुग्रहें विप्र. ४८
होय भगवदाविष्ट[3] द्रौणि ब्राह्मण महोग्र भार्गवसा[4],
अन्योन्य भूत·राक्षस म्हणति, ' धरुनि शिबिरसत्रमार्ग[5] वसा.'
शिबिराकडे निघाला तो साक्षाद्रुद्रसा महातेजा,
ईश्वर चि म्हणत होते बहु राक्षस भूतगण पहाते ज्या. ५०

# अध्याय दुसरा.

कृपभोजांतें सांगे, " शिबिरद्वारीं असा, वधा[6], नाहीं
चिंता तुम्हांसि; तुमचें काय करावें असावधानाहीं? १
शिबिरांत घालितों मीं व्हाया गुरुशत्रुहानि घाल्याला,
एक हि पळों न द्यावा, मारा चि म्हणोनि 'हा!' निघाल्याला."
ऐसें सांगुनि शिरला शिबिरांत द्रोणपुत्र अपथानें[8]
होतीं करित कृपीचीं बहुधा बहुयुग बहूग्र तप थानें. ३
तो धृष्टद्युम्नाच्या गेला राज्या! हळू च निलयातें[10],
गोष्ठांत[11] गोवृषातें[12] व्याघ्र जसा न्यावयासि विलयातें. ४
बहु दुर्लभजयलाभें होउनि निश्चित निर्भयस्वांत[13],
स्वस्थ समस्त हि निजले होते जाणोनि उत्तम प्रांतें[14]. ५

१. खड्ग. २. विघ्नरहित. ३. शंकरानें प्रवेश केला आहे शरीरांत ज्याच्या असा. ४. परशुरामासारखा. ५. छावणीरूपी अन्नछत्राचा मार्ग. ६. [आंतून जे कोणी येतील त्यास] वधा. ७. नाश. ८. आडमार्गानें. ९. अश्वत्थाम्यानें केलेले साहसाचें कर्म हा जणू काय त्यानें ज्यांतील दुग्धपान केलें त्या कृपीच्या स्तनानी अनेक युगे केलेल्या मोठ्या कडक तपश्चर्येचा च प्रभाव होय. १०. [छावणीतील] निवासस्थानातें. ११. गोठ्यांत. १२. गाईबैलांस. १३. निर्भय अंतःकरणाचा. १४. [तो] प्रदेश.

सद्नीं शिरोनि पाहे सुखसुप्ता तातघातका मत्ता
धृष्टद्युम्ना, उठवी हाणुनि नागासि गरुडसा[1] लत्ता. ६
सहसा नेत्रें उघडुनि तो धृष्टद्युम्न ओळखे अरिला,
शयनावरुनि उसळतां दृढ कवळुनि केश गुरुसुतें धरिला. ७
पाडी, रगडी, वाटे तो तार्क्ष्य[1] चि त्या महाहिला झडपी,
पितृघात आठवुनि, उर एकें, अन्यें पदें गळा दडपी. ८
क्रतुपशुतें[2] जेंवि, तसें लागे शस्त्राविणें चि माराया,
बा राया! नखरांहीं फाडी, परि तो शके न वाराया. ९
पार्षत म्हणे, 'गुरुसुता! मजला शस्त्रेंकरूनि मारावें,
पावेन वीरलोकाप्रति, बा! शरणागतासि तारावें.' १०
द्रौणि म्हणे, 'मारावा शस्त्रें तो, जो असेल अधमान्य[3].
गुरुघातका! तुजा तों गुरुभक्तजनीं असा चि वध मान्य.' ११
ऐसें म्हणोनि मर्मीं हाणी तो शत्रुघातकर टांचा;
बुकलुनि मारी, चित्तीं घूककृत[4] स्मरुनि घात करटांचा[5]. १२
तो मार्यमाण[6] पार्षत आरडतां ज्या स्त्रिया जवळ होत्या,
उठल्या सहसा, झाल्या त्रासव्याळाननीं[7] कवळ हो! त्या. १३
उग्रें कर्में रूपें भासे तो भूत, विप्र भासेना;
जाल्या त्रासें हरिच्या[8] दशकंठें[9] जेंवि विप्रभा सेना. १४
भीरु स्त्रीजन न वदो; वदले उठुनीं हि रक्षक न कांहीं,
जे गौरविले होते प्रियसखसे अवनदक्ष[10] कनकांहीं. १५
वध करुनि द्रौणि रथीं बसल्यावरि, त्या म्हणोनि 'हा!' रडल्या;
शापुनि त्या दुररीशा[11] कुररीशा[12] एकदा चि आरडल्या! १६

१. गरुड. २. यज्ञांतील पशूस. ३. नीचाहून निराळा, अनीच. ४. उलूक-**पंत.** ५. काकांचा-**पंत.** (मागें अ० १।५ ते ६ पहा). ६. मारला जाणारा. ७. भीति. ८. हरिच्या सेना=शक्रचमू-**पंत.** ९. जेंवि दशकंठें हरिच्या सेना [तेंवि तेणें त्या सेना] त्रासें (भयानें) विप्रभा (निस्तेज) जाल्या. १०. रक्षण करण्याविषयीं कुशल. ११. अत्यंत दुष्ट शत्रूस. १२. कुरर पक्ष्यांच्या माद्यांप्रमाणे.

अंतःपुरांत जेव्हां नृप[1] वधिला म्हणुनि गलबला केला,
होय चमूला भुज ही भर पार्शी[2] जेंवि गल बलाकेला. १७
'धांवा हां! धांवा! हा आतां यसला रथीं, पहा, रोधा[3],
नेणों नर कीं राक्षस गेला मारूनि या महायोधा.'. १८
गडबडुनि वीर उठले, शस्त्रें घेऊनि धांवले क्षिप्र,
त्या सर्वांतें हि वधी त्या रुद्रास्त्रेंकरूनि तो विप्र. १९
तेसें चि उत्तमौजाप्रति, वधि पशुतें मखीं जसें शमिता[4],
कीं प्रकटली शरीरीं रुद्रवरें शक्तिसंपदा अमिता. २०
हाणी उरीं गदेनें वीर युधामन्यु जरि, तदपि त्याचा
वध करि तसा चि सुयशें नाशाया तो मनोगद[5] पित्याचा. २१
मग सुखसुप्तांची च द्रुततर[6] शिविरांत मान तो कापी,
शस्त्रासि म्हणे भँटगळ[7] देउनि जसि माय थान तोका 'पी.' २२
बा! वधिले ते हि प्रतिविंध्यादि द्रौपदीकुमारमणी,
रुसली लावुनि तेव्हां अकृपपण[8] प्रभुकडे उमा रमणी. २३
मग मारिला गुरुसुतें पाडुनि तो भीष्मघातक शिखंडी,
गुंजा हि गुरु[9] गराची[10] गिळितां, न करील घात कशि खंडी? २४
स्पर्शे ज्यातें त्यातें त्यातें तत्काळ तो सदसि खंडी;
वीरांत न राहों दे, व्याळांत लव हि जसा मद शिखंडी. २५
शिबिरांत राक्षसभयें हृदयीं हतशेष[11] सर्व भट कोंदे,
पळतां कृप कृतवर्मा द्वारीं एकास ही न फेंटकों[12] दे. २६

---

१. पांचालनृप धृष्टद्युम्न. २. पार्शी पडता बलाकेला मान सावरत नाही तसे—**पंत.** ३. अडवा. ४. यज्ञांतील पशूचा वध करणारा. ५. मानसिक रोग. ६. फार जलदीने. ७. वीरांचे गळे. ८. आपल्या नवऱ्याच्या वरामुळे अश्वत्थाम्याला असे नीच कृत्य करितां आलें म्हणून पार्वतीला शंकराचा राग आला. ९. अधिक. १०. स्वल्पभृत वैर ही दुर्जर; मग महद्वैर कसे पचेल?—**पंत.** ११. मरून उरलेले. १२. बाहेर जाऊं न दे. (सर्व तेथल्या तेथे च ठार करी).

मग तींकडे[1] दिसाया सर्व शिबिरसंनिवेश[2] पेटविला,
सकळ प्राणिगण तिघां वीरांहीं प्रेतपतिस भेटविला. २७
स्वप्नांत रणारंभापासुनि ते सर्व उग्रगात्रीतें,[3]
देखत होते अश्वत्थाम्यासमवेत, काळरात्रीतें. २८
स्वकदन जैसें स्वप्नीं त्याच्या[4] दृष्टीस विधिबळें पडलें,
घडलें तसें चि, दडलें भिउनि जरि प्राणिवृंद तें रडलें. २९
त्या द्रौणिच्या प्रवेशीं शिबिर सुनिःशब्द[5] बा! जसें हो[6] तें,
तैसें चि निर्गमीं[7] ही निजलें घालूनि बाजसें[8] होतें. ३०
एक चि झाला होता रक्तें चिकटोनि खड्गमुष्टि[9] कर,
तैसा चि कवच देह हि; त्याहुनि न विवाहवेष[10] तुष्टिकर. ३१
भेटे कृपासि हर्षें, त्या ही तो वीर विप्र भोजास,
खद्योत[11] घूक[12] झाले पर मानुनियां रवि प्रभो[13]! ज्यास. ३२
दुर्योधनाकडे मग गेले सौप्तिककथा[14] कथायास,
दुर्लभजयलाभें जे न गणिति देहक्षतव्यथाऽऽयास[15]. ३३
'अर्थी येती घ्याया धन तुजपासाव[16] जेंवि दारा[17] या,
तेंवि मिळालीं होतीं बहु कुरुपा! सावजें विदाराया.' ३४
पुसि रक्तदिग्ध[18] मुख त्या प्रभुचें[19] गुरुपुत्र महिवरा! हातें,
ज्याच्या भुजाश्रयसुखें[20] विसरलि होती च महि वराहातें[21]. ३५
स्मरुनि बहुमानदान द्रौणि करि विलाप, कुरुकुपास[22] रडे;
'होते निर्भय आश्रित अवलंबुनि तुज, जसे कुपा[23] सरडे. ३६

१. तीन बाजूंनीं. २. छावणी. ३. भयकर शरीर असणाऱ्या (काळरात्रीस). ४. त्या प्राणिवृंदाच्या. (सेनेच्या). ५. अगदीं शब्दरहित. ६. होतें. ७. बाहेर जाते वेळीं. ८. बाज घालून निजलेसें. ९. तलवारीची मूठ. १०. लग्नाच्या वेळचा पोषाक. ११. काजवे. १२. घुवड. १३. धृतराष्ट्रा! १४. निजलेल्याना मारल्याची हकीगत. १५. शरीराला झालेल्या जखमाची पीडा आणि श्रम. १६. पासून. १७. तुझ्या दारीं. १८. रक्तानें भरलेलें. १९. दुर्योधनाचें. २०. बाहूंच्या आश्रयामुळे होणाऱ्या सुखानें. २१. वराहरूप विष्णूस. २२. दुर्योधनराजासाठीं. २३. कुंपणास.

ऐसा पडतों, होतों धन्य, न होईन रत्ननगधार्मी;
हतभाग्य म्हणुनि झालों भाजन बहु यत्न करुनि न वधा मीं.
मद्दीनता सुखातें जासि तापविली पहार थेंबातें[1];
जें जोडावें युद्धीं मेळविलें त्वां महारथें बा ! तें. ३८
जीवंत अससि कीं बा कुरुराज्या ! ऐक हर्षदा वार्ता,
हें विजयवृत्त होवू त्वत्कर्णा जेंवि वर्ष[2] दावार्ता. ३९
केशव सात्यकि पांडव या सातांहूनि अन्य झोडून[3]
धाडून यमपुरीतें आलों अरिशिबिर शून्य पाडून. ४०
वधिला गुरुघ्न बुकलुनि पशुसा दुर्योधना ! शम[4] नयज्ञा !
आदरिल न सुज्ञाचें, न करुनि दुर्योध-नाश, मन यज्ञा. ४१
तैसा चि उत्तमौजा वधिला तैसा चि तो युधामन्यु,
तो शांतनवांतक ही, हो ! स्वस्थ नको धरूं बुधा ! मन्यु[5]. ४२
वधिले म्यां ते हि प्रतिविंध्यादि कुमार पांच वीरा ! जे
झाले शतशः प्रमुदित ज्यांचो पाहोनि पांचवी[6] राजे.' ४३
त्वत्सुत[7] त्या, कामकरा[8] श्रीरुद्रा जेंवि मानवे[9] दास,
दे त्यांसि[10], आभिचारिक[11] दे चवथ्या[12] जेंवि मान वेदास. ४४
'हर्ष[13] दिला त्वां चि करुनि धृष्टद्युम्नादि शत्रु शांत[14] नव[15],
प्रियकर असा न कर्ण हि, न तुजा तात हि, न तो हि शांतनव.
माजें तुम्हीं तिघानीं केलें प्रिय सर्व पूर्ण अवसानीं,
श्रीशंभुच्या करावें भक्ताचें इष्ट जेंवि नवसानीं. ४६
हें प्रिय गुरुसि[16] कथिन, मज देऊनि निरोप पाठवा नाकीं[17],

१. 'नष्ट करी' असा अध्याहार. २. पर्जन्यवृष्टि. ३. सर्व; एकूणएक. ४. शांत हो. ५. कोप. ६. जन्माच्या पांचव्या दिवशीं केला जाणारा उत्सव. ७. तुझा मुलगा (दुर्योधन). ८. इच्छित पूर्ण करणाऱ्या. (हें विशेषण शंकर व अश्वत्थामा या उभयतांस हि लागेल) ९. मान देई. १०. अश्वत्थाम्यास. ११. जारणमारणादि कर्म करणारा. १२. अथर्ववेदास. १३. दुर्योधन म्हणतो. १४. नष्ट. १५. नऊ. १६. द्रोणाचार्यास. १७. स्वर्गात.

वदलों असेन अप्रिय तें मागें किमपि आठवाना कीं ! ४७
त्यजितों शरीर, आज्ञा द्या, तुमची आमुची पुन्हां भेट
स्वर्गीं घडेल चि, उगे, शोकसमुद्रांत धैर्य हें बेट.' ४८
ऐसें वदोनि राया ! दुर्योधनराय काय सोडून,
स्वर्गासि मानि[1]मस्तककंपप्रद तेज जाय जोडून. ४९
ते त्या नृपदेहातें भेटुनि पाहुनि पुनःपुन्हां वदन,
रडत उषःकाळीं[2] पुरपथ धरिती स्मरुनि तें महाक्रंदन[3]. ५०
ऋषि[4]दत्त दिव्यदर्शन[5] माजें शोकांत पावलें अंत,
तें सत्य 'ज्ञानाचा उच्छेदक शोक' म्हणति जें संत. ५१
अत्युष्ण दीर्घ असकृत् सोडुनि निःश्वास काष्ठसा अंध
निश्चेष्ट होय शोकें, न दृढ स्नेहाअसा दुजा बंध. ५२

(गदापर्वांतर्गत)

# ऐषीक[6]पर्व.

## अध्याय पहिला.

वार्ता सांगे धृष्टद्युम्नाचा सारथी नरवरा ती;
पडला पांडवकर्णीं निद्रेंत तसा हि तो न रव राती. १
'वधिले द्रुपदसुत सबळ, कृष्णेचे सुत हि गुरुसुतें[10] नष्टें,

१. अभिमानी पुरुषाचें हि मस्तक डोलविणारे. २. पहाटे. ३. मोठे युद्ध ४. व्यासानीं दिलेला. ५. दिव्यदृष्टि. ६. 'इषिका' म्हणजे दर्भाची काडी; ती ब्रह्मास्त्राचें अभिमंत्रण करून अश्वत्थाम्याने पांडवाचा निःपात व्हावा म्हणून त्यावर सोडली, असा कथाभाग असल्यामुळें या पर्वाला ऐषिकपर्व म्हणतात. ७. धर्मास. ८. गरुडा. ९. बलवान. १०. दुष्ट अशा.

आपण चि वधव्यग्रा[1] भोजापासूनि[2] वांचलों कष्टें. २
कृपभोजद्रौणिमनीं तिळ हि न सकरुण सखेद रव[3] डाजे[4],
यांहुनि बेरड मांग हि बहुत बरे घालिते दरवडा जे. ३
जाले अवलोकुनि जे रक्ताचा ह्रद अगाधसा धसते,[5]
परि तोडिले चि वदनीं तृण धरिते[6] ही अगा! धसाधस ते.' ४
तो वृत्तांत श्रवणीं पडतां चि नृपाळ पावला पतन,
केला सात्यकियमजयभीमाहीं सांवरूनियां जतन. ५
धर्म म्हणे, 'हा! हा! जरि करितों सुतपोवनांत सुतपातें,
कां शोकदग्ध होतों स्वसुहृत्संबंधिमित्रसुतपातें? ६
माजे न भाजतिल कां? शोकें असु भाजिले अनयनाचे[7];
मोहीं पडे, रडे, जयलाभें हांसोनि जो अनय[8] नाचे. ७
आला माजा चि जसा गुरुपुत्राचा तसा न राग मला,
सुज्ञा निजप्रमाद चि घातक पर बालिशा नरा गमला. ८
ती मृदुलप्रकृति[9] कसी दुःसह शोकज्वरासि साहेल?
राहेल सासु कैसी? कोणाच्या आननासि पाहेल? ९
कर्ण द्रोण पितामह या दुस्तरसागरत्रयीं तरले,
ते कुनदांत[10] बुडाले: धिक् तुज जनजीवनस्थिते[11] तरले!! १०
वत्सा नकुळा! जा ये घेउनि त्या परमहीनभागेला[12],
जीस तमीं घालुनि शिशुशशिगण[13] सोडुनि मही नभा गेला.'
धाडुनि मांद्रेयांतें* धर्म रडत जाय सुतवधस्थानीं,

१. वध करण्याचे कामीं आसक्त झालेल्या. २. कृतवर्म्यापासून. ३. [शिबिरांतील लोकांचा] शब्द. ४. दुःख देई, द्रव आणी. ५. धसते जाले=घाबरून धावूं लागले. ६. दातीं तृण धरणारे, शरण आलेले. ७. धृतराष्ट्राचे. ८. अनीतिमान् मनुष्य. ९. नाजुक स्वभावाची (द्रौपदी). १०. लहानशा नदींत; ओढयांत. ११. हे तरले (चंचल अशा) जनजीवनस्थिते (जीवांच्या जगण्या)! १२. अत्यंत दुर्दैवीला. १३. पुत्ररूप चंद्रांचा समुदाय. * माद्रेयातें (?).

[1]उपरिस्थानीं केलें रोदन तैसें चि तें अधःस्थानीं. १२
[2]व्याधहतातें शोचीं यूथप पाहोनि जेंवि कळपातें,
धर्म तसा स्वजनातें; नेणें निज[3]देह जें विकळ पातें. १३
नकुळ उपप्ल[4]व्याहुनि वाहुनि कृष्णेसि निजरथीं आला,
तद्बंधुकुमारांचा द्रौणिकरें होम जे स्थलीं झाला. १४
पडले येतां चि तिच्या द्रौणिनिहत बंधु पुत्र ते दृष्टी,
शोकीं पडली [5]व्याघ्रव्यापादिततर्णका जसी गृष्टी. १५
मोहसमुद्रीं कृष्णा[6]क्षिति सांवरिली वृकोदरवराहें,
धर्म म्हणे, '[7]ध्रुवमतिदा ! व्यसन अरीस हि नको [8]दरवरा ! हें.'
कृष्णा म्हणे, ' न जालें [9]ऐसें दैत्यासुरा नरां [10]जन्य,
धन्य प्रभु धर्मा ! तूं, अन्य नयनिपुण असा न [11]राजन्य. १७
निजसंतान यमाच्या दिधलें [12]शुचिच्या जसें चि आज्य करीं,
बहु बरवें केलें हें; निश्चित सुखें यथेष्ट राज्य करीं ! १८
राज्यसुखें या पांचां त्या [13]सौभद्रास ही विसरशील,
कीं तूं [14]स्वसुखसुविस्मृतदेहादिनिखिल सुधी [15]विसरशील. १९
मन चिंतुनि [16]सुप्तहता त्या एकेका मुलास कळकळतें;
प्रायोपवेश चि महादुःखौषध, हें तुला सकळ कळतें. २०
मज शांति नसे पातकिगुरुपुत्रवधाविना, शपथ करित्यें;

---

१. स्वर्वासिनः पातालवासिनश्च तदा रुरुदुरित्यर्थः-**पंत.** तेव्हां स्वर्गवासी व पातालवासी लोक रडले, असा अर्थ. २. व्याधानें मारलेल्या. ३. देहविस्मृति जाली-**पंत.** ४. अज्ञातवासानंतर युद्धाची तयारी करण्याकरितां पांडव विराट- नगरीजवळच्या या गावीं राहिले होते; येथें च द्रौपदीस ठेविलें होतें. ५. वाघानें मारला आहे वत्स जीचा अशी नूतनप्रसूत गाय. ६. द्रौपदीरूप पृथ्वी. ७. भो भगवंत स्तोतुं ध्रुवाय मतिस्फूर्तिप्रद-**पंत.** भगवताची स्तुती करण्यास ध्रुवाच्या बुद्धीस स्फूर्ति देणाऱ्या ! ८. पांचजन्या ! संबोधन-**पंत.** ९. प्रत्ययाभावी सप्तमी. १०. युद्ध ११. क्षत्रिय. १२. अग्नीच्या. १३. अभिमन्यूस. १४. स्वतांच्या सुखामुळें अगदीं विसरलें आहे देहादि सर्व पदार्थ ज्यानें असा. १५. विसराळू. १६. झोंपेंत मारलेल्या.

प्रायोपवेशविधिनें मीं प्राणांचा विनाश पथकरित्यें.' २१
ऐसें वदोनि बसली घेउनि मरणार्थ पतिपुढें धरणें,
भीमासि म्हणे, 'त्वां तरि बुडल्ये निजकीर्ति हे समुद्धरणें! २२
देउनि सर्वस्व नृपें मेळविलें राज्य सुखविलासार्थ,
काय यश वदों? धर्में फार चि रक्षूनि सुखविला सार्थ!' २३
धर्म म्हणे, 'साध्वि! समज, सुत सोदर[2] तव अशोच्य, तरले[3] तें;
जाणसि तूं संसारस्थितितें अस्थैर्यविजिततरलेतें[4]. २४
बहुधा दूर सुदुर्गमगहनीं[5] गुरुसुत पळोनि सति! गेला,
तूं जाणसिल कसा गे! त्याचा समरांत वध हि जरि केला?'
कृष्णा म्हणे, 'नृपा! म्यां आयकिला सहजमणि शिरीं आहे,
ज्यातें मत्सुतघातक तुमचा गुरुपुत्र नागसा वाहे. २६
माज्या हस्तीं आणुनि द्यावा तो मणि तुला चि वाहेन,
पाहेन तव शिरीं मीं या सुतशोकज्वरासि साहेन.' २७
अत्युग्र वचन परिसुनि गुरुवत्सळ धर्म तो म्हणेना 'हूं,'
भीमासि म्हणे, 'असि च स्वाश्रुजळें बळिशिरोमणे! नाहूं?
त्या वारणावतीं[6] त्वां केलें जैसें बळ प्रकट अवनीं[7],
त्या हि हिडिंबापासुनि परिभवसंकट पडों दिलें न वनीं. २९
तैसें चि एकचक्रावासिजनव्यसन बकवधें हरिलें,
धरिलें चित्तीं कीचकहनन, जसें प्राथितां चि आदरिलें. ३०
तैसें चि सुप्तघातकि पातकि विप्राधमासि मारूनीं,
शक्र शचीस[8] तसा हो सुयशा मज संकटांत तारूनीं.' ३१
ती भीमा श्वासें दे, दहनाला जेंवि तेज नव[9] धमनीं[10];
स्त्रीप्रिय[11] जे धरितील न कां विप्राचा हि ते जन वध मनीं? ३२
भीम निघे बहु सत्वर सारथि नकुळासि करुनि निजयानीं,

१. आप्तजन. २. बधु-**पंत.** ३. तरले ते समज-**पंत.** ४. अस्थिरपणानें जिंकलें आहे विजेस जिनें. ५. जाण्यास कठिण अशा अरण्यांत. ६. हस्तिनापुरी. (लाक्षागृहदाहप्रसंगीं). ७. रक्षण करण्यांत. ८. इंद्राणीस.' ९. प्रतिश्वासें नवें नवें-**पंत.** १०. धमनी, फुंकणी. ११. स्त्री आहे प्रिय ज्यांना असे.

धरिलें मौन चि तेव्हां सात्यकिसहदेवधर्मविजयानीं. ३३
निजशिबिरापासुनि गुरुपुत्ररथाच्या धरूनि मागातें
धावे भीम, जसा हरि माराया स्वापराधि[1]नांगातें. ३४
श्रीकृष्ण म्हणे, “धर्मा! भीम कसा त्वां उपेक्षिला आजि?
न करुनि विचार गेला द्रोणसुतासीं करावया [*]आजि. ३५
स्वभ्रात्यां स्वप्राणांहुनि कीं तुज भीमसेन आवडतो,
आधार संकटीं जो मार्कंडेया द्विजा जसा वड तो. ३६
जेणें भस्म करावी [2]सागरवसना हि मेदिनी बा! हे,
ऐसें ब्रह्मशिरोस्त्र द्रोणें पुत्रासि पढविलें आहे. ३७
हें प्रथम चि या विजया साधुप्रियसद्गुणाकरा शिकवी,
जाणुनि सुपात्र ऐसें, [3]वात्सल्यज्ञानवारिराशि कवी. ३८
अश्वत्थामा कोपें अस्त्र न कथिलें म्हणोनियां कढला,
[4]चढला शिरीं धनंजय वाटे, कीं, अतिरहस्य हा पढला. ३९
मग गुरुला एकांतीं गांठुनियां आग्रहें चि तो याची,
ऐसें म्हणे, ‘करि [5]मुदिर सर्वत्र हि सम चि वृष्टि तोयाची. ४०
शिष्यासि योग्यता या अस्त्रग्रहणीं; कसी न [6]दायादा?
तुज [7]गुरुसि मज अपत्या गांठि तसी कीं, जसी नदा यादा.’
[8]चपळ दुरात्मा सुत हें जाणे, यास्तव म्हणे तया तो कीं,
‘बा! होतसे सुपात्रीं छात्रीं हि तसी, जसी दया तोकीं. ४२
बा! न मनुष्यांवरि हें त्वां [9]परमापद्गतें हि योजावें,
सोडू नको चि समरीं; जीवित जैसें तसें चि [10]मोजावें.’ ४३
ऐसें सांगुनि शिकवी गुरु संकोचें सुता कुपात्रास,
परि त्या होय, [11]अधिकृता लोभ्यापासुनि जसा [12]कुपा, त्रास. ४४

---

१. छत्तीस. २. समुद्र हे च वस्त्र जिचें. ३. प्रेम व ज्ञान याचा समुद्र. ४. वरचढ झाला. ५. मेघ. ६. पुत्रास. ७. पित्यास. ८. चंचल मनाचा. ९. अत्यंत संकटस्थितीस प्राप्त झालास तरी. १०. गणावें; मानावें. ११. अधिकार दिलेल्या. १२. भूपास–पंत. * युद्ध.

शिकवुनि अस्त्र गुरु म्हणे, 'तूं न स्थिर सत्पथीं रहासील,
दिसतें न वहाशील व्रत, यश भद्र[1] न पुढें पहासील.' ४५
या गुरुवचनें अश्वत्थामा चित्तांत खिन्न बहु जाला,
होतां* वनांत तेव्हां भ्रमण करित यदुपुरासि तो आला. ४६
तो यादवांसि बहुमत होय स्वर्गीं सुरांसि जेंवि कच;
प्रिय यांसि विप्रदर्शन, न तसें मधुपांसि पद्म जें विकच[2]. ४७
वसतां तेथें गुरुसुत साधाया योजिल्या महाकार्या[3],
सिंधुतटीं एकांतीं मज ऐसें एकदा म्हणे आर्या! ४८
'अस्त्र अगस्त्यापासुनि गुरुनें तप करुनि जोडिलें कांहीं,
तें म्या हि पित्यापासुनि; कीं, घ्यावी सर्व जोडि[4] लेंकांहीं. ४९
देतों मीं तुजला, घे तें[5] ब्रह्मशिरोस्त्र सुसमयीं आजि,
दे चक्र आपुलें मज कृष्णा! इतुकी च कामना माजी.' ५०
या प्रार्थनेवरुनि बा! मज त्याचा भाव समजला वक्र;
वदलों स्मित करुनि, 'नको भवदस्त्र; सुखें असें[6] चि घे चक्र.
दानव मानव निर्जर[7] गंधर्व पतग[8] भुजंग ही सारे,
मद्वीर्यशतांशासीं[9] गोळा केले तऱ्ही न सम बा रे! ५२
हे शक्ति, हे गदा, हा असि, हा दर, हें धनुष्य, हें चक्र,
ज्याची इच्छा तें घेः अयशस्कर होय अमृत ही तक्र. ५३
अससील शक्त ज्यातें उचलाया, संगरांत योजाया,
द्रौणे! घ्याया त्याप्रति तव भुज निःशंक सिद्ध हो जाया.' ५४
मजला म्हणे कृपाचा 'अमृतास हि तोंड वासुना' भाचा,
'काम मुमुक्षुसि आत्मज्ञानाचा मज तसा सुनाभाचा[10].' ५५
'घे' म्हणतां उचलाया लावी हर्षी न हात तो डावा:
नुचले; क्षमा न करितें तरि तेणें कां न हात तोडावा? ५६

१. कल्याण. २. विकसित. ३. [माझ्याकडून] सुदर्शन मिळविण्याच्या मोठ्या कार्या. ४. मिळकत. ५. तुझें अस्त्र. ६. मोबदल्यावाचून. ७. देव. ८. पक्षी. ९. माझ्या बळाच्या शभराव्या अंशास हि. १०. सुदर्शनाचा. * असतां.

लावी दुजा हि कर करकर रद चावे, ढळे चि ना तदपि,
सिंधुजळा मुनिमुखसें, द्रौणिबळा अरि[1] हरावया मद पी. ५७
रंभा शुका तसी गुरुसुतशक्ति सुदर्शना चलित न करी.
त्याची अहंकृति विरे, केवळ चि वृकापुढें जसी बकरी. ५८
मीं मग वदलों, 'द्रौणे ! जो परम ख्यात या मनुष्यांत,
ज्याच्या गांडीवें मद राहों न दिला चि परधनुष्यांत; ५९
बहुरूप देवदेव प्रभुवर शितिकंठ[2] सुखविला युद्धें,
सुरशत्रु[3] मथुनि जेणें गावविलीं त्रिभुवनीं यशें शुद्धें; ६०
ज्याहुनि अन्य प्रियतर नरलोकीं न च मना पुरुख[4] गमला,
सर्वस्व ज्यास द्यावें, ज्यापरि बहु नाठवे गुरु खग[5] मला; ६१
तो हि सखा पार्थ असें पूर्वीं न कधीं च वचन वदला, तें
वदलासि; कसा तोडिल शिशु हरि[6]नाभ्यंबुरुहनवदलातें ? ६२
मीं रुक्मिणीसह तप द्वादश वर्षें हिमाचळीं तपलों,
भगवत्प्रसादकाम[7] श्रीपंचाक्षर[8]जपा सदा जपलों. ६३
आला वैदर्भीच्या[9] पोटीं योगी सनत्कुमार मुनी;
पावे काम, जसि उमा पतिभजनीं कीं जशा कुं,[10] मां[10] रमुनीं. ६४
तो रुक्मिणीकुमार ज्येष्ठ प्रद्युम्न ही न मागे जें,
तें मागसि, हा वेड्या! हें वदलों म्हणुनि तूं न रागेजें. ६५
जरि हि बहुप्रेमास्पद गद[11] वदला हें असें कधीं नाहीं,
मग बोलिजेल ऐसें कैसें त्या वृष्णिहीं[12] अंधीनाहीं[12] ? ६६
बलजलधि आर्य राम प्रभु हि स्वमुखें असें कदा न वदे,

१. सुदर्शनचक्र. २. कृष्णवर्ण कंठ ज्याचा तो (शंकर). ३. निवातकवचादि. ४. पुरुष–**पंत.** ५. गरुड–**पंत.** ६. विष्णूच्या नाभिकमलाच्या नवीन पानास. ७. शिवकृपेची इच्छा करणारा (मी). ८. 'नमःशिवाय' या मंत्राचा जप. ९. रुक्मिणीच्या. १०. भू लक्ष्मी पतिभजनीं रमुनि जशा मनोरथातें पावल्या, उमा जसी काम पावली, तसी च रुक्मिणी ही पावली–**पंत.** ११. या नांवाचा प्रमुख यादव. १२. अंकित असलेल्या यादवांनीं.

दानव देव म्हणति ज्या ‘ जी ! जी !,’ ज्या मद्य मद सदा नवदे.
दिधला सुतपस्तुष्टें भगवंतें भक्तवत्सलें सांबें,[1]
जें न च मागितलें त्या जांबवतीच्या[2] हि नंदनें सांबें. ६८
तें दिव्यचक्र साधुनि बा ! तूं करणार काय सांग मला ?
दुःसाध्य जो पदार्थ, त्वच्चित्ता तो सुसाध्य कां गमला ? ६९
तुज तों सर्व हि यादव बहु मानिति; वद खरें चि, या चक्रें
युद्ध करिसि कवणासीं ? कोपविलें काय तुज यमें शक्रें ?’ ७०
ऐसें पुसतां धर्मा ! स्मित करुनि द्रौणि मज म्हणे, ‘ कृष्णा !
तुज पूजुनि जिंकावें चक्रें होती मनीं असी तृष्णा. ७१
व्हावें अजेय आपण समरीं परिभव तुजा करुनि चक्रें,
जिंकावा, प्रबळ जसा छद्में[3] वृत्रादि जिंकिला शक्रें. ७२
बहु पावलें च, परि मीं ब्राह्मण या पावलों न कामातें;
सत्य मनींचें कथिलें, ‘ वृकसम कपटी ’ म्हणों नका मातें.’ ७३
ऐसें ब्राह्मण वदला; म्यां त्याचें दुखविलें न मन कांहीं;
बोळविला निजगुरुसा पूजुनि सद्रत्नरत्नकनकांहीं. ७४
चपळ क्रूर दुरात्मा ब्रह्मशिरोस्त्रज्ञ चंड लोभी; मीं
त्यासि बरें जाणतसें, करिल महास्त्रप्रयोग तो भीमीं. ७५
यास्तव उठा, चला त्या भीमातें संकटांत रक्षाया,
स्पष्ट व्याघ्रासि दिला बा ! त्वां दक्ष स्वबाहु भक्षाया.” ७६

---

# अध्याय दुसरा.

कृष्णेपासीं सात्यकि सहदेव विवेकरसविलेपार्थं[5]
स्थापुनि, धर्म धनंजय हे स्वरथीं[4] शीघ्र बसविले पार्थे. १

१. शंकरानें. २. जांबवती ही कृष्णाच्या अष्टनायिकांतील एक नायिका. ३. कपटानें. ४. रागिट. ५. विचाररूप रसाचा लेप करण्यासाठीं. ( चार समजुतीच्या गोष्टी सांगून द्रौपदीचें सांत्वन करण्यासाठी ).

प्रभुनें प्रतोद घेउनि भीमाच्या, संकटांत, अवनातें,
हय हाकिले कराया ह्रीत[1] प्रीत[2] हि मनांत पवनातें. २
[3]आटोपिला चि गेला होता जरि भीमसेन दूरवर,
म्हणति तिघे हि 'उभा,[4]' परि आवरला त्यांसि तो न शूरवर. ३
गंगातीरीं होता द्रौणि व्यासाश्रमीं मलिनवदन
करुनि अधर्मोपायें सुप्तश्रांतप्रवीरशिशुकदन. ४
भीमरथाचा कांपवि करुनि गुरुजधैर्यहानि नाद वना,
सुर[5]कुसुमस्तबका ही [6]श्रीकंठशिरस्थ मानिना दवना. ५
सहसा भीमरथ पुढें दिसतां चि द्रौणि दचकला हो! तो;
जाला तसा जसा सुनृपा पाहुनि दस्यु[7] वचकला[8] होतो. ६
दिसला भीमरथ पुढें, त्यामागें कृष्णरथ, तयामाजि
धर्म विजय पाहोनि द्रौणि म्हणे, 'यां नसे दया माजी. ७
ज्यांचे सुत वधिले म्यां ते माजे प्राण कां न हरितील?
धरितील न भीड, जसें म्या केलें हे तसें चि करितील.' ८
ऐसें मनीं विचारुनि वामकरें धरुनियां इषीके[9]ला,
अस्त्रप्रयोग, न गणुनि गुरु[10], ते प्राचीन ही ऋषी[11], केला. ९
सोडी ब्रह्मशिरोस्त्र क्रोधें बोलुनि '[12]अपांडवाय' असें,
तों चित्तीं व्यास म्हणे, 'या सा[13]धूंचें न हो दहांत हसें.' १०
बोलुनि 'अपांडवाय' ब्रह्मशिरोस्त्रप्रयोग तो करि, तें
जाणुनि कृष्ण म्हणे, 'हा! पडलें आचार्यवर्यतोक [14]रितें.' ११

---

१. [ घोडे आपल्यापेक्षा वेगवान आहेत म्हणून ] लज्जित. २. [ आपल्या पुत्राच्या—भीमाच्या—रक्षणार्थ चालले म्हणून ] संतुष्ट. ३. गांठला. ४. उभा रहा, थांब. ५. धर्माश्रित क्षत्रिय गुरु; ब्राह्मण हा लघु—**पंत.** देवाच्या पुष्पगुच्छाला हि ६. शंकराच्या मस्तकावरील दवणा. ७. चोर. ८. भ्यालेला. ९. दर्भाच्या काडीला. १०. द्रोण—**पंत.** ११. नरनारायण—**पंत.** १२. पांडवांचा अभाव होण्यासाठी. १३. पांडवांचें. १४. आपलें शक्तिसर्वस्व जें ब्रह्मशिरोस्त्र तें खर्ची पडल्यानें गुरुश्रेष्ठ द्रोणाचें मूल ( अश्वत्थामा ) निःसत्व झालें.

त्या काडीतूंनि दहन होणार प्रकट तो चि विजयातें
यदुराज म्हणे, 'सखया! दावावा त्वां प्रताप निज यातें. १२
ब्रह्मशिरोस्त्र द्रोणें तुज जें उपदेशिलें असे बा गा!
हा योग्य तत्प्रयोगा प्राप्त समय जाहला महाभागा!' १३
ऐसी प्रभुची आज्ञा होतां चि रथावरूनि तो उतरे,
जेणें सुररिपु केले बहु विमद मृगादनें[1] जसे कुतरे. १४
'द्रौणिस, मज, बंधूंस स्वस्ति[2] असो; हा प्रयोग ही स्वंत[3];
अस्त्रें अस्त्र शमो' हें बोलुनि, वंदूनि देव गुरु संत, १५
पार्थ शिवातें ध्यात, ब्रह्मशिरोस्त्रासि नमुनियां योजी,
तो जीमूतनिभ[4] प्रभु हि म्हणे, न म्हणेल अस्त्र कां 'ओ जी!'?
त्या गुरुसुतप्रयोगें प्रलयें तैसा चि, अग्नि पेटविला;
स्वास्त्राग्नि त्यासि पार्थें, भृगुरामा रामसा[5] चि, भेटविला. १७
अस्त्राग्नि अधस्तिर्यक्[6] सर्वत्र तसे चि धडकले वरते,
गमले न सुरांचें ही राहों देतील धड कलेवर[7] ते. १८
जाले उत्पात विविध बहु उल्कापात भूमिकंपादी,
तेव्हां व्यास सुरर्षि हि लोकत्राणें[8] सुपुण्य संपादी. १९
स्वतपस्तेजें शिरले त्या अस्त्राग्नींत नारद व्यास,
ज्यांचा समाधिपरिस हि बहु लोकानुग्रहीं च हव्यास. २०
ते त्यांसि म्हणति, 'केलें बहु साहस वीर हो! कसें रागें?
हें अस्त्र मनुष्यांत स्पष्ट न कोणी हि योजिलें मागें.' २१
पार्थ म्हणे, 'मुनिवर हो! अस्त्र परास्त्रासि मात्र वाराया

१. सिंहानें. २. कल्याण. ३. हा ब्रह्मास्त्रप्रयोग हि, चांगल्या प्रकारें झाला आहे परिणाम ज्याचा असा असो. ४. मेघश्याम श्रीकृष्ण. ५. हे उभयता हि विष्णूचे च अवतार; तसे च, अश्वत्थामा व अर्जुन यांचीं ब्रह्मशिरोस्त्रें हि एका च गुरूपासून प्राप्त झालेलीं. रघुरामानें शिवधनुष्यभंग केल्यामुळें त्यावर रागानें धावून आलेल्या परशुरामाला माघार घेऊन आपलें तेज हरवावें लागलें वगैरे कथा आहे. ६. खालीं व बाजूला. ७. शरीर. ८. [मध्यस्थी करून] लोकांचें रक्षण केल्यानें.

म्यां योजिलें, स्वबालघ्नां हि न या गुरुसुतासि माराया. २२
आवरितों स्वास्त्रातें, तुमच्या आज्ञेसि कोण मोडील?
परि भस्म करिल आम्हां अश्वत्थामा, कधीं न सोडील. २३
करिती, न विनवितां ही, तोकांचें मायबाप जेंवि हित,
हित आमुचें जनाचें तेंवि कराल चि असेल जें विहित.' २४
उपसंहार करि असें बोलुनि अस्त्रासमेत रोपाचाः
त्यास त्रास ब्राह्मणकोपाचा बहु, न काळकोपाचा. २५
जन्हि आततायिता, तन्हि मानी गुरुतोकविप्रता पार्थ,
सद्वचन अनादरिना अरिनाशक तो कवि प्रतापार्थ. २६
घडलें असतां सत्य व्रतवर्य ब्रह्मचर्य आवरतें;
आवरिलें त्या चि बळें पार्थें गुरुचरणशुद्धभावरतें. २७
जो ब्रह्मचर्य निर्मळ आंगीं नसतां महास्त्र सोडील,
लागेल आवराया तरि तें तन्मस्तकासि फोडील. २८
द्रौणि म्हणे, "नृप भीमें अनयें वधिला म्हणोनि बहु रोष
आला, प्रभु हो! केला शिबिरीं म्यां कदन करुनि बहु दोष.
करुनि पुढें भीमातें मज मारायासि पातला राजा,
कवि हो! विवेक मरणत्रासास्तव सर्व लोपला माजा. ३०
वदलों 'अपांडवाय' श्रीब्रह्मशिरोस्त्र योजितां स्पष्ट,
नष्टज्ञान व्यसनीं जालों निजशांतिसत्पदभ्रष्ट. ३१
हें अस्त्र पांडवांतें भस्म न करितां न आवरेल मला,
सुटला महेश्वरशर न भेदुनि लक्ष्यासि काय हो! शमला?"
व्यास म्हणे, 'द्रोणसुता! आम्हीं प्रार्थूनि वळविला पार्थ,
त्वत्कर्मापरिस बरें कळिचें जें कर्म नळविलापार्थ. ३३
अत्युग्र कर्म बापा! योग्य न तुज, योग्य होय कितवा हें;
क्षिप्र करावें चि, परि न केलें भवदस्त्रशमन सितवाहें. ३४

१. माझ्या मुलांना मारणाऱ्या. २. वधोद्युक्तता. ३. गुरुपुत्राचें ब्राह्मणत्व. ४. [ब्रह्मशिरोस्त्र] आवरतें. ५. व्यासनारद! हो! ६. धर्म. ७. सुटलेला. ८. नीचाला.

कीं या दिव्यास्त्राचा जेथें प्रतिबंध सर्वथा होय,
तेथें द्वादश वर्षें वर्षेना बिंदुमात्र ही तोय. ३५
स्वपरक्षेमार्थ जसें केलें पार्थें, महास्त्र आवरिलें,
त्वां हि तसें चि करावें; त्यजुनि सुमति, कां कुबुद्धिला वरिलें?
अस्मद्वचनें स्वकरें स्वशिरोमणि पांडवांसि ओपावा,
तुजवरि न मनांतुनि हा राजर्षि अजातशत्रु कोपावा.' ३७
द्रौणि म्हणे, 'पांडुतनूजांहीं जीं काय जोडिलीं यत्नें,
धृतराष्ट्रसुतानीं ही, तुच्छें या मणिपरीस तीं रत्नें. ३८
ज्याचें धारण करितां सुरराक्षसदैत्यनागभय कांहीं,
तैसें चि दस्यु[1]शस्त्रव्याधिक्षुद्भय हि लेश ही नाहीं. ३९
एवंवीर्य[2] सुमणि हा कौस्तुभ[3]सा दिव्य; या अमूल्याला
इच्छिल तो हि, यशा जो मर्दुनि दनुज्यांचिया चमू ल्याला.
सर्व हि भोग्य चि भोक्त्या पुरुषा, परि हा मणींद्र अत्याज्य,
प्रभु हो! केवळ जैसा देवा दहना[4] पदार्थ अत्याज्य[5]. ४१
अत्याज्य महामणि तर्हि देतों ज्या देववाल सन्मुनि हो!
सद्वचनें सर्वस्वत्यागें हा[6] जन सुकीर्ति[7] जन्मुनि हो. ४२
परि हें व्यर्थ न होइल जैसें दहनार्चि[8] शुष्कदर्भांत,
सोडील पांडवांतें अस्त्र, तयांच्या पडेल गर्भांत.' ४३
व्यास म्हणे, 'मति दुसरी न करीं, स्थिर वचन या! असों दे हें;
या तव समंजसत्वें आम्हीं रोमांचितें असों देहें.' ४४
एवं[9] व्यासानुमतें पांडुसुतांवरुनि अस्त्र तें फिरवी,
तद्गर्भांवरि[10] पाडी, परि त्याची[11] मति तपस्विता हिरवी. ४५

१. चोर, शस्त्रें, रोग व क्षुधा यांचें भय. २. अशा प्रभावाचा. ३. चौदा रत्नांपैकीं एक मणि; हा विष्णूच्या गळ्यांत असतो. ४. अग्निनारायण. ५. आंति आज्य ज्यांत—**पंत.** ६. मी. ७. चांगली कीर्ति ज्याची असा. ८. अग्नीची ज्वाला. ९. याप्रमाणें. १०. पांडवांच्या [उत्तरेच्या ठायीं असलेल्या०] गर्भांवर. ११. अश्व-

"देवि! पहा हा मणि घे, जो त्वां आज्ञा करूनि आणविला,
त्वत्सुत् हंत्यासि तुज्या [1]व्रतराजें स्वप्रताप जाणविला. २१
तूं राज्ञि! आठवूनि क्षत्रियधर्मासि शोक हा टाकीं;
[2]या आले यश घ्याया देउनि सर्वस्व लोक हाटा कीं. २२
सर्वसुहृच्छिष्टमतें धर्में योजूनि सामसदुपाया,
पाठवितां शत्रुकडे प्रार्थुनि कुरुकुळशिवार्थ यदुपा या, २३
तूं कोप[3]चलत्तनु, अनुकरुनि [4]पवनजनितकंपकदलीस,
स्मर जें 'पति सुत बंधु न मज' ऐसें कठिन वचन वदलीस.
देवि! गदेनें निर्मळ जोडाया त्वत्प्रसाद बहु मोटा,
मांड्या मोडुनि वधिला, तुज दावी वाम अंक जो खोटा. २५
वदलों तसें चि केलें दुःशासनकंठरक्तपान हि तें,
शत हि अमृतपानें हे जीभ म्हणति, जेंवि रक्तपा, 'न हितें.'[5] २६
धनु टाकविलें, मणिसह यश हरिलें, दंड हा चि त्या युक्त,
केला नारदकृष्णानुमतें गुरुपुत्र म्हणुनि तो मुक्त." २७
कृष्णा म्हणे, 'बरें, मीं केवळ अनृणत्व पावल्यें आजि;
गुरुसुत गुरु चि; अहो! [6]धी भ्रमली होती पहा कसी माजी. २८
द्या प्रभुसि, न वज्रिकरा हा करितां चिर हि युद्ध यावा हो!
जैसा स्यमंतकाला अक्रूर, तसा चि शुद्ध या वाहो.' २९
[10]स्वगुरूच्छिष्ट म्हणुनि मणि साध्वीवचनें हि नृप शिरीं बांधी,
जडवस्तुच्या भ्रमावी लोभें त्या सत्य साधुची कां धी? ३०

१. [ पातिव्रत्यरूपा ] श्रेष्ठ व्रतानें. २. या [ जन्मरूपां ] बाजारांत. ३. रागामुळें हालत आहे शरीर ज्यांचें अशा. ४. वाऱ्यामुळें हलणाऱ्या केळीस. ५. स्वभावें जळवेला रक्तपान आवडतें, न तसें अमृतपान—पंत. ६. बुद्धि. ७. धर्मास. ८. इंद्राच्या हातीं. ९. शतधन्वानामक यादवानें सत्राजितनाम मारून त्याची कन्या सत्यभामा इच्याजवळील स्यमंतकमणि आणून अक्रूरास दिला होता. १०. आपल्या [ गुरुपुत्ररूपा ] गुरूचा प्रसाद.

उदयाचळ अमृतकरें तैसा तो धर्म मणिवरें साजे,
कृष्णा म्हणे, 'निववीले डोळे त्वां बा यदूत्तमा! माजे.' ३१
धर्म म्हणे, 'श्रीकृष्णा! सर्वशिबिरयोधकदनकर वीर
द्रौणि कसा झाला अ[1]तिशक्तिश्रीकेलिसदन क[2]रवीर? ३२
आचार्यसुतें केलें अत्यद्भुत कर्म कोणतें बा! कीं?
या कदनें रोमांचित झाले असतील सर्व सुर नाकीं. ३३
वधिले एकें चि कसे कृष्णासुत जे सह[3]स्रशतयोधी,
शस्त्रास्त्ररहस्य जयां प्रद्युम्न द्वारकेंत बहु बोधी? ३४
गुरु हि जयाला वचके, न च केवळ गांठि आग्रहें घाली,
त्या धृष्टद्युम्नाची हानि कसी द्रौणिच्या करें झाली? ३५
अ[4]रुण सुगनीं रविच्या, आम्हीं प्र[5]भुच्या पुढें तसा केला,
तो हि ससैन्य शिखंडी द्रौणिकरें केंवि अलपसा मेला? ३६
अद्भुत तेज अकस्मात् कोठुनि आलें नवें च? हाय! कसा
जाला माज्या शिबिरीं द्रौणि, त्रिपुरीं महेशसायकसा?' ३७
श्रीकृष्ण म्हणे, 'धर्मा! बहुधा तो शरण शंकरा गेला,
ज्यातें म्हणवुनि सुरपतिवरि काळावरि हि रंक रा[6]गेला. ३८
प्रायः प्रसन्न झाला आचार्यसुतासि देव देवांचा,
जो ईश्वरेश्वर, प्रभु, अ[7]व्यय, कल्पद्रु र[8]चितसेवांचा. ३९
प्रभु वज्रिचें हि करवी भलत्या होउनि सहाय शा[9]तन या,
गुरुच्या देता जाला तेज नृपा! तो म[10]हायशा, तनया. ४०
तो चि प्रवर्तकप्रभु आम्हां सर्वांचिया हि चेष्टांचा,

१. अग्निशक्तिरूप लक्ष्मीच्या क्रीडेचें स्थान. २. कोल्हापूर. ३. लक्षावधि योद्ध्यांशीं लढणारे. ४. आर्या० आदि० अ० ४।७७ ते ८७ पहा. ५. भीष्माच्या. ६. रागावण्यास समर्थ झाला. ७. अविनाशी. ८. केली आहे सेवा ज्यांनीं अशांचा. (भक्तांचा). ९. खंडन, विनाशन. १०. महाकीर्तिमान्.

श्रेष्ठांचा परिपाळक, घातक कर्मानुरूप मेष्टांचा. ४१
जा शरण ईश्वराला, त्याचा चि हितप्रसाद साधुनि घे.'
डोहाकडे चि जैसा अतितप्त, शिवाकडे चि साधु निघे. ४२
निववुनि भक्तमयूरा करुणाघन हा च नाच शिकवीतो,
बहु सुकृतयशःसस्यें क्षेत्रीं क्षेत्रीं यथेष्ट पिकवीतो. ४३

इति श्रीमहाभारते श्रीरामनंदनमयूरविरचिते ऐषीकपर्वणि नवमोऽध्यायः.

समाप्तमैषीकम ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।



१. न इष्ट अशाचा. २. पुण्य व यश हा च धान्यें ३. सर्व देहरूपी शेतांतून.

# स्त्रीपर्व.

## अध्याय पहिला.



नगरीं सशोक संजय येउनि धृतराष्ट्रराजसदनातें,
कळवी सविस्तर वृकोदरकृतदुर्योधनोरुकदनातें.[1] १
धृतराष्ट्र पडे मूर्छितः भासे त्या ताप तो न वांचविसा:
सोसील शोक किति? सुत मेले अठरा दिसांत पांचविसा. २
त्याला विदुर म्हणे, 'या सुतशोकविषासि भर्ग[2] हो राज्या!
[3]भवकांतारीं शिरतां श्रम त्यास हि, कथिल गर्ग होरा ज्या. ३
मेले शतमात्र तुझे बा! साठ सहस्र पुत्र सगराचे,
किति शोक करिसि? झाले सर्व प्रिय अतिथि शक्रनगराचे.[6] ४
[7]कालोपद्रुत लोक न पावे चि त्राण हा. निजायाचें
आम्हीं तुम्हीं श्मशानीं, पावोनि प्राणहानि जायाचें. ५
पावावें तुजपासुनि पुत्रांच्या, [8]सतिळ आजि तोय, शतें:
घेतो अमृतप्रद जें, प्रेतां जो उदक पाजि तो यश तें.' ६
अंध म्हणे, "बा! ज्यांहीं पाजावें त्यांसि सलिल पाजींव,
परि मज पाहुनि म्हणतिल 'हा आला मूर्त कलि, लपा,' जींव.
अंतःपुरीं, बहाया जा गांधारी पृथा, सुना, [10]सीरः
मानू मत्धृदयाहुनि पविकठिनत्वा वृथा सुनासीर.[11]" ८
बाहिर काढुनि विदुरें बैसविल्या सर्व बायका यांनीं,[12]

१. भीमाने दुर्योधनाच्या मांड्या मोडल्याच्या हकीकतीला. २.[ हालाहल विष पिणारा] शंकर. ३. संसाररूपी अरण्यांत. ४. मुहूर्त (गर्गाचार्यकथित मुहूर्त उत्तम मानितात). ५. शल्य० अ० २११ वरील तिसरी टीप पहा. ६. स्वर्गाचे. ७. कालानें पीडिलेला. ८. तिळासह पाणी; तिलांजली. ९. प्राणिमात्र. १०. [आंत] शीर. ११. इंद्र. १२. रथांत.

त्यांच्या न साहिलें [1]जनदृक्पाताद्यसुख काय कायानीं! ९
'हा! हा!' म्हणत चि राजा सर्वांतस्त्रीजनांसह निघाला,
वाटे चोरानीं त्या [2]सार्थावरि घातला गहनि घाला. १०
स्त्रीपुरजनांसह पथीं [3]प्रतिपद बहु दीन होत साक्रोश,
राजा गेला जों त्या नगराबाहेर तो तसा क्रोश, ११
कृप, भोज, द्रौणि तिघे पाहुनि राज्यासि दीन आरडले:
ते [4]राजदार जैसे तैसे ते ही म्हणोनि 'हा!' रडले. १२
'उरलों तिघे चि आम्हीं मागें भोगावयासि शोकातें,
गेला त्वत्पुत्र करुनि बहु दुष्कर कर्म शक्रलोकातें.' १३
ऐसें सांगुनि सांत्वुनि विकळा [5]वैचित्र्यवीर्यनृपतीतें,
[6]जी शतसुतशोकार्ता भेटुनि सांगे तसें चि कृप तीतें. १४
'राज्ञि! अधर्मे भीमें केला प्रभुघात काय बोलावा!
वैरें ज्ञातिमनांत न कीं ग्रीष्मे [7]पल्वलांत [8]ओलावा. १५
केला घात अधर्मे बोलुनि केवळ मृषा [9]गुरुवराचा,
चूरुनि ऊरु [10]निरर्गळमतिहीं तैसा चि हा कुरुवराचा. १६
तैसे चि गुरुसुतें हि क्षोभुनि त्या शिबिरमंडळामधिले
धृष्टद्युम्नादि सकळ पांचाळ द्रौपदीसुत हि वधिले. १७
सर्वसुतवधें तुमचा पांडुसुतांचा हि जाहला घात,
धर्मादि पांच, केशव, सात्यकि हे मात्र राहिले सात. १८
युद्धं चि देव जाले न करुनि ही अश्वमेध सुत नाकीं.
दुःखावरि सुखशोभा; [11]मग मुक्ता प्रथम वेध सुत नाकीं. १९
शोकातें चुकवाया अतिदुस्तर [12]मोहपोत टाकुनि द्या,

---

१. [आपल्यावर] लोकांची दृष्टि पडल्यामुळे वगैरे होणारें दुःख. २. व्यापाऱ्यांच्या टोळीवर. ३. पावलोपावली. ४. राजस्त्रिया. ५. धृतराष्ट्रास. ६. गांधारी. ७. लहानशा तळ्यांत. ८. पाण्याचा (पक्षीं) दयेचा, स्नेहाचा. ९. द्रोणाचार्यांचा. १०. युद्धास आळा नसणाऱ्या (पांडवांनीं). ११. नाकीं [प्रथम] वेध (भोंक) [व] सुत, मग मुक्ता (मोती). १२. मायापाश.

खुडविति बाटुनि लंघुनि संपत्ति जडा[1], जशा तटा कुनद्या[2].२०
द्या आज्ञा, पळतों; कीं, आम्ही उरलों तिघे चि, ते सप्त;
येतिल वधितिल, झाले सुप्तप्रियपुत्रपातनें[3] तप्त.' २१
आज्ञा घेउनि तेथुनि पळत चि हस्तिनपुरासि कृप गेला,
निजराष्ट्रास चि भोज, द्रौणि व्यासाश्रमीं शिरुनि ठेला[4]. २२
भानु नुगवतां[5] भेटुनि राजाला तींकडे तिघे झुकले,
त्यावरि सांपडला[6] गुरुसुत, दोघे अप्रधान[7] ते चुकले. २३

---

# अध्याय दुसरा.

ऐकुनि, सकुटुंब पिता आला, सोडुनि नगर, बाहेर,
चित्तीं धर्म म्हणे, 'ये, स्नेहाहुनि[8] उग्र[9] न गर[10] बा! हेर[11].' १
जाय युधिष्ठिर सानुज भेटाया साधु; तो पुढें चाले,
तेव्हां युयुत्सु केशव सात्यकि मागोनि चालते झाले. २
त्यांमागुनि आप्तांच्या घेउनियां बहु समागमें भार्या,
चाले [12]देवी जीचा कैवारी देवदेव ती आर्या. ३
गंगातीरीं जातां धर्मनृपा तदनुजां तदनुगां[13] जी
देखे, दे खेद स्त्रीः वाटे अदितितनुजांस[14] दनु[15] गांजी. ४
'धर्मज्ञता तुझी ती कोठें? नव्हतासि दिसत घातकसा.
कैसा अजातरिपु तूं? केला हा स्वपरसर्वघात कसा? ५
सुत, बंधु, तात, मातुळ, संबंधी, श्वशुर, गुरु, सखे, दास

१. मतिमंदास. २. लहान नद्या. ३. झोपी गेलेल्या प्रियपुत्राच्या वधानें. ४. राहिला. ५. उगवण्यापूर्वी. ६. पांडवाना. ७. [मुख्यहनन करण्यांत] प्रमुख नव्हत असे ते (कृपकृतवर्मा). ८. पुत्रस्नेहाहूनि–**पंत.** ९. आत्मघातक–**पंत.** १०. विष. ११. पहा–**पंत.** १२. द्रौपदी. १३. त्याच्या मागून येणाऱ्यास. १४. देवास. १५. दानवमाता. (अदिति व दनु ह्या कश्यप ऋषीच्या एकंदर तेरा भार्यांपैकी होत).

मारविले कीं! कैसें देइल सुख राज्य तुज सखेदास? ६
तुजसम हेतु[1] जगाच्या कोणही जाला नसे विलापाला.
राजर्षि कसा? सोडुनि संग[2] वनीं कां न सेविला पाला? ७
द्रोणावांचुनि, भीष्मावांचुनि, अभिमन्युसूनुवांचून
भोगिसिल भोग कैसे? राया! करिसील काय वांचून? ८
जेणें बहु श्रुतींला[3] व्हावें तैसें चि शर्म[4] रसनेला,
तो त्वां जयद्रथासह कैसा विलयासि नर्मरस[5] नेला? ९
दैवें हा बहु अधिक श्रीरामापरिस दाविला पार्थः
तो अन्यवधूंच्या[6], न स्ववधूंच्या परि, सदा विलापार्थ.' १०
ऐसें कुरुस्त्रिया बहु वदल्या पतिपुत्रशोकदावार्ता,
त्या ऐकिल्या मुकयानीं[7] शोकार्तें[8] परमशोकदा वार्ता. ११
जावुनि पुढें पित्याला सांगुनि निजनाम करि पदीं नमना,
क्रुद्धा सिंहासि जसा अपराध करूनि करिप[9] दीनमना[10]. १२
'त्या प्रह्लादासि तसा रक्षील चि कृष्ण सारसाक्ष[11] मला,'
या भावें भेटाया त्या व्याघ्रा कृष्णसारसा[12] क्षमला[13]. १३
धर्मातें आलिंगी तो राजा अप्रसन्न चित्तानें,
सुरसा[14] हि न बहु मानी जेंवि ज्वरदूषितास्य[15] पित्तानें. १४
अंध मनिं म्हणे, 'करितों सुतशतनकाळा! तुझें पहा पीठ;'
तें समजे श्रितरक्षणकीर्तिमहाशक्तिचें[16] महापीठ. १५

१. कारण. २. विषयासक्ति. ३. कानाला. ४. सुख. ५. थट्टामस्करीचा रस. (धर्माला जयद्रथ हा च एक चुलत मेहुणा; तो मारून टाकल्यामुळें मेहुण्यांनीं थट्टा-मस्करी करून एकमेकांना सुखवावयाचें तें आता संपलें, असा भावार्थ). ६. [कारण] तो (श्रीराम) सदा अन्यवधूच्या विलापार्थ; स्ववधूच्या विलापार्थ न. ७. मुकाट्यानें. ८. दुःखपीडित धर्मानें. ९. गजश्रेष्ठ. १०. मन दीन झालेला, खिन्न. ११. कमलनेत्र. १२ हरिणासारखा. १३. समर्थ झाला. १४. उत्तम चव असलेल्या अन्नास. १५. तापानें कडू झालें आहे तोंड ज्याचें असा. १६. आश्रितांचें रक्षण करणें या कीर्तिरूप महाशक्तीचें मोठें स्थान असा (श्रीकृष्ण).

त्या प्रभुनें[1] लोहमयी भीमप्रतिमा समीप आणविली,
ती युक्ति मुक्तिपतिनें कोण्हां धर्मादिकां न जाणविली. १६
धर्मा भेटुनि, भीमा भुज पसरी भूमिपाळ कवळाया,
नमुनि भुजांत शिरे जों, तों रक्षी देव काळकवळा[2] या[3]. १७
आलिंगनीं करांहीं घे प्रभु धर्मानुजास हिसकून,
तृणसम तुच्छ कराया पविदृढ[4]दशशतभुजास हि शकून. १८
भक्तांसि बहु जपे प्रभु, शिरकों दे भुज हि केशितुंडांत[5].
जो गमला पडला नवकुवलयहार[6] चि हुताशकुंडांत[7]. १९
काढुनि मागें झडकरि सत्य, दिला त्यासि भीम लोहमयः
तो काय? प्रभुतेजें पावेल सहस्रमाय[8] मोह मय[9]. २०
रगडुनि धरुनि उरासीं पिष्ट करी त्या हि आयसा[10] कु-पिता[11];
धर्माधर्म हिताहित इत्यादि विचार कायसा कुपिता? २१
समजुनि सत्य वृकोदर तो लोहाचा हि भग्न करि पुतळा,
मानीं नेला चि, जरि सुदुर्जय, तरि निजशतात्मजरिपु तळा[12].
नागायुतबळ[13] राजा कोपें भीमा चुरूनि लोहाच्या,
श्रमला, शोणितें[14] वमला, नादीं लागोनि पुत्रमोहाच्या. २३
लोहित वमला, श्रमला, भ्रमला, गमला परासु[15] तो पातें[16],
पावे सुदुर्दशेतें बहुवश होवूनि भूप कोपातें. २४

१ श्रीकृष्णानें. २. मृत्युमर्माचा घास च अशा. ३. भीमास. ४. ज्या कृष्णानें परशुरामावतारी सहस्रार्जुनाच्या वज्रतुल्य अशा हजार बाहूंचे बल चालू दिलें नाहीं, त्याला धृतराष्ट्राच्या बाहुबलाची पर्वा होती असें नाहीं. पण त्यानें भीमप्रतिमा पुढें करून भीमाला मागें सारलें, असा अर्थ. ५. केशि हा कंसपक्षीय राक्षस अश्वरूपानें कृष्णगोपालांना पीडा देण्याकरितां आला असतां कृष्णानें त्याला त्याचे तोंडांत हात घालून ठार केलें, अशी कथा आहे. ६. नूतन कमलाचा हार. ७. अग्निकुंडांत. ८. हजारो माया करणारा. ९. मयासुर. १०. लोखंडी पुतळ्यास. ११. दुष्ट धृतराष्ट्र. १२. रसातळास; नाशास. १३. दहा हजार हत्तींचें बळ असलेला. १४. रक्त. १५. गतप्राण. १६. [ भूमीवर ] पडल्यानें.

संजय धरुनि तयातें '[1]मैवं मैवं' म्हणोनियां शमवी,
[2]हस्तिपक मदांधगजा चुचकारी तेंवि [3]सांत्व तें गमवी. २५
डसल्यावरि नागाचा तैसा त्याचा अशेष कोप सरे,
जेंवि [4]तममुक्तविधुचा, [5]तत्स्नेहाचा प्रकाश तो पसरे. २६
होय [6]विमथितोरस्क प्रभु तो बाहेर आयसानें हो!
स्नेहें आंत हि; पश्चात्तापद तें कर्म काय [7]सानें हो!? २७
'हा भीमा! हा भीमा!' म्हणुनि महाराज तो बहुत चि रडे,
दुर्वहशोकनगभरें धृतितेजोबळहरें बहुत चिरडे. २८
दवडुनि क्रोधाचा, स्नेहाचा शुद्ध आणिला ऊत.
'आतां हे [8]राजश्री [9]माज्या भीमासि [10]पाणि लावूत.' २९
हें मनिं आणुनि, जाणुनि [11]अवसर [12]नवसरसिजाक्ष तो बोले,
जो देता मधु-कैटभ-कनककशिपु-मुख-महासुरां [13]झोले. ३०
'राज्या! न च शोचावें; बा! जाली प्राप्त [14]भी महा ज्याला,
तो लोहाचा पुतळा; तुझिया भाग्यें चि भीम हा [15]ज्याला. ३१
ती भीमाची लोहप्रतिमा चि, करावयासि [16]वर्जीस,
करवी परवीरपराभवद त्वत्पुत्र भूमिवर जीस. ३२
भीमातें रक्षाया [17]भंजली [17]कष्टांसि मायसी प्रतिमा,
[18]कुरुंची, स्वमूर्तिहुनि बहु मानवली आजि आयसीप्रति, [19]मा. ३३
म्यां समजुनि भाव तुझा माघारा भीम काढिला तूर्ण,

१. असें नको, असें नको. २. महात. ३. सांत्वन. (कोपशात्यर्थ केलेलें मृदु भाषण). ४. राहुपासून सुटलेल्या चंद्राचा. ५. त्याच्या (धृतराष्ट्राच्या) प्रेमाचा. ६. भग्न झालें आहे वक्षस्थळ ज्याचें असा. ७. लहान. ८. राजश्री धृतराष्ट्र. ९. कृष्णाच्या. १०. हात. ११. योग्य समय. १२. नवीन कमलासारखे नेत्र असणारा (श्रीकृष्ण). १३. गोते, हिसके. १४. भीति. १५. जगला. १६. जीस परवीरपराभवद भूमिवर त्वत्पुत्र करवी [व] जीस करावयास [तू] वरजीस (नाकारीत असस्) ती चि [ही] भीमाची लोहप्रतिमा. (भीमाची लोहप्रतिमा का करण्यांत आली होती?). १७. श्रम पावली. १८. कुरुवंशाची. १९. राज्यश्री—**पंत.**

पुतळा दिला अयाचा, यास चि करितासि अन्यथा चूर्ण. ३४
समज महाराजा! त्यां समयीं केली तुझी हि हे सेवा;
देवा! व्यर्थ बुडविला होता त्वां तो तसा चि हा ठेवा. ३५
राया! तुझें भुजांतर जें हें, या मित्र काळमुख युक्त;
नाहीं च असा कोण्ही जन होइल यांत पडुनि जो मुक्त. ३६
मरणार चि पुत्र तुझे: हा भीम निमित्तमात्र बा राया!
अद्यापि कां न शमसी? कां गा! जपतोसि यासि माराया?'
ऐसें प्रभु बोले तों दासानीं शीघ्र आणिलें तोय,
राजा प्रक्षाळुनि मुखकरचरणाद्यवयवांसि शुचि होय. ३८
प्रभु पुनरपि त्यासि म्हणे, 'श्रुतिशास्त्रपुराण सर्व पढलास.
परमपदीं, पाठ करुनि गुरुशुक्रप्रोक्त नीति, चढलास. ३९
सुज्ञ, समर्थ सुमार्गीं वर्ताया वर्तवावया असुनीं,
वसुनीं बुधांत, वसुनीं जोडावें सर्वथैव जें असुनीं, ४०
तें पुण्य यश न जोडुनि साधूंचा द्रोह काय हा केला!
बधिर नसोन हि न दिला आप्तांच्या कां न मान हाकेला? ४१
अपराध तुजा, तूं चि क्षोभसि, तुज काय हें उचित राज्या!?
लाविसि दोष बळें त्या स्वप्नीं हि न ठाउका शुचितरा ज्या. ४२
आम्हीं भीष्म, विदुर, गुरु, संजय असकृत् तुझें भलें वदलों,
त्वां परि तें न च केलें, लटिकें बोलों नको, नको बदलों. ४३
जाले व्यसनाशनिचे ज्यास्तव आघात हे तुला खोटा
त्यजिला न कां, जसा गरगर्भित बा! घातहेतु लाखोटा? ४४

१. नाहीं तर. २. दुर्योधनरूप. ३. भीमरूप. ४. दोन बाहूंच्या मिठीमधील अवकाश ५. श्रेष्ठ पदावर. ६. सुरगुरु बृहस्पती व असुरगुरु शुक्राचार्य यांनीं सांगित लेली. ७. द्रव्यानीं. ८. प्राणानीं. ९. हितोपदेशकांच्या. १०. हाकाटीला. ११. अत्यंत पवित्र अशा (धर्मास). १२. संकटरूप वज्राचे. १३. दुर्योधन. १४. आंत विष असलेला १५. लाखलोटा. (लाखेनें मढविलेले मडकें).

भ्रमसि कासि 'यतो धर्मस्ततो जय' असें सुतासि कळवून ?"
राज्ञी म्हणे, " कथितसा हित सत्य तुम्हीं दयाभ्र मामाजी !
बा ! माजी मति शिरली, हे पर हे निज, न या भ्रमामाजी. ७
कुंतीचे ते माजे, माजे जे ते चि पुत्र कुंतीचे;
निजधर्म चि संसारीं मुक्तीचे हेतु; सूनु गुंतीचे. ८
मन मातेचें चिंतुनि अगुणा हि मृता मुलास कळकळतें,
काय कथूं मीं? साक्षान्नू ईश्वरः बा ! तुला सकळ कळतें. ९
दुर्योधनदुःशासनकर्णशकुनिहीं च या विलापार्थ
सर्वस्व हरुनि कपटें नळसा चि पिटूनि लाविला पार्थ. १०
कुंतीचा माद्रीचा उत्तम, माजा चि ओखटा, कुसवा;
कोह्मो न क्षत्रिय या स्वमतें कल्पूनि दोख टाकु सवा. ११
वत्स विजय, भीम. नकुळ, सहदेव परम भले, न अपराधी;
धर्म चि धर्म चिर असो; दृषी माजी मला चि, न परा, धी. १२
यश सुख चि वीरसूला पुत्र मरो जिंतुः किंतु निःस्वा मी
वदत्ये ऐका, जळत्ये ज्या दुष्कर्मासि चिंतुनि स्वामी ! १३
शिक्षाधिक दुर्योधन दुर्जय भीमें रणांत जाणून,
आणून अधर्म मनीं वधिला नाभीतळीं हि हाणून. १४
बहु पोटीं भडभडतें, गडबडतें चित्त जें विमळ मळतें,
वमनाविणें शमे तम न, उसळलें पित्त जेंवि मळमळतें. १५
युद्धास म्हणे 'मृगया,' जाणों, पुत्रास पुंष्कराक्ष[10] 'ससा,'
दैवें[11] धर्म हि झाला केवळ हृदयांत शुष्क राक्षससा." १६
झाला गांधारीचे ऐसे ऐकोनि बोल कातर[12] तो[13],

---

१. दयाघन. २. पुत्र बधाचे [हेतु होत]. ३. दोष. ४. रणमख-**पंत.** ५. जिंको. ६. परतु. ७. सर्वस्वहीन. ८. शिक्षणानें अधिक अशा. ९. जेंवि उसळलें (वाढलेलें) [आणि] मळमळतें पित्त वमनाविणें [तेंवि] तम (दुःख) वमनाविणे (बाहेर काढल्यावांचून, आक्रोश केल्यावांचून), न शमे. १०. कमलाक्ष श्रीकृष्ण. ११. दुर्दैवाने १२. भयभीत. १३. धर्म.

भीम परि वदे साचें; कीं, व्यसनीं सत्यबोलका तरतो. १७
'माते गांधारि! न तव हृदय दयाशांतिसदन तापावें;
मज सत्यवाणि! परिसुनि सत्यवचन साध्वि! पदनता पावें.
धर्म अधर्म असो, म्यां नाभीखालीं प्रहार सति! केला,
म्यालों मरणास, खरें कथितों तुज पुण्यकल्पलतिकेला. १९
धर्में सुरासुरांच्या न च मरता तो महाभुज गदाहीं,
होता शुष्कार्द्रांच्या[1] क्षम देवि! जसा महाभुजंग[2] दाहीं[3]. २०
सर्वांच्या पटु[4] कटु[5] तत्तेज जसें तक्षकाहिविष मरणीं,
आचरलों माराया धर्माच्या[6] रक्षका हि विषम रणीं. २१
तेणें हि अजातारि प्रथम[7] अधर्में चि जिंकिला बाई!
यास्तव हि गदायुद्धीं आचरलों विषम कर्म मीं आई! २२
घातक झाला व्यसनीं पाडुनि जैसा निजानुगांधारि[8];
वदतों हें स्वशिरासह भूवरि ठेवूनि जानु[9] गांधारि! २३
यास्तव हीं आचरलों मीं या विषमा रणा, सदा व्यानें[10]
वपुसें व्यापाया पद दिधलें विष मारणास दाव्यानें[11]. २४
मज मारुनि न हरावें पुनरपि एकें हि राज्य उर्वरितें[12],
या भावें हि अधर्में वधिता झालों भिऊनि उर्वरितें[13]. २५
भोगूं न देइल मही निखिळा आम्हांसि जरि हि एकाकी[14],
म्हणुनि असें केलें; करि वृत्रवधीं हरि असें च गे काकी! २६
आम्हीं, जेंवि अपटुनीं[15], स्त्री मोकलिली[16] च सव्यथा पटुनीं;
बोल न वदावें तें; दावी ही ऊरु[17] सव्य[18] थापटुनीं. २७

१ वाळलेल्या व ओल्या (पक्षी) निबळ व सबळ याच्या. २. तक्षक. ३. जाळण्याच्या कामीं. ४. समर्थ ५. उग्र. ६ [गदायुद्धप्रसंगीं] युद्धनीतीचे रक्षण करणाऱ्यास (दुर्योधनास). ७. द्यूतप्रसंगीं ८. निजानुगांधाचा अरि—**पंत.** आपल्यामागून येणाऱ्या आंधळ्याचा शत्रु [त्याना] व्यसनीं पाडून घातक होतो. ९. गुडघे. १०. प्राण—**पंत.** ११. द्वेषानें. १२. उरलेल्यानें. १३. मोठ्या शत्रूस. १४. एकटा. १५. असमर्थांनीं. १६. उपेक्षिली. १७. मांडी. १८. डावी.

तेव्हां चि वधावा, परि धर्म विलंघूं न हे कृता[1] समया,
सम या तुझ्या सुतासीं कवि न च म्हणतील शंबरास, मया.
बहु काननांत आम्हां कष्टविलें, वैरवह्नि पेटविला,
त्यास्तव ऐसें घडलें, स्वर्गीं बंधूंसि बंधु भेटविला. २९
गेला वैरांबुधिच्या पाराला, राज्य पावला धर्म,
आम्हीं विमन्यु[2] झालों, माते! मानूनि यांत घे शर्म.' ३०
देवी म्हणे, 'प्रशंसा केली मत्सूनुची तुवां ताता!
त्याचा नव्हे चि वध हा, घातक नव्हसी करूनि ही घाता. ३१
पुसत्यें हें सांग अरे! ज्यांत नसे बहु विचारितां[3] धर्म,
शर्म हि नसे, तसें तें केलें त्वां घोरतर कसें कर्म? ३२
दुःशासनासि मारुनि करिता झालासि रक्तपानातें;
जाणत नसे कसी तव मतिजिह्वा, जेंवि रंकपा, नातें? ३३
बहु नाचलासि रक्तें भरुनि सकळ वदन होत राक्षससा,
स्वपरजन तुला भ्याला सिंहाला जेंवि कातराक्ष ससा.' ३४
भीम म्हणे, "गे माते! त्वच्चित्ता कर्म सत्य न गमो हें;
अन्याचें हि अपेय, प्राशीन कसें स्वरक्त मग मोहें? ३५
आत्मा जसा तसा चि भ्राता येथें दहांत कांहीं च
वेदस्मृतिशास्त्रमतें स्वानुभवें ही विशेष नाहीं च. ३६
हें वैवस्वत जाणे, अधरोष्ठावरि चढोनियां दांत
न स्पर्शिले, निरखिलें रक्तें शिरलें नसे चि तें आंत. ३७
'मूढा! करिसिल माझ्या रक्ताचें संगरांत पान कसें?
दुर्मिळ तुज हें भीमा! शूद्रा द्विजपूजनांत पानकसें.' ३८
ऐसें आठवुनि मला दुःशासन दे, 'विशारदा[11] भ्रात्या!'
हांसे 'वृथा चि गर्जसि' म्हणुनि, जसें देवि! शारदाभ्रा[12] त्या.

१. केलेल्या करारास. २. क्रोधरहित. ३. विचार करून पाहतां. ४. जळू. ५. भयभीत नेत्र ज्याचे असा. ६. स्वकीयाचें रक्त. ७. फरक. ८. सूर्याचा पुत्र यम. ९. खालच्या ओंठावर. १०. पन्ह्यासारखें. ११. पंडिता! १२. शरदृतूतील [शुष्क] मेघास.

जागत होतें चि मनीं माज्या तें [1]दारकचपरामर्शी
वदलों 'प्राशीन रुधिर' ऐसें जें काय वच [2]परामर्षी. ४०
केलें निजप्रतिज्ञावचन खरें देवि! [3]निरयपातात
चुकवाया, करुनि रणीं साध्वि! तुज्या पापपुत्रघातातें. ४१
[4]माज्या होतें व्रतसें दुःशासनरक्तपान [5]मज्जाया
करिती झाली, तेणें योग्या ती [6]रक्तपा न मज्जाया. ४२
माते! पूर्वी कां ते हितबोध करूनि मंद नावरिले?
देतीस दोष [7]अस्मच्छीर्षी काढूनि नंदनांवरिले." ४३
देवी म्हणे, 'सम [8]स्वि अघ केलें व्हाया स्वघात काय शतें?
मत्कुळ तसें बुडविलें सर्वांय हि कीं सचघातका! यश तें. ४४
[9]अल्पापराध एक हि नव्हता [10]रक्षार्ह शंभरांमाजि?
भीमा! व्याली कुस स्पष्ट शतां काय [11]शंबरां माजी? ४५
या अंधा वृद्धाची राहों देतासि एक जरि यष्टी,
भीमा मी मानस तरि होवूं दैन्यें कशास बहु कष्टी? ४६
काळा जेंवि तुला मम भी मानस तेंवि रे! चढे कुळ कीं
[12]वैरांच्या, तोयांच्या* भीमा! नसतें विरे च ढेकुळ [13]कीं.' ४७
ऐसें वदोनि देवी ती '[13]क्व स राजा' असें पुसे [14]धर्मा,
कांपे चळचळ तो प्रभु घालुनि हि [15]अभेद्यसत्तपोवर्मा. ४८
शापभयें कांपे बहु शीतें [16]दुर्गत जसा [17]परिणतवया,

१. स्वस्त्रांचे केशास आढतें वेळीं. २. मोठ्या रागानें. ३. नरकपतनास. ४. [जें] माझ्या व्रतासारखें होतें [तें]. ५. माझी स्त्री हिडिंबा. ६. रक्तपा—राक्षसी—रक्तपानें नरकीं मज्जाया योग्या नव्हे—**पंत.** ७. आमच्या डोक्यावर. ८. स्वतानें. ९. लहानसान अपराध ज्याचा असा. १०. रक्षण करण्यास योग्य. ११. शंबरासुरासारख्या शंभर पुत्रांना. १२. वैराच्या चढे कुळ कीं तोयाच्या चढे ढेकुळ नसतें—उरत नाहीं—विरे च कीं भीमा!—**पंत.** १३. कोठें. १४. धर्मराजाविषयीं. १५. अभेद्य अशा उत्तम तपश्चर्यारूप चिलखतास. १६. दरिद्री. (वस्त्ररहित). १७. उतारवय झालेला. * मुळांत 'तोयाचा' असा हस्तदोष झाला आहे.

अंध व्याघ्रीस म्हणे, जाणों 'विधिभाग ख्वा' हरिण 'तव या.'
जोडुनि कर धर्म वदे, 'देवि! असे तुजपुढें चि हा नीच,
त्वां शापूनि करावी या अधमाची पळांत हानी च. ५०
तव संतति च न केवळ, बुडविलि निखिळा मही हि या पापें:
निर्दय, निर्भय, निस्त्रप, भस्म करावा चि हा तुवां शापें. ५१
हा न च वांचों द्यावा, करिल चि अपकीर्ति संततों पार्थ:
साधु नव्हें मीं; वर्ते लोकांच्या काय संत तापार्थ?' ५२
ऐसें वदला भ्याला, आला जो निकट हस्त जोडून,
त्याला किमपि न बोले, राहे निश्वास दीर्घ सोडून. ५३
तत्साधुत्वें तन्मुख धरिलें: न च शापशब्द बोलवला:
कीं पायांवरि मस्तक ओपाया धर्मराज तो लवला. ५४
पट्टांतरांतुनि तिची दृष्टि सकृत् तन्नखांवरि च पडली,
हस्ती कुनखी झाला मणिनखनृप, असि तया हि गति घडली.
तें पाहुनियां प्रभुच्या पाठीसी तदनुजाधव रिघाला,
कीं घालावा न तसा तद्दक्पातें निजासुवरि घाला. ५६
भ्याला सहदेव, नकुळ, सात्यकि, भीम हि तिच्या गुरुतपाला.
तेव्हां अजातरिपु कीं तो एक न देवकीसुत लपाला. ५७
मग त्या सिंहांतें ती सात्वी आवरुनि दृष्टिशरभांतें,
स्वस्थ करि तच्चित्तें, देवी भुवनें जसी स्वशरभांतें. ५८
धाडी पृथेकडे ती धर्मा; दृष्टांत हा तया युक्त,

१. अन्वयार्थ—जाणों [गांधारीरूपी] अंधव्याघ्रीस [धर्मरूपी] हरिण, म्हणे, '[हा] तव विधिभाग (दैवप्राप्त भाग), या खा.' २. निलज्ज ३. वायसर्ची ४. यमराजाच्या साधुवृत्तीनें. ५. गांधारीचें मुख. ६. ठेवण्यास. ७. [डोळे झाकण्याच्या] वस्त्राच्या आंतून. ८. एकवार. ९. हाताचे ठायीं. १०. वाईट (काळीं) नखें असणारा. ११. रत्नाप्रमाणें उज्वल नखें असलेला. १२. धर्मराजास. १३. श्रीकृष्णाच्या. १४. त्याच्या धाकट्या वहिणीचा पति; अर्जुन. १५. गेला. १६. लपला. १७. दृष्टिरूप [सिंहघातक] शरभास. १८. आपल्या बाणानीं भ्यालेलीं. (कथा?).

गोपीनें वत्स जसा केला गाईस प्यावया मुक्त. ५९
बहुदिवसां सुत पाहुनि कुंती झांकुनि आननास रडे,
सरडीस ही बहुप्रिय जे मत न पुरा न कानना सरडे. ६०
कुरवाळुनि एकैका कुंती क्षतकायनंदनास रडे;
त्या प्रेमा ते वीर चि, अनुभवितिल काय नंदना सरडे? ६१
सहदेवातें कुंती पोटासीं धरुनियां म्हणे 'हाय!'
गाय सुकविजन यश, परि वीराची परमदुःखिता माय. ६२
'सुखविजयावह आहव कैसा तुज देवि काळि! झाला गे!?
कळलें; जेंवि सुतक्षत न स्वक्षत तेंवि काळिजा लागे.' ६३
तों नमुनि पडे पायांवरि पांचाळी, तिला म्हणे सासु,
'वत्से सत्सेव्यगुणे! राज्यसुख सुचिर पहा, रहा सासु.' ६४
रडत म्हणे ती, 'आर्ये! मज राज्य कशास तनयहीनेला?
सुशिवेचा काळानें संहरुनि यशास तनय ही नेला. ६५
राज्यसुख नको आर्ये! जीवित हि नको चि आपलें कांहीं,
दिधला त्यागुनि मज शतशीतकराहार्य ताप लेंकांहीं.' ६६
कुंती सुनेसि उठउनि, नेत्र पदरें पुसोनि, मग तीतें
ने गांधारीपाशीं तीसह निवावयासि जगतीतें. ६७
राहुग्रस्त जसें शशिबिंब चकोरांसि तापवी, सपट
तेंवि जिचें मुख अनुगां, कृष्णेहुनि जीस ताप वीसपट. ६८
ती देवी तीस म्हणे, " सांगों बहु काय तुज कुलीनेला?

१. धृतराष्ट्रगांधारी व कौरवस्त्रिया यांना धर्मादिपांडव तिरस्करणीय वाटत होते तरी कुंतीला ते पुत्रवत् प्रिय च होते, असा भावार्थ. २. जखमी झाली आहेत शरीरें ज्याचीं अशा पुत्रास. ३. नंदनवनास. ४. सुख व विजय देणारे. ५. युद्ध (येथें मूळांत 'आवह' असें लिहिलें गेलें आहे. परंतु अनुप्रासाच्या गडबडींत तसें लिहिलें गेलें असावें). ६. साधूंनी सेवण्यास योग्य असे गुण असणाऱ्या! ७. जीवंत. ८. सुभद्रा—**पंत.** ९. शंभर चंद्रांनीं हि नाहींसा न होणारा. १०. सर्व लोकांना. ११. वस्त्राच्छादन.

काळें पदार्थ दिधला होता तेणें चि तो, मुली! नेला. ६९
पुत्रि! मजकडे हि पहा. शत माजे वेचले, तुझे सुत सा[1].
शमवावा शोक [2]शमें, तैलाचा [3]शिखिसमुपशमें उतसा. ७०
हा मृत्युलोक मतिमति सति! गति ऐसी च यांत, 'नवि च' कवी
म्हणाति, 'सदा हि अविद्या, हे [4]सविवेका चि दांत न विचकवी.'
[5]अकृतार्थ कृष्ण जेव्हां गेला तेव्हां चि अर्थ जो भावी,
कथिला विदुरें; याची शक्रसभेंत हि सदुक्ति शोभावी. ७२
अर्थ [6]अपरिहार्य चि जो जाला गेला: वृथा चि हा शोक.
शोक सफळ जरि असता, मेल्यांला उठविते न कां लोक? ७३
कांय मृदु स्त्रीचें उर! शोकें तडकेल [7]उद्धतपशूर.
शोच्य नव्हेत तसे ते, मराति रणीं करुनि शुद्ध तप शूर. ७४
तूं सति! जसि च तसि च मीं, माजें हि तुजें हि दुःख सम; जावें
न मरोनि वृथा शोकें; आपण चि विवेक करुनि समजावें. ७५
मुलि! समजाविल आम्हां स्वविवेकाहूनि अन्य पटु कोण?
गोड गुहेचा शोकें गेहाचा काळकुटकटु [8]कोण.  ७६
न सुयोधनें, न कर्णें, न च त्या दुःशासनें, न [9]अक्षरतें,
हा नाश मदपराधें: विधिनें लिहिलें चुके न अक्षर तें. ७७
[10]पुंष्पोत्कटा वहु भली, मत्कुक्षिअसा न दुष्ट कुक्षि तिचा.
स्पष्ट सुबीजा सुरसा दूषी संबंधदोष [11]कुक्षितिचा." ७८

१. [ अभिमन्युमह ] महा. २. शांतीनें. ३. अग्नीच्या शांतीन. ( जाळ कमी करून ). ४. सविवेकास चि—**पंत.** ५. [ शिष्टांईचा ] हेतु सिद्धीस न गेलेला. ६. न टाळतां येणारा. ७. दांडग्या पशूंची छाती. ८. कोपरा. ( तात्पर्य, शोकाला घरापेक्षा अरण्य बरें ). ९. द्यूतप्रिय शकुनीनें. १०. रावणाच्या सावत्र बंधूंची माता. ११. वाईट जमिनीचा.

# अध्याय चवथा.

श्रीकृष्णवरें पाहे तें युद्धस्थान दिव्यदृष्टि सती[1],
योग्या जाणाया स्वव्रतपुण्यें ही अशेष सृष्टिस ती. १
क्षितिवरिल सर्व हि सुभटजन[2] एकवटूनि दिवस अठरा जे
मेले होते कौरवपांडवविजयार्थ करुनि हठ राजे, २
ते करतळामलकसे[3] दुरुनि दिसले अशेषः मग ती तें
पाहुनि बहुत तळमळे, मानी यमपुर चि युद्धजगतीतें[4]. ३
व्यासाज्ञेनें तेथुनि धृतराष्ट्र कुरुस्त्रियांसहित गेला,
नेला पांडुसुतानीं युद्धस्थानीं तिहीं पुढें केला. ४
जे भक्षिले शिवांहीं गृध्रांहीं कांतकाय[5] काकांहीं,
ते पाहुनि, न पहाती बहुमूल्यमणींस[6] बायका कांहीं. ५
तें सर्व स्त्रीचेष्टित[7] गांधारी दिव्यदृष्टिनें पाहे,
कृष्णासि म्हणे, 'कोणी स्त्री मजसम दुःखिता जगीं आहे? ६
हुडकिति शवें पहा पतिसुत वळखायासि बायका सारीं.
या कमळवनविहारा[8] शिरल्या[9] हंसी च काय कासारीं! ७
गोविंदा! गेले जे मत्सुत होउनि परासु नाकास,
हुडकिति तत्तनु[10] घालुनि माज्या सुव्रतपरा[11] सुना कास. ८
क्रव्यादांतें[12] वारिति: हा! हरिणी काय हाकितील हरी?
सोसिल शोकविषाच्या कृष्णा! मत्काय हा किती लहरी? ९
भीरुप्रकृति[13] हि न गणिति भय, पतिच्या भेटतां धडा, काकीं,
गृध्रीं, वृकीं हिः साहति कदली[14] हि करेणुचा[15] धडाका कीं. १०

१. गांधारी. २. चांगले योद्धे. ३. तळहातावरील आवळ्यासारखे. ४. रणभूमीस. ५. पतिदेह. ६. मोठ्या किमतीच्या रत्नास. ७. स्त्रियांची कृति. ८. कमलवनात क्रीडा करणाऱ्या. ९. सरोवरांत शिरलेल्या. १०. त्यांचीं शरीरें. ११. पतिव्रताधर्मनिष्ठ. १२. मांसभक्षकांस. १३. भित्र्या स्वभावाच्या. १४. केळी. १५. हत्तिणीचा.

शोधुनि जोडिति हो! ते पतिच्या शिरआदिअवयव धडा जे;
तारुण्यभर वधूंचा मच्चित्तीं तेंवि न सुतवध डाजे. ११
पदरें पुसोनि चुंबिति पतिमुख, सुरतांत तें जसें चुंबी,
बा! मत्क्रिया प्रसवली जैसीं, ऐसीं न कटु फळें तुंबी.' १२
दुर्योधनास भेटे, होय तिच्या फार भर विलापाला,
दैवें शतपुत्रविपच्छ्यामेचा तीस भरविला पाला. १३
आलिंगितां सुतशव स्फुरले बहुकरुण जे विलाप तितें
त्या दुःखा ते स्वल्प चि, सुकळत्रा जेंवि जेविलें पति तें. १४
"कृष्णा! पहा सुतेजा जोडा होता जगांत हा रविला,
हार विलासवतीनें जेंवि क्षितिनें तसा चि हारविला! १५
हार विलासवतीनें केला हा लक्ष्मणप्रसूनें कीं!
हारविला सवतीनें क्षितिनें, पुजिला सुरप्रसूनें कीं! १६
कृष्णा! युद्धारंभीं हा माजा पुत्र मत्पदा लागे,
'माते! विजय घडाया दे आशीर्वाद मज' असें मागे. १७
वदल्यें मेघश्यामा! या माज्या नंदनासि मीं बा गा!
'जिकडे सुधर्म तिकडे जय युद्धीं; न भ्रमें महाभागा! १८
वत्सा! जरि तूं युद्धीं न भ्रमासिल, पावसील सुगतीतें;
करितां कुलीन जेणें हर्षें स्वर्गीं स्वपूर्व फुगतीं तें.' १९
पूरुप्रमुख हि पूर्वज फुगावितिल चि परिसुनि क्षया गाल,
यागा लक्ष करिति परि हा अद्भुत, बा! तुम्हीं च या गाल.
रडत नसे पुत्रातें, स्वर्गा गेला, न सोडिली संधा.
कृष्णा! रडत्यें मीं या दीना हतबांधवा नृपा अंधा. २१

१. हां! जे शिरआदिअवयव ते शोधुनि पतिच्या धडा जोडिति. २. सुनांचा ३. कडुभोपळांचे वेल. ४. श्यामा—भाग—**पंत**. ५. [ किंवा हि ] जेवला [ तरी ]. ६. अत्यन्त तेजस्वी. ७. [ दुर्योधनपत्र ] लक्ष्मणाच्या मातेनें—भानुमतीनें. ८. गदायुद्धीं मत्पुत्र सुरकुसुमांहीं पुजिला कीं—**पंत**. ९. आपले पूर्वज. १०. कृष्णा'—**पंत**. ११. प्रतिज्ञा.

विटले कंसाराते! संसारा, ते चि एक जन धन्य;
अन्य व्यर्थ चि गेले, मेले विषयार्थ करुनियां जन्य. २२
स्त्रीरत्न, मुष्टिसंमितमध्या[2] हे लक्ष्मणप्रसू देवा!
हुडकुनि घेउनि आली नंदनशव, जेंवि हरपला[3] ठेवा. २३
मुख हुंगिती सुताचें, पतिवरि कर फिरविती, पहावेना!
कृष्णा! कोणाचा[4] तरि शोक करिल? हें मला सहावेना. २४
जी शुभवेष[5] शचीच्या[6] दिव्या वेषाअसा[7] विविध वाहे,
ती भानुमती नंदनरहिता कैसी असावि विधवा हे? २५
तापविती अतिदुःसह पतिसुतशोकार्क[8] आंत बाहेर,
विधिवरि बोटें मोडुनि कोपें खातात दांत बा! हेर[9]. २६
मणिकनकप्रासादीं स्वर्गीं देवांगना तशा वसल्या,
भग्नरथप्रेतगजच्छायेंत[10] सुना अहा! पहा बसल्या. २७
हा दुःशासन कृष्णा! मेला ही दाखवी न पाठ; उनीं
पडला पहा उताणा; अभिमान[11] असे असूंसि पाठउनीं. २८
व्याघ्र मृगाच्या तैसा याच्या हा भीम लोहिता[12] प्याला,
चढतां[13] शिरीं जडनदी न बुडवि जडसिंधु तो हि ताप्याला.
हा[14] जूढ भ्रात्याचें कर्णाचें प्रिय करावयासि तसें
साध्वीस सभेमध्यें गांजी, तें कर्म या गमे हितसें. ३०
बहु गंडूष[15] उडवित्या वाटेना काय जेयं[16] अभ्र[17] मुला?

१. युद्ध. २. मुठांत मावण्याजोगा बारिक कंबर असलेली. ३. हरवलेला. ४ कोणा कोणाचा. ५. चांगला पोषाख. ६. इंद्राणीच्या. ७. वेषाप्रमाणे. ८. अर्क=सूर्य. ९. पहा. १०. मोडलेले रथ व मेलेले हत्ती याच्या सावलींत. ११. मागे या देहाजवळ आहे-**पंत.** १२. रक्त. १३. मुझ द्रौपदीभीमाही क्षमा न केली, हे यांस अनुचित-**पंत.** (भावार्थ). ताफा=नद्यादिकांतून लाकडे वाहून नेण्यासाठीं त्याचा एकत्र केलेला रचनाविशेष. १४. दुःशासन. १५. गुळण्या. १६. जिंकण्यास शक्य. १७. मेघ.

स्ववनीं मदांध हस्ती लावीना काय हात अभ्रमुला? ३१
करिल बहु व्याघ्रीच्या जो मत्त बिडाल[1] काननीं चेष्टा,
कृष्णा! मंदा नीच्या त्या कुदशा वरिल कां न [2]नीचेष्टा? ३२
म्हणसिल कृष्णा! मज तरि 'मारावें या कसें न भावातें,'
सोडूं नये प्रशस्ता[3] शीला कुलजें जसें नभा वातें. ३३
'निजपुच्छतुडवित्याचा चावावा कां न काय सापानें?'
वद, झाला या बंधुक्षतज्याच्या लाभ कायसा पानें? ३४
कृष्णा! सभेंत केले सूक्तें जेणें [4]संमुत् सुकविकर्ण,
धर्मनयव्यवहारीं जो प्राज्ञ सदा समुत्सुक विकर्ण, ३५
तो हा वधिला, केलें कर्म अमितसाधुघातसें मोटें
खोटें हें; म्हणतिल, 'शिव! शिव!' कर्णीं घालितील बुध बोटें.
ऐसे च दुर्मुखादिक पडले आहेत सुत; [5]पतन यांचें
सर्व जना कळवितसे जें माजें कुतप, सुतप तनयांचें. ३७
सौभद्र शिशुशरभसा तो हा, संपन्न जो महाक्रौर्यें
तुजहुनि धनंजयाहुनि अधिक दिढीनें रणीं बळें शौर्यें. ३८
[6]कृष्णा! त्वत्सम तव कृतवर्णन भाचा परा सुकविता की,
झाला घालाया धृतवर्ण नभाचा परासु कवि [6]ताकीं. ३९
शुद्धा सरस्वतीसी कृष्णा! सोडी प्रभा न मेल्याला,
मज भगवान् भास्करसा हा हि महाभाग भा गमे त्याला. ४०
अंकीं मस्तक घेउनि ती बाळा उत्तरा पहा पतितें
[7]चिबुक धरुनि बोलवित्ये, 'लिहिलें ऐसें कसें [8]महापतितें?' ४१

---

१. बोका. २. नीच लोक प्रिय असणाऱ्यास. ३. शुद्ध अशा. ४. आनंदित. ५. [ युद्धांत ] मरून पडणें. ६. कृष्णा! त्वत्सम कृतवर्णन—कविकृतगुणवर्णन—तव भाचा परा—अरितें—प्रतापें सुकविता—शुष्क करिता—असा हा होता की, तो हा नभाचा धृतवर्ण—गगनासारिखा श्यामवर्ण—सौभद्र स्वाश्रयीं अमृतीं जे कवि होते ते स्ववियोगीं ताकीं—नीरसीं पराश्रयीं—घालावयासी परासु झाला—**पंत.** ७. हनवटी. ८. नीच, खडतर अशा दैवानें. * ऐरावतस्त्रीस.

म्हणत्ये, ' मौन त्यजुनि स्मितपूर्वक एक बोल बोला जी !
ती कसि निवेल तुमच्या प्रियवागमृतीं[1] च नित्य लोला जी ?
हा जन सखीसमाजीं तुमचा[2] सोडूनि काय पद रमला ?
चुकल्यें, क्षमा करावीः पसराया उशिर काय पदर मला ? ४३
नसतां उशी, उशीरव्यजन[3], पयःफेनशुभ्र[4] मृदु शयन,
कसि निज आली जरि शिर न मदंकीं, पदतळीं हि हा[5] शय न ?
अपराध कां करिल ? हे जाणे पतिदास्यधर्म साध्वी कीं.
अजि ! [6]तीर्थबुद्धि केवळ जी युष्मत्पीतशेषमाध्वीकीं[7]. ४५
नेत्रें उघडूनि पहा दासी तुमची च हे, नव्हे अन्या;
भलती स्पर्शील कसी ? मीं सत्य विराटनृपतिची कन्या. ४६
हा सातवा परिचया[8] मास, पहा गणुनि लोटले सा च,
इतुक्यांत कसे विटलां ? साधु म्हणति, 'सख्य साधुसीं साच.'
आर्या कृष्णा देवी, आर्या कृष्णानुजा, पृथा आजी,
यांवरि रुसलां कैसे जातां सोडूनि कां वृथा आजि ? ४८
सहदेव, नकुळ, अर्जुन, भीम उभे आर्य, धर्म मामाजी,
हे[9] तात[10] काय, जेथें न बहुमता दे मुखांत आमा[11] जी ? ४९
श्रीकृष्णजी ! तुम्हांला पाहुनि, रचिला तुम्हांअसा चि गुणें;
[12]सुकुशळ विधि, परि पडलें मुख्य प्रेमीं गुणीं च फार उणें. ५०
कृप, कर्ण, जयद्रथ, गुरु, गुरुपुत्र क्रूर हे, जसा काळ;
धिक त्यांतें, अन्यायें विरथ करुनि मारिला जिहीं बाळ ! ५१

---

१. प्रियवचनरूप अमृताचे ठायीं लोलुप. २. (मी) उत्तरा. ३. वाळ्याचा पंखा. ४. दुधाच्या फेसामारखे स्वच्छ. ५. माझा हात. ६. तीर्थाच्या ठायीं असणाऱ्या [पूज्य] वृद्धांप्रमाणें असलेली बुद्धि. ७. तुम्हीं पिऊन राहिलेल्या मद्यविशेषाचे ठायीं. ८. प्रथमसमागमाला. ९. महा. १०. वडील. ११. स्तन [देणारी सुभद्रा माता]. १२. तुमचा व माझा योग जुळविणारा ब्रह्मदेव अति चतुरः पण माझें प्रेम च फार उणें पडलें त्यामुळें असा प्रकार झाला; याचा त्याच्याकडे काय दोष ? असा भाव.

वीरा[1] कोणा पांडव माधव तव हे न नाथ सा मान्य?
मेलासि असा हि कसा सहसा चि, जसा अनाथ सामान्य?
अत्यद्भुत ही सुखद न यांचा यांतें हि न महिमा मातें
सुखदा होइल, मारुनि रिपुला, विपुला हि न महि मामातें. ५३
तुजवांचुनि वांचुनि सुख कैंचें? हा काय[2] भार; तार मला:
नेः हंस मानसी निजहंसीविण काय भारता[3]! रमला? ५४
उदकीं लवण, तसें हे करिल चि शोकांत उर विलीन सती;
असती मृदु तरि पळ या तापें लोकांत उरविली नसती. ५५
बहु अप्सरा सुरसुता आहेत मनोविनोदकुशला[5] हो!
पाणिग्राह्यत्वानें[6] तो हि जन उशीर[7], हा[8] हि कुश लाहो[9]. ५६
येइन कसि तरि सखया! मति पायांचा न वाहुं दे शपथ:
न विसंबेल पळ हि मज, आणिल तव शोक पुसत देश पथ.'
दायांतें आयांतें म्हणत्ये, 'मज लाविली वळें च सवे[10],
कां मोडितां तुम्ही च? क्षण आतां स्वपतिवेगळें नसवे. ५८
पतिजवळुनि कां नेतां नेउनि हितबोध करुनि खोलींत?
तुमच्या हि असें अंतर पडलें कां ग! क्रियेत बोलींत?'" ५९
जड[11] सोडवितां हृदयीं देह मनोमय चि उरविला पतिचा,
गांधारीनें कथिला[12] भिजवी प्रभुचें हि उर विलाप तिचा. ६०
"इकडे द्रोणदवानळदग्धा[13] देवा! पहा विराटनगा[14]
स्त्री[15] व्रततिसी[16] करपली बहु उष्णीं करुनियां चिराटन[17] गा! ६१

---

१. अन्वय–पांडव [व] माधव हे तव सा नाथ (रक्षणकर्ते) कोणा वीरा मान्य न? २. भारभूत. ३. भरतवंशोत्पन्ना अभिमन्यो! ४. मग्न. ५. मनोरंजनाचे कामी चतुर अशा. ६. पाणिग्रहणाम; अंगीकारास. ७. अप्सरारूपी वाळा. ८. उत्तरारूपी दर्भ. ९. लाभो, प्राप्त होवो. १०. [पतिसंगतीत असण्याची] सवय. ११. प्रेत. १२. कथिलेला. १३. द्रोणरूप वणव्यानें दग्ध झालेल्या. १४. विराटरूप पर्वतास. १५. विराटपत्नी. १६. वेलीसारखी. १७. फार वेळ हिंडणे.

क्रव्यादाहीं तडतड तोडुनियां भक्षिला चि मत्स्यप हा,
दैवें झाला जीवनविरहविनिश्चेष्ट सत्य मत्स्य पहा. ६२

---

## अध्याय पांचवा.



कृष्णा! भक्तांसि म्हणे गौरीचा कर जसा 'सुपायस[2] खा,'
कीं तूं सदा यशःप्रद पांडुसुतां सिकविता उपाय सखा. १
ऐसा चि सहाय, सखा मत्पुत्राचा उदार घनसा जो[3],
पनसा[4] 'जोड कर' म्हणे, 'तुजहुनि यश परिसता सुजन साजो.'
सर्वां वत्सांत जसा सुरभीचा अधिक तर्णक विराजे,
पुत्रांत तसा, म्हणती ज्यास 'यशःपूर्णकर्ण[5]' कविराजे, २
तो हा मोहामध्यें बुडवाया मज पहा कसा कर्ण
पडला आहे, हा! हे राधा कीं! तद्विलाप आकर्ण[6]. ४
राधा म्हणत्ये, 'हा! मज पुत्रवतींची च लागली दृष्टि:
पुत्रा! शून्या झाली तुजवांचुनि जेंवि रविविना सृष्टि. ५
मजपरिस हि बहु म्हणतिल हे वार्ता परिसतां धरासुर[7] 'हा!'
अस्मद्भाग्यें केला तो कर्ण रणांगणीं परासु, रहा[9]. ६
द्विज हो! संतत तुमच्या जो आशीरमृतवृष्टिनें ओला,
केला[10] धनंजयानें कल्पद्रुम भस्म तो कसा? बोला. ७
ऊठ[11], पुढें जा, ब्राह्मण होति तुझ्या भवनिं सुरसभाजन[12] कीं?

---

१. गतप्राण झाल्यामुळे चलनवलनादि क्रियारहित (पक्षी) उदकविरहित झाल्याने चेतनारहित. २. खीर. ३. कर्ण. ४. माझे यश ऐकणाराच्या अंगावर तुझ्याहून (फणसाहून) अधिक कांटे (रोमांच) उभे राहतात, असा भावार्थ. ५. कीर्तीनें भरले आहेत कान ज्याने. ६. ऐक. ७. भूदेव, ब्राह्मण. ८. रणभूमीकडे येणारा विप्रसमूह पाहून त्यास म्हणते. ९. थांबा. १०. मूळपाठ–**पार्थदवानें केला.** धनंजयानें=अर्जुनरूपी अग्नीनें. ११. कर्णास उद्देशून. १२. उत्तम रसांना पात्र.

बहु सादरा तव गुणीं, जसि वत्सा! [1]अवनिसुरसभा जनकीं. ८
हूं! विप्रांच्या पदरीं रत्नाहीं भरुनि दे अनेक पसे,
होउत नृप तव [2]दानें विमद [3]सुरकरेणुच्या [4]अनेकपसे.' ९
[5]वृषसेना रणिं म्हणती, 'नाथा! तुज न विजयें, न गुरुशापें,
वधिलें कृष्णाक्षोभें, अथवा माज्या चि पूर्वकृतपापें. १०
ब्रह्मण्य, शूर, दाता, बुध, [6]सर्वांगोपभोग जो कर्ता,
हर्ता शत्रूपद्रव, दुष्टे महि! मारिला कसा भर्ता? ११
मज तुज हि सम चि भजला, उपभोगें तोषला: विलासवती
अन्या स्वप्नीं नेणे: त्यासि कसा दोष लाविला सवती!? १२
मज कां गिळिलें नाही पापे! रथचक्र गे! कसें गिळिलें?
दे उत्तर, ऐकों दे. कां न वदसि? तोंड काय गे! खिळिलें? १३
[7]बहुभर्तृका [8]कुशीला तूं, तुज म्हणतात सुकवि '[9]कु' नरी च,
रथचक्र [10]क्रव्यकवळ करुनि खरी जाहलीस कुतरी च. १४
[11]अल्पावशेष केला अवयव खाउनि वृकादिकीं जरि तो,
तरि [12]दृष्टिप्रीति पहा [13]कृष्णचतुर्दशतिथींदुसा करितो! १५
धर्मा त्रयोदशाब्द न ज्याच्या चिंतेकरूनि निज लागे,
तो हा पुन्हा नुठाया वसुधे! तुज दृढ धरूनि निजला गे!' १६
देवा! जयद्रथाचें सांपडलें परि नसे चि धड धड, तें
आलिंगिलें [14]सुतेनें पाहुनि माज्या उरांत धडधडतें! १७
जाली पहा कसी [15]बलवद्वैरें [16]मूढसिंधुराजगती,

१. ब्राह्मणाचा समुदाय. २. देणगीनें (पक्षीं) हत्तीच्या मदस्रावानें. ३. ऐरावत-णींच्या, अभ्रमच्या. ४. अनेकप=द्विप=मुख व शुंडा यानीं पिणारा=हत्ती. ५. हीं कर्णाची स्त्री? ६. सर्व अंग देशाचा उपभोग. ७. पुष्कळ नवरे (पक्षीं) राजे असणारी. ८. दुराचारी (पक्षीं) मृत्तिकामय. ९. वाईट (पक्षीं) पृथ्वी. १०. मांसाचा ग्रास. ११. थोडा च उरलेला. १२. नेत्रसमाधान. १३. वद्यचतुर्दशीच्या [एककलायुक्त] चंद्राप्रमाणें. १४. कन्येनें (दुःशलेनें). १५. बलवानाशी वैर केल्यानें. १६. मूर्ख जयद्रथाची स्थिति.

आश्रय देयिल कसि [1]मृगपागस्करमत्तसिंधुरा [2]जगती? १८
कृष्णा हरिली जेव्हां कृष्णा! हा तेधवां चि मारावा,
परि धर्म म्हणे, 'बुडतें भगिनींसौभाग्य म्हणुनि तारावा.' १९
तैसी च या प्रसंगीं धर्में कां दुःशला न आठविली?.
जाणों युद्धारंभीं करुणा तीर्थाटनासि पाठविली! २०
बहुतकरुनि तों एका कन्येच्या या जनांत ज्या माता,
त्यांसि गमे स्वतनुपरिस अधिक [3]सुतासूनुपरिस जामाता. २१
येती पुनःपुन्हां शिर हुडकुनि धावत सुता धडाजवळ,
कीं काक, गृध्र, वृक, बक तडतड तोडूनि भक्षिती कवळ. २२
म्हणत्ये तुज्या सख्याला 'बा! कोणिकडे झुगारिलें शिर तें?'
चिरतें काळिज, कानीं कन्येचें करुणवच जसें शिरतें. २३
'बाळपणीं [6]क्रीडामणिकंदुक दिधले नवे तसा दे हा,'
हें न परिसवे, मूर्छासिंधु बुडवि, हरि न, वेतसा देहा. २४
सर्व सुना, नातसुना, कन्या, अन्या पतिव्रता रंभा
विविधविलासीं वसल्या, बसल्या करुनीं पतिव्रतारंभा. २५
कृष्णा! मृत ही दिसतो [10]शारदशशिमित्रवक्त्र मद्रप हा,
ज्याचें तेज म्हणे श्रितवर्गासि, 'सदा नवें च भद्र पहा.' २६
पितृसम सदया हि वधीं होउनि जयमत्त मातुलाला जो,
तो धर्म न [11]खळकंसघ्ना कां यदुसत्तमा तुला लाजो? २७
सारथि होउनि रविचें जेंवि उणें उग्र तेज अरुणानें

१. मृगपति-**पंत.** सिंहाचा अपराध करणाऱ्या उन्मत्त हत्तीस. २. पृथ्वी. ३. कन्यापुत्रापेक्षा. ४. अर्जुनाला. ५. जो जो. ६. खेळण्याचे रत्नाचे चेंडू. ७. वेतरूपी देहाला. (भावार्थ असा कीं, मर्छा देहाला ग्रासते; पण नष्ट करून दुःखांतून कायमचे सोडवित नाहीं). ८. सुंदर स्त्रिया. ९. [ज्या] नाना प्रकारच्या उपभोगांत [पूर्वी] रमल्या. १०. शरदृतूंतील चंद्राचें मित्र च असे मुख असलेला. ११. कृष्णानें हि आपल्या कंसमामाला मारलें; परंतु तो तसा दुष्ट तरी होता; पण शल्य हा सज्जन असतां हि धर्मानें त्याला मारल्यामुळें धर्म कृष्णाला लाजणार.

केलें, तेंवि वृषाचें शल्यानें धर्मविहितकरुणानें. २८
हा भगदत्त श्रीमान् श्वेताश्वें मारिला पहा हातें:
अंकुश तैसा चि धरिला, नेणें बळ किति कसें अहाहा! तें.
भीष्मप्रभु शरतल्पीं निजला आहे जसा कुसुमतल्पीं,
हें शौर्य वीर्य न सुरीं; कैसें मनुजीं असेल मग अल्पीं? ३०
धर्म नय त्यजुनि किमपि अरिस हि जो परम शांत न वदे तो
हा दुःसह शोक मला करुनि निजोपग्म शांतनव देतो. ३१
दुःसहतेजा शिरला परवळकक्षांत सशर वणवासा.
दिसतो शरांत, जाणों करि तो सुरसैन्यप शरवणवासा. ३२
यामागें धर्मांचें पांडव पुसतील तत्त्व कोणातें?
हा! राजनीति विधवा झाली! बैसेल धरुनि कोणातें. ३३
हा परमसत्यवादी, स्ववधोपाय स्वयें चि कीं कथिला,
मग अर्जुनें शिखंडी करुनि पुढें न्यस्तशस्त्र हा मथिला. ३४
हा स्वर्गा जातो, जो स्वर्ग अरातींस दे वधुनि तो कीं:
तव शोक चि गुरुः न शतीं जें तुझिया तेज देवधुनि! तोकीं.
शोक दिला बहुतां, तरि कर्माच्या बद्ध लोक दोमीं हा,
जन्हि तूं कर्मविमुक्ता, जाल्यें तुजला हि शोकदा मीं, हा! ३६
सकळां शस्त्रधरांचा हरसा आचार्य नायक विनेता,
पडला पहा, परांतें विलया म्हणवूनि 'हाय!' कवि नेता.
शिव! शिव! कृष्णा! क्रव्यादांहीं याचा हि भक्षिला काय,
स्वाश्रय न रक्षिला तरि अस्त्राहीं अर्थ गक्षिला काय? ३८
अस्त्रांचीं घे, साधुनि सेवा सहवास विप्रसा, दानें,

१. युधिष्ठिराविषयीं ठेविली आहे दया ज्यानें. २. जीवत असल्याप्रमाणें च. ३. स्वतःची शांति, मरण. ४. गवतांत. ५. कार्तिकस्वामी. ६. बोरूच्या बेटांत वास. ७. कोपन्यास. ८. टाकलें आहे शस्त्र ज्यानें. ९. शत्रूंस. १०. गंगे! ११. पाशीं. १२. द्रोणाचार्य. १३. पुढारी. १४. आपलें आश्रयस्थान. (द्रोणाचार्य).

ज्याच्या तरे रण करुनि देवासह वासवि[1] प्रसादानें, ३९
ज्याचें अतुळ ब्राह्म क्षात्र हि तेज प्रसिद्ध, जो लोहा
स्पर्शमणि तसा प्रणता शिष्या अत्युत्तमत्व दे, तो हा. ४०
त्याच्या खातात पहा तडतड तोडूनि करट[2] पायांतें,
सर्व तुम्हीं वंदाया तेव्हां जोडूनि कर टपा[3] यांतें. ४१
कृष्णा! कृपी[4] कृशाकृति कृपणा[5] झाली पहा महाशोकें,
नाना विलाप करिती, गमती कोकी[6] च टाकिली कोकें. ४२
ती ब्रह्मचारिजटिलच्छात्रजनासह करूनि आंशु[7] चिता,
उचिता क्रिया करितसे; या स्त्रीची अद्भुता चि बा! शुचिता.
तळमळती पाहोनि प्रेतदशा निपट अनुचिता पतिची,
अग्निला बहु काय चिता? देणारी सुबहु तनु चि ताप तिची.
रथचापशरादिसमरसाहित्यें द्रोणदेहदाहातें
करुनि छात्र निघाले. कोठें सत्पुरुषरत्न हा! हा! तें? ४५
कृष्णा! पहा उणेपण आलें नाहीं च सोमदत्तमहा[10],
दिसतो सात्यकिनिंदा करितो ऐसा चि भरतसत्तम हा. ४६
हे यूपकेतुमाता[11] आलिंगुनि पतितनू[12], पतिशयातें
ठेउनि उरीं, करुनियां विविधविलापांचिया अतिशयातें, ४७
वदतो, 'आपण बरवें केलें, हीं झाकिलीं भलीं नयनें;
चुकलां चि परमदुःसहतापापासूनि आजि या शयनें. ४८
हर्षकर चि होती जरि पडती बहु पशु[13] इलाप[14] परि सर्व[15] ते,
हे *सुतदार तुम्हां न च देखवते, न च विलाप परिसवते. ४९
सुज्ञ महाराज! तुम्हीं: स्वास्थ्याला[16] सावधानता[17] हेतु,

१. अर्जुन. २. काक-**पंत.** ३. टपत होता-**पंत.** ४. कृपाचार्यांची बहीण व द्रोणाचार्यांची स्त्री. ५ दीन. ६. चक्रवाकपक्ष्याची मादी. ७. त्वरित. ८. अत्यन्त; सर्वस्वी. ९. अशा स्त्रीला. १०. तेजास-**पंत.** ११. सोमदत्ताची स्त्री. १२. पतिहस्तास. १३. पशुसारखे. १४. पृथ्वीपति, राजे. १५. [युद्धरूपी] यज्ञ. १६. शांतीला. १७. चित्तैकाग्रता. * पुत्र व स्त्री.

पटु[1] पथ्य गदापूर्वी[2] पूरापूर्वी च साधिबी सेतु.' ५०
हे यूपकेतुजाया पुसती भेटोनि कांतबाहुतें,
'भंग अनाहूतें[3] हा केला कीं संगरांत आहूतें? ५१
त्वां लीलेनें चि दृढ हि मन्नीविग्रंथि[4] नित्य उकलावा,
क्षत नखरें चि करुनि हा कठिनस्तनभार फार चुंकलावा[5]. ५२
ऐसा महाविचक्षण[6] पूजितलक्षण[7] कृतस्वरक्षण[8] ही
भग्न कसा, अलेस[9] न जो तूं रविकरसा विकस्वर[10] क्षण ही? ५३
प्रिय यज्ञकंकण चि तुज बहु, कीं वहु गोसहस्रधनदाता,
सुहृदभयद शत्रुकटककाळ चि तूं यूपकेतुच्या हाता! ५४
तूं अर्थिकल्पवृक्ष श्वेताश्वें सांग तोडिलासि कसा?
याचकहृत्कुमुदांतें तुज इंदुविणें म्हणो कवण 'विकसा'?' ५५
करुण विलाप करिति भुज ठेवुनि भूरिश्रवःस्त्रिया अंकीं,
गमती करिणी करिकर[11] कवळुनि आपण हि गुंतल्या पंकीं! ५६
हा शकुनि, अमृत परि ज्या विष धर्मन्याय, सत्य घोमेला[12]
नाहीं च मनीं, कपटद्युतीं जोडुनि अत्यघा[13] मेला. ५७
हे राजश्री व्हाया मम तोकांचा विनाश शिकले[14] तें,
तपनाला[15] हि गिळी जो तम[16] तो कां चाविना शशिकलेतें? ५८
जैसे झाले माज्या पुत्रांस प्राप्त शस्त्रजित[17] लोक,
तैसे चि या कुमतिस हि, म्हणुनि मला बहुत बाधतो शोक.
भ्रात्यांत विरोध पडे ऐसें हा छद्मराशि[18] कवि नाकीं

१. शहाणे लोक. २. आर्या-**पंत.** ३. अन+आहृत=न बोलाविलेल्याने. ४. माझ्या नेसलेल्या वस्त्राच्या निऱ्यांची गाठ. ५. मर्दन करावा. ६. फार चतुर. ७. पूज्य चिन्हांनीं युक्त. ८. केलें आहे आत्मरक्षण ज्यानें. ९. आळसी. १०. स्वच्छ किंवा प्रकट होणारा. ११. हत्तींची सोंड. १२. द्रवला. १३. महापापास. १४. प्रसिद्ध कपटद्युत-**पंत**. १५. धर्म बुडविला तेथे मत्सतति काय?-**पंत**. भावार्थ. १६. राहु-**पंत.** १७. शस्त्रानें जिंकलेले. (युद्धांत मेल्याने मिळालेले). १८. कपटाची जणुं राशि च असा.

पुनरपि भोजन द्याया बहु काळा [1]अघ्नरा शिकविना कीं ? ६०
हित कपटकाक [2]ऐसें नयहंसां दूर हाकित वदे हें,
द्याया वृकांसि मत्तनुजांचीं वाक्शूर हा कितव देहें. ६१
मधुसूदना ! मदात्मज शत हि [3]ऋजुप्रज्ञ म्हणुनि हे चुकले,
मुकले प्राणां; पडला [4]लोभांतकपाश न च जना उकले. ६२
हा पडला [5]कुरुगुरुखरशरशतहत, [6]घननिभा, [7]सुरद्रुपदा;
या म्हणत्यें अतितेजस्वित्वें रविसम चि [8]भासुर द्रुपदा. ६३
द्रुपदा सांगति जाणां चिंतार्ता [9]सावधा सुना [10]भाजा,
'मागा, [11]कृष्णाप्रियकर देइल गुरुच्या वधा [12]सुनाभा, जा.' ६४
तूं एक, पांच पांडव हे सा केवळ अवध्य गमतात,
आपण नामें चि अचळ ऐसें येइल [13]अवध्यगमतांत. ६५
भीष्म, द्रोण, जयद्रथ, दुर्योधन, कर्ण यांपुढें पुरलां;
कृप, कृतवर्मा, अश्वत्थामा अत्युग्र परि तुम्हीं उरलां. ६६
हे समरीं अमरींचे तिलक हि लकलकित नाहिंसे करिते,
परि तेजोनिधि दैवें घटजें केले चि कीं अनेक रिते ! ६७
तेव्हां चि पुत्र माजे मेले बा देवकीसुता ! मागें,
गेलासि [14]उपप्लव्याप्रति जेव्हां [15]अकृतकाम तूं रागें. ६८
तेव्हां चि करिति मजला भीष्मप्रभु, विदुर कवि यदुपदेशा !
'गांधारि ! या सुतांवरि न स्नेह करीं' अशा सदुपदेशा. ६९
यांचें ज्ञान अबाधित सत्य, प्रत्यय उदंड मज आले;
बा ! बहु काळ न जातां माजे सुत शत हि भस्म कीं झाले." ७०

१. घस्मर, बहुभक्षक–**पंत.** २. ऐसें हे–**पंत.** ३. सरळ ( भाबड्या ) बुद्धीचे. ४. लोभरूपी काळाचा फास. ५. द्रोणाच्या तीक्ष्ण अशा शेंकडों शरानीं मरून पडलेला. ६. मेघासारखा. ७. कल्पवृक्षाप्रमाणें स्थिति असलेला. (इच्छिले देणारा). ८. सतेज. ९. जीवंतास–**पंत.** १०. स्त्रिया. ११. द्रौपदीचें इष्ट करणारा कृष्ण. १२. सुदर्शनचक्र. १३. अवधिपर्वत हिमाचळ अथवा लोकालोक, त्याच्या मतांत–**पंत.** १४. मागें पृष्ठांक ३४८, ४ थी टीप पहा. १५. [ शिष्टाईचें ] कार्य सिद्धीस न गेलेला.

# अध्याय सहावा.

ऐसें वदोनि दुःखध्वस्तज्ञाना सती बहुत रडली,
धैर्यातें सोडुनि ती गांधारी शोकमूर्छिता पडली. १
नागींसीं व्याघ्रींसीं वाटे येतां चि रोष तोलावी,
ती देवाला जेणें मेले शतपुत्र दोष तो लावी. २
" कृष्णा ! कौरवपांडव जे झाले भस्म करुनि कळहातें,
कैसे उपेक्षिले हे बुडतां तुझिया असोनि बळ हातें ? ३
निकटस्थें हि सकळबळसंपन्नें ही उपेक्षितां घात
केला त्वां चि, बुडविला न जरि तटगतें जनें दिला हात. ४
म्यां तप पतिशुश्रूषा करुनि किमपि जोडिलें असे; ताप
हा मज न सोसवे; घे, कृष्णा ! देत्यें च मीं तुला शाप. ५
लाविल म्हणावया तुज येतां षट्त्रिंश वर्ष मत्तप 'हा !'
ज्ञाति वधुनि ऐसें चि क्रव्यादांस त्रि सहर्ष मत्त पहा. ६
तूं हि हतज्ञाति, हतामात्य, हततनय, वनेंचर स्पष्ट
हो कुत्सितें उपायें हत अवलोकूनियां महाकष्ट. ७
भरतस्त्रिया जशा या निहतसुतज्ञातिबांधवा दीना,
कृष्णा ! तुझिया हि वधू रडतील अशा चि सुप्रभाहीना." ८
भगवान् स्मित करुनि म्हणे, 'संहर्ता मीं च वृष्णिचक्राचा,
गांधारि ! यादवांतें कर जोडितसे प्रताप शक्राचा. ९
कीं, हे अवध्य यादव देवांस, नरांस, दानवांस, सती !
वधितिल परस्परांतें, मदितर यांहुनि बळी पुरुष नसती. १०
शुद्धा, बुद्धा, क्रुद्धा तरि तूं पूर्वीं च कार्य जें सुचलें,
गांधारि देवि ! जैसें या मन्मतिला तुला हि तें रुचलें.' ११

१. दुःखानें नाहींसें झालें आहे ज्ञान जिचें. २. तारावर असणाऱ्या. ३. काही. ४. छातिमार्गे. ५. बाधव. ( यादव ). ६. वनवासी. ७. निंद्य अशा. ८. अत्यन्त निस्तेज. ९. यादवकुलाचा. १०. शहाणी.

प्रभुभाव असा गमला, देयं[1] ईला[2] शाप हा तप सराया;
हें न बुडवितां, येते सर्व ईलाशाप[3] हात पसराया. १२
सकळ हि पांडव तेव्हां अत्यद्भुतधैर्यसिंधु ही भ्याले,
स्वनिमित्तें शाप विभुसि होतां चि निराश जीवितीं झाले. १३
देव म्हणे, "तव मति शममुखशुचिगुणसंपदं[4] विऊ, ठकसी;
म्हण अयशस्तापकरा या स्नेहा[5] 'संप' देवि! ऊठ कसी. १४
निज[6]दुश्चरित बळें मजवरि घालिसि कां? असा अनय न करीं;
तव अपराधें चि उरों दिलि यष्टि न एक ही अंनयनकरीं[7]. १५
देतो सुज्ञसहाया[8] सुज्ञा हि सुराज्यभार ताप सदा;
हें पद द्यावें या समनहितहितसुराज्यभारतापसदा[9]? १६
विप्रीं[10] प्रसवे सुतपोनिष्ठा, बहुभारवाहका गाय,
तुग्गी अशा सुता कीं बहु धांवडितां न जो म्हणे 'हाय!' १७
शूद्रा दास्यानलसा[11], वैश्या कृषिपशुसुरक्षका[12], धन्या
समरीं मरावयास चि तुजऐसी राजवंशजा कन्या. १८
समरीं जरि न मरावें, तरि रोगक्षीणकाय गेहगत[13]
सुक्षत्रियासुत मरति शयनावरि पडुनि काय गे! हगत? १९
केलें जें काय, तसें असतें आयुष्य तरि पुढें करतें;
देते एक हि पुष्कळ अमृत[14] हि सेवूनि न रिपु ढेंकर ते. २०

---

१. देण्यास योग्य. २. या गाधारीला—**पंत.** ३. नदिक्पाळ, भूपाळ, दिक्पाळ —**पंत.** ४. शांतिप्रमुख पवित्र गुणांची संपत्ति उत्पन्न करीं (शांत होवो): [नाहीं तर] फसशील. ५. मायापाशाला ६. आपलें दुराचरण. ७. आंधळ्याच्या ( धृतराष्ट्राच्या ) हातीं. ८. शहाणे आहेत मित्र ज्याला अशास. ९. समे नहिताहिते सुराज्ये यस्य स चासौ भारतापसदश्च तस्मै मदायेद पद देयं? न देयमिति—**पंत.** मारखो न आहेत अहितकर दारू व हितकर तूप हीं ज्याला असा हा जो भारताधम, त्या मूढाला हें राज्यपद द्यावें काय? न द्यावें हेंच उत्तम. १०. ब्राह्मणी. ११. सेवाकर्मांत आलस्यरहित अशाला. १२. शेती व जनावरें यांची चांगल्या रीतीनें निगा राखणाऱ्याला. १३. घरांतील. १४. जीवत (पक्षीं) देवांचें पेय.

धारातीर्थांत जरि न व्हाया शुचि रविसमान वपु न्हाते,
नरकीं पडते, होते कीट कुपशु वा, न मानव पुन्हा तें. २१
स्नेहें त्वां काळाच्या नेले सुत करुनि मत्त पाशापें[1];
तरसिल कसी, लयाला नेउनि उरल्या हि सत्तपा शापें?" २२
गांधारीला झालीं प्रभुवचनें अप्रिय जरि हि सारें[2],
म्हणती सुकवि, 'असह्य चि दुःखितचित्तीं बरें तरि हि सारें.'
राहे उगी च देवी गांधारी बहु मनीं तळमळ करी,
काढी कोप मनींचा भाव, सरींचा[3] जसा, तळमळ[4] करी[5]. २४
धृतराष्ट्र म्हणे, 'धर्मा! मेले या रणमखांत किति योध,
सांग मला, परिसों दे, परिमाणाचा[6] असेल जरि शोध.' २५
धर्म म्हणे, 'एकार्बुद[7] त्यावरि षट्षष्टि[8] मोजिल्या कोटी,
मृतवीरांची केली संख्या या संगरीं असी मोटी. २६
चवतीस सहस्र अणिक एकशत तयावरी हि पांसष्ट,
इतुके अलक्ष वीर, क्षय झाला संगरीं असा स्पष्ट.' २७
पुनरपि वृद्ध म्हणे, 'तूं सर्वज्ञ व्याससा च कीं खोल:
ते शूर पुरुषसत्तम गेले कोणा गतीस? हें बोल.' २८
धर्म म्हणे, "देवा! जे हृष्ट[10] महाशूर संगरीं मेले,
ते देवराजसम शुभलोकांत सुखें वसावया गेले. २९
मरणाचा निश्चय परि होते समरीं अहृष्ट[11] जे शूर,
ते निजलोकीं नेले गंधर्वीं येउनीं पुढें दूर. ३०
युद्धांत पराङ्मुख, मुख अंजळि पसरुनि 'नको नको' म्हणते,
शस्त्रेंकरूनि मेले, गुह्यक[12]लोकासि पावले, पण ते. ३१
त्यजिते झाले तनुला अभिमुख होउनि परा, न टेंकेला[13],

---

१. पाशाजवळ. २. श्रेष्ठ. ३. सरोवरांतील. ४. तळासंबधी पक–**पंत.** ५. हत्ती. ६ संख्येचा. ७. दहा कोटि. ८. सासष्ट. ९. ज्याच्याकडे पाहवत नाही असे, तेजस्वी. १०. आनंदित. ११. नाखुष. १२. सिद्धलोक. १३. चिकाटीला.

ज्यांच्या उत्साहें व्रण, मान्य[1] बुध जसा न रानटें[2] केला, ३२
ते ब्रह्मसदनवासी झाले होतां परासु रवि माना[3]
तेजें; त्यांला न्याया आले घेउनि परा[4] सुर विमाना. ३३
राया! यथाकथंचित्[5] समरीं जे मरण पावले अन्य;
सुक्षेत्रगुणें[6] झाले, जाउनि उत्तरकुरूंसि[7], ते धन्य." ३४
वृद्ध म्हणे, 'धर्माचें तत्व सदा तूं असें चि बा! पाहें,
सिद्धापरि परि कोणा[8] ज्ञानबळें पाहतोसि बापा! हें?' ३५
धर्म म्हणे, 'वनवासीं लोमशदेवर्षिसंग जो घडला,
तेणें सुतीर्थयात्रायोग, तयास्तव समस्त मळ झडला. ३६
सिद्धिद विलोकिले म्यां बहु, उँजवी घालितां[10] अवनि देशः
हें दिव्य चक्षु जालें प्राप्त, पित्या! हेतु या तव निदेशें[11].' ३७
धृतराष्ट्र म्हणे, 'धर्मा! पक्षि श्वापद शवांस खातात,
तूं चि प्रभु, संबंधी, पुत्र, भ्राता, शवां सखा तात. ३८
सर्व सनाथ अनाथ हि वीरांचे देह पावते दाहा[12],
म्हणजे उत्तम होतें; आहे व्यवहार मान्य वेदा हा.' ३९
धर्म म्हणे, 'मान्य न हा श्रेयस्कर बोध काय हो! मातें?
शीघ्र करवितों संगर[13]निहतनिखिलयोधकायहोमातें.' ४०
धौम्य, युयुत्सु, सुधर्मा[14], क्षत्ता, संजय तयांसि तो आर्य
पार्थ प्रार्थुनि सांगे, सूतां भृत्यादिकां हि तें कार्य. ४१
दुर्योधनादिकांच्या रचिल्या रथ[15]चंदनादिकीं सु-चिता,
उचिता क्रिया कराविल्या, ज्यांच्यायोगें घडे मृता शुचिता.

---

१. प्रहार मानिला नाहीं-**पंत.** २. आडदांड मनुष्यानें. ३. रविसे तेजस्वी जाले, असे माना तुम्ही-**पंत.** ४. उत्कृष्ट अशा. ५. कसे तरी. ६. ते जेथे मेले ती उत्तम भूमि (युद्धभूमि) असल्यामुळे. ७. देशविशेष. ८. कोणत्या. ९. 'आला' असा अध्याहार. १०. प्रदक्षिणा घालीत असतां. ११. [वनवासाची] आज्ञा. १२. दहनास. १३. युद्धांत मरण पावलेल्या सर्व योद्धयांच्या शरीराच्या दहनास. १४. दुर्योधनपुरोहित. १५. रथ व चंदन काष्ठें यानीं.

राशि करूनि शवांचे, त्यांवरि रथदारु[1]शरधनुष्यांचे,<br>
भिजउनि घृतें दिले उपहार[2] ज्वलनासि मृतमनुष्यांचे. ४३<br>
कविनयनें[3] शिवुनि शवा द्रवति जसीं बाळकानना थानें,<br>
करिजेल अनाथाचा प्रेमें सांभाळ कां न नाथानें? ४४<br>
करुनि पित्यासि पुढें मग गेला गंगेसि तो नृजातारी[4],<br>
दे उदक समस्तांतें; कवण असा, धर्म तो न ज्या तारी? ४५<br>
त्या उदकदानसमयीं चित्तीं निंदूनि पूर्वकर्मातें[5],<br>
कुंती देवी रोदन करित वदे मंदमंद धर्मातें:- ४६<br>
"जो रथयूथप[6] यूथपवीराधिपलक्षणप्रभावास[7],<br>
ज्याच्या विसरत सोसित नव्हतासि पल क्षण प्रभावास, ४७<br>
इंद्रा उपेंद्रसा जो आश्रय दुर्योधना महातेजा,<br>
पुरुष हि विसरत होते पक्ष्म[8] चाळावया पहाते[9] ज्या, ४८<br>
ज्याच्या दिग्विजयीं सुर नर मानवले[10] सुयुद्धयज्ञानीं,<br>
दाता, नित्य ब्राह्मणपूजक, शुचिशीलरक्षक ज्ञानीं[11], ४९<br>
जो सहजकवचकुंडलमंडित पंडितजनीं असामान्य,<br>
'सूत' म्हणति परि कैसा होइल तैशा कुळीं असा मान्य?<br>
भवदवन[12] करित होता बहुभास्वर[13] ठेवरूनि[14] हात रणीं,<br>
वाटे जना उतरला बहुभाः[15] स्वरथावरूनि हा तरणी. ५१<br>
राधा धात्री[16] त्याची; रविपासुनि मदुदरांत तो आला,<br>
ज्येष्ठ भ्राता तुमचा कर्ण, तुम्हीं सर्व उदक द्या त्याला." ५२

१. काष्ठ २. भेट, आहुति. ३. विदुर–**पंत.** ४. धर्मराज. ५. कर्णाच्या जन्मासंबंधीं प्रसंगाला. ६. रथीश्रेष्ठ. ७. सेनानींच्या अग्रणींच्या अंगीं असणाऱ्या तेजाचें माहेरघर. (अत्यंत पराक्रमी). ८. पापण्या. ९. पहाणारे. १०. समाधान पावले. ११. ज्ञानी. १२. तुमचें रक्षण. (अर्जुनेतर पांडवांशीं निकराने लढणार नाहीं ह्या कर्णाच्या वचनास अनुलक्षून हे उद्गार आहेत). १३. महातेजस्वी. १४. हात राखून. १५. अत्यंत तेजःसंपन्न असा. १६. दाई. (उपमाता).

अप्रियवचनश्रवणें ते पांडव शोकसागरीं पडले,
नेणुनि नाशुनि जाणुनि निधि सुरतरु मंदभाग्यसे रडले. ५३
धर्म म्हणे, ' माते ! त्वां केलें ऐसें अकार्य कां गे ! हें ?
कळतें मज तरि होतीं सहसा बहुकोटि ओस कां गेहें ? ५४
मीं राज्यलुब्ध, घातक ? गुरुभक्त नव्हें चि काय ? कांनातें[1]
कां नातें कळुं न दिलें ? म्हण[2] कथिलें कार्य कायकाना तें. ५५
नांदविता निर्मत्सर बंधु[3] न नेता असे लया तो[4] कीं,
न तशा सदपत्यावरि, कसि तव करुणा असेल या तोकीं ?
ज्याची वधप्रतिज्ञा बोलुनि झाले असंख्य अरि लटिके,
कृष्णेतर[5] कोणी हि न ज्याच्या शरपातभूमिवरिल[6] टिके. ५७
जाला माते ! तुजला तो पुत्र प्राप्त देवगर्भ कसा ?
लोपविला ज्ञातिभयें, कीं त्यजिला जारजात[7] अर्भकसा[8] ? ५८
लोपवि सकळ तेजें कर्ण, अधिष्ठुनि जसा नभा सविता;
अतुळप्रताप लोकीं तव सुत नसतां, तसा न भासविता. ५९
या मंत्रगूहनें त्वां आम्हां सर्वांसि मारिलें माते !
या तेजा[9] भजतां तरि, कुरुकुल वृक, काक, कंक[10] कां खाते ? ६०
गुज कथितिस तरि पूजित होतों कीं नंदनप्रसूनांहीं[11]:
आम्हांसम तुजसम तो कोठें ही नंदन प्रसू[12] नाहीं. ६१
जें कुरुपांचाळवधें, सौभद्रद्रौपदेयहननें तें
दुःख किति ? तयाहुनि शतगुण हें माजें हरूनि मन नेतें. ६२
हरि ! हरि ! दाहापूर्वी कळतें तरि आंगठे[13] मुखीं धरितों,

१. कानातें. २. 'तें एक कार्य कथिलें, तुम्ही आयकाना,' असें म्हण; कोणतें तुझें वचन न ऐकिलें तें सांगून दे-**पंत.** ३. कौरवपांडव. ४. कर्ण. ५. कृष्णार्जुनाशिवाय. ६. बाण पडण्याच्या जागेवरील [ योद्धे ]. ७. जारापासून झालेल्या मुलाप्रमाणें. ८. कर्णजन्मवृत्तांत गुप्त ठेवून. ९. तेजस्वी पुरुषास. १०. बक. ११. कल्पवृक्षाच्या पुष्पांनीं. १२. माता. १३. कर्णाच्या पायाचे आंगठे तोंडांत धरून आम्ही त्याच्याविषयींची आपली नम्रता दाखविली असती.

अपराधकोटि पोटीं घालाया मुकुट[1] पाय ते करितों. ६३
रचितों[2] सार्थकतार्थ, न रचिले जरि पुष्परत्नहार, चिता;
भीम, जय, नकुळ, कृष्ण हि, सहदेव हि करुनि यत्न हा रचिता.'
ऐसा बहु शोक करी, बाधे बहु बंधुघात तो यातें;
मग दे भरूनि अंजलि कर्णातें साश्रुबिंदु तोयातें. ६५
कर्णाच्या भार्यांतें प्रेमें बाहोनि जवळ, जळ-दानें
संतर्पिला निजाग्रज[3] धर्में, चातक जसा चि जळदानें. ६६
श्रीगंगेंतूनि निघुनि तीरीं च सशोक धर्म तो बसला;
भक्तमयूरघन श्रीराम जसा सिंधुच्या तटीं बसला. ६७

इति श्रीमहाभारते श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिते स्त्रीपर्व समाप्तम् ॥

श्रीरामचंद्रचरणयोरर्पित भवतु ॥

॥ श्रीराम जय राम जय जय राम ॥



१. कर्णाचे पाय मस्तकावर मुकुटासारखे धारण केले असते. २. कर्ण जीवंत असताना त्याजकरिता पुष्पाचे व रत्नाचे हार गुंफून जरी आम्ही त्याची सेवा केली नाही, तरी आतां आमच्या जन्माचें सार्थक होण्याकरिता तरी आम्ही त्याची चिता रचिली असती. ३. आपला वडील भाऊ ( कर्ण ).

# शांतिपर्व.

## अध्याय पहिला.

रविपुत्राद्यखिळांच्या[1] उत्तरकार्यासि लागला मास;
मग आले भेटाया धर्मास मुनींद्र जेंवि रामास. १
आले दूर कराया सकळा बाधा रविप्रभ[2] व्यास,
नारद, देवल[3], अन्य हि जे जे आधार विप्र भव्यास[4]. २
बहुशतसहस्र भूसुर[5] बैसविले स्वासनीं पदीं नमुनीं,
त्यांत वदे धर्मातें श्रीनारद जो सदा अदीन[6] मुनी. ३
'या यदुपतिप्रसादें गेले विलयासि सर्व ही दुष्ट,
शोक नसे कीं कांहीं? धर्मा! झालासि कीं जयें तुष्ट?' ४
धर्म म्हणे, "जय झाला श्रीकृष्णब्राह्मणप्रसादानें,
पटु आश्रितांसि द्याया नाहीं कल्पद्रुगण[7] असा दानें. ५
परि माज्या दुर्दैवें जय अजयाकार जाहला स्वामी!
सुख काय त्यांत, नाहीं सौभद्र[8] द्रौपदेय ज्या धामीं? ६
सुतशोकीं कृष्णेला राज्याच्या काय हर्ष लाभाचा?
प्रभुसि म्हणेल सुभद्रा, 'सुख भोगुनि फार हर्षला भाचा!' ७
झांकुनि मंत्र[9] पृथेनें अतिदुःसह दुःख मज दिलें बा! हें;
पाहें, मनांत सानुज दहनीं मीं आज भाजलों आहें. ८
'नागायुतबळ[10], अप्रतिरथ[11], जो सुव्रत, दयालु बहु, दाता,
तो कर्ण स्वसुत,' असें मज देतां तोयें[12] बोलिली माता. ९

---

१. कर्णादिकांच्या. २. सूर्यासारखे तेजस्वी. ३. धौम्यमुनीचा भाऊ. ४. कल्याणास. ५. ब्राह्मण. ६. आनंदी. ७. कल्पवृक्षाचा समुदाय. ८. अभिमन्यु. ९. गुप्त गोष्ट. १०. दहा हजार हत्तींचें बळ असणारा. ११. अद्वितीय रथी. १२. तिलांजली.

प्रथम चि दिनमणिपासुनि हे कुंती प्रसवली, न राधा, त्या;
आलें सुयश कधीं सुतरत्न समर्पुनि असें नरा धात्या? १०
बा! उपजतां चि घालुनि पेटींत तनुज नदींत वाहविला,
मद्दैवें चि पृथेकरवीं सदपत्यविरह साहविला. ११
तो भाग्यें सांपडला राधेला अर्पिला अधिरथानें,
द्रवलीं उदयीं शशिमणिपात्रेंसीं[1], न धरिती च धिर थानें. १२
'भारत, युधिष्ठिराग्रज, कौंतेय' म्हणोत विप्र, 'सूत' न या.
म्हणुनि रणापूर्वीं हें नातें हे ऐकवी प्रसू तनयां[2]. १३
निजगुरुनिदेश सुयशस्कर माथां धरिल तोक सामान्य,
होय कृतघ्नत्वप्रद जरि, तरि कवि करिल तो कसा मान्य? १४
कर्ण असें वदला कीं, 'धर्मासीं संधि करिन जरि माते!
'विजयां* भ्याला' म्हणतिल, जे गाती मत्प्रतापगरिमा[3] ते. १५
म्हणतिल 'अदय अनार्य,' त्यजितां समयीं सुयोधना, मातें;
जाणुनि कृतघ्न, घेतिल न च माज्या द्विज सुयोध नामातें. १६
यास्तव आधीं जिंकुनि कृष्णासह अर्जुनास मीं युद्धीं,
संधि करिन धर्मासीं मग; कीं, मत्प्रीति बहु यशीं शुद्धीं.' १७
'विजयासीं युद्ध करीं, चवघांला अभय दे,' असें वदली.
परि कांपली बहु भयें हे कुंती, जेंवि मारुतें कदली. १८
कर्ण म्हणे, 'देइन मीं जिंकुनियां जीवदान चवघांस;
गजमुक्तांचा[4] चि हरिस अन्याचा तेंवि दे न चव घांस. १९
कर्णवधीं ध्रुव[5] सविजय, विजयवधीं तूं सकर्ण सुत पाहें,
जा माते! पांच तुझे उरतिल,' वदला उदार सुतपा[6] हें. २०
हें वृत्त तोयदानीं वदली तेव्हां चि मज न आइकवे,
ऐसी दुसरी लोकीं त्वां आयकिली नसेल आइ कवे! २१

१. चंद्रोदयाबरोबर पाझरू लागणाऱ्या चंद्रकांतमण्यांच्या भांड्याप्रमाणे. २. कर्णास. ३. मोठपणा. ४. हत्तीच्या गंडस्थळांतील मोत्यांचा. ५. निश्चयानें. ६. तपोनिष्ठ. * अर्जुनाला.

विजयें वधिलें भ्रात्या युद्धीं नेणोनि जेंवि अभ्रात्या,
बहु अर्थिचातकांच्या शोचितसें आठवूनि अभ्रा त्या. २२
होता मजला कर्ण भ्राता श्वेताश्वसा जरि सहाय,
बा! लावितों म्हणाया जिंकुनियां संगरीं हरिस 'हाय!' २३
कोप सभेंत दुरुक्तें त्या द्यूतीं मन्मनांत जो पेटे,
त्या कर्णपाद, जेंवि प्रतिबंधक मणि हुताशना भेटे. २४
आहेत हे पृथेचे जैसे, होते असे चि ते पाय,
हाय! मुने! हा यमुने* कालियसा ईस भासला काय? २५
सादृश्यहेतुतें बहु शोधुनि हृदयांत तेधवां पाहें,
परि नाहीं च समजलें नातें मज मंदमतिस बापा! हें. २६
क्षितिनें रथचक्र कसें गिळिलें, कोणें दिला तया शाप,
बा पद्मोद्भवपुत्रा[3]! वद, वागमृतें तुज्या निवो ताप." २७

---

# अध्याय दुसरा.

नारद म्हणे, "परिस, तुज कथितों मीं देवगुह्य गा राया!
साधु विचार सुराहीं केला क्षत्रिय समस्त माराया. १
वैराग्नि पेटवाया हा कन्यागर्भ निर्मिला धर्मा!
कीं शस्त्रपूत होउनि पावो क्षत्र त्रिविष्टपीं शर्मा. २
देवांच्या संकल्पें पावे सूतत्व तो महातेजा,
जालां असह्य पांच चि सुगुण तुम्हीं कुरुकुळीं रहाते ज्या. ३
तव मति, भीमबळ, विजयलाघव, माद्रीतनूजविनय, असे
हे अद्भुत गुण पाहुनि तो बाळपणीं च फार खिन्न असे. ४

१. अबधम; परक्यास. २. कर्णाचे पाय पाहतां च माझा (धर्माचा) राग शांत होत असे. (कारण २५ पूर्वार्धांत पहा). ३. ब्रह्मदेवपुत्रा नारदा! ४. अविवाहित स्थितींत धारण केलेला गर्भ. ५. धारातीर्थी पडून. ६. क्षत्रियवर्ग. ७. स्वर्गात. ८ सुखास. * यमुनानदीला. (मागें पृष्ठ २९५, टीप ६ वी पहा).

पाहुनि कृष्णधनंजयसख्य, अतिशय प्रजानुराग, मनीं
तापे तो कर्ण, जसा बहु वर्हीच्या भुजंग आगमनीं. ५
विजयासि धनुर्वेदीं बहु सकळांहूनि अधिक पाहूनीं,
एकांतीं द्रोणातें प्रार्थी माथां तदंघ्रि वाहूनीं. ६
'गुरुजी ! ब्रह्मास्त्र मला द्या, स्कंदीं आणि भर्ग सम रामीं:
बा ! करिन अर्जुनासीं दुखवाया शत्रुवर्ग समरा मी. ७
न म्हणोत विचक्षण मज 'अकृतास्त्र' असें दहांत कल्पतरो !
स्वामी ! मनोरथांबुधिमध्यें हा कर्ण पुत्रकल्प तरो.' ८
यापरि गळां पडुनि तो कर्ण ब्रह्मास्त्र जेधवां याची,
जाणे दुरात्मता गुरुवर्य स्वमनांत तेधवां याची. ९
सापेक्ष जसा तो या विजयीं शिष्यांतरीं न सुतपा हो !
किंबहुना द्रोणमनीं उत्कर्ष न याअसा स्वसुत पाहो. १०
कर्णासि म्हणे द्रोण, 'ब्रह्मास्त्रातें कुलीन तो मात्र
ब्राह्मण किंवा क्षत्रिय होय करुनि सुव्रतें तपें पात्र.' ११
पूजुनि, पुसोनि गुरुला कर्ण महेंद्राचळासि तो जाय,
श्रीभार्गवरामाचे बहु विनयें मस्तकीं धरी पाय. १२
गुरुचि पिता या भावें ब्रह्मास्त्राच्या धरुनियां कामा
'ब्राह्मण भार्गव आपण' ऐसें सांगे विचारितां रामा. १३
विनयादिगुणें झाला प्रिय गुरुस अनंतपुण्यलभ्यास,
केला शरसंधानीं तेथें अत्यंत निपुण अभ्यास. १४
इष्वस्त्रीं परदुर्जय भासे सर्वांस कर्ण कामारी.
घडला प्रमाद, मानुनि हरिण द्विजधेनुतर्णका मारी. १५

१ मोराच्या येण्यानें. २. त्याच्या पाया पडून. ३. स्कंदी (कार्तिकस्वामीचे ठायीं) व रामीं (परशुरामीं) भर्ग (शंकर) सम (समदृष्टि); [ तसे च तुम्हीं व्हा ] ४ अस्त्रविद्येचें शिक्षण न झालेला. ५. पुत्रासारखा. ६. दुष्टपणा. ७. सप्रेम. ८ अन्य शिष्यीं. ९. हे परशुरामाचें अवतारसमाप्तीनंतरचें निवासस्थान. १० भृगुकुलोत्पन्न. ११. बाण व अस्त्र यांच्यायोगानें. १२. शंकर. १३. वासरास.

अज्ञानें घडलें तें कर्म निवेदूनि कर्ण कर जोडी,
तरि वाग्वज्रातें, बहु कोप करुनि, तो तपस्विवर सोडी. १६
'घे पद्रांत फळातें पाप्या! या वत्सरत्नहानीच्या,
विफळ असो, स्पर्धेनें ज्याकरितां करिसि यत्न हा नीच्या १७
ज्यातें मारिन म्हणसी दुष्टा! तूं वृत्र जेंवि शक्रातें,
त्यासीं करितां समर, क्षिति गिळिल तुज्या शतांगचक्रातें. १८
रथचक्रातें धरणी ग्रासिल तूं तेधवां असावध हो!
वधिला असावधपणें वत्स जसा त्वा, तुझा असा वध हो.'
व्हाया प्रसन्न दिधलीं कर्णें बहु त्यासि धेनु, धन, रत्नें;
विप्र म्हणे, 'मद्वचन न होईल मृषा धनाधिपतियत्नें. २०
जा कीं रहा, चुकेना कर्मफळ कदापि वत्सहानिकरा!
तूं माज्या कोपाच्या, धर्माच्या पापिवत्, सहा निकरा.' २१
जाला शाप असा बहु दारुण मग 'हाय! हाय!' कर्ण वदे,
जाय गिळोनि; गमे त्या रुद्रा तें काळकूट अर्णव दे. २२
त्यावरि गुरु शुश्रूषाप्रणयदमबळादि सुगुण पाहूनीं
होय प्रसन्न, शिकवि श्रीब्रह्मास्त्र स्वयें चि बाहूनी. २३
ब्रह्मास्त्रातें साधुनि गुरुची सेवा करीत कर्ण वसे,
सच्छिष्य मीनसे त्यां सेव्य चि आचार्यचरण अर्णवसे. २४
राम कदाचित् कुतुकें कर्णकर धरूनि आश्रमीं भ्रमला;
उपवासकृषकलेवर संचारेंकरुनि तो बहु श्रमला. २५
अंकीं शिर ठेवुनि करि कर्णातें पात्र तोकविश्वासा.
सोडी श्रमासह निजुनि अतिदुर्बळगात्र तो कवि श्वासा. २६
तो कृमि अलर्कनामा त्या गुरुशिष्यांत विघ्न बहु मांडी;
न कळत तळीं शिरुनियां फोडी तो सूर्यसूनुची मांडी. २७

१. रथचक्राम. २. यम-पंत. ३. शापापासून झालेला शोक गिळिला ४. सेवा, नम्रता, आत्मसंयमन, बल इ०. ५. बोलावून. ६. एकदा. ७. उपवासानें कृश झालें आहे शरीर ज्याचें. ८. मुलावर ठेवल्या जाणाऱ्या विश्वासास.

गुरुनिद्राभंग न हो म्हणउनि तो धीर वेदना साहे,
'धृति च गुणगणा शोभाहेतु[1]' म्हणति सुज्ञ वेद 'नासा[2] हे.' २८
न शके माराया कीं कृमितें उडवावया हि तो दूर.
गुरुनिद्राभंगभयें साहे उग्रा हि वेदना शूर. २९
जागा जाला सहसा राम रुधिर लागतां चि आंगा तें.
सोसेल युद्धयज्ञावांचुनि शुद्धा [3]अशुद्ध कां गा! तें? ३०
राम म्हणे, 'शिव! शिव! रे! झालों कीं अशुचि; शोणितें आंग
कां हें भरलें? केलें काय? भय त्यजुनि सत्य तें सांग.' ३१
कृमिकृतनिजोरुभक्षण कर्णें कथिलें गुरूसि पद नमुनीं,
पाहे त्या कीटातें क्षतजीं तो शुद्धकीर्तिसदन मुनी. ३२
तो रामदृष्टमात्र[4] प्राणातें कीट तत्क्षणीं सोडी,
विकराळरूप होउनि ठाकुनि गगनीं मुनीस कर जोडी. ३३
'रामा! सुटलों मीं या नरकापासुनि तव प्रसादानें,
स्वस्ति असो तुज; द्यावीं त्वां दीनाला असीं च बा! दानें.' ३४
राम म्हणे, 'तूं कोण? त्यज संकोच स्ववृत्त सांगाया;
करुनि कवण अतिदारुण अघ नरका पावलासि कां गा! या?'
"भृगुशार्दूला[5]! होतों सत्ययुगीं असुर दंशनामा मीं,
भृगुभार्येतें हरिता झालों होवूनि आंधळा कामी. ३६
"'परदारसंग नरक चि' म्हणति सकळ, तरि तुला नसे वीट;
हा पापा! श्लेष्मरुधिरमूत्राशन[6] परम दुष्ट तूं कीट.' ३७
तव पूर्वपितामह भृगु देता झाला मला असा शाप.
पाप क्षणांत फळलें; फळ आलें जो असा महाताप[7]. ३८
त्या शापांत कराया जेव्हां भृगु विनविला पदीं नमुनीं,
'भार्गवराम करिल तव उद्धार' असें वदे अदीन[8] मुनी. ३९

१. शोभेस कारण, शोभा देणारें. २. नाक. ३. अपवित्र (पक्षीं) रक्त. ४. रामानें केवळ पाहिलेला. ५. भृगुकुलश्रेष्ठा. ६. मळ, रक्त व मूत्र सेवन करणारा. ७. जो असा महाताप [तें] फळ आलें. ८. उदार स्वभावाचा.

बहु मान्य होय जन या पायांला भाळ लाविता नाकीं[1],
तुमच्या शुद्धयशाच्या अमृतकर हि भाळला विताना[2] कीं. ४०
मीं च न, नसतां सदनुग्रह, सकळ हि सर्वथा पशु चिदंशीं[3],"
ऐसें वर्णुनि गेला होउनि गततापपाप शुचि दंश. ४१
कर्णासि गुरु म्हणे, 'रे! अन्यां पीडांसि देह वाहेल;
ऐशा अति दुःखातें सुब्राह्मण तों कधीं न साहेल. ४२
हें क्षत्रियधैर्य तसें धैर्य तुझें: स्पष्ट सांग, तूं कोण?
शोण[4] न अनृतें व्हावे डोळे सारे हि, हे जसे कोण.' ४३
कर्ण म्हणे, "मीं ब्रह्मक्षत्रांतरजात[5] सूत; मज लोक
'राधेय कर्ण' म्हणती; गुरुजी! धर्में चि शिष्यजन तोक. ४४
ब्रह्मास्त्रलुब्ध झालों, आलों साधावयासि तें बा! मीं,
सद्गुरु पिता चि, यास्तव वदलों 'भार्गव असें' असें स्वामी!"
वंदुनि शतदा, लोळे, लेश नसे पाप ताप दर[6] ज्यांत,
परि विपरीताचरणें झाला तो तापता पदरज्यांत[7]. ४६
सुज्ञें समजुनि गुर्वघ[8] करितां, नमनें टळेल कां पंच[9]?
पदरज म्हणे, 'दहांला[10] गुरुवंचन[11]फळ कळेल कांपें[12] च.' ४७
राम म्हणे, "धर्म वदसि, 'गुरु चि महाजनक, विप्र, तारक' हा;
तरि तूं न म्हणसिल कसा जरि हि महाजन कवि प्रतारक[13] 'हां[14]!'?
ब्रह्मास्त्र जोडिलें त्वां हा हतभाग्यांगणीं स्वरग[15] रुजला,
सदृशासीं रण करितां वधकाळीं न स्फुरेल तें तुजला. ४९
ब्रह्मास्त्रसिद्धि जाली कष्टें अब्राह्मणा जरि नरा हे,

१. स्वर्गात. २. विश्नाराम. ३. जीवमात्र. ४. अन्वयार्थ —जसे हे [नेहमी च लाल असणारे] कोण (डोळ्याचे कोपरे) तसे [माझे] सारे ही डोळे [तुझ्या] अनृते (खोट्या भाषणाने) [राग येऊन] शोण (लाल) न व्हावे. ५. ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या मध्यंतरी (संकराने) जन्मलेला. ६. भीति. ७. [परशुरामाच्या] चरणधूळीत. ८. महापाप. ९. संकट. १०. लोकास ११. फसविणे. १२. थरकापानें. १३. [तथापि] फसविणारा. १४. हाय-पंत. १५. कल्पवृक्ष.

अकुलीनीं अनयज्ञीं [1]श्रीसी चिर बहु भजे तरि न राहे. ५०
[2]अनृता! आजि च जा गा! जागा आश्रमपदीं नसे तुज या,
कैसा तरेल बहुमत [3]सत्याभिध भवनदी न सेतु जया?" ५१
'त्वत्सम समर्थ होइल पिउनि हि [4]वारुण सुरा न [5]राज्यन्य,
[6]चित्र करिल कर्णा! त्वां [7]केलें दारुण सुरा [8]नरा जन्य.' ५२
यापरि गुरु दे व्हाया [9]शिष्यपरोत्कर्षहानि शाप वर,
[10]रामद्विजराजयशें न च पाहे म्हणुनि 'हा!' [11]निशाप [12]वरें. ५३
गुरुची आज्ञा घेउनि येउनि भेटे सुयोधना कर्ण,
गेला [13]गांतिला, वारुनि रणयज्ञें तो सुयोध [14]नाकर्ण. ५४
त्यावरि [15]कलिंगराजें राजपुरीं कुशळ दूत धाडून
कन्यास्वयंवरीं बहु गोळा केले क्षितीश झाडून. ५५
रुक्मी, कपोतरोमा, नीळ, जरासंध, भोज, शिशुपाळ,
ऋथ नृप, अशोक, भीष्मक, आला तो ही शृगाळ नरपाळ. ५६
तेथें गेला होता दुर्योधनसहित कर्ण, तीं कन्या
[16]वर्णन परिसुनि पाहे लंघाया कुरुवरा जसें अन्या. ५७
भीष्मद्रोणाश्रित कुरुपति लंघन तें न पावुल हि साहे,
चित्रांगदकन्येतें स्वरथीं अभिमानसिंधु तो वाहे. ५८
[17]सहसा स्वयंवरवधू धर्मा! दुर्योधनें जसी वरिली,
कर्णें सर्व नृपांची लीळेनें कीर्ति ही रणीं हरिली. ५९

१. लक्ष्मीमारखी. २. खोट्या! ३. जया सत्याभिध (सत्यरूपी) सेतु (पूल) बहुमत (विशेष मान्य) न, [तो] भवनदी कसा तरेल? ४. वरुण नावाच्या झाडाची. ५. [अन्य] क्षत्रिय. ६. यक्ष. ७. केलेले. ८. युद्ध. ९. शिष्योत्कर्षहानि तच्छत्रूत्कर्षहानि-**पंत.** शापाने शिष्य जो कर्ण त्याच्या उत्कर्षाची हानि झाली; परंतु वराने त्याच्या शत्रूच्या उत्कर्षाची हानि झाली. १०. तापकर शांतिकर हो-**पंत.** द्विजराज=ब्राह्मणश्रेष्ठ (पक्षी) चंद्र. ११. चंद्र. १२. उपरि-**पंत.** १३. सद्गतीला. १४. स्वर्गसंबंधी (देवसंबंधी) ऋण. १५. कलिंगदेशाचा राजा चित्रांगद यानें. १६. [दाईनें केलेलें] वर्णन. १७. एकाएकीं.

ज्या अत्यंत प्रबळा ळवली भूपावली[1] जरासंधा,
त्याची ही कर्णासी रण करितां पावली जरा[2] संधा[3]. ६०
बाहुरणीं हि सुदुर्जय, उखळी तनुसंधि[4], मागध रणीं तें
बहु बळ पाहोनि म्हणे, 'कर्णा! हो मित्र, माग धरणींतें.' ६१
सख्य करुनि मगधेशें दिधली कर्णासि मालिनी नगरी,
प्रबळा हि परग्रासी जी अत्युग्रा, जसी ह्रदीं[5] मगरी. ६२
तेसोच अंगराजें कर्णें परिपाळिली पुरी चंपा,
अमरावती म्हणों तरि हे अरिपासुनि न पावली कंपा[6]. ६३
देहीं दृढ दिव्य सहज कवच, सहज दिव्य कुंडलें कानीं:
यापरि न निववितीं पितृनयनें दावूनि तुंड लेकानीं. ६४
बा! त्वद्धितार्थ मागुनि नेलीं तीं कवचकुंडलें शक्रें.
हा अन्यथा न मरता त्या वज्रें, या हि शौरिच्या[7] चक्रें. ६५
'अर्धरथ' असें भीष्मप्रभु हि म्हणे त्वद्धितार्थ कर्णातें,
तेजातें शल्य उणें करि, और्व[8] जसा सरस्वदर्णातें[9]. ६६
त्या शापयुगें[10] धरिला आलानें[11] द्विरदसा[12] चि आकळुन,
मातेसि दिला तो वर अनृत कसा करिल साधु हा कळुन?
कृष्णाच्या नीतिबळें, पाशुपताद्यस्त्रसंग्रहें शुद्धें,
पार्थें गुरुप्रसादें वधिला व्यसनीं सुदुष्करें युद्धें. ६८
तव बंधु शापिला[13] तो बहुतांहीं वंचिला[14] असा राया!
गेला सोगा लोका रणयोगें त्यजुनियां असारा या. ६९
शोच्य नव्हे तो क्षत्रिय, अभिमुख युद्धांत पावला पतनः
बा! याकरितां चि करिति तनु मनुजवर प्रवीरजन[15] जतन."

---

१. राजपंक्ति. ( राजे लोकांचा समूह ). २. दुर्बळता—पंत. ३. प्रतिज्ञा. ४. शरीराचा सांधा. ५. डोहांत ६. अमरावतीला हि शत्रुभय होतें: पण ह्या चंपानगरीला कोणाचें हि भय नव्हतें, असा अर्थ. ७ कृष्णाच्या. ८. वडवाग्नि. ९. समुद्रजलास. १०. ब्राह्मणाच्या व रामाच्या शापानें. ११. सांखळदंडानें. १२. हत्तीसारखा. १३. शापिलेला. १४. फसविलेला. १५. श्रेष्ठ अशा.

# अध्याय तिसरा.

कुंती म्हणे, 'सुता! तूं योग्य न याचा करावया शोक,
जो करुणास्नेहरहित त्या आप्तास हि न शोचिती लोक. १
भेटुनि भस्म न व्हाया त्या पुण्यश्लोकसायका[1] कुळ[2] ती
त्याला करिती झाली, यासि तसी हे हि माय काकुळती[3]. २
उचिता काय सुतनिकट मातेची प्रार्थना वृथा व्हाया?
राधाह्वा[4] सुबहुमता जेंवि न चित्तीं[5] तसी पृथाह्वा या. ३
स्वप्नांत मजसमक्ष हि सूक्तींच्या शिकवि सुहित अर्क[6] शतें,
उपदेशामृत तो घे न च लेश हि आंत हीरें[7]कर्कश तें. ४
मीं काय? ऐक्य तुजसीं त्यासीं रवि हि न करावया शकला,
पूर्णा[8] हि जें सुदुर्घट, कैसें साधेल कार्य तें शकला? ५
केवळ विपरीतमति प्रतिकूळ तुम्हांसि तो मला कळला,
यास्तव उपेक्षिला म्यां, वळला सूक्तें न, मत्सरें मळला.' ६
या वचनें धर्माचे नयनासि असूंसि निंदुनि पटपट[9]
पडले[10] गळोनि करिती ओला ते अश्रुबिंदु निपट[11] पट. ७
धर्म म्हणे, 'माते! त्वां न करुनि हा मंत्रभेद[12], यां[13] तोकीं[13]
पीडा प्रतिष्ठिली, गे! वर[14] सर्वा करुनि दे दया तो कीं.' ८
ऐसें म्हणोनि झाला कुंतीसुत परमतप्त रोपानें,
सर्व स्त्रियांवरि बहु क्षोभे एकस्वमातृदोषानें. ९
कोणें प्रभुसि म्हणावें, 'सुविचार मनीं करून कोपावें;

१. पवित्र कीर्तींचा नाश करणाऱ्या (दुर्योधनास). २. गांधारी. ३. विनवणी ४. 'राधा' नाव असलेला. ५. कर्णाला. ६. सूर्य. ७. हिऱ्याप्रमाणे कठिण. ८. मूळपाठ—**सकला.** ९. तुकड्याला. १०. पडलेले. ११. अगदी. १२. रहस्यस्फोट. १३. मज बालकाचे ठायीं. १४. तो (कर्ण) दया करुनि [आम्हा] सर्वा [अभय-] वर दे कीं. (त्या कर्णानें सदयपणानें आम्हांला वांचविलें; पण आम्हां मात्र, तूं वेळीं च खरा प्रकार न सांगितल्यामुळें त्याला मारलें, त्याचें मला दुःख होतें).

पकीच्या अपराधें क्षोभ बहूंचरि करूं नको, पावें'? १०
'गुह्यासि आजिपासुनि दृढ कोणी ही स्त्रिया न धरितील'
दे धर्म शाप हा, परि याचा स्तव सर्व सुकवि करितील. ११
उद्विग्नहृदय होउनि धर्म म्हणे, 'अर्जुना! पहा काय
कैसें जालें: आतां शोकीं मज वाहवे न हा काय. १२
वत्सा! तुजला कर्णाद्यामांच्या न स्वजय गमो घातें,
या मोघा कर्मातें अनुसरलों, त्यजुनियां अमोघातें. १३
जरि वृष्णिपुरी भिक्षा भक्षुनि वसतों, कशास लोकांत
ऐसे घातक होतों? पडतों बा! या कशास शोकांत? १४
जालों निंदित बहु गुरुमित्रसुहृत्स्वजनबंधुसुतपातें;
करिन वनीं चुकवाया दुस्तरसंसारअंधु सु-तपातें. १५
तूं राज्य कर सिताश्वा!, माज्या या उक्ति मान सत्या गा!
सर्वस्वाच्या सजलें साधाया मुक्ति मानस त्यागा.' १६
अर्जुन म्हणे, "नृपा! तुज राज्याचा उचित होय अत्यागः
जरि पालन प्रजांचें न करिसिल, स्पष्ट हें चि अत्याग. १७
सत्य वदति कवि, 'कैचें राज्य क्लीबास दीर्घसूत्रास?
पाहोनि विप्रशीला पतिला पावे अपार भू त्रास.' १८
त्वां तरि किमर्थ वधिले कोपें खवळोनि शक्रसम राजे?
ते भोगिति क्षिति, क्षितिपातें मथिती करूनि समरा जे. १९
धर्मप्राप्त करावें राज्य सुखें: निंद्य हें नव्हे राया!
सोतेसि रामसा या स्वश्रीस न योग्य तूं अव्हेराया. २०
तो कीं हा बहु वर्षें चिंतित होतों सदा अवसरा ज्या,
याकरितां कीं केले कैलासाधिपपदा नवस राज्या! २१
राज्य त्यजिसी समरीं मेल्यांचा धरुनियां मनीं शोक,

१. निष्फळ अशा. २. द्वारकेत. ३. कप-**पंत.** ४. महत्पाप. ५. चेगटे मनुष्यास. ६. ब्राह्मणासारखा (शमदमप्रधान) स्वभाव ज्याचा. ७. क्षिति-**पंत.** ८. न्यायानें मिळालेलें. ९. या आर्येचे उभयचरण प्रश्नवाक्ये हि होऊ शकतील.

न्यायविरुद्धाचरणें तुज काय बरें म्हणेल हा लोक?" २२
धर्म म्हणे, " बीभत्सो[1]! बहु मानिसि तूं प्रवृत्तिच्या[2] चि पथा,
वृद्ध[3] न उपासिले त्वां, श्रवण न केली निवृत्तिमार्गकथा[4]. २३
'एकाकिगम्य[5] सत्पथ कोण?' असें पूस तूं मला पार्था!
अथवा पुसल्यावांचुनि कथितों. सार्थप[6] उपेक्षिना सार्था. २४
वानप्रस्थाश्रम[7] हित, त्या हि परिस सर्वकर्मसंन्यास[8],
धन्यास चि हा माने श्वेताश्वा! काय होय अन्यास? २५
मुनिमान्य मुक्तिचा हा मार्ग महामहित[9] मानला मजला,
तो काय यास जाणें, वृद्धांतें आदरें न जो भजला? २६
शिरले प्रवृत्तिमार्गीं, विषयसुखातें भुलोनि नर कामी:
तैसा होउनि जावूं कां कळत कळत बळें चि नरका मीं? २७
संसारा जिंकाया होइन मीं परमहंस[10] सितवाहा!
लाविन म्हणावया त्या गांधारा[11] तेंवि या[12] हि कितवा 'हा!'" २८
भीम म्हणे, "श्रोत्रियसा[13] तूं, त्याची तसि च बा! तुझी शुद्धी.
अनुवाकहता[14] जैसी त्याची, धर्मा! तसी च तव बुद्धि. २९
तत्त्वार्थदर्शन[15] जसें श्रुतिपाठकबुद्धिला[16] नसे कांहीं,
तैसें चि त्वन्मतिला तत्त्वार्थज्ञानलेश ही नाहीं. ३०
पंकें[17] भरोनि तृषितें टाकुनि जावें खणोनि कूपातें,
स्त्रीबाळवृद्धहास्यास्पद जैसें काय कर्म भूपा! तें. ३१
तैसें चि आमुचें हें कर्म, नृपा! श्रम करूनि जोडूनि,
उपभोग न करितां जें म्हणसी, 'जावें चि राज्य सोडूनीं.' ३२

१. अर्जुना! २. ऐहिक विषयाच्या. ३. ज्ञानवृद्ध. ४. परमार्थमार्गकथा. ५. एकट्याला जाता येण्याजोगा. ६. समहरक्षक. (धर्मा). ७. गृहस्थाश्रमानंतर परमार्थासाठीं वनांत एकांतस्थळीं राहणें. ८. त्याग. ९. अत्यंत वाखाणलेला. १०. संन्यासमार्गविशेष. ११. दुर्योधनास. १२. दुष्ट अशा (संसारास). १३. वेदज्ञ ब्राह्मणमा. १४. पठनानें नष्ट झालेली. १५. खऱ्या अर्थाचें ज्ञान. १६. वेदपठन करणाऱ्याच्या बुद्धीला. १७. चिखलानें.

क्षुधितें सदन्नपात्र त्यागावें जोडिलें करुनि यत्न,
कीं कामुकें त्यजावें जैसें निर्दोष कामिनीरत्न, ३३
किंवा अखिलाहितबळपलल खगश्वापदांसि चारावें,
वारावें भय जैसें मग आपण आपणासि मारावें, ३४
तद्वत्तव कर्म नृपा! लोकां तूं मूर्ख वाटसीः मज तों
वाटे, मूढ तुजपरिस बहु आम्हीः कीं, अशा तुला भजतों. ३५
वनवासें मुक्ति, असी येवूं देवूं मनीं नको लहरीः
झाले मुक्त खग, हरिण, वृक, जंबुक, कां वनीं न कोलें हरी?
जरि 'सर्वां कर्मांच्या संन्यासेंकरुनि' म्हणसि 'सर्व तरे,'
व्हावे चि मुक्त राज्या! तरि हे निःशेष वृक्ष पर्वत रे! ३७
प्रभुसीं काय वदों मीं? विद्वान वक्ता वदे न अन्यासीं,
अवनीं अवनीच्या अधिकारी क्षत्रिय, नव्हे चि सन्यासीं. ३८
जे अधन, अशक्त, अलस, नास्तिक, कल्पक तिहीं च संन्यास
कल्पुनियां चालविलाः तैशांस चि योग्य हा, न अन्यास. ३९
तो धन्य, पूर्वजाहीं जें केलें तें चि जो करी राया!
वेचीं नृपा! प्रजांच्या अवनीं, न वनीं वृथा, शरीरा या." ४०
नकुळ म्हणे, "राजेंद्रा! तूं ज्ञाना होसि धाम सत्या गा!
वाटे, बरा विचार न करुनि म्हणसि, 'करिन तांमसत्यागा.'
सर्वसुहृद्धृदयातें हें कर्म करूं नको विदाराया.
त्याग घडावा सात्विकः राजस, तामस न, कोविदा राया! ४२
आम्हां हृदयस्थ सदुपदेश चि म्हणतात, 'होंकरा यास,
त्यजुनि अहंता ममता गार्हस्थ्या सिद्ध हो करायास.' ४३
जरि सर्वाधिक नसतें गार्हस्थ्य, सुकवि कशास या गाते?

१. विलासी पुरुषानें. २. सर्व शत्रुमैन्याचें माम. ३. कल्पना. ४. मकर-**पंत.** ५. पृथ्वीच्या रक्षणीं. ६. सन्यासीं. ७. सात्विक, राजस व तामस अशा त्रिविध त्यागांचे सविस्तर विवेचन व्यासभारतात शांति० अ० १२ यांत पहावें. ८. होंकार द्या; समति द्या. ९. गृहस्थाश्रमास.

याच्या, साधिति लोकीं न च मिरवाया यशास, यागा ते. ४४
'एक चि करी तिघांचें, एकाचें ही तिघां नव्हे कार्य '
ऐसें तोलुनि वदला धाता, म्हणतात सर्व ही आर्य. ४५
द्यावीं अर्थिजनाला, बहु करुनि क्रतु नवे नवे, दानें.
पाठें[२] असोनि हि तरला, उक्त न करितां, न वेन वेदानें. ४६
क्लेश चि भोगावा, कीं आम्हीं धर्मा ! त्वदाश्रयें स्वर्ग ?
वर्ग[३] पुमर्थांचा[३] दे साधुनि सत्संग कीं जसा भर्ग[४]. ४७
हर्षावें ऐकुनि तव शक्र कुरुनायका ! यजन कानें.
केलें नाहीं पुण्यश्लोकें त्या काय काय जनकानें ?" ४८
सहदेव म्हणे, " पाठ चि येती तुज सांग सर्व ही वेद,
छेद न पावे कां हा, जो तव हृदयांत वाढला खेद ? ४९
मुक्त्यर्थ ईश्वराचें, त्यागावें राज्य न, भजन करायाः
सर्वत्र अलिप्तत्वें होतें सन्मित्र नभ जनकराया. ५०
ममकार[६], अहंकार त्यागुनि होसील मुक्त गेहीं च;
भव अपवर्ग, मम न मम, हे दोघे नांदतात देहीं च. ५१
त्यांत ज्ञाते म्हणती, 'जरि केवळ सोडिला अहंकार
तरि होय शीघ्र सर्व व्यवहारोच्छेद हे नव्हें सारें.' ५२
सर्व हि मुमुक्षु म्हणतो, 'जे ममता हे चि होय मम कारा[११];'
यास्तव आधीं अंजळि जोडी, सोडी च तोय, ममकारा. ५३
तूं ममकारातें चि त्यजुनि सुखें चि स्वधर्म राज्य करीं,
या सद्योगाग्निच्या दे निपटुनि सर्व कर्म[१२]आज्य करीं. ५४
सर्व मनःसंकल्पित जरि नाहीं त्यागिलें अगा राया !
तरि बा ! बाह्यद्रव्य[१३]त्याग वृथा; त्यजिसि कां अगारा या ? ५५

१. यज्ञ. २. अन्वय:—वेन, पाठ असोनि हि उक्त न करितां वेदानें न तरला. ३. पुरुषार्थांचा समुच्चय. ४. शिव. ५. विदेही जनकानें. ६. माझेपणा. ७. ममार. ८. मोक्ष. ९. माझें. १०. सत्य. ११. बंदिखाना. १२. कर्मरूपी तूप. १३. बाह्य विषयांचा त्याग. * त्यातून हि.

ज्याच्या मनांत लेश हि शेष वसे [1]कायविषयलोभ, वनीं
बाह्यद्रव्य त्यागुनि गेला नाहीं, वसे चि तो भवनीं. ५६
[2]अंतस्त्यागी वर्तति जैसे वसती सकाम हे भवनीं,
[3]तरि बा ! न म्हणावे ते [3]करिती वसतीस कां महेभ [3]वनीं ? ५७
रम राज्यश्रीसीं, तो मुक्त करुनि जेंवि जानकी रमला;
वदलों विशंक, शिकलों होतों तें, म्हणुनि मान कीर मला." ५८
मग आयकवी कृष्णा [5]निजसूक्तिकलाप लाडकी राज्या,
प्यावे वाणीकर्णे, करुनि [6]बहुकला [7]पलाड कीरा, ज्या. ५९
"शोकपरा दे गेह न, देह हि संताप, हा हि कारा हो !
संसारीं निजधर्मीं अचळा संता पहा, हिका राहो. ६०
चातकसे बंधु, तुम्हीं यांवरि सोडा दयासरी घनसे.
जालां कृपणगृह चि: कीं, [9]अर्थी अनुजोक्त, यास रीघ नसे. ६१
'मारूं सत्य करुनि निजपण ससहाया सुयोधनास रणीं;
मग [10]निःसंपत्न होवुनि भोगूं आम्हीं तुम्हीं सुखें धरणी. ६२
सुखवूं, दावुनि [11]सुनया [11]कुरुगुरुकविनयसमा, नयज्ञांतें.
जन तारूं, विस्तारूं बहु [12]शतमखमखसमान यज्ञांतें.' ६३
ऐसें कीं [13]द्वैतवनीं वदलां, दिधलीं अभीष्ट वर-दानें.
तीं अनृतें कां करितां? परिपाळावें स्ववाक्य वरदानें. ६४
हृदयें वाट पहातीं, मेघाची करुनि जेंवि आ शेतें;
वंध्या करितां [14]वत्सलळचर्य तुम्हीं सुज्ञ केंवि आशेतें ? ६५
[15]क्लीबे अधीर चि कळतें करितां पर्याय शोध नाढळला

१. शरीर व विषय याचा लोभ. २. अंतःकरणापासून विषयाचा त्याग करणार. ३. महेभवनी वसतीस करिती असे ते का न म्हणावे? सुखें म्हणावे–**पंत.** ४. पोपट. ५. आपली सुभाषितवचनें. ६. चांगल्या बोलक्या. ७. पल्याड, दर. ८. उत्तर्का. ९. बधचें भाषण हा च याचक. १०. शत्रुरहित. ११. कुरुकुलश्रेष्ठ व शास्ता अशा भीष्माचार्यासारख्याच्या सन्नीतीला. १२. इंद्राच्या यज्ञासारखे. १३. पांडवांचा वनवास ह्या वनांत सुरू झाला. १४. प्रेम करणाऱ्यांत श्रेष्ठ. १५. पुढे परिशिष्टांत पहा.

कुलज, स्वव्रत सोडुनि जो नृपवर्या ! यशोधना ! ढळला. ६६
राज्यश्री, स्त्री, सुत हें क्लीबाला काय होय ? जो धीर
तो चि धरेतें भोगी विद्वान्, विख्यात, विक्रमी वीर. ६७
बहु सुंदर हि अदंड क्षत्रिय जो तो सभेंत शोभेना;
क्षोभे नारीसी भू, क्लीबा पतिला कधीं हि लोभेना. ६८
मित्रत्व सर्वभूतीं, श्रुतिशास्त्राध्ययन, शुद्ध तप, दान
हा विप्रधर्मः कीं तो पावे, होऊनि उद्धत, पदा न. ६९
दुष्टदमन, अपलायन युद्धीं, द्यावें सदा श्रितां शर्म,
राज्यांचा हा चि परम, हेतु अशेषार्थसिद्धिचा, धर्म. ७०
क्रोध, क्षमा, अनुग्रह, विग्रह, भय, अभय, दान, आदान
जेथें तो धर्मात्माः होय इतर पात्र साधुवादा न. ७१
गेले सोडुनि पावुनि तुजपासुनि बहु रणीं इलांप दरः
न च पसरिला पराला त्वां संपादावया इला पदर. ७२
सोडविली श्रीदशरथदायादें दमुनि खळ जसी महिला,
पुण्यश्लोका धर्मा ! सोडविलें त्वां तसें चि या महिला. ७३
त्या प्रभुला सीतेचा, तुज भूचा त्याग वाटला कार्य.
त्या कर्मा अनुमोदन, तसें देती न यास ही आर्य. ७४
'आपत् सरेल सत्वर वत्से ! चिरकाळ तूं असें सासु,
धर्म तुला सुख देइल,' मज माजी बोलिली असें सासु. ७५
आर्येची आशीश्रुति सत्या पूज्या सदा इलापा ! हे;
त्याग दुराग्रह, कळि हा मिथ्या चि करावया इला पाहे. ७६
तव उन्मादें भ्रमले भीमार्जुन भरतनायका ! यम ही

१. राजदंडहीन. २. आश्रितांना. ३. सर्व पुरुषार्थांच्या साधनाचा. ४. संधि. ५. युद्ध ६. घेणें. ७. पृथ्वीपति राजे. ८. इतऱ्या भूमितें—**पंत.** ९. रामानें. १०. स्त्री. ११. करण्यास योग्य. १२. संकट. १३ आशीर्वादरूप वेदवाणी. १४. [राज्य सोडून वनांत जाण्याचा] हट्ट. १५. दुराग्रहरूपी. १६. वेडपणानें.

सावध असते, तरि तुज बांधुनि हे शासिते न काय मही?
भ्रांति हिताहित न कळों दे मोहुनि मानसा, धुरी तीतें
दूर कराया द्यावी, भ्रांत न दे मान साधुरीतीतें. ७८
अत्युत्तमा चि तुमची रीति जनामाजि; मीं च अधमा, जी
वांचावें म्हणत्यें, कीं बुद्धि विसरली च पुत्रवध माजी. ७९
मेळविति संपदा हे, तूं मेळवितोसि आपदा राया!
शीत स्वल्प चि वाहति नेत्र बहु उष्ण आप दारा या. ८०
लोटिसि कसें पदें जें मत शक्रपदा पद, भ्रमांधा! त्या?
तुज जेंवि अंबरीषा की यश आलें अदभ्र मांधात्या. ८१
जालासि वृथा विमना: पाळीं, त्यागीं कदा न वसुधेतें.
इतें सुरसा समुचित तूं चि: पर जसा न दानव सुधेतें. ८२
भोगावी, धर्में बहु कीं ये संपत्ति लेश देवा! जी;
विप्रांसि दास, दासी, गज, गाई, ग्राम, देश दे वाजी." ८३
पुनरपि अर्जुन भीम प्रार्थिति नानाविधें सदुक्तिशतें;
बहु बोलणें तयांचें धर्माच्या येइना चि युक्तिस तें. ८४
देवस्थान मुनि म्हणे, 'धर्मा! गुणसंपदर्णवा! त्यागा
विप्र उचित: परधर्मस्वीकृति शुभशुष्कपर्णवात्या गा!' ८५
पार्थ म्हणे, 'दंडाचें धारण संन्यासिया जसें आहे,

१ पृथ्वीचें राज्य चालवितें. २ मिरच्या वगैरे पदार्थांची धुरी. ३. तुम्हीं श्रमला, तरी च प्रजापालन सुहृदुक्तस्वीकार करानां—**पंत.** ४ भीमादि चवघे—**पंत.** ५. हृपज—**पंत.** ६. शोकज—**पंत.** ७ उदक (अश्रु). ८ स्त्रिया ९. दुर्वासमुनींच्या कसोटाला उतरलेल्या ह्या भगवद्भक्त राजानें सात दिवसांत सर्व पृथ्वीचें राज्य संपादिलें. १०. पुष्कळ. ११. लवणासुरास मारणाऱ्या या राजानें स्वतपोबलानें वृष्टि करून बारा वर्षांचें अवर्षण घालविलें. १२. खिन्न. १३. अन्वय.—जसा सुधेतें दानव समुचित (योग्य) न [तसा] पर (त्वदितर) इतें न. १४. किंवा. १५. या नावाचा. १६. गुणरूप संपत्तीच्या समुद्रा! १७. कल्याणरूप पिकलेल्या पानास उडवणारा वावटळ. १८. काठीचें. (या आर्येंत 'दंड' हा शब्द द्व्यर्थी योजला आहे).

तैसें चि दंडधारण[1] राज्यास हि सुमुनि सांगती बा! हे. ८६
राज्यासि दंडधारण उत्तमगतिहेतु होय; पापा हें
नाशी, यश दे; तरला सुद्युम्न[2]; मुनींस पुसुनि बा! पाहें.' ८७
व्यासातें धर्म पुसे, कीं, तन्मति सतत सद्यशीं लोला[3],
'बा! दंडधारणें तो तरला सुद्युम्न नृप कसा? बोला.' ८८

---

## अध्याय चवथा.

व्यास म्हणे, "शंख-लिखित-नामक सुतपःक्रियापर महर्षी[4]
होते पृथक् करुनि बहु विद्यान्नार्थिप्रिया[5] परमहर्षी. १
स्वपरौदार्यक्रौर्यसुगुणजितजळमुग्धराशिशु[6] भ्राते
मेळविति सदाचारें कीर्ति सदा दुग्धराशिशुभ्रा[7] ते. २
यत्तेजें कामाद्यरि शिष्यांचे, त्यजुनि [8]केलि, खितपावे,
त्या शंखाभिधमुनिच्या पुण्याश्रमभूमिके[9] लिखित पावे. ३
आम्रा, रंभावृक्षा[10], पाहे परिणतफळा[11] लिखित पनसा;
क्षुधित म्हणुनि खाय फळें, जो वरतेजोगुणें[12] शिखितपनसा[13].
पनसादिपादपांचीं पाहुनि जों परिणतें फळें भक्षी,
तों तेथें येउनि तो सहसा शंख स्वसोदरा[14] लक्षी. ५

१. राजदंडस्वीकार. २. याची कथा पुढील अध्यायांत आहे. ३. लुब्ध. ४. चांगल्या तपश्चर्येंत निमग्न. ५. विद्या व अन्न यांची याचना करणाऱ्यांचे इष्ट करून. ६. स्वेषु परेषु यथासंख्य औदार्यक्रौर्यसुगुणविजितमेघमंगलौ—**पंत.** आत्मीयाविषयींचें व परकीयाविषयींचे अनुक्रमें जें औदार्य आणि क्रौर्य त्या सुगुणानें [क्रमानें] जिंकले आहेत मेघ व मंगलग्रह ज्यांनीं असे. ७. क्षीरसमुद्राप्रमाणें शुभ्र. ८. [आपली] लीला. ९. प्रत्ययाभावीं चतुर्थी. १०. केळीला. ११. पिकलेलीं फळें असलेल्या. १२. उत्कृष्ट सामर्थ्यरूप गुणानें. १३. अग्नि व सूर्य यांच्यासारखा. १४. आपल्या भावास.

'कोणी तुज दिधलीं? हीं कोठील फळें?' असें पुसे विप्र;
सांगे लिखित यथार्थ भ्रात्यातें चरण वंदुनि क्षिप्र. ६
शंख म्हणे, 'चौर्य तुला घडलें; न विचारितां फळें पक्षी
भक्षी कीं कपि; सुज्ञ, प्राणांसि न, पुण्यसंग्रहा रक्षी. ७
जा, सुद्युम्ननृपाला सांग, करिल दंड, अंह[1] रायाला
कळवावें, वैद्याला दुःख; कुशळ तो चि संहरायाला.' ८
जाय लिखित; ऐकुनि ये नृप, सोडुनि सर्व काज, सामोरा;
होय तया हर्ष मुनिस पाहुनि, मेघास बा! जसा मोरा. ९
भूप म्हणे, 'भगवंता! लिखिता! ज्या पातलासि कार्यातें
उघडुनि[2] सांग मला, म्यां दासें केलें चि जाण आर्या! तें.' १०
लिखित म्हणे, 'शंखानें न दिलीं[3] म्यां भक्षिलीं फळें पिकलीं;
शासीं विप्रांगें[4] तव राष्ट्रीं चोरी करावया शिकलीं[5].' ११
सुद्युम्न म्हणे, 'स्वामी! स्पष्ट जसा दंडधारणीं[6] राजा
होय प्रमाण, आज्ञेविषयीं हि तसा चि; शुद्ध तूं, बा! जा. १२
जालासि, मदाज्ञेनें नाशुनियां कीर्तनें[7] हि पाप, शुची;
सेकें[8] चि मनुष्याची पीडा, डागें चि जाय बा! पशुची. १३
बा! वाढिव, मागुनि गृह गज हरि मणि भूमि कन्यका, माहिम्या;
करिजेतिल सर्व तुझे सर्वस्वें सिद्ध अन्य काम हि म्यां.' १४
बहु लोभाविला भूपें, परि मुनि कुरुनायका! वळेना च.
काम[9] कविस लोभाविते, तरि हंसा करुनि कावळे नाच. १५
द्यावें उष्ण चि जळ जरि सोडीना उष्णताप करकापा[10],

१. पाप. २. स्पष्टपणें. ३. दिलेलीं. ४. ब्राह्मणाचे हात इत्यादि अवयव. ५. शिकलेलीं. ६. राजदंड धारण करण्यांत. (राज्यकारभाराच्या कामीं). ७. उच्चार करून हि. ८. शेकल्यानें. ९. वासना. १०. गारा खाणाऱ्याला. (गारा खाऊन हि जर एकाद्याचा उष्णताप कमी होईना तर त्याला ऊन च पाणी द्यावें लागतें. त्याप्रमाणें सांत्वन करून, कृतापराधाची क्षमा करून हि जेव्हां लिखिताचें समाधन होईना तेव्हां निरुपाय होऊन राजा त्याला शिक्षा करण्यास उद्युक्त झाला, असा भावार्थ).

तैसें करी नृप, म्हणे दासांतें, 'शीघ्र लिखितकर कापा.' १६
मग जाउनि लिखित म्हणे, 'कथुनि नृपा उक्त दंड करवीला.'
शंख म्हणे, 'वाटो सुत[1] तो हा पाहोनि दंडक[2] रवीला. १७
वत्सा! धर्म न लोपो, जा, मज्जन[3]तर्पणादि साधुनि घे.'
या गुरुच्या आज्ञेनें साधाया नित्यकर्म साधु निघे. १८
जाउनि नदींत दे तो सत्वाचा[4] निधि भला बुचकळीला;
साधु चि तारक; त्यासीं करु नीरस जड अलाबु[5] च कळीला.
आचमनाला लागे घ्याया त्या थोटकें[6] चि जों पाणी,
आले बाहुयुगीं नवनलिनमलिनकर[7] सुरम्य तों पाणी[8]. २०
विस्मित जाला चित्तीं बहु तें पाहोनि तो लिखित चित्र[9];
गमला नदीप्रवाहीं, स्फटिकमणितळीं जसें लिखितें[10] चित्रें[11]. २१
जींत नवल हें, नामें होउनि ती बाहुदा[12] नदी नांदे,
आजुनि ही पापांपापति[13]पतितां बाहुदान दीनां दे. २२
लिखितें हस्त शिरासह शंखपदीं वाहिले उपायनसे.
श्रीगुरुचें उतराई व्हाया नमनाविणें उपाय नसे. २३
दावी असकृत् प्रेमें नव करकमळें स्वयें लिखित पाहे.
शंख म्हणे, 'म्यां स्वतपें केले तव भव्य नव्य[14] कर बा! हे.' २४
लिखित म्हणे, 'जिंकाया तप सर्वतपस्विनायकां होतें.
दंडापूर्वीं च दुरित[15] माजें हरिलें तुम्हीं न कां हो! तें?' २५
शंखमुनि म्हणे, 'वत्सा! तुज दंडधरें नृपें चि दंडावें;
म्यां ऐसें चि करावें, भवबंधन हरुनि, दुःख खंडावें. २६
जालासि पूर्वजांसह तूं, तो सुद्युम्न ही, शुचि; तरा जा;

१. यमधर्म–**पंत.** २. [ अपराध्यास शासन करण्याची ] रीत. ३. स्नानसंध्यादि. ४. धैर्याचा सागर. ५. भोपळा. ६. थोट्या हाताने च. ७. नवीन कमल-नेत्रास लाजविणार. ८. हात. ९. आश्चर्य. १०. कोरलेले. ११. आश्चर्यानें स्तब्ध उभा राहिला, असा भाव. १२ बाहु देणारी. १३. पापसागरीं पडणाऱ्यांस–**पंत.** १४. नवीन. १५. पाप.

तरतो, दंडुनि घे तो; करि तो शासन हि जो उचित राजा.' २७
ऐसी प्राचीन कथा तुज कथिली म्यां, करूनि या कर्मा
[1]प्राचेतसदक्ष तसा पावे सुद्युम्न सिद्धितें धर्मा! २८
अर्जुन समजुनि वदतो, तूं समज उणें करूं नको दंडा.
बा! दंडें चि क्षत्रा यश, जेंवि [2]गुणेंकरून कोदंडा. २९
[3]ब्रह्मास ब्रह्मपदप्रद होय, तसें न मुंडन क्षत्रा.
गज पावेल [4]गणपसा होउनि [5]उंन्नीतशुंड [6]नक्षत्रा?" ३०
अर्जुन म्हणे, 'मुकुंदा! [7]विज्वर बोधें तुज्या तरी हो हा.
धर्माला धर्म कळिव, वळिव, पळिव [8]कळिवनानळा! मोहा.'
बाळपणापासुनि जो धर्मास अलंघ्य वेदसा राया!
प्रेमें विजयाधिक तो देव पुढें होय खेद साराया. ३२
भुज धरुनि म्हणे, "राज्या! धर्मा! तुज हे दशा नसे उचिता;
बुध म्हणती, '[9]रोगहता क्षत्रियदेहा कदा न सेउ चिता.' ३३
क्षत्रिय ते शोच्य, गेंदें ज्यांचीं झालीं गृहांत [10]अवसानें.
'शस्त्रें रणमरण' असें मागावें ईश्वरास नवसानें. ३४
त्यांस रडावें, मेले असतिल दावूनि जे परा पाठ.
तुज [11]रणमखप्रयोग क्षत्रियतिलका! असे बरा पाठ. ३५
त्वां शोक मोह जाया केलें [12]आचार्यवर्यकुलभजन.
तें निष्फळ न करावें. जो मेला तो नव्हे चि *सुलभ जन. ३६
तुज ती शोक शमाया कथितों, जी सर्वसाधुरायकवी
हा [13]देवर्षि कथा सुतशोकार्ता [14]सृंजयासि आयकवी." ३७
ऐसें म्हणुनि, मरुत्तप्रमुख नृपांच्या कथी कथा सोळा,

---

१. [जसा] प्रचेतसकुलोत्पन्न दक्ष. २. दोरीने. ३. ब्राह्मणांस. ४. गणपतीप्रमाणें. ५. सोंड उच केलेला. ६. स्वर्गास. ७. मनःसंतापरहित. ८. कलिरूप वनास अग्नीसारख्या अशा (कृष्णा!). ९. रोगानें. १०. अंत. ११. युद्धयज्ञाची रीति. १२. गुरुश्रेष्ठांच्या समुदायांची सेवा. १३. नारद. १४. शिबीदेशाच्या राजास. * मिळण्याजोगा.

खोळी[1] हर्षाच्या ज्या म्हणति अमृतघनघटांसि[2], 'कर चोळा.'
पहिला मरुत्त राजा कथिला, नरपति सुहोत्र तो दुसरा.
तिसरा बृहद्रथ, जया भजले अर्थी जसे पिपासु[3] सरा[4]. ३९
शिबि औशीनर[5] चवथा कथिला जो शुद्धकीर्तिलाभरत,
मग पांचवा नराधिप दुष्यंततनूज कीर्तिला[6] भरत. ४०
बहु पावले जयाच्या सुयशीं जितकालकलि[7] नर विसावा,
तो वर्णिला प्रभूत्तम नरवर रघुवंशनलिनरवि[8] सावा. ४१
नृप सातवा भगीरथ, तैसा चि दिलीप आठवा, याचा
कथिला अद्भुत महिमा चित्तांत सदैव आठवायाचा. ४२
मांधाता नृप नववा, भूप दहावा ययाति, न करावा
दूर मनांतुनि पळ ही, कथिला तो अंबरीष अकरावा. ४३
शशबिंदु इंदुनिर्मळकीर्तिधवलितत्रिलोक[9] बारावा,
तेरावा गय, ज्याच्या साधुत्वें शक्रगर्व वारावा. ४४
परमोदार सकळगुणरत्नाकर रंतिदेव चवदावा,
जो कांहीं न उरों दे अर्थिमनीं खंति[10], देव च वदावा. ४५
वाखाणिला मुकुंदें अनरिपुढें[11] सगर पंधरावा हो !
तद्यश दुर्लभ; शिर शिवचरणीं कापूनि कंधरा[12] वाहो. ४६
ज्याच्या सुयशीं न्हाया अति विमळ धवळ सुधांशु घोळावा,
अजितें संस्तविला तो पृथु वैन्य[13] जितार्थिदैन्य[14] सोळावा. ४७
विश्वगुरु म्हणे, 'ज्ञाते, दाते, करिते समस्त सव[15] लोकीं
ठेउनि सद्यश गेले, उघडूनि विवेकचक्षु अवलोकीं. ४८
सर्व हि अनित्य, दुःख चि लोक अरि हि परम हा गमे रुचिर.

---

१. पिशव्या. २. अमृतरूप मेघसमूहास. ३. तान्हेलेले. ४. सरोवरास. ५. उशीनरनामक देशाचा. ६. वर्णिला. ७. काल व कलि याना जिंकिलें आहे ज्यानें असा. ८. रघुवंशरूप कमलाचा सूर्य (श्रीराम). ९. चंद्रबिंबाप्रमाणें स्वच्छ अशा कीर्तीनें शुभ्र केलें आहे त्रैलोक्य ज्यानें. १०. खेद. ११. धर्मापुढें. १२. मान. १३. वेनराजाचा पुत्र. १४. याचकांचें दैन्य दूर केलें आहे ज्यानें. १५. यज्ञ.

किति नर? न रहायाचा अढळ दिसे पर महाग मेरु[1] चिरें[2].'
'त्वां न वधिले, न भीमें, न सिताश्वें हे प्रवीर न यमानीं.'
व्यास म्हणे, 'राज्या! हा केला काळें चि लोकलय मानीं. ५०
साधो! बाधो आधि[3] न, जरि धरित्ये नरकपातभय मेधा[4]
तरि शक्रसा करीं तूं, जालासि निमित्त म्हणुनि, हयमेधा.[5] ५१
मृतभूपकुटुंबांतें आपण निवषावया मन घरा जा,
होतो प्रजासमवनें[6] हयमेधें निश्चयें अनघ[7] राजा. ५२
असतिल राजसुत तयां अभिषेक करूनि राज्य दे हातें,
देतें वात्सल्य यश प्रभुतें, बळ जेंवि आज्य देहातें. ५३
द्वेषें करोत सवती[8] पोटीं जाणोनि गर्भ कलहा न,
अभिषेकावे त्वां नृपदार हि, मग कां न अर्भक लहान? ५४
किंबहुना जा पांच हि, राज्यपदीं बैसवूनि कन्या[9] या,
बहु रंजवा प्रजांतें होवूं देवूं नका चि अन्याया. ५५
करितें बहु प्रजांचें[10] केलें अघशोकहानि रंजन हो!
वारुनि सर्व उपद्रव, करुनि सुखी लोक हा निरंजन[11] हो.' ५६
धर्म म्हणे, 'मज तुमचा आदेश[12], जसा हया कळावा[13], हो.
संपूर्ण राजधर्म स्वामी! करुणालया! कळवा हो!' ५७
पाहुनि देवर्षिकडे व्यास म्हणे, "हरुनि भार ताराया
क्षितितें क्षम तूं असर्सी, सुपर्थी रुचि धरुनि भारता! राया!
श्रुति विधिजिह्वासिंहासनिं[14] बैसुनि वदालि सारसारा[15] ज्या,
त्या पुस राजधर्मा गांगेया सदलिसारसा[16] राज्या! ५९
भीष्में केल्या[17] बहुत चि गुरुभार्गवराम मानवे दास्या

१. महापर्वत. २. चिरकाल. ३. चिंता. ४. बुद्धि. ५. अश्वमेधास. ६. प्रजेच्या रक्षणानें. ७. निष्पाप. ८. राजस्त्रिया. ९. मृत राजांच्या मुली. १०. केलेलें. ११. निष्कलंक. १२. आज्ञा. १३. मोकळ्या घोड्याच्या पायाना बांधलें जाणारें बंधन. १४. ब्रह्मदेवाच्या जिह्वारूपी सिंहासनावर. १५. उत्तमोत्तम भागास. १६. साधुरूप भ्रमरांचे कमल अशा (गांगेया). १७. केलेल्या.

या जाह्नवी[१]सुतास्या तो, जो साधूंत मान वेदों[२]स्या. ६०
मानिति ज्या अनपत्या धनपत्या[३]खंडलादिलोकेश,
ज्यां[४] होय, जो अपुत्रक जन, नाकीं भाजनांत तो केश. ६१
इच्छामरण असें हें ज्या दिधलें भगवदंश[५]यश तातें
तो सर्वज्ञ समर्थ छेदाया शिष्यसंशयशतातें. ६२
जो आहे शरतल्पीं धरुनि प्राणेंद्रियप्रकर[६] आजा,
तो बा ! चातक तूं त्या स्तनयित्नुपुढें[७] हितार्थ कर ‘आ’ जा.”
धर्म म्हणे, ‘ज्ञाति वधुनि, अपराध करूनि सर्वजनघातें,
सरळपणें रण करितां कपटें पाडूनि त्या हि अनघातें, ६४
धर्म पुसाया सर्वक्षत्रघ्न कृतघ्न हा कसा जावा?
छात्र कुपात्र सुपात्रा, तरि हंसा कां न काक साजावा ?’ ६५
श्रीकृष्ण म्हणे, ‘धर्मा ! ऐक गुरु व्यास वीतकुत्स वदे,
या ब्राह्मणांसि, आम्हां सुहृदांसि पदीं बसोनि उत्सव[९] दे. ६६
सिंहासनीं प्रजांच्या तूं आजि हितार्थ रामसा चढ गा !
कर म्हणतों, मेघाच्या, श्रितचातकपक्षिकाम साच, ढगा ! ६६
सुखवाया भ्रात्यांला, कृष्णेला, आइला, मला हि वसें.
करितो भ[१०]जज्जनहृदय चंदनसा झिजुनियां भला हिवसें[११].’ ६८
या वचनें साधूंच्या रोमांच्यासह चि तो उठे धर्म,
कर्म श्रुतिविहित करुनि, लोकांला द्यावया यशें शर्म[१२]. ६९

१. भीष्माच्या तोंडच्या शब्दास. २. वेदवचनास. ३. कुबेर, इंद्र इ० लोकपाल. ४. ज्यां जो अपुत्रकजन तो नाकी (स्वर्गी) भाजनात (भोजनपात्रांत) [जसा] केश [किळसवाणा होतो तसा] होय. ५. परमात्म्याचा अंश असल्याची कीर्ति ज्यांत असें. ६. समुदाय. (पंचप्राण). ७. मेघापुढें. ८. निद्रारहित. ९. आनंद. १०. भक्तजनांचें हृदय. ११. थंड. १२. सुख.

# अध्याय पांचवा



नमुनि मुनींद्रांसि[1] म्हणे, 'मजवरि करुणापयोद[2] हो! ओळा.'
बैसे कनकरथीं ज्या शुभलक्षण वृषभ[3] लाविले सोळा. १
सारथि होय वृकोदर, ढाळिति माद्रेय चामरें दोघे,
नारायणसख नर जो, धरुनि शिरीं छत्र शुद्ध यश तो घे. २
बसवुनि वरनरयानीं[4] गांधारीसह पिता पुढें केला;
वाजत, गाजत, लाजत, साजत राजतरणी[5] पुरा गेला. ३
धर्मामागें चाले सुरथीं बैसुनि युयुत्सु नरवरसा,
तेव्हां कांपे, साहे जय, वाद्यांचा परंतु न रव रसा[6]. ४
भगवान् युयुत्सुमागुनि सात्यकिसह बसुनि निजरथीं चाले,
न्हाले प्रेमाश्रुजळें साधु प्रभुच्या दयामृतें धाले. ५
कुंतीकृष्णादिस्त्रीजन यानीं बैसउनि तयासि, कवी[7]
आपण मागें चाले, धर्म नय करूनि जो दया सिकवी. ६
प्राणगण तनूंत, तसा शिरतां स्वपुरींत धर्म, पौर[8] वदे,
'पौरवदेवासि[9] सदा जगदीशा! यापरी च गौरव दे. ७
सोडवुनि, राक्षसक्षयहेतु[10] करुनि आजि[10], भाजे[11] सीतापें[12]
ती तसि तूं पुरि धर्मे निववीलिस, न आजि भाजसी तापें.' ८
स्वर्गीं गोचर[13] झाला[13] देवांच्या धर्मबंदिरव[14] राज्या[14],
तें तें गमे खचेल, व्यापी स्त्रीवृंद मंदिरवरा ज्यां[15]. ९

---

१. व्यास व देवस्थानयास. २. दयाघन. ३. बैल. ४. 'सार्वभौमस्य तैंल्तरावा' इति भाषायां–**पंत.** ५. राजश्रेष्ठ. ६. पृथ्वी. ७. विदुर–**पंत.** ८. नागरिक. ९. पुरुकुलोत्पन्न राजास–धर्मास. १०. राक्षसक्षयहेतु आजि–**पंत.** ११. भार्या. १२. रामचंद्रानें. १३. ऐकू गेला. १४. इंद्राला. १५. मिरवणुकीच्या रस्त्यावरील इमारतींत समारंभ पाहण्याकारितां स्त्रियांची इतकी गर्दी लोटली कीं, त्या इमारती कोसळतात कीं काय असें वाटलें. * जिच्यावर तक्त ओढून बैठक केली आहे अशी मिवणुकींतील प्रमुख गाडी.

ये बहु शोभा अंतःशून्यत्वास हि धरूनि आगारा,
स्त्रीदृष्टिचातकी[2] त्या गमती गिळिती, करूनि आ, गारा. १०
'तुज[3] पाहोनि विकसली कुरुराज्यश्री तुजी च आलि[4], सये!
दुर्गासी दुष्ट दमुनि, जोडुनि सत्कीर्ति, देवि! आलिस, ये. ११
तव दृक् खळायुला हरि, दीपाची वर्तिका[5] जसी तेला;
सति! सुकर तुला जैसें सुरमानसवर्ति[6] काज सीतेला. १२
त्वत्क्षोभें मेलें हें खळबळ; दुःसह असें न गर महिला.'
बहु मोहिनीस तैसें कृष्णेला वर्णिती नगर-महिला. १३
झांकिति पुष्पप्रकरें लाजाप्रकराधिकें[7] कनकरचितें,
जें औदार्य घनांचें, दाविति पुरकन्यकाजनकर चि तें. १४
शोभा नहुषभ्रंशीं[8] येतां पाहुनि पंतीस[9] जी नाकीं
ती च कुरुपुरीं; स्वामीविण बहु आत्मा सती सजीना कीं. १५
धर्में कुरुपुर पावे, बहु अर्कें जेंवि तोख राजीव[10];
करितां प्रवेश, वाटे तें नृपगृह देह, तो खरा जीव. १६
राजगृहीं देवांसह नमुनि पुरोहित मनांत तोख रची,
पुण्याहवाचनीं बहु धन गोधन धर्मराज तो खरची. १७
म्हणतां मंत्र गमे नृप, सेवी समजोनि सुरस भोज्याला[11],
श्रीरामसा बहुमत प्रभु जाला भूमिसुरसमाजाला[12]. १८
ऐकत होते सुरतीं[13], नुघडुनि सुरजन कवाड, वाद्यातें.
धर्म म्हणे, 'जो जितुकें घेइल मणिकनक वाडवा[14] द्या तें.' १९

१. सर्व स्त्रिया बाहेर आल्यामुळे घरें आंतून मोकळीं पडलीं; तथापि त्यांचां बाह्यांगें त्यांनी व्यापिल्यामुळे तीं फार शोभूं लागलीं. २. स्त्रिया अत्यंत उत्सुकतेनें तो समारंभ पहात होत्या. ३. द्रौपदीला. ४. सखी. ५. वात. ६. देवांच्या मनांतील. ७. लाह्यांच्या राशींहून अधिक अशा. ८. इंद्रपदापासून नहुष भ्रष्ट झाला तेव्हां. ९. शक्रास-पंत. १०. कमल. ११. ज्या त्या ब्राह्मणास वांट, माझ्या च मंत्राला-पंत. १२. ब्रह्मवृंदास. १३. शृंगारचेष्टांत गुंतले असतां. १४. ब्राह्मणास.

चार्वाक[1] सुयोधनसख राक्षस, विषदुष्टरस[2] असा इक्षु[3],
त्या ब्राह्मणांत होता होउनि कपटें त्रिदंडधर भिक्षु[4]. २०
तो धृष्ट[5] तशा उत्सवसमयीं गर्जुनि म्हणे, 'अरे धर्मा!
तुज सन्मुखें वदति हे विप्र सकळ, उचित जें तुज्या कर्मा. २१
धिक्कार असो कुनृपा! ज्ञातिगुरुघ्ना! तुतें वृथा व्याली;
मरण श्रेय, न जीवित तुज पापा; व्याल तूं, पृथा व्याली.' २२
हें निष्ठुर वच परिसुनि, लागे चरका चि काळिजा, भ्याला;
व्रीडित परमोद्विग्न ब्राह्मणसमुदाय राय ही जाला. २३
जरि हि सव्रीडित पीडित जाला त्या आयकोनि धिक्कारा,
जावें ब्रह्मांड गमे भेदुनि त्या, होय सर्व दिक्[7] कारा. २४
क्षणभरि उगें चि राहुनि धर्म म्हणे, "मायबाप हो! पावा;
नमितों, पदर पसरितों, मज दासास प्रसाद ओपावा. २५
भावांच्या इतरां ही जीवांच्या सर्वदुःखपरिहारा
हा 'राज्य करिन' म्हणतो, न वहाया मुकुटकटकमणिहारा. २६
जो किंकर पायांला, स्वशिर करुनि पादपीठ[8], आतळतो,
न करावा धिक्करुनि प्रभुनीं पाण्यापरीस पातळ तो." २७
ब्राह्मण वदले, 'पुण्यश्लोका[6]! हें आमुचें नव्हे उक्त.
युक्त श्रीसीं हो तूं राघवसा जन करावया मुक्त.' २८
ऐसें बोलुनि सुमुनि ध्यानीं जाणोनियां तया पापा,
सांगति, 'दुर्योधनसख राक्षस चार्वाक होय हा, बापा! २९
निंदूं कसे? हरि! हरि! श्रुतिपरि तव कीर्ति सिकतसों गाथा;
जीवितधन देउनि हा आला घेवूनि विकत सोंगा या.' ३०

---

१. मांड्या मोडून पडल्यावर दुर्योधनाला ज्याचें स्मरण झालें तो हा त्याचा दोस्त. (गदा० अ० ९।२३ पहा). २. विषानें दूषित झाला आहे रस ज्यांतील असा. ३. ऊस. ४. सन्यासी. ५. धाडसी. ६. साधूंनीं स्तविलेला. ७. दिशा. ८. पाय ठेवण्याचें आसन. (जो आपल्या मस्तकीं तुमचे-ब्राह्मणांचे-पाय धारण करितो).

राज्याचा खेद हरुनि तो विप्राहीं च राक्षस खपविला,
आटोपता न धर्मोदयसंजातज्वरराक्षस[1]ख पविला. ३१
चार्वाकातें केला त्या मुनिनीं, जेंवि दंड वेनातें;
ऐसें[2] तेज कवण, जें ब्राह्मणतेजासि दंडवेना, तें? ३२
केशव म्हणे, "कृतयुगीं बदरींत[3] बहु स्वसाधना जपला,
न पैलाशन[4] हा श्रमला, बहु वर्षें उग्र तप नृपा! तपला. ३३
धात्यास सर्वभूताभयवर[5] वंदूनि पाप हा याची,
याची इच्छा समजे ब्रह्मा लोकक्षया पहायाची. ३४
दिधला[6] वर, अवमानित विप्र निराळे करूनि, वरदानें.
मग जग पीडूं लागे राक्षस, होवूनि मत्त वरदानें. ३५
व्रीडित पीडित होउनि, गेले नेवूनि देव कागाळी;
वदले, 'दव जेंवि तृणा, राक्षस न तुज्या हि सेवका गाळी.'
द्रुहिण[8] म्हणे, 'द्वापरयुग ये तोंवरि देव हो! सहा ताप.
हा होइल कुरुवंशज दुर्योधननृपतिचा सखा पाप. ३७
तेव्हां चि मरेल, करुनि तत्स्नेहें द्विजसभावमानातें.'
जें द्विजतेज, समस्तां तेजांत गुरुप्रभाव[9] माना तें. ३८
तो हा राक्षस वधिला; भेटेल सखा सुयोधना सत्य;
झाला अंघरोगाला[10] सर्वसमरहतसुयोध[11] नासत्य[12]. ३९
धर्मा! राज्य कर अशा या विप्रांचें संभाजन[13] कराया;
संसारीं धन्य करिल तुज हे, जसि मुनिसभा जनकराया." ४०
या गुरुवरोपदेशें कुंतीसुत शोक दैन्य सोडून,

१. दुर्योधन–**पंत.** धर्माच्या अभ्युदयानें ज्याच्या नेत्रास दुःख झालें आहे अशा दुर्योधनाचा मित्र. २. ब्राह्मणतेजासी जें दडवेना ऐसें तें तेज कवण?–**पंत.** ३. बदरिकाश्रमांत. ४. मासभक्षक. (राक्षस). ५. सर्व प्राण्यांपासून अभय हा वर. ६. अवमानित विप्रांखेरीज सर्वभूताभयवर दिला. ७. वगळत नाही. ८. ब्रह्मदेव. ९. मोठ्या प्रभावाचें. १०. पापरूप रोगास. ११. समरसंग्रामांत मेले आहेत सर्व वीर ज्याचे असा दुर्योधन. १२. अश्विनीकुमार. १३. पूजन.

प्राङ्मुख[1] कांचनपीठीं[2] बैसे विप्रांसि हात जोडून. ४१
तदभिमुख सुमणिकांचनपीठीं श्रीकृष्णसात्यकी बसले;
भीमार्जुन नृप मध्यें घालुनि कनकासनीं समुल्लसले[3]. ४२
सहदेवनकुळ घेउनि दांतीं[4] सिंहासनीं पृथा बसली,
जसि काय देवहूती[5] योगयुगयुता[6] सदाश्रमीं वसली. ४३
रत्नासनीं बसे धृतराष्ट्र क्षितिपति, तयासमीप सती
देवी गांधारसुता झाली मणिमयशुभासनीं बसती. ४४
बसला युयुत्सु कांचनपीठीं सविनय समीप जनकाच्या[7]:
संजय हि आसनावरि बसला होता विशुद्धकनकाच्या. ४५
धर्मार्थकाममोक्षोपायीं म्हणणार विनवितां 'हो' ते
कविजीवसे[8] सुधर्मा[9] धौम्य[10] पुरोहित वरासनीं होते. ४६
अभिषेकाचें आल्या घेउनि साहित्य सर्व हि प्रकृती[11],
पूर्वांग[12] भगवदुक्तें करिती धौम्यादि सर्व विप्र कृती. ४७
व्याघ्राजिन वेदीवरि, आंथुरिला पट तयाउपरि धवळ;
धौम्यें धर्म बसविला, त्याच्या[13] द्रुपदात्मजा सती जवळ[13]. ४८
केला होम यथाविधि, तृषितज्वलनासि पाजिलें प्राज्य[14]
आज्य सुखें यजमानें, बहु निष्कंटक करावया राज्य. ४९
मग सांठविलें आहे ज्याच्या निःशेष विश्व हें उदरें,
कृष्णेसह धर्मातें अभिषेकी देवदेव तो सुदरें[15]. ५०
धृतराष्ट्र हि अभिषेक स्वकरें धर्मी दरेंकरूनि करी,
निजमस्तकीं शमाया संताप जसा करें[16]करूनि करी. ५१

---

१. पूर्वाभिमुख. २. सुवर्णासनावर. ३. शोभते झाले. ४. हस्तिदंती. ५. कपिलमाता. ६. राजयोग व हठयोग यांनीं युक्त अशी. (पतिसहवासांत विविधोपभोग भोगलेली देवहूति कपिलांनीं आत्मज्ञानोपदेश केल्यानंतर आश्रमीं राहू लागली). ७. धृतराष्ट्राच्या. ८. असुराचार्य शुक्र व सुराचार्य बृहस्पती यांप्रमाणे. ९. कौरवांचा आचार्य. १०. पांडवांचा आचार्य. ११. प्रजा. १२. राज्याभिषेकाचें पूर्वकर्म. १३. त्याच्याजवळ सति द्रुपदात्मजा [बसविली]. १४. पुष्कळ. १५. उत्तम शंखानें. १६. सोंडेनें.

अभिषेचुनि वृद्ध म्हणे, 'दिधलें तुज सर्व राज्य पुत्रा ! म्या,
जैसें पूर्वीं कश्यपमुनिनें अभिषेक करुनि सुत्राम्या.' ५२
सर्व प्रकृति हि धर्मीं त्या चि कनकभूषितें दरें वर्षे,
रामाभिषेकसमयीं जेंवि तासि च त्या महोत्सवीं हर्षें. ५३
न च वदवे, जें मिळतें जगदीश्वरकृष्णदर्शनीं यश, तें;
मग तदभिषिक्त धर्म न होइल कां वर्ण्य दर्शनीय शतें? ५४
शिशुंच्या स्पर्शोंनि म्हणे जो 'तव साम्या नयो गया' गाला,
दे, देववे सुपदफळ जें कोणा ही न योगयागाला; ५५
त्या पांचजन्यशंखें केला अभिषेक ज्या महाभागा
तत्तेज किति वदावें? रवि हि म्हणे कविसि, 'हे महामा गा.'
धर्म पदीं बैसवितां श्रीमत्कृष्ण अशेषदेवाद्यें,
बहु वाजविलीं दुंदुभिवीणापणवानकादि जयवाद्यें. ५७
दिधलीं युधिष्ठिरानें त्या विप्रांला असंख्य धनदानें;
वाटे, वांटाया निधि दिधले नव ही तयासि धनदानें. ५८
हृष्ट ब्राह्मण वदले, 'त्वां व्रत हें घेतलें न नव संतें;
पूर्वीं तसें पुढें ही सुखवावें जग, जसें वन वसंतें. ५९
तूं पावलासि, होमुनि बहु युद्धमखीं पर, स्वधर्मातें;
जें क्षत्रियें मिळविलें रण करुनि नव्हे परस्व धर्मा ! तें. ६०
या प्रळयांतुनि सानुज सुटलासि, नसे तुजा असा सुकृती,
ज्यांत नदीज हि खचला, जाले द्रोणादि ही असासु कृती.' ६१
विप्रांतें प्रकृतींतें धर्म म्हणे, 'धन्य धन्य मीं आजि !
गुण घेतां जरि, आख्या रीति असी बहु विलक्षणा माजी.
जालां प्रसन्न सर्व हि जरि, तरि मजवरि करा प्रसाद असा,
होती जी धृतराष्ट्रीं त्या वृत्तीतें चि वाढवीत असा. ६३

---

१. इंद्रास. २. अभिषेक करी. ३. ध्रुवाच्या. ४. पांजजन्य शंख. ५. उत्तम (ध्रुव) पदरूप फळ. ६. शुक्रास. ७. मोठें तेज. ८. सर्व देवांचा आदि अंशा. ९. कुबेरानें. १०. दुसऱ्याचें द्रव्य. ११. मृत-प्रेत. १२. माझा लौकिक.

ज्येष्ठपिता परदैवत पूजावें करुनि यत्न हें माझें;
याचें प्रिय चि करावें अर्पुनि होईल रत्नहेमा जें. ६४
याचें प्रिय शासन[1] तें माझें, याहूनि अन्य मीं नाहीं;
हृद्वृद्धिनें चि व्हावें तद्भजन करूनि धन्य मीनाहीं. ६५
करुनि ज्ञातिवध असा भ्यां न वहावा चि काय; परि साचें
याचें शुश्रूषण मज हित, लोहा जेंवि काय परिसाचें. ६६
सत्ता वाटे गेली रायास, तसी च वाटवा होती.
गजपुरजनपदजन[2] हो! जी पहिली धडक वाट वाहो ती. ६७
किंकर पांच हि आम्ही; राजा धृतराष्ट्र; हे धरा याची;
कथिली वेदाज्ञासी राजाज्ञा हे मनीं धरायाची.' ६८
सांगुनि सर्वांसि असें, त्या नीतिप्रीतिमतिसुधानिधिनें
भीमासि यौवराज्य प्राज्यस्नेहोत्सवें दिलें विधिनें. ६९
सर्वज्ञा, सकलसुकवितिलका, प्रबलाहिताद्रिच्या[3] भिदुरा,
षाड्गुण्य[4], मंत्रनिश्चयें[5] यांचा अधिकार धर्म दे विदुरा. ७०
आयव्यय[6] आणि कृताकृत यांच्या चिंतनीं परिज्ञानीं
संजय नियोजिला; कीं भ्रमवी श्री, न भ्रमे परि ज्ञानी. ७१
सैन्याधिकार नकुळा, ज्याच्या बाहूंसि शक्रपुर गातें;
त्या परचक्रवधाचा दिधला अधिकार शुभ्रतुरगातें[7]. ७२
देता जाला देवब्राह्मणकार्याधिकार धौम्यातें,
दे अधिकार स्वनिकट[8] सहदेवातें हि साधुसौम्यातें. ७३
कीं निधितें यक्षपसा[9] त्यातें करि तो चि सर्वदा जतन;

१. आज्ञा. २. हस्तिनापुरवासी व राष्ट्रवासी लोक. ३. प्रबळ शत्रुरूप पर्वताचें वज्र च अशा. ४. संधि ( तह ), विग्रह (शत्रुसैन्यात जाळपोळ लूट वगैरे करणें ) यान ( स्वारी ), आसन (अनुकूल कालाची प्रतिक्षा करित किल्याचा वगैरे आश्रय करून राहणें), द्वैध (बलवानाशीं तह किंवा अबलाशीं युद्ध) व [ आपल्याहून बलवानाचा ] आश्रय असे सहा राजोपाय. ५. सल्लामसलत ठरविणें. ६. जमाखर्च. ७. अर्जुनास. ८. स्वतांजवळ राहण्याचा अधिकार. ९. कुबेराप्रमाणें.

सहदेव वृत्तिमंत चि, जाणो, श्रीधर्मराज-तें वतन. ७४
ज्या ज्यासि योग्य जें जें, सांगे त्या त्यासि धर्म तें कार्य;
सांगे युयुत्सुसंजयविदुरांतें प्रार्थुनीं असें आर्य. ७५
'नित्य प्रातःकाळीं संध्याकाळीं पुसोनि आर्यातें,
बहु अप्रमत्त निरलस होऊनि करा प्रभूक्तकार्यातें.' ७६

---

## अध्याय सहावा.

धर्म ह्मणे, 'श्रीकृष्णा! वारावे त्वां चि ताप दासाचे,
त्वच्चरण हेतु देवा! मज पावायासि या पदा साचे. १
त्वां उद्धरिली अवनी नवनीरदसुंदरा! अगा धात्या!
किति हे कुंतीसंतति? तरली वानरचमू अगाधा त्या. २
यश, या संसारांतुनि उद्धरुनि पुन्हा हि पांडुसंतति, घे;
स्तविति बहु तुज चि नारद, वाल्मीकि, व्यास, मुख्य संत तिघे.
त्वां व्हाया निजकिंकरभाषित विश्वांत साच, हाकेला
व्यसनीं पावुनि धन्य प्रह्लाद जसा, तसा च हा केला. ४
असुनि हि, समर्थ नव्हते पद साधुनि द्यावया, सखे, दास,
जेंवि ध्रुवा, तसें तुजवांचुनि देवा! मला सखेदास. ५
जालासि सहाय जसा सुगळा हि, बिभीषणा हि असहाया;
साधुनि दिला महेंद्रा अमृतरस तसा चि कीर्तिरस हा यां. ६
सुकविरसज्ञा करिती जी तुझिया नित्य नवनव स्तुतिला,
बा! आढळे तुजविणें वर्णाया गोड नव न वस्तु तिला. ७
शतजन्म नमनांची मीं तुज वाहत असेन लाखोली,
वाटे व्यसन जसें हें मज, न च दावी असें नेला खोली.' ८

---

१. वतनदार. २. धृतराष्ट्रास. ३. मेघ. ४. समुद्रास. ५. आपल्या दासाचें वचन. ६. सुग्रीव वानराला. ७. युधिष्ठिरास—पंत. ८. चांगल्या कवींची जिह्वा. ९. कलिग्रस्त नलराजाला.

भगवान् स्मित करुनि म्हणे, 'साक्षात्त्ं धर्म सन्महित राया!
गाति कवि तुजें, जैसें रामाचें, कर्म जन्म हि तराया.' ९
प्रभुनें बहु हर्षविला धर्म, जसा तृषित नवसुधापानें;
याणें चि सुयश लुटिलें, जो मैथिल त्या हि न वसुधापानें. १०
मग नृप बंधूंसि म्हणे, "मेळविला विजय अनुभवावा हो!
चिंतुनि मांद्रीकुंतीसुयश, शिरःकमळ देनु भवा वाहो. ११
श्रमलां बहु मजकरितां, वनवासाज्ञातवासकष्ट महा,
कोणास ही न म्हणविल यापरि गुरु शनि हि कुज हि अष्टम 'हा!'
बहु भांडले तुम्हांसी शस्त्रास्त्रं धरुनि, करुनि हठ राजे;
ते म्यां काय वदावे, अधिकाधिक कष्ट दिवस अठरा जे?" १३
दुर्योधनदुःशासनदुर्मर्षणदुर्मुखालयें धर्में
भीमप्रमुखांसि दिली भोगाया सुरवरोचितें शर्में. १४
वसले त्या त्या बहुधनकनकनगनिभालयांत वासवसे,
प्रियसखधनंजयगृहीं युयुधानासह जगन्निवास वसे. १५
जो गुरुरत्नकनकमय तुळिला कविनीं सुमेरुशैलासीं,
त्या मुख्य प्रासादीं धर्म वसे, धनद जेंवि कैलासीं. १६
ज्येष्ठकनिष्ठपित्याला गांधारीला निवेदुनी राज्य
होय स्वस्थ युधिष्ठिर देउनि धौम्या कृपा धन प्राज्य. १७
वृद्धांधबाळ जन जो, नाही कोणी च सोयरा ज्याचा,
तो तोषविला धर्में; वाटे परमाप्त होय राज्याचा. १८
क्रमुनि सुखें रजनीतें प्रातःकृत्यासि करुनि साधु निघे,

१. मिथिल देशाच्या जनकराजानें. २. आपल्या पुत्राचा–दानवाचा–नाश करणार असे कीर्तिमान पुत्र माद्रीकुंतीला झाले म्हणून मत्सरानें दनु शंकराला आपले शिर अर्पण करो. ३. मगळ. ४. अष्टमस्थानीं असलेला. ५. 'हा!' न म्हणविल–**पंत.** ६. घरें. ७. इंद्रास योग्य अशी. ८. पुष्कळ धन असलेल्या व सवर्णमेरूप्रमाणे असणाऱ्या घरांत. ९. सात्यकीसह. १०. धृतराष्ट्र व विदुर यास. ११. अर्पण करून. १२. कृपाचार्याला. (मूळात असा उल्लेख नाही).

श्रीकृष्णदर्शनातें, भूसुरसत्कारसुकृत साधुनि, घे. १९
प्रभु रत्नकनकभूषितपर्यंकीं स्वस्थ बैसला होता,
जो वज्रपात विनतीं[1] जाणोनि म्हणे, 'खचोनि पां[2] हो तां.' २०
पीतपट प्रभु, जडिला[3] शुचिकनकीं शक्रनीळसा, साजे;
प्रभुचे *अर्धोन्मीलित डोळे, करिते कृतार्थ दासा जे. २१
वक्षस्थळा सुविपुळा शोभवि कौस्तुभ, जसा नभा सविता;
दृष्टांत होय, परि हा वरमणि; दिनमणि असा न भासविता[4].
यत्तेजें पाताळीं न, न भूलोकीं, न मलिन[5] नये नाकीं,
त्या प्रभुसि पुसे, "आली सुखनिद्रा तूज नलिननयना[6]! कीं?
जाली प्रसन्न मति कीं जीस परमलज्जिता पृथा होती?
यत्कृत[7] पालन पाहुनि, कवि म्हणती, 'माय परि वृथा हो! ती.'"
प्रार्थुनि बोलविला प्रभु, परि कांहीं न च वदे, न वा पाहे;
जाणों शिल्पिवरें हरिनीलमय[8] घडुनि मांडिला आहे! २५
धर्म म्हणे, 'जगदीशा! स्तब्ध विनिश्वास चित्रसें आंग
कां गमतें? त्वां धरिलें कां ऐसें ध्यान? मानदा! सांग. २६
ध्यातोसि काय? देवा! दिसतोसि निवातसदनदीपकसा[9].
आश्चर्य गमे, झाला निश्चळ वितरंग नदनदीप[10] कसा? २७
विश्वध्येया[11]! तुज, निज आत्मा ध्याता नसोनि, कां गमला?
जरि मीं असेन योग्य श्रवणास, ध्यानतत्व सांग मला.' २८
प्रार्थुनि अत्याश्चर्यें कर जोडुनि धर्म राहिला उगला;
मग दृष्टि हळु च उघडी प्रभुवर, जो ध्यानसुखभरें फुगला. २९

१. नम्र झालेल्यावर. २. पकारावयव पंक्तिपासूनि खचला म्हणजे तो चि तकार, म्हणजे 'वज्रपात' तो 'वज्रतात' होतो. ज्याच्या प्रसादें घातक ही परिपाळक होतो–**पंत.** ३. जडविलेला इंद्रनीलमणी जसा तसा. ४. प्रकाश देणारा. ५. कुनीति. ६. कमलनयना. ७. जिनें (श्रीकृष्णबुद्धीनें) केलेले. ८. इंद्रनीलमण्याचा. ९. वातरहित घरांतील दिव्यासारखा. (निश्चल). १०. समुद्र. ११. विश्वानें ध्यान करण्यास योग्य अशा! * 'दिसती' असा अध्याहार.

देव म्हणे, 'देवा ! ज्या देवनदी प्रसवली महाभागा,
श्रीरामसा चि जाला सर्वज्ञ वसिष्ठशिष्य जो बा ! गा; ३०
चापश्रुतिमार्गवरा भार्गवरामा भजोनि जो जाणे,
बाळपणीं च जयाच्या शस्त्रास्त्ररहस्य मानसीं बाणे; ३१
काशिपकन्यात्रय जो सर्वक्षत्रिययशासमेत हरी,
शरभरवें हरिसा बहु कांपे ज्याच्या धनुःस्वनें चि हरी; ३२
ज्या न तरे राम गुरु हि निकरें रण करुनि दिवस तेवीस,
गणि रेणुकेसि गंगेहूनि उणें फार त्या हि देवीसें; ३३
जाणें चतुराननसा जो भूतभविष्यवर्तमानातें,
सत्कविसमेत पावे बहु जो अरिहस्तिगर्त मानातें; ३४
शरतल्पीं प्रेमभरें ध्याता येऊनि शरण तो मातें,
अनुसरलों होतों मीं त्यातें, पाथोधि जेंवि सोमातें. ३५
देवद्विजगुरुभक्त, व्रतियतिपति अतिमति, प्रथित लोकीं,
सत्यप्रतिज्ञ पंडितवर रामा स्वासुहृनि दयित तो कीं. ३६
गेलों मनेंकरुनि मीं धर्मा ! भीष्माकडे, कथूं काय ?
हाय ! प्रेम न वदवे; वत्स चि तो साधुराय, मीं गाय. ३७
भीष्मत्यक्त अशोभित राज्य, जसें पदकहेम हीरा ज्या
टाकी; गतेंदुरजनी गतभीष्मा तसि च हे मही राज्या ! ३८
त्या ज्ञानदीपकाला लागो त्वच्छ्रोत्रवृत्ति हे वाती,
सर्वार्थदर्शिनी तद्रुचि रविरुचिसी करील हेवा ती. ३९
नमुनि पुसायाचें तें त्या भीष्मा सुज्ञनायका पूस;

१. भीष्मानीं वसिष्ठाजवळ वेदाध्ययन केले. २. धनुर्वेदविद्या जाणणारांत श्रेष्ठ अशा. ३. धनुष्याच्या टणत्कारानें. ४. इंद्र. ५. भवानीस—पंत. ६. शत्रुरूप हत्तीस खळग्याप्रमाणें असणारा. ७. समुद्र. ८. चंद्रास. ९. व्रतनिष्ठ वैराग्यसंपन्न (इंद्रियनिग्रही) लोकांचा अधिपति. १०. प्रिय. ११. सुवर्णपदक. १२. चंद्रास्त झालेली रात्र. १३. तू भीष्माकडून ज्ञानाचे श्रवण कर, असा भावार्थ. १४. सर्व पदार्थ (पक्षीं) चतुर्विध पुरुषार्थ दाखविणारी. १५. त्या ज्ञानदीपाची प्रभा.

स्वीकारिति लघुस हि गुरु; गौरी मिरवी न काय कापूस?[1] ४०
ज्ञानें अस्ता जातिल होतां तो भीष्मभानु अस्तमित;
दिसतो तसा नव्हे; बा! तेजस्वी सूर्य काय हस्तमित?[2]' ४१
तथ्य प्रभूक्त परिसुनि धर्माचा गहिवरें गळा दाटे,
मागुनि कुठार आजिरज[3] निर्जरतरुराज[4] खंडिला वाटे. ४२
धर्म म्हणे, 'कथिसि खरें[5] स्तवुनि कुरुपितामहा प्रभावास,
रविसा चि आमुचा तो होय[6] गुरु पिता महाप्रभावास. ४३
वदले महानुभाव ब्राह्मण देवव्रतप्रभावातें;
सर्वज्ञता प्रकटिली त्याची त्वां, जसि शिखिप्रभा वातें. ४४
ने त्याप्रति मातें, जरि भरणार करुनि अनुग्रह रित्यातें;
जो शरभनीत[7] गज, बहु मानिल होउनि अनुग्र हरि त्यातें. ४५
कृष्णा! तुज करुनि पुढें, आम्हीं देवव्रता महाकविला
नमुनि ज्ञान पुसावें, कीं प्रभुनें सदनुगत[8] न हाकविला. ४६
जाणार उत्तरायण होतां चि त्यजुनि देह हा आर्य,
यास्तव या स्तवनार्हा दर्शन दे त्यजुनि सर्व ही कार्य. ४७
ताप हरिल तव दर्शन, सुखउनि बहु मानसा, धुनीज्याचा;[9]
कीं तो तूं, सर्वस्वें कीजे बहुमान साधुनीं ज्याचा. ४८
अक्षर[10] तूं, क्षर ही तूं, ब्रह्ममय निधि प्रसिद्ध बा धात्या!
जो पाहे तुज कृष्णा! मायाकृत्या[11] करी न बाधा त्या.' ४९
ज्या प्रिय हें कीं, स्वपदा, सर्व धरुनि सत्पथास, यो जीव,
तो प्रभु सात्यकिस म्हणे, 'सत्वर माज्या रथास योजीव.[12]' ५०
सात्यकि सज्ज कराया श्रीशौरिरथास दारुकास वदे,

१. हरितालिकेला वगैरे कापसाच्या मुतपुतळ्या वाहतात हे प्रसिद्ध आहे. २. हाताएवढा. ३. अगणातील. ४. कल्पवृक्ष. ५. खरें प्रभावासि कथिसी–**पंत.** ६. रविसा चि महा-प्रभा-वास होय–**पंत.** ७. शरभानें नेलेला. ८. थोरामागून गेला अर्थी, प्रभुनें प्रभुदर्शनास नेला याचक–**पंत.** ९. भीष्माचा. १०. अविनाशी. ११. मायारूपी राक्षसी. १२. सिद्ध कर.

तत्काळ सिद्ध तो करि हरिहरि, जैसा सदा रुका सवदे. ५१
जें स्वबळा होउनि दव, करुनि परां दारुकक्ष, तारी, तें
रथरत्न सज्जुनि कळवी साधूंच्या दारुक क्षतारीतें. ५२

## अध्याय सातवा.

श्रीव्यास श्रीनारद, मुनि देवस्थान, वात्स्यनाम मुनी,
अश्मक, सुमंतु, जैमिनि, व्हावे पतितें हि धन्य ज्यां नमुनी; १
मार्कंडेय, विभांडक, धौम्य हि, शांडिल्य, भास्करी, पैल,
मैत्रेय, देवरात, स्मरणें ज्यांच्या जळे दुरितशैल; २
लोमश, हारीत, असित, मैत्रेय, वसिष्ठ, गाधिज, च्यवन,
श्रीदत्त, शुक्र, गुरु जो करि नहुषमहाभयार्तशच्यवन; ३
कुरु, तुंबुरु, वाल्मीकि, श्रीकपिल, सनत्कुमार, तृणबिंदु
मौद्गल्य, राम भार्गव जो शिष्यचकोरमंडळीं इंदु; ४
संवर्त, पिप्पलाद, क्रतु, पुलह, पुलस्त्य, वायु, कच, दक्ष,
कश्यप, काश्य, पराशर जेणें कुणपाश जाळिले लक्ष. ५
मांडव्य, धौम्र, गौतम, गालव, कृष्णानुभौतिक, मरीची,
ऋषि अंगिरा, उलूक, श्रीपूरण मुनि विभूति च हरीची. ६

१. कृष्णाचे घोडे. २. धन-पंत. ३. काष्ठ व तण. ४. नाहीसे केले आहेत शत्रु ज्यानें त्या श्रीकृष्णास. ५. पापपर्वत. ६. 'मैत्रेय' या नावाची द्विरुक्ति का? व्यासभारताच्या प्रचलित मुद्रित प्रतींपैकी कोणत्या हि एका प्रतीला अनुसरून पंतांची नावें नाहींत. 'कृष्ण' हें ऋषिनाम पंतांनी वगळलें आहे. 'कौशिक' 'आत्रेय' 'बृहस्पति' यांऐवजी 'गाधिज' 'श्रीदत्त' 'गुरु' अशा प्रकारचा फरक पंतांनी केला आहे. ७. नहुषाच्या भीतीनें त्रासलेल्या इंद्राणीचें रक्षण. (उद्योग० अ० २।२४ ते ६५ पद्य). ८. शवभक्षक, राक्षस.

ऐसे महानुभाव ब्रह्मज्ञश्रेष्ठ वर्णिले धन्य
भीष्मासमीप होते, सूतादि बहुत अनुक्त[1] ही अन्य. ७
श्रीभीष्म श्रीकृष्णप्रभुचा स्तव आदरें करी, राज्या!
केसरशिखा[2] चि मानीं, रुतल्या खरशरशिखा[3] शरीरा ज्या. ८
'स्तवराज' असें म्हणती ज्या, जें भगवन्मनोवशीकरण;
प्रेमा[4] भीष्मा 'भगवत्स्तवन'[5] म्हण, जेंवि राम 'शीक रण.' ९
होय प्रसन्न देव स्तवराजें: त्यासि भेटला योगें[6].
दिव्यज्ञानामृत दे जोडाया कर भवें[7] महारोगें. १०
होते समीप योगी ज्ञानी श्रीव्यासनारदांसम जे,
त्या सर्वांस प्रभुनें भीष्मीं केला प्रसाद तो समजे. ११
त्या अतुळचमत्कारें वाल्मीकिपराशरादि गहिवरले,
प्रेमाश्रुबिंदु इंदुस्तुत[8] त्यांचे हरिति ताप महिवरले. १२
ते बोलिले, 'उघडिली हे स्तुति पुरुषार्थसुखनि[9] शांतनवें,
हें स्तवनसें न देइल चिंतामणिचें हि सुख निशांत[10] नवें. १३
विश्वांत जह्नुकन्या धन्या प्रसवुनि तुला चि शांतनवा!
जाला न, नसे संप्रति, होइल न त्वत्समान शांत नवा.' १४
करुनि प्रसाद भीष्मीं, योगेश्वर[11] शक्रसुनुच्या[12] गेहीं,
शयनस्थानीं शिरला जाउनि जों काय आपुल्या देहीं, १५
तों प्रार्थुनि प्रबोधित[13] पार्थें प्रभु वृष्णिपाळ हा केला,
उठवी प्रसूसि[14] जैसा देउनि पानार्थि[15] बाळ हांकेला. १६
मग वैदर्भीवल्लभ[16] बसला सात्यकिसमेत निजयानीं,
स्वर्णस्यंदन एक चि भूषविला धर्मराजविजयानीं. १७

१. न सांगितलेले. २. परागाचीं टोकें. ३. तीक्ष्ण बाणाचीं अग्रें. ४. कर्ता प्रेमा, रामना—**पंत.** ५. कर्म भगवत्स्तवन, रणमें—**पंत.** ६. योगमार्गानें. ७. संसाररूपी. ८. चंद्रानें स्तविलेलें. (अति थंड). ९. उत्तम खाण. १०. घर. ११. श्रीकृष्ण. १२. अर्जुनाच्या? १३. जागृत. १४. आश्रम. १५. स्तनपान इच्छिणारा. १६. रुक्मिणीपति.

एकरथीं तेजस्वी भीम बसे [1]संयम, तो जना सत्य
भासे भगवान् भव्यप्रभ साक्षात् भानुमान् [2]सनासत्य. १८
नगराकाररथांवरि बसले संजय, युयुत्सु, कृप, सा हे
स्यंदन शीघ्र निघाले, ज्यांच्या तेजा न शत्रुनृप साहे. १९
धर्मासि कुरुक्षेत्रीं [3]ह्रद दाखउनि, प्रताप रामाचा
कथिला सविस्तर पथीं श्रीकृष्णें क्षत्रकुळविरामाचा. २०
परम भयंकर युद्धस्थानें तीं तीं मनांत वाणींत
आणीत प्रेमभरें, [4]न च येवूं देत विकृति घाणींत, २१
गेले ते, तो जेथें ओघवतीच्या तटीं च शरतल्पीं,
पडला होता भीष्म प्रभु जेंवि रथावरूनि रवि [5]केल्पीं. २२
सर्व श्रीकृष्णादि स्वस्वशुभस्यंदनांसि सोडून,
प्रथम सविनय व्यासप्रमुखमुनिजनांसि हस्त जोडून, २३
करुनि प्रदक्षिण, नमुनि भीष्मा, भवते उगे चि ते बसले;
धर्ममनीं, तेंवि नदीसुतदेहीं शरसहस्र तें न सले. २४
त्या शरतल्पीं भीष्म [6]क्षीणस्नेहप्रदीपसा वाटे,
किंचिद्दीनमना [7]प्रभु होय, गमे गहिवरें गळा दाटे. २५
मग हळुहळु भीष्मातें श्रीकृष्ण म्हणे, "प्रभो! तव ज्ञानें,
आहेत कीं प्रसन्न, मोह निरसिला जिहीं [8]अवज्ञानें? २६
बा! [9]झाली नाहीं कीं राज्या! भरताचिया कुळाधारा!
या [10]खरशराभिघातें, वातें बहु जेंवि [11]आकुळा [12]धारा? २७
सांग महाराज्या! शरशयनीं तव गात्र हें कसें दुखतें?

---

१. नकुलसहदेवासह. २. अश्विनीकुमारासह. ३. डोह. ४. रणभूमीवरील शवरक्तमांसाच्या घाणीची किळस न मानता. ५. कल्पांतीं–**पंत.** ६. तेल सपलेल्या दिव्यासारखा. ७. भक्तवत्सल कृष्ण–**पंत.** ८. अवज्ञेनें–**पंत.** ९. 'तव तनु' असा अध्याहार करावा. १०. तीक्ष्ण बाणांच्या टोंचण्यानें. ११. पीडित, वांकडी, कमजोर. १२. पर्जन्यधारा.

यांतुनि एकें चि इतर होता तत्काळ बा! परासु खतें[1]. २८
तूं छंदमृत्यु[2] शंतनुवरदानें चि प्रभो! महाभागा!
हें छंदमृत्युकारण पितृतोषण मज हि न घडलें बा! गा! २९
सूक्ष्म हि शल्य सुदुःसह, तूं तों शरपंजरांत खिळिलास,
काळें वरवज्रकवचसंवृततनु[3] म्हणुनि बा! न गिळिलास. ३०
धावा तुहिननगाला[4] निववाया मेळवूनि गारा ज्या,
त्या जेंवि, तुज कथाव्या भूतोद्भवलयकथा[5] अगा राज्या! ३१
कीं तूं उपदेशाया देवांस हि योग्य बा! जसा जीव[6],
या सुयशें लोकांतें, देउनि चंद्रास लाज, सांजीव. ३२
सर्वज्ञत्व वसे तव हृदयीं वा! करतळीं जसें बंदर,
न[7] दर[8] स्पर्शों दे, तुजवरि विद्येचा सदा वसे पदर[9]. ३३
हा[10] स्त्रीसहस्रपरिवृत अतिरम्य अरोग काय[11] होता; तें
दिसतें इतरें[12] शंतनुयश मेळविजेल काय हो! तातें? ३४
सत्यप्रतिपाळक तूं, नांदे त्वन्मानसीं च भूतदया;
जालासि धन्य; कीं, जो सत्पति चिंती सदैव भू तद्या[13]. ३५
आम्हीं लोकीं पेशा शुद्धा सुगुणा न आयकों देहा,
विपुलें सुयशःप्रसरें[14] या ब्रह्मांडांत काय कोंदे हा. ३६
एकरथें जिंकाया लोकत्रय तूं समर्थ, मीं जाणें;
गाणें, जेंवि शिवाच्या, देवींला शिकविलें तुज्या बाणें. ३७

१. क्षते, जखमेनें. २. इच्छामरणी. ३. उत्कृष्ट व वज्राप्रमाणे अभेद्य अशा कवचानें झाकलें आहे शरीर ज्याचें असा. ४. हिमाचलास. ५. जीवांच्या (सृष्टीच्या) उत्पत्तीच्या व संहाराच्या कथा. ६. बृहस्पति. ७. शोभाव–**पंत.** ८. बार. ९. भय. १०. पाजताना स्त्रिया मुलाला पदरानें झांकतात या जनव्यवहारास उद्देशून 'पदर' पदाची योजना करून, विद्या व भीष्म यांचा मातृपुत्रसंबंध ध्वनित केला आहे. ११. भीष्माचा देह. १२. भीष्माच्या बापाला त्याचेसंबंधीं जो कीर्तिलाभ झाला तो इतर कोणत्या हि बापाला आपल्या पुत्रापासून होणें नाहीं, असा भावार्थ. १३. अयः शुभावहो विधिरित्यमरः–**पंत.** त्याच्या भाग्यास. १४. सत्कीर्तीच्या प्रसारानें.

तूं शक्त स्वतपें या विश्वा विश्वेशसा चि निर्माया,
मग कां अत्युत्तमनिजलोकासि न निर्मिशील निर्माया!? ३८
धर्मज्ञानार्णव तूं होतासि जरि हि लहान शांतनवा!
साधु म्हणति, 'शांत प्रभुसत्तम पहिला च हा, न शांत नवा.'
यास्तव अमृतकरातें, धर्माचा हरुनि ताप, लाजीव.
सर्व तुम्हां साधूंच्या बोधें निवतो चि तापला जीव. ४०
ज्ञातिविनाशें जाल्या याच्या शोकासि तूं शमिव राज्या!
आहेत युक्ति विदिता तुज त्या, दत्तादिका शमिवरा ज्या. ४१
कुरुकुळगगनघना! या पार्थमयूरें निवोनि हर्षावें,
त्वां वर्णाश्रमधर्मज्ञानामृत बा! यथेष्ट वर्षावें." ४२
भीष्म म्हणे, 'दास तुवां दर्शन देवूनि धन्य हा केला,
त्या पावला गजाच्या तुजवांचुनि कोण अन्य हाकेला? ४३
व्यापिलि असे शिरें द्यौः, क्षिति चरणांहीं, दिशा तव भुजाहीं.
दिसति सनातनरूपीं शक्रादिक दैवतें मज तुज्या हीं. ४४
हें सुकविमंडळींचें दिव्य सदा नव्य भव्य माहेरः
आहे रम्य तमभ्रमहर, भरलें रूप आंतबाहेर.' ४५
देव म्हणे, 'माजा तूं भीष्मा! ऋजु शांत भक्त, यास्तव न
त्वदधिक किमपि, असें हा हरि हरिण चि, होय गीत या स्तवन.
शुचि योग्य तूं म्हणुनि हें म्यां दाखविलें स्वरूप तुज राया!
मीं भक्तिवश न चुकलों त्या कुब्जेच्या हि वपुसि उजराया.४७
अठ्ठावीस क्रमिले, क्रमिसिल हे राहिले दिवस तीस,
मग निजगतीस वरिसिल तूं त्या पहिल्या, जसा शिव सतीस.
तूं गेल्यावरि लोकीं नाशातें पावतील सुज्ञानें,

१. मोहरहिता. २. समर्थश्रेष्ठ. ३. चद्रास. ४. झालेल्या. ५. योगिश्रेष्ठास. ६. मेरुकुलरूप आकाशांतील मेघा! ७. स्वर्ग. ८. पृथ्वी. ९. सनातन परमेश्वराचे रूपाचे ठायीं. १०. अज्ञान व भ्रांति नाहींसे करणारे. ११. सरळ. १२. भक्तिने वश होऊन दर्शन दिलें-**पंत.** १३. आपल्या [मूळच्या अष्टवसूंच्या] स्थितीस.

धर्मासि करावा त्वां यास्तव धर्मोपदेश सुज्ञानें. ४९
हा मोहीं न बुडो, दे बोधसुभुज सुज्ञनायका! यास.
आले आहेत मुनि हि बहु धर्मरहस्य आयकायास.' ५०
कर जोडुनि भीष्म म्हणे, "कृष्णा! नारायणा! महादेवा!
बहु हर्षित रोमांचित जालों या त्वद्वचें पहा, देवा! ५१
त्रिभुवनगुरो! तुजपुढें म्यां या धर्मासि काय शिकवावें?
वद सदया! अमृतघनें कीं जलदें प्राज्य पीक पिकवावें? ५२
स्वोचित सुकार्य कथिसी करुनि दया बा दिवाकरा! याला,
परि तव समक्ष अक्षम लक्षमतें हा दिवा करायाला. ५३
स्नेहें शिशुला देइल मातेहुनि अधिक काय सुख दायी?
चंद्रापुढें चकोरा ग्रह होइल कोण अन्य सुखदायी? ५४
जगदुत्पादक विधि तव शिष्य, तुझा वेदराशि निश्वास,
विश्वास ज्ञानद तूं, साधूंचा त्वत्पदीं च विश्वास. ५५
धर्मासि तुजपुढें मी उपदेश करूं विभो! कसा काय?
बा! पद्मपत्रनेत्रा! पडलासे विकळ हा असा काय. ५६
कथमपि वृद्ध सहातो देवा! तापापहा! कसाल्याला,
शललें शल्य, तसा हा सायक बापा! पहा कसा ल्याला. ५७
न तसी अतसी-कुसुम-श्यामा! मनि, कीं तनूंत हाडास
भेदुनि शिरले शर हे म्हणविति अहिचे जसे चि 'हा!' डास.
स्वल्पीं हि भाषणीं मन रसनेंत भ्रमुनि न शिरवि; प्रतिभा
गेली मातें सोडुनि, जाती ग्रहणांत जसि रविप्रति भा. ५९
भू, गगन, दिशा, विदिशीं नेणें मीं व्याकुळ अशा देहें:

१. ज्ञानरूप बळकट हात. २. दया! (श्रीकृष्णा!) ३. लाखों लोकांच्या मनानें ४. वेदचतुष्टय. ५. कसा तरी. ६. दुःखनिवारका! ७. परिश्रमास. (वेदनास). ८. साळपिसें. ९. सायाळ—पंत. साळई पक्षी. १०. धारण करिता झाला. ११. जवसाच्या फुलांप्रमाणें श्यामवर्ण ज्याचा अशा (कृष्णा)! १२. स्फूर्ति. १३. तेज. १४. आग्नेयादि उपदिशा.

'मा वद[1] किमपि' असें वरदान मला बा! महायशा! दे हें. ६०
वदतां चि त्वत्तेजें वाक्पति[2] ही तुजपुढें गडबडेल;
स्तंभ चि होइल किंवा भलतें चि प्रभुवरा! बडबडेल. ६१
मधुसूदना! मुकुंदा! त्वद्ध्यानबळें चि या जडा[3] वाहें.
केवळ अशक्य आतां, कथिसी 'व्यवहार हा घडावा' हें. ६२
सांग स्वयें चि देवा! धर्मासि असेल काय जें विहित.
मजपासिं तूं कराया बहु दाईहूनि माय जेंवि हित. ६३
श्रीगुरुसमक्ष धर्मव्याख्या[4] शिष्यास तों नसे उचिता;
स्मरण चि घडो, असे जों दक्षिण रवि, देह तों न सेउ चिता."
श्रीकृष्ण म्हणे, 'भीष्मा[5]! राज्या कौरवधुरंधरा! उक्त[6]
हें सर्वज्ञास तुला अतुलाखिलसद्गुणाकरा[7] युक्त. ६५
शुचि पुरुषरत्न सादर गुरुगेहीं जें विशंक राबेल,
बहुमत तदुक्त सर्वां, सर्वज्ञा! जेंवि शंकरा बेल. ६६
देतों प्रसन्न होउनि, घे वर शरघातवेदनाशमना;
तव[8] बोधनाश मोह न, जगाच्या जेंवि वेदनाश, मना. ६७
ग्लानि स्वल्पा हि नसो सन्मणिदोषीं तसी तुज्या देहीं;
मूर्छा न शिरो हृदयीं, अ-सती स्त्री जेंवि साधुच्या गेहीं. ६८
गंगांककल्प[9] हो शरतल्प तुला सुकृतसिंधुयादा[10]! हें,
तूं सोडावा शरजें, गरजें हर जेंवि, तेंवि या दाहें[11]. ६९
लागेल न क्षुधा तुज, न तृषा ही भारता! बुधाधारा!
वाणी निघेल वदनांतुनि, चंद्रांतुनि जसी सुधाधारा. ७०
कुंठित बुद्धि न होइल, जें जें त्वां चिंतिजेल सत्वरतें,

१. काहीं हि बोलूं नकोस. २. बृहस्पति ३. जड शरीरास. ४. धर्मसंबंधी विवरण. ५. श्रप्रा! ६. बोलणें. ७. अनुपम अशा सर्व गुणांची खाण च अशा. ८. जेंवि जगाच्या मना वेदनाश [तेंवि] तव मना बोधनाश (शुद्धीचा नाश वेशुद्धि) न मोह. ९. गंगेच्या मांडीप्रमाणें. १०. पुण्यस्वरूप समुद्रांतील जलचरा! ११. बाणापासून होणाऱ्या दाहानें.

स्वरगा[1] श्रितकामितसें[2] समर्थी सर्व स्फुरेल सत्वर तें. ७१
तूं ज्ञानचक्षु उघडुनि ईश्वरसा सर्व ही पहासील,
स्वाधीनमरण यावद्वांछा[3] तावत् सुखें राहसील.' ७२
भीष्मीं प्रसाद होतां द्विज जयजयकार करिति हर्षोनि,
अमृतघनें वांचविला जाणों नग खगनिवास[4] वर्षोनि. ७३
प्रभु, भीष्म, धर्म यांवरि केली बहु पुष्पवृष्टि अजरानीं[5]:
भरिलें स्तोत्रचतुर्विधवाद्यांच्या[6] सर्व गगन गजरानीं. ७४
गंधर्वांच्या[7] वृंदा न उरे दे देहभान यशगात्या,
नाचत होत्या होउनि गानास वराप्सरा हि वशगा त्या. ७५
तें धन्य आपणाला आपण मानूनि घे. वदे वसुधा,
'काय स्वर्ग मजपुढें? सोडुनि बसेल[8] घेवदेव सुधा.' ७६
वाहुनि सुगंध शीतळ मंथर[9] जीवांसि शर्म दे वायु;
वाटे कवींस विफळ, न घडतां श्रीभीष्मधर्म, देवायु[10]. ७७
गमला तेजस्वित्वें भीष्मस्तव तो[11] स्व अस्तव नवासा,
जाणों जावूं लागे रवि सोडुनि लोक अस्तवनवासा. ७८
दिवसविरामीं[12] ते मुनि म्हणति श्रीकृष्णभीष्मधर्मांतें,
'येतों सकाळ धर्मश्रवणें व्हाया सुपात्र शमांतें.' ७९
ब्रह्मण्य देव, पांडव, सात्यकि, संजय, युयुत्सु बोळविती[13]

१. कल्पवृक्षाला. २. आश्रिताचें इच्छिलें जसें तसें. ३. जोंपर्यंत. ४. पक्ष्यांचें राहण्याचें स्थान असा वृक्ष. ५. देवानीं. ६. स्तुति व चतुर्विध (कातड्यानें मढविलेलीं, तारा लाविलेलीं, धातूचीं व तोंडानें वाजविण्याचीं) वाद्यें ह्यांच्या. ७ लुब्ध. ८. उद्विग्न होऊन बसेल. ९. मंद. १०. भीष्माअसा धर्म न घडतां देवांचें बहु ही आयु व्यर्थ, कीं ज्या धर्मे विश्व धन्य जालें–**पंत.** ११. [रविला] तो भीष्मस्तव तेजस्वित्वें नवासा (नवीन च असा) [व] अस्तव (स्तव नाहीं ज्याचा असा–स्तुति करण्यास अशक्य असा) स्व (आत्मा–आत्मीय मूर्ति) गमला; [म्हणून च] जाणों रवि [हा] लोक सोडुनि अस्तवनवासा जावूं लागे. (भीष्मस्तव चालूं असतां सूर्यास्त झाला, हा भाव). १२. दिवस मावळावयाचे वेळीं. १३. निरोप देतां.

त्या सुमुनींतः आर्धी मस्तक तत्पदरजांत लोळविती. ८०
विनयें पुसोनि उजवें घालुनियां त्या सुरापगातनया,
आपण हि निघे पांडवसह, त्याच्या तो दुराप गात नया. ८१
जाउनि पुरांत निजले ते पुरुषप्रवर आपुल्या सद्मीं,
येऊनि सत्यलोकाहूनि, जसे हंस मानसी पद्मीं. ८२
जपविप्रपूजनादि प्रभुवर उरकूनि घे प्रथमयामीं,
रथ आणवी, म्हणे जो 'शिल्पाचा शिकविता पथ मया मी.'
भीष्मयशें धवळाया जग आघ विशुद्धसत्वराशि कवी
प्रेषुनियां सात्यकितें त्वरिता ही नृपतिस त्वरा शिकवी. ८४
निघतां धर्म नृप म्हणे, "विजया! बहु आजि हा जन कशाला!
साधूचितप्रवेशा ती रणभू जेंवि बा! जनकशाला. ८५
कथिल कुलकमलरवि कविवर, परमरहस्य आजि जें शुचि, तें;
उचितें जनें चि सादर सेवावें वाढवूनियां रुचितें. ८६
बहु हित व्हाया तुमची शुद्ध मनोवृत्ति आजपासून
म्हणु कर्णांतें, कुळजा जेंवि म्हणे 'करुनि आ जपा' सून."८७
कथिलें करुनि, किरीटी 'सिद्ध स्यंदन असे' असें कळवी;
धर्म निघे सात्यकिसह बसुनि रथीं, प्रभु हि भानुभा मळवी.
मानससरोवराप्रति हंस जसे पावले ऋषि तसे च,
गांगेयाप्रति पांडव सजनार्दन धावले तृषितसे च. ८९
नमुनि मुनिजना, वेष्टुनि बसले उगले चि पांडुसुत राज्या,
तो हि प्रभु, होते भववैतरणी चिंतितां चि सुतरा ज्या. ९०

१. श्रीकृष्ण. २. दुर्लभ प्रभु-**पंत.** ३. मानससरोवरांतील कमलात. ४. पहिल्या प्रहरात. ५. मयासुरास. ६. सज्जनास योग्य आहे प्रवेश जीत अशी. ७. जनकराजाची सभा. ८. भरतकुलरूप कमलाला [विकसित करणारा] सूर्य. ९. कुलजा मन गुरूपदेशामृतपानीं-**पंत.** भीष्मोपदेश लक्षपूर्वक ऐका, असा भाव. १०. सूर्यकांति. ११. भीष्मास-**पंत.** १२. ज्या चिंतितां भववैतरणी सुतरा होते तो ही प्रभु तसा चि बसला-**पंत.** * अघसबधी=पापी.

नारद म्हणे, 'पुसा हो! भीष्म प्रभु सर्व धर्म बोधील.
रविमार्गें तम नाशुनि कोण ब्रह्मांडगर्भ शोधील?' ९१

अन्योन्य 'पूस' म्हणतां सर्वांच्या ही मुखास आला न;
जाणों ते गज चि, तयां जालें गुरुभीष्मतेज आलान. ९२

धर्म म्हणे, 'मीं भ्यालों तूं चि विभो! भरतनायका पूसः
वह्निपुढें, वायुपुढें धृति धरुनि टिकेल काय कापूस? ९३

भीष्मासि हर्षवाया, वदवाया तूं चि एक बा! विंदु;
सर्व ग्रहांत एक चि आल्हादप्रद पयोधिला इंदु.' ९४

जेंवि हरें, केला ज्या योगींद्रें विमद मत्त मार जनीं,
त्या प्रभु म्हणे, 'सुखें त्वां क्रमिली की राजसत्तमा! रजनी?

ज्ञान प्रकाशलें कीं हृदयांत नभोंगणांत जेंवि रवी,
वदनां वरा सभेंत श्रोत्यांच्या संशयासि जें विरवी? ९६

स्वस्थ असासि कीं राज्या! ग्लानि नसे कीं तुज्या मनीं काहीं?
शल्यानीं न दिला कीं मोह परांच्या जसा अनीकाहीं? ९७

आर्या! महाव्रना! तूं विकळ न जालासि वेदनाहीं कीं?
म्यां प्रियसख गोप तसे मोकलिले त्वां हि वेद नाहीं कीं?' ९८

भीष्म म्हणे, "गोविंदा! गेल्या सोडूनि वेदना मातें
जालों स्वस्थः खरें जें 'अमृत' तुज्या म्हणति वेद नामा तें.

कश्मळजडत्व गेलें, आलें सर्वज्ञपण तुज्या च वरें;
करुनि प्रमाद लाविशि रंकावरि ही उडावया चवरें. १००

तुजवांचुनि कोण असे अन्य त्रिजगीं गुरुत्वसुपदेश?
करुनि दया, न करिसि कां या धर्मासि स्वयें चि उपदेश?"

कृष्ण म्हणे, "ब्रह्मांडीं माझी तों कीर्ति कोंदली आहे.

१. मारवळदंड २. भीष्मास. ३. वक्ता–**पंत.** ४. मदन. ५. श्रेष्ठ अशा. ६. नाहींमें करी. ७. परानींकांहीं न दिला तसा–**पंत.** ८. मोहानें आलेलें जडत्व. ९. गुरुत्वाच्या उत्तम पदाचा स्वामी.

धावे[1] तुझ्या हि सुयशें बसले सत्कर्ण करुनि जे 'आ' हे. १०२
'शीतांशु[2] चंद्र' म्हणतां, विस्मय जैसा जनीं नसे काहीं,
तैसा चि यशस्वित्वें विस्मय माजा हि भारता! नाहीं. १०३
क्षीरधिला, चंद्राला, त्या ही तुहिनाभिधा[3] अंगा धवळें
स्वयशें लुप्त करावें, बोधुनि धर्मा तुवां अगाधबळें. १०४
होइल आकल्प[4] तुझ्या बोधासि, जसा चि मान वेदास;
तुज मानवेल कविजन, मज माजा जेंवि मानवे दास. १०५
तुज सुमति दिली, द्याया वाढउनि तुला यशा असीमा गा!
हे जसि अर्थिजनांतें, न म्हणेल चि सुरभि ही असी 'मागा.'
तूं वृद्ध शुद्ध सद्गुण उपदेश करावयासि योग्य नृपा!
सांग प्रसन्न होउनि, जेंवि पिता हित कथी करुनि कृपा." १०७
भीष्म म्हणे, "जरि म्हणसी 'निजकार्य करावयासि योजीन.'
तरि हा तव प्रसादें वेणुध्रुवसुपदवीस[5] यो जीन. १०८
देवद्विजगुरुभक्त स्वच्छाखिलगुणसमुद्र हा धर्म,
जे काय पुसायाचें, ते ते मजला पुसो स्वयें धर्म." १०९
श्रीकांत म्हणे, 'राज्या! बहु लोकांचें करुनियां कदन,
अपवादास्तव लाजे धर्म तुला दाखवावया वदन. ११०
जाणोनि पाप, नेत्रें झाकुनि प्याले यथेष्ट हाला[6] जे,
ते शिष्टाचारातें लाजति जैसे, तसा चि हा लाजे. १११
केले अपकार रणीं अनुचित तुझिया हि या वयाला जे,
गुरुभक्त मान्य मारुनि, धर्म तुजसमोर यावया लाजे.' ११२

१. तृप्त व्हावें. २. 'चंद्राचे किरण थंड आहेत.' ३. 'हिम' नाव असलेल्या पर्वताम. ४. प्रलयकालापर्यंत. ५. मुरली व ध्रुव ह्याच्या उत्तम पदवीस. (तुझ्या प्रसादानें मुरली सुस्वर काढू लागली व तुझ्या शंखाचा ध्रुवाच्या गालास स्पर्श झाल्यामुळें तो भगवत्स्तुति करण्यास समर्थ झाला, तसा मी हि तुझ्या कृपेनें धर्मबोधाचें कार्य करीन, असा भाव). ६. वृद्ध. ७. दारू.

भीष्म म्हणे, " विप्रांचा दानतपोध्ययन मुख्य हा धर्म,
यावज्जीवानुष्ठित[1] देतो बहु इहपरत्र[2] यश, शर्म. ११३

मुख्य तसा चि क्षत्रियधर्म हि युद्धांत देहपातन हा,
म्हणुनि म्हणावें वत्सा! त्वां, बहु मानूनि लोकघात, न ' हा!'

हो गुरु, पिता, पितामह, पुत्र, सखा, बंधु, सोयरा, ज्याचा
व्यवहार[3] दुष्ट तद्वध, मुख्य चि हा धर्म होय राज्याचा. ११५

शांतासि[4] रक्तगंधें जो क्षत्रिय मत्त, मानला; जावें
भय, यावें जवळ तुवां, वत्सा! कुरुसत्तमा! न लाजावें."११६

अभयानुग्रहवचनश्रवण करुनि धर्म जाय त्याजवळी;
प्रह्लाद नृसिंहाचे, भीष्माचे चरण तो तसा कवळी. ११७

हुंगुनि मस्तक, हस्तें कुरवाळी तो पितामह त्वरितें;
पाडी अमृतकराचें, निरवधि सुख ओपिता, महत्व रितें. ११८

बसउनि निकट म्हणे, "बा! हित पुसतां गुरुसि भय उडुनि जावें.
विपुळीं[5] गुरुप्रसादीं सदपत्य, जसें नभीं उडु निजावें. ११९

पूस पदार्थ परिशिला वत्सा! जो त्वां नसेल कानांहीं,
हरिजन म्हणेल अर्थ[6] प्रणतां द्याया न सेलका ' नाहीं.' " १२०

कृष्णकृपव्यासांतें नमुनि पुसे धर्मराज धर्मातें,
त्याला सांगे भीष्म त्राताखिलधर्मराजधर्मातें[7]. १२१

आपद्धर्म सविस्तर कथुनि सकळ मोक्षधर्म आयकवी,
प्रभुवेणु तसा चि करी तो त्या श्रोत्यांसि चित्रकाय[8] कवी. १२२

१. जीव असेपर्यंत आचरलेला. २. इहपरलोकीं. ३. आचार. ४. शांत अशा ( मला ). ५. अन्वयार्थः—जसे विपुलीं नभीं उडु ( नक्षत्र ) [ तसें ] विपुलीं गुरुप्रसादीं सदपत्य ( सद्गुणी मूल ) निजावें ( निर्भय रहावें ). ६. निरर्थक असा अर्थ. ७. संरक्षित होतात सर्व धर्म ज्यांनीं अशा राजधर्मांतें. ८. रोमांचित झालें आहे शरीर ज्यांचें असे.

भीष्मोक्ति बुधचकोरां बहुहित रा[1]का; यशोधन व्यास
नारद हि म्हणे, 'धालों,' मग इतरा काय शोध न[2]व्यास? १२३
श्रीरामगुरुपदाब्जीं सु[3]कृतिरुचि मयूर सुकृति हे[4] वाहे;
श्रीतुळसीसीं, पावुनि बहुमान, न कां करील हेवा, हे? १२४

इति श्रीभारते श्रीरामनंदनमयूरविरचिते शांतिपर्वणि सप्तमोध्यायः ॥

॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ श्रीराम जय राम जय जय राम ॥

१ पूर्ण राका निशाकरे इत्यमरः.–**पंत.** पौर्णिमेची रात्र २. नवीन श्रोत्यास.
३ चांगल्या कृताचा आवड असलेला ४. शांतिपर्वरूपी



# अनुशासनपर्व.

## अध्याय पहिला.

विदुवर नदीनंदन सांगे बहु दानधर्म धर्मातें,
व्हावें कृतकृत्य सुखें जीवाहीं ज्या करूनि कर्मातें. १
पर्वीं परमोदारीं या घडतां श्रवण आनुशासनिकीं,
बहु सांपडतीं स्वहितें सुकरें श्रद्धालु मानुषास निकीं. २
भीष्म म्हणे 'कृष्णा! नृप पुसतो माहात्म्य शंभुचें देवा!
बा! तूं चि सांग, त्याची तुज बहु घडली युगींयुगीं सेवा.' ३
श्रीकृष्ण म्हणे, 'महिमा विश्वेशाचा अपार अर्णव तो;
लेश यथाशक्ति यथामति कथित; अनंत काय वर्णवतो?' ४
प्रक्षाळुनि करचरण, स्वच्छ उदकें करूनि आचमना,
शिवयश सांगे, सुखवी ज्याचा पहिला चि बहु 'उवाच' मना. ५
श्रीकांत म्हणे, क्षितिवरि ठेउनि शिर, तो 'नमःशिवाय' असें;
वर्णी माहात्म्य परमविनयें विभुचें भरूनि भक्तिरसें. ६
"जीच्या विपक्षवदनें केलें प्रियमित्र पक्क जांबव, ती
भैष्मीसुतरत्न तसें मागे मज पुत्ररत्न जांबवती. ७
गरुडीं बसुनि गेलों शिवभजनाद्भुतरसें हिमागातें,
सुक्षेत्र पावलों, जें म्हणे, 'प्रिय असो कसें हि मागा तें.' ८
तेथें आश्रममंडळ, शशिमंडळ जेंवि अंबरीं अमळीं,
उपमन्यु सुमुनि नांदे ज्यांत, जसा हंस मानसीं कमळीं. ९

१. ज्ञात्यामध्यें श्रेष्ठ. २. उपदेशात्मक अशा. ३. खरा. ४. 'म्हणाला' हा पहिला शब्द. ४. शत्रूच्या (सवतीच्या) मुखानें. ५. पिकलेल्या जांभळाप्रमाणे लज्जेनें निळें काळें तोंड केलें. ६. रुक्मिणीच्या पुत्ररत्नाप्रमाणें. ७. शिवभक्तींत असलेल्या अपूर्व गोडीनें. ८. हिमाचलास. ९. निर्मळ आकाशांत.

परम प्रमुदित झालों, त्यातें त्या आश्रमांत मीं नमुनीं,
वदला प्रसन्नमानस तो शुद्धतपःसमुद्रमौनमुनी. १०
'वा! आमुचीं तपें त्वां केलीं पद्मालयावरा! सफळें,
अस्मद्योगास तसें तव संदर्शन, जसें शरास फळें[3]. ११
महिमा अतर्क्य तव त्या, जो तर्क करील नित्य नव लक्षः
पूज्य हि पूजिसि मज, हें एक तुझें यश चि, गांग न वलक्ष[6].
ज्ञानें ज्यासि पहावें, तो तूं मज इच्छिसी पहायास,
वंदिसि मजला, ज्याच्या करि पादरजोर्थ विधि महायास.' १३
ऐसें गौरवितां, म्यां पुसिलें सर्वत्र कुशळ सन्मुनितें,
जेणें केलें जें जें वेदगुरुप्रोक्त, सर्व जन्मुनि तें. १४
मदभिप्राय ज्ञानें समजुनि उपमन्यु मज म्हणे, "कृष्णा!
सत्सुतलाभें होइल परिपूर्णा निश्चयें तुझी तृष्णा. १५
शंकरवरप्रसादा भाजन, येथें करूनि सुतपा, हो;
भैष्मी तसि जांबवती क्षिप्र त्वत्तुल्यशील सुत पाहो. १६
या आश्रमांत करितो नित्य सपत्नीक तो प्रभु क्रीडा,
यच्चरणयशें धरिती चिंतामणि सुरभि सुरतरु व्रीडा. १७
आराधितां सुदुर्लभ वर एणें बहु दिले पदनतातें,
अर्पावें या एकें श्रीसांबें आपुलें पद, न तातें. १८
सर्वां मनोरथांचें भैवभजन असें न पूर्तिकर[11] कांहीं,
ताप नुरवि, जाड्य न करि, गावि न कां शंभुमूर्ति करकांहीं[12]?
प्रभुनें नेले बहु ऋषि, बहु सुर, बहु असुर उच्चपदवीतें;
अपरिमित यश, परि किमपि परिस, प्रेम चि बळें चि वदवीतें.
जो ख्यात मेरुकंपन[13] अरिघूकांचा हिरण्यकशिपु रवी,

१. लक्ष्मीपते! २. आमच्या चित्तवृत्तिनिरोधाला. ३. लोखंडी पातें. ४. [त] पूज्य असून हि. ५. गंगोदक. ६. शुभ्र. ७. चरणधूलीसाठीं. ८. पात्र. ९. पार्वतीसह. १० शंकराच्या भक्तासारखें. ११. पूर्ण करणारें. १२. गारांनीं. १३. मेरुपर्वतास कांपविणारा.

परिस तयाची दुर्घट वांछा श्रीमन्महेश कशि पुरवी. २
सर्वसुरैश्वर्यातें अर्बुदसंख्याक पावला वर्षें,
श्रीहरवरप्रसादें तो अद्भुतशक्ति नांदला हर्षें. २
मंदरनामा पुत्रप्रवर तयाचा चि समर शक्रासीं
करिता झाला अर्बुद अब्द जसा मत्त नक्र नक्रासीं. २
वज्रें झाला त्याचा ईशवरें एक ही न वक्र कच;
चक्र हि होय वृथा, जें गिरिदारुविदारणीं नव क्रकच. २
त्यास चि माराया जें प्रभुनें तेज चि सर्वथा खंचिलें,
प्रथम स्वयें स्वकौशलसुयशास्तव परम आदरें रचिलें. २
एका पिनाकिवांचुनि नोहे इतरासि शक्य देखाया;
लोपवि रविला, इतरा तेजाचा सांग काय लेखा यां? २
पाहों न शकति कोणी जन, डोळे भानुनें जसे चिपडे,
तेव्हां 'सुदर्शनं भव' त्यासि म्हणे देव, नाम तें चि पडे. २
होतां न्यून सहस्रीं एक, नयननीरजें यथाविधिनें
पूजन करितां, दिधलें पूर्वीं जें काय तुज दयानिधिनें. २
जीर्णतृणसम प्रतिहत चक्र सुदर्शन महारणीं झालें,
सामर्थ्य असें मंदरदेहीं प्रभुदत्तवरबळें आलें. २
वर देउनि विद्युत्प्रभ केला लक्षाब्द सर्वलोकेश;
न भजे अशा प्रभुसि जो, कुळदुग्धामाजि होय तो केश. ३
'माझा चि नित्य अनुचर होसील' असें हि शिव तयासि व
पुत्र सहस्रायुत ही दे बहु, चरणांसि शिवतया, शिव दे. ३
त्यासि कुशद्वीपाचें राज्य हि करुणा करूनि दे हा चि,

१. सर्व देवांच्या राजपदाप्रत. २. दहा कोटि वर्षे. ३ पुत्रश्रेष्ठ. ४. सुदर् चक्र. ५. पवनरूप लाकूड कापण्याचें कामीं. ६ करवत. ७. भरलें. ८. आप चातुर्यानें होणाऱ्या सत्कीर्तीसाठीं. ९. पाड. १०. सुदर्शनचक्रास. ११. चा आहे दर्शन ज्याचें असा हो. १२. नयनकमलानें. १३. वाळलेल्या गवतासार १४. कंठितगति, रुद्ध. १५. या नावाचा दैत्य. १६. लक्ष वर्षें. १७. दहा कोटि

भक्ताची प्रीति बहु प्रभुला, जीवासि जेंवि देहाची. ३२
शतमुख[1] एक महासुर करि शतवर्षे स्वमांसहोमातें,
तो उग्रप्रकृति म्हणे, 'भगवानुग्र[2] प्रसन्न हो मातें.' ३३
होय प्रसन्न ईश्वर, 'वर माग' म्हणे तयासि, तो याची,
'दे योगशक्ति, जीणें ग्रहघनभूम्यादिसृष्टि[3] होयाची. ३४
दे ब्रह्मज्ञानोद्भव[4] शाश्वत बळ हें अगा! रमागेहा[5]!
ऐसें प्रभुला, होउनि वरप्रसादा[6] अगार, मागे हा. ३५
क्रतु[7] हि शतत्रयवर्षें सूत्रात्मध्यान[8] धरुनियां भजला,
तो जाउनि शरण म्हणे, 'शंभो! दशशत सुपुत्र दे मजला.' ३६
भेटुनि 'वर माग' असें प्रथम अभय दे, वदे वच क्रतुला,
पुत्रसहस्र सुदर्शन दे, जैसें देवदेव चक्र तुला. ३७
जेणें मुक्त करावे नत, मद्वायसकुलाय[9] शापावे,
तो याज्ञवल्क्य मुनिवर शिवभजनें गततुला[10] यशा पावे. ३८
व्यास हि महेश्वरातें आराधुनि पावला यशा अतुला,
कथितो भक्तिप्रेमें, बा! विदित रहस्य काय गा! न तुला? ३९
अवमानिले बळमदें पूर्वी मुनि वालखिल्य[11] जे शक्रें,
ते वदले, 'हा! शंभो! केला अमृतोपहास की तक्रें!' ४०
कृष्णा! प्रमाण, ज्यांच्या अल्पत्वें, होय आंगठा काया:
ते प्रभुचरणांसि करुनि देती पदपीठ आंग टाकाया. ४१
समजुनि सुधा शिवाच्या, इतरांच्या फार सपर्क[12] रीतीतें,
काय कथूं, ते देहें अल्प परि अनल्प तप करीती, तें? ४२
दे अमृतहरखगेंद्रोत्पादनवर[13] देव वालखिल्यांतें,

१. दैत्यविशेष. २. भगवान शंकर. ३. सूर्यचंद्रादि ग्रह, मेघ, पृथ्वी इत्यादि सृष्टि उत्पन्न करिता येईल अशी. ४. ब्रह्मज्ञानापासून उत्पन्न होणारे. ५. श्रीकृष्णा! ६. वराच्या अनुग्रहास पात्र ७. दैत्यविशेष. ८. आत्मचिंतन. ९. मदरूपी कावळ्याचें घरटें च असे. १०. अतुल. ११. आर्या० आदि० अ० ४।१२७ तें १३७ पद्य. १२. बेचव. १३. अमृत हरण करणाऱ्या पक्षिश्रेष्ठास (गरुडास) उत्पन्न करण्याचा वर.

[1]कर्मांसि म्हणे, 'भजकां जरि अंतर देववाल खिल्यांतें.'
पूर्वी महेश्वराचीं रोषें होतां चि लोचनें केलिलें,
सर्वत्र ही विनष्टें झालीं तत्काळ सर्व ही सलिलें. ४४
[3]सप्तकपाळें यजितां देवाहीं सुप्रसन्न शिव होय,
तो यज्ञभाग भोगुनि मग सर्वत्र [4]प्रवर्तवी तोय. ४५
[5]शौरे! अत्रिवरि भरे अनसूया [6]ब्रह्मवादिनी रागें,
जें न कधीं हि घडावें, घडलें दैव तसें हि तें मागें. ४६
दुरितक्षयार्थ सत्कवि ज्या साध्वीचें पवित्र यश गाती,
क्षोभोनि म्हणे, 'यावरि होइन न कदापि अत्रिवशगा' ती. ४७
त्यजिती साध्वी कां, जरि न त्यजिता श्रीमदत्रि नयनातें?
जाय शरण, की नाहीं लव हि तपःश्रीमद त्रिनयनातें. ४८
निजलि शतत्रयवर्षें रचुनि करें काष्ठकीलशयनातें,
करि सुप्रसन्न शर्वा तप तीचें [10]पुंडरीकनयना! तें. ४९
अनसूयेतें देव स्मित करुनि म्हणे, 'पतिव्रते! रुचलें,
आलिस मज त्रिलोकीपतिस शरण, हें भलें तुला सुचलें. ५०
होइल तुज पुत्र, वदे हा मिथ्या न वच रुद्रः वापी हो
अमृताची कीर्ति तुझी; स्मरुनि मला [11]नवचरुद्रवा पी हो! ५१
विख्यात तुझ्या नामें होइल तव पुत्र मान्य विश्वासः
'अनसूय' त्यासि म्हणतिल सुकवि, असो दे मदुक्ति विश्वास.'
[12]शाकल्य [13]मनोयज्ञें [14]नववर्षशतें शिवासि आराधी,

१. देव कर्मांतें असें म्हणे, 'जरि भजकरवीं भक्तांसि अंतर देववाल तरि सिधुकरवीं मघवखिल्यांतें–मघवाच्या खडियांतें–हें अंतर देववाल. तुमचें बळ मजपुढें काय?'–**पंत.** २. रागयुक्त. ३. या नावाच्या यज्ञानें. ४. निर्माण करी. ५. श्रीकृष्णा! ६. ब्रह्मज्ञा. ७. अत्रिऋषीचा अंकित. ८. शंकरास. ९. लाकडी खिळ्याच्या शय्येनें. १०. कमलनयना श्रीकृष्णा! ११. नवीन पुरोडाशाच्या रसास. १२. मुनिविशेष. १३. मानसिक यज्ञानें; भक्तीनें. १४. नऊशें वर्षें.

'हो ग्रंथकार' त्यातें देव म्हणे, देउनि स्वसारा[1] धी. ५३
'लोकत्रयांत तव यश अक्षय हो, पुत्र सूत्रकर्ता[2] हो,'
झाला प्रसन्न ऐसा शाकल्यास त्रिलोकभर्ता[3] हो! ५४
करि षट्सहस्र वर्षें तप उग्र, प्रभुसि[4] भाटसा वर्णी,
तो ग्रंथकृदजरामर[5] केला थापटुनि पाठ सावर्णी[6]. ५५
वाराणसींत आहुति विधिनें अग्नींत दे वराज्याच्या[7],
झाला शिवप्रसादें शक्र पदा योग्य देवराज्याच्या. ५६
तो जाणे सार किमपि शिवभजनाहूनि आन[8] नारद न,
ज्याचे गुण शोभविती सद्वृंदा[9], जेंवि आनना रदन[10]. ५७
न विचिंतुनि दाराधन[11], आराधन शंभुचें करी रमुनीं;
होय कृपास्पद होउनि चरणार्पितवाङ्मनःशरीर[12] मुनी. ५८
श्रीशंभु म्हणे, 'वत्सा! लोकीं झालासि नारदा! धन्य,
त्वत्सम न होइल जन ज्ञानें, तेजें, तपें, यशें अन्य. ५९
भक्तिसती न करिल, तुज सदना सोडुनि, बहिः पदन्यास[13];
प्रिय मानुनि, न भजो तव मति, जसि न भजे उमा मदन्यास[14].
विश्वगुरुत्वाचा म्यां दिधला अधिकार तुज अनन्यास,
समुचित होय वदान्या परमवदान्यालयीं[15] धनन्यास[16]. ६१
वाजउनि मधुर वीणावेणुमृदंगादि सर्व वाद्यातें,
प्रेमें सुस्वर गाउनि, डोलविशिल या हि विश्वपाद्यातें[17].' ६२
वर्णावें एकमुखें म्या प्रभुयश किति, कसें रमेशा! तें?
ऐक, सदा मन्मानस भगवद्भजनीं जसें रमे शांतें[18]. ६३

१. ज्ञान आपला अंश आहे अशी. २. [तुझ्या ग्रंथाचीं] सूत्रें करणारा. ३. शंकर. ४. शंकरास. ५. ग्रंथकार व अजरामर. ६. या नावाचा मनु. ७. उत्तम तुपाच्या. ८. अन्य. ९. साधुसमुदायास. १०. दांत. ११. स्त्री व धन. १२. चरणाच्या ठायीं अर्पिली आहेत वाचा, मन व शरीर हीं ज्यानें असा. १३. बाहेर पाऊल ठेवणें. १४. माझ्याशिवाय दुसऱ्यास. १५. अत्यंत उदार पुरुषाच्या घरांत. १६. द्रव्याची ठेव. १७. मज जगदाद्यानें—पंत. १८. मुखानें.

# अध्याय दुसरा.

मीं व्याघ्रपादमुनिचा सुत, माझा बंधु धाकुटा सौम्य,
'उपमन्यु' नाम माझें, त्याचें अभिधान माधवा! 'धौम्य.' १
कथितों सविस्तर, प्रभु नागी मज परममुग्धभक्ता, तें.
पाहें बाळक मीं ऋषिशिशुभक्षितरम्यदुग्धभक्तातें. २
मातेसि म्हणें, 'तैसें दुग्धोदन मज यथेष्ट दे खाया,'
बहुदुःखभरें उघडुनि दृष्टि न शकली मदास्य देखाया. ३
मग माजी ती माता पिष्ट जळीं कालवूनि तें कढवी,
ठकवी किति दिवस असें, दारिद्र्य चि कपट तीस तें पढवी. ४
पोषिलि होती चुंबुनि जी शांतिसुरभि तदूध-भा तातें
शोषिलि, दुःखें माय चि, तशा वाढून दूधभातातें. ५
झांकी जी दुग्धकपट, बा! करि उघडें हि ती च ममता तें:
ज्ञातिकुळीं यज्ञातें जातां, नेलें मला हि मम तातें. ६
घडलें तेथें कृष्णा! दिव्यसुरभिदुग्धपानः रस मजला
समजे सत्यानृत, गुरुभक्त जसा काय बा! नर समजला. ७
सेवविला मातेनें श्रुतिनें जो 'सेव्य' म्हणुनि विष्टरसा,
विषया ब्रह्मज्ञ तसा भुललों दुग्धज्ञ मीं न पिष्टरसा. ८
यदुवीरा! बाळपणें ऐसें उपमन्यु हा वदे तीस;

१. वसिष्ठकुलोत्पन्न ऋषिविशेष २. अन्यत मद. ३. ऋषिपुत्रानें भक्षिलेल्या चांगल्या दुधभातास. ४. तशा दुधभातानें वाढून, तातें जी शांतिसुरभि (शांतिरूपी कामधेनु) पोषिली होती [ती] तदूधभा (तिच्या कामेंतील तेज-दूध) चुंबुनि शोषिली [व] माय दुःखें चि शोषिली. (त्या लटक्या दुधभातानें माझी फसवणूक चाललेली पाहून पित्याची शांति ढळमळूं लागली व आई तर दुःखानें करपून च गेली, असा भावार्थ). ५. दुधाविषयीं केलेलें कपट. ६. मुलाला बरोबर नेलें तर तेथें चार दिवस तरी खरा दूधभात त्याला खायला मिळेल असें पित्याला वाटलें, असा भावार्थ. ७. चव, गोडी. ८. खरा व खोटा. ९. दर्भाच्या मुठीप्रमाणें.

'माते! क्षीर नव्हे हें; नलगे; ठेवूनि नाव देतीस.' ९
या मद्वचनें कृष्णा! अंबा बहु गहिवरे, असुख पावे;
वाटे तीस असें कीं, 'जन्म विफळ, आपुले असु खपावे.' १०
कृष्णा! मज आलिंगुनि मस्तक हुंगुनि, असें म्हणे माता,
'मागसि तें दुग्धौदन कैंचें या तापसा जना ताता!? ११
वाताहार करावा, प्यावें जळ, शाकमूळफल खावें;
सुखभोगविहीनत्वें बा! आम्हां तापसांसि वळखावें. १२
बा! आम्हांऐशांची परमा गति शिव, तया सदाराध्या
क्षीरौदन किति? पुरविल सकळेच्छित, ईश्वरा सदारा ध्या.
वत्सा! सांबपदाश्रित तरले बहुसंख्य वन्य तापस रे!
ताप सरे शिवभजनें, ब्रह्मांडामाजि धन्यता पसरे.' १४
मीं कर जोडुनि पुसता झालों, 'माते! कसा सदाशिव तो?
कोठें असतो? कैसा दास तया स्वामिच्या पदा शिवतो? १५
शिवदर्शनकर, निश्चितफळ जो सदुपाय तापसां गमला,
तो जननि! मन निवाया, जाया निःशेष ताप, सांग मला.' १६
या मद्वचनें मोहांवहसा सहसा मदीय जननीला
आला पुष्कळ गहिवर, अहिवरशयना! अकाळघननीला! १७
सांगों काय, प्रेमें भेटुनि मज मस्तकासि हुंगो, तें?
मातेतें सदपत्य प्रिय बहुत चि, सुमधु जेंवि भुंगीतें. १८
उपदेशी जें श्रीशिवतत्त्वमहावाक्य मज मदंबा, तें
मातें बहु धन्य करी, कृष्णा! तव जेंवि पद कदंबातें. १९

१ [दूध हें] नाव ठेवून. २. दुःख. ३. प्राण जावे. ४. वायुभक्षण. ५. भाधून। आराधन करण्यास योग्य अशा. ६. दूधभात. ७. सस्त्रीकास; उमामहेश्वरास. ८. स्मर. ९. शिवचरणरत. १०. मूर्च्छा आणणारा. ११. शेषशयना! १२. वळवाच्या मेघासारखा निळा अशा! १३. श्रीशंकरस्वरूपबोधक महावाक्य. १४. या नावाच्या झाडावर कालीयामर्दनसमर्था व एकदा गोपींचीं वस्त्रें पळवून नेऊन श्रीकृष्ण बसले होते.

माय मज म्हणे, 'वत्सा! बहुदुर्ज्ञेयस्वरूप शिव साचा;
जीवां दुर्लक्ष्य सदा, दिवसांधा जेंवि नाथ दिवसाचा. २०
सुज्ञमहर्षिसभेची ऐसी म्यां स्पष्ट मात आयकिली:
पावे तो गुरुरूप, श्रीशिव देतो जयासि पाय-किली. २१
दुर्ज्ञेय जसें निर्गुण, शिवरूप तसें चि सगुण ही बा! गा!
विश्वांत विश्वरूपें वसतो: विरळा दिसे महाभागा. २२
श्रीशिव निर्गुण सगुण हि दुर्ज्ञेय, तथापि भक्तवश गा! तो:
त्याला सुलभ, प्रेमें जो आत्मार्पण करूनि यश गातो. २३
आपण चि, आपणातें निर्मुनि घेतो म्हणोनि ओंतारीं,
ब्रह्मादिपुत्तिकांत प्रभु चि प्रणता म्हणोनि 'ओ' तारी. २४
नसतां सद्भक्ति बृहस्पतिमुनिशिष्या हि वासवा गोतें,
जड हि तरति म्हणति 'मति न शास्त्रीं, सोडुनि शिवासि, वागो' तें.
होइल सुभक्तिनें तें पूर्ण मनीं इच्छिशील वत्सा! जें.
दुःसह तेजस्वित्वें शिवभालदृगग्निकीलवत साजे.'" २६

---

# अध्याय तिसरा.

उपमन्यु म्हणे, "हितकर, जननीचा सदुपदेश तो, याचा,
ग्रीष्मीं तृषिता पांथा दाखविला जेंवि देश तोयाचा. १
बाळा हि दिला साधुनि उपदेशें परम लाभ जननीच्या.
घडलें, बहु उच्छ्वास हि अतिदुर्घट, पर मला भजन नीच्या. २
बुडतां मनोरथीं, ते बोध तिचा धरूनि होत पार मला:

१. दिसण्यास कठिण २. घुबडास. ३. सूर्य. ४. गोष्ट ५. चरणरूप किल्ली. ६. एखादाच महाभाग्यवानास दिसे. ७. ब्रह्मदेवादिकांपासून तो लहानशा मुंगीपर्यंत सर्व. ८. सद्बुद्धि. ९. शंकराच्या कपाळावरील नेत्राच्या अग्निज्वाला-प्रमाणें. १०. दाखविलेला. ११. आपली दूधभाताची इच्छा सफल होत नाहीं म्हणून मी निराश झालों असतां.

शिवचरणाब्जीं अळिसा अल्पवया करुनि हा तपा रमला. ३
काय शिवभजन, असल्या लालाश्रुभरें नहात पोरासी?
जाला बाळपणांत चि, बा! व्हावा जरि न हा तपोराशी. ४
वर्षे सहस्र वामांगुष्ठाग्रीं मीं हरे! उभा राहें,
मंदसु· परस्पर म्हणति, 'न अपयश हो, वपु अरे! उभारा हें.'
शतवर्षे फळभक्षण, शतवर्षे अशन शीर्णपर्णाचें,
शतवर्षे मग कृष्णा! तृष्णाशमनार्थ पान अर्णाचें. ६
सप्तशताब्द मरुदशन करुनि, शिवासि न म्हणोनि 'हाय!' नमीं.
ऐसें करितां झालों उग्र तप सहस्र दिव्यहायनं मीं. ७
प्रभुवर मातें निजपदपद्मासवपानमत्त पाहून
होय प्रसन्न, मानी अन्यतप स्वल्प मत्तपाहून. ८
मत्सत्त्व परीक्षाया हरिच्या घे वामदेव सांगातें.
कृष्णा! 'होय, नव्हे' हा संदेह मनीं न दे वसों गा! तें. ९
सर्वामरगणवेष्टित, ऐकत गंधर्वगीत यश कानीं,
मिरवित पवितें भ्यावें ज्या चवरा सर्वशत्रुमशकानीं, १०
केयूर-किरीट-कटक-कुंडल-वररत्नहार-पदकांहीं
भूषित होउनि, करित स्मित अतिशयितप्रसादपद कांहीं, ११
चित्तांत आतपत्रें बहु लज्जा देत शारदशशीतें,

---

१. लहान वयाचा. २. लाळ व अश्रु याच्या प्रवाहानें. ३. डाव्या पायाच्या आंगठ्यावर. ४. श्रीकृष्णा! ५. उभें ठेवा. (आपण-प्राण-निधन गेलों तर याचा देहपात होऊन तपोभंगानें अपयश आपल्या माथां येईल, म्हणून च केवळ माझे पंचप्राण कुडीं धरून होते). ६. गळून पडलेल्या पानाचें. ७. उदकाचें. ८. वायुभक्षण. ९. देवाचीं वर्षें (एक मानुष वर्ष=एक दिव्य दिवस). १० आपल्या चरणकमलांतील [मकरंदरूप] मद्याचें पानानें मत्त झालेला. ११. इंद्राच्या. १२. शंकर. १३. वज्ररूप चवरांस. १४. बाहुभूषण. १५. अत्यंत प्रसन्नतायुक्त असे. १६ [अत्यंत शुभ्र अशा] छत्राच्या योगानें. १७. शरदृतूतील चंद्रास.

करुणामृतें शतें निजनयनांचीं करुनि फार देश शीतें, १२
मार्गीं वराप्सरांच्या देखत देखत सलील लास्यांतें,
आस्यांतें अवलोकुनि, नर्मरसें पुष्टि देत हास्यांतें, १३
आला स्कंधीं बैसुनि सांत्वित नागा सुधावदाता, तें
केलें कपट; परि दिलीं ठकवुनि वाळा सुधा, वदा, तातें. १४
शक्र म्हणे, 'वर देतों, जो तुज हित विप्रसत्तमा! गमला;
झालों बहु तुष्ट तपें, आलों मीं वरदराज, माग मला.' १५
ऐसें ऐकुनि कृष्णा! जेंवि घनें दावपावक, विझालों,
जो मीं प्रार्थुनि म्हणतां 'शंभो! पद दाव, पाव, कवि झालों.'
वदलों शक्रासि, 'महादेवावांचूनि तों मला कांहीं
तुजपासुनि कीं अन्या देवांपासूनि मागणें नाहीं. १७
तुज कथितों सत्य, रुचे, शंभु नसे जीत, तों जनकथा न.
साचें कीं चित्राचें, वद, शिशुच्या तृप्तिचें जनक थान? १८
पशुपतिवचनें होइन तत्काळ विशाळ वृक्ष कीं कीट,
इतरें दिधल्या त्रिभुवनराज्यश्रीचा हि बहु मला वीट. १९
हरचरणनमननिरता हो श्वपचकुळीं हि जन्म धन्य मला;
नसतां शिवभक्ति, नव्हे संभव शक्रा! तुझ्या गृहीं हि भला.
जळवातसेवनें ही न सरेल चि दुःख लेश हि नराचें,
न घडे ज्यासि हराचें भजन सुरासुरसभागुरुवराचें. २१
जरि हि अन्यधर्मयुक्ता त्यांच्या वार्ता, पुरे, वरा कुचला,
हरचरणस्मरणाचा विच्छेद क्षण हि ज्यां जनां रुचला. २२
व्हावें शिवपदरतमति, न शिवाया कळियुगीं हि तापानें;
होय न भय संसारीं हरभक्तिरसायनाचिया पानें. २३
दिवस, तदर्ध, मुहूर्त, क्षण, लव ही भक्ति शंकरीं त्याला

आपलें सहस्र नेत्र. २. हावभावयुक्त अशा. ३. शृंगारचेष्टांनीं. ४. चुचकारीत. ५. ऐरावतास. ६. अमृताप्रमाणें शुभ्र अशा. ७. ज्ञाता. ८. चांडालकुलांत. ९. जन्म. १०. देवदानवांच्या सभेंतील अत्यंत श्रेष्ठ अशा (हराचें). ११. शिवभक्तिरूपी औषधविशेषाच्या.

न घडे चि, तत्पदाचा नाहीं प्राप्त प्रसाद ज्या झाला. २४
कीट पतंग हि होइन शिववचनें, सुख चि तें, नव्हे कष्ट.
शक्रा! त्रिभुवनराज्य हि जरि दिधलें त्वां नको मला स्पष्ट. २५
श्वान हि ईश्वरवचनें व्हावें म्यां, परम काम हा माझाः
होइन अनीश्वरोक्तें[१] न सुरगणांचा मुहूर्त ही राजा. २६
क्षण हि नको देवांचें राज्य, नको ब्रह्मपद, नको मुक्तिः
शिवदासत्व चि बहुमत मज, शक्रा! जाण सत्य हे उक्ति. २७
शशिशेखरप्रसादाप्रति यावत्काळ मीं न लाहेन,
जन्ममरणदुःखांचे तोंवरि शतशः प्रहार साहेन. २८
त्या त्रिभुवनसारातें, आद्यातें, कोटिचंद्रकांतीतें
आराधुनि प्रसन्न न करितां, पावेल कोण शांतीतें? २९
म्हणतो, जरि जन्म पुन्हां मम दोषांहीं असे, असो, भावीः
त्या त्या जन्मीं माझी शिवचरणीं नित्य भक्ति शोभावी.' ३०
शक्र मज म्हणे, "कारणकारण[२] ईश्वर' असी तुझी उक्ति,
तरि तत्सत्तेविषयीं उपमन्यो! कोणती असे युक्ति[३]? ३१
अति हिंसक जो प्रळयीं करितो ब्रह्मांड भस्म हें सर्व,
याकरितां चि जयाचें सुज्ञाहीं नाम ठेविलें 'शर्व.'[४] ३२
नग्न, कपालभुजगधर[५], मसणीं क्रीडे सदा, न शिवशील[६],
ऐशा उग्रापासुनि[७] तूं कसा वर वरूनि निवशील? ३३
देहींचा दाह बुधा! वद दहनालिंगनें निवे काय?
संहर्त्यातें व्हाया सुख भजसि, नमोस्तु ते विवेकाय[८]!' ३४
यदुनाथा! आयकिली शक्राची म्यां असाधु अशि वाचा,
जीच्या श्रवणें व्हावा सर्व श्रोत्यांसि लाभ अशिवाचा[९]. ३५

१. शंकराव्यतिरिक्त दुसऱ्याच्या मागण्यावरून. २. कारणाचे कारण; आदिकारण. ३. प्रमाण. ४. संहारकर्ता, शिव. ५. रुंडमाला व सर्प याना धारण करणारा. ६. पवित्र आचार ज्याचा. ७. उग्र म्ह० शंकर व भयंकर; येथे दोन्ही अर्थ ग्राह्य आहेत. ८. तुझ्या शहाणपणास नमस्कार असो! ९. अकल्याणाचा.

बहु युक्तिश्रुति[1] दाउनि वदलों, “ शक्रा ! सुबालिशा मत्ता
न कळो, महेश्वराची न कळे सुज्ञा तुला कसी सत्ता ? ३६
जें बीजीं सामर्थ्य, प्रकट करितसे जसें चि मृत्स्ना तें,
परम शिव तसा सत्ताप्रद या [3]अव्यक्तकादिकृत्स्नातें. ३७
ब्रह्मज्ञ ‘ परम आत्मा,’ ऐसें म्हणती सदा [4]परतरा ज्या,
त्या ‘ नाहीं ’ वदसि कसें ? या त्यजुनि कुमतपथा परत राज्या !
‘ [5]ज्ञानैश्वर्य ’ ‘ [6]अचिंतित ’ ज्या म्हणति, ‘ [7]अनादिमध्यपर्यंत, ’
ज्याच्या ध्यानें होतो निःशेष चि निश्चयें [8]सद्यंतः ३९
जो निर्मी, निर्माया सर्वा जीवा, नगा, [9]अगा, धान्याः
शक्रा ! कोणें गुरुनें तुज कथिलें कीं, ‘ न गा अगाधा त्या ’ ? ४०
[10]ईक्षण चि क्षणमात्रें ज्याचें ब्रह्मांडकोटि निर्माया,
भस्म कराया हि क्षमः कैसा नेणसि अशा हि [11]निर्माया ? ४१
[12]झाला, हरिस हि पढवुनि नय, शोभाजनक, विप्रसा, दानें,
केला कोण शिवाच्या न यशोभाजन कवि प्रसादानें ? ४२
किंबहुना शक्रा ! तूं पूज्य असा त्रिभुवनांत झालास,
श्रीशिववरप्रसादें मजला वर द्यावयासि आलास. ४३
[13]गुरुनीतितें, अशनितें, स्वतपस्येतें हि, [14]कश्यपदयेतें
यश देः परि प्रसादें प्रभुच्या होवूनि वश्य पद येतें. ४४
जालें कोणाच्या शिखिवदनहुतें कनक सांग गा ! [15]रेतें ?
कोणाचें तापत्रयहर हांसे धवळ आंग गारें ? ४५
कोठें पूज्यत्व असें ? ‘ [16]सुकृतगतिसुखार्थ शंभुच्या लिंगा ’
म्हणति मनोवृत्तींतें बहु साध्वी साधु ‘ नित्य आलिंगा. ’ ४६

१. प्रमाणें व वेदवचनें. २. मानी. ३. ब्रह्मादि सर्व वस्तुस. ४. अत्यंत श्रेष्ठास ५. ज्ञान हें च ऐश्वर्य ज्याचें असा. ६. अतर्क्य. ७. आदि, मध्य व शेवट नाहीं ज्याला असा. ८. साधुच्या शत्रूचा नाश. ९. वृक्षास. १०. दृष्टि. ११. मायारहितास. १२. कथासंदर्भ? १३. बृहस्पतीच्या नातीस. १४. पित्याच्या दयेस. १५. अग्नींत दग्ध झालेल्या रेतानें ( पाऱ्यानें ). १६. पुण्य, मोक्ष व सुख यासाठीं.

कश्मीर, वंग, तंगण, पांचाळ, विदर्भ, कोसल, कलिंग,
पाताळ, नाक हि पहा शोधुनि, कोठें समर्चित न लिंग? ४७
तूं, विधि, विष्णु, जयाच्या लिंगातें पूजितां सुर सदा, त्या
मागेन: उदकदात्या मागावें कीं सुधासुरसदात्या? ४८
पद्मांका चक्रांका वज्रांका पाहतां नव्हे कांहीं,
माहेश्वरी भगाह्वा लिंगाह्वा हे प्रजा, दुजी नाही. ४९
व्हावा लघु हि शिवाचा, गुरु हि मज तुजा दिला नको च वर;
भूपें कुसुम दिलें बहु मानधना, सेवकें नको चवर. ५०
माझा ठाईं भगवान् हा शंकर उग्र की अनुग्र हरे!
मागेन मागणें तें त्यास चि, शापो, करो अनुग्रह रे! ५१
शीतकर थोर गणिला, उष्णकर कधीं लहान, कोकाहीं?
त्वद्दत्त तव पदादिक, शक्रा! जा कीं रहा, नको कांहीं." ५२
ऐसें बोलुनि कृष्णा! 'पूर्ण करायासि काम हा देव
आला, प्रसाद न करी मजवरि अद्यापि कां महादेव?' ५३
यापरि चिंतित मी शिवघनविरहम्लानशालि बा! होतों,
प्रकटी स्वरूप करुणाकर शंकर विजयशालिवाहो! तों. ५४
वृषभें केला प्रकट स्वाकार, त्यजुनि कुंजराकार,
करि बहु, ज्यातें मानुनि पतितेजःसारपुंज, राका र! ५५

१ पूजन. २. अन्वयार्थ –पाहतां (पाहूं गेलें असतां) [हे प्रजा] कांहीं पद्मांका (महादेवाच्या कमलचिन्हानें युक्त) चक्रांका (विष्णुचिन्हानें युक्त) [किंवा] वज्रांका (इंद्रचिन्हानें युक्त) नव्हे. हे प्रजा भगाह्वा (भग=उमेचें–स्त्रीचें–चिन्ह, त्यानें युक्त) [व] लिंगाह्वा (लिंग=महादेवाचें–पुरुषाचें–चिन्ह, त्यानें युक्त) [अशी असल्यामळें] माहेश्वरी (उमामहेश्वरापासून च झालेली) [आहे]; दुजी नाही. ३ इंद्र. ४. शंकररूप मेघाच्या वियोगानें सुकून गेलेला साळीचा अंकुर च असा. ५. हत्तीचें (ऐरावताचें) रूप. ६ ज्या नंदीतें पतिच्या (चंद्राच्या) तेजाच्या सत्वाचा गोळा समजून राका (पौर्णिमेची रात्र) [त्याच्या रूपानें आपल्या पतीचें सर्व तेज बाहेर पडून तो निस्तेज झालासें वाटून] रडूं लागली.

[1]मधुपिंगललोचनयुग बहुरम्यावयव तो महाकाय;
वृषरूप [2]क्षीरोद चि, वर्णूं तद्रूप तें अहा! काय? ५६
[3]सूक्ष्मारुणवर्णाग्रें जीं पद्में सेविलीं मनोभृंगें,
[4]पविसारमयें [5]तप्तस्वर्णद्रवपूरसन्निभें शृंगें. ५७
परम मनोहर त्याचें श्रीकृष्णा! कृष्णवर्ण तें पुच्छ,
बहुधवळ विशाळ [6]ककुद, [7]तुहिनाचळशिखर ज्यापुढें तुच्छ.
[8]सारें पविचे, वर्णें [9]हरिनीळाचे हि बा! खुर [10]गडी ते,
[11]शिवते महीतळा तरि मृदु वस्त्रा जेंवि आखु रंगडीते. ५९
बहुतगुणेंकरुनि उणें भासविलें अमृत वासवा [12]फेनें
यद्वदनींच्या, केला जित सुरतरुकुसुमवास, वाफेनें. ६०
त्या वृषभावरि भगवान् विश्वेश्वर. तत्प्रिया उमा, गीतीं
दावी [13]कल्पनगाश्रित कल्पलतेची च गिरिकुमारी ती. ६१
तेज असें प्रथम दिसे, ज्यांत लपावें सहस्रतपनाहीं;
मीं काय? ज्या पहाया पद्मीं ब्रह्म्याचिया हि तप नाहीं. ६२
प्रभुच्या [14]दीप्तिपुढें किति [15]अचिरभावृष्टि, [16]तरळलीला जे?
[17]मुग्धा पतिस पहाया तसि माजी दृष्टि [18]तरळली लाजे. ६३
मग देव दिसे: की, करि पूर्ण प्रभुचा अनुग्रह गित्यानें:
अत्युग्रा ही हरिचा बा! बाळक जो, अनुग्र [19]हरि त्यानें. ६४

१. मधासारखे पिंगट नेत्र असलेला. २. क्षीरसमुद्र. ३. बारीक व तांबूस रंगाची टोंकें असलेलीं. ४. वज्रसारखें. ५. तप्त सुवर्णरसाच्या प्रवाहासारखीं. ६. वशिंड. ७. हिमाचळाचें [शुभ्र] शिखर. ८. सामर्थ्यानें. ९. इंद्रनीलमण्याचे. १०. नदीचे खुर. ११. [ते नदीचे खुर] महीतळा शिवते तरि मृदु वस्त्रा जेंवि आखु (उंदीर) [तेंवि] रंगडीते (चर करिते). [महीतळाला पादस्पर्श न होणें हें देवतांचें एक चिन्ह आहे—व्यासभारत वन० अ० ५७ पहा]. १२. फेंसानें. १३. कल्पवृक्षाचा आश्रय केलेल्या. १४. तेजापुढें. १५. विजेची वृष्टि. १६. चंचलगति. १७. अभिनवतारुण्यवती स्त्री. १८. चंचल झाली. १९. तो अत्युग्र सिंह.

ध्यात्यासि म्हणति, 'आम्हीं सद्विद्यालाभहेतु मठ[1], राबा,'
ऐसे विलोकिले म्यां प्रभुचे बहु रम्य बाहु अठरा बा! ६५
शुक्लध्वज, शुक्लांबर, शुक्ल चि माल्यानुलेपनें[2] देहीं,
उपवीत[3] शुक्ल, शुक्ल चि सर्व, जसा धर्म साधुच्या गेहीं. ६६
माळा उरस्थळावरि साजे बहु भव्य शुक्लकमळांची,
तीतें झांकी, उघडी, द्युति दंतांची कळाभृदमळांची[4]! ६७
बाळसुधाकर[5] मुकुटीं, अंकीं तुहिनाद्रिनंदिनी[6] शुक्ला,
न धरी ध्यान असें जो, तो मूढ चि, की महासुखा मुकला.
प्रभुकंठ, तुझा जैसा देह, तसा देवराजनीलाभः[7]
जेणें[8] भूतदयेचा स्वातिच्या देवरा! जनीं लाभ. ६९
बाणपरशुशूळांची कथितो कृष्णा! कथा पिनाकाची[9],
वधिती देवारीतें, देती सद्गति तथापि नाकाची[10]. ७०
जें धनु पिनाकनामक, ज्याच्या गाताति वेद महिम्यातें,
अवलोकिलें प्रभुपुढें, जें जालें सप्तशीर्षअहि[11], म्यां तें. ७१
बाण हि सहस्रबाहूदरमस्तकनेत्र देखिला, ज्याला
'पाशुपत' असें म्हणती, प्रणती करि ज्यास काळ ही भ्याला.
ब्रह्मास्त्र मुख्य, कृष्णा! त्याहुनि नारायणास्त्र अस्त्रांत,
त्यांत हि पाशुपताचें, दहनाचें जेंवि तेज वस्त्रांत. ७३
तें मूर्त पाहिलें म्यां बा! शूळ, तुझ्या[12] हि जें अरिस भारी,
श्रुत हि प्रताप ज्याचा होता पीतांबरा! अरिसभाऽरी[13]. ७४
मूर्त त्रिशूळ करुनि त्रिशिखा भृकुटी, धरूनि सर्प करीं,

१. छात्रगृह. २ फुलें व उटी यांनी. ३. यज्ञोपवीत. ४. चंद्राप्रमाणे स्वच्छ अशा. ५ चंद्रकोर ६. हिमनगसुता ( पार्वती ). ७. इंद्रनीलमण्याप्रमाणे कांति आहे ज्याची. ८. जेणें जनीं भूतदयेचा लाभ [झाला] [ तो ] प्रभुकंठ. ( जगाच्या कल्याणासाठीं हालाहल विष प्राशन करून शंकरांनी आपला गळा निळा करून घेतला ). ९. पिनाक धनुष्याची. १०. स्वर्गाची. ११. सात फणा असलेला साप. १२. सुदर्शनचक्रास. १३. शत्रुमंडळाचा शत्रु.

पाशकरा काळा भय दाउनि, जाणों म्हणे 'न गर्व करीं.' ७५
अहिपाणि[1] मूर्त परशु हि कृष्णा! म्यां देखिला पुरुषकाय,
पाहेल मरणधर्मा[2] त्या अमरभयप्रदा पुरुष काय? ७६
प्राधान्यें कथिलीं म्यां हीं चार, अनंतशक्तिचीं अमितें
अस्त्रें किति वर्णावीं सर्वामरकायवाङ्मनोनमितें[3]? ७७
दक्षिणभागीं पाहें द्रुहिणा[4] स्वर्णप्रभा वरविमानीं;
मीं त्यातें, देखुनियां त्याचा वर्णप्रभाव, रवि मानीं. ७८
पार्श्वीं प्रभुच्या पाहुनि पद्मगदाशंखचक्रकर[5] वामीं[6],
भरलों सुखामृतें जो होतों धृतदुःखतक्र[7] करवा मीं. ७९
'करिन निर्धीश[8]' म्हणे जो प्रणतोद्धृतिदक्षबाहु[9] 'निःस्वा[10] मीं.'
बहु शोभला मयूरीं देवीच्या[11] निकट राहुनि स्वामी[12]. ८०
देवापुढें चि ज्यातें शक्रादि समस्त लोकपति वंदी,
जो रूपें सामर्थ्यें शंकरसा, तो विलोकिला नंदी. ८१
स्वायंभुवमुख[13] मनु, हरिमुख सुर, भृगुमुख हि ऋषि तपोराशी
आले चातक, विनउनि घन, निववायासि तृषित पोराशी. ८२
आटोकाट मिळाले, 'आटो कीट[14] स्वदृष्टिचा' म्हणती,
'जय जय' म्हणोनि करिति प्रभुच्या चरणांबुजांप्रति प्रणती.
ब्रह्मा रथंतराख्यें[15], विष्णु ज्येष्ठाभिधें[16] स्तवी सामें,
शतरुद्रियें[17] शतमख हि; विभुचीं गाती किती सुधी नामें. ८४

१. सर्प हातीं ज्याच्या असा. २. मर्त्य पुरुष. ३. सर्व देवांचे देह, वाणी व मन ह्यांनीं नमिलेल्या. ४. ब्रह्मदेवाला. ५. विष्णु. ६. डाव्या पार्श्वीं (बाजूस). ७ धारण केला आहे दुःखरूपी तक्रम ज्यानें असा करवा. ('करवा' हा शब्द उसाच्या तुकड्याला विशेषेंकरून लावितात). ८. कुबेर. ९. शरणागताचा उद्धार करण्याचे कामीं तत्पर आहे बाहु ज्याचा. १०. निर्धनास. ११. पार्वतीच्या. १२. कार्तिकस्वामी. १३. प्रभृति. १४. मळ. १५. या नावाच्या साममंत्रानें. १६. सामवेदांतील 'ज्येष्ठ' नांवाच्या मंत्रानें. १७. या नांवाच्या यजुर्वेदांतील मंत्रानें.

शंभुपुढें उदयातें एकाकाळीं च केशवा! करिते,
जरि बहु अयुतें असते चंद्रार्क, स्पष्ट लोपते तरि ते." ८५

## अध्याय चवथा.

उपमन्यु म्हणे, "कृष्णा! गुरुभजनीं जें विशंक रावेल,
समजेल मन, वहावा स्तव भावें, जेंवि शंकरा वेल. १
'दुष्टे! हित साधूं दे, धरिसी कोंडूनि कां मना? लाजे,'
ऐसें म्हणति, त्यजिती निपटुनियां सर्व कामनांला जे. २
तें जोडिलें चि भावें स्तवुनि, नव्हे जें विनाशि वस्तु, तिहीं.
वाक्शुद्धि न होय इतर मंत्रजपाहीं विना शिवस्तुतिहीं. ३
म्हणुनि असा स्तविला प्रभु, 'विश्वाकारा! तुला असो नमन.
तो निष्फळजनु[1], जेणें स्मरण न केलें तुझें, असोन मन. ४
धाता, दाता, त्राता, भ्राता, माता, पिता[2] हि तूं देवा!
सद्गुणहीनां दीनां संसारीं तारिती तुझी सेवा. ५
सांबा! सांभाळाया दक्ष तुझें चरणरज चि लक्षमतें:
शर्वा! सर्वाधारा! जें दृढतर वज्रकवच अक्षम तें. ६
शंभो! अंभोद[3] हित हि परि मारी चातकास करकांहीं[4].
आवरिति जोडिले[5] हि न त्या सुजडा[6] घातकास कर कांहीं. ७
भर्गा! स्वर्गागम जड, यद्यपि ते आश्रितासि शोभविती,
क्षोभविती कामातें, बहु अर्पुनि विषय चित्त लोभविती. ८
किति देइल, चिंतामणि[7] हो किंवा ते हि कामकपिला[8] हो,?
तूं चि म्हणसि, 'मोक्षास हि, नसतां ही मोक्षकाम, कंपि लाहो.'
जीवांसि सगुण होउनि तारिसि, म्हणसी, 'अहा! न तापावे.'

१. निष्फळ आहे जन्म ज्याचा. २. पोषणकर्ता. ३. मेघ. ४. गारांनीं. ५. गाठलेले. ६. पाण्याने भरल्यामुळे अत्यंत जड असलेल्या (पक्षी) अत्यंत मूर्ख अशा. ७. कल्पवृक्ष. ८. कामधेनु. ९. कथासंदर्भ?

जो न त्वत्सम, माझ्या तो काय भजेल उद्धत पदास? ३३
तूं शुचि दृढभक्त असें जाणें; आत्म्यास काय न कळे तें?
मी साक्षी वृत्तींतें मुख्य, जसा वायु गायनकळेतें. ३४
झालों यशोर्थ करिता मीं कृत[1]हरिकायमाय मायेतें,
करितों भक्तीं, तोकीं तेंवि करिल काय माय मायेतें? ३५
वत्सा! मीं केवळ रवि, मम सर्वस्वच्छवि[2] प्रवरदास,
स्वात्म्यापरीस बहुमत मज सर्व स्वच्छ विप्र वरदास. ३६
या भक्तिनें मुदित मीं झालों वरदेश सोम[3], वत्सा! जें
हित, तें घे, स्वयशें हा निववुनि वर देश, सोमवत्[4] साजें. ३७
या प्रभुवचनश्रवणें वाहे प्रेमाश्रु लोचनावाटे,
दाटे कंठ, जगीं मी धन्य, असें बंधमोचना[5]! वाटे. ३८
कर[6]मस्तक चि न शिवले क्षितिसि, म्हणति 'नमन हो वरें' गुडघे;
बहु हर्ष तो, म्हणे प्रभु 'बहु' दुर्गतशिशुसि, 'खोबरें गुड घे.'
कृष्णा! करी मदंगीं एकैकी परम हर्ष पद लोमीं,
बहु[7]कंपसंपदास्पद होउनि, ऐसें नमूनि वदलों मीं. ४०
'जालों धन्य, मजपुढें तो कीं तूं प्रभु उभा, सुरा[8]सुर-ज्या
'परमगुरु' म्हणति, वंदिति यच्चरणाच्या सुभासुरा सु-रज्या[9].
धन्यतर कवण मदितर? हे सुर हि करूनि ही महायास
ज्याचे पाय न पाहति, त्या प्रभुला पात्र मीं पहायास. ४२
या जगदवनाकरितां द्रुत गिळिता होय जो अं[10]ज गरातें,
त्या तुज मीं देखतसें साक्षात् का[11]ळाखुच्या अजगरातें. ४३
क्षम द[12]क्षवामपार्श्वांपासुनि जो विधिसि हरिसि निर्माया,

१. केलें आहे इंद्राच्या स्वरूपाचें कपट ज्यानें. २. सर्वस्वभूत अशी प्रभा, तेज. ३. उमेसह. ४. चंद्राप्रमाणें. ५. [संसाररूप] बंधापासून सोडविणाऱ्या श्रीकृष्णा! ६. मीं साष्टांग नमस्कार घातला, असा भावार्थ. ७. बहु अशा कंपरूपी संपत्तीचें स्थान होउनि=थरथर कांपत. ८. अत्यंत तेजस्वी. ९. तत्काळ. १०. जन्मरहित (शिव). ११. काळरूप उदराच्या. १२. उजव्या व डाव्या भागांपासून.

त्या तुज पाहें, बा! हें नवल भवलयार्थ करिसि, निर्माया! ४४
त्याचा रचिता तूं कीं, सूर्या, चंद्रा, यमा, मरुद्राज्या
जो दुःसह, किंबहुना कांप ब्रह्मांडधाम रुद्रा ज्या.' ४५
ऐसें बोले; हांसे, उद्धरिला तो जसा करी, नाच
ब्राह्मण हा ब्रह्मण्या! देवा! तैसा पुरे करीना च! ४६
कृष्णा सजळजलदहरिनीलनिभानंदकंदनवदेहा!
वरदा स्मरदाहकरा विश्वेशा करुनि वंदन वदे हा. ४७
'देसि यशाचें दासा जरि आजि, करुनि अनुग्रहा, चवर;
तरि भव्य भक्ति दे मज, घ्यावा द्यावा अनुग्र हा च वर, ४८
जाणावें सुज्ञानें म्यां भूतभविष्यवर्तमानातें,
स्वप्नीं न सांपडावें दुस्तरविपदंधगर्तमानातें. ४९
क्षीरोदन भक्षावें म्यां अक्षय सर्वबांधवांसहित,
त्वत्सान्निध्यें व्हावा माझा आश्रम सदा जगन्महित.' ५०
संप्रार्थिला चराचरगुरु विश्वेश्वर मला म्हणे, 'साधो!
बाधो आधिव्याधि नः जें त्वद्वांछित असेल, तें साधो. ५१
अजर अमर हो; होतिल ते हि, जसा तूं, तसे तव ज्ञाती.
अनिवार्या काळाची गति; परि न करिल तुझी अवज्ञा ती. ५२
दिव्यज्ञानसमन्वित होसिल सन्मुनिजनासि सत्कार्य;
बहुमत यशासि हो तव नाम, जसें सन्मनासि सत्कार्य. ५३
दिव्यतपस्तपनाच्या तेज्या तव देहसुरनग न सोडु;
शोभो बहुमुनिपद हें त्वां द्विजराजें जसें गगन सोडु. ५४

१. इंद्रास. २. हा शंकराचा प्रलयकालीन अवतार. ३. गजेंद्र. ४. पाण्याने भरलेले (काळे) मेघ व इंद्रनीलमणी यासारखा सुंदर, आनंददायक व अपूर्व आहे देह ज्याचा अशा कृष्णा! ५. दुस्तर अशा संकटाचा अंधकारयुक्त खळगा च अशा अभिमानातें. ६. विनविलेला. ७. मानसिक व शारीरिक दुःख. ८. अलौकिक तपोरूप सूर्याच्या. ९. देहरूप मेरुपर्वत. १०. बहुमुनिवदाश्रमपद–**पंत.** बहुमुनींनीं युक्त असें आश्रमस्थान. ११. ब्राह्मणश्रेष्ठानें (पक्षीं) चंद्रानें. १२. नक्षत्रयुक्त.

तुज भेटोनि मिघाया येतिल सुकृतक्रियापर[1] महर्षी,
वाहुनि मस्तक चरणीं, होतिल, करुनि प्रिया, परमहर्षी. ५५
आहे आलिंगुनियां मजला मच्छक्ति[2] हे जसी अतुला,
राहेल यौवनश्री आलिंगुनि सर्वदा असी च तुला. ५६
वत्सा! उपमन्यो! म्यां तुजला दिधला चि राशि दुग्धाचा,
बहुमत मज भक्ताचा, ताताला जेंवि बोल मुग्धाचा[3]. ५७
तूं इच्छिसील जेथें, तेथें दुग्धाब्धिचें सदा तुजला
सान्निध्य घडो: टकळा[4] घालूनि न वत्स सुरभिचा सुजला[5]. ५८
श्रुतिवक्त्या मज 'घे' या उच्चारण कठिन काय वाणीचें?
घेणें रुचतें, परि बा! देणें न रुचे कधीं हि वाणीचें[6]. ५९
जें अल्पदान, नोहे प्रभुस प्रभुयाचकास ही शुभ तें,
यास्तव या स्तवनार्हें म्यां तुज दुग्धाब्धिचें दिलें दुभतें. ६०
आकल्प क्षीरोदन अमृतोपम सामवर्ग जेव, रहा:
ते काय, स्वजनांच्या विश्लेषें[7] म्हणवितील जे वर 'हा!'? ६१
कल्पांतीं पाव मला, तों वस सेवीत दुग्धभक्तातें:
न विसंबें, न उपेक्षीं मीं सामान्या हि मुग्ध[8] भक्तातें. ६२
बांधववृंद तुझे कुळगोत्र हि आकल्प मुदित राहेल,
कृतलोककवळ[9] काळ क्रोधकुटिलदृष्टिनें[10] न पाहेल. ६३
दिधली प्रसन्नचित्तें तुज शाश्वत भक्तिसंपदा साची;
म्यां भक्तत्व दिल्यावरि, मति कां पावेल कंप दासाची? ६४
बा! या त्वदाश्रमीं मीं सान्निध्य करीन सर्वदा साचें,
स्थळ कैलासाहुनि मज बहुमत उटजादि[11] सर्व दासाचें. ६५
स्वस्थ यथाकाम[12] रहा, उत्कंठेतें करूं नको लेश;

१. पुण्यकृत्यें करण्यांत तत्पर. २. पार्वती. ३. लहान मुलाचा. ४. ध्यास धरून. ५. आतुर झाला. ६. कर्मापणाचे. ७. वियोगानें. ८. भोळ्या. ९. केला आहे जगाचा घांस ज्यानें. १०. रागानें वांकड्या झालल्या दृष्टीनें. ११. पर्णकुटिकादि. १२. स्वेच्छेनुसार.

बुडतां उद्धार करी क्षितिचा दंष्ट्रेकरून कोलेश[1]. ६६
संरक्षिले शिशु पशु हि, धरिला मंथाद्रि पाठिवरि; कां म्यां
भेटि न द्यावी? मजला इच्छा होतां चि आठिव रिकाम्या.[2]'
यापरि महाप्रसादें करुनि त्रिजगांत धन्य हा विप्र,
तत्काळ गुप्त झाला रविकोटिसमप्रभ प्रभु क्षिप्र. ६८
कृष्णा! विलोकिला म्यां यापरि भगवान् समाधि साधूनीं,
या चि उपायें केला नाहीं च भवश्रमाधि[3] साधूनीं. ६९
झालें प्राप्त सकळ जें, दे अनुकंपा करूनि मज भव तें;
आहे, पहा, कसें हें ब्रह्मज्ञ ब्रह्मवृंद मजभवतें. ७०
गंधर्व, सिद्ध, विद्याधर, किन्नर, अप्सरा, पहा, गा! या
येतां इकडे, न म्हणे शतमख[4], 'जावूं नका; रहा गाया.' ७१
तरु गुल्म लता देती सर्व ऋतूंच्या फुला, फळा, सुरसा;
हा आश्रम शतमखसा, ताप सकळ यापुढें बळासुरसा. ७२
हें वन मदाश्रमींचें, तरुपंचक[6] जेंवि नंदनवनीं तें;
विपुळ सुखें मज प्रभु पोषी, तुज जेंवि नंद नवनीतें. ७३
हा उपमन्युमुनि पयोनिधिच्या सेऊनि अक्षय दुधाला,
जेंवि तव यश प्राशुनि, तृप्त करुनि साधुलक्ष, यदु[7] धाला. ७४
यां स्थानीं लक्ष्मीचें माहेर क्षीर, हात यादानें,
तैसे न जोडितां म्यां, आहे, रक्षी रहातया दानें.[8] ७५
या आश्रमीं अनुभवुनि विविधा अवलोकनीं चमत्कारा,
सर्व स्वर्गस्थ म्हणे, 'हा वासवलोक नीच मत्कारा.[9]' ७६

१. वराहावतार. २ [भक्ताना भेटण्याविषयी नेहमी च] रिकाम्या अशा मजला. ३. संसारश्रमापासून होणारे मानसिक दुःख. ४. इंद्र. ५. कुंज, जाळी. ६. कल्पवृक्षाचें पंचक. ७. [तुझा पूर्वज] यदु. ८. अन्वयार्थः–[जैसे] यादाने तैसें म्यां हात न जोडिता (केवळ प्रभुकृपेने, असा भाव.) या स्थानीं लक्ष्मीचे माहेर क्षीर (क्षीरसागर) आहे, [व तो] [क्षीर-] दाने रहातया रक्षी. ९. माझा तुरुंग.

बहुकुतुकातें येथें [1]भक्तभवतमोरविप्रसाद विती,
लोकास 'पहा शिवघन,' ऐसें [2]हा मोर विप्र [3]सादविती." ७७

---

## अध्याय पांचवा.

श्रीकृष्ण म्हणे, "धर्मा! माज्या आलें चि तें अनुभवातें:
नमिता झालों होउनि [4]रोमांचप्रोल्लसत्तनु भवातें. . १
उपमन्युप्रति वदलों, 'विप्रेंद्रा! त्रिभुवनांत तूं धन्य;
प्रभुवरवरप्रसादालंकृत ऐसा न ऐकिला अन्य.  २
हा तीर्थराज आश्रम, कीं जो जाला शिवासि [5]आवास;
याचें सुयश म्हणेल चि [6]अमृताशननायकासि, "'आ' वास.'
होतील धन्य, देतिल कलिला बहु धाक विप्र [7]यां गाते;
त्वदधिक न च म्हणतिल शुचिसलिला बहुधा कवि प्रयागा [8]ते.
मुनिसिंहा! मज हि प्रभु दर्शन देईल काय? बा! पाहें.
तुजपरि धन्य यशस्कर वाटेल अपत्य मायबापा हें?' ५
ऐसें पुसतां धर्मा! ध्यानीं आणुनि तया अनादिस तो
मुनि मज म्हणे, 'मुकुंदा! निकट चि तव अभ्युदय [9]मना दिसतो.
तूं देखसिल असंशय देवा [10]मासीं महायशा सांव्या;
कीं प्रभुनें विघ्नचमू भजका होउनि सहाय शासाव्या. ७
देइल शिव आठ, [11]शिवा आठ, पुन्हा ती च आठ वर; हा तो
भगवत्प्रसाद; जेणें कळतो सर्वार्थ, [12]आठव रहातो. ८

१. भक्ताच्या संसाररूप अंधकाराचा [ नाश करणारा ] मयूर च अशा शंकराची कृपा. २. उपमन्यु. ३. आनंदानें मागतो. ( 'साद घालणें,' 'सादविणें' हे शब्द पोपट, मोर इत्यादींच्या सानंद शब्दास लावितात ). ४. रोमांचानें शोभणारें शरीर ज्याचें असा. ५. राहण्याचें ठिकाण. ६. अमृतसेवन करणाऱ्याच्या ( देवाच्या ) मुख्यास-इंद्रास. ७. या आश्रमास-**पंत.** ८. प्रसिद्ध-**पंत.** कवि. ९. [ माझ्या ] मना. १०. सहा महिन्यानीं. ११. पार्वती. १२. स्मरण.

स्वस्वाश्रमीं[1] तपें अवलोकाया कामदा[2] श्रमतयांतें
द्रुत सिद्धिप्रद नसता, तरि रुचता कां मदाश्रम तयांतें? ९
हे मुनि सहस्रशः प्रभुकरुणेला पात्र जाहले असती.
होइल मदाश्रमींची विफळा कृष्णा! तुला चि कां वसती? १०
कठिनीं च कठिन, मृदुलीं मृदुल, तुजें हृदय वा! जसें तोयः
देवांसि तुजअशासीं श्लाघ्य समागम यदूत्तमा! होय. ११
ब्रह्मण्य श्रद्धावान् तूं, शीलविजितसुरापगातोया[3]!
बहु शुचि तव यश, कृष्णा! व्हाया निर्मळ सुराप[4] गातो या.
कथितों सर्वार्थप्रद जप्य[5] महामंत्र मीं तुला; एणें
वश होइजेल देवें, जेंवि मधुरगीतमोहितें एणें.[6]' १३
नमुनि मुनिप्रति वदलों, 'भगवंता! हा तव प्रसादास
पावो, ग्रनास समयीं व्हाया सुसमृद्ध वप्रसा,[7] दास.' १४
झाले मुनिवाकृश्रवणें मज एक मुहूर्त आठ वासर ते,
देहाच्या गेहाच्या होउ न देतां हि आठवा[9] सरते. १५
सांगे 'सहस्रनाम' प्रभुचें, प्रकटी जयासि तंडी,[10] तें,
जें दृग अविद्येतें करि, जेंवि ज्वलनतेज थंडीतें. १६
दीक्षा देउनि सुदिनीं स्तवराज्याचा करून उपदेश,
सांगे सांबाराधन, कीं ज्यां व्हावें सुसिद्धिसुपदेश.[11] १७
दीक्षित[12] होउनि झालों त्या मुनिवृंदांत आगतप्रथ[13] मीं,
करुनि फळाशन होतों[14] मासीं नियमांत जागत प्रथमीं. १८
उदकाशन द्वितीयापासुनि संपूर्ण पांचवा मासः

१. आपापल्या आश्रमा. २. इच्छा पुरविणाऱ्या (शंकराला). ३. स्वभावानें जिंकिलें आहे स्वर्गंगेचें उदक ज्यानें अशा. ४. मद्यपी. ५. जप करण्यास योग्य असा. ६. हरिणानें. ७. शताप्रमाणें. ८. मुहूत झाले, सरते हि झाले–**पंत.** ९. आठवणीला. १०. उपमन्यूचा गुरु. ११. चांगली सिद्धि व चांगलें पद याचा स्वामी. १२. शिवदीक्षायुक्त. १३. मिळाली आहे प्रसिद्धि ज्याला असा. १४. ध्यानधारणादि नियम दक्षतेनें पाळीत होतों.

की परमार्थपरां तप 'मीं च' म्हणे 'हित, न सांचवा मास.[1]' १९
शंभुपदीं शिर, होतों एक पदावरि उभा, वहायास,
परमार्थेच्छु कवण बुध न करिल सुतपीं शुभावहायास[2]? २०
षष्ठारंभीं दशशतरवितेज्याचा विलोकिला पुंज,
जो विवि[3]धवर्णशतमखचापशतद्युतिविलासिनीकुंज. २१
बहु च[4]पला, बहु नील[5]श्वेतारुण मेघ रेखिले होते,
कोणी ही अ[6]त्यद्भुतदर्शन नसतील देखिले हो! ते. २२
त्यांत सुनीळ सुनिर्मळ तेज्याचा भव्य देखिला राशीः
मन्नयनासि तसें, शुभ दे[7]शें जसें भ[8]व्य दे खिलारासी[9]. २३
त्या नीलवर्णतेजोराशींत प्रभु दिसे सदार मला,
ज्याच्या स[10]दापदाहरपद्भजनीं दास हा सदा रमला. २४
होतां उमामहेश्वरदर्शन, मन बहु निवोनियां रमलें;
यु[11]गपत्समुदित ज[12]लदस्थित शशिभास्कर, असें मला गमलें.
शोभवित तेज होतीं निजतेजें भगवती उमा पतिचें,
ब्रह्मांड भरुनि उरलें ऐसें सौभाग्य तें उ[13]माप तिचें. २६
झाला उत्फुल्लनयन रोमांचितकाय परमलाभानें,
सोडु नये चि पळ, क्ष[14]णभरि सोडियलें चि पर मला भा[15]नें. २७
शरणागतिनें दिसला देव श[16]रच्छशिसुधारसवलक्ष,
जो दुर्लभ करितां हु[17]तकरिकरसमघृतसुधार सव लक्ष. २८
वर्णील अळंकारा, आकारा, कोण आयुधा? त्याचें

१. मास. २. कल्याणप्रद श्रम. ३. शेकडों रंगांबेरंगी इंद्रधनुष्याची प्रभा हीच कोणी क्रीडा करणारी स्त्री, तिचें संकेतस्थान. ४. विजा. ५. निळे, पांढरे व तांबडे. ६. अत्यंत आश्चर्यकारक आहे दर्शन ज्याचें. ७. सुपीक—हिरवागार—प्रदेश. ८. मुख. ९. गाईंच्या कळपाला. १०. साधूंचीं संकटें दूर करणाऱ्या चरणाच्या सेवेंत. ११. एकाच वेळीं उदय पावलेले. १२. मेघपटलांत असलेले. १३. पुष्कळ. १४. दहा पळें. १५. देहभानानें. १६. शरदृतूंतील चंद्र व अमृत यांप्रमाणें शुभ्र. १७. हवन केल्या आहेत हत्तीच्या सोंडेसारख्या तुपाच्या धारा ज्यांत असे.

सर्व हि अत्यद्भुत; तें गाया अत्यल्प आयु धात्याचें, २९
अत्यद्भुत मुकुट शिरीं, अत्यद्भुत कुंडलें, कुरुक्ष्मापा[1]!
अत्यद्भुत अंगदयुग[2], अत्यद्भुत हार, पांडवा! बापा! ३०
शूलगदावज्रपरशुचापप्रमुख महायुधें धरिते
बहु भुज विलोकिले, जे भजकासि भवार्णवांत उद्धरिते. ३१
जो तों[3] प्रभुचा शुद्धा सत्वाआंतील शुद्ध भुज गाभा,
आहे पदाश्रित म्हणुनि केवळ न त्यजुनि शेषभुजगा भा[4]. ३२
जो विशद यश प्रकटुनि करितो कल्याण चिर विभु जगाचें,
यज्ञोपवीत वीतक्रिय[5] विप्रयशोर्थ मिरवि भुजगाचें. ३३
दिव्या अनेकवर्णा भव्या आगुल्फलंबिनी[6] माळा,
पडुनि गळा, पाय धरुनि, म्हणती जाणों, 'स्वदास सांभाळा.'
यश वस्त्राचें मिरवी शार्दूळाचें[7] चि अजिन, वलयाचें[8]
अहि, भस्म चंदनाचें: वर्णावें काय अजि! नवल याचें? ३५
प्रमथपरिवृत[9] प्रभुचा झाला, सत्प्रेक्षणीय परि, वेष
दुःप्रेक्ष्य, शरत्काळीं चंडकर[10] जसा, जयासि परिवेष[11]. ३६
एकादशशत रुद्र प्रभुतें सद्भक्तवज्रवर्मांतें[12]
होते स्तवीत, गावुनि मधुर प्रभुच्या चि भव्य कर्मांतें. ३७
आदित्यसाध्यविश्वेदेववसुप्रमुख सर्वसुरसहित
वर्णन[13] करीत होते, जें हृतपीयूषगर्व सुरस हित. ३८
इंद्रोपेंद्र ब्रह्मा हे मधुर रथंतराख्य[14] सामातें
बहु निकट गात होते, ज्यां प्रभु चि म्हणे, 'विशंक गा मातें.'
आले होते योगी, देवर्षि, महर्षि, सिद्ध, चट सारे.

१. कुरुदेशाधिपते धर्मराजा' २. बाहुभूषणाची जोडा. ३. प्रभुचा प्रत्येक भुज. ४. तेज. ५. त्यक्तकर्म असा. ६. घोट्यापर्यंत लोंबणारी. ७. व्याघ्रचम. ८. कळ्याचें. ९. पिशाचगणानें वेढलेला. १०. सूर्य. ११. तेजोवलय, तेजाचे खळे. १२. सद्भक्तांचें वज्रतुल्य चिलखत च अशा. १३. वर्णन. १४. मागे अ० ३।८ पहा.

तो समुदाय उदधिसा, मीं [1]मुनिसा, देवदेव वटसा, रे! ४०
[2]खनिमेष हि आले, मग येतिल न यज्ञवृक्ष दर्भ कसे?
सकळ पदार्थ मिळाले, प्रियदपितृपदासमीप अर्भकसे. ४१
बा! [3]पल्वलें हि आलीं, यावें धावूनि केंवि न घनांहीं?
होउनि मूर्त मिळालें विश्व तयामाजि [4]एक अघ नाहीं. ४२
गंधर्वांच्या भरिलें होतें नभ सर्व मधुर तानाहीं.
वाटे गानीं तैसी कोणा हि रसांत मधुरता नाहीं. ४३
नृत्यांत अप्सरांचे तोडिति [5]हृत्सह चि सर्व [6]थाक थवे.
एवं प्रभुप्रसादें जो उत्सव तो न सर्वथा कथवे. ४४
सांब सदाशिव जेव्हां वर द्याया मजपुढें उभा राहे,
ब्रह्मादि विश्व सर्व हि माज्या चि मुखांबुजाकडे पाहे. ४५
शक्ति मज महादेवा देखाया कीं स्तवावया नाहीं
ऐसें झालें, [7]धर्मा! गजबजलों, बा! सुचे चि ना कांहीं. ४६
समजे सर्वज्ञत्वें मच्चित्तांतील सर्व नरपा! हें.
देव मज म्हणे, 'कृष्णा! स्तव वद, होउनि विशंक वर पाहें.
आराधिलों असें त्वां पूर्वी शतशः सहस्रशः स्पष्ट,
न गणुनि याहुनि बहुशत वर्षे [8]तपस्याग्रहें महाकष्ट. ४८
त्वत्सम कोण्हीं अन्य प्रिय या लोकत्रयांत मज नाहीं.
बहु असति भक्तरत्नें, तुळितां पुरतिल तुज्या न वजना हीं.' ४९
वदतां असें प्रसादें, प्रभुच्या केलें पदा शिरें नमन,
झालों मग्न स्तवनीं, म्हणत चि होतें सदा 'शिरेन' मन. ५०
अंजलि करुनि, '[9]नमस्ते' म्हणुनि, समस्तेश्वरासि 'तूं सर्व,'
ऐसें स्तवनीं वदलों, तेणें संतुष्ट जाहला शर्व. ५१

१. मार्कंडेयऋषीसारखा. २. शून्य आहे (नाहींत) निमेष (पापण्या) ज्याना असे (देव). ३. लहान सरोवरें. ४. केवळ एक हि. ५. हृदयाबरोबर. ६. अवसान. ७. राजा धर्मा! ८. तपाच्या निग्रहानें. ९. तुला नमस्कार असो.

'[1]रज्जूंत सर्प, किंजळ किरणीं श्रुतिसन्मतें विवर्त तसे
बहु जेंवि, तुझा ठायीं पावुनि जग जन्म तेंवि वर्ततसे. ५२
तूं तप, सत्वरजस्तम, विधि, रुद्र, ज्वलन, वरुण, रवि, धाता,
त्वष्टा, मनु, वेद सकळ, यज्ञ, तदंगें[2] हि, तत्फळविधाता. ५३
सकळार्थप्रद तव पद चित्तें ध्यातात संत तत्वरतें[3],
सर्व[4]प्रणतोद्धारीं सदय तुझें हृदय संतत त्वरतें.' ५४
इत्यादि स्तव करितां, झाला संतुष्ट अंधकाराती,
परमप्रसन्नता करि दूर गुहास्था हि अंधकारा ती. ५५
नमुनि निवाले सकळ हि, जेव्हां मज सर्व तापहर पावे:
चंद्र चकोरीं द्रवतां विश्वाचे सर्व ताप हरपावे. ५६
'जय जय!' म्हणुनि, मम शिरीं सुरसंहति[5] वर्षली प्रसूनाहीं,
तो काय जन, जयाच्या धन्यत्वें हर्षली प्रसू[6] नाहीं? ५७
देवीतें, शक्रातें, मातें विजितामृतातिवृष्टीनें[7]
दृष्टीनें पाहे प्रभु कृतरक्षितहृतसमस्तसृष्टीनें[8]. ५८
चरणरजें देवांच्या जो बहु देणार लाज अगमातें,
वात्सल्यें करुनि म्हणे ऐसें तो देवदेव मग मातें. ५९
'कृष्णा! माझा ठायीं उत्कृष्ट भक्ति जी तुझी आहे,
ईतें प्रसिद्ध सुज्ञ ब्रह्मादि समस्त जाणती बा! हे. ६०
मत्प्रीति हि प्रसिद्धा तुझिया ठाईं असे सदा परमा.
न विसंबे पळमात्र हि तुज, माता जेंवि बाळका चरमा[9]. ६१
आराधिला तुवां बहु, देतो वरदेश आठ वर हा, या

---

१. अन्वयार्थ–जेंवि रज्जूंत सर्प तसें (आणि) किरणीं किंजळ (पद्मकेशर) विवर्त (मिथ्याभासानें) वर्ततसे तेंवि श्रुतिसन्मतें तुझा ठायीं जग बहु जन्म पावोनि वर्ततसे. २. त्याचें फळ देणारा. ३. तत्वाविषयीं आवड असणाऱ्या (चित्तें). ४. शर्व=शंकर. ५. देवसमुदाय. ६. माता. ७. जिंकले आहे अमृताच्या अतिवृष्टीस जिनें अशा. ८. उत्पत्ति, स्थिति व लय केला आहे सकल सृष्टीचा जिनें. ९. शेवटच्या, सर्वांत धाकट्या.

माग स्वश्रेय,[१] सुखें न गमो परदेश आठव रहाया.[२] ६२
देतों सुदुर्लभ हि, वर माग, तुज करिन सुखी अदेयशतें.[३]'
ऐसें म्हणे प्रभु मला, विश्वास तसें च कीं वदे यश तें. ६३
मीं त्या तेजोराशिस्थितभक्तमयूरमूर्तवर्षातें[४]
भगवंतातें ऐसें वदलों पावोनि परमहर्षातें. ६४
'धर्मीं सुदृढत्व असोः व्हावा समरांत शत्रुचा घात;
यश बहु विमळ मिळावें, लाजावा मज महाबळा वातः ६५
हा त्वद्भक्त असावा अचळ योगें सदैव संपन्न;
व्हावें म्यां विश्वाला परमप्रिय सर्वदा जसें अन्न; ६६
द्यावें पुत्रशतांचें शत, या विश्वास आठवायासः
तव सन्निधान, हा वर बा! वरदा! दे च आठवा यास.' ६७
वरयाचना अशी जी केली, शंकर म्हणे 'तथास्तु' तिला.
सेविल न सुधा किंवा भेदिपशुश्रुति[६] च या कथास्तुतिला. ६८
त्रिजगन्माता सुयशःकर्पूराची अनादि जी कदली,
दिव्यतपोनिधि देवी[७] धात्री[८] मज सर्वपावनी वदली. ६९
"कृष्णा! तुज भगवंतें सुतरत्न दिलें अनर्घ्य अनघातें,
मज गुहसा यश देइल जांबवतीस स्वशत्रुजनघातें. ७०
'सांब' असें नाम तया ठेवावें, सविधि बारसें करुनीं;
विश्वासि विधु तसा तव हृदया निववील बा! रसें[९] करुनीं. ७१
मद्वात्सल्यें माजी 'तूं ही दे' म्हणुनि पुरविली पाठ;
आठ प्रिय वर माग; प्रभुपरि मजला हि 'घे' असे पाठ." ७२

---

१. आपले कल्याण. २. सुखेंकरून परदेशदुःखस्मरण राहात नसते—**पंत.** ३. न देतां येण्यासारख्या शेंकडो गोष्टींनीं. ४. तेजोराशीत असलेल्या व भक्तरूप मयूरास मूर्तिमान मेघाप्रमाणे असणाऱ्या. ५. जगानें ज्याचें नांव काढावें असे. ६. भेदवादी हा च पशु, त्याचे कान. ७. पार्वती. ८. माता. ९. अमृतानें ( पक्षीं ) आनंदानें.

जें वंदिलें विधीनें, तत्सुतसुतवंशसंभवानीं,[1] तें
चरणसरोजयुग[*] शिरें नमुनि, असें बोलिलों भवानीतें. ७३
'विश्वजननि! विप्रांच्या ठाईं तिळमात्र ही नसो रोष;
व्हावा पितृप्रसाद प्राप्त, परम भोग भोगितां तोष; ७४
शत सद्गुणपुत्रांचें; प्रीति असावी कुळीं सदा माते!
मातृप्रसाद; दाक्ष्य[2] हि; शम हीं, जेणें न जन कदा माते.' ७५
देवी म्हणे, 'दिलें हें कृष्णा! अमरप्रभाव होसील;
सत्य वदावें, ऐसें माझें तैसें तुझें हि हो शील; ७६
षोडशसहस्र भार्या त्यांचा ठाईं असो प्रियत्व सदा;
धनधान्याद्यर्थाला, व्यय करितां, क्षय तुझ्या नसो चि कदा;
तुज बांधवांकडून प्रीति सुविपुला दिली घनश्यामा!
तैसी च काम्यता[3] तव देहीं बहु लाजवावया कामा;[4] ७८
सप्ततिशत† अतिथि तुझ्या सदनांत सदा सुतृप्त होतील,
तत्कांचनपात्रीं बहु पायस[5] तव सूदवर्ग[6] ओतील.' ७९
देवानें आठ दिले, देवीनें वर दिले असे सोळा,
केले म्यां चोवीस प्रेमें तत्पादरेणुसे[7] गोळा. ८०
यापरि परमेश्वर वर देउनि तत्काळ जाहला गुप्त;
विस्मित झालों, स्वप्नीं अद्भुत पाहोनियां जसा सुप्त. ८१
हें अत्यद्भुत कथिलें वंदुनि उपमन्युला नृपा धर्मा!
तो सात्विकभावाहीं परवश होऊनि पावला शर्मा. ८२
उपमन्यु म्हणे, 'दाता कीं करिता शूर शर्वसम यज्ञ
कोणहीं देव नसे; बा! कैंचे सर्वत्र सर्व समयज्ञ?'" ८३

---

१. ब्रह्मदेवाच्या नातवाच्या (वैवस्वतमनूच्या) वंशात जन्मलेल्यानी (मानवानी).
२. कार्यकुशलता. ३. सौंदर्य. ४. मदनास. ५. खीर. ६. आचारी लोक.
७. त्यांच्या चरणरजांसारखे. * पदकमलद्वय. † सात हजार.

# अध्याय सहावा.

व्यास म्हणे, 'पुत्रा ! हो प्रीत महादेव, या स्तवा पढ गा !
या पाठकताप[1] सुजय, मेघांच्या जेंवि बर्हिताप[2] ढगा. १
या स्तवराजें जैसा पीयूषरसें पिपासुताप[3] सरे,
ब्रह्मांडीं कीर्ति, जशी शारदशशिचंद्रिका, सुता ! पसरे. २
मेरुनगीं सफळ करी माजें स्तवराज सुतप हा, यास
कीर्तित होतों प्रेमें तापस मीं योग्य सुत पहायास. ३
होता मनोरथ स्तवराजावांचूनि सिद्ध आशु कसा ?
झाला, शिवप्रसाद न होतां, कवणासि पुत्र वा ! शुकसा ? ४
धर्मा ! या स्तवराजें सर्व तुझे काम सिद्ध होतील;
शिवकरुणामुदिर भजकचातकवदनांत अमृत ओतील.' ५
मग सर्वदेवसंमत सांख्याचार्य हि म्हणे, 'मला कपिला
ज्ञान दिलें जगदीशें, अतिदुर्लभ अमृतफळ जसें कपिला. ६
बहुजन्में तप तपलों, जपलों, झालों उदास सुज्ञा ! न;
केलों धन्य प्रभुनें पात्र याचा सुदास सुज्ञान.' ७
शक्राचा दयित* सखा, 'आलंबायन' असें जया म्हणती,
तो चारुशीर्ष करुणामय बोले, करुनि शंभुला प्रणती. ८
"म्यां शतवर्षें केलें गोकर्णीं उग्र सुतप, कीं शांत,
व्हावे अयोनिज, अजर, लक्षायु, ज्ञानसिंधु, सुत दांत. ९
धर्मा ! नावडती सुत, सुंदर हि कदापि, जे न कोविद रे !
तैसे चि पंडित हि परि बापा ! कोणास ही नको विद्रे. १०
नसतां शांत, सुताचें बहु ताप चि दे वपु; त्रपाकारी

१. सहज नाहींसा करण्यासारखा. २. मोराचा त्रास. ३. तृषिताचा त्रास. ४. त्वरित. ५. महामुनि कपिल. ६. आलबगोत्रोत्पन्न. ७. जितेंद्रिय. ८. ज्ञाते. ९. कुरूप. १०. लज्जाप्रद. * प्रियकर.

काय न अदांत[1] कश्यपमुनिसि तसा देवपुत्र पाकारी[2]? ११
सर्व हि सद्गुण सोडुनि जातात तया नरा, जरा ज्याला;
आटे[3] प्रबळारिचमूशतमथित्या ही नें[3] राजराज्याला. १२
पुरुषास कांनकोंडेपण[4] बा! करितां चि बायको[5] येतें,
न दिसे तरुत्व म्हणउनि गेलें सोडूनि काय कोयेतें? १३
झाले प्राप्त विपुलगुण सुत, तत्संबंधयोग परि टांचा[6],
तो तैसा लज्जाकर, जेंवि परपटोपभोग[7] परिटांचा. १४
ऐसें मनीं विचारुनि सुविचारें आयतें* वदान्यातें
मागितलें म्हणत्या 'जें इष्ट, असे आयतें, वदा, न्या, तें.' १५
दुर्घटकामपुरविता, दीनांचा आप्त, कामपुर[9] विलया
नेता चि समर्थ जगीं; कोण दुजा आप्तकाम[10] पुरविल यां[11]?" १६
मग वाल्मीकि मुनि म्हणे, "पांडित्यें जाहला मला गर्व,
वेदविरुद्ध चि वदलों, अग्निसह महर्षि कोपले सर्व. १७
मज 'तूं ब्रह्मघ्न' असें वदले ते अग्निसहित मुनि सारे,
तत्काळ त्या अधमें झालों[12] आविष्ट पांडवा! बा रे! १८
गेलों शरण अमोघा अनघा परमेश्वरासि बा राज्या!
पाप पळालें, पुरतें प्रायश्चित्ता न अब्द बारा ज्या. १९
यास्तव दुःखविनाशनं ऐसा कोणी नसे सुरामाजी,
झाली होती आख्या[13], सुजनाग्राह्या[14] जसी सुरा, मांजी[13]. २०
मजकरवीं देवानें धर्मा! करयुग्ममात्र जोडविलें;
परमेश्वरें सुदुस्तर पापापासुनि पळांत सोडविलें. २१

१. अजितेंद्रिय. (या विशेषणावरून इंद्राच्या अहल्याजारत्वावर रोख दिसून येतो.) २. पाकासुरशत्रु इंद्र. ३. आटोपत नाही. ४. लाजिरवाणेपण. ५. बायकोमध्ये च. ६. थोडा. ७. दुसऱ्याच्या वस्त्राचा उपभोग. ८. 'जे इष्ट ते वदा; आयते असे न्या,' ऐसे म्हणत्या वदान्यातें मागितले–**पंत.** ९. मदन आणि त्रिपुर किंवा स्वच्छंदानुवर्ती त्रिपुर. १०. नित्यतृप्त असा परमेश्वर. ११. मनोरथा–**पंत.** १२. पछाडला गेलों. १३. माझे नाव. १४. सज्जनानी ग्रहण करण्यास अयोग्य.

विस्तृत (दूरवर) अशा.

‘तुज कविवर म्हणतिल बुध, यश गातिल सकळ,’ वरद वर दे हा.
किंबहुना ‘धन्य’ म्हणति अमरवर हि शंभुदासनरदेहा.” २२
मग राम म्हणे, “वधिला नींचाहीं[1] श्रेष्ठ मज्जनक राया!
गेलों शरण शिवाला, जेंवि नदा तप्त मज्जन कराया. २३
करिता झालों प्रभुच्या नामाहीं स्तत्य पांडवा! स्तुतिला;
मुख्या हे चि, दुजी जी श्रुति न म्हणति ‘सत्यपांडवास्तु’[2] तिला.
मज देवदेव सत्फळ दे सहदिव्यास्त्र परशु[3] भजनाचें;
सद्यः[4] प्रभु हा चि करी, तैसें न करी च पर, शुभ जनाचें. २५
“पापा न शिव, खळांच्या यांच्या मोडुनि हि कापिल्या मांना,
‘रे सुर हो! या माज्या मत्सम, सोडुनि हिंका[6], पिल्यां माना.’
वत्सा! रामा! अजराजेयामर दिव्यकाय होशील,”
ऐसें वदे महेश्वर, याचें स्तवबेल काय हो! शील? २७
धन्य प्रसाद पावुनि झालों, भजतां भवा, असा राया!
सारत्व सुखें येते भगवद्भजनें भवा असारा या.” २८
विश्वामित्र म्हणे, “मीं क्षत्रिय कुरुकुळविभूषणा! पहिला,
भोगित होतों होउनि अभिषिक्त परंपरागता महिला. २९
जींची कास म्हणे, ‘गे! पावलिस वृथा चि तूं सुधे! नुतिला[8].’
होतों हरित बळें, जी वसिष्ठमुनिकीर्तिसी सुधेनु तिला. ३०
तेव्हां वसिष्ठतेजें धर्मा! मी पावलों परिभवातें;
स्पष्ट बुडालों होतों, बा! गेलों शरण मीं परि भवातें. ३१
होतें आंगीं भटपण, त्याचा आला उंमाप[10] निटकारा,
त्यांत चि मला दुसरिया[11] देता झाला उमापति ‘ट[11]’कारा. ३२
ब्राह्मण्य सुदुर्लभ, परि झालें प्राप्त प्रभुप्रसादानें.

१. कार्तवीर्यपुत्रानां. २. ब्रह्मांडाश्रय–**पंत.** ३. कुऱ्हाड. ४. तत्काल ५. प्रार्थना. (दुष्टाच्या प्रार्थनांना हि न जुमाननां तू त्याच्या माना कापिल्यास तरी त्याचे पाप तुला न लागो, असा अर्थ). ६. हट्ट. ७. माझ्या बरोबर. (परशुरामास). ८. स्तुतीला. ९. क्षत्रियपण. १०. अत्यंत. ११. भट्टपणा, ब्राह्मणत्व.

अभिलषित पदार्थांचीं देतो सत्स्वर्द्रु[1] एक हा दानें. ३३
अनुभवितो रंक, वरुनि अभिषेकातें, विशंक राज्याला;
पावुनि शव अमृतरसा, हा गाधिज तेंवि शंकरा ज्याला.[2]" ३४
हरिसख गृत्समद म्हणे, "गेलों होतों महेंद्रसत्रास.
चुकलों सामीं[3], झालों मनुसुतशापेंकरूनि सत्रास[4]. ३५
चाक्षुषपुत्र[5] म्हणे, 'रे ! केला कीं सत्रघात, तूं पापी
एक अयुत अष्टादशशत वर्षें हरिण हो' असें शापी. ३६
होती पूर्वस्मृति, मज तृणसम जन्हि उडविलें अशुभवातें[6];
गेलों शरण, नरेशा ! शापें होवूनि मीं पशु भवातें. ३७
स्वमति मज म्हणे, 'वारुनि चित्तांतिल हानिलाभ-गलबा[7], गाः
नारिल भावें, न रुचे लव हि उमाजानिला भगल बा ! गा !'
वळवावया करावें काय पतितपावना[8] तप शुभ जनें ?
द्रवला स्वयें चि पशुपति देव अतितपा[9] वनांत पशुभजनें[10]. ३९
भेटुनि देव मज म्हणे, 'अमरत्वें जिष्णुसीं च तुकशील:
चुकशील न च कधीं, हो जितवाणीपाणिवर्तिशुकशील.[11]' ४०
बापा धर्मा ! कोणी विद्येनें मजअसा कवी नाहीं.
प्राचीनाहीं जेसे, तैसे कर जोडिले नवीनाहीं. ४१
वत्सळवर हर, उपमा न च कोठें राजपुंगवा ! यास:
प्रेम बहु चाटवाया कीं लावी इतर हुंगवायास." ४२
पुनरपि कृष्ण म्हणे, "मीं पूर्वीं साहोनि ताप सत्वानें,
प्रभुतें प्रसन्न करिता झालों निर्दोष तापसत्वानें[12]. ४३
वदला शंभु असें, 'त्वां शुचि तप केलें धरूनि विश्वास;

१. मज्जनाचा कल्पतरु. २. जगला. ३. साममंत्र म्हणण्यामध्यें. ४. सत (विद्यमान आहे) त्रास ज्याचे ठिकाणीं असा. ५. [ तो ] चाक्षुष मनूचा मुलगा ६. अकल्याणरूप वाहटळीनें. ७. हानिलाभविषयक गडबड. ८. शंकरास. ९. ढोंग. १० हरिणाच्या ( माझ्या ) भक्तीनें. ११. जिंकिलें आहे सरस्वतीच्या हातावरील पोपटास ज्यानें असा. १२. तपश्चर्येनें.

होसील, अंतरात्मा जैसा, प्रिय तूं तसा चि विश्वास.' ४४
पूर्विल अवतारीं मीं बहुत चि मणिमंथपर्वतीं जपलों,
शरदयुतसहस्रांचें सहस्रशत सुदृढनिश्चयें तपलों. ४५
भगवान् प्रसन्न होउनि, भेटुनि मज बहुत आदरें द्रवुनीं,
सुख पावलों प्रसादीं, हेमंतीं जेंवि बा! दरिद्र उनीं. ४६
शंभु म्हणे, 'न तव तपीं पाहें मीं वामदेव विवरातें:
मत्प्रेमा मजकरवीं, पुरवाया काम, देवविवरातें. ४७
चित्तीं असेल, तें तूं माग सकळ शुद्धभक्तवशगा या,'
वदला असें, दयामृतनद लावाया कवींस यश गाया. ४८
नमुनि शिरें पद, वदलों, 'त्वच्चरणप्रियनिवासदारा हो
मद्भक्ति, तुझा ठायीं श्रीमदुमासीं शिवा! सदा राहो.' ४९
देव म्हणे, 'दिधलें हें मद्ध्यान समुद्र होउ, मासा हो;
मन्मूर्तिसीं जडो, बहु दयिता तव भक्ति हो, उमा साहो.'' ५०
तों जैगीषव्य म्हणे, 'सुलभ प्रभु, काय कष्ट गुण गाया?
कथितों स्वानुभव, दिलें अणिमाद्यैश्वर्य अष्टगुण गा! या.' ५१
द्याया अजातरिपुला विपुलानंद स्वयें म्हणे गर्ग,
'देता झाला अद्भुत सकळकळाज्ञान कीं मला भर्ग. ५२
तसें चि सविनयांचें, धर्मज्ञसभाप्रपादितनयांचें,
एक सहस्र दिलें मज बा धर्मा! ब्रह्मवादितनयांचें. ५३
वर्षशतायुत दिधलें ससुतास मला युधिष्ठिरा! आयु,
बा! युद्धीं, वरदानीं अतुळ चि हा योगवह्निचा वायु.' ५४

१. शरद=वर्ष. (कोट्यवधि वर्षे). २. वाकडा (पक्षी) सुंदर असा देव; शंकर ३. छिद्रातें, न्यूनातें. ४. तुझे चरण हे च आहे आवडतें निवासस्थान जिचें अशी स्त्री. ५. [तुझ्या] भक्तिरूप सवतीला साहो. ६. सूक्ष्मता, स्थूलता, जडत्व, ऊर्ध्वगतित्व, सर्वाभीष्टप्राप्तित्व, इच्छाऽप्राप्तित्व व इंद्रियजयत्व असे आठ गुण ज्यात आहेत असे अणिमा, महिमा, गरिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, ईशत्व व वशित्व एतत्संज्ञक ऐश्वर्य. ७. वृष्णिकुलोपाध्याय. ८. धर्मज्ञ मंडळींच्या सभेंत संमत आहे आचरण ज्याचें. * देवलगुरु.

त्यावरि पराशर म्हणे, 'मद्वचनातें हि परिस अनराते[1]!
शिवचरण सुरा, असुरा, बहुवरद नरा, तसेच अनरा ते. ५५
पावे हा हि, पसरुनि प्रभुसि तपःपद्र विप्र भव्यास.
झाला सुत सुज्ञ, अजर, अमर, तपःपद[2], रविप्रभ, व्यास. ५६
कौंतेया! या लोकीं सत्यवती होय अदिति; हा साचा
विष्णु स्वयें प्रकटला, कर्ता जगदिष्टसदितिहासाचा[3].' ५७
मांडव्य म्हणे, "धर्मा! मीं नृपदूतांसि भासलों चोर,
केलों शूलप्रोत[4], व्यसन असें प्राप्त जाहलें घोर. ५८
व्यसनीं वदलों, 'शंभो! अंत पहातोसि काय? बा! धावें.
दीनासि दीनबंधो! दुःख, स्मरतां न पाय, बाधावें.' ५९
प्रभु दे अभयवर जसा बुडतां अवलंब[5] बाप दे हातें,
कळवळुनि म्हणे, 'वत्सा! बाधो तुझिया न ताप देहातें. ६०
सत्वर शूळापासुनि होइल माज्या वरें तुजी सुटका,
तुज कर्मविपाकाचा[6], मज याया शरण, दाविला चुटका. ६१
आधिव्याधि न शिवतिल तुज, बहुतीर्थाभिषेक घडतील;
स्वर्ग दिला अक्षय; तव तेजें भंगोनि षडरि रडतील. ६२
अर्बुद वर्षें वत्सा! मत्पदसेवापरा! सुखें वांचें;
घे सुख, जें अमृताच्या वरि भूदेवा! परासु खेंवांचें[7]. ६३
शूलप्रोतीं, दर्शन देउनि, करुणा असी करी गाया!
पीडा, व्रीडा पावुनि गेलि च सोडूनियां शरीरा या." ६४
भगवत्प्रसादकथनें सर्वांहुनि अधिक तोष गालव[8] दे;
स्वानुभवातें, अमितें हर्षें उत्फुल्ल करुनि गाल, वदे. ६५
"धर्मा! परिस प्रभुची कथितो तुज शक्ति, चाल[9] गालव हा;
कोणास हि न म्हणों दे ज्याच्या पदभक्तिचा लेंगा[10] लव 'हा!'

१. अजातशत्रो! २. तपाचें आश्रयस्थान. ३. जगाचें कल्याण करणाऱ्या उत्तम इतिहासाचा. ४. सुळावर चढविलेला. ५. आधार. ६. कर्माचे परिणामाचा; दैवाचा. ७. आलिंगनांचें. ८. विश्वामित्रशिष्य. ९. वर्तनक्रम. १०. लाभ. ( आश्रय ).

श्रीगाधिजमुनिजवळि श्रुतिशास्त्रें सांत सर्वही पढलों;
श्रीगुरुपदप्रसादें पदवीस प्राज्ञमंडळीं चढलों. ६७
गेलों गृहासि, माता धावुनियां माझिया गळां पडली,
'असता तव तात, सुखी होता,' ऐसें म्हणोनियां रडली. ६८
'स्वाधिकसाक्षरपुत्रप्रेक्षणजन्यें महासुखें धाता,
म्हणता, 'यश वदतों, मज देता जरि काय बहु मुखें धाता.'
धैर्यातें अश्रुसह चित्तीं, करुनि विलाप चिर विविध, वेचीः
अर्चि घृतासि, तसि दशा माझ्या हृदयासि विरविं विधवेची.
गेलों शरण शिवाला, भजलों मीं सर्व ताप साहून,
बहु मानिलें प्रभुवेंर मज त्या त्या सर्व तापसांहून. ७१
म्हणतां 'माग,' म्हणें मीं, 'द्यावें मज्जनकदान; होतां तें,
सर्व हि असोः मज मृतें शोकीं मज्जन कदा न हो तातें.' ७२
'जा, भेटेल पिता तुज गुरुभक्तिपरा सुता, तदा नातें
निवविल वहु' वदुनि असें, दे देव परासु तात-दानातें. ७३
आज्ञा होतां, प्रभुतें वंदुनि, आलों गृहासि लवलाहें,
लवलाहें हर्षभरें, कीं श्रीपदपद्मधूळिलव लाहें. ७४
गेलों गृहासि मीं जों स्मरत स्मर-तम-इना शरण्यातें,
तों आला तात, जसा पूर्वी जावूनि ये अरण्यातें. ७५
इष्टि करूनि वनातें जाउनि, घेउनि फळादि वन्यातें,
आला; बा! अत्यद्भुत, कथितां न गमेल सत्य अन्या, तें. ७६
जितुकें वय, जो वर्ण, ज्ञान जसें, जेंवि काय होता, तें
सर्व यथास्थितः वाटे, ठकिलों कुतुकार्थ काय हो! तातें. ७७

---

१. आपल्यापेक्षा अधिक सुशिक्षित पुत्रास पाहिल्याने होणाऱ्या. २. संतुष्ट होता. ३. अग्नीची ज्वाला. ४. त्या प्रसिद्ध अशा. ५. झाले असता. ६. लवला आहे. ७. मंगलकारक चरणकमलाचें रजःकण. ८. मदनरूप अंधकाराचा नाश करणाऱ्या सूर्यास ( शंकरास ). ९. पाक्षिक यज्ञविशेष. १०. रानातील पदार्थांस. ११. शरीर. १२. ठकलो गेलों. ० मृत पित्यामुळे.

द्रवला प्रेमें बहुत चि तात मज चिरागतास पाहून,
वदला, 'नसेल कोठें तप पूजित माझिया तपाहून.' ७८
'ये वत्सा ! ये वत्सा !' ऐसें मज गहिवरोनि बाहूनीं,
*नमितां, माथां हुंगुनि, आलिंगी कडकडोनि बाहूनीं. ७९
ऐसें हें अत्यद्भुत धर्मा ! प्रभुचें वदान्यपण साचें,
शंभुयशें रोमांचित होउनि, वपु होय मित्र पणसाचें. ८०
बहु शोक ताप तैसे सोडुनि या काय गालवा जावे?
स्तव जप न कळो, केवळ 'हर ! हर ! हर !' म्हणत गाल वाजावे."
श्रीकृष्ण म्हणे, " धर्मा ! वदला उपमन्यु मुनि असें तो कीं,
' परमेश्वरपद्भजनें सकळ हि पुरुषार्थ सुलभ या लोकीं· ८२
शरण शिवाशि न जाती, जे तामस पापमलिन राजस जे;
जो शुद्धचरित सात्त्विक भवभजना तो चि साधुराज सजे.८३
शक्रत्व, ब्रह्मत्व हि, विष्णुत्व हि भक्तितुष्ट भव देतो;
वरदवर दयासागर ' नाहीं ' ऐसें कदापि न वदे तो. ८४
इतरें असो कसा तरि आचरणें, सर्वथा भवीं तरतो,
जो परमेश्वरभक्त, व्यक्त महामुनिसमान बा ! नर तो. ८५
प्रभुसि मनें चि शरण जे गेले, ते सर्व अमळनय नाकीं
सेविति सुरसम हितें सुरस, महित होवूनि, कमळनयना ! कीं.
मारिल तृषिता, न मिळो देवुनि, फोडुनि तडाग, तोय, जना,
पापें लिप्त नव्हे, बा ! प्रभुचा जरि काय करिल तो यजना.८७
पीडू जना, काळि जसा लाउनि दावा नळा, समग्रा, मीं
जाणें त्या शिवयजनें शुचि, जो दावानळासम ग्रामीं· ८८
न म्हणे शिवप्रपन्ना माजी ' संसारचक्रवशग ' मती,
कीं स्मरेहरचरण हरि, ब्रह्मवधाद्यखिल दोष शश गमती.' "
यदुनाथ म्हणे, "धर्मा ! श्रीशिवपद्भजन विश्वपावन गा,

१. आर्या० खड २ रा, पृ० ७४, टीप ८ वी पहा. २. प्रभुच्या (?). ३. भक्तास.
४. शिवाला शरण गेलेल्यास. ५. शंकराचे चरण [हे] सिद्ध. * 'मी' हा कर्ता.

सोडुनि यासि, सुरांच्या कोण सुधी जन म्हणेल ‘पाव’ नगा?
शिव चंद्र, चकोर चि, कीं शिव मुदिर, मयूर साधु चातक वा,
शिव जीवन, यावांचुनि लव हि न देहांत साधुच्या तकवा.
आम्हां तुम्हां समस्तां भक्तां द्यावीं अभीष्टवरदानें,
हें चि वरव्रत घेउनि, उद्धरिले नत अनंत वरदानें.” ९२
ऐसें अद्भुत केलें श्रीकृष्णें प्रकट सद्यश तपानें,
जेणें शुद्ध करावें, घडलीं असतां हि मद्यशतपानें. ९३
वदले साधु मयूरा, ‘शुकसम गमसी बरा शिशो! भावें:
हरिहरपदार्पित दळ हि होउनि जितरत्नराशि शोभावें.’ ९४

# अध्याय सातवा.

ज्यांतिल कथांहुनि सुधावृष्टि गमे हर्षदा न धर्मा तें
हें पर्व, यांत सेविति बुध पावुनि हर्ष दानधर्मातें. १
अन्नोदक भूवस्त्रच्छत्रोपानत्सुवर्णगोदात्या
जें पुण्य, म्हणे ‘स्वाधिक’ गंगा, यमुना, शतद्रु, गोदा, त्या. २
ब्राह्मणमाहात्म्य बहु श्रीमद्गंगातनूज वदला हो!
कीं जन याच्या श्रवणें जोडुनि शुचि सुकृत, उच्चपद लाहो. ३
“अयश न आलें, न स्त्री लक्षिलि, रक्षिलि यथोक्त मही ज्यां, तें
द्विजभजनबळ; नृपा! किति वर्णूं मीं भूमिदेवमहिम्यातें? ४
श्रीकृष्ण ब्रह्मण्य ब्राह्मणमाहात्म्य जाणतो; या तें
पूस, म्हणे जेंवि तृषित चातक जलदासि, ‘आण तोयातें.’”
धर्म म्हणे, ‘श्रीकृष्णा! कथितो तुज शांतनव पुसायास,

१. कल्पवृक्षास. २. मेघ. ३. श्रेष्ठ असें व्रत. ४. पोपटासारखा (पक्षी) शुकाचार्यासारखा. ५. तुळशीचें (पक्षीं) बेलाचें पत्र. ६. अनुशासनपर्व (पक्षीं) मकरादि पर्वणी. ७. उपानत्=जोडा. ८. शरयू. ९. भीष्म.

वि[1]... वदतां व्हावें याचें वहु शांत, न वपु सायास.[2] ६
कृष्ण म्हणे, "म्हणतो जो 'गर्व मजपुढें करूं नको' पविला,
प्रद्युम्न भूसुरांहीं कांहीं विप्रियें[3] करून कोपविला. ७
तो प्रद्युम्न मज म्हणे, 'आहे गुण कोण विप्रभजनांत?
'जी! जी!' म्हणुनि, नमुनि कां व्हावें दाटूनि विप्रभें जनांत?'
वदलों मीं, 'प्रद्युम्ना! सुज्ञा! बापा! असें कसें वदसी?
आम्हां मुख्य जयप्रद विप्राशीर्वाद, न च असा सर्दसी.[6] ९
आर्धी पात्र ब्राह्मण सर्वांच्या वंदनास दैवत रे!
संसारीं सुख भोगुनि, विप्रभजक, नंदना! सदैव तरे. १०
कुळपूज्य तुझा आजा वसुदेव हि देवकी हि आजी, जी
विप्रांसि करिति, जैसे चातक मेघांसि, करुनि 'आ' 'जी! जी!'
सुख द्यावया समर्थ ब्राह्मण, अत्यंत दुःख अथवा; हे
सर्वांहीं पूजावे, हा धडक अनादि राजपथ वाहे. १२
पुत्रा! ब्राह्मणपूर्वक, सर्व हि जे लोक आणि लोकेश.
सत्त्याज्य, पात्रदूषक, जो विप्राभक्त, होय तो केश. १३
पहिली भस्म कराया, क्षिप्र रचाया हि नूतना सृष्टी,
जाण यथार्थ, समर्था विप्रांची ईशशक्तीसी दृष्टी. १४
आयुष्य, कीर्ति, यश, बळ, फळ हें द्विजपूजनीं सुता आहे:
साहे न क्षिति यांच्या आहिता, जरि नैगशता सदा वाहे. १५

१. मूळांत या ठिकाणी 'वि' एवढें अक्षर दिसत आहे. पुढील अक्षरावर शाईचा डाग पडला आहे व त्यावर हरताळ आहे. अंत्याक्षर मानुस्वार व फाट्याचें (उकारी वगैरे) आहे. चातुर्मास्याच्या प्रतींत 'वदतां व्हावें याचें चित्त चि' व कोल्हापूरचे पंतभक्त दाजाबावा पुजारी याच्या प्रतांत 'कीं विवदता हि व्हावें' अशा रानानें मात्रा भरून काढल्या आहेत! २. आयासें सहित—पंत. ३. अनिष्ट. ४. कृष्णरुक्मिणीपुत्र. ५. तेजोहीन. ६. चांगली तरवार. ७. ब्राह्मण आहेत पूर्वी ज्यामध्यें. ८. सज्जनांनीं त्याज्य. ९. भोजनपात्र दूषित करणारा (पक्षीं) सत्पात्राला दूषित करणारा. १०. शेंकडों पर्वतांस.

प्रद्युम्ना! मीं 'आपण ईश्वर' ऐसें मनांत आणून,
कैसा आदर न करूं, विप्र तपोनिधि समर्थ जाणून? १६
म्हणसिल हो एखादा! पात्र करुनि रक्तनयन कोपा 'हूं!'
विप्र महद्भूत, तया होउनि तूं त्यक्तनय नको पाहूं. १७
ज्या प्रेमें स्वापत्या, त्या प्रेमें ब्राह्मणासि पोसावें:
कल्याणार्थ, सुनेनें सासूचें जेंवि, तेंवि सोसावें. १८
शत पथ आहेत, परि क्षेमपथ नसे चि या पथापरिस,
पुत्रा! स्वानुभवाची कथितों, ती आदरें कथा परिस. १९
हरिपिंगल, चीरवसन, कृश, दीर्घश्मश्रु, बिल्वदंडधर,
बहु उच्च जो प्रमाणें जैसा विंध्याभिध प्रचंड धर, २०
ऐसा एक ब्राह्मण हिंडे या द्वारकेंत येऊन:
तें तेज तसें आलें, ग्रीष्मीं दुःसह जसें चि ये ऊन. २१
हिंडे राजपथांत प्रकट सभाचत्वरांत यदुनाथा!
प्रद्युम्ना! तो गाय स्वाभिप्रायप्रकाशिका गाथा. २२
'सत्कारुनि, दुर्वासा,ब्राह्मण कोणी गृहांत वसवील?
बसवील दैवतापरि, सुखवील, न कोपवील, हसवील?' २३
उच्चस्वरें करुनियां गाथा सर्वत्र गाय हिंडत या:
ग्राहक न मिळे, सुयशोवस्त्रांचें जें तदुक्त दिंड तया. २४
स्वगृहांत वसविला म्यां, सफळा व्हाया स्वसंपदा, नमुनीं:
स्वोग्रत्वें देता जो प्रथम चि सर्वांसि कंपदान मुनी. २५
वसला माझ्या सदनीं तो दुर्वासा मुनींद्र मन्नमनें.
तें तें सिद्ध असे बा! जें त्याच्या वांछिजेल अन्न मनें. २६
नित्य उपासित होतों आंगें त्या हव्यभुग्रविप्रखरा,

१. संमाननीय व्यक्ति. २. कुशलप्रद मार्ग. ३. तांबुस व पिंवळसर. ४. वल्कलें धारण केलेला. ५. पर्वत. ६. सभागणांत. ७. आपला हेतु व्यक्त करणारें. ८. गीत. ९. गाठोडें, गट्ठा. १०. अग्नि व सूर्य याप्रमाणें प्रखर अशास.

तन्हि तो न तुष्ट, रुष्ट चि: उग्रांशप्रभव[1] उग्र विप्र खरा. २७
तत्सेवेला जपली निजली क्षण ही तव प्रसू[2] नाहीं,
वर्णावी सुकुमारी जी जातीच्या[3] नव प्रसूनाहीं. २८
निजले माजे न दिसा, घटिका हि न राति सूद नांवांचे[4]:
अहि ज्यांत, त्या गृहीं बा! धृति काय अरातिसूदना[5]! वांचे? २९
अन्न बहुसहस्रांचें एके समयीं पळांत जेवि, खरी
प्रळयाग्निशक्ति दावी: तें काय कथूं, पदार्थ जे विखरी? ३०
'नीज सुखें, करितां पदसंवाहन[6], जेव, मायबापा! न्हां;'
मुनिसि म्हणे, कोपे: परि थानीं प्रेम न माय बा! पान्हा. ३१
व्हावें गुप्त, अकस्मात् प्रकट, हसावें, उगें च वरडावें,
नाचावें, धावावें, जाळुनि गृह, वस्त्र ही नव, रडावें. ३२
भलते भलत्या समयीं युक्तायुक्त हि पदार्थ मागे जे,
ते तत्काळ हि देतां, न स्वीकारी: उगा चि रागें जे. ३३
त्यागुनि पलंग, मागे होउनि अतितप्तकाय बाजा च,
कंथा[7] चि आणवी तो: सांगावा फार काय बा! जाच? ३४
सदनीं कन्या, मृदुला शय्या धृततापसा[8] सिता[9] पाहे,
जाय: 'पदार्थ' म्हणे, 'बहु देतिलें[10] मज तापसासि तापा हे.' ३५
ऐसा विलोकिला म्या प्रचुर[11] चमत्कार नित्य नव याचा;
आढळला जन तैसा तितुक्या कोणी च अन्य न वयाचा. ३६
जातां गेला चि दिसे, करि रुसव्याच्या उदंड परि[12] पर[13] तो:
सासूस जांवईसा वाटे गेला रुसोनि परि परतो. ३७
स्वरगकलहीं[14] न ज्याचा मागें, वाहूनि आण, पाय सरे;

१. [आत्रेय व अनसूया यांचे पोटीं] रुद्राच्या अंशापासून जन्मलेला. २. आई. ३. जाईच्या. ४. नांवाला सुद्धां. ५. शत्रुनाशका! ६ पाय चुरणे. ७. गोधडी. ८. ताप झाल्यासारखा होऊन. ९. पांढरी स्वच्छ. १०. मूळपाठ-**होतिल**. ११. पुष्कळ. १२. प्रकार. १३. परंतु. १४. कल्पवृक्षाशी कलह करण्यांत.

प्रकटुनि सहसा चि म्हणे, ‘उष्ण चि पाहूनि आण पायस[1] रे!’
‘ज्याचे, ज्ञान हि अर्पिति, केवळ दासासि न वसु[2], पाय, ‘सखा’
न म्हणों देति सुरतरुसि, तो तूं हें उष्ण नव सुपायस खा.’ ३९
ऐसें म्हणोनि कांचनपात्रीं म्यां वाढिलें सुपायस त्या,
जपलों मुनिस बहु, जशा जपति पतिस करुनियां उपाय सत्या[3].
प्रद्युम्ना! सूदजना सोडूं दे श्वास न मुनि पायसदा[4],
झाला तृप्त प्रभु, कीं, जपलों मीं दास नमुनि पाय सदा. ४१
होउनि तृप्त मुनि म्हणे, ‘कृष्णा! जें शेष राहिलें पात्रीं,
हें पायस लावावें सर्वत्र क्षिप्र आपल्या गात्रीं[5].’ ४२
प्रभुसि ‘अवश्य’ म्हणुनि म्यां पायसशेषें स्वकाय सारविला.
नक्षत्रांसि असो, परि विधुचा संकोच कायसा रविला? ४३
पायसलेपन देहीं दृष्टांतीं सच्छवा[6] रुचो, पडतें
नीट चि युक्ति पहातां हें, कीं मी कृष्ण वारु[7], चोपड[8] तें. ४४
भैष्मीचा ही झाला मुनिवचनें काय पायसा मान्य;
मोडील कोण आज्ञा? बापा! ते काय पाय सामान्य? ४५
मग रुक्मिणीस योजीं, आधीं योजूनियां रथास मज.
विप्रप्रभुत्व, पुत्रा! सादर परिसोनि ही कथा, समज. ४६
जेंवि रथाला घोडा जोडावा, एक त्या दुजी घोडी,
जोडी स्त्रीस तसें बा!, वद कोणाच्या यशीं असी गोडी? ४७
बसुनि रथीं राजपथीं बहु मिरवत चालवि प्रतोदानें[9];
लोका शोकाचीं दे, धरुनि तसो चाल, विप्र तो दानें. ४८
जो जातीपुष्पांच्या[10] नवमाळेसीं च सुतनु तोलावो,
त्या भैष्मीस नृपपथीं विप्रप्रवर प्रतोद तो लावो. ४९

१. खार. २. द्रव्य. ३. साध्वी स्त्रिया. ४. खीर वाढणाऱ्या. ५. शरीरावयवास. ६. सज्जनांच्या कामास. ७. घोडा. ८. चोपडण्याचे पदार्थ. ९. ‘प्रतोद’ हें घोडे, बैल वगैरेंना टोचण्याचें एक साधन आहे. तथापि ‘चाबूक’ अशा अर्थानें त्याचा उपयोग करण्याचा लोकप्रचार आहे. १०. जाईच्या फुलाच्या.

**टोंची मुनि प्रतोदें, उघडि यशाचें कवाड; वाटो च**
**दीन जनांत, परि म्हणें मीं मनिं, 'निःशंक वाडवा! टोंच.' ५०**
**मुनिनें गमे कराया देह सफळजनन टोंचिला गावा**
**कविनीं मुक्तामणिसा श्रुतिभूषण जन नटो चि लागावा. ५१**
**यादव म्हणति, 'दवानळ दुर्वासा, हे लता पहा काय!**
**या उग्र ग्रीष्मीं हे दूर्वा साहेल ताप हा काय? ५२**
**ब्राह्मणजाति श्वश्रू, अससिल कसि वृष्णिसंपदे! सासु?**
**लोकीं बहु दांष्टिक ही ऐसी न सुनेसि कंप दे सासु.' ५३**
**पुर तळमळे तसें हृदतापें बहु जेंवि याद तळमळतें;**
**म्हणति, 'पथरजांत स्त्रीरत्न नलिनमृदुलपादतळ मळतें!' ५४**
**कष्टीं धर्माचरणीं श्वशुरानें योजितां स्वदयितातें,**
**पाहूं, वारूं, न शके जाणों ती विनयवसति दयिता तें. ५५**
**कैकेयीवर मुनि, मीं राम, म्हणति, 'विरह पळ न यो,' ध्याती**
**परिहारोपाया, कीं जाणों न द्वारका, अयोध्या ती. ५६**
**मीं नाकावरि ठेवी वाराया लोक अंगुलीला च.**
**धरिली तापभरातें सर्व जनें स्पष्ट पंगुलीला च. ५७**
**झाले चित्र चि पाहुनि पौरांचे वाटसुर थवे गा! तें;**
**देती मुनिच्या धाकें राजपथीं वाट सुरथवेगातें. ५८**

१ या आर्येचा अन्वयार्थ कोल्हापरचे प्रसिद्ध व्युत्पन्न व पंतभक्त दाजीबावा पुजारी यांनीं स्वलिखित पोथींत पुढीलप्रमाणे दिला आहे—"मुक्तामणिसारिखा श्रुतिभूषण म्हणजे कर्णाभरणरूप जो देह तो कविनीं गावा, ते ऐकुनि श्रोताजन नटो चि लागावा म्हणजे नाचू चि लागावा, अशा अभिप्रायें देह सफळजनन म्हणजे सार्थकजन्म कराया मुनिनें टोंचिला ऐसें मज गमे." २. देह कसा म्लान झाला पहा—**पंत.** ३. रुक्मिणीरूप दूर्वा. ४. यादवलक्ष्मी! ५. जिवत. ६. खाट. ७. कमलाप्रमाणे मऊ पादतळ ज्याचे असे. ८. श्वशुररूप अशा दुर्वासानें. ९. दशरथानें कैकेयीस दिलेला वर. १०. चिंतिती. ११. मानानें किंवा अधिकारानें थोर असणारा मनुष्य नाकावर बोट ठेवून लहानाला आपला निषेध व्यक्त करितो.

भगवंताची सेवा काहींसी द्वारकापुरीं घडली;
धांवडितां रथ, मंथरगति वैदर्भी सती पथीं पडली. ५९
मुनिच्या मनांत होतें कीं, बहुवेग रथा पिटाळावें;
माझ्या चित्तीं सत्वें दुस्तर संकट तथापि टाळावें. ६०
परि भैष्मी स्खलनातें पावे; जें सौकुमार्य, तो दोष;
रोष प्रभुला आलाः गुण हि अगुण होय, जो न दे तोष. ६१
तो मुनि कोपोनि म्हणे, 'तरते सिंधूंत जे नदा भ[illegible]णगा
'दुस्तर' म्हणति, तयांचें हृदय सदुपदेश जेन दाभण गा. ६२
स्खलन समीं राजपथीं पावतसे बायको, समजलाहे
आशयः आली घेउनि एक तऱ्ही काय कोस मजला हे?' ६३
ऐसें वदला, रुसला, गेला टाकुनि रथावरूनि उडीः
मन्मति विकळा झाली, प्राणवियोगकरूनि जेंवि कुडी. ६४
द्रुत दक्षिणेकडे मुनि पायानीं उत्पथें चि तो धावे;
होता गुप्त, तरि सुता! कोठें तच्चरणपद्म शोधावे? ६५
तैसा चि तूर्ण पायसादिग्धतनु, विरोनि आपुल्या आंगें,
'भगवन्! प्रसीद' ऐसें म्हणत द्रुत मीं हि धावलों मागें. ६६
वैदर्भी ही धावुनि ये, प्रार्थी मंजु मौंजियाचितसें,
'न घडेल स्खलन पुन्हा, बैस रथीं हें चि आजि याचितसें.'
वात्सल्यें कळवळला, वळला चि, सुजाण विप्र संभ्रमनें;

१. भगवान् दुर्वासाची २. मंदगति. ३. भीदाने. ४. अडखळून पडली ५. अन्वयार्थ.—जे सिंधूंत तरते (तरणारे) भणगा (भिकार) नदा 'दुस्तर' म्हणति, तयाचें हृदय जेन (बुरणूस) [व] सदुपदेश दाभण [असें] गा (म्हणा). बुरणुसांतून दाभण काढून घेतां च भोंक बुजतें, तसें च लबाडाच्या मनावर सदुपदेशाचा काही च परिणाम होत नाही. (रुक्मिणी लबाडीने अडखळली, असा भाव). ६. सपाट. ७. लवकर ८. आडमार्गाने. ९. खिरीनें माखलें आहे शरीर ज्याचें. १०. अपराधानें. ११. क्षमा करा. १२. मनोभावाने केलेल्या नमस्काराने. * माझ्याप्रमाणें च.

त्वांराधनफळ आम्हां, विश्वास हि, जाणवि प्रसन्नमनें. ६८
तो तेजस्वी मानें सादर पाहुनि म्हणे, ' महाबाहो !
बा ! हो धन्यः स्पर्धा करुनि परमह न तुज्या महा बाहो. ६९
अति दुर्जय परि कृष्णा ! त्वां कोप प्रकृतिनें चि बा ! जितिला.
जी महिषघ्नी देवी योग्य मिळाली च आलि आजि तिला. ७०
इतुक्या दिवसांत तुझें दिसलें नाहीं च तिळ हि आग मला,
सादर गमलासि, जसा चातक मेघासि करुनि 'आ' गमला. ७१
झालों सुप्रीत, मला वांछितवर सर्व माग, अथवा हो
'दे' न म्हणतां चि पूर्ण; ब्राह्मणपद्भक्तिभव्यपथ वाहो. ७२
तें काय योग्य, भक्तें मुख, 'दे' हे शब्द वदत, पसरावें ?
सुभजकहितार्थ कृष्णा ! माजें सर्वार्थपद तप सरावें. ७३
बा ! भाव मनुष्यांचा अन्नीं जोंवरि जसा दृढ असेल,
तोंवरि तसा चि तुझा ठायीं तो भाव निश्चळ वसेल. ७४
त्वत्कीर्तिपुण्य लोकीं नांदेल सदैव पूतनाकाला !
त्वत्पुण्यगुणश्रवणें जातिल होवून पूत बकाला. ७५
स्पष्ट विशिष्टत्वानें तूं त्रैलोक्यांत पात्र होशील,
सर्वां लोकांस प्रिय परम तुझें एक मात्र हो शील. ७६
पात्रादि फोडिलें जें, गृह भूषण वस्त्र जाळिलें रागें,
स्रक्चंदनान्नपान हि जें कांहीं व्यर्थ नाशिलें मागें, ७७
दिव्य यथास्थित सर्व हि किंवा तदधिक गृहीं पहासील,
किंबहुना पुष्पादिक तें देवब्राह्मणां वहासील. ७८
अमृत चि सारविलें हें माजें उच्छिष्ट अन्न गात्रास;
मृत्युंदवाचा नाहीं या सद्गुणपत्रिसद्मगा त्रास. ७९

१. आपल्या सेवेचें फल. २. दुसऱ्याचे तेज. ३. सात्विक स्वभावानें. ४. तव प्रकृति–**पंत.** ५. धर्मार्थकाममोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचे निवासस्थान. ६. तुझ्या कीर्तीचा महिमा. ७. 'जन' असा अध्याहार. ८ हार. ९. मृत्युरूप वणव्याचा. १०. सद्गुणरूप पक्ष्यांच्या [ देहरूपी ] उत्तम वृक्षास.

बा! त्वां देहीं धारिलें जें हें, पायस न, होय पवि[1]कवच:
प्राशामृतसें प्यावें माजें बहु आदरूनि भविकवच[2]. ८०
कां सारविले नाहीं पायांचे मात्र पुत्रका[3]! तळवे?
उरलें अपक्क मृदुपण कीं हें, जेणें फुला हि नातळवे[4]. ८१
हें न मम प्रिय, पायसलेपा केलीं न पात्र पादतळें;
निवड करुनि, तृषितांसीं सुज्ञा! सांगेल काय वाद तळें? ८२
मुनिचा प्रसाद होतां वत्सा! जों आपणाकडे पाहें,
तों पहिल्याहूनि अधिक मीं श्रीसंपन्न शतगुणें आहें. ८३
करुनि प्रसाद मजवरि, वैदर्भीतें हि मग म्हणे विप्र,
'वत्से! मत्सेवेचें सत्फळ, 'दे' न म्हणतां चि, घे क्षिप्र. ८४
सर्वा स्त्रियांत रुक्मिणि! कन्ये! होसील वरयशा पात्र,
पावेल न रोगजरावैवर्ण्यांतें[5] कधीं तुझें गात्र: ८५
दि[6]व्यकुसुमदाम तसें वाहेल सदैव पुण्यगंधातें:
सेव्य गुणांतें होइल हें, जैसें सत्य सत्यसंधांतें[7]. ८६
पुत्रि! वरिष्ठा होसिल हरिच्या षोडशसहस्र भार्यांत:
कीर्तीनें कीर्ति तव हो मान्या, मम माय[8] जेंवि आर्यांत. ८७
आराधन कृष्णाचें नित्य प्रेमेंकरूनि करिसील,
हरिशील चित्त पतिचें, धरिसील सुशील जेंवि हरि-शील.८८
बहु आवडसिल कृष्णा, ती अभ्रमु[9] जेंवि त्यां सदानगंजा[10]:
पतिसह उत्तमलोकीं वससिल, जासि शंभुसह सदा नगजा[11].
मुनि सुवरभूषणांहीं त्वन्मातेतें असें अलंकारी,
लंकारी जो, तो चि प्रभु कार्यांतीं[12] जसा अ-लंकारी. ९०

१. वस्त्राचे चिलखत. २. कल्याण—**पंत.** कल्याणकर वचन. ३. बाळा! ४. ज्या मृदुपणाच्यानें फुलाला हि स्पर्शवणार नाहीं. ५. वैवर्ण्य=निस्तेजता. ६. पारिजातक पुष्पमालेप्रमाणे. ७. सत्यप्रतिज्ञास. ८. अनसूया. ९. ऐरावताची स्त्री. १०. ऐरावत-नामक मदमत्त हत्तीस. ११. गिरिजा. १२. पृथ्वीचा राक्षसभार उतरल्यावर.

भैष्मी चित्तांत म्हणे, 'अगइ! गवसला महाकसाल्याला[1]
देह[2], शिरःस्नात[*] जसा लग्नीं, शोभा पहा कसा त्याला!' ९१
प्रस्थानीं तो भगवान् मुनि कुरवाळुनि म्हणे नतास मज,
'कृष्णा! मेघश्यामा! बा! माझ्या माधवा! मता समज. ९२
आम्हीं शिव, यश द्याया भजकांतें, जाहलों असों देही;
कृष्णा! नित्य ब्राह्मणभजनीं ऐसी च मति असों दे हीं.' ९३
वदुनि असें, तेथें चि प्रभु झाला गुप्त: पुनरपि तयातें
देखावें चि म्हणें मीं स्वःस्थातें[3] जेंवि सुनर पितयातें. ९४
तेव्हां चि प्रद्युम्ना! अतिचित्रा अनुभवूनि या महिम्या,
त्वन्मातेसह, न सरों देतां अर्धार्धमात्र याम हि[4], म्यां, ९५
ब्राह्मण म्हणेल जें, तें सर्व करावें चि सर्वदा साचें,
हें गुप्त व्रत वरिलें: कीं, यांत चि सर्व इष्ट दासाचें. ९६
तदनंतर भैष्मीसह आलों होवूनि मुदित बहु धामीं,
पाहें मुनिप्रसादेंकरुनि चमत्कार उदित[5] बहुधा[6] मीं. ९७
जो काय दग्ध केला होता मुनिनें पदार्थ, जो भग्न,
त्यातें अभिनव पाहुनि, झालों बहु विस्मयांत मीं मग्न. ९८
आंत सदय शांत सदां, दिसला बाहेर मात्र कोपन गा!
प्रभु मद्देहा, गेहा शोभा दे, कुशळ जेंवि ओप[7] नगा[8]. ९९
म्यां देखिलें रुचिर, नव, दृढ, वस्तु सकळ, जया विनाशी[9], तें;
जीं उष्णें, तीं च करिल नयनें न इतर तयाविना शीतें. १००
जें पात्र भंगिलें, जो सुरस उडविला, तया चि सुरसानें
तें पात्र पूर्ण जालें; करि कौतुक काय भूमिसुर सानें[10]? १०१

१. अत्यंत परिश्रमांत सांपडलेला. ('कसाला' हा शब्द पूर्वी शांतिपर्व अ० ७।५७ मध्यें आला आहे). २. देहधारी. ३. देवातें–शक्रातें (पक्षीं) स्वर्गस्थास. ४. प्रहराचा चवथा भाग हि. ५. उत्पन्न झालेले. ६. नाना प्रकारचे. ७. उजळा. ८. अलंकारास. ९. 'दुर्वास' हा कर्ता. १०. लहानसहान. * अभ्यंगस्नान केलेला.

तुडवी, उडवी, पूर्वी कोपोनि न ज्या मनोरमा त्याला,
त्या चि पहाता झालों रम्या फुल्ला गृहांत माल्याला. १०२
जे पूर्वदग्ध, झाले पर्यंक प्रकट शुचि नवे दांतः
विप्रप्रसादज जसे ते देती, तेंवि रुचि न वेदान्त. १०३
ऐसा परमक्षोभ चि झाला परमप्रसाद बा ! गा ! तोः
हा कृष्ण विप्रमहिम्या. इतरांसि म्हणावया 'देवा' गातो. १०४
*त्यापासुनि देहानें, वाचेनें, प्रेमयुक्त चित्तानें,
विप्रांसि रौक्मिणेया ! मी पूजितसें सदैव वित्तानें.' १०५
यापरि कथिलें धर्मा ! म्यां प्रद्युम्नासि तें चि तुज राया !
सत्य वदविलें भीष्में विप्रभजनशुद्धमार्ग उजराया." १०६
रामसुत मयूर म्हणे, 'जाणेल निका मनी चमत्कृतिलाः
नुमजुनि कथे ! न मानिल तुज, तेंवि निकाम नीच मत्कृतिला.'

---

## अध्याय आठवा.

व्यास म्हणे, 'गांगेया ! श्रवण करुनि सर्व दानधर्मातें,
नृप पावला प्रकृतितें, अमृत रोगार्त जेंवि शर्मातें. १
त्वां मेघें केला हा गर्जुनि कौंतेयमोर सानंद,
बोध दिला पुष्कळ या, कृष्णा दे जेंवि गोरसा नंद. २
धर्ममना बोध सुखद झाला, मणिलाभ जेंवि उरगमनाः
आतां आज्ञा द्यावी या कुंतीनंदनासि पुरगमना.' ३
भीष्म म्हणे, "स्वपुरातें त्वां सद्गुणहंसमानसा ! जावें,
स्वपदीं देवेंद्रापरि होउनि बहु पूज्यमान साजावें. ४
सुश्री, सुकीर्ति, होइल गति ही बरवी; प्रजा चि रंजीव.

१. फळास. २. हस्तिदंती. ३. ब्राह्मणाच्या कृपेनें झालले. ४. [ ब्राह्मणापद ] वाका. ५. खरा सज्जन. ६. अत्यंत. ७. स्वस्थचित्त झाला. ८. सर्पाच्या (नागाच्या) मना. ९. मोठें वैभव. * तेव्हापासून.

त्या काळ हि कर जोडी, म्हणती वर विप्र ज्या 'चिरं[1] जीव[2].' ५
वाढे प्रताप सुकृतें, अल्प हि जो अग्नि, जेंवि तो धमनें[2].
लुब्धें धनसंचयसा, संरक्षावा जपोनि बोध मनें. ६
यावासि आणुनि घनश्यामा! सदयासुधारसमयास[3]:
व्हावा सहाय घेउनि करवाळ जसा सुधार[4] समयास. ७
होतां चि उत्तरायण ये मज जात्यास[5] बोळवायास.
मुनि हो ! या सर्व तुम्हीं, स्वपदरजांमाजि घोळवा यास." ८
भीष्मासि धर्म वंदी भ्रात्यांसह, त्या हि केशवासहित,
यत्पदपद्मांचा[6] करि मातृशताहूनि लेश[6] वास[6] हित. ९
करुनि पुढें गांधारीसह धृतराष्ट्रास, शक्रसम हर्षी,
गेला पुरा युधिष्ठिर राजा, सभ्रातृवर्ग, समहर्षी. १०
प्रेषी स्वस्थानाप्रति सत्कारुनि पौरजानपदलोक[7]:
सांत्वुनि हरि स्त्रियांचा दानेंमानेंकरूनियां शोक. ११
शुद्धें चित्तें वित्तें नमुनि यथायोग्य गौरवि, प्राशी
सादर चकोरसा तो कौंतेय सुधांशुगौर[8] विप्राशी. १२
वारी अवृष्टिचा[9] बहु तो भीष्म चि गाधिसुत[10] ऋषी वळसा.
ओळे धर्मघन, सुखी होय जन समग्र हि कृषीवळसा[11]. १३
होता पुरीं युधिष्ठिर लोकव्यवहार चालवीत नयें,
जो कथिला सर्वज्ञें सद्गतिकीर्त्यर्थ जाह्नवीतनयें. १४
सरतां चि दक्षिणायन शांतनवप्रोक्त समय आठवुनि,
साहित्य पुढें चंदनघृतरत्नसदंबरादि पाठवुनि, १५

१ दीर्घकाळ वाच. २. फुंकण्यानें. ३ दयामृतमय अशा ४. चांगल्या धारेची तरवार. ५. [परलोकीं] जाणाऱ्यास. ६. ज्याच्या चरणकमळाचे अल्प हि सान्निध्य. ७. सर्व प्रजाजन. ८. चंद्राप्रमाणें शुभ्र. ९. अवर्षणाचा फेरा. १०. विश्वामित्र. (एका भयंकर दुष्काळात कुत्र्याची तंगडी खाण्याचा प्रसंग आला असता विश्वामित्रानें ऐंद्राग्नेय विधानें चरु कढवून इंद्रादिकांस हविर्भाग दिले, तेव्हां इंद्रानें पाऊस पाडला व त्यामुळें दुष्काळ गेला). ११. शेतकऱ्यासारखा.

गांधारी, धृतराष्ट्र, भ्राते, कुंती, युयुत्सु, युयुधान,
याजक, जनार्दन, विदुर, ज्याचा सज्जनसभेंत बहुमान. १६
यां सर्वांतें घेउनि, अग्नि पुढें करुनि राजराज्याचे,
गेला पाय पहाया गुरुवत्सळ धर्मराज आज्याचे. १७
जावूनि कुरुक्षेत्रीं त्या श्रीभीष्मासमीप तो पावे:
श्रीव्यास नारद निकट ज्याच्या, ज्यांहीं पुमर्थ[1] ओपावे[2]. १८
नानादेशसमागत नृपति मुनि न वदति निकट लेश, तशा
पाहे, गमे पिपीलिक[3] त्या गुडराशीस चिकटले शतशा. १९
उतरुनि धर्म नमी त्यां, जे विपुल[4] अलिप्त[5], जेंवि गगन, मुनी:
वंदला विनयें ऐसें श्रीगंगानंदनासि मग नमुनी. २०
'तो हा नमितो, वदतो, पढविसि तूं मनुजदेव[6] कीरा[7] ज्या:
आला असे पहा तो, जो प्रसवलि तनुज देवकी, राज्या! २१
सस्त्रीक[8] ज्येष्ठ तनय आला आहे, कनिष्ठ[9] ही राया!
नेत्रें उघडूनि पहा राजेंद्रा! सुक्षमुकुटहीरा! या. २२
भीम, सिताश्व, नकुळ, सहदेव तुजे नमिति पाय: हेमा जी
न म्हणे तवचरणरजोधिक, करिती नमन माय हे माजी. २३
नृप, मुनि, कुरुजांगलजन[10], देवर्षि हि, पातला असे व्यास.
आले सेव्य तरुकडे द्विज[11] जेंवि, त्यजुनियां असेव्यास. २४
हे ऋत्विक् सर्व तुझे आले घेऊनि अग्नि समयास;
साहित्य सकळ केलें श्रीकृष्णें, हें सुचेल न मयास[12]. २५
नेत्रें उघडुनि राज्या! आम्हां सर्वांकडे पहा, बोल;
तववचनामृतपानीं झाले आहेत कर्ण हे लोल.' २६

१. चतुर्विध पुरुषार्थ. २. द्यावे. ३. मुंगळे. ४. अमर्याद (पक्षी) थोर अंतःकरणाचे. ५. सर्वव्यापी पण कोणत्या हि पदार्थांत न मिसळणारे (पक्षी) विषयापासून अलिप्त. ६. नृपति. ७. पोपटास. ८. गांधारीसह धृतराष्ट्र. ९. विदुर. १०. कुरु आणि जांगल देशांतील लोक. ११. पक्षी. १२. मयासुरासारख्या कल्पक शिल्पकाराला हि, असा भाव.

उघडुनि नयनें भीष्म, प्रेक्षुनि सर्वांकडे म्हणे धर्मा,
'आलासि बरा समयीं, वत्सा! मीं बहुत पावलों शर्मा. २७
सित[1] पक्ष, माघ कीं हा? शरशयनीं बहुत जाहलों कष्टी,
बापा! वर्षशतसमा म्यां द्व्यूना[2] रात्रि कंठिल्या षष्टि. २८
वत्सा! धृतराष्ट्रा! तूं ज्ञाता, तुज पाठ च्यार ही वेद;
भावि कदापि चुकेना, आतां कांहीं करूं नको खेद. २९
तुजला देवरहस्य व्यासापासुनि असे विदित राज्या!
सत्सूक्ति[3] सेविल्या त्वां, न मिळाव्या संसृतींत[4] इतरा ज्या. ३०
हे पांडुचे जसे सुत, धर्मे तैसे चि सर्व तव राया!
गुरुवत्सळ धर्म, समज अचळत्वें[5] तुल्य पर्वतवरा[6] या. ३१
चिंतामणिची तापा जसि न, करुनि शर्महानि, दे शाला,
सत्संगति तासिः न तुझ्या उल्लंघिल धर्म हा निदेशाला[7]. ३२
पुत्र न ते; अरि दारुण, खळतक्षकसर्पपाक[8], वणवे च.
तच्छोकें तेज्याचा, सुज्ञ असुनि, करिल बा! कवण वेच?' ३३
इतकें धृतराष्ट्राला सांगुनि, मग त्यासि आपगातनय
नमि, ज्याचे रिपु वसले ज्यासह, होवूनि आप[10], गात नय. ३४
'चालाया, बोलाया देसी जीवासि तूं चि देवाद्या!
पुतळीस सूत्रधारक[11] कीं वादक शक्ति जेंवि दे वाद्या. ३५
पांडव आहेत तुझ्या पदरीं, म्यां रीति म्हणुनि निरवावे.
आमन्व तुजपुढें बा त्रिजगज्जनका! कशास मिरवावें? ३६
मज भक्तवत्सळा! त्वां आज्ञा द्यावी शरीर सोडाया,
देशील तूं चि, सुकृत न माज्या पदरांत सुगति जोडाया. ३७
हा घेतो जेणें[12] तव नाम, परा मुख न वासु देवा तें.

१. शुक्ल. २. साठाम दोन कमी, अठ्ठावन. ३. साधचे सदुपदेश. ४. संसारात. ५. स्थैर्यावरून (पक्षी) निश्चयाच्या अटळपणावरून. ६. मेरूला. ७. आज्ञेस. ८. दुष्ट अशा तक्षक सर्पाची पिलें. ९. श्रीकृष्णास. १०. आत्मीय. ११. कळसूत्रें हलविणारा. १२. ज्या मुखानें.

मागेन, भजन सोडुनि, दुसरें तुज सुख न वासुदेवातें. ३८
उक्त न करुनि, सुयोधन दुर्मति बुडवुनि घरा, बुडाला च.
धरिल कसा सद्रस तो, ज्या कलशाच्या घरा बुडाला च? ३९
व्यासें हि नारदें ही तूं मजला मधुरिपो! कळविलास,
तन्हि च तुजपुढें शत्रुश्रीचे दुर्जय हि पोकळ विलास. ४०
नारायणा! त्वदाज्ञा होतां हा, जेंवि मंडपा वेल,
उत्तमलोकासि तुझा सेवक, होवूनि थंड, पावेल.' ४१
कृष्ण म्हणे, "या लोकीं, म्हणसी होऊनि सज्ज, 'न वसूं' तें
रुचलें: जा पाव सुखें भीष्मा! तूं सुज्ञ सज्जन वसूंतें. ४२
या लोकीं तुज कांहीं शांतनवा! लेशमात्र अघ नाहीं.
कामशरांहीं भिन्न प्रभु तूं वज्राद्रि जेंवि न घनाहीं. ४३
मार्कंडेय तसा तूं पितृभक्त. मुनींद्र वर्णिती बा! हे,
यास्तव मृत्यु तव वशीं आनत होवूनि भृत्यसा आहे." ४४
आज्ञा देतां देवें, भीष्म, प्रतिपाल्य जे सदा वपुसे,
पांडव, धृतराष्ट्र, विदुर, सर्व सुहृद्वर्ग जो, तयास पुसे. ४५
'परिसा हो! सर्व तुम्हीं, मागतसे भीष्म हा निरोपातें:
लोभ न देवू सत्या, दे जेंवि ग्रीष्म हानि गोपातें. ४६
रक्षुनि शुद्धयशातें मेळवितें जेंवि सत्य, यश तातें
तेंवि न मेळविलें: हो! हें चि करी दूर अत्ययशतातें. ४७
भूतीं दया असों द्या: व्हा इंद्रियषड्रिपुनिग्रहीं धीट:
सोडुनि अन्य पथ, धरा निजधर्माचारमार्ग हा नीट. ४८

१. [तूं] मागितलेलें. २. छिद्र. ३. न परमेश्वर असल्यामुळें च ४. भीष्म हा अष्टवसूंपैकीं सोमसंज्ञक वसूचा अवतार असल्यामुळें 'तत्स्वरूपानें मिळून जा' असें म्हटलें आहे. ५. वणानीं. ६. पितृभक्त असा न. ७. नम्र. ८. चाकरासारखा. ९. पालन करण्यास योग्य. १०. तयास? ११. अन्वयार्थ–रक्षुनि (रक्षण करून) जेंवि सत्य शुद्धयशातें मेळवितें तेंवि ताते [आपल्या मुलांना] रक्षुनि यश न मेळविलें. १२. शेंकडों संकटांना. * विदरपर्वत (हिऱ्याचा पर्वत).

चैतन्य सम पहावें, गुरु लघु देहें दिसो करी कीट.
ब्राह्मणसत्काराचा येवूं देवूं नका मनीं वीट.' ४९
कथुनि असें, आलिंगुनि धर्मासि, पुन्हां सरिद्वराज म्हणे,
'वा! प्राज्ञ गुरु ब्राह्मण पूजावे त्वां सदैव राजमणे!' ५०
सर्वांसि पुसुनि शंतनुसुत तो राहे मुहूर्तभरि उगला,
फुगला सुखें, मनांत श्रीकृष्णाच्या धरूनि पदयुगला. ५१
वंदुनि चिंतुनि चित्तीं, शांतनवें भक्तवत्सळा हरिला,
ज्या धारणा तयांचा ठायीं आत्मा यथाक्रमें धरिला. ५२
उर्ध्व गति प्राणांची करितां आश्चर्य जाहलें मोटें,
व्यासप्रमुखमुनीहीं जें पाहुनि घातली मुखीं बोटें. ५३
तो ज्या ज्यांत सोडी तत्काळ विशल्य होय तें अंग,
असुनीं तनुचा तैसा त्या शल्यांनीं हि सोडिला संग. ५४
झालीं क्षणें विशल्यें भीष्माचीं वीररससुधापात्रें,
कृष्णप्रमुखांचीं हीं झालीं रोमांचितें तदा गात्रें. ५५
भेदुनि मस्तक आत्मज्योति महोल्का तसें शिरे व्योमीं;
मुनि वदले. 'या तेजीं तें आल्हादप्रदत्व, जें सोमीं.' ५६
'करुनि प्रकाश गगनीं, मग नीरधरांत, जेंवि सवित्याचें
मंडल, अदृश्य झालें तें आत्मज्योति,' म्हणति कवि, 'त्याचें.'
क्षत्ता, युयुत्सु, पांडव, कृष्णागुरुचंदनें चि आशु चिता
उचिता रचिती; त्या श्रीगांगेयाची तसी च वा! शुचिता. ५८
रत्नकनकगंधांबरमाल्याहीं भीष्मदेह तो भावें
धर्म, विदुर शोभविती, जेणें सुकृतें उगें चि शोभावें. ५९
ज्या पाहुनि मृत्यु म्हणे, 'देतो मज, करुनि हा तप, त्रास,'

१. भीष्म. २. आनंदपणं झाला. ३. वृत्ति एकाग्र करून श्वासनिरोध करणें. ४. ब्रह्मांडीं प्राण नेला असता. ५. आश्चर्य प्रकट केलें. ६. वीररसरूप अमृतानें भरलेलीं पात्रें च अशीं (गात्रें). ७. मोठ्या ज्वालेसारखें. (आत्मज्योति). ८. मेघांत. ९. विदुर. १०. कृष्णागरु–(धूपकाष्ठविशेष)–सहवर्तमान चंदनानें. ११. सहज.

त्या प्रभुवरी धरी धृतराष्ट्रसुत युयुत्सु आतपत्रास[1]. ६०
जे झाले[2] माराया ज्या शस्त्रव्रातदातयावरि[3], ते
उडविति धवळ चवरें भीमार्जुन बा ! तदा तयावरि ते. ६१
ज्याचे सुतापसां गुण, कटक[4] जसे सेव्य[5] नुत हिमाद्रीचे,
त्या प्रभुचीं उष्णीषें[6] धरिती सप्रेम सुत हि माद्रीचे. ६२
स्त्रीवातस्पर्श नसे गंगेवांचुनि जया सपरिवारा
कौरवपतिस्त्रिया सुव्यजनें घालिति, तयास परि, वारा. ६३
बहु सामगान[7] झालें, वाटे शोभा तसी न यज्ञांत,
कीं नारदादि जेथें, वर धर्मज्ञांत जे नयज्ञांत. ६४
करुनि पुरावा कृष्णागुरुकर्पूरादिपुण्यगंधाचा,
संस्कारिला यथाविधि देह चिताग्नींत सत्यसंधाचा. ६५
अपसव्य[8] करुनि सर्व हि धृतराष्ट्रप्रमुख सज्जन चितेतें,
वाटे गंगेत करिति यज्ञांतावभृथमज्जन[9] चि ते तें. ६६
गांगेयास व्यासें, गंगोदक नारदें दिलें, असितें[10],
तेणें[11] हि, सुगति पावुनि, अरि बहु वर्णिति जयाचिया असितें[12].
विश्व धवळिलें जेणें स्वयशाहीं चंद्ररश्मिगौराहीं,
त्यासि भरतभार्याहीं सतिळ जळ दिलें, तसें चि पौराहीं. ६८
प्रकट जळदानाच्या अवसानीं भूषणास्यरुचिरहिता[13],
करि परिदेवन[14] दीना देवनदी नारदादिमुनिमहिता[15]. ६९
ती रोदन करित म्हणे, “भारत हो ! भूप हो ! अहो ! मुनि हो !

१. छत्रास. २. [सिद्ध] झाले. ३. शस्त्रसमुदायाचा—बाणाचा वगैरे—वर्षाव करणाऱ्यावर. ४ हिमालय पर्वताचे नावाजलेले कडे. ५. ग्रहण करण्यास (पक्षी) आश्रय करण्यास. ६. किरीटें. ७. सामवेदाचें गायन. ८. उलटा प्रदक्षिणा घालून ९. यज्ञाच्या अंतीं केलें जाणारें अवभृथस्नान. १०. मुनिविशेषानें. ११. त्या कृष्णानें. १२. [नंदकनामक] तरवारीस. १३. अलंकार व मुखावरील प्रभा यांविरहित असा. १४. शोक. १५. नारदादि मुनींनीं स्तविलेली.

वाटे,[1] न जपुनि, न तपुनि, न नमुनि, कोणही श्रमी न होमुनि हो.
जो शुद्धराजवृत्तें[2] संपन्न, धनेंकरूनि यक्षपसा,
कोणी हि कवि धराया ज्या न, जसा पारदास[3] दक्ष पसा; ७१
प्रज्ञेनें वाक्पतिसा, संपन्न जसा महामुनि यमानीं;[4]
मणिनीं शेषशिरोगणसा साजे जो सदा सुनियमानीं; ७२
सादर सदा गुरूंचें वृद्धांचें जो संभाजन[5] कराया,
ज्या तेंवि शोभवी बहु जेंवि कवींची सभा जनकराया: ७३
वदले सुज्ञ, 'त्रिजगीं जोडा गुरुभक्त ज्या न पहिल्याला;
जो गुरुभक्तिरुचिस[6] रवि, परगुरुभक्तित्वचेस[7] अहि ल्याला:' ७४
अरिकटकझषकुळीं,[8] स्वव्यसनतमीं,[9] जो महाव्रत तिमिं,[10] रवी;
ज्याच्या प्रसूपुढें न च यश अमृतफळा महाव्रतति[11] मिरवी. ७५
आचार्यें ही रामें शस्त्रास्त्राही न जो पराभविला,
वधिला शिखंडिनें तो, नवल, कसें भंगिलें तृणें पविला? ७६
हें माझें हृदय मला भारत हो! अश्मसारमय[12] वाटे,
परमप्रियपुत्राच्या न विरहशोकेंकरून जें फाटे. ७७
क्षत्र[13] समग्र हि 'हा! हा!' करि, हरितां कन्यका, शिरा ज्याच्या
तेजें लववी, नगरीं, करुनि तुमुळ जंन्य[14] काशिराज्याच्या; ७८
ज्यासम बळवान् महिवरि कोणी ही ऐकिला न राजन्यः[15]
जसें अमरवरासी, दुर्घट ज्यासी तसें नरा जन्यः ७९

१. जप, तप, नमन व होमहवन करून कोणी हि व्यर्थ श्रमी होऊ नये. कारण, भीष्माचें उदाहरण पाहिलें असता, इतकें करून हि शेवट सुखाचा होतो च असें नाहीं, असा भावार्थ. २. शुद्ध अशा राजाचरणानें. ३. पाऱ्यास. ४. अहिंसादि बाह्येंद्रियनिग्रहांनीं. ५. पूजन. ६. गुरुभक्तिरूप प्रभेस. ७. परमगुरु परमेश्वर त्याच्या भक्तिरूप कातेला. ८. शत्रुसैन्यरूप माशाच्या समुदायांत. ९. स्वजन-**पंत.** स्वजनाच्या संकटरूप अंधकारांत. १०. देवमासा. ११. कल्पलता. १२. दगडाचें च. १३. अन्वयार्थ—काशिराज्याच्या नगरीं तुमुळ युद्ध करुनि कन्यका हरितां ज्याच्या तेजें समग्र हि क्षत्र 'हा! हा!' करि व शिरा लववी (माना खालीं घाली). १४. युद्ध-**पंत.** १५. क्षत्रिय.

वधिला शिखंडिनें तो, नायकवे सज्जनाग्ययश कानें.
शशकानें मथिला हरि, कीं म्हणतां पक्षिपाळ मशकानें? ८०
जेणें रामगुरु कुरुक्षेत्रीं बहु पीडिला अबहुयत्नें,
वधिला क्षुद्रें: कौस्तुभ परिभविला कृत्रिमें कसा रत्नें? ८१
तुज वदलें पाहुनि तव साधुसभा 'जनक' विप्र शांतनवा!
कोठें पाहूं करिता साधुसभाजन कवि प्रशांत नवा?" ८२
ऐसे विलाप करितां समजावी वासुदेव गंगेतें:
मन शुद्धबोधदुग्धें क्षाळी, शोककरूनि रंगे. तें. ८३
"देवि! नको शोक करूं: शुद्धयशा तो न तव तनय शमला.
श्रुत इतर असें करितें सत्कविवाणीस न वतन यश मला. ८४
उत्तमलोकांसि, यशें श्रोत्यांचा हरूनि ताप, गेला गे!
रसिकांसि तव सुतचरित अमृताहुनि गोड आपगे! लागे.८५
भद्रे! हा वसु येथें शापें होता धरूनि नरतेतें:
ठाव तुज, या लोकीं तुच्छ सुखा आदरूनि न रते, ते. ८६
तदनुमतें चि करि तुझा हा त्यासीं तेंवि जन्य पणतूं तें.
पुत्राच्या रणमरणें आलें विश्वांत धन्यपण तूतें. ८७
शुभदर्शने! सुत तुझा पार्थशराहीं न पावला पतन:
'वत!' न म्हणावें; गेलें होतें, तें साधिलें पुन्हां वतन. ८८
तुज सुतशोक शिखंडी, सिंहाला शश, कधीं न दे वधुनी;
विजय हि न वधी: कीं तो मृत्यु तयाच्या अधीन देवधुनी!८९
उद्यतबाणा भीष्मा होती शक्रीं हि शक्ति न वधाया,
कीं तव शुचि कुक्षिभवा घडली परमेशभक्ति नवधा या. ९०
याच्या शराहुनि अधिक तेजस्वी कवि म्हणेल कां पविला?

१. फार प्रयत्नाशिवाय, सहज. २. साधूंचें पूजन. ३. मृत झाला. ४. असें यश मला श्रुत नाहीं.-**पंत.** ५. गंगे! ६. हे कल्याणि! ७. अर्जुन. ८. हाय. ९. वसुत्वरूपी वतन. १०. सुतशोक सिंहास शश न दे, तसा शिखंडी तुज-**पंत.** ११. सज्ज आहेत बाण ज्याचे असा. १२. नवविधा.

कीं येणें परिभविल्या पुष्पशरें[1] वज्रपाणि[2] कांपविला. ९१
जरि देवता समस्ता मिळल्या, करित्या रणीं न तच्छमना;
कीं तो होता ज्ञाता, साक्षात् स्मरहर तसा चि अच्छमना[3]. ९२
तो स्वच्छंदें चि तनु त्यागुनि गेला, परं न वधिला, गे!
मृत्युवशा मर्महता न मराया बहु असा अवधि लागे. ९३
प्रसवुनि म्हणती, 'वत्सा! आचर, होवूनि वीर, सूचित[4] रे!'
तुजसारिखी सुदुस्तरसुतशोकाब्धीत वीरसू चि तरे. ९४
प्रसवश्रम भोगुनि ही, सुयश न मिळतां, अवीरसू चि रडे;
समरहत-सुवीरस्तुत-सुत-शोकभरें न वीरसू चिरडे." ९५
व्यास हि म्हणे, "विशोका हो, तो पडला सुखांत वसु नाकीं,
वसुभार्या म्हणती 'प्रियकर' पार्थशिलीमुखां तव सुता कीं."
श्रीमत्कृष्णोक्ति करी त्या गंगेच्या हि दूर शोकास,
जी पापताप वारुनि, निववितसे कीर्तनें हि लोकास. ९७
आज्ञा देउनि, घेउनि ती शिरलीं निज सुतारक वनांत,
त्या चि कथेचा आला कांहीसा या उतार कवनांत. ९८
रामसुत मयूर म्हणे ज्ञात्यां रसिकांसि पसरुनी पदर,
'मीं तुमच्या अमृतकरें गरुडें पावे न जेंवि नीप[11] दर. ९९
सज्जन मानें देवू संग, जसा गरुड दे कदंबातें;
देणें मीं च न, गाइल बहु नाकीं मत्पिता मदंबा तें.' १००

इति श्रीमन्महाभारते आनुशासनिक पर्वणि श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचितेऽष्टमोऽध्यायः।
श्रीरामचंद्रार्पणमस्तु। शुभं भवतु। स्वस्ति। श्रीकृष्णार्पणमस्तु.

१. मदनानें. २. इंद्र. ३. शुद्ध अंतःकरणाचा. ४. अत्यंत उचित असें. ५. वीरमाता. ६. शोकरहित. ७. भीष्म हा वसु, अर्थात् वसुभार्या त्या गंगेच्या सुना. ८. अर्जुनाचे बाणास. ९. उदकांत. १०. उतारा; प्रतिबिंब. ११. कदंबवृक्ष. (अमृत हरण करून येत असतां विसावा घेण्यासाठीं गरुड एका कदंबवृक्षावर बसला; त्या वेळीं कांहीं अमृतबिंदु त्या वृक्षावर पडल्याने तो अमर झाला).

# अश्वमेधपर्व.

## अध्याय पहिला.

दायाद[1] पांडुचा त्या गांगेया आठवूनियां रडला,
दारुण[2] कर्में मूर्छित होउनि, गंगातटीं च तो पडला. १
धृतराष्ट्र म्हणे, 'धर्मा! न[3] करुनि हितवचनें, बुडविली महि म्यां;
कां शोक करिसि? आश्रय तूं चि कुरुकुळांत सद्यशा महिम्या.'
कृष्ण म्हणे, 'तूं धर्मे न्यायें संपादिलें[4] करीं राज्य,
यज्ञ करुनियां धर्मा! अन्नधन ब्राह्मणांसि दे प्राज्य[5].' ३
धर्म म्हणे, 'मागतसें तुज जोडुनि हात, पावना! दे हें,
कृष्णा! अंतीं जावा, जोडाया हा तपा, वना, देहें.' ४
व्यास म्हणे, 'जरि हिंसादोषास्तव पावली च भय मेधा[6],
तरि धर्मा! सांग[7] करीं अस्मद्वचनेंकरुनि हयमेधा.' ५
धर्म म्हणे, 'निःसंशय पाप सकळ अश्वमेध[8] वारील;
जरि तो घडेल विधिवत, तरि सर्वा भूमितें हि तारील. ६
परि धन नसे, कसा मज केवळ अधनास सांग सव घडतो?
पुष्कळ असेल ज्याच्या पदरीं कांचन, तयासि सवघड तो. ७
बहु दुःसह हृदयींचे आझुनि ज्यांचे न वाळले घाय,
त्यां हतनृपबाळांला[9] मागावें धन मुनीश्वरा! काय?' ८

१. पुत्र. (धर्म). २. भीष्मद्रोणादि आप्तांच्या वधरूपी आपल्या क्रूर कृत्यानें (त्याच्या आठवणीनें). ३. आमच्या उपदेशाप्रमाणें आचरण न करून. ४ मिळविलेलें. ५. पुष्कळ. ६. वृद्धि. ७. सर्वांगानें पूर्ण, कोणतें हि उणें पडू न देता. ८. अश्वमेधयज्ञानें. ९. पित्याच्या भारतीयुद्धांत झालेल्या वधामुळें ज्यांच्या मनाला झालेलें तीव्र दुःख अद्यापि ताजें आहे, त्या युद्धांत मारलेल्या राजांच्या मुलाजवळ.

व्यास म्हणे, 'युक्ति तुला कथितों मीं कोष पूर्ण होयास;
आहे हिमाचळीं धन, आणाया सिद्ध तूर्ण हो यास. ९
यज्ञांत धन मरुत्तें जें विप्रांला दिलें, तिहीं श्रांतीं
त्यजिलें कांटाळुनि, तें पुष्कळ आहे हिमालयप्रांतीं.' १०
धर्म म्हणे, 'इतुकें धन संपादी तो कशा मरुत्त नयें?
येणें चिर पात्र आत्मा केला त्या, ज्या यशा मरुत्तनयें.' ११
व्यास म्हणे, "रविवंशीं प्रख्यात करंधमाख्य जो राजा,
धर्मा! मरुत्तपृथिवीपाळाचा, जाण, होय तो आजा. १२
प्रख्यात अंगिरा मुनि जो, त्याचा होय भूप तो याज्य;
साधु अविक्षिन्नंदन धर्मन्यायें सुखें करी राज्य. १३
शतमख मरुत्त यांसी लागे तेजें परस्पर स्पर्धा,
जाणों राज्या याच्या तो, त्याच्या हा, बळें हरी अर्धा. १४
अपकर्ष मरुत्ताचा व्हाया कांहीं उपाय चालेना,
प्रबळा हि मारुताला जैसा रत्नप्रदीप हालेना. १५
गुरुसि म्हणे, 'योग्य तुला अमरेश्वर मी, न मर्त्य तो याज्य.
रसिकें तेल न खावें, मिळतां नव विपुळ धेनुचें आज्य.' १६
हरिनें म्हणे गुरु, 'धरिन त्याच्या मी न स्रुवा सवामाजी,
संधा भंगुनि येत्रृ देइल न च अश्रु वासवा माजी.' १७
जाय मखार्थ बहाया तो नृप, तें सर्व वृत्त परिसून;
सास् करी उपेक्षा, त्यागीना स्वविनयासि परि सून. १८
नमुनि नृप म्हणे, 'माजें वांछित सद्यजन, तें पुरो, हित हो;

१ हा दिष्टकुलोत्पन्न अविक्षित राजाचा पुत्र. २. त्या [धन नेता नेता] श्रमलेल्यांनीं. ३ कोणत्या नीतिमार्गानें. ४. समुद्रलंघनादि यशें वानरांत अतुल हनुमान्, तसा मरुत्त नरांत अनंतधनदानयशेंकरून—पंत. ५. ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकी एक. ६. यजमान. यजन करून घेणारा. ७. शंभर यज्ञ करणारा; इंद्र. ८. अध्यांला. ९. कमीपणा. १०. यज्ञादिकांत अग्नींत आहुति घालण्याची लाकडी पळी. ११. प्रतिज्ञा. १२. चांगले यज्ञकर्म.

साहित्य सिद्ध झालें, जैसें कथिलें तुम्ही पुरोहित हो !' १९
आंगिरस[1] म्हणे, 'येइन मीं न तुजकडे, त्यजूनि शक्रातें,
जा, मुग्धा ! दुग्धातें सोडुनि सेवील कोण तक्रातें?' २०
फिरला मरुत्त, लज्जित होय, म्हणे. 'दुःसहा व्यथा माजी.'
आर्ता[2] धन्वंतरिसा, त्या नारद भेटला पथामाजी. २१
नमितां स्पर्शे निवविति देवर्षिचरण तया सखेदा ते,
जे कलिकुतुकी[3], कलिहर[4], कामद, कल्पद्रुचे सखे दाते. २२
खेद पुसोनि मुनि म्हणे, 'सुरपतिभाग्यासि लोभला जीवं,
त्यासि, तदनुजा[6] जाउनि शरण, यश बहुत शोभ. लाजीव. २३
करुनि विरोध विटविला सुरगुरुनें[5] दीर्घदृष्टि[7] संवर्त
उन्मत्तसा चि फिरतो, योगबळें करिल सृष्टिसंवर्त[8].' २४
राजा म्हणे, 'जिणें त्या त्याचा गी वि प्रसाद देवर्षे[9] !
असि युक्ति सिकिवः घनसा अमृतें तो विप्र साद दे, वर्षे.' २५
नारद म्हणे, "शिवातें पाहे वाराणसीत गुण[10] पर हा,
मोक्षपुरीद्वारीं[11] तूं भलतें स्थापूनि एक कुणप रहा. २६
परतेल शव विलोकुनि जो, त्वां संवर्त तो चि जाणावा,
कीं काशींत शिव चि शव, हा त्याचा मुख्य भाव बाणावा. २७
परतेल कुणप पाहुनि, जावें तेव्हां उगें चि त्यामागें;
मग एकांतीं, जोडुनि कर, विनवावें तुवां महाभागें. २८
'मी संवर्त, असें तुज कोणीं कथिलें?' असें पुसेल मुनी,

---

१. अंगिरा मुनीचा पुत्र बृहस्पति. २. [रोगानें] पीडिलेल्यास ३ कलहाची हौस असणारे ४. कलहाचा नाश करणारे. ५. बृहस्पति. ६. त्याचा धाकटा भाऊ जो संवर्त त्याला. ७. दूरदर्शी. ८ जगाचा नाश ९ अन्वयार्थः–राजा म्हणे, "देवर्षे! जिणें त्याचा प्रसाद [होय] त्या गी (वाणीने) वि (बोल) [व] तो विप्र अमृतें घनसा वर्षे व साद दे (हाक दे) असि युक्ति सिकिव." १०. गुणपर=गुणातीत असा (?). ११. अयोध्या, मथुरा मायावती, काशी (वाराणसी), कांची, अवंतिका, द्वारावती अशा सात मोक्षपुऱ्या आहेत.

तरि माझें नाम तया सांगावें, तत्पदांबुजें नमुनी. २९
'कोठें आहे नारद?' ऐसें ही जरि पुसेल, तरि त्यातें,
'शिरला दहनांत' असें सांग, भिवु नको चि, कोप करित्यातें."
मुनि जाय असें सांगुनि, ज्याचें यश नित्य गीत[1] सद्वारीं[2];
मांडी कुणप मरुत्त हि, जाउनि वाराणसीस, तद्वारीं. ३१
तों ये संवर्त. फिरे पाहुनि तत्काळ कुणप, हा याला
अनुसरला नृप, बसला होता जो दूर ग्वुण पहायाला. ३२
पाय धरूं जाय नृपति. तों करि चेष्टा अनेकधा कपिसा,
उडवी रज दगड. थुंके, बहु दावी त्यास जेंवि धाक पिसा. ३३
जों जों असें छळी मुनि, तों तों राजा मरुत्त कर जोडी;
गोडी कळतां, मधुनें जसि मासी, वारितां बहु, न सोडी. ३४
भागुनि वटातळीं मुनि बसुनि, म्हणे, 'सोसिका नृपा! वळलों;
वद, मी संवर्त असें कोणीं कथिलें? तुला कसा कळलों? ३५
वदसील सत्य, तरि तूं स्वमनोरथसागरांत तरसील,
करितां असत्य भाषण, मस्तक शतधा फुटोनि, मरशील.' ३६
भूप म्हणे, 'गुरुपुत्रा! मजला तूं नारदें कळविलास,
साधुविना साधुपरिज्ञानी न चले चि धींबळविलास.' ३७
संवर्त म्हणे, 'राया! सत्य वदसि, नारदा असें कळलों,
जन मोहाया, कपटें झालों उन्मत्त, मी वेळें[10] मळलों[11].' ३८
'नारद कोठें आहे?' ऐसें पुसतां, पुन्हा हि पद नमुनी,
भूप म्हणे, 'गुरुपुत्रा! शिरला दहनांत सिद्धिसदन मुनी.' ३९
ऐसें ऐकुनियां, तो पावे आनंद आंगिरस, डोले,
'इतुकें[12] असें कराया मीही आहें समर्थ' हें बोले. ४०

१ गाइलेले. २. साधुमंडळाना. ३. संवर्ताला. ४. नानाप्रकारच्या. ५. वेडा. ६ सहनशील अशा! ७ प्रसन्न झालो. ८. साधूला ओळखण्याचे कामी. ९. बुद्धिसामर्थ्याचा खेळ. १०. मुद्दाम. ११. वाईट स्थिति अंगिकारिली. १२. हे एवढे करण्याला म्हणजे नारदाने केल्याप्रमाणे दहनात प्रवेश करण्याला.

निर्भर्त्सना करुनि मुनि, पुनरपि त्या नृपतिला म्हणे, “ अज्ञा !
वातविकारें[1] भ्रमलों, नेतोसि मला कशास रे ! यज्ञा ? ४१
निज[2]मानसवशवर्ती भ्रांत तुझें करिल काय हा यजन ?
अ[3]-सु-पोतीं चढुनि, पडुनि परमव्यसनीं, म्हणे चि ‘ हाय ! ’ जन.
कार्य[4] नव्हे, परिपाकीं[5] म्हणविल जें कर्म ‘हा !’ नयज्ञा ! तें;
जा तूं देवगुरुकडे, न्यावा त्वां तो चि, हा[6] न यज्ञातें. ४३
हरिलें सर्व हि तेणें, विनवावा स्वयजनार्थ तो याज्यें[7],
झालों भिन्न[8], निवडलीं[9] होतीं न कदापि एक तोयाज्यें[10].” ४४
भूप म्हणे, ‘ घे पदरीं या[11] न कृत[12]हरिप्रशंस तो याज्या[11].
स्वीकारील कसा त्या, टाकी निवडूनि हंस तोया ज्या ? ४५
लंघाया इच्छितसें तव सामर्थ्येंकरूनि शक्रातें,
तेजस्वि[13]जनोत्कर्षासहनातें सर्व[14]काळ वक्रातें.’ ४६
संवर्त म्हणे, ‘राज्या ! याज्याचा उचित होय अत्याग[15]:
शरणागतयजमानत्याग जोडीन मी न अत्याग. ४७
स्वीकारुनि करिन तुज्या धरुनि यशाचा चि लोभ यजनातें:
द्वेष देइल तुज बहु, दे इतरा जेंवि तो[16] भय जनातें. ४८
सुरपतिच्या सुरगुरुच्या द्वेषा शकसिल न तूं सहायास:

१ वायूच्या झटक्याने. २ स्वच्छंदाने वागणारा. ३. फुटक्या नावेंत. ४. करण्यास योग्य ५. परिणामीं. ६. मी संवर्त ७ [त्वां] यजमानानें. ८. विभक्त. ९. वेगळीं केलेलीं. १०. पाणी आणि तूप हीं. ( पाणी जोपर्यंत तुपांत मिसळलेलें असतें तोपर्यंत त्याला तुपाची च योग्यता येते, परंतु तें वेगळें केल्यावर ती रहात नाहीं. तद्वत् मी माझ्या भावापासून—बृहस्पतीपासून—वेगळा झाल्याने आतां माझे ठायीं त्याचेसारखी योग्यता राहिली नाहीं, असा भाव ). ११. मला यजमानाला. १२. केली आहे इंद्रप्रशंसा ज्यानें असा. ( मागें २० वी आर्या पहा ) १३. वाणेदार लोकांचा अभ्युदय ज्याला सहन होत नाहीं असा. १४. सदां दिन आपल्या च कुऱ्यांत असणाऱ्या. १५. मोठे पातक. १६. इंद्र.

समयीं[1] सोडिसिल नृपा ! मग जरि गडबडुनि मज सहायास[2].
तरि तुज सबांधवातें शापुनि करिन क्षणांत मीं भसित;
स्पष्ट प्रथम चि वद; मम मुख अयशें न करिसील कीं असित[3]?'
नृपति म्हणे, 'संगति जरि सोडिन, तरि मज कधीं न हो सुगती:
विषयांसीं संग घडो, ज्यातें सेउनि मदें कुधी[4] फुगती[5].' ५१
विप्र म्हणे, "दृढनिश्चय ऐसा केला तुवां जरि, मरुत्ता !
तरि[6] शक्रमदीं घनता साची व्हाया, दिली तुज मरुत्ता. ५२
कीर्ति असावी अतुळा, तसी च मखीं समृद्धि कनकाची,
जाउनि शरण, करावी स्तुति कथिन तसी कुमारजनकाची[7].
प्रख्यात मुंजवान्गिरि हिमवत्पार्श्वी[8] नृपोत्तमा ! आहे,
तेथें शुद्ध कनकखनि, तद्रक्षक यक्षवळ सदा राहे. ५४
साक्षान्महेश वसतो त्या स्थानीं, त्या प्रभूसि आठीव
देइल आज्ञा, 'सेवक, आणाया विपुळ हेम, पाठीव.'" ५५
ऐसें सांगुनि, साधन भगवत्स्तोत्रादि सर्व जाणविलें:
भूपाकरवीं प्रेषुनि राजपुरुष[9], बहु सुवर्ण आणविलें. ५६
पात्रादि सर्व पुष्कळ केलें त्या अध्वरांत कनकाचें,
सनका[10]चें संवर्ती सामर्थ्य, तयाचिया[11] हि जनकाचें. ५७
तें ऐकुनि, चिंतेचा झाला ज्ञाता हि सोयरा जीवें[12]:
बहु कृश विवर्ण[13] तद्वपु जळ सरतां जेंवि होय राजीव[14]. ५८
'हा आपणाहुनि अधिक होइल धनवान् स्वशत्रु संवर्त,'

१ आणीबाणीच्या वेळी. २. सहायकत्यास. ३. काळें. ४. दुष्ट बुद्धीचे लोक. ५. उन्मत्त होतात. ६. अन्वयार्थ—तरि (तर मग) शक्रमदीं (इंद्राच्या गर्वाचे ठायीं) घनता (मेघरूपता) साची व्हाया तुज [मी] मरुत्ता (वायुता) दिली. (वायूनें मेघाचा नाश होतो त्याप्रमाणे तुझ्यायोगाने इंद्राचा गर्वपरिहार होईल). ७. कार्तिकस्वामीचा पिता शंकर, त्याची. ८. हिमाचलाचे बाजूस. ९. राजाचे नोकर. १०. महादेवाचा एक मानसपुत्र. ११. त्या सनकाचा पिता जो महादेव त्याचें. १२. बृहस्पति ज्ञाता असून हि चिंतामग्न झाला, असा भावार्थ. १३. निस्तेज. १४. कमळ.

ऐसें म्हणे मनीं, कीं दायदोत्कर्ष तो चि संवर्त.[1] ५९
ऐकुनि शतमख झाला व्याकुळ, कीं[2] हा[3] निवास वपुसा या;
गेला सामर गुरुच्या सदना, सुखहानि वासव पुसाया. ६०
'झालासि पांडु कृश कां? तुज या स्वर्गीं हि खेद कां गमला?
आहेत कीं चतुर परिचारक? आज्ञेंत देव? सांग मला.' ६१
सुरगुरु म्हणे, 'चतुर परिचारक आहेत, करिति बहु सेवा;
सर्व हि निर्जर माझ्या आज्ञेतें धरिति मस्तकीं देवा!' ६२
शक्र म्हणे, 'सांग, तुला दुःखप्रद कोण, त्यांसि मारीन;
वारीन खेद सर्व हि, बुडतां चिंतार्णवांत तारीन.' ६३
जीव म्हणे, 'तुज कथितों अतिदुःसह दुःख जें, नयज्ञा! तें.
संवर्त मरुत्ताच्या करिताहे साभिमान[4] यज्ञातें. ६४
संवर्तानें याजन तों न करावें चि आशयज्ञा![5] तें,
करितां दुराग्रहानें, प्राप्त असावा चि नाश यज्ञातें.' ६५
शक्र म्हणे, 'सुरगुरु तूं, अजर, अमर, देवपूज्य हा[6] काय.
प्राप्त सकळ काम तुला, संवर्त तुझें करील बा! काय?' ६६
धिषण[7] म्हणे, "तूं कैसा म्हणतोसि स्वायुधांसि, 'असुरा खा.
जो जो समृद्ध कोणी त्याचें न च एक दिन हि असु राखा.'?
जसि जसि समृद्धि अहितीं तसि तसि चिंतारुजा[8] मनीं वाढे:
अमृतरस हि न शके, मग तच्छमनीं काय बापुडें काढे? ६८
संवर्तातें वारीं किंवा तूं त्या नृपा मरुत्तातें,
अस्मत्संगत[9] तृणता, तत्संगत[10] न धरु शिखिमरुत्ता[11] तें." ६९

१. प्रलयकाळ, मृत्यु. २. बृहस्पति. ३. या (इंद्राला) वपुसा (स्वशरीराप्रमाणें) निवास ( आश्रयस्थान ). ४. अभिमान धरून; (इंद्रानें) ५. मनांतील अभिप्राय जाणणाऱ्या इंद्रा! ६. हें तुझें शरीर म्हणजे प्रत्यक्ष तूं. ७. बृहस्पति. (बुद्धि किंवा वाणी तिचा पति, असा पदार्थ. ८. चिंतारूपी रोग. ९. आपली उभयतांची मैत्री १०. संवर्त व मरुत्त यांची मैत्री. ११. अग्निपणा व वायुपणा. (मरुत्त आणि संवर्त ह्यांची जूट झाल्यानें आपणा दोघांचा नाश न होवो, असा भावार्थ ).

शक्र म्हणे, " अग्ने ! जा, सांग मरुत्तास, सख्य[1] उंजराया,
' याजक देतों गुरु, हा यज्ञ करुनि, अमर करिल तुज राया ! ' "
जाउनि अग्नि मरुत्ता भेटे अद्भुत धरूनियां रूप,
बोले सभेंत ऐसें, उद्यत[2] होतां स्वपूजना भूप, ७१
' बहुसत्कृतिनें न, जसा कार्याच्या सिद्धिनें निवे दूत;
परिस; मदुक्ति हरीचा आशय राया ! तुला निवेदूत[3]. ७२
निर्जरगुरु श्रुवातें[4] तव यज्ञांत स्वयें धरिल हातें;
जें अमरत्व सदुर्लभ मर्त्यास, सुलभ तुला करिल हा तें.' ७३
नरपति म्हणे, ' स्रुवातें संवर्त चि मन्मखीं धरो हातें;
करणार बृहस्पति[5] जें याजन माजें स्वयें करो हा तें. ७४
कर[6] जोडिले गुरूंसि, की माजा श्रुव धरिल, तरि न साजेल;
तो मर्त्ययाजकत्वें[7] सुरपतियाजक सभेंत लाजेल. ' ७५
अग्नि म्हणे, ' याजक गुरु होइल, तरि ज्यांत तिळ नसे शोक,
त्या शतमखप्रसादें बहु उत्तम पावसील तूं लोक.' ७६
संवर्त म्हणे, ' अग्ने ! सामें[8] येसिल मखा, सभाजीन[9];
यां कार्यास पुन्हां तुंज[10] येतां चि पवनसखास भार्जीन.' ७७
जें शुचि निजयशः बुडविल दहनत्वें धरुनि कां मदा हा[11] तें ?
भ्याला त्या योगीश्वरनयनाला, स्मरुनि कामदाहातें[12]. ७८
अश्वत्थपर्णसा[13] तो मुनिवचनें दहनदेव कांपविला,
चित्तीं म्हणे, ' मुनिपुढें रक्षिल सुरपति न सेवकां पविला.' ७९

१. स्नेहसंबंधातील तेढ काढून टाकण्यासाठी. २. सिद्ध. ३. निवेदन करीत. (कर्ता, 'मदुक्ति'=माझे शब्द). ४. यज्ञपात्रविशेषातें. ५. बृहस्पति. ६. हे मरुत्ताचे उपरोधिक बोलणे आहे. ७. [ माझ्यासारख्या ] मनुष्याचा अध्वर्यु झाल्याने. ८. स्नेहभावाने. ९. पर्जीन. १०. मध्यस्थी करणारा तू जो वायूचा मित्र अग्नि त्या तुला. ११. अग्नि. १२. शंकरानें नेत्राग्नीने मदन जाळला त्या प्रकाराला. १३. पिंपळाच्या पानासारखा. ( हें फार चंचल असतें ).

कल्पांतीं ग्रहमंडळ[1] होती, भेटोनि ज्या तवे[2] दाहें;
तो सांगे सुरपतिला स्वर्गीं जावूनि जातवेदा[3] हें. ८०
शक्र म्हणे, 'लंघितसे नृप गुरुतें, जेंवि कुनर पितयातें:
वच न करितां, पवि शिरीं हाणिन, हें सांग पुनरपि तयातें.' ८१
अग्नि म्हणे, "आतां जो बहु पटु वक्ता असेल, तो जावा:
गंधर्वराज हा धृतराष्ट्र चि कार्यास निपुण योजावा. ८२
वदला संवर्त, 'न तव दर्शन मन्नयन पळ हि सोसील,
राज्याला गुरु द्याया, पुनरपि येतां चि भस्म होसील.'" ८३
देवेंद्र म्हणे, 'दहना! कां अश्रद्धेय आजि हें वदसी?
दाहिसि, भस्म करिशि तूं: स्पर्श तुझा भीतिकर, जसा संदसी.
वह्नि म्हणे, 'शक्रा! तूं तेजस्विप्रवर, तदपि तुज भारी
भेटे वृत्र: कसा जरि म्हणसि, तया कोण अन्य सुर मारी? ८५
स्मृति आहे कीं नाहीं तुझिया हृदयांत देववर्या! ती?
दस्रांसि सोम द्याया करिता झाला मखास्मि शर्याती. ८६

१. त्रिलिंग-पंत. ('मंडल' हा शब्द तिन्ही लिंगी आहे) इत्यादि. २. तत्व-प्रमाणें तापून लाल. ३. अग्नि. ४. तीक्ष्ण तलवार. ५. तो मारी कसा म्हणून विचारशील तर, दुसरा कोणता हि देव त्याला मारण्यास समर्थ झाला नाहीं. तेव्हां अखेर तो तुझ्यावर चालून आला. ६. या नावाच्या वेदपारगत राजाला सुकन्यानामक कन्या होती. एकदा ती आपल्या पित्याबरोबर बाहेर गेली असतां, ज्या वारुळांत च्यवनऋषि तपोमग्न होता त्या वारुळाजवळ आली. आंत काय चकाकतें या जिज्ञासेनें तिनें वारुळांत काटा खुपसला, तेव्हां त्या काट्यानें ऋषीचे डोळे गेले, व त्यामुळें ऋषी रागावून गेला; पण राजानें सुकन्या देऊन त्याला शांत केलें. पुढें अश्विनीकुमारांनीं त्याला उत्तम देह व दृष्टि दिली. या ऋणांतून मुक्त होण्याकरितां ऋषीनें शर्यातीकडून यज्ञ करवून अश्विनीकुमारांना हविर्भाग मिळत नसे तो दिला. हे सहन न होऊन इंद्रानें त्या ऋषीवर वज्र उगारलें असतां ऋषीनें त्याचा हात जागच्या जागीं खिळून टाकला. पुढें ऋषीनें 'निर्मुनि मदासुरातें' वगैरे कथा आहे.

गेलासि च्यवनशिरीं घालाया देवनायका! पविला;
त्वां तेजें त्याचा, कीं तेणें चि तुझा चि काय तापविला? ८७
निर्मुनि मदासुरातें, हरि तव सुरनायका! यश च्यवन;
वद सत्य, होत होतें स्वावन तरि? पुसुनि काय शच्यवन? ८८
मैंददेहकथाकथन चि दारुण, ते दंत काय शत गावें!
त्वत्तुल्यशताचें तरि पावुनि त्या अंतका यश तगावें? ८९
च्यवन शरणागतातें बा! तूतें परमसभयदेहातें,
स्मरतें आम्हां सर्वां, जें धरितां चरण अभय दे हातें. ९०
क्षात्रबळाहुनि शक्रा! परम गुरु ब्रह्मबळ, पहा नीट;
संवर्तासीं निष्ठुर बोलायाला हि मी नव्हे धीट.' ९१
शक्र म्हणे, "वदसी जें ब्रह्मबळोत्कर्ष तूं न तें लटिकें;
रसिकपरीक्षेंत जसें सुरसत्व घृत तसें न तेल टिकें. ९२
संवर्त असो: परि त्या आविक्षितनृपबळास वचकोनी,
केसरिभयें शश तसा, मीं वज्री हरि वसेन न च कोनीं. ९३
करिल मरुत्तशिरातें चूर्ण चि मद्बाहुमुक्त शतकोटी;
वधिले असतिल ऐसे म्या श्रीमदमत्त दुष्ट शत कोटी. ९४
ये धृतराष्ट्रा!, जा, त्या सांग मरुत्तासि या निरोपातें,
'अनुसरतासि गुरुसि, कीं तव मस्तक अशनिच्या विरो पातें?''
गंधर्वराज जाउनि, भेटुनि, ऐसें म्हणे मरुत्तातें,
"आज्ञापितो तुज प्रभु, केला उत्पन्न जो मरुत्तातें, ९६
'याजक बृहस्पतीतें करितोसि मखीं, करूनि नमना, कीं
वधुनि तुज करूं उत्सव, जेंवि बळवधीं, तया चि सम नाकी?'"
त्यासि मरुत्त म्हणे, 'कां तें कथितां, श्रोत्र ज्यामुळें मळतें?

१. स्वतःच्या देहाचें रक्षण. २. इंद्राणीचें रक्षण होत होतें काय, हें विचारा-वयास च नको. ३. शभर शभर योजनें लांब. ४. तुझ्यासारख्या शभर इंद्राचें. ५. टिकेल काय? ६. माझ्या हातांतून सुटलेले. ७. वज्र. ८. चूर्ण होऊन जावो. ९. कश्यप-पंत. * मद=मदासुर.

शिव ! शिव ! मित्रद्रोह ब्रह्मवधसमान हें तुम्हां कळतें. ९८
देऊं जें यश दे तो गुरु शक्रा करुनि याजना हातें;
याजक संवर्त प्रभु [1]तर्पूं अर्पूनि [2]यां जना हा तें.' ९९
धृतराष्ट्र म्हणे, 'आला सुरपतिचा घोर नाद हा कानीं,
[3]क्षेमसमय गेल्यावरि फिरविल मागें न पाद [4]हांकानीं.' १००
ऐके मरुत्त, वज्री, येतां स्ववधार्थ, गर्जन करी, तें;
ये सिंह जेंवि धांवत माराया, करित [5]तर्जन करीतें. १०१
भूप म्हणे, 'संवर्ता ! तूं श्रितसुरनग, न या नरा खावें
काळें हि, काय पवि ? हें स्वयशाचें [6]गगनयान राखावें. १०२
हा वज्रधर, अमानुष घोष करित येतसे, महातेजाः
तेज दिसतसे, झालें बहु भीत [7]सदस्यजन पहाते ज्या.' १०३
संवर्त म्हणे, 'राज्या ! स्वस्थ रहा, किमपि भय नसे तूतें;
जलधिस सुखें तरावें, अवलंबुनि [8]शेषशयनसेतूतें. १०४
म्यां [9]संस्तंभनविद्या शक्रास्त्रस्तंभनार्थ आठविली,
महिषावरि दुर्गासी, हरिकोपावरि मघां चि पाठविली. १०५
झालें [10]वारापाणी वज्र, तव भयें चि देव कांपावे;
माग वर, महेश्वरसा हा हीं संवर्त सेवकां पावे.' १०६
नमुनि मरुत्त म्हणे, 'बा ! यावा सामर महेंद्र मद्यजना,
वैर असेव्य गमावें त्याला, शिष्टां जसें चि मद्य जना.' १०७
संवर्त म्हणे, 'राज्या ! हो स्वस्थ, त्यजुनि सर्व संत्रास;
झाला अवैर हरि, अहि निर्विष जपतां चि जेंवि मंत्रास. १०८

१. तृप्त करा. २. मला. ३. कल्याणाचा संधि. ४. रडण्याआरडण्याने. ५. भीति दाखवीत. ६. स्वकीर्तिरूपी विमान (डोलारा). ७. यज्ञीय विधि बरोबर होतो किंवा नाहीं यावर लक्ष ठेवण्याकरितां नेमलेले लोक. ८. शेषशायी विष्णूचा आश्रय करून. ९. कोणती हि वस्तु जेथल्या तेथें खिळून टाकण्याची विद्या. १०. वाऱ्यानें पाणी ( पाऊस ) जसें नाहींसें होतें, तसें इंद्राचें वज्र माझ्या संस्तंभनविद्येनें निष्फळ झालें.

हा आला सोमातें प्राशाया, त्यजुनियां विरोधा त्या;
म्हणतो, ' मत्सर करिता जन लज्जेनें मनीं विरो, धात्या[1]!' "
वारिदपंक्ति जसें जळ, सज्जनसंगति तसें चि सुख विखरी;
मातेपरिस शतगुण सच्छरणागति जनासि सुखवि खरी.
सुब्राह्मणतेज्याला सर्वसुरसमूह वशतम[2] खरा; ज्या
'वधिन' म्हणे, त्या, मानीं आत्म्याहुनि अन्य न शतमख, राज्या.
संवर्तसह मरुत्त प्रभु सामोरा शचीवरा गेला;
वाटे परमप्रियसख शतमख, चित्तीं कधीं न रागेला. ११२
पूजी मरुत्त उत्तमवस्त्रमणिस्वर्णीं[3] नाकपाळाला,
त्या सुमहाभागाच्या कोण सुधी वर्णिना कपाळाला? ' ११३
संवर्त म्हणे, ' तूं या नृपतिस, पञ्चास तपनसा, मान्य.
शक्रा! तव प्रसादें हा मख, माझें हि तप न सामान्य.' ११४
भूप म्हणे, ' सौम्या हो तव दृष्टि त्रिदिवभवनदीपा[4]! हें,
योग्यायोग्य असें न प्रभुपादांगुष्ठभवनदी[5] पाहे. ११५
हा माझा मखकर्ता अनुज परि तसा चि सत्य जीवाचा[6];
गंगा शुचितेसि, तसी ज्याची संधेसि न त्यजी वाचा.' ११६
इंद्र म्हणे, ' तव गुरुतें जाणें, बहुधा[7] कवि प्रयास महा
करिती, परि तीव्रत्वें याचा बहु धाक; विप्र* यासम हा*. ११७
गेला मज हीं[8] सोडुनि हा ताप सरून कोप सारा, या
तव गुरु चि अगद[9]; जोडुनि हाता पसरूं नको पसा राया!
मीं काय? विधि हरि हर हि याच्या न विलंघितील आह्वाना.
राजाजी! धन्य तुम्हीं कां अवलंबुनि अशा हि या व्हाना?'

---

१. ब्रह्मदेवा! २. पूर्णपणे वश. ३. उत्तम वस्त्र, जवाहीर आणि सुवर्णाचे अलंकार ह्यानीं. ४. स्वर्गरूपी गृहांतील दीपा! (स्वर्गाला शोभा देणाऱ्या!). ५. विष्णूच्या पायाच्या आंगठ्यापासून उत्पन्न झालेली गंगानदी. ६. जीवाचा (बृहस्पतीचा) अनुज परि सत्य तसा च (जीवसा च). ७. नानाविध. ८. हा ताप हीं. ९. औषध. * या ब्राह्मणाला याची च उपमा योग्य आहे.

संवर्त म्हणे, 'जरि तूं प्रसन्न, तरि तुज दयानिधानातें
उचित विनवितों, स्वमुखें सांग सवांत स्वयें विधानातें.' १२०
त्या स्वमखांत शतमखप्रभुसि म्हणे विप्र 'कारभारी हो;'
बहुमान चि वाटे तो तैसा ही विप्रकार भारी हो! १२१
अत्यद्भुत, हरिमुख सुर त्या संवर्तासि नमुनि राबति, तें:
केलें अमर नर, सुधा जी मग, करि काय न मुनि राव तितें?
आवसथसभास्थानें विविधें शोभावयासि मख रचितें
सुर, गमति, करिति यज्ञश्रीच्या फळशोभनार्थ मखर चि ते!
साहित्य करिति धनपति, विश्व, वरुण, सोम, वसु, मरुत्तरणीं.
जाणों आणी अरि, परिभवुनि तयां वीरवर मरुत्त रणीं. १२४
सेवुनि सोमरसातें सकळसुरसमाजसहित शतमन्यु
स्वर्गासि जाय होउनि सत्कृत सानंद साश्रु गतमन्यु. १२५
यापरि मरुत्तराजा यज्ञ करि: पदोपदीं कनकराशी
नेतां नेतां उरले, बहु विटवुनि भूमिसुरजनकरासी. १२६
ते[10] आणावे, होइल सांग तुझा अश्वमेध त्या वित्तें:
कथिलें तसें करावें त्वां माझें वचन सादरें चित्तें." १२७

# अध्याय दुसरा.



शांतनवाचें उत्तरकार्य करुनि सांग सर्व तो धर्म,
धर्में नयें प्रजांतें परिपाळुनि, दे नवें नवें शर्म. १

१. व्यवस्थेनें. २. विरुद्ध प्रकार; अपमान. ३. इंद्र आहे प्रमुख ज्यांत असे. ४. संवर्तानें देवांना मनुष्यांप्रमाणें राबविलें; मग देवांचें अन्न जें अमृत तें त्याला काकवीप्रमाणें सुलभ होणार नाहीं काय, असा भावार्थ. ५. होमशाळा, सभामंडप. ६. गर्भादानार्थ. ७. इंद्र. ८. गेला आहे राग ज्याचा असा. ९. ब्राह्मणांच्या हाताला थकवून. १०. कनकराशि. * मरुत्+तरणी.

धर्मातें पुसुनि, प्रभु इंद्रप्रस्थासि जिष्णुसह गेला,
केला शिल्पोत्कर्ष प्रचुर मयें जींत, तींत तो ठेला. २
सांपडला जिष्णुसह क्रीडाया दासमानदा समय,
करुणाब्धिस सुखवाया उचित चि यादासमान दास मय. ३
प्रभु आज्ञेंत वसुनि बहु मानुनियां नित्य जेंवि धर्मास,
तेंवि सभेंत वसुनि बहुमानुनि, दे त्या मया हि शर्मास. ४
तेथें मानस सहसा परमसखकथाप्रसंगआठव दे;
म्हणुनि प्रभुला अर्जुन, देउनि उरल्या कथांसि पाठ, वदे. ५
'कृष्णा! युद्धारंभीं त्वां स्वसख्या परममुह्यमाना या,
धर्मी मानित नसतां, कथिलें जें शास्त्रगुह्य मानाया, ६
तें विसरलों. तरि मला सांग पुन्हां वृष्णिनायका! सार;
जळदानें जळ-दानें पुनरपि भरिजे न काय कासार?' ७
कृष्ण म्हणे, 'श्रितमति उपदेशामृत पिउनि मज गमे धावी;
म्हणउनि रहस्य कथिलें तुज, परि तूं अर्जुना! न मेधावी. ८
आतां तें काय पुन्हां सांगावें? त्यासि पात्र मेधावी;
उपदेशासि मति, जसी गीतासि मृगी, तसी च वेधावी.' ९
ऐसें वदोनि, विभुनें कथिली त्या अर्जुनासि अनुगीता,
दुसरी ब्राह्मणगीता जी अमृतनदी भवोग्रदवभीता. १०
तिसरा गुरुशिष्यांचा कथिला संवाद आयकायाचा,
ज्याच्या श्रवणें, स्नानें मळसा अभिमान जाय कायाचा. ११
मग देव म्हणे, 'पार्था! आतां प्रार्थूं नको रहायास;
तव संमतें पित्यातें रामातें, इच्छितों पहायास.' १२

१. बांधकामाच्या चातुर्याचा शिकस्त. २. भक्ताला मान देणाऱ्या कृष्णाला. ३. मूळपाठ—**मयास.** ४. श्रीकृष्णानें सांगितलेल्या गीतेच्या प्रसंगाचें स्मरण. ५. इतर सर्व गोष्टी बाजूस ठेवून. ६. अत्यंत मोह पावणाऱ्या मला (अर्जुनाला). ७. तृप्त व्हावी. ८. बुद्धिवान्. ९. संसाररूप भयंकर वणव्याला भ्यालेल्यास. १०. ऐकण्याला योग्य असा.

जिष्णु म्हणे, 'धर्मातें प्रार्थूनि निरोप देवविनः' यश तें
काय वदावें? गुरु करि भक्तां, जो सेव्य देव विनयशतें ! १३
इंद्रप्रस्थाहुनि ते कृष्ण प्रभु गजपुरासि मग आले,
झाले नत धर्मपदीं; तद्वाक्संदर्शनामृतें धाले. १४
दुसरे दिवसीं कृष्णा जायास निरोप देववी, राज्या
धर्मा विनउनि, तो, बहु मानवले सर्व देव वीरा ज्या. १५
धर्म म्हणे, 'पितरांतें भेट, तुला शीघ्र आणविन यज्ञाः
तेथें आम्हांसह या स्वसख्या स्मरणांत आण, विनयज्ञा! १६
कृष्णा! निजपितरांतें तूं पाय धरूनि सांग मन्नमनें,
तव दर्शन सुहृदांच्या क्षुधितांच्या ध्येय जेंवि अन्न मनें. १७
जें जें मनोज्ञ, ने, धन, गज, हय, रथ, रत्न, वास, वस्तु, तयाः
माज्या सर्वस्वा तूं पात्र सलोकेशवासवस्तुत या.' १८
कृष्ण म्हणे, 'आहे जें येथें, सर्वस्व होय हें माजें;
त्वां सुयश दिलें, घ्यावें, त्यजुनि अयुतमेरुरत्नहेमा, जें. १९
न्यावें कशास येथुनि? तेथुनि आणीन तुरगमेधा मीं;
पुण्यश्लोका! मज याअधिक न तें वृष्णिपुर गमे धामीं.' २०
धर्मातें भीमातें कुंतीतें नमुनि, पुसुनि विदुरातें,
स्पर्शुनि शिरीं यमांतें, भेटोनि सख्या परादिभिदुरातें, २१
धृतराष्ट्रातें वंदुनि, धर्मानुमतें पुसोनि द्रौपदीतें,
अनुजेसि घेउनि निघे दैवत, ज्यातें महेश सेवी, तें; २२
भीमार्जुनयमविदुर प्रभुला पावूनि परतले मागें,
त्यांचीं मनें न फिरलीं, मोहुनि नेलीं च त्या महाभागें. २३

---

१. शकडों प्रकारच्या नम्रतादर्शक कृतींनीं. २. धर्मराजाचें भाषण आणि दर्शन एतद्रूप अमृतानें. ३. वसुदेवदेवकीला. ४. मंदर. ५. वस्त्रें. ६. हजारों मेरुपर्वताइतकीं रत्नें व सोनें याना. ७. या हस्तिनापुराहून श्रेष्ठ. ८. द्वारकानगरी; यादवांचें नगर. ९. कातीमध्यें. १०. शत्रुरूपी पर्वतांचा भेद करणारा जो (अर्जुन) त्यातें. ११. द्रौपदीतें. १२. पोंचवून. * कृष्णार्जुन.

मरुधन्वनाम देशीं भेटे उत्तंक विप्रवर वाटे;
तो मुनिवर्य मयूर चि, यदुनायक देव नीरधर वाटे. २४
त्या ब्राह्मणासि पूजी भगवान् ब्रह्मण्य देव पद नमुनीं;
प्रभुतें पूजुनि, तो ही झाला परमप्रसन्नवदन मुनी. २५
उत्तंकाला वाटे, कौरवपांडवविरोध वारूनीं
आला देव सुदुस्तर युद्धव्यसनार्णवांत तारूनीं. २६
प्रभुसि पुसे तो, 'कृष्णा! जावुनि कुरुपांडुपुत्रसद्मातें,
आलासि हर्षउनि की हर्षविनो अर्क जेंवि पद्मातें? २७
आप्त शमविले कीं, सुत शमवावे जेंवि वैरवश तातें?
झालासि चंद्र कीं तूं क्षितिवर्तिनृपाळकैरवशतातें? २८
समजाविशील तूं प्रभु, सजले जे मारणाप्रति, ज्ञाती;
कीं तव, सत्या केली, जी निजजनतारणा प्रतिज्ञा, ती. २९
हें मम चित्तीं होतें, केलें की त्वां तसें चि सांग मला,
वद सत्वर, काय मनीं चिंतिसि? मत्प्रश्न भार कां गमला?'
कृष्ण म्हणे, 'सांगाया आप्तजन, करुनि अनर्थशाम, हर्षें:
बा! पांच मात्र पांडव उरले, कोणी हि अन्य न महर्षे! ३१
लंघुनि माझ्या मतितें, त्या हि श्रीभीष्मविदुरबुद्धींतें,
गेले धृतराष्ट्रतनुजशत नृपशतसह लयासि युद्धीं तें.' ३२
भार्गव उत्तंक करी, ऐकुनि तें कृष्णवचन कोपातें:
कीं सन्मन तरि 'भूताभ्युदय,' जरि म्हणेल 'कच नको' पातें.
"कृष्णा! उपेक्षिले त्वां, सामर्थ्य असोनि, ते परिच्छिन्न;
तरि च परस्पर शस्त्रें पडले होवूनि भूवरि छिन्न. ३४
नायकत्यांला हितकर आप्त ज्ञाता बळें चि आयकवी,

१. उत्तक ऋषीचें आख्यान आ० भा० आदि० अ० २ रा पहा. २. ब्राह्मण आहेत पूज्य ज्याला तो. ३. कैरव=चंद्रविकासी कमल. ४. पक्ष्म केशनाशीं जसें कांपते तसें साधुहृदय भूतनाशीं—**पंत.** (भावार्थ). पातें=पापणी. ५. उघड उघड; स्पष्ट.

नायक विख्यात नयें वर्तविति; उपेक्षितात काय कवी ? ३५
मज माझी मति म्हणती, 'दे शाप, न हें सहा, यशा पावें;
जो प्रभु अरक्षक तया, घेऊनि सुतप सहाय, शापावें.'" ३६
कृष्ण म्हणे, "तुज कथितों अध्यात्म, प्रथम परिस बापा ! तें;
मग शापोचित जरि मीं गमलों, तरि दे विशंक शापातें. ३७
कोपवश पुरुष निजतप शापुनि वेंचीः न कोप हा साधु.
कीर्तिस म्हणसि. 'तुळा' कां वा! 'पुनिवेंची नको,' पहा, 'साधु'?
उत्तंका ! समज मनीं तापस चुकला, करून कोपाला:
क्रोधा अग्नि, तयांत स्वतपा सुकला करूं नको पाला." ३९
विप्र म्हणे, 'अध्यात्म श्रवण करिन, सांग मान सांधीन;
शापानुग्रह करणें आहे माझ्या चि मानसाधीन.' ४०
कृष्ण म्हणे, "उत्तंका ! प्रकृति पुरुष मीं च, गुण महाभूतें:
मातें प्रपंच तेसा, व्यजुनि असे घट जसा न हा भूत. ४१
मीं विश्वरूप जैसा, पटतंतु मनीं, पहा, तसें आणः
हें सत्यः 'वहा' म्हणसिल साधो ! जरि, तरि वहातसें आण.
धर्मत्राणाकरितां विप्रा ! मीं वेष जो जसा धरितों,
वा ! उचित तया वेषा जें जें जसें, तसें तसें करितों. ४३
या द्वापरांत संप्रति झालों नर, वर्ततों सदा नरसा:
हरिला संकसरा तनु होय, समुचिता, गजा सदानरसा. ४४
वदलों कलह शमाया, जैसे वदतात आप्त नर सामीं:
तो खळ म्हणे, 'समर्पिन सूच्यग्र भेदिली हि न रसा मीं.' ४५
परिसुनि मदुक्तिस, जसे तस्कर पाहूनि पुनिव, रागेले;
परि धर्मयुद्धहत ते खळ हि स्वर्गासि मुनिवरा ! गेले. ४६

१. कांति रक्षण कर—**पंत.** २. शारदपौर्णिमापमा साधो कांतिम—**पंत.** ३. बोळलेला. ४. बहुमान वचनाचा श्रवणें करीन—**पंत.** ५. शाप किंवा प्रसाद. ६. तसें पहा, मनीं आण—**पंत.** ७. आयाळानें युक्त अशी. ८. मदाच्या रसानें युक्त अशा. ९. सत्यवादी. १०. सलोखा करण्याचे बाबतींत.

दुर्योधनादि मेले, धर्म त्यागुनि, करूनि अन्याया;
पांडव विजयी झाले, यांच्या येनी न रीति अन्या या. ४७
अन्याय काय माझा उत्तंका! यांत, तूं चि सांग मला.
हा वासुदेव नमतां अपराधी शापयोग्य कां गमला?" ४८
उत्तंक म्हणे, "बा! मीं ब्राह्मण, परि उग्र; तूं अनुग्र हरे!
मज मंद मति म्हणती, 'या केला परमेश्वरें अनुग्रह रे!' ४९
देवा! अनुग्रहातें जरि योग्य असेन, तरि मला दे हें,
तें विश्वरूप दाखिव: कीं, संगें धरिति परिमला देहें[1] ५०
क्षणसंग सुपरिमळद्रव्याच्या धरिति परिमळा देहें;
विख्यात चंदनांचा संगिनगा स्वगुण परि मळा दे हें."[2] ५१
स्वसख्यास, विश्वरूप प्रभुनें त्या ब्राह्मणा हि दाखविलें:
कीं सोमें देवगणा, तें चि चकोरा हि अमृत चाखविलें. ५२
तें विश्वरूप पाहुनि झाला कृतकृत्य, जेंवि तो पार्थ;
तरला चि, देत होता प्रभुला जो शापदान कोपार्थ. ५३
विस्मित होउनि, वर्णुनि सुगुणसदोका[3] यशा, पदा नमुनी,
धरि लाज, देत होता कोपुनि जो काय शापदान मुनी. ५४
'आवरुनि विश्वरूपा, दर्शन पहिलें चि दे,' वदे हा, तें
करि शीघ्र, प्रकट करुनि त्या पूर्वीच्या चि देव देहातें. ५५
प्रभुवर 'वर माग' म्हणे, विप्र म्हणे, 'विश्वरूप दाखविलें,
मागों काय अधिक? तप बुडवित होतों वळें चि, राखविलें.'
देव म्हणे, 'उत्तंका! कविनीं मजला, तुला हि बा! गावें;
दर्शन अमोघ माझें, यास्तव कांहीं अवश्य मागावें.' ५७
विप्र म्हणे, 'मागावा वर म्यां, प्रिय हें चि जरि तुझें होय,
तरि इच्छित तेथें या मरुदेशामाजि मज मिळो तोय.' ५८
चातक घना तसें, हें निर्जळ जाणोनि मारवाड, वदे,

१. शरीरें. २. हे प्रसिद्ध च आहे—**पंत.** परिशिष्ट पहा., ३. उत्तम गुणाचें चांगलें माहेरघर अशा.

जाणों, न पुढें याया, तो विषयेच्छेसि मार वाडव दे. ५९
'उत्तंका ! स्मर मातें, ज्या समयीं इच्छिसील तूं सलिला,'
ऐसें वदोनि गेला स्वपुरीतें, भयद यश जिचें कलिला. ६०
प्रभु गेल्यावरि, वांछा जेव्हां त्या मुनिस होय तोयाची,
मेघासि जसा चातक, आठवुनि प्रभुसि तोय तो याची. ६१
मार्गीं मातंग दिसे, नरकाआंतूनि काय तो उतरे,
ज्याजवळि चर्मपात्रीं भरिलें जळ विपुळ, मक्षिका, कुतरे. ६२
आग्रह करुनि म्हणे, 'घे' तो सुमलिन नग्न मांग, 'तोयातें;'
जाणों विहित परमहित शिष्ट परम आप्त सांगतो यातें. ६३
धिक्कारी सुब्राह्मण तो, त्या 'शिव ! शिव !' म्हणोनि मांगाला,
लागों देइल कैसें परमदुराचरणपाप आंगाला? ६४
वरदा प्रभुस हि निंदी, वरफळ पाहोनि तो तसें ऋषि तें;
विहित मरावें, हें परि प्यावें चंडाळजळ कसें तृषितें? ६५
मातंग म्हणे, 'त्यजिसी, परि पश्चात्तापतप्त होसील;
अमृत अनादरुनि, तृषित बुद्धिभ्रमखेद कोण सोसील?' ६६
मातंग जसा, तैसे अंतर्हित ते हि जाहले कुतरे,
उत्तंक होय विस्मित, तो त्याचा कोप तत्क्षणीं उतरे. ६७
'कृष्णें चि आपुलें तें वंचन केलें' असें तया वाटे,
तों चक्रपाणि धांवत येउनि, भेटोनि, करि दया वांटे. ६८
उत्तंक म्हणे, 'म्यां वरविश्वासें प्रार्थिलें तुला तृषितें,
मातंगचर्मपात्रें जळ द्यावें प्राशनार्थ या ऋषितें? ६९
करिति तुज्या सुयशातें, व्हाया कामेभतोत्र, पाठ कवी,
तो तूं कसा ठकविसी? निर्दय जो, त्यजुनि तो त्रपा ठकवी.'
कृष्ण म्हणे, "जो वाहत होता तैसा चि मार्ग वाहो तो;
भलत्या चि संशयानें प्रेमाचा भंग भार्गवा! होतो. ७१

१. वडवा=ब्राह्मणस्त्री; तिचा पुत्र तो वाडव=ब्राह्मण (उत्तंक). २. चांडाळ.
३. नरकलोकांतून. ४. गुप्त. ५. मार्गी. ६. मदनरूपी हत्तीला अंकुश.

म्यां छळ केला ऐसें लटिकें चि मनीं धरूं नको, पावें;
वदतों, तें श्रवण करीं; मज न इतरसम करून कोपावें. ७२
मीं शक्राला वदलों, 'मरुदेशीं शीघ्र नाकपा! जावें,
त्वां उत्तंकासि अमृत, कानीं पडतां चि हाक, पाजावें.' ७३
शक्र म्हणे, 'मर्त्याला अमृत न द्यावें; तथापि जरि आज्ञा,
मातंगरूप घेउनि देइन मीं, त्या रुचेल तरि नाज्ञा.' ७४
बहिरंगें तुज दिसला नीरस तो अदितिसुतपनस; मजला
'अदय'म्हणसि, भाव तुला,पदरीं च असोनि सुतप,न समजला.
अमृत तुझें तप चि, द्वें न दे नाकपटा विनाश, तक्र तुतें
व्हावें कशास, तुज जें देना कपटाविना शतक्रतु, तें? ७६
तुजला लागेल तृषा, तेव्हां घन वर्षतील तर्पाया,
बा! या मरुदेशास हि तुजसह अत्यंत तृप्ति अर्पाया. ७७
होसिल बहुमान्य, जसा तो चातकनाम सुखग, मेघांस;
जो वांटुनि भक्षावा, तो सुज्ञजनास सुख गमे घांस. ७८
'उत्तंकमेघ' म्हणतिल लोक तयां, जे त्वदर्थ वर्षतिल,
या तव सुयशःश्रवणें उत्तंका! सर्व साधु हर्षतिल." ७९
केला उत्तंक मुदित, जो होता जाहला असानंद,
बहुमान्य जसा विप्र, प्रभुला न च शौरि, न च असा नंद. ८०
नृपति पुसे, 'शापाया झाला जगदीश्वरासि जो सिद्ध,

१. सामान्यजनासारखा समजून. २ ज्ञात्यास–पंत. ३. इंद्ररूपी फणस. (फणस जसा बाहेरून काट्यांनी भरलेला असतो, परंतु आंत उत्तम रुचिकर गरे भरलेले असतात, तसा इंद्र हा वरून मातंगाचा वेष घेऊन आला होता, तथापि त्याच्या चर्मपात्रात अमृत होतें, असा भावार्थ). ४. मूळपाठ–घडे दिव्या न पटा. ५ ज्या तपानें जळपान ही नाही असे ही तप तुझे प्राण नाशाया न समर्थ; जसा दिव्यपटास दहन–पंत. हे सभाव विवरण आहे. ६. इतरास देऊन त्याचेबरोबर खावा. ७. गोड लागतो. ८. आनंदरहित. ९. वसुदेव. १०. जनमेजय.

कोणा सुतपस्तेजें होता उत्तंक तो असा इद्ध[1]?' ८१
वैशंपायन सांगेः-गुरुभक्तप्रवर गौतमच्छात्र,
बहु मुनिसुत शिष्य, तयां सर्वांत श्रेष्ठ गुरुकृपापात्र. ८२
सिंचीं[2] भजन लाउनि भक्तीचें भावधौतमनिं रोप;
इतरां शिष्यांतें दे, परि उत्तंका न, गौतम निरोप. ८३
गुरुभक्तिनें भुलविला न च काढी गोष्टि हा निरोपाची;
गुरुला ही तद्संगति*, सुरतरूच्या जेंवि हानि रोपाची. ८४
काष्ठांचा भार शिरीं घेउनि येतां, तया जटा जडली;
श्रांत उत्तंक तो त्यजितां, त्यासह तुटोनि ती पडली. ८५
वृद्धपणातें कळवी सहसा चि[3] रजतसमा जटा कविला;
खेद विवेक, जेंवि कुसंग सज्जनसमाज, टाकविला. ८६
झाला हा निरवरवया; हानि वरवया, न जाणतां, होय;
म्हणुनि रडे, तों धरवी गौतम कन्यांजळींत तें तोय. ८७
गौतमकन्येचे त्या उत्तंकनयनजळें कर जळाले,
तत्काळ ते अबिंधनदग्ध, जसे पद्मिनीछद, गळाले. ८८
गौतम पुसे तयातें, 'बापा! कां सांग आजि रडलास?
जडलास गुरुपदाब्जीं, कोणा शोकार्णवांत पडलास?' ८९
उत्तंक म्हणे, 'तुजला आज्ञा मागावया स्वयें चुकलों;
त्वां ही न दिली, झालों वृद्ध, गृहस्थाश्रमास मी मुकलों.' ९०
त्यासि गुरु म्हणे, 'झाला त्वत्प्रेमा तो चि मद्यरस मजला;
भुललों केवळ साधो! गेला जरि विपुल काळ, न समजला.
बा उत्तंका! आज्ञा दिधली आतां, गृहस्थ हो, जा. गा!
तूं या गुरुगेहवसतिसुखशय्येतें त्यजूनि हो जागा.' ९२

१. तेजस्वी; प्रकाशमान. २. भक्तिभावानें शुद्ध अशा अंतःकरणांत भक्तिरूपी रोप लावून त्याला भजनरूपी पाणी घाली, असा भावार्थ. ३. रुप्यासारखी पांढरी ४. उतार वयाचा, ५. शहाण्याला; चांगल्याला. ६. अप्+इंधन+दग्ध=जलरूपी इंधनपणानें भाजलेले. ७. कमलिनीचीं पानें. * त्याचा वियोग.

तो द्विज म्हणे, 'तुज गुरुस, द्यावी म्यां, सांग, दक्षिणा काय?'
गौतम म्हणे, 'बहु दिली; सेवेंत तुवां न राखिला काय. ९३
सादरभजनें घडतो, सर्वार्थांउपरि तो खरा होतो,
मेरुवितरणें हि तसा गुरुसि नव्हे सुपरितोख, राहो तो. ९४
मी तुष्ट असेन तुझ्या भजनें, तरि षोडशाब्द होसील;
देइन तुज निजकन्या. तव तेजातें, परा न, सोसील.' ९५
गुरुवचनें होय तरुण; कीं अमृतें ही नवा युवा होतो;
दीप कराया त्या शुचितेजातें, कां न वायु वाहो तो? ९६
कन्या, आशी, आज्ञा गुरुपासुनि पावला महाभाग;
मग गुरुपत्नीतें तो बहु विनवी, 'दक्षिणा' म्हणे 'माग.' ९७
त्यासि अहल्या हि म्हणे, 'सादर सेवेंत दक्षिणा आली,
विप्रवरा! वृत्ति तुझी सुरभीची होय दक्षिणा आली.' ९८
मागावें चि सुदुर्लभ वस्तु असा शिष्यभाव जाणोनि
'मणिकुंडलें' म्हणे 'दे सौदासस्त्रीधृतें चि आणोनि.' ९९
गेला उत्तंक; पुसे गौतम, सांग तयास तज्जाया;
तो मुनि म्हणे, 'अहा! त्वां पाठविला संकटांत मज्जाया. १००
राक्षस झाला आहे संप्रति सौदासभूप तो शापें,
खातो बहु पुरुषांतें, न च वचके विप्रभक्षणें पापें.' १०१
साध्वी म्हणे, 'न जाणुनि हें म्यां तो साधु विप्र पाठविला,
परि येइल कुशळ पुन्हां, की त्वां वरदें मनांत आठविला.' १०२
मुनि 'एवमस्तु' बोले; नाशुनि विघ्ना, श्रमा, अघा, बरवी
वरिल कसि कीर्ति, गुरुचें मन, साहस करुनि, जो न घाबरवी?

१. माझा सेवा करण्यात तू कुचराई मुळीं च केली नाहींस. २. सुवर्णपर्वताच्या दानानें देखील. ३. अत्यंत आल्हाद. ४. सोळा वर्षांचा. ५. 'ते निजकन्या', असा अध्याहार. ६. उदारा सखी—पंत. ७. सौदासनामक अयोध्याधीशाच्या स्त्रीनें धारण केलेलीं. (आर्या० खंड १ ला, पृष्ठ २१२, टीप २ पहा). ८. असें असो.

शून्यवनीं अत्युग्रा सौदासाजवळि विप्र तो पावे,
स्वाधिक म्हणउनि राक्षस ज्यातें पाहुनि मनांत कोपावे. १०४
उठला परम क्षुधित क्रूर करायासि घात राक्षससा,
होय न, व्हावा जरि, हरिदृष्टिपुढें जेंवि कातराक्ष ससा. १०५
राक्षस म्हणे, 'भला बा! षष्ठी काळीं स्वयें चि आलास,
विप्रा! क्षुधितास मज प्राणप्रद तं सुभक्ष्य झालास.' १०६
उत्तंक म्हणे, 'राज्या! आलों गुरुदक्षिणार्थ, रक्षावें;
आधीं कार्य करावें; मग, जरि चित्तीं असेल, भक्षावें.' १०७
भूप म्हणे, 'दिधला, जरि गुर्वर्थ तुझा, असेल मदधीनः
जरि या दशेंत मागुनि, बा! होय तव त्रपेसि पद धी न.' १०८
'मणिकुंडलें तुझ्या जीं स्त्रीच्या कर्णांत दिव्य आहेत,
तीं ल्यावीं आपण, मम गुरुपत्नीच्या मनांत हा हेत.' १०९
मित्रसह म्हणे, 'विप्रा! तीं माझ्या स्त्रीस कुंडलें उचितें;
माग इतर वस्तु, सुखें देइन, येईल जें तुझ्या रुचितें.' ११०
'देणें रुचेल, तरि देः उचित यश चि तुज, न कुंडलें उचितें;
किंबहुना कुलजें त्वां संपादावें, असेल जें शुचि, तें. १११
हो सत्यवाक् प्रभो! तूं, मीं हि वचनें आपुलें करीन खरें:
अर्थ्याधि नुरे प्रभुच्या लापनें, हरिच्या जसा करी नखरें.'
नृपति म्हणे, 'साधो! जा मागुनि घे, आपुली जसी ठेवीः
माझा निरोप कथितां, देइल मणिकुंडलें तुला देवी.' ११३
विप्र म्हणे, 'कोठें ती देखावी? कां स्वयें न येसि? वदः

१. आपल्यापक्षां बलाढ्य. २. जणिवत राक्षसासारखा. ३. भीतीनें कावरेबावरे झाले आहेत डोळे ज्याचे असा. ४. सहाव्या भोजनाच्या वेळीं; तीन दिवसांच्या (अहोरात्र) उपवासानंतर. ५. गुरूनें मागितलेली वस्तु. ६. मी या स्थितींत असून हि जर तुझ्या मनाला मागण्याचा संकोच वाटत नाहीं, असा भाव. ७. आर्या० खंड १ ला, पृष्ठ २१३, टीप ५ पहा. ८. याचकाची चिंता. ९. वचनानें.

केलें स्वयें सुपात्रीं स्वधनाचें दान, होय तें शिवद.' ११४
भूप म्हणे, 'कोठें वननिर्झरदेशीं असेल सक्त, पहा;
पष्ठीं काळीं तें स्त्रीरत्न पहाया अयोग्य रक्तप हा.' ११५
पुसुनि नृपातें, शोधुनि भेटे देवीस काननीं आर्य;
नमुनि विचारी साध्वी, सांगे तो तीस आपुलें कार्य. ११६
मदयंती त्यासि म्हणे, "बा! हीं अतुळ चि जाण तानिवडें,
देउनि गुरुपत्नीतें, तूं गुरुभक्तांत जाणता निवडें. ११७
यांतें ती च धरिल, बा! जीच्या आंगीं असेल अति शुचिता;
मणिकुंडलांसि तव गुरुपत्नी मजपरिस बहु गुणें उचिता.
सुर, राक्षस, यक्ष, भुजग, बहु निस्पृह जे वनांत तपतात
ते हि महर्षि, हराया यांतें बापा! सदैव जपतात. ११९
स्रवतात कनक संततः बहु गुण सुरवृक्षपुष्पसम यांत;
नक्षत्रतारकाधिक भव्य दिसे तेज रात्रिसमयांत. १२०
धरितां, क्षुधा-पिपासा-श्वापद-विष-वह्नि-भय नसे कांहीं;
यांच्या होय बहु सुखित, अमृताच्या जेंवि नयन सेकांहीं. १२१
क्षितिधरिं भय नागांचें, उच्छिष्टपणांत यांसि यक्षांचें;
निद्रेंत निर्जरांचें नानायत्नस्वकार्यदक्षांचें. १२२
बा! गुरु लघु अनुरूप होती, प्रौढा असो, असो कन्या;
मणिकुंडलें असीं हीं माझीं परमार्चितें धरो धन्या. १२३
देत्यें ताटंक, परि घेउनि ये एकदा अभिज्ञानः
जेंवि नृपाच्या वदनीं, माज्या हि तसा नसे अभिज्ञा!' 'नं.'"
विप्र नृपासि म्हणे, 'जी तत्प्रत्ययहेतु, सांग खुण गा! तीः
'अर्थिमनोरथपूरक तूं चि, म्हणुनि कवि तुझे चि गुण गाती.'

१. रमलेली. २. राक्षस. ३. कर्णभूषणें. ४. [तू] पसन हो. ५. तहान. ६. सिंचनानें. ७. हरप्रयत्न करून आपलें कार्य साधण्यांत दक्ष अशा निर्जरांचें (देवांचें). ८. खूण. ९. जाणत्या! १०. नकार. ११. तिला विश्वास पटेल अशी खूण.

भूप म्हणे, “सांग असें, ‘हे क्षेम[1]या गति नव्हे, नसे अन्या:’
या मन्मतासि जाणुनि, हो देउनि रत्नकुंडलें धन्या.” १२६
ऐसें जाउनि कथितां, दे ताटंकें सहर्ष पद नमुनीं;
आला नृपाकडे तो होउनि परमप्रसन्नवदन मुनी. १२७
विप्र अभिज्ञानाचा अर्थ पुसे त्या नृपासि: तो बोले,
ज्यातें उत्तंकमुनि श्रवण करुनि कविसमूह ही डोले. १२८
भूप म्हणे, ‘क्षेम नसे लेश हि जीमाजि, गति असी घडली;
ब्राह्मणशापें झालों राक्षस, हे दुर्दशा गळां पडली. १२९
ईपासुनि उत्तंका! मुक्ति घडाया, विचारितां, धन्या
युक्ति द्विजप्रसादावांचुनि नाहीं च निश्चयें अन्या. १३०
ब्राह्मण हे गति सर्व क्षत्रा[2]ची, सर्वथा नसे दुसरी:
ब्राह्मणसेवा नसतां, सकळा ही निष्फळा कळाकुसरी. १३१
या लोकीं परलोकीं आधार क्षत्रियासि विप्र; भयां
अभयां द्याया प्रभु हे, सप्रभ कीं करिति निपुट[3] विप्रभ यां. १३२
आम्हां ब्राह्मण चि गति, न अन्या, कथिलें असें अभिज्ञानीं:
पुसिला त्वां तो कथिला, उत्तंका! अर्थ हा अँ[4]भिज्ञानीं. १३३
मणिकुंडलें तुज दिलीं: केला म्यां, सत्य बोलिला बोल:
बा धर्मज्ञा! त्वां ही न करावें वचन आपुलें फोल.’ १३४
विप्र म्हणे, ‘ठावें [5]मज सत्य सुकृतजनक वाडवां राया!
बा! लाविल, येतां श्री-कीर्ति, कवण जन कें[5]वाड वाराया? १३५
[6]माजा बहु सत्यांत चि, न गणुनि हा काय, भर वसायाचा:
क्षणभंगुर बुद्बुदसम समजे: बा! काय भरवसा याचा? १३६
आलों परतोनि तुला किमपि पुसायास, कोविदँा[7] राया!

---

१. भावार्थ–हल्लीं मी ज्या स्थितींत आहे ती स्थिति कल्याणप्रद नाही, परंतु ह्या स्थितींतून सुटण्याला [ब्राह्मणप्रसादावांचून] दुसरी वाट नाही. २. क्षत्रियाची. ३. खात्रीनें. ४. मला ब्राह्मणाला. ५. दार. ६. ह्या देहाची पर्वा न करितां सत्यपणानें च वागण्याची माझी मोठी इच्छा आहे. ७. शहाण्या! * खुणेंतील.

कीं तिळ हि संशया[१] तुज, हरिस गजा, श्रम नको विदाराया.'
राजा म्हणे, ' प्रकाशीं इतरीं प्रिय पद्म न रविचा रमला;
वेदज्ञास कथावें काय? परि प्रश्न कर, विचार मला.' १३८
उत्तंक म्हणे, " धर्में झाली आम्हांत मित्रता राया!
हा संबंध व्यसनीं, क्षम तिमिरीं जेंवि मित्र ताराया. १३९
'वाक्संयत विप्र' असें धर्माचें तत्व जाणते म्हणती,
मित्रीं विषम, तयाची करिती विस्पष्ट तस्करीं गणती. १४०
मित्रकृत बोध मित्रां हर्षद, रवि जेंवि सारसां, गमला;
यास्तव वा मित्रसहा! तूं एक विचार सार सांग मला १४१
मीं प्राप्तार्थ, नृपा! तूं पुरुषादक पुरुषभक्षणीं लोल,
जाउनि पुन्हां तुजकडे येउं? न येऊं? कसें करूं? बोल." १४२
मित्रसह म्हणे, 'साधो! पुससी जरि धरुनि मित्रभावातें,
कथितों, गेली शापें न प्रतिभा, जेंवि मित्रभा वातें. १४३
वेंची मराळ मोतीं, तसें, बोलेन वचन, या वेंच;
त्वां मजकडे पुन्हां, सुररिपुदेशा जेंवि कच, न यावें च. १४४
येतां परतोनि, तुझे प्राण द्विजसत्तमा! न वांचावे;
कीं, क्षुधित नित्य चरचर हा राक्षस मत्त मानवां चावे.' १४५
होउनि कृतकृत्य, द्विज तो निघतां त्या नृपासि आमंत्री;
दुर्घट हि कार्य घडवी सुसमर्थ गुरुप्रसाद हा मंत्री. १४६
कृष्णाजिनांत वेष्टुनि मणिकुंडलयुग, जपोनि राखे तें;
चढला फळार्थ बिल्वीं, बांधुनियां धन तदीय शाखेतें. १४७
पक्कें पक्कें पाडी, गुंते मुनिची फळांकडे दृष्टी;
दैवेंकरुनि फळांची शाखासक्ताजिनीं पडे वृष्टी. १४८

१. शकच निवारण करण्याला. २. सूर्यविकासी कमल. ('पद्म शब्द येथे पुल्लिंगी आहे). ३. ब्राह्मण हा वाणीनें (वचनानें) बद्ध असतो. ४. मनुष्य-भक्षक. ५. लपट; चटावलेला. ६. सूर्याची प्रभा. ७. निरोप घेई. ८. दुर्दैवानें. ९. फांदीस बांधलेल्या कृष्णाजिनावर. * आदि० कचोपाख्यान अनुसंधेय आहे.

अजिन विसकटे, पावे मणिकुंडलयुग धरातळीं पतन;
विधि रक्षिना जया, त्या कोण कुशळ करिल वस्तुला जतन!
अजिन करि शब्द पतनीं, उत्तंकाला स्वपात तें कळवी;
पाहे फिरोनि मुनिवर तो जों, तों नाग कुंडलें पळवी. १५०
ऐरावतकुळज भुजग सत्वर मणिकुंडलें मुखीं धरुनीं
वल्मीकांत शिरे, तों टाकी तो मुनि उडी द्रुमावरुनीं. १५१
उत्तंक म्हणे अजगरगिळितैकतनयजनापरिस 'हाय!'
गुरुचा प्रसाद होता त्या गुरुभक्तोत्तमा परि सहाय. १५२
दंडें वारुळ खाणुनि, खाणी धरणीस दिवस अठरा हो!
कांपे धरा थरारां, त्या मुनिस म्हणेल कोण 'हठ राहो'? १५३
द्विजरूपी शक्र म्हणे, 'नाहीं नागांत बा! त्रपा ताळ;
काष्ठ खणिसिल किति? बहुशत योजन परम दूर पाताळ.'
उत्तंक म्हणे, 'विप्रा! यावद्बळ भूतळासि फोडीन,
जोडीन कुंडलें कीं प्राणांतें त्वत्समक्ष सोडीन.' १५४
निश्चळ निश्चय जाणुनि, शिरवी दंडांत देव तो पविला;
कीं, भस्म अहिसुरांचें न करो गुरुभक्त विप्र कोपविला. १५५
वज्रास्त्रबळें सुदृढ हि भूतळ तें क्षिप्र भेदिलें दंडें,
भेदावीं सानुभवें वेदांतज्ञ जसीं सुखें वंडें. १५६
भेदी शिळातळातें तो दंड, जेंवि जाणता टंकें;
कीं जातो आणाया, भेदुनि भस्मासि, बाण तांटंकें. १५७
पाडी महीतळीं, घनपटळीं ज्यापरि समीर, विवरातें;
भूमितळा 'तम,' गुरुच्या म्हणतों, बा! परिस, मीं 'रवि' वरातें
करि, उपवासांचा श्रम बहुदिन साहोनि, तो खनक विवर;

१. मागें गीति १२२ वी पहा. २. अजगराने गिळिला आहे एकुलता एक पु[त्र] ज्याचा अशा माणसापेक्षां अधिक. ३. पाखाड मनें. ४. वाकबगार; निष्णा[त]. ५. टांकांनें. ६. अगदीं अनायासें, असा भावार्थ. ७. कुंडलें. ८. बारा.

सुविशाल नागलोका पावे पाहोनि तोख[1] न कविवर. १६०
तो बहुसहस्रयोजन अत्यद्भुत नागलोक, शत[2] गावें
ज्याचें द्वार, विलोकुनि ज्या कोणाचें हि धैर्य न तगावें. १६१
प्राकार सुवर्णाचे जेथें, बहुसंख्य नंदनाभ[3] वनें,
त्या लोकींचीं किति म्यां वर्णावीं पांडुनंदना! भवनें? १६२
दुःसाध्य कार्य वाटे, झाला चिंतामहागदातुर गा!
तेथें पाहे कृष्णा सित[4]वालधिमंडिता तदा तुरगा. १६३
अश्व म्हणे, 'आढ्यत्वीं[5] निश्चित आहे चि जेंवि मद पानीं[6]
मत्तांचा उतराया माज, करीं धमन शीघ्र मदपानीं[7]. १६४
उत्तंका! त्वां आजि च धरिला संकोच कां अगा! धमना[8]?
होतासि करित गुरुच्या सदनीं ऐसें चि तूं अगाधमनाः[9].'१६५
उत्तंक म्हणे, 'भलतें वदसी हें काय तूं? अरे वाजी!
न तसी तसी[10] करिसि, परि होइल रेवा[11] कसी, अ-रेवा जी?'
अश्व म्हणे, 'तव गुरुचा गुरु मीं होवूनि नित्य दास, मज
पूजिसि गौतमगेहीं ज्या, तो चि ज्वलन होय हा समज.' १६७
त्या पावकप्रसादें झाला तत्काळ तत्वबोध मनीं,
मग वाजिच्या अपानीं उत्साहें सक्त होय तो धमनीं. १६८
त्या अश्वरोमकूपांतुनि होय प्रकट बहुतसा धूर,
जेणें अद्यापि भिजे अश्रुभरेंकरुनि बहुत सोधूर[12]. १६९
करितो जसी सरोरुहगहनांत[13] सिरोनि धामधूम करी,
तैसी, वासुकिमुख[14] भुजगांचें व्यापूनि धाम[15] धूम करी. १७०

१. तोष. २. शेंकडो कोस रुंद. ३. नंदनवनाप्रमाणें आहे प्रभा ज्यांची अशीं. ४. जो काळा आहे व ज्याची शेपटी पांढरी आहे अशा. ५. श्रीमंतीत. ६. [मद्यादिकाच्या] पानांत. ७. माझ्या अपानद्वारांत (गुदद्वारात). ८. फुकर घालण्याला. ९. खोल आहे बुद्धि ज्याची असा. १०. जी गोष्ट जशी नव्हे त्या गोष्टीला तशी उपमा देतोस. ११. नर्मदा. १२. साधूंचे उर. १३. कमलवनांत. १४. वासुकीप्रमुख. १५. गृह.

भुजगां सिकवी, करुनि व्याकुळ बहु मानसा, धुरी ती तें,
कीं, द्यावा, सकळ[1] छळ सोडुनि, बहुमान साधुरीतीतें. १७१
'शरणागत रक्षावे हंसें बक; वाडवा! सुकिव देहें
न नतांचीं; करुणेचें लावीं न कवाड,' वासुकि वदे हें. १७२
मणिकुंडलें समर्पुनि, पूजुनि, उत्तंक विनविला[2] नमुनीं,
होय सुशांत, अभय दे व्याळांतें; दीर्घरोष[3] तो न मुनी. १७३
दमिले, अतितर दारुण जे श्रीमदमत्त कुंडली होते.
गुरुभक्तितपस्तेजें केले गुरुदार कुंडली हो! ते. १७४
उत्तंक म्हणे गुरुला, 'हातीं येतीं न कुंडलें कांहीं:
केलें होतें माजें कद्रूच्या मलिन तुंड लेकांहीं:
परि या पदप्रसादें तरलों मीं संकटांत गुरुदेवा!
भवसागरांत नौका, सेतु, विमान प्रभो! तुझी सेवा. १७६
मीं भक्त मयूर, प्रभु तूं करुणामृतपयोद गुरुराजा!'
ऐसें वदोनि वंदी; ऐसा तो सुगुरुभक्त कुरुराज्या! १७७
होय सुधा वसुधेवरि उत्तंकाची कथा असी सुरसा:
ईतें सादर सेविल जो कोणी रसिक साधु, तो सुरसा. १७८

---

## अध्याय तिसरा.

यादव करीत होते येउनि सस्वजन रैवतमहातें,
तेथें वसुदेवातें वंदी भेटोनि दैवत महा तें. १
वसुदेव पुसे, सांगे भीष्मद्रोणादिनिधन वनमाळी;
शोक न व्हावा म्हणउनि, अच्युत अभिमन्युचा चि वध गाळी.

१. सर्व कपट (लबाडी). २. विनविलेला. ३. दीर्घकाल टिकणारा राग ज्यांचा असा. ४. सर्प. ५. गुरुपत्नी. ६. कर्णभूषणांनीं युक्त. ७. कद्रूच्या मुलांनीं (सर्पांनीं) माझे तोंडाला काळोखी लागण्याचा वेळ आणली होती. ८. रैवतक पर्वतावरील उत्सवातें. ९. आजानुलंबिनी माला धारण करणारा (श्रीकृष्ण).

भवसागरीं तराया ज्याची धरितात सुज्ञ जन कास,
त्यातें म्हणे सुभद्रा, 'भाच्याची गति हि सांग जनकास.' ३
बोलुनि असें, पडे ती, शोकें वसुदेव, देवकी हि, पडे;
तें किति वर्णूं? शिशुसा उद्धव, अक्रूर आयकोनि रडे*. ४
तातप्रमुख जनांच्या दूर करी वासुदेव शोकांतें;
नामें विश्वाचें हरि, राहों देईल दुःख तो कां तें? ५
प्रभुनें सौभद्राच्या श्राद्धीं द्विज साठ लक्ष जेवविले.
लेवविले आपण सदलंकार, सुवर्णराशि देवविले. ६
यादव, पांडव, सर्व हि दुःखित अभिमन्युच्या वियोगानें:
न रुचति कोणांला हीं मधुरें शुकसारिकोदितें गानें. ७
सर्वांत उत्तरा बहु शोकार्ता, सुबहु दिवस जेवीना;
ठेवीना गर्भी ही दृष्टि सती नीट, जळ हि सेवीना. ८
शोकें, जागरणें, उपवासें घडला जसा चिरायास,
पोटांत गर्भ हळुहळु तत्तापें लागला जिरायास. ९
व्यास प्रकटुनि सांगे कुंतीतें, त्या हि मत्स्यतनयेतें,
'वत्से! समुचित तरि, जरि गेलें शोकेंकरूनि धन येतें. १०
शोकीं बुडो अवीरा, पति किंवा जीस शुचि तनय नाहीं:
प्रभुतेजें, मद्वचनें देखसिल कुमार उचित नयनाहीं. ११
परिपाळिल साधूंतें, द्याया बहु उत्सवास वसुधेतें,
तत्सोमातें सेविल टाकुनि कृतकुत्स वासव सुधेतें. १२
झुरवाया श्वशुरहृदय, गर्भ हि उपवास करिसि मुलि! कां गे!?'
ऐसें चि पांडवांस हि, 'न करावा व्यर्थ शोक,' हें सांगे. १३
"'यावरि शोक करूं ना' ऐसें बोला कसे, वहा आणा:

१. पोपट आणि मैना ह्यांनीं उच्चारलेलीं गाणीं. २. अति श्रम. ३. 'पति किंवा जीस शुचि तनय नाहीं' अशी स्त्री. ४. [यज्ञात] त्यानें दिलेल्या सोमरसातें. ५. केलेली आहे कुत्सा म्हणजे निंदा ज्यानें असा. * कित्येक.

शकट[1]गजोष्ट्रांवरि तें धन यज्ञाकारणें वहा, आणा." १४
यापरि आज्ञा करुनि, व्यास प्रभु गुप्त होय; मग [2]तीतें
पांडव [3]अनुष्ठिती, हयमेध तारावयासि जगतीतें. १५
जावुनि हिमाचळीं, पदपद्में पूजूनि विश्वजनकाचीं,
घेउनि आले नानाविध पात्रें आयतीं च कनकाचीं. १६
आठ सहस्र सुं*वर्ण, प्रबळीं उष्ट्रीं, वहावया, भार,
शकटीं द्विगुण, त्रिगुण द्विरदीं. रचिला न दुर्बळीं फार. १७
लक्ष गज, लक्ष गाजिनीं, लक्ष शकट, लक्ष रथ हि हे[4] मानें
भरिले मरुत्तदत्त द्विजवर्यत्यक्त शुद्ध हेमानें. १८
मग साठ लक्ष उंट हि भरिले[5] तैसे चि तद्द्विगुण वाजी,
खर, पुरुष [6]भारवाहक जे, तत्संख्या नसे चि यामाजी. १९
तो दोन दोन कोस स्वर्णभरातीं महाचमू चाले,
परमेश्वरप्रसादें पांडव निर्विघ्न निजपुरा आले. २०
पांडव येणार, पुढें तों चि सुभद्रासमेत रामातें
घेउनि नागपुरा प्रभु ये, पुरवाया स्वभक्तकामातें. २१
प्रद्युम्न, सांब, सात्यकि, कृतवर्मा, निशठ, चारुदेष्ण, गद,
इत्यादि वीर विभुच्या जवळि, सुवैद्याचिया जसे [7]स्वगद. २२
त्यातें धृतराष्ट्र, सुकवि विदुर, यथान्याय पूजिती हर्षें;
प्रभुदर्शनें निवे गजपुर बहु, जेंसें मयूरकुळ वर्षें. २३
पांडव हळुहळु, बहु धन घेउनियां, येत निजपथीं असतां,
विदुरसुसत्कृत यादव, माधव, बळदेव गजपुरीं वसतां, २४

१. रथ, हत्ती आणि उंट यावर लादून. २. व्यासाशीतें. ३. मानित झाले. ४. या प्रमाणानें. ५. मळपाठ–**भरिलीं उंटें तेथें सासष्ट सहस्र.** [ हा पाठ टाळण्याचें कारण पंतांनीच ' षष्टिरुष्ट्रसहस्राणि शतानि द्विगुणा हया । इति मूलं ' असें पोथीच्या समासात लिहून ठेविलें आहे ]. ६. हलकरी. ७. चांगलीं औषधें.
* ऐशी मुजांच्या वजनाची सोन्याची नाणीं.

शुभदिवसीं, शुभलग्नीं, अभिमन्युसुतासि उत्तरा प्रसवे;
तो हर्षशोकवर्धन[1] होय, न तदसूंस तद्वशीं[2] वसवे. २५
तो शिशु निश्चेष्ट शव ब्रह्मास्त्रें[3] करुनि पीडिला होय,
निश्रीक[4] दिसे, जैसा कासारीं पद्म, आटतां तोय. २६
प्रभु धांवे, तों भेटे अनुजाकृष्णायुता[5] पृथा वाटे,
जीस सुदुःसहनानाशोकाकुळ जन्म निज वृथा वाटे. २७
कुंती प्रभुसि म्हणे, "बा! कीर्तिश्रीसद्मकंज[6] राखावें,
काळें न तुझ्या दासा शरणागतवज्रपंजरा! खावें. २८
झाला, मेला, सुत त्या तव नेत्रसमाननेत्रशोभाचा[7].
हा वांचवुनि, करावा त्वां परलोकीं प्रहृष्ट तो भाचा. २९
गातो, गुरुसि सुत दिला त्या अतुला[8] त्वत्कृता प्रतिज्ञा ते.
जोडू सुकीर्ति, सोडू बा! न तुला त्वत्कृता प्रतिज्ञा ते. ३०
तो चपलाक्ष[9] स्त्रीप्रति वदला कीं, 'त्वत्सुतासि रक्षील
मन्मातुळ[10] जगदीश, प्रेमें मजहूनि अधिक लक्षील.' ३१
संदेश स्वस्त्रीयाचें[10] सत्य करीं, वांचवूनि तोक, वच;
भगिनीस, पांडवांस, सखसखीस[11], पितृष्वसेस[12], हो कवच[13]. ३२
आधीं च उत्तरा बहु विकळा चित्तीं, स्मरोनि चपलाक्षा;
वांचेल पुत्रशोकीं हे, तरि दहनीं करूनि तप लाक्षा[14]. ३३

१. [पुत्र झाल्यामुळे] आनंदाला आणि [मेलेला च जन्मला म्हणून] शोकाला वाढविणारा असा. २. त्याच्या प्राणाना त्याच्या ताब्यांत (शरीरांत) राहता येईना. ३. मागे ऐषीकपर्व २।४३ ते ४५ पद्ये. ४. निस्तेज. ५. धाकटी बहीण सुभद्रा आणि द्रौपदी यांच्यासह असलेली कुंती. ६. कीर्ति व लक्ष्मी ह्यांचे निवासस्थान असें अभिमन्युसुतरूपी कमल. ७. तुझ्या नेत्राप्रमाणे आहे नेत्रशोभा ज्याची त्या अभिमन्यूचा. ८. कृष्णाने 'श्रीसांदीपनिगुरुसुत यमलोकाहूनि आणिला तूर्ण', अशी कथा आहे. ९. पाणीदार डोळ्याचा अभिमन्यु. १०. तुजसमान जो तुझा भाचा त्याचे. ११. द्रौपदीला. १२. आत्या, कुंती. १३. रक्षणकर्ता. १४. लाख.

गुरु[1]विप्रदेवकीसुतवितरणसुयशांत हें हि सांचीव,
पात्र दया लोभाचा तो भाचा स्मरुनि, बाळ वांचीव.'' ३४
बहु करुणविलाप करुनि, कुंती देवी सती रडायाला
लागे शोकें मोहें, वातें कदली तसी पडायाला. ३५
श्रीकृष्ण सांवरी त्या मोहीं बहु कळवळोनि आतेला;
या प्रभुसि दया जैसी ये, न पित्याला तसी, न मातेला. ३६
प्रभुला म्हणे सुभद्रा, "वांचिव मुल, परिस, भाचिया दे हें:
[2]त्वां आक्रमिली हरिची, दुष्प्रापा परि सभा चि या देहें. ३७
असीसि समर्थ असा कीं, मृत लोकत्रय पुन्हां जिवविसील:
ततांतें अमृतघनाहूनि अधिक शतगुणें निववविसील. ३८
वदलासि गुरुसुतातें [3] 'लंघूं पाहसि, करूनि वध, मातें,
तरि वांचवीन मीं मृत सौभद्राचें अपत्य अधमा! तें.' ३९
सुतशोकांत बुडाली, मेली, त्वां रक्षिली न परि सून;
बा! ते पांडव म्हणतिल काय, असें हें अनिष्ट परिसून? ४०
उठउनि पौत्रातें, जरि न सुखविसिल वृष्णिनायका! मातें,
व्हावास तरि कशास भ्राता? येसील काय कामातें? ४१
भगिनी, प्रिया सख्याची, दीना, शरणागता, हतापत्या,
ऐसें आणुनि चित्तीं, स्वोक्ति करावी प्रभो! तुवां सत्या. ४२
मजहुनि मन कृष्णेचें पाहोनि मृता मुलास कळकळतें,
बापा! मरणाधिक हें दुःखः किति वदों? तुला सकळ कळतें.''
देव म्हणे, 'तेज तुझ्या वरिल पुन्हां कां न नातवा, सति! तें?
लागे चि, लतां[6] सहजा जी चंदनकाननांत, वास तितें.' ४४

१. सांदीपनिगुरूचा सुत, द्वारकेंतील एका ब्राह्मणाचा सुत आणि देवकीचीं पाहलीं सहा मुलें ह्यांना यमलोकाहून परत आणून देणें हें च उत्तम यश, त्यांत. २. तूं या च देहानें दुष्प्राप्य अशा वैकुंठांतील हरीच्या सभेला जाऊन तेथून गुरुपुत्रादिकांस घेऊन आला आहेस, असा भावार्थ. ३. अश्वत्थाम्यातें. ४. उत्तरा. ५. तुझा जिवलग मित्र जो अर्जुन त्याची पत्नी. ६. चंदनाच्या झाडावर चढलेली वेली.

ऐसें बोलुनि रडतां घेउनि तीतें, स्वयें अ[1]रिष्टातें
गेला, द[2]यामृतमुदिर भगवान् वारावया अरिष्टातें. ४५
कृष्णा म्हणे सुनेतें, "हा, ताप सरावयास, आला गे!
श्वशुर, जया यम, जोडुनि हाता, पसरावयास 'आ' लागे." ४६
वृ[3]द्धांगना, चिं[4]कित्सक, सित माल्यें, दीप, कलश जलपूर्ण,
प्रभु 'साधु साधु!' बोले पाहुनि त्या सूतिकागृहीं तूर्ण. ४७
ती होय सु[5]संवीता, आला श्रीकृष्णनाथ जाणोनि;
करि करुणविलापातें. नि[6]र्भर नयनांत नीर आणोनि. ४८
"अजि! मामाजी! प्रभुजी! मज हा झाला कुमार मेलों[7], हो!
हें श्रवण करुनि न अधःप्रे[8]क्षणदात्री उमा रमेला हो. ४९
मेल्यें मीं हि, प्रभुजी! तो मन्नाथ चि म्हणों नको मेला;
बहुधा जनक न जोतों यासि दिसे, हा म्हणोन कोमेला. ५०
होतें हित, दाखविली असती जरि [11]हें तुम्ही [12]इषीकेला;
गुरु[13]जें निमग्न मंदुदरि[14] हा पतिसुतशोकशर [15]विषीं केला. ५१
केलें न तुम्हीं, मी पतिलोका जान्यें, कुमार उरता, तें;
म्यां ताडावें येथें, कितितरि याच्या परत्र[16] उर तातें! ५२
शस्त्र[17]ज्वलनीं केलें हवि, अंकीं रत्न हें न खेळविलें;
आचार्यसुतें जन्मुनि संसारीं सुफळ कोण मेळविलें? ५३

१ सूतिकागृह-पंत. बाळंतिणीच्या खोलीत. २. मेघ. ३. वृद्ध स्त्रिया. ४ वैद्य. ५. वस्त्र नीट सावरून घेतलें आहे जिनें अशी. ६. विपुल. ७. मेलेला. ८ खालीं पहावयास लावणारी. ९. 'कसा तव भर्ता श्रितरक्षण करितो' असे वदोनि -पंत. १०. जातकर्मी-पंत. जातकर्माचे वेळीं. ११. मी उत्तरा. १२. अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्रमंत्रित दर्भाच्या काडीला. १३. अश्वत्थाम्यानें. १४. या ठिकाणीं पंतांनीं प्रथम 'मदुरी' लिहिलें होतें. पण मागून समासांत 'द' लिहून हंसपदानें 'मदुदरि' करण्यास सुचविलें. 'री' ऱ्हस्व करण्याचें मात्र राहिलें. १५. विषदिग्ध-पंत. १६. परलोकीं. १७. हे पुत्ररत्न मांडीवर खेळविलें नाहीं, तर अश्वत्थाम्याच्या ब्रह्मास्त्ररूप अग्नीत त्याची आहुति दिली.

नमन तुम्हांसि करावें सुत घेउनि मन्मनीं असें होतें,
केलें विफळ मनोरथशत केवळ गुरुसुतें कसें हो! तें? ५४
च[1]पलाक्ष बहु तव प्रिय गमला आम्हां तुम्हां म[2]हाहितसा
केवळ कृतघ्न, घातक, निर्दय; त्याचा कुमार हा हि तसा. ५५
कर्म तसें चि करितसे हा, ज्यांत स्वपरघात कां जी! तें?
त्यजुनि सुधेतें, पीतो सुत, कीं प्याला स्वतात, कांजीतें! ५६
चपलाक्षासीं केली होती 'येईन सह' असी बोली;
खो[3]ली ती असती, तरि म्हणती 'छी!' त्यजुनि आपुली खोली.
चपलाक्षमति सुमृदु, परि दूषीना दुष्ट काय कोप तितें?
परलोकीं जाउनि, हे कसि समजावील बायको पतितें?" ५८
रडवी स्त्रियांसि, मोहीं सुतनु बुडे, जेंवि शृंगिणी पंकीं;
होय मुहूर्तें सावध, उचलुनि त्या मृतसुतासि घे अंकीं. ५९
त्यासि म्हणे, 'वत्सा! तूं धर्मज्ञतनुज कसा अधर्मातें
तुमजसि? निजगुरुगुरुतें न नमिसि, पावावया सुशर्मातें? ६०
[6]प्रपितामही, पहा हे बुडती कीं शोकसागरीं आजि;
तैसी च सुपूज्या हे पांचाळी, हे हि सात्वती आजी. ६१
जाल्यें मीं व्याधविशिखविद्धकुरंगीसमा कुळाधारा!
मज तव दृष्टि, सुधेची जेंवि पिपासासमाकुळा धारा. ६२
अभिमुख आहे आर्य श्रीकृष्ण, हरील ताप हा; याचें
वदन पहा, तव चित्तीं जरि चपलाक्षास्य बा! पहायाचें.' ६३
करुनि बहु विलाप असे, रडवुनि भरतस्त्रियांस, ती रडली:
जसि कर्दमांत [10]करिणी, पुनरपि मोहांत उत्तरा पडली. ६४

१. अभिमन्यु. २. [अकालमरणानें पितरांचें ऋण न फेडल्यामुळे] महान शत्रुप्रमाणें. ३. ज्या खोलींत, 'मी सहगमन करीन' अशी पतीशीं बोली केली ती खोली. ४. गंभीरता; मौन–पंत. ५. गाय. ६. पणजी; कुंती. ७. सात्वतांच्या (यादवांच्या) कुळांत जन्म पावलेली सुभद्रा ही आजी. ८. पारध्यांच्या बाणानें ताडित झालेल्या हरिणीसारखी. ९. तृषेनें पीडिलेल्यास. १०. हत्तीण.

सावध करिति, उठविती आर्या कुंतीमुखस्त्रिया तीतें;
वंदी नतवरदप्रभुपदयुग अभिमन्युची प्रिया ती तें. ६५
त्या विपुल विलापातें श्रवण करुनि, दीनबंधु तो तीतें
दावी वात्सल्य, जेया गातां वेडे चि सुकवि होतीं, तें. ६६
आचमन करी भगवान यदुनायक, आणवूनि शुचि वारी;
क्षिप्र ब्रह्मास्त्रातें, तापातें जेंवि शीतरुचि वारी. ६७
स्वमुखें करि प्रतिज्ञा देव, म्हणे, 'पुत्रि! उत्तरे! जाण,
मिथ्या न कधीं वदलों, करितों मीं त्वत्सुतासि सप्राण. ६८
वदलों नसेन मिथ्या, युद्धीं फिरलों नसेन जरि मागें,
तरि हा तव पुत्र उठो, वधिला जो त्या द्विजाधमें रागें. ६९
धर्म, ब्राह्मण परम प्रिय जरि असतिल मला पुढें मागें,
तरि हा तव पुत्र उठो, वधिला जो त्या द्विजाधमें रागें. ७०
विजयीं विरोध कांहीं जरि म्यां केला नसेल अनुरागें,
तरि हा तव पुत्र उठो, वधिला जो त्या द्विजाधमें रागें. ७१
धरिला असेल सत्यासह म्यां जरि धर्म, मणि जसा नागें,
तरि हा तव पुत्र उठो, वधिला जो त्या द्विजाधमें रागें. ७२
वधिले असतिल धर्में जरि केशी, कंस, त्यांचिया आगें,
तरि हा तव पुत्र उठो, वधिला जो त्या द्विजाधमें रागें.' ७३
यापरि कृष्णप्रभुचे वचनामृतसेक हे जसे झाले,
हाले मृतशिशु, हळुहळु गेले असु चेतनेसह चि आले. ७४
राहुविमुक्त विधु जसा, ब्रह्मास्त्रविमुक्त शिशु तसा गेहीं
प्रकटी प्रकाश, शिरतां प्राणगणासहित चेतना देहीं. ७५
मृतशिशुशोकानुभव प्रभुनें तो स्वप्नसा चि वाटविला,
सागर जेंवि अगस्त्यें, क्षणमात्रें सर्व खेद आटविला. ७६
भरलें होतें गजपुर जें शोकें, वांचवूनि तोक, रितें,

१. ज्या वात्सल्याचें वर्णन करितांना सत्कवि वेडे बनतात. २. थंड आहे कांति ज्याची असा चंद्र. ३. अर्जुनाच्या ठिकाणीं. ४. त्याच्या च अपराधामुळें. ५. वंशाव.

प्रभु, परिपूर्ण कराया हर्षामृत सांचवूनि, तो करि तें. ७७
कुंती, देवी कृष्णा, कृष्णावरजा[1], विराटनृपकन्या,
अंतःपुरीं, पुरीं अति मुदिता झाल्या स्त्रिया सुबहु अन्या. ७८
कविजनमुखें[2] तसीं च प्रकटिति बहुशब्दसंपदे वाद्यें;
संपों नये रडें, परि संपे, म्हणतां चि 'संप' देवाद्यें. ७९
गाति जनमेजया! तव गुरुच्या[4] आश्चर्य मरणजननाचें[5],
प्रभुतें[3] सुखविति गानें, स्तवनें, तैसे चि कुशळजन नाचें. ८०
करि जातकर्म, वांटी बहु रत्नसुवर्णशर्करा जीवां:.
प्रभु तेंवि जना सुखकर, विधु कुमुदां[6] जेंवि, अर्क राजीवां[7]. ८१
जनमेजया! परिक्षिन्नाम स्थापी प्रभु स्वयें त्याला,
कीं होतां चि कुरु परिक्षीण[8], तव जनक महायशा झाला. ८२
प्रभुतें, पुढें कुमार स्थापुनि, ती उत्तरा करी नमन;
दे रत्नें बहु त्यातें, जो व्यसनीं हर्षवी करीन[9] मन. ८३
उपजुनि अविघ्न जाला पौत्राला एक मासः मग राया!
पांडव, बहु धन घेउनि, आले, पावोनि विजय, नगरा या. ८४
धर्मासि अमात्यांसह गेला आनंदकाय सामोरा;
प्रभुपरि भेटुनि देइल, तोयद आनंद कायसा मोरा? ८५
ती भरतराजधानी वाटे भरिली लुटोनि अलकेला[11];
जाणों दारिद्र्यावरि निधिनीं सज्जनबळें चि चाल[12] केला. ८६

---

१. कृष्णाची धाकटी बहीण सुभद्रा. २. कवीच्या वाणीतून ज्याप्रमाणें कृष्णस्तुतिपर पुष्कळ शब्दभांडार प्रकट झालें तसें च नानाप्रकारचीं वाद्यें आपले आनंददर्शक शब्द ( आवाज ) करूं लागलीं. ३. कृष्णानें. ४. पित्याच्या. ५. जननमरण हा नैसर्गिक क्रम; पण परीक्षितीचा मरणजनन हा क्रम अर्थात च आश्चर्यकारक. ६. चंद्रविकासी कमलांना. ७. सूर्यविकासी कमलांना. ८. कुरुकुळ नष्टप्राय झालें असतां. ९. करींद्र-पंत. १०. आनंदमूर्ति. ११. कुबेरनगरीला. १२. चाल, हल्ला.

धृतराष्ट्रातें वंदुनि, भेटुनि विदुरा, युयुत्सुला, धर्म
पौत्राची उज्जीवनवार्ता ऐकोनि पावला शर्म. ८७
पूजी धर्म प्रभुतें प्रेमें, पावोनि गहिवरा; हा तें
स्मरवी, समर्चिलें जें, उद्धारितां मग्न[3] महि, वराहातें. ८८
त्यावरि भेटे कृष्णद्वैपायनभानु सारसा राज्या,
सांगे, सच्छ्रवणसुधा धर्मकथांमाजि सारसारा ज्या. ८९
मुनितें धर्म म्हणे, ‘ धन घेउनि आलों तव प्रसादानें,
लावावें हयमेधीं तें हें त्वां विश्वपूज्यपादानें.’ ९०
व्यास म्हणे, ‘ बहु उत्तम; सत्वर साहित्य तूं करिव राज्या!
सुखसिद्धिकीर्ति वरितिल तुज, वरित्या जाहल्या करिवरा[6] ज्या.
मीं, पैल, याज्ञवल्क्य, त्वन्मखसिद्ध्यर्थ सर्वदा जपतों;
तप तों, तुजसारखियां साधूतें[*] उद्धरावया तपतों.’ ९२
धर्म म्हणे, ‘ श्रीकृष्णा ! तूं दीक्षित हो, तुझी च हे वसुधा;
पांडव न पावते च स्वभुजबळेंकरुनि, जेंवि देव सुधा. ९३
योग्य स्वीकाराया, तूं चि प्रभु, न वसुधा, न दीक्षा, मीं;
हो कीर्ति जगीं, धर्मी दृष्टि तुझी, नवसुधानदी क्षामीं.’ ९४
पुण्यश्लोकासि म्हणे तत्प्रार्थित आयकोनि शौरी तें,
‘ धर्मा ! तूं चि उचित या दीक्षेतें, जेंवि शंभु गौरीतें. ९५
तूं आम्हां सर्वांचा नाथ, कुरूत्तम गुरूत्तम खरा, या
सर्वां भूतांची गति तूं धर्मा !; तुज चि योग्य मख राया. ९६
धर्मा ! प्रधान तूं, बा ! आम्हीं सर्व हि तुझे गुणीभूत[10];
भूताधिपें[11] करावें, तें कैसें करिल, जन्हि गुणी, भूत[12] ? ९७

१. सजीव झाल्याची हकीकत. २. धर्म. ३. बुडालेली. ४. धर्मराजरूपी कमलाला. ५. उत्तमोत्तम; निवडक. ६. गजेंद्राला. ७. तर. ८. अन्वयार्थ— [ जसी ] क्षामीं नवसुधानदी [ तसी ] तुझी धर्मी ( धर्मराजावर ) दृष्टि [ आहे ] [ अशी ] कीर्ति जगीं हो. ९. कृशी—**पंत.** १०. अंगभूत. ११. श्रीशंकरानें. १२. शंकरगण, पिशाच्च. * साधूनें (?).

दीक्षास्वीकार करीं, वरकड तूं सर्व काम सांग मला;
अधिकार राजसां कीं तामसां नीचोच्च मखांत गमला.' ९८
चैत्राचिया, प्रतीक्षा करि, दीक्षा द्यावयासि, पुनिवेची:
ती चैत्री ये तोंवरि धर्मकथांहीं च काळ मुनि वेची. ९९
मग अश्व उक्तकाळीं, दीक्षा देउनि युधिष्ठिरा विधिनें,
संरक्षणार्थ अर्जुन योजुनियां, सोडिला तपोनिधिनें. १००
विजयासि धर्म सांगे, "हरि-हरित्यांसीं महाविरोध रणीं
न करावा त्वां, बाळकपाळकशोकीं न हे विरो धरणी. १०१
सांत्वुनि त्यांसि म्हणावें, 'या सहपरिवार तुरगमेधाला,'
बहु सामें हृष्ट रमो अरि, अमृतें जेंवि सुर रमे धाला. १०२
हरि-हरित्यांवरि कार्यापुरते चि स्वशरजाळ वर्षावें,
व्हावें त्वां करुणाघन, शिशुभूपसमग्रवृंद हर्षावें." १०३

---

## अध्याय चवथा.

अच्युतसख अनुसरला अध्वरतुरगोत्तमासि फिरवाया,
जिरवाया शात्रवमद, सर्वत्र स्वप्रताप मिरवाया. १
हरितें हरितें झाले जे नृप, त्यांचे रणीं मद न टिकले:
धर्माज्ञेनें उरले शोभवित तदंगनावदन टिकले. २
पति सूर्यवर्मनामक ये, न लवुनि कंधरा, त्रिगर्तांचा:
'प्रभुचा' म्हणे, 'अतिक्रम करिन,' जसा अंध 'रात्रि गर्तांचा.'

१. यज्ञांत राजस किंवा तामस मनुष्याला अधिकार हा लहानमोठा वाटत असतो; सात्त्विक मनुष्याला मात्र सर्व कामें सारखीं च असतात. २. प्राणघातक असें युद्ध. ३. अल्पवयी राजाच्या शोकांत. (भारती युद्धांत सर्व मोठे राजे पडल्यामुळें त्यांच्या मुलांना धर्मानें गादीवर बसविलें होतें). ४. अर्जुन. ५. यज्ञीय अश्वश्रेष्ठास. ६. त्यांच्या स्त्रियांचें मुख. ७. सौभाग्यतिलक. ८. नम्र होऊन. ९. धर्मराजाचा. १०. रात्रीच्या वेळीं. ११. खाचखळग्याचा.

अर्जुन म्हणे, 'स्मरा तें निजपूर्वजवीरमथनः कां मरतां ?'
कटु हि हित तदुक्त नयां, जसें वैराग्यकथन कामरतां. ४
साम न मानुनि, कटकें वेढी बाळ त्रिगर्तनृप हरिला:
त्याचा प्रताप तेव्हां मृदुयुद्धेंकरुनि हरिसखें हरिला. ५
तद्बंधु केतुवर्मा धांवे, त्यातें हि पार्थ कवि रोधी.
तिसरा हि न धृतवर्मा होऊं दे सामसार्थक, विरोधी. ६
बहु मानवे धनंजय त्या धृतवर्म्यास शीघ्रसंधानें,
तो तत्प्रसाद तेणें न निरखिला, निधि जसा चि अंधानें. ७
क्षत केला विजयाचा, सोडुनियां दीप्त कांड, वाम कर:
सिंधुमकरापुढें करि तो क्षुद्र सरस्थ तांडवा मकर. ८
शर लागतां कराला, गांडीव गळोनि तत्क्षणीं पडलें,
कुरवाळितां डसावें विषधरशिशुनें जसें, तसें घडलें. ९
गांडीव गळुनि पडतां, धृतवर्मा तो पुनःपुन्हां हांसे,
खेळांत महापटुतें पाडुनि अनुकूळ शिशु जसा फांसे. १०
कोपुनि, गांडीव धरी, रक्त भरला पुसोनि हात, रणीं,
सोडी खर शर; वाटे करितो चि क्षय रुसोनि हा तरणी. ११
त्यांचें तेज हरी, क्षण आयासीं करुनि हात, सारे च:
मृगपति जसा करींचा, उतरी, धनु धरुनि, हा तसा रेंचें. १२
झाले त्रिगर्त सर्व हि, आले तृणवदन संगरीं शरण,
त्यांसि अभय दे अर्जुन, धर्माज्ञेचें करूनियां स्मरण. १३
वदला, 'विरोध न बरा; संसारीं साधुसीं बरी मैत्री:
या हयमेधासि पुढें, जों कीं येणार पूर्णिमा चैत्री.' १४

१. भारती युद्धात झालेल्या २. विषयासक्त जनाना. ३. अश्वाला. ४. फार मान देऊं लागला. ५. तेजस्वी बाण. ६. नाच, गमजा. ७. सापाच्या पिलानें. ८. फांसे अनुकूळ पाडुनि-पंत. ९. तरणी=सूर्य. १०. आपल्या हाताला किंचित्काल श्रम देऊन. ११. रग जिरवा. १२. जेव्हां चैत्री पौर्णिमा येईल तेव्हा.

तेथुनि निघोनियां मग जों प्राग्ज्योतिषपुरासि[1] हय गेला,
तो हरुनि वज्रदत्तें भगदत्तसुतें महाबळें नेला. १५
भगदत्तवधक्रोधें त्या पार्थासीं त्रिरात्र युद्ध करीः
तो हरिसा, यश त्याचा ऐरावतसा चि मिरवि शुद्ध करी. १६
चवथे दिवसीं पावे पार्थशराहत सुवीर तो पतन,
पुनरपि चढे करिवरीं, स्वयशातें करि पराक्रमें जतन. १७
[2]बहुशरचित शल्यसम चि होय द्विपवर रणांत, मग शिर तो
नत करुनि पडेः वाटे वज्राहत मेदिनींत नग शिरतो. १८
यापरि अर्जुन भंगुनि भगदत्तसुतास वीर्यमत्तास,
देता झाला अभय व्यसननिमग्नास वज्रदत्तास. १९
त्यासि म्हणे, 'सुरभि न जें, देइल तत्काळ साधुमैत्री तेंः
यावें पहावया त्वां हयमेधोत्सव पुढील चैत्रीतें.' २०
तेथुनि जयद्रथाच्या गेला तो पार्थ सिंधुदेशालाः
तेथें ही जय पावे, करुनि प्रकट प्रतापलेशाला. २१
आधीं सैंधववीर स्मरुनि जयद्रथवधासि कोपानें
वेढिति, म्हणति, '[3]धरा या खळरुधिराच्या सुतृप्त हो पानें.'
उत्पात विविध झाले; भ्याले सुर म्हणति, 'पार्थ हा शुकसा
शरपंजरांत दिसतो, होइल यांतूनि मुक्त आशु[4] कसा?' २३
देते झाले मुनिवर त्यासि करायासि समर तेज्यातें,
तो भंगेल कसा हो! 'विजयी हो' म्हणति अमर ते ज्यातें?
पर झांकिले नराच्या इषुहीं, तरु जेंवि शलभसेनाहीं[5]ः
झाले जिष्णुपुढें ते मृगराजसमक्ष कलभसे[6] नाहीं[7]. २५
ज्याचें त्याचें[8] हि करी भंगीं[9] 'हा! हा!' अशा स्वनीं[10] तुंडः

१. शाकल देशाच्या उत्तरेचा देश. २. पुष्कळ बाणानीं विद्ध झालेला तो श्रेष्ठ हत्ती साळुद्रानामक प्राण्याप्रमाणें रणांगणांत दिसूं लागला. ३. पृथ्वी. ४. लवकर. ५. टोळधाडीनें. ६. लहान हत्तीप्रमाणें. ७. नाहींसे झाले, नाश पावले. ८. प्रत्येकाचे. ९. पराभव झाल्या वेळीं. १०. शब्दाला.

धावोनि दुःशला ये, दावी त्या अतियशा[1] स्वनातुंड[2]. २६
भगिनीतें पाहुनि, धनु उतरि अजातारिच्या[3] अकोपार्थः[3]
द्रवुनि म्हणे, 'काय करूं? वद वत्से!, पर[4] म्हणों नको पार्थ.'
ती त्यास म्हणे, 'माजा पुत्र तुझा सुरथनाम जो भाचा,
तत्सुत हा तुज नमितोः दे आशीर्वाद अभयलोभाचा[5].' २८
पार्थ म्हणे, 'कोठें तो तव पुत्र सुरथ? न आणिला कां गे!?'
ती दुःशला, स्वनयनें शोकांबुभरें भरूनियां, सांगे. २९
'बा! होता शोकाकुळ, ऐकुनि निजतातसिंधुराजगतीः
कळली आक्रमिली त्वां सिंहें त्या बाळसिंधुरा[6] जगती. ३०
तव आगमनाची त्या झाली अतिमात्र शोकदा वार्ता,
सिंहासनीं च मूर्छा आली तत्काळ शोकदावार्ता[7]. ३१
केवळ बाळ झळेनें[8] ग्रीष्मांत जसा तसा चि कोमेलाः
भद्रासनावरुनि बा! पडला, पडतां चि सुरथ तो मेला! ३२
मग या तत्पुत्रातें घेउनि, अभयार्थ धांवल्यें बा! मीः
मेला तुझ्या भयें जो, पडला आहे तसा चि तो धामीं.' ३३
ऐसें सांगोनि रडे फार चि कारुण्यसंपदभ्रा[9] त्या,
पुनरपि म्हणे, बहु करुण व्हाया, तच्चित्तकंपद भ्रात्या. ३४
'अभिमन्युसुत तसा परिपाल्य सुरथसुत हि अर्जुना! तूतें,
तो अर्जितो जसें जें प्रेम तुझें; हा हि अर्जु[10] नातू तें. ३५
दुर्योधन सैंधव खळ, त्या दोघांस स्मरों नकोः पावें;
बा! मजवरि न, तयांचे ते अपकार स्मरोन, कोपावें. ३६

१. अतिशय आहे यश ज्याचें अशा अर्जुनाला. २. आपले नातवंड (जयद्रथाचा मुलगा जो सुरथ त्याचे मूल). ३. धर्मराजाने रागावु नये म्हणून. ४. परका. ५. अभय आणि कृपालोभ ह्यांनी युक्त असा. ६. बालगजाला. ७. शोकरूपी वणव्याने पीडित अशा त्याला. ८. उन्हाच्या तापानें, तिरिपेनें. ९. करुणारूपी संपत्तीचा वर्षाव करणाऱ्या अर्जुनाला. १०. मिळवो.

हतबंधु निपट शिशु[1] हा काहीं नेणें, अशावरि द्रव[2] दे
शरणागता अभयः बा! प्रभु करि, विनवूनि जें दरिद्र वदे. ३७
बा! सन्मन अरिच्या ही पाहुनि दुःखित मुलास कळकळतें,
बहु काय वदों? शरणागतवत्सळ तूं, तुला सकळ कळतें. ३८
इत्यादि बहु विलाप श्रवण करुनि, पार्थ गहिवरें दाटे:
फाटे उर शोकानें, बहु निंद्य क्षत्रधर्म त्या वाटे. ३९
आलिंगुनि, समजावुनि पार्थ म्हणे, 'रक्ष या स्वसे! वेलां[3]:
सांगत जा मज, द्याया शुद्धयशा अक्षया, स्वसेवेला. ४०
आलें हठें मराया, समर कराया, वळ, स्वसे! ने तें.'
वदुनि असें दे आज्ञाः ती गेली फिरवुनि स्वसेनेतें. ४१
आकाशीं जेंवि मृगामागें[4] भगवान् पिनाकधर लागे,
त्या यज्ञहयामागें तैसा चि विजयः न लेश ही भागे. ४२
अश्व मणिपूरदेशीं जातां, ज्याचें न यश कधीं मळलें,
तो अर्जुन आला, हें तत्तनया बभ्रुवाहना कळलें. ४३
धनविप्रपुरःसर[5] ये, नमन करी, धरुनि तो[6] के विनयातें:
सुखवी, माथां हुंगुनि, आलिंगन करुनि. तो कवि[7] न यातें. ४४
जी साधुरीतिसी शुचि सुतरीति[8], धरूनि तोष, तोलावी.
तीतें हि पुत्रवत्सळ बहु धर्मनयज्ञ दोष तो लावी. ४५
कोपोनि म्हणे, 'युद्ध न करितां, स्वक्षत्रधर्म सोडून,
मोडून वीररीतिप्रति, कां आलासि हात जोडून? ४६

१. केवळ अर्भक. २. सदय हो, करुणा कर. ३. जयद्रथवंशाच्या अंकुराला. ४. शंकरांनीं दक्षयज्ञविध्वंस केला त्या वेळीं यज्ञ हा मृगरूपानें पळून जाऊं लागला, वगैरे कथा अनुसंधेय आहे. ५. नजराणा आणि ब्राह्मण ह्यांना पुढें करून. ६. तो अर्जुनचित्रांगदापुत्र बभ्रुवाहन. (आर्या० आदि० अ० ३८।३९ पहा). ७. तो कवि (सुज्ञ अर्जुन) यातें (बभ्रुवाहनाला) न सुखवी; अर्जुनानें त्याचा उलट सत्कार केला नाहीं. ८. मुलाची वागणूक.

क्षत्रियधर्मबहिष्कृत उचित मज न पुत्र तूं भयातुर गा!
हे[1] भेटि नीट तरि, जरि अनुसरतों पार्थ मीं न या तुरगा. ४७
भेटसि भीरु स्त्रीसा: करिसी, जोडूनि हात, सामातें:
परकृत अपमान जसा, त्वत्कृत बहुमान हा तसा मातें. ४८
आयुध धरूनि आलों किंवा मीं करुनि आयुधन्यास?
वद रे! रुचे यशस्कर कीं अयशस्कर हि आयु धन्यास? ४९
या समयीं जोडावे शर, तें न करूनि जोडिसी हात:
घात यशाचा केला, होइन कैसा प्रसन्न मीं तात?' ५०
यापरि बहु धिक्कारी पुत्रातें पार्थ संकटीं घाली:
तो भेदुनि उर्वीतें, तेथ नागात्मजा सती आली. ५१
पार्थप्रिया उलूपी येवूनि अधोमुखा सुता पाहे,
साक्षाज्जननीहुनि बहु पावे चित्तीं सती सुताया हे. ५२
त्या बभ्रुवाहनातें भेटुनियां ती म्हणे, 'अरे ताता!
नागात्मजा उलूपी मी श्वेताश्वप्रिया तुझी माता. ५३
पतिचें जसें करावें, तैसें चि प्रिय तुझें हि पुत्रा! त्यां:
एकावें चि हितविहित माझें त्वां सर्ववीरसुत्रास्या! ५४
मद्वचनें तातासीं युद्ध करीं, बा! घडेल धर्म तुला:
घे यश, तव शर्माची पावेल न तें जयंतशर्म तुला. ५५
युद्धें चि युद्धदुर्मद, हा होइल न प्रसन्न सामासः
दानान्हि न वळेल चि, माथां धरिल्या हि पाय सा मास.'
ती धमनी, सुतदहन चि, पेटविला क्षिप्र बोधवातें हो!
कीं तच्चित्तीं, प्रिय, भुजविक्रम दावूनि, तो धवातें हो. ५७

१. या यज्ञीय अश्वाचे मागे त्याचे रक्षणार्थ न येता, पिता ह्या नात्याने तुला भेटावयाला येतो तर, असा भाव. २. शस्त्रत्याग. ३. आयुष्य, जिणे. ४. थोर पराक्रम. ५. पृथ्वीतें. ६. नागकन्या उलूपी. (ही बभ्रुवाहनाची मावत्र आई). ७ अर्जुनाच्या स्त्रिया. ८. सर्ववीरेंद्रा! ९. तुझ्या यशाची. १०. शक्रसुत–**पंत.** ११. नवऱ्याला.

चित्तीं धरि मातेच्या सुकृतसुखसुकीर्तिदायक वचातें,
दिव्य शिरस्त्राण शिरीं, देहीं तो वीरराय कवचातें. ५८

सदिषुधिशतसंबाधीं नमुनि उलूपीस शुभ रथीं चढला,
कढला क्रोधें; समयीं धर्मातें कां चुकेल, जो पढला? ५९

न दुजा तसा सुतेजा पाहे, जरि करि उदंड शोध, रवीः
निजसैनिकांसि आज्ञा करुनि हयास प्रवीर तो धरवी. ६०

होय प्रसन्न अर्जुन, पुत्रावरि बाणवृष्टितें सोडी,
तो बभ्रुवाहन हि त्या गुरुवरि; घनवृष्टि तीपुढें थोडी. ६१

केवळ सुर असुर जसे, करिति पिता पुत्र उग्र युद्ध तसेः
दिसती निर्दय, निर्भय, निर्मम, निःशंक, निपट उद्धतसे. ६२

तातासि बभ्रुवाहन शतपर्वप्रतिम तीव्र रोपानें,
युद्धांत जत्रुदेशीं ताडी वधकामसा चि कोपानें. ६३

शर लागतां चि घेरी आली जी, चेतनेसि घेरी ती;
होउनि निश्चेष्ट क्षण, तो पार्थ परासुची च घे रीती. ६४

तो सावधान होउनि पुत्रासि म्हणे, 'भला! भला! वीरा!
हो सावधान आतां, मद्बाणातें पहा, सहा, धीरा!' ६५

ऐसें गर्जुन, अर्जुन भरभर खरतर शरप्रकर सोडी.
तो वीर बभ्रुवाहन तितुक्यांस हि शीघ्र तडतडां तोडी. ६६

स्वसमसमर्थ सुत, असें कळुनि हि, करि कलह जेंवि अविचारीः
तोडुनि कनकध्वज, हय मारी कुरुकुळसरोजरवि च्यारी. ६७

अतितप्तघृतकटाह क्षोभे, साहे जसा न थेंबाला,

१. उत्तम बाणाच्या शेंकडों भात्यांनी युक्त अशा (रथात). २. केवळ बेगुमान असे. ३. शंभर आहेत पर्वें (पेरें) ज्याला अशा बाणासारख्या (टणक). ४ बाहु आणि खांदा यांच्या संधिस्थानीं. ५. पछाडी. ६. गतप्राण झाल्यासारखा च दिसूं लागला. ७. कौरवकुलरूपी कमळाचा रवि म्हणजे शोभा देणारा (अर्जुन). ८. अतिशय तापलेल्या तुपाची कढई. ९. पाण्याच्या थेंबाला.

तेंवि न बाणा साहे; ताडी विशिखें अतिव्यथें[1] बाला[2]. ६८
होउनि विरथ, क्षितिवरि उतरुनि, घनसा शरव्रजें वर्षे;
तों तों मयूरसा तो पांडव तांडव करी, मनीं हर्षे. ६९
ताडिति अन्योन्यातें बाणाहीं पत्रिपतिसमरयांहीं[3];
केला, रसिक कवींला लावाया वेड, अतिसमर याहीं. ७०
बाळपणंकरुनि भरीं भरला मणिपूरपाळ कोपानें,
ताडी ताताते तो हृदयीं अत्यंततीक्ष्ण रोपानें. ७१
पर्वत पविप्रहारा, तेंवि न साहोनि काय तो खचला;
जाणों प्राण परस्पर वदले, 'राहोनि काय तोख? चला.' ७२
समरीं श्रम बहु घडला, पडला, पावोनि तो हि मग मोहाः
जाणों वीररस तसा मोह हि वदला, 'गुरून न गमो हा.' ७३
स्वकृतें तातनिपातें पावेना देह कां पतन याचें?
नें पावलें चि होतें, तातविशिखविद्ध कांप तनयाचें. ७४
आली अशांत तेथें धावुनि चित्रांगदा, म्हणे, 'हाय!'
जाय तिचें धैर्य, तसें सोसिल पतिपुत्रदुःख ती काय? ७५
पावे देह, विलोकुनि सहसा प्रियपुत्रपात, कांप तिचाः
मोहसमुद्रामाजि न बुडविल साध्वीस घात कां पतिचा? ७६
तों सावध करितां, ती देवी तेथें उलूपिला पाहेः
तीच्या आरडुनि, गळां पडुनि, करी बहुविधा विलापा हे. ७७
'सखि! पुत्राकरवीं त्वां कां मारविला रणांत हा कांत?
सति! आणिला बळें चि प्रार्थुनि कैसा गृहासि आक्रांत? ७८
ज्यातें वर्णित होता बहु सादर साधु लोक अवघा, तें
कां बुडविलें स्वयें त्वां सौभाग्यसुयश अशेष धवघातें? ७९

१. अतिशय तापदायक अशा (बाणानें). २. बापाला. ३. पक्षिनायक गरुडा-सारख्या वेग असलेल्या. ४. तो अर्जुनाचा देह खालीं पडला. ५. आनंद. ६. गुरु+ऊन=बापापेक्षां कमी. ७. एकमेकांच्या वधेच्छेनें करून. ८. पति व पुत्र यांची मूर्छि-तावस्था. ९. नवऱ्याच्या घातानें.

अपराध तिघांपासुनि या दंडा योग्य काय घडला गे!?
रोषीं हि विषफळांचा, वद, अमृतलतेसि काय घड लागे? ८०
सांग, न वांछिसि सद्गुणपतिसी तूं कां पतिव्रता केली?
कोठें असी सतीनें, मनिं न धरुनि कांप, तीव्रता केली? ८१
शोक नसे, तुज करवुनि पतिच्या हस्तें रणांत तोकांत:
पुत्रकरें मारविला, सर्वाधिक जो, क्षणांत तो कांत.' ८२
पतिस हि म्हणे. 'उठा, कां रुसलां? चुकला इलाप हा: वाजी
व्हावा कशास? घ्या, म्यां तुमचा सोडुनि दिला, पहावा, जी!
सत्वर करुनि मखतुरगहरपरनरपाळहानि जायाचा,
शारीरसुखीं ठेउनि दृष्टि, नव्हे काळ हा निजायाचा. ८४
यज्ञ समाप्त न होतां, व्यर्थ असमर्यी कसे असु खरचितां?
व्हा सावध: धर्ममनीं, श्रीकृष्णमनीं, कसे असुख रचितां?'
पुनरपि उरगीस म्हणे, 'सखि! तूं तरि सांग उठि वे अनघातें:
होइल पश्चात्ताप स्वांतीं कीं शुद्धकीर्तिधनघातें. ८६
पुत्र नुठो, कांत उठो: हो सदया साध्वि! तूं, न विधवा हो.
सेक नसेल, तरि नसो: परि सुनद व्रततिच्या सविध वाहो.
पतिवांचुनि वांचुनियां आहे लोकांत काय हो! करणें?'
ऐसें बोलुनि पतिच्या निकट चि मरणार्थ घे सती धरणें. ८८
तों बभ्रुवाहन निघे मोहांतुनि. परि बुडे महाशोकीं:
कीं, तातघात घडला, जो दोषामाजि मुख्य या लोकीं. ८९

---

१. क्रीडा. २. मनात काही भीति न बाळगता. ३. घात. ४. मुलाचा शेवट. ५. पुत्र–**पंत.** पृथ्वीपति (बभ्रुवाहन). ६ अर्थ:–हा काळ यज्ञीय अश्वाचे हरण करण्यात तत्पर अशा राजाचा वध करूनि सत्वर [घराकडे परत] जायाचा [आहे]; शारीरसुखीं दृष्टि ठेउनि निजायाचा नव्हे. ७. उलूपीला. ८. अंत:करणास. ९. जीवंत न झाला तरी चालेल. १०. वरून पाणी घालणें. ११. पाण्याचा चांगला प्रवाह. १२. वेलीच्या. १३. निकट–**पंत.** * मोठ्या भाग्याची.

प्रायोपवेशन[1] करी तो ही, पाहुनि नृपा सखेदास;
शोकीं पडले, रडले, बहु धरुनि मनीं कृपा, सखे, दास. १०
तेव्हां सती उलूपी स्मरली पंन्नगपरायणा[2] मणितें,
ज्याच्या यशें निववीलें सन्मन बहु, कामिमन जसें मणितें[3].
स्मरतां चि तिच्या हस्तीं आला संजीवनाख्य सन्मणि; कीं,
येईल सतीच्छेनें स्पष्ट ब्रह्मांडभाव[4] तन्माणिकीं. १२
त्या बभ्रुवाहनातें मग ती साध्वी म्हणे, 'कुमारा ! मीं
कल्याण इच्छित्यें बहु तुझिया ठायीं, जसी उमा रामीं[6]. १३
ऊठ, नको शोक करूं, न पराभविला रणीं तुवां तात;
न शकेल अमरवर ही वत्सा ! याचा करावया घात. १४
पतिला तुझा पराक्रम दावावा म्हणुनि, मोहिनी माया
योजुनि युद्ध करविलें: बापा ! टाकीन मीं कसी माया ? १५
म्यां हें केलें पतिच्या, विश्वाच्या हि, प्रियार्थ; अवधानें[7]
युक्त असावें तव मन: होसिल गुरुच्या प्रहृष्ट अवधानें[8]. १६
हा संजीवनमणि घे, याच्या स्पर्शें सजीव हो तात.
जे जे पन्नग मरती, ते ते येणें सजीव होतात.' १७
निववी मधुरें उक्तें, नारदवीणा जसी कलकणितें[9];
दे पुत्रकरीं, पतितें उठवाया, ती महासती मणितें. १८
उठवी धनंजयातें, पुत्र करितां चि मणि उरोनिहित[10];
अमृतरस सरोनि करी, तदधिक तो, कीं, करी उरोनि हित[11].
उठतां चि पुत्र वंदी, विधुच्या उदयीं चकोरसा हर्षें;

१. मरणाच्या निश्चयाने सर्व देहव्यापार आवरून बसणे. २. सर्पांचा अमोलिक ठेवा अशा. ३. रतिकूजित–**पंत.** स्त्रीशी गजगज गोष्टीने. ४. अखिल ब्रह्मांडाचा पसारा. ५. तिच्या मडक्यात. ६. शिवदैवत जो राम त्याचे ठायीं. ७. हुषारीने; सावधपणाने. ८. सावध होण्याने. ९. मधुर स्वराने. १०. छातीवर ठेवतां च. ११. अमृतरस हा स्वत: कमी होऊन दुसऱ्याचें हित करितो; पण संजीवनमणी स्वत: कमी न होतां हित करितो, म्हणून तो त्यापेक्षा श्रेष्ठ होय.

त्यांवरि नंदनवनभवकुसुमाहीं शक्र मेघसा वर्षे. १००
सुर 'साधु! साधु!' वदले, वाद्यें गगनांत वाजलीं अमितें,
शीतळमंदसुगंधें वातें झालीं श्रमोदकें शमितें. १०१
आलिंगुनि पुत्रातें, माथां हुंगुनि धनंजय निवाला.
मणिपूरेश्वर हि निवे भेटुनि गुरुला, जसा गुह शिवाला. १०२
सुप्तोत्थितसा अर्जुन पुत्रास पुसे, 'यथार्थ सांग मला,
त्वन्माता कां आल्या? बहु विस्मय, शोक, हर्ष कां गमला?'
मणिपूरपति म्हणे, 'बा! जें पुसणें, तें पुसा उलूपीतें;
तुमचें श्रोत्रयुग भुलू, शत्रूंचें हे कथा उलू पीतें.' १०४
अर्जुन पुसे, 'प्रिये! तूं कां या युद्धांगणांत आलीस?
चित्रांगदा हि आली? प्रश्न तुझ्या हा चि, या हि आलीस. १०५
माजें या पुत्राचें इच्छिसि कीं कुशळ? जो मना श्रम दे,
तो अपराध नसे कीं केला आम्हीं तुझा? वद प्रमदे! १०६
हे चैत्रवाहिनी ही अपराध तुझा करीत नाहीं कीं?
वद सत्य, साध्वि! पूर्वप्रेमीं पडलें उणें न कांहीं कीं?' १०७
प्रार्थुनि म्हणे उलूपी, "केलें आग न तुवां, न तनयानें;
चित्रांगदा हि भजती, प्रेष्यासी करुनि शिर नत नयानें. १०८
चेष्टित कथित्यें, केलें तुझिया चि करावया प्रियाला जें;
प्रभुनें क्षमा करावी, सांगायाला हि मीं प्रिया लाजें. १०९
वधिला भीष्म शिखंडी करुनि पुढें, हाणिलें तुवां शर कीं;
पडतासि त्या अधर्में प्रायश्चित्ताविना महानरकीं. ११०
त्या पापाची पुत्रापासुनि तुज शांति या रणीं घडली;
कीं, बभ्रुवाहनशरें तव तनु होउनि अचेतना पडली. १११

१. नदनवनात होणाऱ्या फुलाना. २. श्रमान प्राप्त झालला घाम. ३. शांत असा, नाहींशीं. ४. अन्वयार्थः–हे कथा पीतें (ऐकणारें) तुमचें (कर्णद्वय) श्रोत्रयुग भुलू (मोहित होवो) [आणि] शत्रूचें उलू (विदीर्ण होवो). ५. चित्रांगदा. ६. दासीसारखी. ∗ कार्तिकस्वामी.

त्यां देखिले सुरनदीतीरीं ते अद्भुतप्रभा[1]! वसु जे;
गंगा हि, जिचें दृग्युग[2], रडतां स्मरुनीं सुतप्रभाव, सुजे. ११२
भीष्में देह त्यजितां, गंगेंत स्नान करुनि, शोकानें
देते झाले शाप; श्रुत केला त्यां चि शाप तो कानें. ११३
वसुनीं गंगानुमतें तुज 'नरक घडो' असा दिला शाप;
कीं, त्वां केलें बहु परसंसक्तायुध्यमानवधपाप[3]. ११४
ती अत्युग्रा वार्ता कुरुकुळतिलका! कथूनि शापाची,
त्यां बहुविकळा केली आपण तैसी च बुद्धि बापाची. ११५
जावुनि शरण, विनविले तातें ते, नमुनि, आठ वसु नाकीं,
कीं, 'गांधारी, कुंती, करिती अभयार्थ आठव सुना[4] कीं. ११६
प्रभु हो! शाप दिला तो, मत्कन्येवरि कृपा करा, फिरवा;
मिरवा यश; विष ईशें जेंवि, तसा क्रोध हा तुम्हीं जिरवा.'
वसु ऐसें वदले कीं, 'समरीं मणिपूरपाळ मारील;
या शापापासुनि तो पार्थातें पातकांत तारील.' ११८
वसुवचन मला कथिलें, यश व्हाया प्राप्त शुद्ध, मत्तातें:
म्हणुनि पराभविलें तुज त्यां पुत्रकरें चि युद्धमत्तातें. ११९
'स्वपराजयकर[5] सुत हो, वेंचिन सर्वस्व वित्त,' नवसा या
सुज्ञ करितसे; यास्तव द्यावें कोपास चित्त न वसाया. १२०
आत्मा सुत, म्हणुनि उचित कोपाला या पराजयास्तव न;
सत्पुत्रत्वें समुचित या परिहृतशापराजया[6] स्तवन. १२१
हा पुत्र जरि न तारिल, लज्जावह काय मग न या नातें?

१. पार्थसंबोधन—**पंत.** २. दोन्ही डोळे. ३. पर+ससक्त=अर्जुनाखेरीज इतरांशीं लढण्यांत गुतलेला आणि अयुध्यमान=[ अर्जुनाशीं ] युद्ध न करणारा असा जो भीष्म त्याच्या वधाचें पाप. ४. भीष्म हे अष्टवसूंचे अवतार; म्हणून कुंती, गांधारी ह्या वसूंच्या सुना; त्या अर्जुनाला अभय देण्याविषयीं तुमची आठवण करीत आहेत असें उलूपीच्या बापानें वसूंना सांगितलें. ५. आपल्याहून अधिक पराक्रमी, असा भावार्थ. ६. दूर केला आहे शाप ज्यानें अशा राजयास ( बभ्रुवाहनास ).

सुगतिगुणें पुत्रातें बहु मानिति कवि, न गगनयानातें. १२२
अच्युतसखा! प्रभो! तुज शक्र हि शकता रणीं न भंगाया:
आत्मा चि सुत, म्हणुनि करि निर्जीव पुन्हां सजीव अंगा या."
लवली जैसी कदली, वदली पदलीनचित्तवृत्ति सती;
प्रियहित करुनि हि, झाली अपराधवती तसी च ती दिसती.
सात्विकभावें होउनि रोमांचित कृष्णसख म्हणे, 'अयि! ते
प्रभुची दया तव मनीं सिरली, श्री वारिजीं जसी, दयिते!
ऐसें प्रभुप्रसादें मिळतें; या अमृतरस कळत्रास .
लाजे, कीं जैसें हें, पळवी पीयूष न सकळ त्रास. १२६
त्वां बहु मत्प्रिय केलें, हें तव यश करिल पद रसिकतिलकीं;
या चरितातें गाया, गुरुला पसरूनि पदर, सिकतिल कीं.'
ऐसें परम प्रिय तो पार्थ स्वप्रियतमेसि आयकवी;
वर्णिल सकळ सविस्तर एक वदनकरूनें काय कवी? १२८
मग पुत्रासि म्हणे, 'या दोघी माझ्या प्रिया सपरिवारा
घेउनि, हयमेधा ये; लागों द्यावा न यांस परि वारा.' १२९
भूप म्हणे, 'एक निशा, व्हायासि सनाथ हा निवास, रहा;
ताता! तव प्रवेशें करिल सुहृत्तापहानि वासर हा.' १३०
पार्थ म्हणे, "हयरक्षणदीक्षेसि विरुद्ध हें, नको बाहूं;
दे मज निरोप, येतों; हा गहिवर आवरूनि म्हण बा! 'हूं.'"
पूजुनि निरोप मातांसह दे धृतयज्ञहयपथा पितया;
गुरुसम समर्थ जरि तो, बहु अवघड वाटलें तथापि तया.
तेथुनि राजगृहातें गेला, जोडूनि विजयधन, पार्थ;

१. सद्गति प्राप्त करून देण्याच्या गुणानें (पक्षी) सुगमन करण्याच्या गुणानें. २ विमानाला. ३. अर्जुनाचे पदीं लीन झाली आहे चित्तवृत्ति जिची, ती उलूपी. ४. प्रिये! ५. तुजसारिखें कलत्र (भार्या). ६. रसिकश्रेष्ठांवर छाप बसवील, त्याला मान्य होईल. ७. दिवस. ८. स्वीकारला आहे यज्ञाच्या घोड्याचा मार्ग ज्यानें अशा. ९. या नांवाच्या मगधदेशाच्या राजधानीला.

धरि मेघसंधि नृप हय, निजधर्म करावयासि अनपार्थ. १३३
त्या सहदेवसुतातें विरथ करुनि, पार्थ अभय देवून,
तो द्वारकेसि गेला, हरि-हरित्यांच्या यशास घेवून. १३४
वृष्णिकुमार समस्त हि तेथें गेले हरोनि तुरगातें;
त्यां उग्रसेन वारी; कीं, या विजयासि वृष्णिपुर गातें. १३५
वसुदेवासह भेटुनि विजयातें, उग्रसेन दे वाजी:
सन्मंत्रींतें विटविल कोण, मना श्रीपरीस देवा जी? १३६
पूजिति बहु पार्थातें शौरीचे हस्त, उग्रसेनाचे:
यदुकुळ विजयें, जेसें बर्हिणकुळ वारिमुग्रसें, नाचे. १३७
प्रीति प्रभुची. चिंतामणिची जसि सर्व काम दे शाला;
यदुपतिस पुसुनि, तेथुनि गेला गांधारनामदेशाला. १३८
शकुनिसुत पूर्ववैरें आला घेऊनि जिष्णुवरि सेना.
धर्माज्ञा जय साम सांगे, परि तो कुबुद्धि परिसेना. १३९
पार्थ म्हणे. 'तरि, सोडुनि भद्रनिवासाध्व साम, नाटोप.'
खळबळ पळउनि उडवी, मग ध्याया साध्वसा मना, टोपें.
समजे बळ कीं, 'हरिता शिर. जरि आटोपिता न हातातें;
व्यर्थ विटविला याच्या, अमृतस्त्रावी वितानें हा, तातें.' १४१
तो मंद पळों लागे, तों धावुनि शकुनिची वधू आली;
पूजुनि पार्थपदावरि पुत्रातें, पदर पसरुनीं, घाली. १४२
बहुमान करुनि, वंदुनि तो पार्थ तिला, म्हणे, "अहो मामी!
करुणा नसती जरि, तरि करितों याच्या हि कां न होमा मीं?
बहुमान्या गांधारी आम्हां, त्वत्पुत्र आमुचा बंधु;

१. आपला क्षात्रधर्म. २. यथार्थ; खरा. ३. यादव. ४. कंसाचा पिता. ५. अननाम. ६. मान्य. ७. पार्थाच्या आगमनानें. ८. मोराचा समुदाय. ९. मेघरसे -पंत. १०. चिंतामणिरत्नाचें गृह. ११ कल्याणाच्या निवासाचा मार्ग च असे साम. १२. माघार घेऊं नको. १३. भयाला. १४. शिरस्त्राण. १५. गांधारसेना. १६. अमृताचा वर्षाव करणारा चांदवा किंवा छत्र च असा (अर्जुन).

श्रीकृष्णनाथ सागर, धर्मप्रभु जलद, अन्य नृप अंबु. १४४
सर्वत्रसम अमृतकर अजातरिपु, शकुनिपुत्र कैरव हा:
यावें हयमेधाला, सांगावें यास कीं, ' न वैर वहा.' " १४५

## अध्याय पांचवा.



प्रभुला दिग्विजयींचा करुणारस, वीररस कळवि चार:
कीं, शरणागतिवांचुनि चालों दिधले चि न सकळ विचार. १
होय प्रसन्न परिसुनि, करि विजय शकुनिसुतावर दया, तें:
धर्म म्हणे, ' यश देतो, स्मरुनि स्वदयालुता वरदं, यातें.' २
भीमासि म्हणे, "अर्जुन आला, हे सांगतात बा ! हेर:
उरला मास चि अवधि, स्थान करावें मखास बाहेर. ३
बहुमानें ब्राह्मण, नृप, सर्व हि सत्वर मखासि आणीव:
पार्थ प्रार्थित आला; दूत प्रेषुनि तथापि जाणीव. ४
पुरुपार्थ, वेद, हरिभुज, मज बंधु तुम्ही नयज्ञ वाटतसा.
ज्ञाते म्हणोत, 'जैसे इतरांचे, हा न यज्ञवाट तसा.' " ५
भीम 'अवश्य' म्हणे, मग विप्रविचारें करूनि सर्व करी;
जेथिल चित्रंकरीस हि पाहुनि, हरिचा हि न धरि गर्व करी. ६
विप्रगृहें देखुनि मुनि म्हणति, ' न मोमांसि ही असीं मखरें;
मख रेंच उतरि हरिचा; प्रेम प्रभुचें नतीं असीम खरें.' ७
प्रकटी स्वशिल्प भगवद्भक्तमखीं सर्व विश्वकर्मा तें,
व्हाया प्रसन्न पाहुनि त्या भगवद्रूपविश्वकर्मातें. ८

१. विर्हार. २. चद्रविकासी कमल. ३. धर्मराजाला. ४. करुणरसोत्पादक व वीररसोत्पादक हकीकत. ५. हेर. ६. इतर सर्व. ७. श्रीकृष्ण. ८. पुरुषार्थ चार, वेद चार, श्रीकृष्णाचे भुज चार आणि धर्माचे बंधु हि चार च. ९. यज्ञाचा मण्डप. १०. चित्रांतील हत्तीला देखील. ११. मा+उमा=लक्ष्मी आणि पार्वती यांना. १२. आपली कारागिरी.

आले भीमप्रेषित कृनोक्तें सकळ विप्र भूप कृती;
त्यांलां सर्वस्वार्पण केलेंसें न कळवि प्रभूपकृती. ९
चातक, मयूर, सख्यें निववाया प्रार्थितां, जळद ये, तें
दावी प्रभुवर येतां; तेथें शिवसा करी वळें दयेतें. १०
पूजी धर्म तयांतें, जसा दांभिक जनास दंभानें,
निववी बहु शीळानें, समयंघन जसा वना सदंभानें. ११
'लक्षब्राह्मणभोजन होतां, सांगुनि निरोप धाडावा,
तेव्हां चि वादकानें गुरु दुंदुभि एकवार ताडावा.' १२
केली मर्यादा त्या यज्ञीं जनमेजया! नरवरा! हे;
होतां द्विजभोजनभर, दुंदुभिचा पळ हि तो न रव राहे. १३
प्रभु धर्मासि कथी, 'चर आले मद्वारकापुराहून;
आला महायशा, ज्या मानी सद्वार कापुराहून.' १४
हर्षें धर्म म्हणे, 'वा! सांग मज निरोप काय वत्साचा,
प्रिय आत्मवत् सखा तव मजला, मी जाण कायवत् साचा.'
श्रीकृष्ण म्हणे, 'घेउनि, आला तुज चार हा, निरोपातें;
कीं, बुध होउ न देती तुलसीच्या जेंवि हानि रोपातें. १६
तेंवि मखागतभूपप्रमात.तूं न होउ दे हानी;
सर्वांच्या रोमांचित व्हावें सत्कारसुखित देहानीं. १७

१. सामर्थ्यवान. २. अन्वयार्थः-प्रभुपकृती ( धर्मराजाने केलेला आदर ) त्याला [ आपण ] सर्वस्वार्पण केलेसें न कळवी ( आपलें सर्वस्व धर्मराजानें चरणीं वाहिलें आहे व आपण त्याचे अंकित झालो आहों असें वाटू देईना ). ३. राम-**पंत.** शंकरासारखा बळराम सुद्धा येण्याची कृपा करिता आला. ४. ह्या गीतींत, धर्मराजानी केलेल्या आदरातिथ्यांत व दांभिकाच्या दंभांत 'यथास्थितपणा'पुरतें च साम्य घ्यावयाचें. प्रेमळ भगवद्भक्ताच्या ईश्वरावरील एकनिष्ठेला केवळ एकतानते-पुरती च जशी जारिणीच्या जारावरील निष्ठेची उपमा देतात तसा च या गीतींतील प्रकार आहे-**का० सं०.** ५. योग्य काळीं आलेला मेघ. ६. चांगल्या वृष्टीनें. ७. सपाटा. ८. अर्जुन. ९. सज्जनसमूह. १०. आत्म्याप्रमाणे. ११. शरीराप्रमाणे.

चित्रांगदा, उलूपी, या दोघी सुगुणवसति मज्जाया
मत्पुत्र बभ्रुवाहन घेउनि येइल सुखांत मज्जाया. १८
त्वत्प्रेमा मच्चित्तीं सुख, जेंवि करुनि [1]अलोलकीं रचितो,
मत्पुत्रीं हि रचू तें; शुचि पटु वक्ता [2]अलोल कीर[3] चि तो.' १९
या प्रभुकथितें अर्जुनसंदेशें, जेंवि वर्षलाभानें
बर्ही, तेंवि त्यजिला देहाच्या[4] धर्मं हर्षला भानें[4]. २०
धर्म पुसे, "देवा! कां पावतसे वत्स विजय कष्ट महा?
कोणीं [5]असुलक्षण, कीं म्हणवी गुरु, मंद, भौम, [6]अशुभ 'हा!'?
जन्मापासुनि कष्ट, श्रमला बहु वत्स करुनि संगर हा,
कष्टातें विधि वदला काय '[7]जयाचा चि धरुनि संग रहा'?" २२
भगवान् वदे, 'नसे चि न्यूनत्व सुलक्षणांत कायाच्या:
[8]जंघा पश्चाद्भागीं अधिका आहेत पिंडिका याच्या.' २३
श्रीकृष्णा श्रीकृष्णा तिर्यक्[9] [10]सासूय तेधवां पाहे:
कीं, तें [11]प्रियतमलक्षणदोषोद्घाटन न तीं सती साहे. २४
प्रभु समजे कीं, 'आला, दूषण वदलों, म्हणोन कोप तिला:'
तीस म्हणे, '[12]मन्नर्मीं सति! तूं हि किमपि म्हणों नको पतिला.'
तों सुखवी दूत 'निकट आला अर्जुन' असें निवेदून;
तद्वचनें सानुज नृप तो, जेंवि अमृतरसें निवे [13]दून. २६
आपण पावुनि बहु सुख, दे त्या दूतासि धर्म धनदानें:
[14]घनदानें शिखिस जसें द्यावें अधनासि शर्म [15]धनदानें. २७
दुसरे दिवसीं येतां भगवत्सख, साहुकार याद वहीं,

१. अपूर्वाई. २. लोल ( चंचल ) नव्हे असा. ३. पोपट. ४. हर्षला धर्म देहाच्या भानें त्यजिला—**पंत.** ५. कोणतें तरी अशुभसूचक चिह्न. ६. अष्टमस्थानीं आलेले गुरु, शनि आणि मंगळ. ७. अर्जुनाचा. ८. याच्या माड्या पाठीमागल्या बाजूला अधिक पुष्ट ( मांसल ) आहेत. ९. वांकड्या नजरेनें. १०. रागानें. ११. प्रियतमाच्या ( अर्जुनाच्या ) दोषाचें आविष्करण. १२. माझ्या थट्टेसबंधीं. १३. पीडित. १४. मेघानें. १५. कुबेरानें.

पौरस्त्रिया अळंकृति, विसरति, ते आपणास यादव ही. २८
राजा धृतराष्ट्रातें करुनि पुढें, अनुजयादवांसहित
सामोरा जाउनियां, भेटे त्या; कीं, तसा चि तो [1]महित. २९
धृतराष्ट्रादिगुरुजना वंदुनि भेटे तया रमेशातें;
वैकुंठीं पापी ही, ज्याची होतां दया, रमे [2]शातें. ३०
[3]झाली यात्रा सुहृदां, अहितां, विश्रामदा, विलापार्थाः
पथिका सरें, तसा जगदीशें विश्राम दाविला पार्था. ३१
संपत्तिकीर्ति आणुनि, पार्थ स्वपुरासि पावता झाला;
चित्रांगदा उलूपी घेउनि मणिपूरपाळ ही आला. ३२
तो धृतराष्ट्रप्रमुख स्वगुरूंतें नमुनि जाय [4]आजिकडे;
ती त्यास म्हणे, 'वत्सा! मज [5]दुर्गम मेरुचे न आजि कडे.'
त्या बभ्रुवाहनाच्या मातानीं निवविला पृथाकाय,
'जेथें [6]आकृति, तेथें वसति सुगुण,' म्हणति कवि वृथा काय?
धर्में, भीमें, नकुळें, सहदेवें, बभ्रुवाहना, यत्नें
मेळविलीं होतीं, तीं रामें कृष्णें हि ओपिलीं रत्नें. ३५
केल्या अजातरिपुनें [7]कृष्णाकृष्णानुजासमाना [8]त्याः
त्या [9]साधुच्या मना कां नसतिल, ज्या बहुमता [10]समा [10]नात्या?
भुलल्या प्रेमें पाहुनि कृष्णाकृष्णानुजा सुरीतीतें;
जी सुमति, '[11]सुरी' तीतें म्हणति सुकवि, कुमति जी, '[12]सुरी' तीतें.
करिता, प्रसन्न होउनि, जो मेरुसमान [13]वल्लभव्यास,
[14]तिसरे दिसीं वदे तो [15]साधुसभाप्राणवल्लभ व्यास. ३८

---

१. सन्मान्य. २. सुखें—**पंत.** ३. अन्वयः—यात्रा सुहृदां विश्रामदा, अहितां विलापार्था झाली. ४. कुंतीकडे. ५. आज मला मेरुपर्वताचें शिखर सुद्धा सुगम वाटतें. ६. शरीरसौंदर्य. ७. द्रौपदी व सुभद्रा यासारख्या. ८. उलुपी व चित्रांगदा. ९. धर्माच्या. १०. ज्या नात्यानें समान. ११. सुरस्त्री, देवांगना. १२. कट्यार. १३ वालापवढ्या (अत्यल्प) कल्याणाला. (वाल=दीड, दोन, तीन गुंजांचें एक वजन). १४. अश्व आल्यावर—**पंत.** १५. साधुसभेला प्राणाहून प्रिय असा.

" वा ! या तव यज्ञातें कवि म्हणतिल 'बहुसुवर्णक अहीन[1]';
सुगुणाहीं शोभ, जसा शोभे मणिहीं क्षमाधर[2] अहीन[3]. ३९
दे त्रिगुण[4] दक्षिणा; गुण सुमत, गुणशता हि परिस हा यज्ञाः
त्रिगुण क्रतुफळ घे, तूं ज्ञाता आम्हां चि परि सहायज्ञा[5]!" ४०
कथुनि असें, सुमुहूर्तीं आरंभुनि करवि सुकवि तो यजनः
घेतां[6] देतां[6] निरुपम धर्मप्रभुः न रविः सुकवि तोय[7] जन[7]. ४१
विख्यात, विश्वपावन, विस्तृत, विध्युक्त होय तो यज्ञ;
सर्व तृषित निववाया प्रकट करी तोय साधु तोयज्ञ. ४२
गाती नारद, तुंबुरु, विश्वावसु हे जयांत समयज्ञ,
झाला अजातरिपुचा साधुस्तुत तो तया चि सम यज्ञ. ४३
ज्या यज्ञांत चयन[10] तें शुचिकनकाच्या चि इष्टकांहीं[11] हो!
अर्थिजनाचें, सर्व हि झालें परिपूर्ण, इष्ट[12] कांहीं हो. ४४
शोभार्थ भीम उभवी[13] त्या यज्ञीं शुद्धकनकयूपांतें[14];
भूपांतें बहु भुलवी, रत्नाकरभाग्य जेंवि कूपांतें. ४५
निजगंधसेविते जे, नाशुनि अघ, सुकृत दे वपा[16] त्यांतें[15]:
आपुलियां मानवले या धर्ममखांत देव पात्यांतें[17]. ४६
ज्या सुविरक्ता लागे बहु गोड सुधारसापरिस भाजी,

---

१. दिवससमुदायानीं साध्य होणारा यज्ञविशेष. ह्या यज्ञांत दक्षिणा फार असते. २. पृथ्वी मस्तकावर धारण करणारा अहिश्रेष्ठ शेष. ३. निष्पट. ४. त्रिगुण दक्षिणा देण्याचा. ५. सहायकर्त्यांना जाणणाऱ्या ! ६. [ कररूपानें द्रव्य ] घेण्यांत [ व त्याचें ] दान करण्यांत. ७. तोय सुकविनो जन हो सुकविनो आकर्षणीः देता अतिवृष्ट्यादिक ताप रवि तो देतो—**पंत.** ८. पानाडाः विहिरीला पाणी कोठें लागेल तें सांगणारा. ९. त्या च यज्ञासारखा. १०. यज्ञवेदिका. ११. विटांनी. १२. कांणतें हि इच्छित असो. १३. उभारी. १४. यूप=यज्ञसमाप्तीचा द्योतक स्तंभ. १५. [ हवन होते वेळीं ] ज्यांनी आपला (वपेचा) वास घेतला त्यांतें. १६. यज्ञांत मारलेल्या पशूंची हवन करावयाची चरबी. १७. देवांना आपापला वाटा या यज्ञांत फार मानवला. पाती=वांटणी.

आला अवलोकाया. धर्माची जन तसा परि सभा, जी! ४७
ती कसि वर्णूं, जींत क्षुत्तृट्तनुभान काळजी नाहीं?
साक्षात् ब्रह्म निरखिलें अबळांहीं निपट बाळजीनाहीं. ४८
क्षण करुनि दाखवी तो बहुकाळातें हि अध्वरक्षणें हो!
करवी प्रभु, कीं, लोकीं धर्माचें मुख्य अध्वरक्षण हो. ४९
देती, तें सार करुनि, जें निपट असार, विप्र भव्यास;
साधुनि सर्वासिद्धि वदे धर्मास असा रविप्रभ व्यास. ५०
"निर्विघ्न सांग सिद्धिप्रति तव सव पावला, असा अन्य
नाहीं पुण्यश्लोका!, सर्वां धन्यांत तूं महाधन्य. ५१
प्रेमें बहु काळ तुझें गायिल हें साधुसद यश; क्रतुला
वर्णुनि, आपण शतमख, तर्हि म्हणतो 'साधु,' 'सदय,' 'शक्र तुला."
मग तो प्रकृतिवदान्य, ब्रह्मण्य, अजातशत्रु, निष्कपट
दे व्यासासि धरा, त्या विप्रांसि सहस्रकोटि निष्क, पट. ५३
व्यास म्हणे, 'क्षितितें घे, निष्क्रय देऊनि तूंचि सोडउन;
विप्रांसि धन चि, जेंसें हेमंतीं दुर्गतांसि गोड उन.' ५४
धर्म म्हणे, 'भू मुख्यस्वपतिसखा दक्षिणा दिली पाहो:
या हर्ष यश भरता, बहु त्या ही दक्षिणा दिलीपा हो. ५५
अर्जुनजिता हयमखीं ज्यां दिधली ऋत्विजांसि हे अवनी,

१ क्षुधा, तृषा आणि देहभान. २. पोरापासून थोरापर्यंत सर्वांनी. ३. उत्सव—**पंत.** यज्ञसंबंधी आनंद. ४. प्रभूनें हा यज्ञ करविला; कारण, जो हा धर्माचा मुख्य पंथ त्याचें रक्षण व्हावें अशी त्याची इच्छा होती. ५. यज्ञ सिद्धीप्रत नेऊन. ६. ही सज्जनसभा. ७. मोठ्या भाग्याचा—**पंत.** ८. स्वभावतः उदार मनाचा. ९. ब्राह्मणाविषयीं पूज्यबुद्धि असलेला. १०. सोन्याचें एक नाणें. ११. वस्त्रें—**पंत.** १२. किंमत. १३. दरिद्र्यास. १४. दक्षिणा दिली भू मुख्यस्वपतिसखा (मुख्य अशा आपल्या पतिच्या—माझ्या—सखा), पाहो (कारण होवो) असा, किंवा स्वपतिसखा पाहो [म्हणोनि] मुख्य दक्षिणा [जा] भ[ता] दिली, असा अन्वयार्थ. १५. उदारा, सरळा—**पंत.**

घ्यावी यथाविभाग; क्षम सर्व प्रभु तुम्हीं इच्या अवनीं.[1] ५६
झालों कृतार्थ, आतां लावींना हात या परस्वा[2] मीं:
आज्ञा तपोवनाप्रति जाया द्या, जोडितों कर स्वामी! ५७
तुमच्या पदप्रसादें, चिरचिंतित जें, अशेष तें घडलें:
दुर्वह भार उतरला, मद्भ्रात्यांचें हि मन सुखीं पडलें. ५८
स्वामी! पुण्य यश विपुळ घेउनि, हे त्यां तुम्हां धरा विकिली;
उघडील जी कपाट[3] स्वर्गांचें, ती जिवीं धरावि किली.[4] ५९
कृष्णा, भीम, जय, नकुळ, सहदेव हि करुनियां तया प्रणती,
धर्म प्रभुवर वदला जैसें, तैसें चि सर्व ही म्हणती. ६०
त्यां सर्वांहीं म्हणतां, 'राज्यादि, त्यजुनि तप, नको कांहीं:'
'हा!' म्हणितलें जनाहीं तें, जातां जेंवि तपन[5] कोकाहीं. ६१
प्रकृति[6] म्हणति, 'हे व्हावी यांची, जन्हि उत्तमा, न सत्या गी.[7]'
झाले मोटे मोटे त्या वचनें हृष्टमानस त्यागी. ६२
तों 'साधु! साधु!' ऐसी आकाशाआंत जाहली वाणी:
विप्र प्रशंसिती बहु 'जैसे पांडव तसी च की राणी.[8]' ६३
नरपतिसमूह सर्व हि रोमांचित होय. 'हलहला![9]' शब्द,
बहु गेंजबजे[10] सुहृन्मति, चातकधी जेंवि परततां अब्द.[11] ६४
व्यास म्हणे, 'दिधली त्वां देतां तुज मीं स्वभूमि परतूंन:
पर[12] तूं न, पौत्र; धन्य ब्राह्मणवचनीं च भूमिप रतूंन. ६५
या ब्राह्मणांसि पुष्कळ तूं भूनिष्क्रय[13] हिरण्य[14] दे हातें:

१. रक्षणात. २. दुसऱ्याच्या धनाला. ३. दार. ४. ती किल्ली अत्यंत आदरानें जवळ बाळगावी. ५. सूर्य अस्ताप्रत गेला असतां. ६. प्रजाजन ७. वाणी. ८. द्रौपदी. ९. दुःखोद्गार. १०. गोंधळून गेली. ११. मेघ वर्षाव न करितां निघून गेला असतां. १२. अन्वयार्थः—न पर (परका) नः पौत्र (नातु) [आहेस]. [दुसरें असें की,] भूमिप ब्राह्मणवचनीं च रतून धन्य [होतो]. अर्थात् वारस म्हणून किंवा माझी आज्ञा म्हणून तुला ही भूमि परत घेतली पाहिजे. १३. पृथ्वीचें मोल. १४. सोनें.

करुनि, गुरूक्त करावें, रोमांचित सर्व साधुदेहातें.' ६६
कृष्ण म्हणे, 'हा भगवान् व्यास जसें सांगतो, तसेंच नृपा!
योग्य कराया तूं; कीं, तुजवरि याची शुकीं तसीच कृपा.' ६७
धर्म वेळे[1], कीं, हितकर दोघे[2] ही कृष्ण सारखे दासीं,
भेटे[3], यदाश्रित, जसा न सुधाकरकृष्णसार खेदासीं. ६८
व्यासासि दिली त्रिगुणा कोटींची कोटि दक्षिणा हर्षें,
आनंदविले ब्राह्मण बहु, जेंवि मयूर वारिदें वर्षें[5]. ६९
धन ऋत्विजांसि देता झाला तें व्यास तो महाभाग;
केले तिहीं चतुर्धा[6], मग वांटुनि घेतलें यथाभाग. ७०
स्वांशांतें ऋत्विज ते वांटुनि देती यथेष्ट अन्यांस[7].
कितिक विनोदें म्हणती, 'तरि नेऊं, जरि म्हणाल 'अन्यास[8].''
राशि न सरती; जाणों आली सहसा धना तदा सांजी[9]:
न परा श्री, श्रीपतिच्या सर्वांसह साधनांत दासां जी[10]. ७२
सर्व द्विजांप्रति म्हणे, वंदुनियां पाद, 'या, लुटा,' कवि तो;
कीं, सद्भक्तांकरवीं धनलोभ प्रभु दयालु टाकवितो. ७३
चयनातिल[11] हेमांच्या वदल्या नेत्यासि भार घेन 'वीट[12];'
जाणों म्हणती तेव्हांपासून चि इष्टकेसि जन 'वीट[13].' ७४
घ्याव्या झाऱ्या, चंबू, तांटें, संपुष्ट[14] कीं कलश, हांडे?
भांडे तृष्णेसीं द्विज भारातें, म्हणे, 'यथेष्ट घे रांडे[15]!' ७५

१. कवळ झाला. २. कृष्णद्वैपायन व्यास आणि कृष्णपरमात्मा. ३. दुःख पावत नाहीं. ४. चंद्रावर दृग्गोचर होणारा काळवीट. ५. वृष्टीने. ६. चार विभाग ७. इतर ब्राह्मणाना. ८. 'ही ठेव नव्हे, आम्हीं ती परत मागणार नाहीं' असें कबूल कराल तर. ९. समृद्धि; पीक. १०. अन्वयार्थः— श्रीपतीच्या साधनांत दासां सर्वांसह जी श्री ती परा न. श्रीकृष्णाच्या भक्तीमुळे त्याच्या भक्ताना त्याच्या आप्तेष्टांसुद्धा, जी लक्ष्मी प्राप्त होते ती इतराना प्राप्त होणें शक्य नाहीं. ११. होमकुंडातील सोन्याच्या [इष्टिका]. १२. मोठा. १३. कंटाळा. १४. पंचायतन ठेवण्याचे पात्र. १५. हे सटवे आशे!

आधीं ब्राह्मण, मग जे क्षत्रिय, विट्, शूद्र, धन तिहीं लुटिलें,
किंबहुना म्लेच्छांहीं: न सुयतिनें, तें न हतभगें कुटिलें. ७६
माता जासि कन्येतें, जो जनता, धर्म बोळवी तीतें;
बहु हितकर भूतादर सन्मतितें, जेंवि बोळ वीतीतें. ७७
व्यास न निजाश्रमपदा, लोभाचें जें विमान, वसु ने तें;
कुंतीतें दे प्रेमें, संसारीं जेंवि मानव सुनेतें. ७८
श्वशुरार्पित धर्मधनेंकरुनि करी सांग पुण्यकव्रत ती;
पुरवी मनोरथातें गुरुभक्ति तसी न निजरत्नवती. ७९
देतां निरोप वदला मणिपुरेश्वर, ' पुरत या रोशीं:
भरलों मणिकनकाहीं, आणिक न काहीं, अभीष्ट द्या आशी.'
बहुसत्कारें नाशा ती, अमृतें जेंवि आठवी न गरा:
त्या दुःशलेसि पौत्रासह पूजा करुनि पाठवी नगरा. ८१
पूजुनि सुतादिकांसह कृष्णबळ द्वारकेसि पाठविले:
शतदा पांडुसुतांहीं प्रभु, त्यांहीं हे, दिसांत आठविले. ८२
घेत झाले वर्णनगुण दाते शूर विप्र भाटांचा:
धर्मप्रभेपुढें घे तुडवुनि जाणों रविप्रभा टांचा. ८३
झाले प्राप्त तसे ते बहुमान, उचित मखीं सुरवरा जे:
प्रकृतींसि मोहिति, जसे गोपींसि सुवेणुचे सुख, राजे. ८४
' एके कृष्णें होतो सांग क्रतु ' म्हणति सर्व सुनयज्ञ,

१. वैश्य. २. स्वेच्छा निरिच्छ सन्याशानें ३. हतभाग्या अशा दुष्टानें ४. सर्वजनसमूह—**पंत.** ५. निरोप दे. ६. बाळंतिणीला देण्याचें हें एक औषध आहे ७. बाळंत झालेल्या स्त्रीला. ८. लोभाच्या संचाराचें साधन. ९. धन. १० कल्पवल्ली. ११. धनरत्नाच्या—**पंत.** १२. अमृतपान दिलें असतां जशी विषाची आठवण राहत नाहीं त्याप्रमाणें त्या दुःशलेला धमकृत अत्यादरानें पतीचा नाश आठवला नाहीं: पतिनाशाची विस्मृति पडली, असा अर्थ. १३. जळफळून टाचा घाम लागला. १४. प्रजाजनांना. १५. चांगल्या मुरलीचें. १६. एकट्या कृष्णाच्या नामस्मरणानें.

'मग कृष्णत्रय जेथें, होइल तो कां बहूत्तम न यज्ञ?' ८५
स्तवनीं समर्चनीं जरि जिह्वाहस्तें चुका, परि समोर
नाचा प्रभुच्या; म्हणती गुरु कीं, 'बहुमत शुकापरिस मोर.'

# अध्याय सहावा.

यज्ञाच्या अवसानीं दिव्यकुसुमवृष्टि होय, तों नकुळ
तेथें येउनि गर्जे, भाग्यमदें करुनि जेंवि हीनकुळ. १
त्या नकुळाचा मस्तक सर्व अणिक एक पार्श्व कनकमय;
वाटे दैव त्याचा राहविला धरुनि हस्त जनक मय. २
तो नकुळ म्हणे, 'सक्तुप्रस्थासीं हा न होय सम यज्ञ;
ब्रह्मांडदाहुनि अधिक पात्रीं देणार तोय समयज्ञ.' ३
त्यासि ब्राह्मण म्हणती, 'ऐसें वदतोस्ि काय गा नकुळा!?
या यजमानयशाचें न कवींच्या स्मरवि काय गान कुळा? ४
नकुळा! स्वकुळांत चि तूं हर्म्याहुनि बहु करून कोटर गा;
दिससि पटु, कटु वदसि कां? साधूंची बहु करूं नको टर गा!'
नकुळ म्हणे, "हो! सक्तुप्रस्थ चि उत्तम, न हा निका यज्ञ;
वर्णिल कां उटजाला मणिकनकखचितमहानिकायज्ञ? ६

१. कृष्णद्वैपायन, कृष्णपरमात्मा व अर्जुन असे तिघे कृष्ण. २. चुकना—**पंत.**
३ पोपटापेक्षा (पक्षी) पुराणवक्ता श्रीशुक त्यापेक्षा. ४ मयूर (पक्षी) मोरोपंत कवि. ५ अगम्य. ६. अकुलीन. ७. बाजू, अर्धांग. ८. त्याचा जनक मय हा सर्व देह सुवर्णाचा करीत असता जणू काय दैवानें हात धरून थांबविला' ९. प्रस्थभर (६४ तोळ्याचा एक शेर) सातूचें पीठ [देण्यानें घडलेल्या यज्ञाच्या] बरोबरीचा १०. ब्रह्मांडाचें दान करणाऱ्यापेक्षा योग्य वेळ जाणून सत्पात्रीं पाणी देणारा दाता सुद्धां श्रेष्ठ होय. ११. हर्म्याहुनि (राजवाड्यापेक्षां) कोटर (ढोल्र) बहु करूनि (श्रेष्ठ मानून) तूं आपल्या कुळांत (स्वज्ञातिमंडळांत) गात रहा. १२. चांगला. १३. पर्णकुटिकेला. १४. रत्नें व सुवर्ण ह्यांनीं मढविलेलें मोठें गृह ज्याला ठाऊक आहे असा.

होता [1]कपोतवृत्ति स्त्रीपुत्रवधूसवें कुरुक्षेत्रीं:
त्या सकुटुंबाचे असु दुष्काळीं सर्व राहिले नेत्रीं. ७
बहु कष्टें, बहु काळें, मेळविला हो! तिहीं [2]यवप्रस्थ:
[3]तत्सक्तुकुडव चवघे घेति, नियम करुनि बैसुनि स्वस्थ. ८
तों अतिथि ब्राह्मण ये: त्या क्षुधित विलोकितां चि आल्याला,
रोमांचातें देहीं सकुटुंब कपोतवृत्ति हा ल्याला. ९
पूजुनि तया म्हणे, 'वा! भक्षुनि हे सक्तु, [4]धा कुटीमाजी:
हे आजि होय गुर्वी उर्वीहुनि बहु, न धाकुटी [5]माझी.' १०
सत्व रहाया देइल यवसक्तूंचा न कां कुडव हातें?
स्ववपु विपत्तींत तसें त्या, जेंवि नदींत [6]लांकुड वहातें. ११
स्त्री हि अतृप्त अतिथितें जाणुनि, पतितें [7]अवक्तुकामातें
प्रार्थुनि म्हणे, 'करावा शुचि. अर्पुनि हे हि सक्तु, कां मातें?
स्त्रीचे हि अतिथिला दे सक्तु, सबहुमान, सत्व राखाया:
तों त्या क्षुधिताचें करि सक्तुस बहु मानस त्वरा खाया. १३
[8]कापोति म्हणे, 'याहुनि समधिक न [9]शिखी, रवि, प्रयाग मला.'
बहु हर्षें मातेला भोक्ता सुतसा च विप्र [10]यां गमला. १४
पुत्र म्हणे, 'मत्सक्तु हि दे, अतिथि च हित तुला सकळ कळतें:'
तात म्हणे, 'मन, वत्सा! क्षुधित विलोकुनि मुलास कळकळतें.'

१. कपोताप्रमाणें दाणे टिपून त्यावर निर्वाह करणारा. उञ्छवृत्ति. २. यव—जव, सातु. ३. त्या यवाच्या पिठाचें कुडव (१६ तोळ्याचा पावशेर). ४. तृप्त हो—**पंत.** ५. ही माझी पर्णकुटिका आज पृथ्वीहून थोर झाली. ६. चिंताखेद नाहीं—**पंत.** नदींत वाहणाऱ्या लाकडाला ज्याप्रमाणें चिंताखेद कांहीं नसतो त्याप्रमाणें विपत्तींत सांपडलेल्या त्याच्या शरीराची स्थिति होती, असा भावार्थ. ७. बोलण्याची इच्छा नाहीं ज्याला अशातें. ८. कपोतवृत्ति ब्राह्मणाची स्त्री. ९. अग्नि, सूर्य व तीर्थ [ यांची उपासना ]. १०. या कापोतीला.

संतीं श्री सुरतरुचें नवि नवि लाक्षि प्रसून, हित याची;
मग 'सक्तु घ्या' म्हणुनि कां न विनविल क्षिप्र सून हि तयाची?
ज्ञात्याला, ताप वसे अन्यशरीरांत, परि सकळ कळतो:
करि साधु त्या अतिथिची आत्मकुटुंबा हि परिस कळकळ तो.
अतिथिद्विजासि, चित्तीं जाणुनि बहुनिर्विकार चवघांस,
देती त्या सक्तूंचे पीयूषाहूनि अधिक चव घांस. १८
अतिथि प्रसन्न होय: प्रकट करि स्ववपु, ढंकर, दया: तें
वर्णुनि सुदान झाला तो धर्म प्रभु पुढें करद यातें. १९
सकुटुंब वरविमानीं वाहुनि, वारूनि सर्व शोकातें,
धर्में दिव्यतनु करुनि, नेला तो विप्र सत्यलोकातें. २०
ते पाहिलें, निघालों बाहिर सोडूनि मीं बिळाला हो!
मज पुण्यसक्तुगंधें जळलेशें लाभ हा मिळाला हो! २१
शिर, एक पार्श्व, झाला स्वर्णमय, तसा चि अन्य कीं उरला:
फिरलों पुण्यस्थानें कोठें माझा न काम हा पुरला. २२
धर्माच्या हयमेधीं होईल चि काम आपला पूर्ण:
या भावें मीं येथें आलों धावोनि विप्र हो! तूर्ण. २३
परि सक्तुप्रस्थसम न हो, 'दोष,' म्हणाल 'पाहिला काय?'
तरि सर्व पहा झाला न कनक, तैसा चि राहिला काय. २४
कनकमय न झालों मीं, पावुनि या अन्नकर्दमा, नकुळ.

१. अर्थ:—[कल्पवृक्षाप्रमाणे] कल्पवृक्षाचे फल हि मतांचे ठिकाणीं नित्य नवें पुष्पय पाहते व त्याचेजवळ आपल्या हिताची याचना करिते. असे असता, कल्पवृक्षासारख्या त्या ब्राह्मणाप्रमाणे कल्पवृक्षप्रसूनासारख्या त्याच्या सुनेने हि 'माझे सक्तु घ्या' अशी त्या अतिथीची प्रार्थना केल्यास नवल ते काय? २. आपले खरे स्वरूप. ३. यम. ४. हात देणारा, तारणारा. ५. उत्कृष्ट प्रकारच्या. ६. त्या पुण्यकारक सक्तूंच्या वासाने. ७. पाण्याच्या बिंदूनीं. ८. पुढील आर्या पहा. ९. सर्व शरीर सोन्याचें व्हावें ही इच्छा. १०. मख—पंत.

हा[1], त्या; तुमचें द्विज हो! 'साधु' म्हणो यास नर्दमान कुळ."
यापरि अशेषसुरसिकसाधुमधुपसेव्यमान[2] जो बकुळ,
त्या निंदुनि धर्माच्या हयमेधा, गुप्त होय तो नकुळ. २६
जनमेजयभूप पुसे, 'सकळां साधूंचिया हि उत्साहा
भंगाया कोण करी सत्क्रतुचा सुद्विजात कुत्सा हा?' २७
मुनि सांगे पूर्वकथा, "जो सत्तेजःप्रकर्षनमदग्नी[3],
तो राज्या! श्राद्धाचा संकल्प करी मुनींद्र जमदग्नी. २८
मुनिच्या संकल्पातें जाणुनियां होमधेनु ये जवळ;[4]
सांधवि तत्पय भांडीं, ब्रह्मांडीं स्वयश तो जसें धवळ. २९
तों धर्म कोपरूपें ये, येउनि, त्या पयासि मग तो पी,
मुनिस परीक्षाया; जन म्हणती, परि, होय कीं नव्हे कोपी.[5]
मुनि त्यातें कोप असें जाणे, त्यावरि करी न कोपाला;
तें नवल, 'चलदलाचा[6] मृदु,' जेंवि म्हणे करी. 'नको पाला.'[7]
त्या मुनिवराप्रति, धरुनि तो कोप ब्राह्मणी शिवा मूर्ति[8],
पूर्ति[9] कराया श्रुतिची[10], बोले, पाहोनि शांतिची स्फूर्ति[11]. ३२
'सुमुने! भार्गव रोपण[12] हा या लोकीं. वृथा चि बोभाट;
बा! जिंकिलें मला त्वां, होईल तुझा न कोण तो भाट[13]? ३३

१ आपण त्या ब्राह्मणास 'साधु' म्हणेन–**पंत.** अन्वयार्थः–द्विज हो! तुमचें नर्दमान कुळ (घोष करणारा समूह) यास (धर्मकृत यज्ञास) 'साधु' म्हणो; [परि] हा (नकुळ) त्या (कपोतवृत्तिकृत यज्ञास) ['साधु' म्हणे]. २. सपण असे चांगले मर्मज्ञ साधुपुरुष हे च कोणी भृंग, त्यांना सेविला जाणारा जो बकुलवृक्ष. ३. उत्तम तेजाधिक्याने नमन (नमणारा) आहे अग्नि ज्याला असा ४. शुभ्र (पक्षी) निष्कलंक. ५. जन ['कोपी'] म्हणती; परि [तो] कोपी नव्हे [असा] होय का. ६. पिप्पल–**पंत.** ७. [निसर्गतः कोवळ्या पाल्याचा भोक्ता असा] हत्ती. ८. शुभ अशी ब्राह्मणाची आकृति. ९. तृप्ति. १०. कानांची. ११. शांतपर्णाची वृत्ति. १२. जमदग्नि हा सतापी आहे असा. १३. स्तुति करणारा.

बा! तुज मीं वश झालों, तूं शांतीचें पद क्षमाशीला!
कोपाच्या उकळीला जिरवील, जसा न दक्ष मासीला. ३४

तव उग्रतपापासुनि झालों मीं प्राप्तकंप अपराधी,
अपराधीन प्रभु तूं एक चि, ऐसी, नसे चि अपरा, धी ३५

त्रस्तीं करावयाला तूं योग्य महाकवि प्रसादास,
आर्तांच्या कां देइल धर्मज्ञ न हाक विप्र सादास?' ३६

जमदग्नि म्हणे, 'क्रोधा! साक्षाद्दर्शन तुझें गमे चित्र;
तव उदयीं तम दाटे; न दिसे चि असो प्रदीप, कीं मित्र. ३७

जा विगतज्वर होउनि. माझें त्वां किमपि बा! नसे हरिलें.
तुजविषयीं निजचित्तीं म्यां कांहीं वांकुडें नसे धरिलें. ३८

ज्यांच्या अर्थें पय तें होतें संकल्पिलें, तयां पितरां
जा प्रार्थाया क्रोधा! व्यर्थ प्रार्थूनि काय गा! इतरां?' ३९

ऐकुनि ऐसें त्याला, झाला तत्काळ धर्म तो गुप्त;
पितृशापें होय नकुळ. येतें भोगासि तें चि, जें उप्त. ४०

पितरांतें प्रार्थी तो, ताराया प्राप्तनकुळता राया!
कीं शापित्याविना क्षम, न ज्ञान, न शील, न कुळ, ताराया.

वदले पितर असें कीं, 'जेव्हां तूं निंदिसील धर्मातें,
शापावसान तेव्हां होइल, मग पावशील शर्मातें.' ४२

तो धर्म कोपरूपी, पितरांचें धरुनि तें मनीं उक्त,
निंदुनि धर्मसुतातें, शापापासूनि जाहला मुक्त." ४३

१. भीतियुक्त. २. स्वतंत्र. ३. ऐसी धी [असे], अपरा (अन्य) नसे चि. ४. धर्मज्ञ विप्र आर्तांच्या सादास हाक का न देइल? देइल चि-**पंत.** सादास=ओरडण्याला. ५. तुझा उद्भव झाला असता सर्वत्र अंधकार पडतो, म्हणजे क्रोध प्राप्त झाला असतां मनुष्य अंध (सारासारविचारशून्य) होतो. ६. सूर्य. ७. निश्चित. ८. पेरिलें-**पंत.**

श्रीगुरुनें चि करविलें हें [१]स्वार्थ, करूनि नवस, लेखन; कीं,
[२]मणि आकरीं, प्रभुविना स्नेहासि धरूनि न वसले खनकीं. ४४
श्रीरामपदीं अर्पित केलें हयमेधपर्व चवदावें,
[३]सामर्थ्य पारिजातीं जें, तें कुसुमीं हि सर्व च वदावें. ४५

इति श्रीमहाभारते श्रीरामनंदनमयूरेश्वरविरचिते अश्वमेधपर्वणि षष्ठोऽध्यायः।

श्रीरामचंद्रार्पणमस्तु।



१. स्वतःसाठीं. २. कीं (कारण), आकरीं (खाणींत) [ जे ] मणि [ असतात ], [ ते ] प्रभुविना (यजमानावाचून) [ केवळ ] खनकीं (खणणाऱ्या मजूराच्या ठायीं) स्नेह धरूनि न वसले (राहत नाहींत). खाणींत जीं रत्नें असतात तीं प्रत्यक्ष खणून वर काढणाऱ्या मजूराकरिता नसून त्याला कामावर नेमणाऱ्या यजमानाकरिता असतात, त्याप्रमाणे भारतरूपी खाणींतून मीं (मोरोपंतानें) जें हें पर्वरूपी रत्न काढिलें तें माझ्या स्वतःकरिता नव्हे; तर श्रीगुरूच्या प्रेरणेनें त्याच्याकरिता च होय. ३. कल्पवृक्षाच्या ठायीं जें सामर्थ्य असतें तें सगळें त्याच्या एका पुष्पांत हि असतें; त्याप्रमाणें भारतग्रंथांत जें सामर्थ्य आहे तें त्याच्या एका पर्वांत हि आहे.

# आश्रमवासिकपर्व.

## अध्याय पहिला.

क्षोणीतें प्रतिपाळी धर्म, पुढें करुनि अंधराज्यास,
आज्ञा पाळूनि, दिलें वेदत्व चि अब्द पंधरा ज्यास. १
विदुर वसे निकट, गमे बोध प्रारब्धभोग उरकवितो;
शोकाश्रुनें भिजों दे त्या प्रज्ञाचक्षुचें न उर कवि तो. २
कृप, संजय, वैश्यात्मज जो साधु युयुत्सु हे तिघे राया
रक्षकमणिसे रक्षिति, न शकति शोकाग्निहेति घेराया. ३
भ्रात्यांसह धर्म सदा वंदुनि विनयें पदासि आर्यातें,
प्रेमें निकट चि बैसुनि, पुसुनि, करी सर्व राजकार्यातें. ४
गांधारीची होय व्यवहारीं, दृक् पडों न दे गुंतीं;
तीस गमे स्वच्छाया, स्वच्छा यापरि भजे सदा कुंती. ५
त्या श्वश्रूश्वशुरांच्या सेवेला द्रौपदी अनळसा च;
कीं, गुरुजन तापद ही श्रेयस्कर सर्वथा अनळ साच. ६
प्रभुची अनुजा हि जपे श्वशुराच्या सर्वकाळ सेवेला;
कीं, फळपात्र नव्हे कर, जो सिंचायास आळसे वेला. ७

१. पृथ्वीत. २. बहुमान देऊन; त्याचे नाव पुढे करून. ३. धृतराष्ट्राची आज्ञा दैवल्य मानून धर्माने त्याला जणो वेदपणा दिला. ४. वर्षे. ५. धृतराष्ट्रासन्निध राहून विदुररूपी आत्मज्ञान त्याला आपले प्रारब्धफळ भोगावयाला सामर्थ्य च देत आहे असे वाटे. ६. दृष्टमणीप्रमाणे, वज्रबद्धप्रमाणे. ७. शोकरूपी अग्नीची ज्वाळा. ८. दृष्टि. ९. अडचण. १०. अग्निनारायण. ११. फळ घेण्याला योग्य. १२. पाणी घालण्यास.

चित्रांगदा, उलूपी, इतरां ही पांडवस्त्रिया होत्या,
धृतराष्ट्राची सेवा करिति, कराया पतिप्रिया हो! त्या. ८
सर्वांतें धर्म म्हणे, "पहिली जी नीट वाट वाहो ती,
स्वश्री 'आहे च' असें या राज्याला, न वाटवा 'होती.'" ९
सकृप श्रीव्यास प्रभु अनुदिन निकट चि वसे, कथा कथितः
व्यथित सुतासि उपेक्षिल कैसा, जो दीनवत्सळ प्रथित? १०
सामंतांहीं द्यावें धन, हा व्यवहार जो असे पहिला,
विदुरनयें तो चाले, वाटे अंधासि 'शास्ति' महिला. ११
न'वदे धर्म किमपि, जरि बद्धा, वध्या हि, तो करी मुक्तः
कीं, गुरुशासनलंघन गुरुहनन चि, सर्वथा नव्हे युक्त. १२
सर्व तदुक्त करीः कीं, न च शोकें नम्रकंधर क्षण हो.
साधु अजातारि म्हणे, 'वेचो सर्वस्व, अंधरक्षण हो.' १३
या धर्ममता एका भीमावांचूनि सर्व अनुसरलेः
कीं, न सरे यश चि, इतर बहु बहुवर्षायु दिव्यतनु सरले. १४
अंधाच्या दुर्मतिनें त्या दुर्द्यूतात वृत्त जें घडलें,
तें भीममर्नी, वज्रीं वज्रें लिहिलें जसें तसें जडलें. १५
अनराति स्पष्ट म्हणे, 'कोणी मागील पाप काढील,
त्या होइल फळ त्याचें, जो विष मिसळूनि अन्न वाढील.' १६
धृतराष्ट्रतत्सुता जन न म्हणे, वाहूनि आण, 'वाईटः'
कीं, प्रभु म्हणेल, 'धाडुनि लंकेला यास आणवा ईट.' १७
अनुतप्त होय राजा, होतां अनुभूति साधुरीतीचीः
'गोड सुधा' म्हणत्याला हळहळ लावील माधुरी तीची. १८

१. दुर्योधनादि असताना धृतराष्ट्राचा जसा मानमरातब होता तशी च पद्धति चालू राहू दे. २. कृपाचार्यासहित. ३. प्रसिद्ध. ४. मांडलिकांनी. ५. धृतराष्ट्र ६. वडिलाची आज्ञा मोडणें. ७. खाली मान घातलेला असा, खिन्न. ८. शिक्षा असा भावार्थ. ९. राजनिंदकास दिगंत। पाठवील–पंत. ह्याच्याकडून लंकेतील वीट आणवा म्हणजे ह्याला हद्दपार करून टाका. १०. अनुभव, प्रचीति.

धृतराष्ट्र निर्वोनि म्हणे, 'देती सुख पांच जें, न शंभर तें.
खळसंग, सत्याग, केला म्यां स्वपरघात दंभरतें.' १९
निंदी पुत्रातें विषकंदातें तेंवि भूप मंदातें;
वर्णी बहु धर्मातें, गुण समजुनि, जेंवि अमृतकंदातें. २०
विस्मरण होय जेव्हां आपुलियां दारुणां हि अनयांचें,
होय स्मरण स्नेहें शतसंख्य सुयोधनादि तनयांचें. २१
चित्तीं अंध म्हणे, 'सुत शत वधितां, लेश ही न घामेला,
हा राक्षस भीम न कां, जोडुनि अतिदारुणा अघा, मेला?' २२
भीम हि मनीं म्हणे, 'मज न गमे झाली खरी प्रतिज्ञा ती;
कीं, ते वधिले, न वधुनि म्यां या मुख्या अरिप्रति, ज्ञातीं.' २३
द्यूतादि क्लेशांच्या, कृष्णेचा प्राणवल्लभ, स्मरणीं,
तापे पहिल्या चि तसा, करुनि हि सकळारिमल्ल भस्म रणीं.
भीम बहु अप्रकाशें राज्याचीं अप्रियें करी रागें;
त्याच्या सोसावीं किति तीं दावालिंगनें शरीरागें? २५
अंधाच्या आज्ञेचा परभारा भंग भीम तो करवी,
ऐकवि असें वच, म्हणे ज्याहुनि 'न स्वांय भीमें तोकें' रवी. २६
भुजशब्द, भुजपराक्रम, भुजभुजगाकार, परिसवि तयाला;
अहिस भय गरुड दे, तीं बहु अरिच्या त्या हि परिस वितंयाला.
"उपमेला दिक्करिकर न सरे, भुजग न सरे, परिघ न सरे;
भुज हो! अतुळ तुम्हीं; बहु शरधारा वर्षतो, परि घन सरे. २८
जे राज्यें हि न, केले ते, देउनि तोयदान, वश तातें;

---

१. कपटाचरणात गढलेल्या म्या. २. ह्याच्या अंतःकरणाला थोडा सुद्धा पाझर फुटला नाहीं. ३. सर्व शत्रुरूपी वीर. ४. अप्रत्यक्ष रीतीने. ५. वणव्याच्या झडपा. ६. शरीररूपी वृक्षानें. ७. शनैश्चर—**पंत.** ८. क्रूर. ९. दंड थोपटण्याचा आवाज. १०. पिणाऱ्याला—**पंत.** धृतराष्ट्राला. ११. दिग्गजाची सोंड. १२. पुढे न येई. १३. जे दुर्योधनादि पुत्र बापाकडून सर्व राज्य मिळून सुद्धा संतुष्ट झाले नव्हते ते आतां बापानें दिलेल्या तिलांजलीनें तृप्त होत आहेत!

सोसी हिते[1]च्छु लंघन, दाहाद्युग्र हि, सदर्भकाऽयास. ४७
मीं पश्चात्तम असें व्रत, नियमाचें करूनि मिष, करितों;
न परापराध हा; जें आपण केलें जसें, तसें भरितों. ४८
हे स्त्री माझी छाया; वर्तेल तसें चि काय अ[2]च्छाया?
कथिलें तुम्हांसि जें व्रत, आम्हीं दोघें हि पात्र अ[3]च्छा या. ४९
कीं आम्हां दोघांचें अस्मद्दोषें चि पुत्रशत मेले,
गेले सुगतिप्रति परि पळतां न प[4]रासु ते परें केले. ५०
धर्मा! तुजपासीं मीं वर्षें सुखरूप पंधरा होतों,
आतां तपोवनीं हा, जों आयु असेल, अंध राहो तों. ५१
तु[5]ज राज्यासि फळ असे, सरतिल मद्दोष ताप[6]सत्वानें,
करिन कुळव्रत अंतीं, साहेन सदार ताप सत्वानें. ५२
तुज न विसरेन, बापा! बहु आशी[7]राशि नित्य योजीन,
प्राज्ञा! आज्ञा दे, म्हण, 'करुनि सुतप, सुगतिपात्र हो जी[8]न.'"
धर्म म्हणे, "बा! भोगिसि गुप्त असें दुःख तूं कवि प्रा[9]ज्य,
राज्यसुख रुचे न तुला हें, ज्वलनाला जसें अ[10]विप्राज्य. ५४
धिक्कार असो मातें! कीं केवळ मूर्ख मीं, जया कांहीं
भोगासक्ता गेहीं दुः[11]खितगुरुवृत्त ठावुकें नाहीं. ५५
मज गू[12]ढबुद्धिनें त्वां देउनि विश्वास, वंचिलें स्पष्ट;
कीं, हे उपवासक्षितिशयनादि असह्य भोगिले कष्ट. ५६
या दुःखोक्ति तुझ्या मम हृ[13]दयाश्वा लागल्या क[14]शा समज;

१. आत्महित साधण्याची इच्छा करणारा, उपवास, पचाग्नि वगैरे कडक नियम आणि सत् (सज्जन) [व] अर्भक (अडाणी लोक) ह्यांनी दिलेले आयास (कष्ट) सोसितो ( ? ). २. छायेप्रमाणें वर्तन न करणारी. ३. या पवित्र व्रतास. ४. ठार. ५. तपस्व्याच्या फळाचा षष्ठांश राजास मिळतो, म्हणून मी तप केल्यास तुला त्याचें फळ आहे च. ६. तपस्वित्वें–**पंत.** ७. शेंकडो आशीर्वाद. ८. वृद्ध. ९. पुष्कळ. १०. ब्राह्मणेतरानें हवन केलेलें घृत. ११. दुःखी झालेल्या वडिलांची वार्ता. १२. गुप्त विचार ज्याचे अशा त्वां. १३. अंतःकरणरूप घोड्याला. १४. चाबकाचा मार.

व्हावें राज्य, विविध सुख, यज्ञानुष्ठान, हें कशास मज? ५७
तूं आमुचा पिता, तूं माता, तूं परमगुरु, अगा राया!
कोठें कसें वसावें, त्वां जातां, त्यजुनियां अगारा या? ५८
जातो सुखें जन जसा, गुरुनें म्हणतां चि 'आजि होरा, जा,'[1]
मीं च वनातें जातों; तव औरस सुत युयुत्सु हो राजा. ५९
अयशंकरुनि जळालों आहें चि, मला पुन्हां न जाळावें;
टाळावें हें व्यसन, प्रभुनें शरणागतास पाळावें. ६०
राजा तूं[2], मीं सेवक; वद, आहें कीं अधीन मीं नाहीं?
दासें धण्यास, आज्ञा दिधली डोहा कधीं न मीनाहीं. ६१
आतां सुयोधनाचा कोप नसे माझिया मनीं कांहीं;
वाटे, उत्तम झालें, कीं वरिली सुगति त्या अनीकांहीं[3]. ६२
भवितव्य तें, तसें चि भ्रमलों; जातों सुयोधना शरण,
कीं तो येता, होता तरि कां, व्हाया सुयोधनाश, रण? ६३
ते सुत, तसे चि हे; त्यां जालासि न सिद्ध, यां अव्हेराया;
उचित शरणागतांचा धर्मज्ञा! त्याग तुज नव्हे, राया! ६४
पांडु, पृथा, गांधारी, तूं, यां पाहें समान चवघांस;
देतात, शर्करेचे भिन्न म्हणुनि, काय भिन्न चव घांस? ६५
त्यजिशील मज, तरि तुझ्या बापा! सोडीन न पंथ[4]; बहु धार्मी
वत्सास दुःख आहे, कथितों, वाहोनि शपथ, बहुधा मीं. ६६
तव विरहीं देइल धनपूर्णा ही दुःख नित्य नव धरणी,
हें पाहणें कपाळीं, बहुधा झाला म्हणूनि न वध रणीं. ६७
आम्हीं तुज वश आहों, आहे सर्व हि तुझें नरवरा! हें,
नमितों, प्रसन्न हो, बा! शमला प्रकटो पुन्हां न रव[5], राहें. ६८
सेवेनें ताप तुझ्या टाकुनि, माज्या हि, मानसा जावा;

१. आज मुहूर्त आहे, जा, अशी आज्ञा मिळता च. २. तुझ्या ताब्यांत. ३. सैन्यांतील योध्यानी. ४. तुझ्या पाठोपाठ अरण्यात येईन. ५. विलाप—**पंत.**

पुरुष विवेका, हिमगिरि, सोडुनि राज्या! हिमा, न साजावा."
धृतराष्ट्र म्हणे, 'बापा! तप चि करावें, असें मनीं आलें,
उचित हि हें या स्वकुळीं; भोगुनि भोगांसि, कोण गा! धालें?
वसलों चिर, शुश्रूषा चिर केली त्वां तसी, जसी उचिता;
दे आज्ञा; मज वृद्धा प्राप्त सुतपंकरूनि हो शुचिता.' ७१
ऐसें वदोनि, मग तो, जोडुनि कर, संजया कृपास वदे,
'विनवा नृपासि, साधा सुयशाचे, करुनियां कृपा, सवदे. ७२
वाग्व्यायामें या, बहु वृद्धपणें, न वदवे; वदन सुकलें;
झालें म्लान मन, जसें वृकविपिनामाजि वासरूं चुकलें.' ७३
ऐसें बोलुनि, आश्रय गांधारीचा करी बहु श्रमला,
नृप राहिला उगा चि, प्राणरहितसा चि तेधवां गमला. ७४
होय व्याकुळ शोकें, पाहुनि तो धर्म संत तदवस्था,
बाधे गुरुताप तया, दाव गजा जेंवि संततदवस्था. ७५
धर्म म्हणे, "हा! हा! या राजेंद्रीं अयुतनागबळ होतें,
निःशेष बुडविलें कीं पोटा येऊनि सर्व खळ, हो! तें! ७६
भीमाची लोहमयी प्रतिमा केली चुरोनियां पिष्ट,
तो अबळाश्रित झाला; फिरतां, वज्रासि तृण करी, दिष्ट. ७७
म्हणति अयशा बुधा 'अरि,' कीर्तिकरा अश्रुता 'तनय,' नाकीं.
मीं रिपु, न पुत्र, आलें मजकारितां अश्रु तातनयना कीं! ७८
हा! हंत! धिक् श्रुतातें माझ्या! केला जनांत हाकाट,
झालों गुरुला तापद, तैसा चि असे मनांत हा कांट. ७९
मी हि न करीन भोजन, जरि न करिल तात माय गांधारी;

१. सत्कीर्तीचा लाट साधा. २. भाषणाच्या श्रमानें. ३. लांडगे असलेल्या अरण्यांत. ४. पसरलेल्या वणव्यांत सांपडलेल्या. ५. दहा हजार हत्तींचें बळ. ६. दैव–पंत. ७. अपकीर्ति करणाऱ्या विद्वान मुलाला. ८. कीर्ति मिळविणाऱ्या अज्ञ मुलाला. ९. स्वर्गी पितर–पंत. १०. ज्ञानाला. ११. बोभाट. १२. मी धर्म. १३. कांट, नष्ट.

यांच्या घातें झालों बहु निंद्य, जसा निजानुगांधारी.[1]" ८०
ऐसें वदुनि, उरावरि, वदनावरि, पाणि[2] नृपतिच्या फिरवी;
तोयार्द्र[3] सुरत्नौषधिधर[4] तो यश अमृतरश्मिचें[5] मिरवी. ८१
त्या परमपुण्यपाणिस्पर्शें संज्ञेसि[6] वृद्ध तो पावे,[6]
धर्मासि म्हणे, 'बापा! स्पर्श क्षणभरि असे चि ओपावे.* ८२
बा! मज धरीं उरासीं बाहूनीं व्याकुळासि कवळून,
हुंगोन मस्तकीं, बा! क्षणभरि जावू नको चि जवळून. ८३
राजीवलोचना! शशिरश्मि चकोरा, मला हि पाणि तसे;
यांचा स्पर्श प्राणांप्रति परतुनि सुपतिसा[7] चि आणितसे. ८४
भोजन केलें, त्याला झाला बा! आजि काळ अष्टम हा,
म्हणउनि विसंज्ञ[8] झालों, झाले तुज विनवितां हि कष्ट महा.'
त्यावरि पाणि युधिष्ठिर, फिरवी उतरी विषघ्नपल्लवसा,[9]
गोंजारी तापार्ता दुर्बळ वृषभासि सदय बल्लवसा.[10] ८६
हुंगी आलिंगी दृढ तो स्वस्थ प्रभु विशाळभुज; गमला,
चंदनतरुला आहे आलिंगुनियां विशाळ भुजग, मला. ८७
आघ्राणा[11] होय विनतशिर,[12] आंगीं आंग लीन परिरंभा;
गुरुरीति सन्मन हरी, तैसी, बहु चांगली, न परि रंभा. ८८
गुरुतापें गहिंवरलो, अन्यें तो सुज्ञगुरु[13] न गहिंवरता;
न च गडबडता युद्धीं, जरि पडता काय गुरु नग हि वरता.
स्त्रीजन, सुहृज्जन, रडे, त्या गांधारी रडों न दे, वारी,[14]
शोक शमे तो, जैसा [15]दवीतेजीं पडोन देवारी.[16] ९०

१. माझ्यावर विसंबून माझ्यामागून येणाऱ्या आंधळ्याचा घात करणारा. २. हात. ३. आला. ४. उत्तम रत्नें आणि औषधी यानीं युक्त. ५. अमृतस्रावी चंद्राचें. ६. शुद्धीवर आला. ७. चांगला पति ज्याप्रमाणें रुसून गेलेल्या आपल्या प्राणांला (पत्नीला) परत आणितो तसा. ८. मूर्छित. ९. विष उतरविणाऱ्या पाल्यासारखा. १०. गवळ्यासारखा. ११. [धृतराष्ट्रानें आपलें] मस्तक हुंगावें म्हणून. १२. वांकविलें आहे शिर ज्यानें असा. १३. ज्ञात्यांत श्रेष्ठ असा धर्म. १४. निवारण करी. १५. देवीच्या तेजांत. १६. महिषासुर. * द्यावें.

पुनरपि वनगमनाज्ञा, पडुनि गळां, प्रभुसि भूप तो याची;
चातक घना जळ जसा, इच्छा न करूनि कूपतोयाची. ९१
'वदतां पुनःपुन्हां म्यां, व्हावें न ग्लान मानदा! तातें;
कष्टी न करुनि देतो, जें द्याया योग्य दान, दाता तें.' ९२
बहु कृश विवर्ण पाहुनि बापातें, आरडुनि गळां पडला;
जडला कंठीं, केवळ शिशुसा चि अजातशत्रु तो रडला. ९३
वदला, 'तुझें प्रिय मला व्हावें, तैसें न जीवित, न राज्य;
विषयरसभजन तैल चि, गुरुजनपदभजन तें मज·वराज्य. ९४
बा! प्रीति, अनुग्रह, जरि मज पुत्रावरि असेल, तरि आधीं,
आहार करुनि, मग तूं समुचित कर्तव्य आपुलें साधीं.' ९५
धृतराष्ट्र म्हणे, 'बापा! आधीं आज्ञामृतासि सेवीन;
मग मीं निश्चितपणें, होउनियां प्राप्तकाम जेवीन.' ९६
त्या अवसरांत आला तो भगवान् सजलघननिभ[1] व्यास,
श्रुतिस म्हणे[2], 'विश्वाच्या करि, उघडुनि अर्थ, जननि! भव्यास[3].'

# अध्याय दुसरा



व्यास म्हणे, 'धर्मा! हा मत होइल, न करितां तप, कसा रे!?
तरुणपणीं गोड, पुढें वृद्धपणीं विषय ते सपक सारे. १
अंधें वृद्धें दोघें झालीं शोकांत मग्न सुतपातें;
राजर्षीस उचित वनसंश्रय[4] अंतीं; करूत सुतपातें. २
दे आज्ञा; संपादु स्वकुळव्रत सेवटील, सुतपा हो,
न मरो वृथा; सुगतितें हा माझा अंध वृद्ध सुत पाहो.' ३

१. जलयुक्त मेघासमान आहे कांति ज्याची असा. २. 'जो' असा अध्याहार. ३. कल्याणास, (व्यासांनी भारताच्या रूपानें वेदभावाचें प्रकटन केल्यामुळें त्यांना 'वेदव्यास' व भारताला 'पंचमवेद' म्हणतात). ४. अरण्यवास.

धर्म म्हणे, " भगवंता! देतो, वच करुनि[1], मान वढिला हो[2];
होतां प्राप्त गुरुविरह, कैसा न म्हणेल मानव ढिला[3] 'हँ![4]'? ४
तूं कुळराज्यपरायण, मम सर्वस्व गुरुजन कवि, प्राज्ञा!
कां न करीन, हरी जी श्रम सर्व, स्वगुरु-जनक-विप्राज्ञा?" ५
व्यास म्हणे, " योग्य तुझ्या, माझ्या ही, होय हा निरोपातें,
यातें न घडो शोकीं, दवदहनीं जेंवि हानि रोपातें. ६
सत्कर्म योजिलें जें, नेती सिद्धीस संत राया! तें,
ताततपासि कराया तूं सुज्ञ न योग्य अंतरायातें. ७
देह पडावा युद्धीं, किंवा विधिनें तपोवनीं अंतीं,
राजर्षींचा धर्मा! हा चि परम धर्म वर्णिला संतीं. ८
पूर्वीं पांडुनृपें हा शिष्यें गुरुसा उपासिला भावें,
कीं[6], 'तोय, तेल,' म्हणतां, येणें दुग्धातुपासि लाभावें. ९
व्रत यज्ञानुष्ठानें, कीं घडलीं कोणतीं न यां[7] दानें?
न[8] म्हणावे, 'वापीचे अनुभविले कोण तीन यादानें.' १०
पुत्राच्या राज्यांत हि त्यांत हि वर्षें समग्र हा तेरा
पावुनि वित्ता, जोडी विपुल यशा, जेंवि शूर हातेरा[9]. ११
त्वां ही कृतार्थ केला, बहु शुश्रूषा करूनि, आलिकडे,
काय उणें त्या, घे ज्या सत्संगति सुरभिची च आलि[10] कडे[11]?

---

१. आज्ञा शिरसावंद्य मानून. २. मा धर्म—**पंत.** ३. चचल वृत्तीचा. ४. हाय! —**पंत.** ५. माझे तों गुरुजन कवि सर्वस्व; प्राज्ञा व्यासा! तूं तों कुळराज्यपरायण; मग का न करीन निजपित्याच्या पित्या विप्राची आज्ञा?—**पंत.** ६. धृतराष्ट्राने पाणी अथवा तेल मागितले असता त्याला पाहूनें दूध किंवा तूप द्यावे. ७. धृतराष्ट्राला. ८. कूपात रहाणाऱ्या जलचराने विहिरीचे तीन च कोपरे पाहिले आहेत, चवथ्याची त्याला माहिती नाही असे म्हणणे जसे अयुक्तिक, तसे च धृतराष्ट्राने मुलाच्या राज्यात अमुक एक सुख भोगिले नाही असे म्हणणे अयोग्य होय, असा भाव. ९. शूर हातेराते पावुनि जसा विपुल यशाते जोडितो—**पंत.** १०. कामधेनूची च सखी. ११. कडेवर.

समय तपाचा, आज्ञा दे, तात तरो तपोंनि, धीरा ! जे
मेले तपोवनीं, सुरपूजित झाले तपोनिधी राजे. १३
हा स्पर्शला न कोपा आजि, जसा द्विज महातपा यवना;
जातो नृप, कीं जावें तों, जों स्वाधीन हातपाय वना." १४
धर्मास निरोप तसा मागे पुत्रार्थ एकल व्यास,
शिष्यार्थ द्रोण जसा पूर्वी अंगुष्ठ एकलव्यास. १५
मुनि गेल्यावरि वंदनें, बोले तो धर्म मंद मंद नतें;
पावे, निरोप देता नंदा जें दुःख नंदनंदन, तें. १६
'व्यास, कृप, युयुत्सु, विदुर, संजय, तूं, हे सदैव जेंवि हित
कुरुवंशाचे, तेंवि न इतरः करिन मीं वदाल जें विहित. १७
जेवावें, मग जावें; अन्य वरा त्यजुनि, आजि या चि तसें,
स्तन्याला बाळ जसें, सानुज मीं, नमुनि पाय, याचितसें.'
आज्ञा युधिष्ठिरानें देतां चि तपोवनास जायास,
उठला, विप्र विवाहा, जाणों, पावुनि धना, सजायास. १९
जातां गृहांत मार्गी करि जीर्णकरींद्रसा पदन्यास;
जें सुख, जें दुःख, तया, जालें चि नसेल तें तदन्यास. २०
विप्रादिकांसि भोजन देवूनि, करी स्वयें हि मग विधिनें;
कीं, लाविला असे हा अर्थिखगांचा गृहस्थनग विधिनें. २१
कुंतीसह जेवविली गांधारी हर्षली सुनारी ती,
कीं, आदरीं सखीची कन्येची दाविती सुना रीती. २२
भोजन करूनि बसला स्वस्थानीं स्वस्थ भूप, त्याजवळ
ये धर्म; चकोर जसा इंदुकडे घ्यावया प्रभाकवळ. २३

१. धृतराष्ट्रासाठीं. २. एकटा. ३. पार्थाकारणें. ४. आर्या० आदि० अध्याय २५।४५ पहा. ५. नंदाला निरोप देणाऱ्या श्रीकृष्णाला जें दुःख झालें. ६. हा च वर. ७. अगावरील दुधाला. ८. म्हातार्‍या गजश्रेष्ठाप्रमाणें. ९. पाय ठेवणे. १०. याचकरूपी. पक्ष्यांचा. ११. गृहस्थजनरूप आश्रयवृक्ष. १२. किरणांचा घांस (घुटका). * मुख खालीं करून.

धर्मासि म्हणे राजा, फिरवुनि सप्रेम पाठिवर हात,
'वत्सा! धर्मी सादर, नित्य सदुपदेश आठिव, रहात. २४

आत्मा संरक्षावा, मंत्र[1] करावा नृपोत्तमा! गूढ,
सुज्ञ पुरुष एक हि बहु, राजा! न बरे सहस्र ही मूढ. २५

हो च उपासक विद्यावृद्धांचा, शंभुचा उपासकसा;
सेवीं तद्वचनास प्रेमें, जन सेविती तुपास कसा. २६

राजकुळ सुखें नांदे, देती वर[2] विप्र ज्या सदाशी[3], तें;
निववीं निरीक्षणें, जसि संतति बरवि, प्रजा सदा शीतें[4]. २७

ढाळितिल जाळितिल हिमहेममया[5] कामकोपलोभ नगा,
बा तनया! वात न या पापांचा या पथांत शोभन[*] गा! २८

तुज सदुपदेश भीष्में केला चि असे, तथापि हें काहीं
कथिलें, कीं करिती हृद्वाग्[6]वात्सल्यें उगीं च हेंका हीं.' २९

धर्म म्हणे, 'करिन असें; कथिलें त्वां नीतिसार सार मला.
त्यजुनि गुरूक्ता, इतरीं हा न च, अळि जेंवि सारसा[7] रमला.'

हित सांगुनि धर्माला राजा अंतःपुरांत तो गेला,
त्यासि म्हणे गांधारी, 'सांगावा मज विचार, जो केला. ३१

आलें सुतापसत्वें जरि राया! तव मना सजायाचें,
तरि करिशिल केव्हां तूं या स्थानाहुनि वनास जायाचें?' ३२

भूप म्हणे, 'पुत्रांचीं श्राद्धें करुनि, द्विजांसि तर्पूनीं,
गांधारि! शीघ्र निघतों, सर्वस्व ब्राह्मणांसि अर्पूनीं. ३३

आज्ञा घ्यायाकरितां आधीं सर्व प्रजेसि आणवितों;
इतुकें चि राहिलें, हें कर्तव्य युधिष्ठिरासि जाणवितों.' ३४

---

१. मसलत. २. श्रेष्ठ. ३. चांगले आशीर्वाद. ४. प्रीतियुक्त अवलोकनानें. ५. हिमालय व मेरू ह्या पर्वतांना. (कामक्रोधादि विकारानी बर्फाचा व सोन्याचा पर्वत सुद्धां चळेल किंवा जळेल, मग मानवांची कथा काय?). ६. मनांतील शब्द. ७. कमळाला [त्यजुनि]. * चांगला, हितावह.

धर्मासि नृपें सांगुनि[1], धर्में हि सकळ जनास, पाठविलें[1],
वर्ण सकळ ही आले; कीं, प्रभुनें आपणास आठविलें. ३५
नगरींचे, देशींचे, जन आटोकाट[2] दाटले थाट[2],
दे वेत्रपाणि[3]वांचुनि वृंद[4] वहाया न वायुला वाट. ३६
नृप भेटुनि त्यांसि म्हणे, 'सज्जन हो! जेंवि वायुसह वास,
तेंवि तुम्हांसह भारत[5], अविट[6] सदा यावदायु[7] सहवास. ३७
जें आप्त हो! वदतसें, हें माझें वचन आयकोनि करा;
आली मति वनिं जाया, माहेरीं जेंवि बायको, निकरा. ३८
व्यासें, धर्में हि, दिली आज्ञा जाया तपोवनास मज;
कीं, आहे, या सुज्ञा राया, जसि त्या[8] तपोधना, समज[9]. ३९
द्यावी तुम्हीं हि आज्ञा मज; न करावी विचारणा कांहीं,
मत्परिणाम घडावा बहु बरवा, यांत वांकडें नाहीं. ४०
प्रीति जसी, प्रेमळ हो!, जी तुमची आमुची सदा आहे,
देशांतरस्थ[10]भूपप्रकृतिप्रेमोपमा न हे साहे. ४१
आहें सुतविरहाकुळ, उपवासक्षीण, या वयें श्रांत;
श्रांत नसें जालों जों, तों मीं पाहेन[11] आपुला[11] प्रांत. ४२
गेलें या पांडुसुतीं, सत्पुरुषवरीं, युधिष्ठिरीं राज्य;
प्राज्य सुख मला झालें; संसितीं[12] दुग्धीं च सांडलें आज्य. ४३
या पुत्रैश्वर्याहुनि तें पुत्रैश्वर्य होय फार उणें,
हा कोठें! तो कोठें! तदधिक सत्पुरुष धर्म कोटिगुणें. ४४
गति वनवासावांचुनि या संसारांत काय हो! मातें?

१. निरोप धाडला, बोलाविलें. २. शक्य तितकें दाटीनें जमले. ३. भालदारा-शिवाय. ४. जनसमूह. ५. भरतकुळांतील राजे. ६. कटाळा न येई अशा रीतीनें. ७. आजन्म. ८. त्या व्यासऋषीला. ९. समजत. १०. परदेशांतील राजा व प्रजा यांचेमध्ये आमच्या प्रेमाची बराबरी करणारें प्रेम मिळणार नाहीं. ११. मी माझ्या आयुष्याचें सार्थक करण्याची सोय पाहीन. १२. शर्करायुक्तीं—पंत.

वृद्धांध, अपुत्र हि, मीं करिन, तपोऽग्नींत कायहोमातें. ४५
यास्तव आज्ञा द्यावी आजि तुम्हीं, वृद्ध हा तपो रानीं;
याकरवीं जोडविले[1] निःसार भवासि हात पोरानीं.[2]' ४६
ऐसे आज्ञेकरितां बहु विनयें विनविले महिवरानें,
कोणी किमपि न देती उत्तर, बहु दाटले गहिवरानें. ४७
पुनरपि भूप म्हणे, 'या क्षितितें शंतनु अगाधमति पाळी,
मग दे [3]शांतनवप्रतिपाळित मत्तात[4] मनुजपति पाळी.[3] ४८
पांडु मग प्रतिपाळी, केलें सत्कीर्तिनें पद भ्रात्या,
मीं किति? तुम्ही च गातां त्याच्या सद्गुणगणा अदभ्रा[5] त्या. ४९
म्यां तुमची शुश्रूषा केली च नसेल नीट अंधानें,
अंजलि केला, याच्या घ्यावी परिपूर्ण करुनि बंधानें.[6] ५०
दुर्योधन राज्य करित होता, तेव्हां कुबुद्धि तो कांहीं
करिता झाला तुमच्या अपराधातें असाधु कीं नाहीं? ५१
स्पष्ट बुडविली धर्मस्थिति, नीति, क्षिति, महाखळें तनयें,
केला विमर्द[7] दारुण तैसा तो बहु दुराग्रहें अनयें. ५२
अपराध सर्व माझा, यास्तव केला तुम्हांसि अंजलि हो!
वंध्यत्व लिहो भाळीं विधिचें, कदपत्य[9] न, करकंज[8] लिहो. ५३
हतपुत्र, वृद्ध, दुःखित, पूर्वनृपांचा अचक्षु हा तनय;
म्हणुनि क्षमा करावी, जरि हि नसें मीं क्षमार्ह हातनय.[10] ५४
पहिल्यापासूनि पटी बांधुनि झाली अचक्षु गांधारी;
ना तरि सुना पहातां, येती शतदा दिसांत आंधारी. ५५
मागतसे आज्ञेतें, मजसहित करावयासि सुतपा, हे[11];
राहेलें[12] काय, होते शत, त्यांतुनि एक ही न सुत पाहे[12]? ५६

१. निःसार अशा संसाराला पुरे पुरे म्हणावयाला लाविले. २. दुर्योधनादिकांनी. ३. पाळी फेडली. ४. भीष्मानीं सांभाळ केलेला माझा पिता विचित्रवीर्य. ५. विपुल. ६. ह्या हात जोडण्यानें. ७. युद्ध-पंत. ८. ब्रह्मदेवाचें हस्तकमल. ९. कुसंतति. १०. त्यक्तन्याय-पंत. ११. ही गांधारी. १२. 'जी तीं' असा अध्याहार.

आलों शरण तुम्हांला, वाहतसों नित्य शोकसरिदोघें,[1]
अवलंबूनि तरी द्या तूर्ण तपोरण्यवसतितरि[2] दोघें. ५७
रक्षिल तुम्हांसि हरिसा, विधिसा, हा धर्म वत्स राघवसा;
येथें नाहीं कामक्रोधाहंकारमत्सराघ, वसा. ५८
हा निरविला[3] तुम्हांला म्यां चिंतास्पर्शमणिधनन्यास,[4]
बहुसावधानचित्तें संरक्षा नित्य या अनन्यास. ५९
जेंवि किजे पुत्रकरीं अंतीं सर्वस्व-आयुधन्यास,[5]
केला तुम्हीं तसे; कीं, दिधलें[6] सर्व स्व आयु धन्यास. ६०
विप्रिय करिता झालों तुमचें मीं, मत्सुतादि, मज्जन[7] कीं,
तें द्या[8] मज, मन्नमनीं अथवा ठेवूनि दृष्टि मज्जनकीं.' ६१
ऐसीं करुणावचनें ऐकुनि, जन सर्व कोंडला,[9] 'जा' या
वर्णा वदेल कैसें, त्याचें लोकांत तोंड लाजाया?[10] ६
पुनरपि करी, सभेला म्हणवाया 'हाय!' राय काकुळती;
बोलेल काय, जीचें हृदय करुणशब्दसायकाकुळ,[11] ती? ६३
'द्यावें तपोवन मला, भक्ताला जेंवि पद रमागेहें,'[12]
सर्व जना दीनपणें नरपति, पसरूनि पदर, मागे हें. ६४
आधीं रोदन पुष्कळ, मग करुनि विचार, त्या सशोकाहीं
ऋग्वेदी सांब द्विज वक्ता केला समस्तलोकाहीं. ६५
तो सांब म्हणे, "राज्या! जें तूं वदलासि, तें सकळ साचें;
तव वचनाचें, जैसें प्रासादाच्या महत्त्व कळसाचें. ६६
कोणीं प्रजांसि अप्रिय राजा एकीं हि जो उणा अंशीं,

---

१. दुःखरूपी नदीच्या प्रवाहानें. २. तपोवनांतील राहणें ही च कोणी नाव, तिचा आश्रय करून. ३. हातीं दिला. ४. चिंतामणि आणि स्पर्शमणि (परीस) एतद्रूप धनाचा ठेवा. ५. सर्वस्वभूत असा शस्त्राचा ठेवा. ६. तुम्हीं आपलें सर्वस्व आणि आयुष्य ह्या धन्याच्या चाकरीकरितां दिलें. ७. माझे चाकरनोकर. ८. तें मला परत द्या (माफ करा). ९. गहिंवरानें दाटला. १०. काळोखी लागण्यासाठीं. ११. करुणरसपूर्ण शब्दरूपी बाणानें व्याकुळ झालेली. १२. रमाकांतानें.

कुरुकुलतिलका! ऐसा झाला नाहीं च भूप या वंशीं. ६७
भ्रात्यापरि, तातापरि, आम्हां प्रतिपाळितां तुम्हीं करुण,
अनुराग[1] तुम्हांआधीं, जैसा सूर्योदयापुढें अरुण. ६८
दुर्योधनें न केलें कांहीं च अयुक्त अब्द तेरा, ज्या
अस्मद्रंजननिरता[2] नेणति, लावूत[3] शब्द[3] ते, राज्या. ६९
त्वां व्यासोक्त करावें, होतें करितां तदुक्त जन्महित;
आम्हां सर्वांचा तो परमगुरु ज्ञानसिंधु सन्महित. ७०
धरुनि व्यसनांत तुझी, तरलों आम्हीं समस्त जन, कास;
विरहीं दुःखित होवूं, बाळ जसे आठवूनि जनकास. ७१
शंतनु, चित्रांगद नृप, तो तव तात हि विचित्रवीर्य, नृपा!
पांडु, जसा प्रतिपाळी, त्वत्सुत हि तसा चि बहु करूनि कृपा.
तातीं तसे चि होतों विश्वस्त सुयोधनीं, नसे तातें
केलें असें प्रिय; नृपीं जें सुख आम्हां, घनीं न सेता[4] तें. ७३
तैसा चि हा युधिष्ठिर करिल बहुसहस्र वत्सर हितातें,
याची श्रितरहिता[5] मति पावे, जें धेनु वत्सरहिता, तें[6]. ७४
वृत्तें[7] जसा कुरु, जसा संवरण, जसा च कीर्तिला भरत,
हा धर्मज्ञ युधिष्ठिर राजर्षि तसा च कीर्तिलाभरत. ७५
मधुसंश्रित[8] कोणही तरि तरु म्हणतो, होवुनी विपल्लव 'हा!'?
देवा! स्वप्नीं हि न तव आश्रितजन पावला विपल्लव[9] हा. ७६
देवा! ज्ञातिविमर्दी[10] म्हणसी दुर्योधनासि हेतू तें
न तसें, दैव चि कारण, ऐसें जन विनवितात हे तूतें. ७७
अक्षौहिणी क्षयातें गेल्या अठरा दिनांत अठरा ज्या,

१. प्रेम. २. आमचें मनोधारण करण्यांत निमग्न अशा दुर्योधन राजाला. ३. बोल ठेवीत. ४. शेताला वृष्टीपासून हि नाहीं. ५. आश्रितजनवियुक्त अशी. ६. दुःख—**पंत.** ७. वर्तनानें. ८. मधुमास म्हणजे चैत्रमास, त्याचा आश्रय करून. ९. विपत्+लव=दुःखलेश. १०. भाऊबंदांच्या युद्धांत.

येथें दैव चि कारण मुख्य, नव्हे त्वत्तनूजहठ राज्या! ७८
सुजनातें सुखवाया सुयशें, वरिती परासुता[1] राजे;
निर्वाविति चंदन गंधें, छेदू देती परा[2] सुतारा[3] जे. ७९
दिव्यें देहें पावुनि व्हाया सुरपूज्यमान सत्य, ज़ुनीं
तुच्छें जीं, तीं, गेले ते धर्मीं निरतमानस, त्यजुनीं. ८०
दुर्योधनादि सर्व क्षत्रिय गेले चि वीरलोकातें,
त्यांच्या आम्हीं कोण्ही आप्तजन नसों चि योग्य शोकातें. ८१
राया! निजायुतें तूं, होउनि गुरुपादनत, तपुनि वेचीं;
तव कीर्ति कार्तिकींच्या नेत्रें झांकील सतत पुनिं वर्चीं. ८२
धर्ममतिला प्रजा तसि आवडत्ये, जेंवि आइला दुहिता[3],
क्षितिला सुखविल, आहितवह्नि[4] जसा विप्र गाइला दुहिता[5].८३
विप्रांच्या पूर्वप्रभुदत्तावृत्ती जपोनि चालवितो,
देउनि नव्या हि, द्याया सुयशें, अर्थिद्विजांसि पालवितो[6]. ८४
सुतपस्या चि करावी अस्मच्चिंता तुवां कदा न मनें;
देतों निरोप, करितों बा! आम्हीं सर्व हे तुला नमनें." ८५
ऐसी आज्ञा देतां, बहुत चि तो जन मनीं असुख पावे;
हर्षे नृप; कीं, त्याच्या चित्तांत तपोवनीं असु खपावे. ८६
देतां निरोप, नृप, दृढ करुनि हृदय, त्या जनासि कर जोडी;
जांणों सुहृदां, अटकळ असुमोक्षाची पहावया, सोडी. ८७
जो 'मीं, माजें,' म्हणुनि स्वपरांतें व्यसनसागरीं पाडी,
मागाया श्राद्धार्थ द्रव्य विदुर पांडवांकडे धाडी. ८८
विदुर म्हणे, "धर्मनृपा! जाणार वनासि तव पिता; पण तो,
'जावें, गुरुपुत्रसुहृच्छ्राद्धांतें करुनियां,' असें म्हणतो. ८९

१. मृत्यु. २. शत्रुरूप जो सुतार त्याला. ३. कन्या–**पंत.** ४. ज्यानें अग्निहोत्र ठेविले आहे असा. ५. धार काढणारा. ६. टवटवीत करितो. ७. सुहृदांच्या वियोगापासून जें दुःख होईल त्यावरून जणुं काय प्राणत्यागाच्या वेळच्या दुःखाचें अनुमान करण्याकरितां च त्याना सोडता झाला, असा भावार्थ.

देसिल आज्ञा जरि, तरि त्या गांधाराधमास[1] ही, साधो!
साधो सुगति श्राद्धें, न अनाथाला क्षुधा तृषा बाधो." ९०
धर्माच्या, विजयाच्या, गुरुचा संदेश[2] बहु मना रुचला,
एका वृकोदराच्या झाला कर्णद्वयास तो कुचला. ९१
विनवी साधु विजय त्या भीमासि, तदाशयासि समजुनियां,
जो भावी[3] अपकारां हृदयांत सदा नव्या चि सम जुनियां. ९२
'आर्या! आप्त मृतांचे अनृण[4] श्राद्धंकरूनि होतात,
भीष्मादिगुरुसुहृत्सुत यांचीं श्राद्धें करूनि हो तात. ९३
आम्हीं मागत होतो ज्या, तो आम्हांसि मागतो, बा! हें
मोटें यश; काळ कसा झाला अनुकूळ आजि हा, पाहें. ९४
गुरु मागतो तयाला निर्जित[5] धन द्यावयासि तूं अर्ह[6],
यश वाढाया सुज्ञें द्यावें धन, जेंवि बर्हिणें[7] बर्ह[8].' ९५
भीम म्हणे, "भीष्माचें, द्रोणाचें, बाह्लिकादि जे त्यांचें,
आम्हीं च श्राद्ध करूं, साधूंचें, कामकापजेत्यांचें. ९६
श्राद्ध करो, करणें तरि, निजधन वेंचुनि; पृथा चि कर्णाचें
नातें कथुनि, करितसे वरिवरि सांत्वन वृथा चि कर्णांचें. ९७
वृद्ध श्राद्धें न करो, देणें नाहीं च एक ही कवडी,
कष्टें[9] जोडुनि, देउनि कोण अकार्यास धन वृथा दवडी? ९८
भागविले, वद, कोणीं, असुकार्या[10] वाहतां वसु, खवाटे?
त्यांसि कसें तर्पावें, ज्यां अस्मद्वैभवें असुख वाटे? ९९
अधिकाधिक कष्टांतें पावावे पाप[11] साधुजनघातें,
दुखवावें दुष्टातें, सुखवावें सर्वथैव अनघातें. १००
दुर्योधनादिकांचीं श्राद्धें जरि वाटलीं मना कार्यें[12],

१. दुष्ट पुत्र जो दुर्योधन त्याला. २. निरोप. ३. मानीत असे. ४. ऋणमुक्त होवो. ५. जिकलेलें. ६. योग्य. ७. मोरानें. ८. पीस. ( मोरचल हें राजचिह्न आहे यावर येथें कविकटाक्ष आहे). ९. श्रम करून खादे दुखवून घेतले. १०. अप्रशस्त कामाकरितां. ११. दुर्योधनादि दुष्ट लोक. १२. करण्याला योग्य.

कां बकहिडिंबकीचककिर्मीरांचीं करूं नये आर्यें[1]? १०१
बा! विसरलासि इतुक्यांत चि तें तूं; विसर हा बरा काय?
स्त्रीचा, सभेंत लुगडें फेडुनि, केला चि घाबरा काय. १०२
कपटें सर्वस्व हरुनि, पाठविता[2] तात बा! न वनवासा;
तूं[3] दवडिलासि कीं रे! अपराधी दंड्य मानव[4] नवासा! १०३
विदुरातें वरिचेवरि जो, हृदयीं हर्ष धरुनियां मोटा,
द्यूतीं, 'किं जितमधुना?' 'किं जितमधुना?' असें पुसे खोटा,
'बाप' म्हणावें याला, तरि असतें अरिस काय बा! सिंग?
तेज[6] गुरु, न हा गुरु; बहु सुकिरीटापरिस काय बासिंग[7]?"
बहु निर्भर्त्सुनि त्या अनुजासि, म्हणे धर्म, "तूं उगा चि रहा;
कीं, म्हणवी गुरुनिंदा परलोकीं निजकृतानुगा[8] चिर 'हा!'"
अर्जुन म्हणे, 'गुरुपुढें भीमा! म्यां बहुत काय बोलावें?
सकळंक[9] हि हेम महित[10], तें पितळासीं कधीं न तोलावें. १०७
विसरति अपकारातें, उपकारातें चि साधु आठविती;
बा! सोसितां न सा विति होय वपु, न सोसितां न आठ[11]विती.'
विजयोत्साह[12] जया बळ, वाताचा जेंवि मर्मरा[13] जव, दे,
तो त्या कनिष्ठताताप्रति ऐसें साधु धर्मराज वदे:- १०९
'निजकोषांतुनि देतों; न्यावें, जितुकें अभीष्ट जनका जें;
व्हावें कशास तें, बा! आप्तांचीं जरि न करिल धन काजें?'
ऐसें विदुरासि कथुनि, धर्में बहु धन्य सुयश[14] अर्जुन, हो!
यापरि वाक्कुसुमाहीं पूजियला तो सुशीळ अर्जुन हो! १११
त्या अर्जुनाकडे तो भीम कटाक्षेंकरूनियां पाहे,

---

१. धृतराष्ट्रानें. २. पाठविणारा. ३. तूं हांकलून दिला गेलास. ४. अपरिचितसा—**पंत.** ५. आतां काय जिंकलें? ६. प्रताप हा च गुरु. ७. वधूवराच्या कपाळावर बांधावयाचें बेगडाचें एक भूषण, मुंडावळ. ८. आपण केलेली व आपल्या मागें येणारी. ९. डांकलग. १०. मान्य. ११. वितस्ति—**पंत.** १२. अर्जुनाचें प्रोत्साहन. १३. पानांच्या हालण्याच्या आवाजाला. १४. संपादुन—**पंत.**

जें 'साधु! साधु!' वदला अनुजासि, न आपणा, न तें साहे.
पुनरपि धर्म म्हणे, "बा विदुरा! भीमीं नृपें न कोपावें,
प्रार्थुनि तुवां म्हणावें, 'परुषोक्त[1] मनीं धरूं नको, पावें.' ११३
कष्टी वनांत झाला, साहुनि बहु वृष्टि, शीत, आतप, हा,
तेजस्विजना कंपद परिभव, दीपासि लव हि वात, पहा. ११४
बहुत चि दुःखित, यास्तव करितो हा भीम मत्सरा, याचा
कोप मनीं न धरावा; मीं तैसा हा हि वत्स रायाचा. ११५
जें कांहीं माज्या, कीं या विजयाच्या, असेल धन धामीं,
स्वामी त्याचा राजा धृतराष्ट्र, स्पष्ट सांगतों बा! मीं. ११६
संकोच धरावा त्या प्रभुनें चित्तांत न वसु खरचाया,
गुरुच्या[2] गुण प्रसादीं, न तसा वित्तांत, नव सुख रचाया. ११७
तनुसह सर्वस्वाच्या मीं कांटाळेंन न व्ययशतातें,
ऐसें सांग पित्या कीं, 'जोडावें नित्य नव्य यश तातें.'" ११८
विदुरें तसें चि सांगुनि सर्व हि, धृतराष्ट्र भूप हर्षविला;
पात्रशतीं[3] तो तेणें शुभकाळें मेघसा चि वर्षविला. ११९
भीष्मद्रोणजयद्रथबाह्लिकतत्पुत्रशकुनितनयशतें.
श्राद्धें त्यांचीं सांगें करि नृप, बहु गाय साधुजन यश तें. १२०
दासीदासग्रामक्षेत्रसदनहस्तिवाजिशिबिकाहीं
तोषविले विप्र म्हणति, 'अधिक गमेना चि आजि शिबि[4] काहीं.'
दे मणि, कांचन, शय्या, कन्या, गोधन, अजाविक[5], तराया,
कवि म्हणति, 'हंस घेउनि, यश देशील न अजा[6] विकत राया!'
धृतराष्ट्र देववी शत ज्याला, त्याला सहस्र दे धर्म,
ज्यासि सहस्र, अयुत त्या, देत्या घेत्या हि व्हावया शर्म. १२३

१. कठोर भाषण. २. वडिलांच्या. ३. सत्पात्र अशा शेकडों ब्राह्मणांच्या ठायीं. ४. राजा—**पंत.** आर्या० खंड २ रा, पृष्ठ ४१३, टी० १ पहा. ५. शेळ्यामेंढ्या. ६. ब्रह्मदेवास—**पंत.** हंसाचें शुभ्रत्व धर्माच्या कीर्तीच्या शुभ्रत्वाहून कमी ठरल्यानें ही अदलाबदल करण्याला धर्म कबूल होणार नाहीं.

तर्पी सुहृदां दासां; त्या, जेंवि स्वपर तोयदा नाहीं;
स्त्रीचा हि, आपुला ही, अनृण क्षितिपाळ होय दानाहीं. १२४
सर्वस्वदानमखसा दश दिवस श्राद्धयज्ञ तो होय,
सकळ निववीले भूपें, वर्षुनि धन, तोयदें जसें तोय. १२५

# अध्याय तिसरा.



मग कार्तिकीदिनीं तो प्रातःकाळीं च पांडवां बाहे,
इष्टि करुनि, तापसमुनिवेष धरी, वल्कलाजिनें वाहे. १
नृप सिद्ध होय, भार्यास्कंधीं अर्पूनि बाहुला, जाया,
लागे धर्मा गिळिल्या मोहा ग्रस्तार्क राहु लाजाया. २
गांधारीचा बाहु स्वस्कंधीं घे सती पृथा वाटे;
कीं, कुळवतीस गुरुजनभजन न घडतां, जिणें वृथा वाटे. ३
हाहाकारसह उठे; अजिनें वल्कें, पटासि निंदुनि, घे;
सम त्रि गृहांतुनि राजा जननयनांतुनि हि अश्रुबिंदु निघे! ४
किमपि न वदवे कोणा: कीं, झाले बाष्पभारुद्ध गळे:
धर्माचें वपु सहसा, वीराचें जेंवि करुनि युद्ध, गळे. ५
त्या श्वश्रूश्वशुरानीं प्रीति त्यजिली, न परि सुनानीं ती:
'न रडावें' ऐसें गुरु सांगति, तन्हि, 'म्हणति परिसुना नीती.'
दुष्प्रापदर्शना ज्या देवें तपनें हि लेखिल्या होत्या,

१. जेंवि तोयदा [ तेंवि ] त्या स्वपर ( आपपरभाव ) नाहीं. २. कार्तिकी पौर्णिमेच्या दिवशीं. ३. धर्माला स्ववश करणाऱ्या मोहाला पाहून सूर्याचा देखील ज्याने ग्रास केला आहे असा राहु सुद्धा आपणास तुच्छ मानूं लागला. ४. धृतराष्ट्र आपल्या आसनावरून उठावयाला व तो वनवासाला जातो म्हणून लोकांत हाहाकार व्हावयाला एक च गाठ पडली, असा भावार्थ. ५. वडिल माणसें. ६. 'न रडावें' हा उपदेश.

सर्वजनें कुरुकांता उघड्या मार्गांत देखिल्या हो! त्या. ७
पांडव वनवासाला जातां, जें दुःख जाहलें होतें;
निघतां तपोवनाला धृतराष्ट्र, जनास जाहलें हो! तें. ८
सर्वांस वर्धमानद्वाराबाहेर[1] परतवी राजा,
धर्मासि म्हणे, 'वत्सा! घेउनि सर्वांसि, परत, वीरा! जा.' ९
संजयविदुर न फिरती, सिद्ध चि ते सुज्ञ शुद्ध वनवासा,
कविहृदयास बहु रुचे त्याग चि, बाळास उद्धव[2] नवांसा[3]. १०
राजा अजातरिपुच्या, बहु निरखुनि, कृप युयुत्सु दे हातीं;
शस्त्रें न, कंप करुणें गुरुवचनें जेंवि देति देहा तीं. ११
कुंतीतें धर्म म्हणे, 'मी पावायासि[4] नरवरा जातों,
शरदंब्द[5] चातकाचा, माजा करि तेंवि न रव राजा तो. १२
माते! समजावूनि स्ववधूजन, तूं फिरोनि नगरा जा,
जातो तपोवनीं हा, व्हाया तेथिल नगांत[6] नग, राजा.' १३
धृतराष्ट्राला सोडुनि न पृथा, जसि सिंधुला नदी, परते;
गुरु तो शिवं[7] चि; पतंगी अन्यत्र, त्यजुनियां न दीप, रंते[8]. १४
जाय तसी च वनपथीं, न धरुनियां कंप, देत पाउल ती,
दुसरी[9] हृदयीं, वीरितां त्यजुनि तशा संपदे, तपा, उलती. १५
धर्मासि म्हणे, "वत्सीं सहदेवीं त्वां प्रमादें[10] न करावा,
हा म्यां, सरस्वतीनें जैसा पावो दिला न अंक[11] रावा[12], १६
कर्णाच्या, तळमळनें माजें, स्मरुनि स्वपाप, मन, घातें;
बापा! स्मरत असावें त्वां त्या पितृतर्पणांत अनघातें. १७

---

१. वनवासाला जाताना पांडव या च द्वाराने बाहेर पडले. २. उत्सव: सण. ३. नव्यासारखा. ४. पोचविण्याला. ५. शरदृतूंतील शुष्क मेघ चातकाचे ओरडणे निष्फल करितो त्याप्रमाणे धृतराष्ट्र तर माझा शब्द ऐकत नाहीं च. ६. वृक्षांत वृक्ष म्हणजे मुख्य वृक्ष. (तपश्चर्या करित असतां झाडाप्रमाणें शीतोष्णताप सहन करणारा, कृश पण कणखर, असा भावार्थ). ७. कल्याणकारक. ८. न रते. ९. इतर कोणी सामान्य स्त्री. १०. हेळसांड, दुर्लक्ष्य. ११. दुःख-पंत. १२. शुक-पंत.

त्वां प्रीति उणी होवूं द्यावी बा मानदा! न देवीची,
देती सती, सुधेची तेंवि सुखाचें न दान दे वीची[1]. १८
भीमार्जुनाहुनि समाधान करीं सर्वकाळ नकुळाचें,
केवळ आजि तुजकडे वढिलपणें सर्व पाळन कुळाचें. १९
शुश्रूषा या श्वश्रूश्वशुरांच्या मीं वनांत पायांची
जात्यें करावया, बा! मजला संगति अनातपा[2] यांची. २०
न विसंबावें म्यां गुरुचरणातें सेवटीं अहेयांतें[3],
'स्वरगविमान' कवि म्हणति धर्मा! अरिवायुच्या अहे[4]! यांतें."
ऐकुनि युधिष्ठिर म्हणे, होउनियां आधिशोकपद[5] तीस,
"त्वां काय योजिलें हें? मातें हें काय योग्य वदतीस? २२
जातीस कसी सहसा? स्वमुखें तुजला म्हणेन 'जा' मीं न;
माते! म्हणेल काय, त्यागुनि जातां, नदीस 'जा' मीन? २३
विदुलेच्या[6] वचनाहीं पूर्वीं देउनि तुवां चि उत्साहा,
युद्धासि सिद्ध केला सानुज निजपुत्र, करुनि कुत्सा हा. २४
वधिले बहु नृप, आलें त्वत्प्रज्ञेनें[7] चि राज्य पदरा हें,
ते मति कोठें गेली? भोगाया प्राप्तराज्यपद राहें. २५
स्वसुतांतें, स्ववधूंतें, जासि त्यागूनि या हि पणतूतें[8],
दुर्गम विषम वनवसति जननि! व्याकुळ करील पण तूतें." २६
असकृत्[9] 'प्रसीद[10]' ऐसें रडत जरि म्हणे सुपुत्र तो, तरि ती
जाय तसि च, अश्रुमिषें पुत्रस्नेह स्रवोनि होत रिती[11]. २७
भीम म्हणे, "त्वां सुतजित राज्य, करुनि दानधर्म, भोगावें,
संप्रति नमुनि म्हणावें, 'घ्या सुसमृद्धें[12] सुविप्र हो! गावें.' २८
त्यागमति असी कोठुनि आली? या भोजनांत हे मासी;

१. अमृताची लाट. २. सच्छाया—**पंत.** शीतल. ३. त्याग करण्याला अयोग्य अशा. ४. सर्पा!—**पंत.** ५. चिंता आणि शोक यांचें स्थान. ६. उद्योग० अ० १० पहा. ७. बुद्धिबलानें. ८. परीक्षितीतें. ९. वारंवार. १०. पाव; संतुष्ट हो. ११. रिकामी; मोहरहित. १२. सुसंपन्न अशीं गांवें इनाम घ्या.

काय वनीं बहु? धन्या तूं वांटुनि[1] हो जनांत हेमांसी. २९
तरि करविलीं नृपांचीं बहु शून्यें त्वां वृथा चि कां गेहें?
'द्या साधुनि राज्य' म्हणसि, टाकिसि ती तूं पृथा चि कां गे! हें?
बाळ वनीं[*] होतों, त्यां आम्हां घेउनि, कशास आलीस?
श्री न, सखी वनभू जरि, तरि दिधला कां वियोग आलीस[2]?
सहदेवासि तरि पहा, केला माते! कशास पण[3] तुंडें[4]?
कां उत्तराकुमारें पात्र न व्हावें यशास पणतुंडें? ३२
माते! प्रसन्न हो, गे! जें येथें तुज घडेल, न वनीं तें;
साहेल देह हा तप, आतप तरि साहिजेल नवनीतें.' ३३
सहदेव बहु रडे; कीं, जात्ये, होता करीत 'आ' जिस, ती;
वाटे स्पष्ट तयाला होती माद्री च माय आजि सती. ३४
रडती पांच हि, म्हणती, 'दुःसह पदविरह, पाव;' काकुळती
करिति, तरि माय जाय चि. आवरि मन विरहपावकाकुळ[5] ती.
कुंती म्हणे, "तुम्हां म्यां कथिलें विदुलोक्त वृष्णिराय[6] कवी
युद्धापूर्वीं तुमच्या राज्यसुखयशोर्थ कृष्ण आयकवी. ३६
उरल्या देहांतें ही गिळित चि होते, करूनि 'आ,' ज्ञातीं;
म्यां पांडुवंश न बुडो, यास्तव केली तुम्हांसि आज्ञा ती. ३७
वृत्त्यर्थ[7] तुम्हीं प्रभुहीं न पहावें अन्यवदन दीनाहीं,
कादंबिनि[8] न साहे, म्हणतां तृषितांसि नदनदी 'नाहीं.' ३८
म्यां भोगिलें स्वपतिच्या राज्याचें, भोगयोग्य जें फळ, तें;
सांग महादान सकळ केलें, जितुकें पुरोहिता कळतें. ३९
विधिवत्सोमरसाच्या म्या तृप्ति हि मानसा दिली पानें,

१. सुवर्णदान करून. २. वनभूमिरूपी सखीला. ३. कुंतीने माद्रीच्या सहगमन-कार्ळीं 'मी सहदेवाचे पालन करीन' अशी प्रतिज्ञा केली होती. ४. तोंडानें. ५. वियोगरूपी अग्नीनें व्याकुळ झालेली. ६. यदुश्रेष्ठ असा. ७. [आपल्या] पालन-पोषणाच्या साधनासाठीं. ८. मेघपंक्ति. * आदि० अध्याय १९।२० महा.

हे पांडुनें कृतार्था स्त्री, जेंवि सुदक्षिणा[1] दिलीपानें. ४०
मजला पुत्रविनिर्जित राज्यफळाची स्पृहा नसे कांहीं,
मेघें मही निवाली इच्छील निवावया न सें[2]कांहीं. ४१
या श्वश्रूश्वशुरांच्या सेवेंत तपोवनीं गळो[3] गात्र,
पतिलोक प्राप्त असो, आहे हृदयांत काम हा मात्र. ४२
त्यजिल कसा निजधर्मा, भजत चि आली पृथा परतरा[4] ज्या?
धर्मीं बुद्धि असों दे, न करीं आग्रह वृथा, परत राज्या! ४३
योगें हर्ष, वियोगें खेद, पळ[5] बरा नव्हे प्रजापाळीं[6];
समजावूनि वधूंतें, अनुजांतें, जा: नयें प्रजा पाळीं." ४४
धर्मासि न अनुमोदिति जे, त्यांची आप्तता वृथा, परं[7] ते:
यास्तव सुतस्नुषांच्या स्नेहें पद ही न ती पृथा परते. ४५
दिव्यां[8] पटां धरुनि, बहुमान न जाणों तिणें दिला जुनियां[9],
मातेसि 'धन्य!' म्हणती ते पुत्र युधिष्ठिरादि लाजुनियां. ४६
धृतराष्ट्र म्हणे स्त्रीला, "गांधारि! पृथेसि सांग जें विहित,
केलें माजें बहु, करि जीवाचें जपुनि आंग जेंवि हित. ४७
म्हण, 'या पुण्यश्लोका धर्माला पात्र; काननीं काय?'
'कां होमिती* सुतांचे व्यर्थ विरहपावकाननीं काय?' ४८
'सत्सुतराज्यसुख पहा: करुनि सुतीर्थें, व्रतें हि, दे दानें;
भवनीं न, वनीं च सुकृत, हें तों कथिलें नसे चि वेदानें. ४९
भीतां अभय, क्षुधितां अन्न, अनाच्छादितांस दे वासें[10];
वेड्ये! सर्व तपाहुनि हें चि करिल सुप्रसन्न देवास.'" ५०
एवं धृतराष्ट्राच्या, गांधारीच्या हि, घे नें[11] उक्तिस ती;

१. ही दिलीपराजाची पत्नी. २. वरून पाणी शिंपडण्यानें. ३. माझें शरीर पतन पावो. ४. अधिक श्रेष्ठ अशा (धर्माला). ५. क्षणभर देखील. ६. राजाचे ठायीं. ७. शत्रु–पंत. ८. [मोक्षरूपी] तेजस्वी वस्त्राला. ९. [संसाररूपी] जुनेराला. १०. वस्त्र. ११. ऐकेना. * 'होमिसी' असा पाठ असता तर बरा काय?

[1]कीं, गुरु मेघ, निवृत्ति स्वाती, वाग्वृष्टि, रत्नशुक्ति सती. ५१
स्तविति पृथेसि, गुरुवचन केवळ चि अनादरी, तथापि कवी:
सस्यांसि[2] सुवृष्टि जसी, सुयशासि तसी तिची कथा पिकवी.
गुरुतें, गांधारीतें, कुंतीतें, नमुनि परतला धर्म:
गुरुजनचरणवियोगें संसारीं त्यासि नाढळे शर्म. ५३
कृष्णादि पांडवांच्या विकळा सकळा हि जाहल्या भार्या;
कीं, नव्हती मातेची स्मृति होऊं देत ती पृथा आर्या. ५४
राजर्षि कुरुक्षेत्रीं होता नामें प्रसिद्ध शतयूप[3],
त्याच्या सदाश्रमीं तो विदुरमतेंकरुनि राहिला भूप. ५५
तेथें धृतराष्ट्राला भेटे येऊनि नारद, व्यास,
ज्यांचे श्रीचरण सदा निर्भय आधार सर्व भव्यास. ५६
नारद म्हणे, " नृपा ! या शतयूपाचा महातपा आजा,
नामें सहस्रचित्त्य स्थानीं या सिद्धि पावला राजा. ५७
येथें चि नर्मदाप्रिय पुरुकुत्सनृपति[4] तपोनि धीरा ज्या
सिद्धि असुलभा, पावे अविलंबें तो तपोनिधी राज्या ! ५८
या च वनीं शशलोमा[5] तपुनि स्वर्गासि पावला आहे:
द्वैपायनप्रसादें[6] देइल तुजला हि सुगति भू बा ! हे. ५९
पुरुषासि[7] पटु तपाचा, शिखिचा वंशासि, ताप उजराया,
शतमखसमीपवर्ती पांडु स्मरतो सदैव तुज, राया ! ६०
जीचा जीव न तुमचा विरह, जसा वायुचा अनळ, साहे,
जपुनि तुम्हां दोघांचो शुश्रूषा करितसे अनळसा हे. ६१

१. कारण, गुरुजन जे धृतराष्ट्रगांधारी हे च मेघ, [कुंतीला] परतविणे हे च स्वातीनक्षत्र, [धृतराष्ट्रगांधारींचे तद्विषयक] भाषण हो च वृष्टि; [परंतु] सती (कुंती) [ही मात्र] रत्नशुक्ति, (स्वातीनक्षत्राचे उदक वाया न दवडणारी मुक्ता-शुक्ति नव्हे, तर जणूं काय रत्नाची च शिंप अशी होती). २. पिकास. ३. केकय देशाचा राजा. ४. मांधाता राजाचा पुत्र. ५. एक राजर्षि. ६. व्यासकृपेनें. ७. अन्वयार्थ:-[जसा] शिखिचा (अग्नीचा) ताप वंशासि (वेळूला, बांबूला) उजराया (नीट-सरळ-करण्याला) पटु (समर्थ) [तसा] पुरुषासि उजराया तपाचा ताप पटु.

पावेल पृथा पतिच्या लोका, जसि मंडपा लता पावे,
गुरुदास्यतपस्तेजें, काय इतर? अंडपाल[1] तापावे. ६२
करिल प्रवेश धर्मीं[2] सर्वजगन्मान्य हा कवि, दुरापें
इतरांस जीं यशें, तीं येती मारीत हाक विदुरापें[3]." ६३
मग शतयूपासि वदे, "तव चित्त 'स्तुति' असें म्हणेना कीं?
'केव्हां येइल केकयपति,' यापरि हरि सदा म्हणे नाकीं[4]."
शतयूप म्हणे, 'स्वामी! आम्हीं तव पादसारसां गावें,
द्रुहिणें[5] वेदें जैसें, बा! त्वां तैसें चि सार सांगावें.. ६५
कोणा लोकास, कधीं, हा नृप पावेल? वद मुनिवरा! हें;
कीं[6], उद्धरिजेल मही इतरें अति अहित न दमुनि वराहें.' ६६
नारद म्हणे, "नृपाळा! आहे आयुष्य तीन हायन[8] या,
याच्या क्रिया विलोकुनि, म्हणतिल पंकप्रसूति[9] 'हाय!' नया.
ईश्वरमित्रपुरीतें[10] पावेल, म्हणति कवी जिला 'अलका,'
अमरावतीहुनि तिळ हि बहुमान जिचा नृपा! नसे हलका.
करुनि प्रवेश शिवसखसत्कृत हा हर्षवील अलकेला;
कीं, येणें आत्मा शुचि सुतपें, काढुनि पापसल[11], केला. ६९
गंधर्वदेवराक्षसलोकीं, अर्कप्रभा[12] वरविमाना
पावुनि, मिरवेल; करिल या पात्र तपःप्रभाव रविमाना[13]." ७०
या मुनिवाणी देती बहु धृतराष्ट्रादि तापसां हर्षा,
जेंवि मयूरांसि वनीं ग्रीष्मांतीं करुनि गर्जना वर्षा[14]. ७१

---

१. ब्रह्मांडपालक प्रजापतिप्रमुख–**पंत.** २. धर्मराजाच्या शरीरात. ३. विदुरापाशीं. ४. भावार्थ:–हे शतयूपा! जर मीं तुला असें सांगितलें कीं, स्वर्गात इंद्र तू कधीं येशील याची अत्यंत उत्सुकतेनें वाट पहात आहे, तर त्या भाषणाला तू तोंडपुजेपणा म्हणणार नाहींस ना? ५. ब्रह्मदेवानें वेदरूपानें जसें सार सांगितलें. ६. अन्वय:–कीं, इतरें वराहें अति अहित दमुनि (असंख्य शत्रूंचे दमन करून) मही न उद्धरिजेल. ७. अद्भुतज्ञान तूं चि–**पंत.** (भावार्थ). ८. वर्षे. ९. चिखलाचें उत्पत्तिस्थान अशा नद्या. १०. शिवमित्र कुबेराच्या राजधानीला. ११. पापरूपी शल्य. १२. सूर्यासारख्या तेजस्वी. १३. रवीच्या मान्यतेप्रत. १४. वर्षाऋतु; पावसाळा.

# अध्याय चवथा.

पांडव, पौर हि म्हणती, 'नृप, विदुर कसे वनांत वसतील,
न कळे, देवी[1] कैशा सांप्रत पर्णालयांत असतील. १
आंधीं[2] वनीं असे ज्या, त्याचा करिती च मग निभाव सवे,
आतप[3]हिमवृष्टिसहा तापसदेहा चि नग[4]निभा वसवे.' २
हुरहुर मन करि, न सुचे कार्य, शुकाचें हि किमपि न वच रुचे.
ज्वरितां पर्युषिता[5]चे लागति, तैसे चि कवळ नव[6]चरुचे. ३
लोभ्यानें निधि, कीं तो शूरें उजवा चि बाहु हारविला,
गुरुविरहाधि न धर्मा लागे, त्या स्पष्ट राहु हा रविला. ४
बहु चटपट धर्माला लागे, सहदेव इंगितें समजे;
समजतिल अत्यसुख तें, असतिल गुरुभक्त बुध तयासम जे.
सहदेव म्हणे, 'जावूं, पाहूं, आहे वनांत आइ कसी;
घन जेंवि चातकाचें, तूं प्रणतप्रार्थनोक्त आइकसी.' ६
कृष्णा हि म्हणे, 'चाला; या स्ववधूधेनु वारिवारि[7] घाला;
आम्हांत, ईश्वरा[8]! हा यांकरवीं ताप[9] वारिव, रिघाला. ७
वसले या वंशींचे नृप विपिनीं, जे शरण्य वासवसे,
हें[10] दुःख, अंध हतसुत, अंगीकारुनि अरण्यवास वसे.' ८
अंतःपुरजन, पुरजन म्हणती, 'देवा! मनास यो, जावें;'
नृप सचिवांसि म्हणे, 'बळ सत्वर जाया वनास योजावें.' ९

---

१. गांधारी व कुंती. २. ज्याला पूर्वीपासून वनांत रहाण्याची सवय आहे त्याचा त्या सवयीमुळें वनांत निभाव लागतो. ३. ऊन, थंडी व पाऊस सहन करणाऱ्या. ४. अचल वृक्षासारख्या. ५. शिळ्या; आदले दिवशीच्या. ६. ताज्या, ऊन भातीचे. ७. पाणवठ्याला न्या; तृषाशांत अशा करा. ८. आमच्या मध्यांत उत्पन्न झालेला हा खेद. ९. धर्मादींच्या हातून निवारण करीव. १०. ही गोष्ट अत्यंत दुःखदायक आहे.

धौम्ययुयुत्सुशिरीं दे राज्याचा सर्व ही भर भरतसा;
जाय गुरुकडे, डोहाप्रति गजयूथप जसा भरभर तसा. १०
पंच दिन क्रमुनि पथीं, ताताच्या आश्रमासि तो पावे,
'आधीं गुरुचरणांवरि मस्तक,' जन सर्व म्हणति, 'ओपावे.'
जाणों म्हणे खगरवें[1] त्यां, 'तुमचा पंक[2] धुविन या,' वन तें;
केला प्रवेश धर्में जनसह पार्थी च सुविनयावनतें[3]. १२
राजा बहुत गडबडे, आश्रमपद पाहतां चि ओसाड,
गुरुचिंताग्निपुढें किति? इतराधिघुणासि होय तो साड[4]. १३
विधुला राहु तसा, त्या ग्रासाया गुरुवियोगताप सजे;
नृप त्यांसि पुसे, आले देखाया आपणासि तापस जे. १४
मुनि वदले, 'यमुनेतें गेला आणावया फुलें, पाणी;
यष्टि नया गांधारी झाली, तिस ती हि पांडुची राणी.' १५
ऐकुनि, धरिता झाला त्या यमुनेच्या चि धर्म वाटेतें;
उचित अनुचित हि तैशा त्या तदवस्थेंत कर्म वाटे तें[5]. १६
घे धांव, देवदेवी दिसतां, सहदेव, जेंवि तान्हा तो,
ज्याचा उर अश्रुभरें खातां, पीतां हि, जेवितां, न्हातो. १७
न वियोगीं विषय रुचे सहदेवा, जेंवि पाडसा[6] चारा;
त्याच्या याच्या प्रेमा सुज्ञमतें एक पांड[7] साचारा. १८
रडला सहदेव, पृथाचरणावरि निपट[8] बाळसा पडला;
वाटे तीस हि चिंतामणि, हरपुनि सुचिरकाळ, सांपडला. १९
प्रियपुत्रातें भेटुनि, रडुनि म्हणे, 'मांडवास जा, वेला!'

१. पक्ष्याच्या शब्दांच्या मिषानें. २. मळ, पाप. ३. अत्यन विनयानें नम्र झालेला. ४. इतर चिंतारूप भोग्याला तो धर्मराजा लाकडाच्या नागामारखा होता. (लाकडाच्या गाभ्याला किडांचें भय नसतें; परन्तु वडिलांविषयींच्या चिंतारूप अग्नीपुढें त्याचें काय चालणार?). ५. तें धृतराष्ट्रांचें करणें त्याला एका प्रकारें योग्य, पण एका दृष्टीनें अयोग्य हि वाटलें. ६. बरोबरी. ७. अगदीं. ८. मोठा दीर्घायुषी हो.

पुसतां कळवि सगद्गदवाचेनें पांडवास[1] जावेला. २०
माथां कलश पृथेच्या, दों स्कंधांउपरि हात दोघांचे;
देह तिघांचे हि सखे,[2] ग्रीष्मींच्या सिंधु ज्या, तदोघांचे. २१
पाहुनि तसी अवस्था, मूर्छा पावुनि, पदापुढें पडले,
ते धर्म, भीम, अर्जुन, नकुळ, नमुनि, 'हाय!' म्हणुनियां, रडले.
आलिंगिले तिघांहीं, शब्दें, स्पर्शें हि, ते नृपा कळले;
पुण्यमयतदंगमळें पुत्र महाभाग पांच ही मळले. २३
धर्मादि त्यां तिघांचे उतरुनि, घेती शिरीं घट तिघे ते;
बहु शोभेल न ऐसें, जे मुकुटांचे[3] वृथा नटति घेते. २४
त्यां करद शत्रु झाले, दोघे दोघांस पुत्र जे करद[4]:
गुरुभक्तां बाधा दे स्वप्नीं हि न अंतराय[5] एकरद.[6] २५
'लागत नव्हता व्यंजनावांचुनियां' म्हणति पौर, 'वारा ज्या,
त्या बाधे आतपहिमवृष्टिमहावात पौरवा राज्या.' २६
भेटे सुनांसि कुंती, गांधारी, जेंवि माय लेंकींतें,
तेव्हांचें सुख त्यांचें ब्रह्मांडांत हि न मायलें कीं तें. २७
ज्यां ज्यां देता झाला, होवूनि तपोवनस्थ, विरहातें,
*त्यां त्यां कुरवाळुनि, करि तो बहुसुखभाजन[7] स्थविर,[8] हातें.
नमितां, त्यांचें कळवी स्वपित्याला नामगोत्र अनरातीं[9];
मन रातीं हि तयाचें जनचिंतेंत चि; सुबुद्धि न नरा[10] तीं. २९
सर्वस्वजनसमागम होतां दैवेंकरूनि सुलभ वनीं,
वाटे नृपासि, 'आपण आहें होतों तसा चि कुलभवनीं.[11]' ३०

---

१. एकेका पांडवाचें नांव घेऊन गांधारीला ते आल्याचें तिनें कळविलें. २. उन्हाळ्यांतील नद्यांच्या प्रवाहाच्या जोडांचे म्हणजे कृश. ३. मुकुट धारण करणारे. ४. ज्या दोघां पुत्रांनीं दोघांना हात दिले त्या पुत्रांना शत्रु करभार देणारे झाले होते. ५. विघ्न. ६. विघ्ननाशन गणपति. ७. अत्यंत सुखाला पात्र. ८. वृद्ध धृतराष्ट्र. ९. अजातशत्रु धर्मराज. १०. इतर पुरुषाला. ११. आपल्या वडिलोपार्जित घरांत (राजवाड्यांत). * मूळांत 'त्या त्या' असे आहे; पण तो हस्तदोष होय.

सर्वांस हि कुशळ पुसे, बोले, जें त्या श्रमीं तयांस हित,
जावुनि बसला राजा व्यासात्मज आश्रमीं तयांसहित. ३१
तेथें आले तापस, पाप सकळ ज्यांसि पाहतां चि सरे,
त्यांचें ही पातें, त्या साधूंतें देखतां, लेवों विसरे. ३२
साधुनि जयांसि चिंतित अर्थ भगवदंघ्रिकंजयव देतो,
तद्रूपलक्षण पुसति तापस जे, त्यांसि संजय वदे तो. ३३
नृपति म्हणे, 'बा! केली कुंती त्वां सुप्रजा, वना येणें
जालें ज्या सुप्रेमें करिसी कीं सुप्रजावना येणें?' ३४
धर्म म्हणे, 'आहे, जो केला त्वां सदुपदेश, तो कानीं;
आम्हीं वरिला, जैसा गोपांच्या यदुपदेश तो कानीं. ३५
स्मरत नसे कीं, करितां तप, दुःख तुला अनंत राया! तें?
पावेल कीं पृथा गुरुगतितें, ती ही अनंतरायातें? ३६
सर्वांसि पाहतों मीं, परि कां एका चि न विदुरा पाहें?
आश्रमपद पावावें तेणें द्युति नित्य नवि दुरापा हें.' ३७
भूप म्हणे, "कुशळ असे विदुर, वनीं तापसांसि आढळतो,
घोर तप अनशनव्रत करितो, बहु ज्यांत करुनि 'आ' ढळतो.
कविस रुचे, घालावें विषयसुख, करूनि घोर तप, डावें;
मूढासि आवडे बहु, जेउनि, सस्त्रीक घोरत पडावें. ३९
सुतपीं धरूनि, झाला आहे तो धमनिसंतत, रतीतें,

१. डोळ्याच्या पापण्या उघडझाक करावयाचें विसरल्या. २. भगवान् श्रीकृष्णाच्या अंगुष्ठकमलाचा लेश. ३. त्यांचें स्वरूप आणि खाणाखुणा. ४. श्रीकृष्ण. ५. गति ही अविघ्नातें पावेल की—**पंत.** ६. शोभा. ७. दुर्लभ अशी. ८. पुष्कळ लोक ज्या व्रतापासून आ करून (आश्चर्य पावून) ढळतात. ९. विषय-सुखाचा अव्हेर करावा. १०. ज्याच्या सर्व शिरा शरीरावर पसरलेल्या स्पष्ट दिसत आहेत असा, अथवा 'धमनि संतत' अशीं वेगवेगळीं पदें घेतल्यास, सुतपाचे ठायीं आवड धरून ह्या एकसारखा त्या तपोग्नीला प्रज्वलित करणारी फुंकणी च झाला आहे, असा अर्थ.

जाणे रहस्य, ज्याचा लाउनि शोध मनिं संत तरती, तें." ४०
स्मरण असें करितां चि श्रीदत्तात्रेयसा चि तो आला,
धर्मातें अवलोकुनि, बहु जन पाहूनि, परतता झाला. ४१
धर्म द्रुततर मागें धावुनियां, त्या सदेकनिष्ठातें,
[1]साधुगुणज्येष्ठातें, स्वपित्यातें, तो वदे, [2]कनिष्ठातेंः- ४२
'ताता ! मी, कुंतीचा ज्येष्ठ तनुज, लाडका तुजा आहें,
बा ! हें निष्ठुरपण कां ? [3]ठाक उभा; बोल; मजकडे पाहें.' ४३
दूर वनीं जाउनि तो, ओठंगुनि तरुसि, बैसला [4]क्षत्ता,
सुकृश, मलिन, [5]वीटामुख, योगित्वें परममान्य जो दत्ता., ४४
धांवत धांवत जाउनि, धर्म प्रभु त्यापुढें उभा राहे;
कवि नयनें नयनासीं मेळउनि सुताननाकडे पाहे. ४५
त्या पाहण्यांत नेत्रद्वारें धर्मीं प्रवेशला तूर्ण,
वाटे युधिष्ठिराला, 'झालों ज्ञानें, सुखें, बळें पूर्ण.' ४६
स्मरला व्यासमुनिकथित [6]निजजन्म महामना तदा हा तें;
मग त्या कळेवराच्या जों तो योजी मनांत दाहातें, ४७
तों होय [8]नभोवाणी, "त्वां न म्हणावें चि मानदा ! 'हा ! हा !'
यतिधर्मपात्र झाला, समुचित कविकाय बा ! न दाहा हा."४८
खोक्कीस मान देउनि, कविचा तैसा चि काय सोडूनीं,
परतोनि धर्म आला, जोडायाची सुकीर्ति जोडूनीं. ४९
'शिरला आत्मशरीरीं नेत्रद्वारा, त्यजूनि काय, कवी,'
हे वृत्त आश्रमीं त्या, धृतराष्ट्रा, भ्रातयां हि, आयकवी. ५०
सर्व सविस्मय 'जय ! जय !' वदले, आला तयांसि कांटा हो !
धर्मघन पूर्ण होतां, श्रितमोरांला सुचे न कां टाहो ? ५१
सर्वांसि अतिथिभावें त्या दिवसीं भूप अन्न दे [9]वंन्य;

---

१. साधुगुणामुळे ज्येष्ठत्व पावलेल्या. २. वयानें कनिष्ठ अशा चुलत्याला. ३. टेकून: ४. विदुर. ५. तोंडांत लांकडाचा तुकडा धरणारा. ६. आपण व विदुर यमधर्मांशज आहोंत ही हकीकत. ७. झालेला. ८. आकाशवाणीला. ९. कंदफळें.

त्यातें सेवुनि, मानिति धर्मादि समस्त आपणा धन्य. ५२
रात्रौ पांच हि निजले कुंतीच्या भोंवते महीवरते;
पर्यंकीं ही न कधीं तैसें सुख पावले महीवर ते. ५३
दुसरे दिवसीं पूजी, होते त्या आश्रमांत तापस जे;
ते वदति, 'असा चि रघुप सर्व हराया तपस्वितापस जे.'
हेमरजतताम्रमयें, कीं पात्रें कार्य आयसें होतें,
मृत्कांष्ठतृणमयें कीं, दे तैसें, नवल कायसें हो! तें? ५५
व्हावें चीर अजिन, ज्या वल्कल, तैसें चि कांबळें, दे हा;
द्यावा सुविरक्तांच्या अनभिमतें ताप कां बळें देहा? ५६
अनुसरले 'संतोषं जनये'दित्यादि सदुपदेशाला,
त्यांसि स्वोचितवस्त्रें, व्हाया संतुष्ट यदुप, दे शाला. ५७
होता सानुज शिबिरीं स्वव्यवहारेंकरूनि, मग राजा;
ताताज्ञा ऐसी कीं, 'यावन्निजतोष वसुनि, नगरा जा.' ५८
कळलें करणार पितर उग्र तपोग्नींत कायहोमास;
जरि एक तयानिकट क्रमिला, तरि अधिक काय हो! मास?
दर्शन घ्यावें; वंदुनि नित्य रहावें उभें तदाज्ञा त्या,
बसाया बोलाया, जाया, लागे नृपा तदा ज्ञात्या. ६०
मासानंतर तेथें सुदिनीं द्विजपाल पातला व्यास;
कीं, शोकश्येन न करु त्या दीना व्यसनपात लाव्यास. ६१

१. अन्वयार्थः—हेमरजतताम्रमयें (सोनें, रुपें व तांबें ह्यांच्या) कीं आयसें (लोखंडाच्या) कीं मृत्काष्ठतृणमयें हीं (मातीं, लाकड व गवत यांचीं हि) पात्रें [त्या तपस्व्यांना जसें] कार्य (जरूर) होतें तैसें [धर्मराज] दे. हो! तें नवल कायसें? गवताचीं पात्रें=वल्कलें (?). २. वस्त्र. ३. ज्या वस्तूंची इच्छा नाहीं अशा वस्तु देण्यानें. ४. [प्राज्ञानें] संतोष उत्पन्न करावा. ५. मखाला. (श म्ह० सुख). ६. आपलें नित्याचें आह्निक आटोपून. ७. आपल्याला संतोष वाटेपर्यंत. ८. दुःखरूपी पक्षिरीससाणा. ९. धृतराष्ट्ररूपी लावापक्ष्याला. * येथें 'काष्ट' असा हस्तदोष झाला आहे.

नारद, पर्वत, देवल, तुंबरु इत्यादि आश्रमीं आले,
ताताज्ञेनें धर्में ते प्रेमें पूजिले, सुखें धाले. ६२
व्यासाज्ञेनें तत्सुत, पांडव, सर्वा हि त्या वधू बसल्या;
श्वशुराश्रमांत गमल्या कीं देवी नंदनीं वनीं वसल्या. ६३
व्यास म्हणे, 'त्यजुनि नवा, जीर्णा मलिना शिवे कवण वासा?
अघ जाळाया झाला कीं दीप्त तपें विवेक वणवासा? ६४
पांडुसुतांचा ठायीं क्षोभ नसे कीं तुझा नृपा! आतां?
लागति गोड तनुजगुण, पुत्रा! किंवा मुकुंदगुण, गातां? ६५
शोकमळें न मळावें, अंतर्बाह्य स्वपाप, सुतपातें,
विदुरें जिंतिलें तैसें त्वां हि जितावें करूनि सुतपातें. ६६
धर्म विदुरः विदुर अनरिः मद्वचनें जाण बा! सनातन या;
याच्या स्मरणें हि सदा वाढाव्या पुण्यवासना तनया! ६७
मांडव्यें, सुतपोव्यय करुनि, दिला ज्या सनातना शाप;
तो हा यमधर्म प्रभु, ज्याच्या स्मरणें जळे महापाप. ६८
ब्रह्मवर्चें, स्वबळें हा, केला उत्पन्न, अष्टयाम हि म्यां
चिंता वाहुनि, व्हाया पात्र, न पावोनि कष्ट, या महिम्या. ६९
श्रेय तुझें हि कराया आलों मीं वरद आज, यामागें
कोणी ऋषिनें कोणां न दिलें, तें इष्ट राजया! मागें. ७०
तूं, त्वद्भार्या, कुंती, कृष्णादि तव स्नुषा समग्रा वा,
मागा; चिंतामणि हो जात्या, न गुणें, परासम ग्रावा. ७१
हे गंधर्व, महर्षी, सुर, होउत हर्षमत्त पाहून;
मानूत मनीं केवळ तुच्छ अमृतवर्ष मत्तपाहून.' ७२

---

१. देवांगना. २. वस्त्राला. ३. पुत्राच्या मरणामुळें उत्पन्न झालेल्या शोकरूपी मळानें [त्वां] न मळावें. ४. यमधर्म तो च विदुर, अर्थात् विदुर तो च धर्मराजा. ५. पुराणपुरुष. (यमधर्म). ६. आदि० अ० १५१५९ ते ७८ पहा. ७. मांडव्यें ब्राह्मणाच्या शापवचनानें. ८. अष्टौप्रहर, सतत. ९. चिंतामणि जातीनें पाषाण-परा पाषाणासम हो, गुणेंकरून अन्यपाषाणसम न होय–पंत.

धृतराष्ट्र म्हणे, 'ताता! झालों विश्वांत आजि मीं धन्य
हा चि अनुग्रह दुर्लभ, याहुनि बहु काय मागणें अन्य? ७३
वदलासि तूं वचन शुचि, सत्य, श्रितसर्वजनसुरद्रो! हें;
माजें या साधूंच्या पुत्रकृतें फाटतें उर द्रोहें. ७४
मारविले बहु, पडलें मंदिर कोणा न ओस रायाचें?
जन्मांतरीं हि हें या न मनांतुनि दुःख ओ[1]सरायाचें. ७५
मारविला म्यां सतनय वृद्ध महाराज बाह्लिक रणांत,
तात[2] हि, गुरु[3] हि, न[4] ज्यांच्या तेज वयाचें शतांश करणांत. ७६
इत्यादि शोक होतो आठवितां नित्य हीं नव, शमेना;
शांति मतीस, कराया तनयोसि जसी शके न वश मेना[5].' ७७
ज्येष्ठस्नुषा[6] म्हणे, "हें पुत्रवियोगास वर्ष सोळावें,
रात्रिभरि नृपें शयनीं या कुशिचें त्या कुशीस लोळावें. ७८
शय्येंत तसा, ग्रीष्मीं तळमळतो काय जेंवि रेतींत,
वाटे सुतस्मृति नदी, मन ढेंकुळ काय जें विरे तींत. ७९
यास्तव ज्यां देखाया नृप इच्छितसे, तयांसि दाखीव;
सदया! सुता[7] सुतप्ता हस्तींचें[8] अमृत लेश चाखीव. ८०
स्वतपें समर्थ अससी तूं विश्व असें नवें चि निर्मोया,
काय तुला लोकांतरगत दावाया अशक्य निर्मोया[9]!? ८१
हे हि हतज्ञातिसुता कृष्णा, मीं जेंवि काय शोचितसें,
प्रभुजी! हें दुःख जसें, दग्ध करीना चि काय शोचि[10] तसें. ८२

१. कर्मी व्हावयाचें. २. भीष्म. ३. द्रोण. ४. ज्याच्या करणात ( इंद्रियात ) वयाचें ( तारुण्याचें ) शतांश [हि] तेज न, असे (गलितगात्र). ५. हिमाचलस्त्री–पंत. ( शंकर पति मिळावा म्हणून पार्वती तप करीत असतां, 'असें करूं नको' म्हणून तिच्या आईनें तिला पुष्कळ सांगितलें, तरी त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं, ह्या कथाभागावर येथें कविकटाक्ष आहे). ६. गांधारी. ७. [ आपल्या ] पुत्राला, धृतराष्ट्राला. ८. हस्तनक्षत्राचें उदक. (हें निरोगी व पुरवठ्याचें असतें). ९. मोहविकाररहित अशा! १०. अग्निज्वाळा–पंत.

सर्वा स्नुषांत दयिता[1] कृष्णा गुरुजनमनें धरुनि आहे.
तव सुप्रसाद मुदिरा[2]! इच्छितसे चातकी, करुनि 'आ,' हे.
ऐसी च हे सुभद्रा पुत्रवधें न सुख तापली लाहे;
बाधा इची च गुरु, बा! 'निपट लघु' म्हणेल आपली लाहे[3].
भूरिश्रवःप्रिया[4] हे, दुःख इला जें, दर्वी नवलतेतें,
तव यश पिवुनि, म्हणुत, जे अमृतस्तविते, 'नव्हे नवल' ते तें.
पुत्रासि दिले होते जे शत सुत, या समग्र तज्जाया
इच्छिति तव प्रसादा; मीनी[5] डोहासि जेंवि मज्जाया. ८६
अनुभविलें शत हर्षद, शत शोकद तें चि आर्तव[6] मनानें,
होतो अभोजनें जन न तसा, बहु जेंवि आर्त[7] वमनानें. ८७
'मामाजी! न सुतविरह हा हे साहेल गद नवा[8] सून;
दावा कर्ण मज,' असें विनवी कुंती हि वदन वासून[9]. ८८
व्यास म्हणे, "गांधारि! स्वप्नसम वियोगदुःख लेखाल,
सर्वा स्त्रिया तुम्हीं या प्रभुसह सर्वां मृतांसि देखाल. ८९
अवतरले होते मुनिराक्षसदेवासुरादि जे आर्य,
ते स्वस्थाना गेले संपादुनि कीर्ति करुनि सुरकार्य. ९०
गंधर्वराज[10] तव पति, याचें पहिलें हि हें चि नाम असे,
पांडु मरुद्गणज म्हणे, 'रिपु वधुनि करीं[11] यशः प्रकाम[12] असे!' ९१
तो विदुर, हा युधिष्ठिर, धर्माचे अंश साध्वि! हे दोघे,
कळि दुर्योधन, शकुनि द्वापर, लोकांत 'फट[13]' म्हणुनि जो घे.

१. आवडती. २. हे मेघा! ३. लाही. ४. सोमदत्ताची सून. ५. मासोळ्या. ६. ऋतु—पंत. अन्वयार्थः—[पूर्वी जे] आर्तवशत (पतिसमागमास योग्य अशा ऋतुकालांचें शत) हर्षद अनुभविलें ते चि आर्तवशत [सांप्रत] शोकद [अनुभवित आहेत]. ७. एकादें सुख मुळीं च प्राप्त न झालेलें बरें; पण प्राप्त होऊन त्यांत व्यत्यय येणें हे अधिक दुःखास्पद होय, असा भावार्थ. ८. पुत्रविरहरूपी नवा रोग. ९. तोंड पसरून; दीनवाणीनें. १०. धृतराष्ट्रनामक गंधर्व. ११. अत्यंत यश मिळीव. १२. खड्गसंबोधन—पंत. १३. 'छीः थू' करून घे.

सानुज, ससुत, सुयोधन, तन्मातुळ शकुनि, अन्य ही राजे
आले, लाजविते निजसुहृढत्वें सुखनिजन्यहीरा[1] जे. ९
जलसंध[2], जयद्रथ, भगदत्त, ससुतपौत्र बाह्लिक, ज्ञाती
आले सर्व, रणकथा जी जी, वाटे मृषा चि अशा ती. १०
धृतराष्ट्रासि दिलो त्या सर्वांतें दिव्यदृष्टि देखाया,
अमृतप्रदा म्हणावें नलगे, 'रसना मुखांत दे खाया.' ११
दिव्यज्ञानबळें ती गांधारी ही सुतादिकां पाहे,
पावे तत्साधुत्वें सात्विकभावेंकरूनि कांपा हे. १२
ते संपन्न समस्त हि पहिले होते तसे चि सर्वगुणें;
मत्सरवैरक्रोधाहंकार नसे, तयांत हें च उणें. १३
भेटुनि पितरांचें मन केलें परम प्रहृष्ट तनयशतें,
श्रीव्यासाचें एकें वदनें गाईल काय जन यश तें? १४
भेटे सखा सख्याला हर्षे, भ्राता हि हर्षद भ्रात्याः
प्रेमाश्रुवृष्टि त्यांच्या बहु लज्जित करिति वर्षदभ्रा[3] त्या. १५
देतो स्त्रियांसि सुख पति, जाउनि, येऊनि, जें विदेशाला.
श्रीमुनिकरुणा, चिंतामणिरचिता सर्द जेंवि दे शाला. १६
भेटे भ्रात्यांसि महाशोकीं तारावयासि तो कर्णः
अभिमन्यु गमे आला भेटुनि वारावयासि तो कर्ण[4]. १७
स्वप्न चि मानी कृष्णा शोकें, विसरुनि सुखें, वदे 'हा!' तें;
पंचप्राण तसे सुत जेव्हां देती सुखेंव[5] देहातें. १८
भेटुनि सुतासि झाली पार्थाची साश्रु यादवी रमणी,
अंकीं घेतां, वाटे ती सरसी[6], तो हि याद वीरमणी. १९
आलि म्हणे, "गे कुमुदिनि! वैराटि! कलाप[7] हा सुखेंव, दया
करुनीं, द्याया येतो, वैरा[8] टिकला, पहा, सुखें वद, 'या.'" २०

---

१. उत्तम खाणींतून निघालेल्या हिऱ्यालां. २. धृतराष्ट्रपुत्र. ३. वृष्टि करणाऱ्या मेघास. ४. पुत्रकर्तव्यरूपी ऋण. ५. दृढ आलिंगन. ६. सरोवर. ७. चंद्र. ८. हा युद्धांत वांचला.

कुरुदार ललाटाहीं धरिति बहु नवि प्रभा सतिलकांहीं,
मंत्रविरहितमुखांहीं सुंदर हि न विप्र भासतिल कांहीं. २१
सर्व स्त्रीजन पतिनीं प्रेमें भेटोनि सुखविला साचा.
केला सफळ मनोरथ, होता जो वंध्य सुखविलासाचा. २२
ऐसे प्रिय भेटविले, जे जे ज्याहीं मनांत आठविले,
प्रातःकाळीं मुनिनें त्या त्या लोकासि सर्व पाठविले. २३
जालें तसें स्त्रियांला पति जातां दुःख, जेंवि वाढविलीं
सहसा सदन्नपात्रें, तृप्ति न होतां, पुढोनि काढविलीं! २४
त्यांसि मुनि म्हणे, "मुलि हो! घालील सरांत याद, या, गे! हा.
तप दुःखितावनार्थ चि घडलें, न स्वार्थ, या [1]दयागेहा. २५
तुमच्या पतिलोकाप्रति पाठवितों मीं तुम्हांसि; या, गे! या.
होतिल, ज्या साधुसभा, त्यांत कथा सत्कर्मांसि या [2]गेया. २६
म्हणतों, 'वेचेल सुतप, वेचो, परि सर्व धन्य मज्जन हो.'
साधन दुर्घट नाहीं, एक करा सुरनदींत मज्जन हो!" २७
श्वशुरातें जोडुनि कर, म्हणती, 'देतो [3]सुनाकदान मुनी;
सुखिता होतिल, पुनरपि या चरणा या सुना कदा नमुनीं?' २८
वंदुनि गांधारीतें, कुंतीतें, नारदादि सन्मुनितें,
नमिति [4]अनरिपदयुग, जें वंदावें लक्षदा हि जन्मुनि, तें. २९
[5]कृष्णादिकां स्त्रियांतें, रोमांचित करुनियां जनवपुस, त्या
निघतां जाल्या हर्षें, दावुनि अत्युत्सव स्व नव, पुसत्या. ३०
शिरल्या गंगेत, तयां पाहुनि, कोणी हि आलि न वदे 'हा!;'
स्नानीं च पावल्या त्या [6]अद्भुतलावण्यशालिनवदेहा. ३१

---

१. दयेच्या माहेरघराला. २. गाण्याला योग्य. ३. चागलें स्वर्गद्वार. ४. अजातशत्रु धर्माचें पदद्वय. ५. अन्वयार्थः--त्या (कौरवस्त्रिया) जनवपुस रोमांचित करुनिया निघतां स्व नव (अपूर्व) अत्युत्सव दावुनि कृष्णादिकां स्त्रियांतें हर्षें पुसत्या जाल्या. ६. अलौकिक सौंदर्यानें शोभणाऱ्या अशा नवीन दिव्य देहाप्रत.

त्या जेंवि [1]गोप्रतारीं केल्या श्रीराघवें प्रजा धन्या;
बैसुनियां सुविमानीं गेल्या स्वर्गासि, जेंवि सुरकन्या. ३२
लाभ [2]स्त्रीततिस तसा, रतिस जसा [3]कामपुरविलासाचा;
यापरि जो जो ज्याचा, तो प्रभुनें काम पुरविला साचा. ३३
ऐकुनि हें जनमेजय त्या वैशंपायना म्हणे, 'माजा
तात मला जरि दाविल, जो केला भस्म तक्षकें राजा, ३४
तरि मज अत्यद्भुत हें त्वत्कथित चरित्र सत्य वाटेल;
मृततातदर्शनें मम संशयशोकाब्धि सर्व आटेल. ३५
[4]भस्म खळतक्षकानें तनु केली, करुनि हानि, पण ज्याची,
त्या [5]स्वपित्याच्या पाहे कीर्ति करायासि हा निपणज्याची.' ३६
राजमनोरथ गुरुला त्या वैशंपायनें चि जाणविला;
व्यासें सिद्धिसि आज्ञा करुनि परीक्षिन्नृपाळ आणविला. ३७
जनमेजयासि त्याचा तात परीक्षिन्नरेंद्र भेटविला.
जेंवि घृतें वह्नि, तसा मुनिच्या सुतपें प्रताप पेटविला. ३८
सत्सुत वांटी पांटीभरि, द्यावी मुष्टि शर्करा ज्याला;
वदले कवि 'तम' दुःखा, सर्व जना 'पद्म,' 'अर्क' राज्याला. ३९
ऐसा मुनिप्रसादें जनमेजय भूप ही सुखी झाला.
होउनि कृतकृत्य, पुन्हां तो धृतराष्ट्र हि निजाश्रमा आला. ४०
व्यास म्हणे, "धृतराष्ट्रा ! पुत्रादि [6]जसे विलोकिले काय,
आहेत सुखी स्वर्गीं; त्यांच्या शोकें म्हणों नको 'हाय !' ४१
दे आज्ञा धर्माला धर्में सर्व प्रजांसि रक्षाया.
येऊनि मास अधिक चि झाला कीं स्वगुरुभक्तिदक्षा या." ४२
धृतराष्ट्र म्हणे, 'दिधलें पुत्रफळ तुवां चि सज्जना! सत्य;

१. सरयूनदींतील एका तीर्थांत. २. स्त्रियांच्या समुदायास. ३. मदनाच्या नगरींतील सुखोपभोगाचा. ४. अन्वयार्थः—पण खळतक्षकानें ज्याची तनु भस्म करुनि हानि केली, त्या स्वपित्याच्या निपणज्याची (व्यासाची) हा (जनमेजय) कीर्ति करायासि पाहे (कीर्ति वाढवूं इच्छितो). ५. व्यासाला. ६. ज्या काहीं स्थितींत.

मज भेटलासि, जेंवि च्यवना[1] गदशमनसज्ज नासत्य. ४३
कथिलें भीष्में कांहीं तुज रक्षाया महाभुजा ! महि, म्या;
जाणसि उपाय तूं हीं; बहुत चि गाती प्रजा तुज्या महिम्या.
होतो उपरोध[2] तपा; उरलें आयुष्य अल्प; नगरा जा;
हो गजपुरांत, झाला साकेतीं[3] जेंवि कल्पनग राजा.'[4] ४५
धर्म म्हणे, 'बा ! कोठें, कैसें, वातें त्यजूनि नभ जावें ?
जाणुनि धर्म, गुरुपदा कैसें, राज्या भजूनि, न भजावें ? ४६
जातिल सर्व हि: करितों करयुग जोडून, दास मीं नमनें.
बा ! इच्छीना, पंक हि उरतां, सोडूं नदास मीन मनें.' ४७
गांधारी त्यासि म्हणे, "'हूं' म्हण बा वासवप्रभा[5] ! वढिला;
कां सेवटील आज्ञा मोडिसि ? करिसी निजप्रभाव ढिला ?"
धर्म म्हणे कुंतीतें, "माते ! मत्तनु न तातपद सोडी.
सोसिल हें[6], पटलग्ना[7] जैसी हिम, वृष्टि, आतप, दसोडी[8]; ४९
ज्येष्ठपिता म्हणतो 'जा' मज गांधारी हि म्हणतसे 'जा च;'
दुःसह मुलिस जसे, मम मतिस श्रीभोग पण तसे जाच. ५०
राजाराज्ञी म्हणती, 'राज्य करा गजपुरांत, जा, वर्ता.'
परि मति तुझ्या पदाला सोडीना, जेंवि नाव आवर्ता[9]. ५१
काळें आप्तजन बहुत गिळिले: दुर्लभ मनुष्यजनु ठावें;
तप सुख वाटे: येथुनि सोडुनि तव पादपंकज नुठावें. ५२
एक श्रीकृष्णप्रभु आहे, निजवृष्णिचक्र[10] रक्षून;
धरिले या संसारीं म्यां प्राण तयासि मात्र लक्षून." ५३
सहदेव म्हणे, 'माते ! मीं त्वत्सेवा करीत राहेन;
पाहेन चकोर चरण[11]नखचंद्रातें; हिमाद्रि साहेन.' ५४

१. कथासदन मागें पृ० ५१६ टीप ६ वी पहा. २. अडचण; विघ्न. ३. अयोध्येंत. ४. श्रीरामचंद्र. ५. इंद्रासारखें तेज ज्याचें अशा! ६. माझी तनु. ७. वस्त्रास जडलेली. ८. दशा. ९. भोवऱ्याला. १०. यादवकुल. ११. चरणनखाला चंद्राची उपमा देण्याचा कविसंप्रदाय आहे.

कुंती म्हणे, 'तपा तूं ज्ञाता करितोसि अंतरायातें:
जें प्रियसान्निध्य, करी नियमाचा स्पष्ट अंत राया! तें. ५५
विघ्न तपस्विजनाच्या बांधों देति न तपासि कांवि राजे.
त्यांच्या सत्कीर्तिपुढें शतयज्ञाची[2] हि कीर्ति न विराजे. ५६
निजमातेच्या चि कसा विघ्न कराया तपा पहातोस?
त्यजुनि प्रजावनातें, नसतां मत्तोष, कां रहातोस? ५७
वत्सा! सहदेवा! तुज घडली सेवा, असी न इतरांतें.
मज चि न, आनंदविलें त्वां त्यां स्वर्गस्थितां हि पितरांतें. ५८
[3]पांडु युधिष्ठिरः याची सेवा करिसील, होय हे माद्रीः
धर्माज्ञा जी, ती मीं; येणें होइल निवास हेमाद्री. ५९
स्नेहें चळेन सुतपोयोगापासून मीं, सुता! पाहें.
पहिलें तसें चि होइल पात्र मम हृदय पुन्हां सुतापा हें.' ६०
कुंती, सहदेवातें पोटासीं धरुनियां, असें वदली.
धैर्यें निरोप दे, परि कांपे ती मारुतें जसी कदली. ६१
सोडी, गळा पृथेचा धेनूचा धरुनि जेंवि [4]सास्ना, न.
भिजला अश्रुभरानें, केला गंगेंत तो जसा स्नान. ६२
समजाविला प्रयत्नें बहु तो, कीं पात्र परम लाडासः
माय म्हणे, '[5]स्नेह सुखद, वाटे अहिचा चि पर मला डांस.'
प्रेमें मस्तक हुंगुनि, आलिंगुनि, त्या सुतांसि दे आज्ञा;
धर्मादिकांवरि करी बहु आशीरमृतवृष्टि ती प्राज्ञा. ६४
नृप, गांधारी, कुंती, यांतें नमुनि, प्रदक्षिणा करुनीं,

१. ज्ञातें, शहाणें. २. इंद्राची. ३. युधिष्ठिर हा च पांडु, याची सेवा ती च तुझी माता माद्री; धर्माची जी आज्ञा ती मी कुंती, असें समजून वाग, म्हणजे तुझें निवासस्थान जें गृह, तें च तुला मेरुपर्वताप्रमाणें होईल. ४. धेनूची सास्ना (गळ्याखालील पोळी) ज्याप्रमाणें गळ्याला सोडीत नाहीं त्याप्रमाणें सहदेव कुंतीचा गळा न सोडी. ५. स्नेह सुख देणारा खरा; परतु मला हा सर्पदंशासारखा दुःखद वाटतो.

ते सस्त्रीक निघाले, चरण मनीं, अश्रु लोचनीं धरुनीं. ६५
आला पुरासि देहें, परि चित्तें आश्रमीं च तो वसला;
नृप, बद्ध वत्स गोष्ठीं[1] नगरीं सिंहासनीं तसा बसला. ६६
अब्दद्वय जाल्यावरि, नारद भेटे नृपासि येऊन;
बहु सुखद होय दर्शन तें, हेमंतांत जेंवि येऊन. ६७
पूजन केलें, आसन देउनि बैसावयासि कनकाचें;
धर्में प्रार्थुनि पुसिलें त्या सर्वज्ञास वृत्त जनकाचें. ६८
"गंगातटवासी द्विज कथिती, 'नृप परम उग्र तप करितो,'
सर्वज्ञा ! मुनिवर्या ! मज सांग, असेल देखिला जरि तो." ६९
देवर्षि म्हणे, "धर्मा ! श्रवण करीं, धैर्य धरुनि, तद्वृत्ता;
तूं आल्यावरि गेला गंगाद्वारासि[2] भूप, सद्वृत्ता ! ७०
तो अग्निहोत्रयाजक गांधारी त्वत्प्रसूसहित राहे;
यासि तपस्या घडली जी, केवळ दुष्करा चि इतरा हे. ७१
वाताशन, वीटामुख[3], होता तप उग्र करित सा मास;
सुस्नात[4] जसा वपुवरि, न उरों दे अस्थिवरि तसा मास. ७२
गांधारी जळ सेवी; दुसरी मासोपवास करि देवी;
तिसरे दिवसीं रात्रौ संजय मुन्यन्न[5] अल्पसें जेवी. ७३
वनगोचर[6] नृप झाला, संजय अवलंब[7] त्यासि दे हातें;
गांधारीच्या चालवि कुंती, होऊनि नेत्र, देहातें. ७४
एके दिवसीं होता स्त्रीकुंतीसहित भूप तो कच्छीं[8].
ये स्वाश्रमाकडे जों, स्नान करुनि सुरनदीह्रदीं[9] अच्छीं, ७५
तों आश्रममार्गींचें वेष्टुनि सर्वत्र तें महागहन,

---

१. गोठ्यांत. २. गंगोत्रीला. ३. तोंडात लाकडाचे तुकडे धरले आहेत असा. ४. चांगल्या रीतीनें स्नान केलेला असा तो धृतराष्ट्र आपल्या शरीरावर व त्या च प्रमाणें अस्थींवर हि मास उरो न दे, असा अर्थ. ५. मुनींना भक्षण करण्याला योग्य असें अन्न. ६. वनाला जाणारा असा. ७. आधार. ८. जलप्रायदेशीं—**पंत.** ९. निर्मल अशा गंगेच्या डोहांत.

भस्म करीत चि आला, कल्पांतीचा[*] जसा, तसा दहन. ७६
सर्पमृगकुळें, जळतां वन, त्या दावानळीं बहु जळालीं.
शिरलीं वराहयूथें डोहांत, प्रथम जीं द्रुत पळालीं. ७७
तो देव, त्या हि देवी, केवळ अक्षम तिघें हि अपसरणीं;
ज्यांत अनशन, तसें तें लंघूं देईल काय तप सरणी ? ७८
नृप सूतासि म्हणे, 'तूं व्यसनांतुनि शीघ्र संजया ! निघ रे !
प्रभुहृदय आश्रितार्थ चि तापें तत्काळ तूपसें विघरे.' ७९
संजय म्हणे, 'प्रभो ! तुज रक्षाया संकटीं नसे शक्ति.
सोडुनि जावें कैसें ? व्याकुळ करिती मना तुझी भक्ति. ८०
होतो वृथाग्निनें तुज मृत्यु, नृपा ! हा अनिष्ट मज वाटे.
फाटे उर शोकानें, पाहुनि हे गति तुझी, गळा दाटे.' ८१
भूप म्हणे, 'प्रार्थावें हें चि जनें प्राप्ततापसत्वानें;
आम्हां घडेल सद्गति; सोसूं क्षण दाहताप सत्वानें.' ८२
ऐसें वदोनि बसला प्राङ्मुख नृप, तत्समीप त्या हि सती;
प्राणव्यसनीं निश्चळ ते त्यांचे देह चित्रसे दिसती. ८३
संजय म्हणे, 'प्रभो ! त्वां निजयोगेंकरुनि देह सोडावा;
श्रवण बहु तुला घडलें; ऋषिपुत्रा ! पुण्यलोक जोडावा.' ८४
कथुनि असें भूपातें, संजय करुनि प्रदक्षिणा जाय:
'हाय !' न म्हणुनि करी, जें अवसानीं उचित होय, तें राय. ८५
केला क्षिप्र तिघांचा त्या दवदहनें तृणासम ग्रास.
गेला परलोकाप्रति, यापरि वारुनि ऋणा समग्रास. ८६
गेली परलोकाप्रति गांधारी, तसि च ती पृथा; न रडें;
ज्ञात्यानें न च द्यावें शोकव्याघ्राननीं वृथा नरडें. ८७

१. रानडुकरांचे कळप. २. बाजला होर्ण्याला. ३. मार्ग—पंत. ४. मंत्रसंस्काररहित अशा अग्नीनें. ५. प्राप्त झाला तपस्वीपणा ज्याला अशा. ६. पूर्वाभिमुख. ७. स्वतःच्या योगसामर्थ्यानें. ८. अंतकाळीं. * कल्पांतीचा ( ? ).

जेवि खळांत[1] वृषांचा[2] घेरा सर्वत्र मेढिला[3] होतो,
मुनिनीं सूतें[4] सुरनदीतीरीं तैसा चि वेढिला हो! तो. ८८
म्यां[5] पाहिला, तदास्यें हें वृत्त श्रवण जाहलें कांहीं;
दहनें केला, जैसा करिजेतो कायदाह लेंकांहीं? ८९
हें वृत्त तापसांला सांगुनि संजय हिमालया गेला;
वृत्तांत तुम्हांला श्रुत तेथुनि येवूनि तो चि म्यां केला." ९०
ऐसें ऐकुनि, सांतःपुर पांडव शोकसागरीं पडले;
परम प्रबुद्ध, परि, ते सर्व हि, चिरकाळ बाळसे रडले. ९१
होय व्याकुळ जळतां सर्वस्व[6] वही[6] मनांत सांव[7] जसा,
धर्म म्हणे, "हा! हा! प्रभुवर्य जळाला वनांत सावजसा! ९२
रे दहना! तूं निर्दय, केवळ घातक कृतघ्न, कळलास;
हा! मंदा! या कर्मे अयशें लोकीं वृथा चि मळलास. ९३
केला भस्म पृथेचा देह वनीं वाळला जसा पाला;
तुज हि नसे, जसि होतां दुग्धप्रदकाळ[8] लाज सापाला. ९४
रागांत[9] तुझी पुरवी जो वांछा खांडवास खायाची,
'माता खावी,' म्हणुनि स्वमुखें यां[10] पांडवा सखा यांची[10]. ९५
विजया! जो वांचविला तो चि तुझी माय खाय हा कशि रे!!
सहदेवा! तवं कानीं कां नीट निघुनि तिची न हाक शिरे? ९६
भीमा! दहनासि दिलें कैसें होउनि सहाय बळ वातें[11]?
नकुळा[12]! दैवत कोठें, ज्याला जाया स्वदुःख कळवा, तें? ९७
गांधारी प्रेतांहीं[13] वंध्या झाली असो निर्हीनांहीं[13];

---

१. धान्याची मळणी करण्याच्या जागेत. २. बैलाचा. ३. मध्यतरी पुरलेल्या खुटाला. ४. संजय. ५. खोडलेला पाठ—**म्यां सूत पाहिला.** ६. सर्वस्व जीवर अवलंबून आहे अशी हिशेबाची वही. ७. साहुकार. ८. दूध पाजणाऱ्याचा च घातक. ९. कथासंदर्भ आदि० अ० ३८।९३–९६ पहा. १०. [त्या] ह्या अर्जुनास [तू त्याचा] मित्र याचना करिता झालास, असा अर्थ. ११. भीम वायुपुत्र, म्हणून साभिप्राय प्रश्न. १२. नकुळ हा अश्विनीकुमारांशज आहे, या गोष्टीस अनुलक्षून प्रश्न. १३. अत्यंत हलकट अशा मृत पुत्रांमुळे गांधारी वंध्या झाली, तें एक असो.

कुंतीस पांच पंडित, पुत्र, परम पटु, असोनि ही नाहीं. ९८
वेचिति रक्त स्तन्यें, काळजिनें व्यर्थ बायका मास;
सुत्र समर्थ असोनि हि, आलों आम्हीं च काय कामास? ९९
मज हें चि दुःख वाटे, ज्या यावज्जीव पूजिलें दहना,
तो हि न कामा आला; हा! कर्मा! गति तुझी महागहना. १००
हें परम श्लाघ्य तुला, गडबडुनि भयें न जें पळालास,
गुरु शोक हा चि कीं, तूं सस्त्रीक वृथाग्निनें जळालास." १०१
देवर्षि म्हणे, 'धर्मा! न जळाला तो वृथाग्निनें राजा,
जेव्हां उपोषणांहीं केवळ असमर्थ जाहला काजा, १०२
तेव्हां इष्टि करुनि, त्या अग्नींतें हस्त नव पिता जोडी;
वनवास स्वीकारी; उटजीं करणें निवास तें सोडी. १०३
त्या अग्नीतें याजक विप्रवर विजनवनांत सोडून,
स्वस्थानाप्रति गेले, बहु कष्टें स्नेहबंध तोडून. १०४
ते चि अनळ अनिळानें त्या निर्जनकाननांत पेटविले,
समयीं आणुनि काळें रायाला आयते चि भेटविले. १०५
हें म्यां कथिलें गंगातटवासितपस्विजनसभाकथित;
सर्वांसि सुगति झाली; धर्मा! होवूं नको चि तूं व्यथित. १०६
घडला संस्कार, उचित जो त्या सुतगांत होय देहातें.
आतां सदार सानुज तूं त्यां सर्वांसि तोय दे हातें.' १०७
उत्तरकार्य तयांचें करि नृप कथिलें जसें चि वेदानें;
सकळें हि तदुद्देशें गोभूशय्यागृहादि दे दानें. १०८
श्रीरामसुतमयूरें शुभ आश्रमवासिकाख्य हें पर्व
भावें समर्पिलें श्रीपतिचरणीं दोष जावया सर्व. १०९

इति श्रीमहाभारते आश्रमवासिके पर्वणि श्रीरामनंदनमयूरविरचिते पंचमोऽध्यायः

श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।

१. अंगावरील दुधाच्या रूपानें. २. मार्गे ८१ वी आर्या पहा. ३. पाक्षिक यज्ञावशेष.

# मौसलपर्व.

## अध्याय पहिला.

जनमेजयाप्रति म्हणे वैशंपायनः—कथा परिस, राया!
तुमजे बाळांसि[1] किमपि, लागे चि भवव्यथा परि सराया. १
जगदीशातें वंदुनि, गावें तद्विश्वतारका चरिता;
इतरां[2] कर्मी घेता, जैसा मानूनि तार काच रिता. २
धर्मप्रभु षट्त्रिंशीं[3] वर्षी उत्पात उग्रतर पाहे,
समजोनि, म्हणे, "म्हणती आम्हां, 'चिंता करूनि करपा,' हे."
तों यादवनाशाची दूतमुखें परमशोकदा वार्ता
होय श्रुता अकस्मात् धर्मा भीष्मादि शोकदावार्ता. ४
'उमात खरी' म्हणती, श्रीकृष्णबळप्रभाव ते 'लटकी.'
धर्म निकट बंधूंतें, सांगाया वर्तमान तें, हटकी.* ५
'इष्टांचा, मित्रांचा, सर्व गुरूंचा हि, मुख्य राय, कवी,
नायक विश्वांचा, हरि गेला,' हें वर्तमान आयकवी. ६
काळें प्रभु हृत होतां, ते पांडव सकल भासले शवसे;
सिंहें यूथप वधितां, धैर्य धरुनि न कलभास लेश वसे. ७
जनमेजय वृष्णींचा नाश सविस्तर पुसे, तयासि कवी
वैशंपायन सांगे, ज्या सर्वज्ञत्व गुरुदया[6] सिकवी. ८

१. अज्ञ श्रोत्यास कथाचें माहात्म्य मुळीं च कळत नसतें, असा भावार्थ. २. कांचेंसि मोती मानूनि घेणारा जसा रिक्त–पंत. ३. [अभिषेकानंतर] छत्तिसावे वर्षी. ४. त्या उत्पातांचा अर्थ जाणून., ५. पूर्वी च झालेल्या दुश्चिन्हांवरून ही बातमी खरी असें वाटे; पण् श्रीकृष्ण व बळराम ह्यांच्या प्रतापाची आठवण होऊन ती खोटी असावी, अशी शंका येई. ६. व्यासगुरूची दया बाळावी

नारदविश्वामित्रप्रमुख मुनि द्वारकापुरीं[1] होते,
क्षोभविले भाविबळें,[2] करुनि च्छळ, सारणादिकीं हा! ते. ९
देतां गर्भवतीच्या सांबाला[3] सारणादि सोंगातें:
दे तत्पटुत्व न जना पुंस्त्वाच्या[4] कारणा दिसां गा! तें. १०
ऐसें पुसती त्यांतें, 'सुतकामा[5] बभ्रुची[6] वधू धन्या
हे गर्भवती आहे; सांगा, होईल पुत्र कीं कन्या?' ११
मुनि म्हणति, "यादवास्य[7] हि करितें कीं जें वि वंचन[8] खलास्य,
शाप करो यांत, जसा करितो हरिणांत पंचनख[9] लास्य.[10] १२
रे मत्त हो! पुसतसा जरि 'होइल काय?' म्हणुनि, तरि सारे
कथितों यथार्थ आम्हीं ब्राह्मण कर्मानुरूप, परिसा रे! १३
आला वेष करुनि हा कृष्णात्मज पाप सांब रमणीचा,
आपण होवूं पाहे राहु सकळतापसांबरमणीचा.[11] १४
याला अपत्य होइल, जें आयस[12] घोर मुसल, माना, तें.
त्यातें बुडाल पावुनि सर्व, जसे वेद मुसलमानातें." १५
मुनिनीं गांधारीच्या[13] शापासि सहाय शाप भेटविला,
ब्रह्मक्षोभसमीरें तो साध्वीक्षोभदहन पेटविला. १६
मुनि गेले: व्यसन प्रभु परिसे, परि सेवटीं न संहरि तें;
त्या जड काय? वसाया करि नामें हृदय, हरुनि अंहं,[14] रिते. १७
दुसरे चि दिनीं सांब प्रसवे बहुघोर मुसळ लाजाया,
अंडाबाहिर[15] हि विषानळसा वृत्तांत उसळला जाया. १८
करवूनि उग्रसेनें मुसळाचें सूक्ष्म पिष्टसें चूर्ण,
निःशेष स्वाप्तकरें[16] टाकविलें दूर सागरीं तूर्ण. १९

१. दैवाच्या जोरानें. २. वसुदेवरोहणीपुत्र. ३. त्याचें सोंग देण्याचें कौशल्य. ४. पुरुषचिह्नाना. ५. पुत्राची इच्छा करणारी. ६. यादवविशेषाची. ७. यादवांचें तोंड देखील. ८. फसवणूक. ९. सिंह. १०. नृत्य. ११. सर्व तापसी हा च कोणी सूर्य, त्याचा. १२. लोखडाचें. १३. आर्या. भा.स्त्री. अ. ६।६ पहा. १४. पाप. १५. ब्रह्मांड-पंत. १६. आपल्या विश्वासांतील माणसाच्या हातून.

मग नगरीं घोषविलें[1] कीं, 'कोणीं करिल जो सुरापान,
त्याला[2] शूलाग्रीं स्थिति, नाकीं साधुसि जसी दुरापा न.' २०
सेविति न सुरा, जपती आज्ञेला भिवुनि आहुका[3] राज्या.
कल्याण त्यासि कैंचें, सुबहुमता[4] न वहि साहुकारा ज्या? २१
बहुसावधानचित्तें संरक्षी द्वारकेसि भोजपती[5];
त्या[6] केल्या नियमातें, प्रभु न क्षोभावयासि तो, जपती. २२
तों काळ, कृष्णपिंगळवर्ण, बहुकराळरूपधर, मुंड[7],
फेरी पुरीं प्रतिगृहीं घाली, तो दाखवी[8], चुकवि तुंड. २३
हाणिति जपोनि यादव बाणाहीं त्या भयानकाला ही;
ते शर तयासि देती, गरुडासि जसे भया न कालाही. २४
उत्पातरीति परिसा, सुश्रोते हो! क्षमा करा, लघुसी[9],
आखु श्मश्रु[10] हि खाती: मार्गीं खणिति क्षमा करालें* घुसी. २५
उत्पात विविध होती, मणिकांचनमयसभेंत हि उकीर[11],
शिरती कपोत गेहीं, करिती खर काकसे रव[12] सुकीर[13]. २६
परिसोनि पांचजन्यध्वनितें गर्जति पुरींत रासभ जे;
गुरुस च्छात्र, पतीस स्त्री, स्वस्वामीस ही न दास भजे. २७
त्यांत किडे व्हावे, जे सुपदार्थ बरे जपोन रांधावे[14];
स्वप्नांत दिसे काळी स्त्री, चोरीत स्त्रियां नरां, धावे. २८
तालांक[15]सुपर्णाकध्वज चक्र[16] हि उडुनियां नभीं जाय,

---

१. जाहीर केलें. २. अन्वयार्थ:—जसी साधुसि नाकीं स्थिति दुरापा न [तसी] त्याला शूलाग्रीं स्थिति (सुळावर चढविणे) दुरापा न (सहज खात्रीने होईल). ३. उग्रसेन-पंत. ४. आदरणीय; मान्य. ५. उग्रसेन. ६. प्रजा. ७. मुंडण केलेला. ८. क्षणात दिसे, क्षणात तोंड चुकवी. ९. थोडीशी. भावार्थ:—उत्पाताचे थोडेसें तरी वर्णन करावें लागत आहे, याचा राग मानू नका. १०. दाढीमिशा. ११. मातीचे-केराचे-ढीग. १२. भयकर कर्कश आवाज. १३. चांगले बोलके पोपट. १४. शिजवून तयार करावे. १५. तालवृक्षाचें चिह्न असलेला (बळरामाचा) व गरुडचिह्नांकित असा (कृष्णाचा) ध्वज. १६. कृष्णाला अग्नीनें दिलेले वज्रनाभनामक दिव्य चक्र. *उग्र.

अब्धिवरि तुरग चालत रथ घेउनि जाति, म्हणविती ‘ हाय !’
श्रीकृष्ण म्हणे, ‘ तेरा दिवसांचा भारतीं रणीं पक्ष[1]
आला, तसा चि आतां; वीरांचें संहरील हा लक्ष.’ ३०
सर्वांच्या हि विचारा आलें, रक्षील तीर्थ या आर्सी,
लोकीं अनिष्टशमनें सुकृतें इतरें न तीर्थयात्रांसीं[2]. ३१
गेले अब्धितटीं प्रभुसह सर्व हि यादव प्रभासा जे;
त्यांच्या रविप्रभा उपमा न बळा या, दवप्रभा[3] साजे. ३२
तेथुनि असकृत् प्रभुला नमुनि, पुसुनि, साश्रु उद्धव निघाला;
घडतां सुगति, पडो कां द्यावा देवदस्युरुद्धवनीं घाला ? ३३
जें ब्राह्मणार्थ केलें, देती शुद्धान्न वानरांस चि तें;
विपरीत दैव होतां, विपरीत चि मत[5] पहा कसें रचितें. ३४
भ्रमले, भक्षुनि विविधें अन्नें, प्याले नवासवाला[6], हो !
मद्यरसीं होय तयां, सोमीं हि तसा न वासवा लाहो[7]. ३५
वाद्याचे, नृत्याचे, रस सेविति ते सुराप गानाचे;
विसरति विप्रां, ज्यांचें पदरज मिळतां सुरापगा नाचे. ३६
झाली होती समदा बहु वृष्णिसभा पिवूनि मद्या जी,
नीमाजि तो, म्हणे जो, ‘ हो संसृतिला[8] भिवूनि, मद्याजी[9].’ ३७
ज्याची सत्कीर्ति म्हणे, ‘ तव हृदयीं मद न देवनदि ! राहो,’
तो हि प्रभु रामासह प्याला होता यथेष्ट मदिरा हो ! ३८
रामासमीप होता कृतवर्मा[10] त्या सभेंत पीतसुर[11],
कृष्णासमीप सात्यकि[12], व्हावे, ज्या कोपवूनि, भीत सुर. ३९
सात्यकि कृतवर्म्यातें हांसोनि म्हणे, ‘ प्रसुप्तवध[13] मानी

१. पधरवडा. २. तीर्थयात्रेसारखीं. ३. वणव्याच्या प्रकाशाची उपमा शोभेल. ४. वणवा आणि चोर ह्यानीं वेढलेल्या वनांत. ५. बुद्धि. ६. ताज्या दारूला. ७. लाभ, आनंद. ८. संसाराला. ९. माझा भक्त. १०. कौरवपक्षीय यादव. ११. प्यायली आहे सुरा ज्यानें असा. १२. पांडवपक्षीय यादव. १३. निजलेल्याचा वध. (अश्वत्थाम्याच्या बरोबर रात्रीं शिबिरात निजलेल्या पांडवपक्षीयांचा वध करण्याकरितां कृतवर्मा व कृपाचार्य गेले होते).

क्षत्रिय कोण करिल ? तें कर्म करावें अघार्थ अधमानीं.' ४०
प्रद्युम्न हि धिक्कारी अभिनंदन करुनि तदुपहासाचें,
हांसुनि, कोपोनि, म्हणे, 'वदतो दुष्कर्म यदुप हा साचें.' ४१
कोपुनि हार्दिक्य म्हणे, 'हृतभुज भूरिश्रवा कसा वधिला ?
त्वां बहुधा गुरु केला पापनिधि व्याध जो वनामधिला.' ४२
ऐकुनि या वचनातें, प्रभु वक्रसरोषदृष्टिनें पाहे;
साहे मर्मस्पर्श न, परि परमेश्वर उगा चि तो राहे. ४३
प्रभुला स्यमंतकाची युयुधान करूनि आठवण दे हा,
ज्यास्तव सत्राजित घे पाडुनि नमनोत्थ आठ वण देहा. ४४
तों कृष्णांकीं बैसुनि, धैर्य दिगंतासि पाठवी रमणी;
तें पाहुनि, तो आठवि जें केलें शास्त्र पाठ वीरमणी. ४५
युयुधान उठोनि म्हणे ऐसें गर्जोनि सत्यभामेला,
'देवि ! उगी; मीं घेतों सूड, पहा स्पष्ट पाप हा मेला. ४६
कृष्णासुत, द्रुपदसुत, केवळ जो भग्न धडपणीं चि मणी,
सर्व सुखवितों; सोसिल गरुडाची काय झडपणी चिमणी ?'
ऐसें वदोनि, धावुनि, खड्गें कृतवर्मशीर्ष तो उडवी;
जाणों युयुधानकरें काळप्रभु फुल्लपद्म तें खुडवी ! ४८
त्याच्या पक्षीं जे जे, त्यांतें ही भरतसत्तमा ! राया !
लागे सात्यकि, होउनि कोपें मध्यें ही मत्त, माराया. ४९
वाराया धांवे प्रभु, तों ऐकसरोनि सर्व कोपानें,

१. कृतवर्मा. २. छेदला आहे [अर्जुनानें] हात ज्याचा असा. ३. या कामी तू रानटी शिकारी लोकांचें अनुकरण केलेस, असा भावार्थ. ४. सात्यकी. ५. [साष्टांग] नमस्कार घातल्यानें पडलेले. ६. सत्राजिताची आठवण झाल्यानें सत्यभामेला शोक होऊन तिनें कृष्णाच्या मांडीवर डोकें टेकिलें आणि आपल्या शोकानें कृष्णाचें हि धैर्य नाहींसें केलें, असें मूळांत आहे. ७. सात्यकी. ८. कृतवर्मा. ९. जो मणी (वीरश्रेष्ठ धृष्टद्युम्न) चांगला धडधाकट असतां आकस्मिक रीतीनें झोंपेंत भग्न केला गेला (मारला गेला), असा भावार्थ. १०. एकत्र गोळा होऊन. * सात्यकी.

भोजांधक[1] सात्यकिला वेष्टिति, अत्यंत मत्त जो पानें. ५०
काळविपर्यय जाणुनि[2], कोपे त्यावरि न तो महातेजा[3];
कीं, ते न भजति त्या, जे[4] भजले वेद चि असें पहाते ज्या. ५१
तें वारें, जें लागे कांचनमय ताट-वाटि कायाला;
त्या उद्याना होता आयूचा ताटवा टिकायाला. ५२
ते[5] भोजांधक त्यातें ताडिति उच्छिष्ट कनकपात्राहीं,
त्याच्या तो मार[6] जसा योग्यांच्या साहिला चि गात्राहीं. ५३
प्रद्युम्न सहाय तया होय, जसा साधुसंग बोधाला;
एका अंधक गांठिति, एका ते सर्व भोजयोधाला. ५४
त्या[7] बहुताहीं सात्यकि भगवन्नंदन हि तो खपविला हो!
गिरि[8] धरपक्ष[9] च्छेदुनि जाणों ते म्हणति, 'तोख पविला हो.'
पन्नग पिपीलिकाहीं वधिले तेसे, करून एकोपा;
कोपे प्रभु हि, म्हणे जो, 'काळहतांवरि करूं नये कोपा.' ५६
प्रभु घे मुष्टिभरि जलधितटज तृणविशेष एरका[10] काहीं;
मुसळत्व तिहीं धरिलें, जेसें गरुडत्व येर काकाहीं. ५७
अभिमुख सर्व हि मेले प्रभु तो समजोनि एरका हाणी;
सदतिक्रमगति ऐसी, परिसुनि बहु काय येर[11] कोहाणी? ५८

१. भोज व अंधक ह्या कुळांतील यादव. २. काळ फिरला हें जाणून. ३. श्रीकृष्ण. ४. जे यादव पूर्वी कृष्णाला वेदासारखा समजून पूज्य मानीत आले, ते च आता त्याच्या शब्दाला मानीनात. ५. सोन्याचीं जी पात्रें अंगाला लागत ती च कोणी वावटळ, त्या वावटळीपासून त्या बागेचें म्हणजे त्याचें आयुष्यरूपी कुंपण रक्षण करीत होतें. ६. तो पात्राचा तडाखा (पक्षी) काम; विषयवासना. ७. अन्वयः—हो! तो भगवन्नंदन (प्रद्युम्न) हि खपविला. ८. पर्वत—**पंत.** ९. पर्वतपक्ष—**पंत.** १०. ब्रह्म-शापामुळें कृष्णपुत्र सांबाला झालेल्या मुसळाचें जें पीठ समुद्रांत टाकलें होतें तें समुद्राच्या तीराला लागून त्यापासून हें एक प्रकारचें गवत व लव्हाळे उत्पन्न झालें होतें. ११. सज्जनांचा अतिक्रम केला म्हणजे त्याचा असा परिणाम होतो एवढें च तत्त्व खरें; इतर पाल्हाळ ऐकून करावयाचें काय?

पाडी अशनि नगांला, वृष्णींच्या तेंवि येरका ढीगा.
संमार्जनी[1] धरुनि तो जाणों ब्रह्मण्य केर काढी, गा! ५९
'विधि फिरतां तृण चि अशनि,' कळवि असें एरका कवीला हे.
ज्ञाता सुरसज्ञ सिता[3] इक्षुरसीं, येरें[4] काकवी लाहे. ६०
आरगधिली म्हणे वरदा जाणों, 'शस्त्रबाध[5] सोंध,' संती[6];
शिवतां चि येरका त्या तोडी वृष्णींस बा! धसाधस ती. ६१
यादवहस्तीं आल्या, सोडूनि समुद्रवारितीरा, ज्या,
त्या एरका चि कलहीं मारिति, न तयांसि वारिती, राज्या!
तें एरकाभंव मुसळ टेंकुनि भगवान् स्वयें उभा राहे,
गदसांबचारुदेष्णप्रद्युम्नादिक रणांत हत पाहे. ६३
मग जगदीश क्षोभें हरिणांवरि हरि तसा उसळला, हो!
निःशेष यादवांतें करित, म्हणे, 'तृप्तिला मुसळ लाहो.' ६४
प्रार्थी प्रभुला, जोडुनि कर, दारुकसहित तो असें बभ्रु,
'राम पहावा आतां, व्हाव्या वक्रा प्रभो! तुझ्या न भ्रू.' ६५
क्रोधें गेलें होतें तें श्रीच्या आत्मभान ये कांतीं,
मग देखिला तरुतळीं होता चिंतीत राम एकांतीं. ६६
प्रभु दारुकासि सांगे, 'नागपुरी नाश हा कळिव राज्यां[10].
आलें भागा पन्नं विष द्यावें, मधु दिलें अळिवरा[11] ज्या. ६७
द्रुत अर्जुन घेउनि ये. हूं, जोडीं वररथीं जवन वाजी.
तूं जाणसि ती विद्या, दावि प्रतिपद[12] पर्था जव नवा जी. ६८
जा, जातो क्षुधित जसा आणाया दारु[13] काननामाजी;
करिल त्वरा न तन्मति कसि, विसरे दारुका! न नामा जी?'
दारुक गेल्यावरि हरि त्या व्यसनीं बभ्रुतें म्हणे 'दक्षा!
त्वां द्वारकापुरीची शीघ्र करावी स्वपौरुषें रक्षा. ७०

१. केरसुणी. २. शहाण्याला. ३. शर्करा. ४. इतर अनभिज्ञ लोक. ५. शस्त्रसमूह तुला मिळो. ६. दुगा-पंत. ७. यादवविशेष. ८. भिवया. ९. शुद्धि. १०. धर्मराजाला. ११. भ्रमराला. १२. प्रत्येक पावलाला. १३. काष्ठे, सर्पणे.

मृतयादवस्त्रियांवरि अणु ही करितील ते न दस्यु[1] दया,
रव्युदया घूक तसे साहत नव्हते च ते सदस्युदया.[2] ७१
तेथुनि बभ्रु निघाला प्रभुच्या घेऊनि जो निरोपातें,
दैव म्हणे, 'मुसळाच्या उदकाच्या लोटसा विरो पातें.' ७२
त्या ब्रह्मशापमुसळें पडुनि, जसा आखु, बभ्रु कुटिला हो!
स्वसमक्ष असें होतां, प्रभु हि म्हणे, 'प्रकट न' भ्रुकुटिला 'हो.'
प्रभु अग्रजाप्रति म्हणे, "तोंवरि येथें चि तूं रहा रामा!
ज्ञातिस निरखुनि येतों, शोकांत, म्हणोंत त्यां न 'हा!' रामा."
प्रभु मग पुरींत जावुनि, सांगे ती सर्व वधकथा पितया:
जरि तो परममृदु, कथी, बहु वार्ता अप्रिया तथापि तया. ७५
"ताता! शरण व्यसनीं कोणा जातील यादवा भाजा?[6]
त्यां न म्हणावें अर्जुन ये तों, 'पावोन या दवा भाजा.' ७६
सर्वस्वजनरहित हें जालें, मज या पुरीं रहावेना.
रामाकडे चि जातों, स्त्रीजनवदनाकडे पहावेना. ७७
तप हित रामसहित मीं जाउनि जोडीन[8] हा च लाभ वना,
आयुष्य शेष आम्हां म्हणतें, 'सोडूनि या चला, भवना.'[9]" ७८
वदुनि असें, कर जोडी त्यां हि, कठिन न परि देव नात्यातें,
झडझडुनि निघों देती दयितांच्या न परिदेवना त्यातें. ७९
तेव्हांचें बहु अंतःपुरपुरजनदुःख[11] बोलवेना तें,

१. चार: रानटी लोक. २. आमुच्या मुखचंद्राच्या उदयास–**पंत.** ३. मार्तंडाच्या ढेक-
काप्रमाणे. ४. आपला राग दर्शवू नकोस ५. त्या स्त्रिया. ६. यादवांच्या स्त्रिया. ७.
पतिपुत्रशोकरूपा दावानळातें–**पंत.** ८. या ठिकाणीं मूळांत 'जोडील' असें पद पडलें
आहे; पण तो हस्तदोष असावा, व 'जोडीन' असा च पंताचा संकल्पित पाठ असावा.
९. या भवना सोडून चला–**पंत.** १०. त्या वसुदेवातें, त्या नात्यातें हीं–**पंत.**
अन्वयार्थ:—देव कठिन (मनाचा कठोर) न; परि असें वदुनि त्या (वसुदेवातें)
(आणि) त्यां नात्यातें हि कर जोडी (सोडता झाला). दयितांच्या (प्रियजनाच्या)
परिदेवना (विलाप) त्यातें झडझडुनि निघों न देती. ११. स्त्रीजन व पुरवासी जन.

त्या जेंवि यादवांतें[*] लाविति, तैसा न बोल वेनोतें[1]. ८०
प्रभु त्यांसि म्हणे, 'जेणें केला चि पुन्हां अजातरिपु राजा,
या बहुदुःखापासुनि सोडविल तुम्हांसि तो सखा माजा.' ८१
ऐसें सांगुनि, न म्हणुनि कन्या, प्रिय दार, माय, हे काकी,
रामासमीप तेथुनि भगवान् धावूनि जाय एकाकी. ८२
तों राममुखांतूनि प्रकट निघे श्वेत नाग बाहेर,
जनमेजया! तयातें ध्यानीं[4] तूं भूरिभाग[3] बा! हेरं. ८३
तो चंद्रमंडळांतुनि अमृताचा कीं प्रसन्न गांगाचा[6]
शिवमुकुटांतूनि निघे पूर, असा वर्ण पन्नगांगाचा. ८४
न सहस्रमस्तकाचा वदवे आकार वर्ण वाचेला,
येवूनि पुढें नमितां, त्या 'गुरु' कवि म्हणति, अर्णवा 'चेला.' ८५
तटिनी, वासुकि, तक्षक, कर्कोटक, कंबलाश्वतर, वरुण,
हे सामोरे आले; बहुगुणवृद्धा[10] हितों[11] जसे तरुण. ८६
त्यांहीं केली पूजा स्वीकारुनि, नाग सागरीं सिरला.
तें पाहुनि, एकाकी तेथुनि मागें मुकुंद तो फिरला. ८७
यापरि परलोकातें तें प्रभुनें वृष्णिचक्र पाठविलें;
गांधारीचें श्रीमद्दुर्वास्याचें हि वाक्य आठविलें. ८८
शून्यवनीं बसुनि, मनीं अवसानींचा स्वयोग आणूनि,
निद्रा क्षितिवरि केली, जालें अवतारकृत्य जाणूनि. ८९
तेथें आला लुब्धक[12], जो नामें पापनग जरा, ज्याला
मृग भासे, ज्याची स्मृति बाधों दे ताप न गजराज्याला[13]. ९०

१. यादवी स्त्रिया. २. या नावाच्या जुलमी राजाला. ३. मोठा नशीबवान्. ४. ध्यानात आण, कल्पना कर. ५. शुद्ध, शुभ्र. ६. गंगोदकाचा. ७. मूळपाठ—**सुशुचि**. ८. शेषाचा. (यानें बलरामाचा अवतार घेतला होता). ९. शहाणे लोक त्या शेषाला 'गुरु' म्हणाले आणि त्याच्यापुढे अर्णव (समुद्र) हा शिष्यासारखा दिमतो असें म्हणाले. १०. पुष्कळ गुण आहेत अंगीं ज्याच्या अशा वयोवृद्धाला ११. कल्याणकारक अशा. १२. पारधी. १३. गजेंद्राला. * यादवसमुदाय.

मृगशंकेनें विशिखें पादतळीं सर्वलोकपा वेधी,
मग बहु त्या व्याधाची, प्रभुला जाणोनि, शोक पावे धी. ९१
'हाय!' म्हणे, पाय धरी व्याध; तयाचा हि सर्व शोक हरी
करुनि समाधान, निघे, बहु मुदित करावया स्वलोक, हरी.
प्रेमाश्रूंच्या करित चि ये वर्षा देवराज सामोरा;
अखिलसुरजना भगवान्, घन हर्षा[1] दे वरा जसा मोरा. ९३
स्तुतिगीतनृत्यवाद्यध्वनि यांचा पर्वकाळ, जीला जे
रस रुचले, त्या मतिला ते मिळतो सर्व; काळजी लाजे. ९४
पांडव, शार्ङ्ग सुदर्शन धरुनि करीं, भार भूमिचा हरुनीं,
जाय स्वस्थाना, दे स्वस्था[2] नांदे प्रजा असें करुनीं. ९५

# अध्याय दुसरा.

दारुक सत्वर जाउनि, वृष्णिक्षय पांडवांसि आयकवी,
सायक वीरांसि उरीं झाला तो, बहु वदेल काय कवी? १
भ्रात्यांतें पुसुनि, निघे, कृष्णाचे आठवूनि पाय, सखा;
वाटे तें वृत्त [3]म्हणे, विषमिश्रित पाठवूनि पायस, 'खा.' २
तो द्वारकेसि पावे, भाट जिचे म्हणति नित्य जैतं[4] रणीं,
ती दिसली विधवासी, जसी बहुदुःखहेतु वैतरणी[5]. ३
द्वारवती निःश्रीका* यादवभार्या हि पाहिल्या हो! त्या,
दावार्त मृगी मेघा नेंवि जया[6] स्मरत राहिल्या होत्या. ४
प्रभुमंदिरांत जातां, प्रभुच्या दयिता सहस्र ज्या सोळा,
सर्वा प्रभुप्रियसखाभवत्या धावोनि जाहल्या गोळा. ५

१. वरा हर्षा-**पंत.** श्रेष्ठ आनंदानें. २. स्वस्था प्रजा नांदे असें करुनि दे-**पंत.** ३. कृष्ण-**पंत.** वाटे, कृष्ण तें वृत्त [हें च] विषमिश्रित पायस पाठवुनि 'खा' म्हणे. ४. जित (विजय) तत्संबधी. (विजयगानें). ५. नरकलोकांची नदी. ६. अर्जुनाला. * शोभाहीन अशी व अशा.

जें प्रभुयोगवियोगज[1] निरवधि[2] सुखदुःख आयकवितो तें,
दीना दशा सतींची जी बहु बोलेल काय कवि तीतें? ६
ऐकुनि कृष्णवधूंच्या विषसरिदोघा[3] तदा विलापातें
पार्थें न देखिला जो, प्रभुच्या तो घात दाविला[4] पातें. ७
मोहांत सत्यभामावैदर्भी रक्षिती पतिसखातें;
कीं, निजदुःख भल्याच्या न, बहु सुहृद्दुःख तें मतिस खातें[5]. ८
त्या जळ सिंचिति, घालिति, व्हाया न प्राणहानि, वारा या;
कीं, क्षम सर्वव्यसना, असतां सप्राण, हा निवाराया. ९
सावध करुनि बसविला यत्नें कनकासनीं नर[6] सत्याहीं[7];
बहुत रडे; कीं, याणें जो, तो आस्वादिला न रस त्याहीं. १०
पार्थ म्हणे, "प्रभुवर्यें माझे धुतले तुरंग, खाजविले;
लाजविले गुरु सुरतरुः देउनि यश पांडुपुत्र साजविले. ११
'स्वप्रियसख' म्हणउनि मज, गेला त्यागूनि दीनपाळ कसा?"
विविध विलाप करुनि, बहु रडला जननीवियुक्त बाळकसा.
नेला मातुळगेहीं, दैवें देवूनि बळ, विलापार्थ.
पडला होता शोकातुर शयनीं, त्यासि कळविला[9] पार्थ. १३
ठेवी वसुदेवाच्या[10] पायांवरि पुत्र पांडुचा शिर तो,
वाटे, जाया दुःसह तांप, गुरुचरणसरोरुहीं शिरतो. १४
इच्छी बहु, परि शौरि न शकला माथां उठोनि हुंगाया,
आलिंगी पडुन चि तो, कंठीं घालूनि बाहु तुंगा[11], या. १५
वसुदेव म्हणे, "वत्सा! गेला त्यागुनि वनीं तव सखा तो;

१ कृष्णाच्या सहवासापासून व वियोगापासून उत्पन्न झालेले. २. अमर्याद. ३ विषनद्याचा ओघ ज्यांत अशा. ४. प्रत्यक्ष प्रभुपतन पाहिले असें झाले—**पंत.** ५. मनाला स्वतःच्या दुःखापेक्षा मित्राचें दुःख अधिक ताप देतें. ६. अर्जुन. ७. श्रीकृष्णाच्या स्त्रियांनीं. ८. वडिल. ९. शोकग्रस्त होऊन अंथरुणावर पडलेल्या वसुदेवास, 'पार्थ आला आहे' असा निरोप कळविला गेला. १०. वसुदेव. ११. उच्च अशा अर्जुनाला.

हा शोक या यदुकुळा, दीप्तदवानळ जसें[1] यवस[2], खातो. १६
बा! 'काळानन चि' असें म्हणती या सर्व बायका भगरा:
यदुघातवर्तमानाहुनि गुरु गणितील काय कान गरा? १७
प्रद्युम्न, सात्यकि, तुझे जे शिष्य, क्षय तिहीं चि हा केला:
शापोक्तिस दिलि अनुमति[3], आकाशें जेंवि हाक हाकेला. १८
वदला कृष्ण असें कीं, 'व्यसनीं सर्वासि पार्थ रक्षील:
मीं तो, तो मीं; भेद न आम्हां दोघांत सुज्ञ लक्षील. १९
करिल तुझें तो सार्थक, पार्थ कसा मन्निदेश[4] मोडील?
जोडील सुयश, सोडिन मीं, जेथें देह राम सोडील.' २०
कृष्णें, गांधारीचा, विप्रांचा, शाप तो खरा केला,
गेला स्वकीर्तिनें बा! देउनियां ताप तोख[5] राकेला[6]. २१
जरि न करिता उपेक्षा, तव पौत्र तसा चि वंश वांचविता:
पूर्वीं जीं अतुळ यशें सांचविलीं, त्यांत हें हि सांचविता. २२
कृष्णें कथिलें आहे कीं, 'स्वजनव्यसन पार्थ उडवील,
पौरयदुवधू घेउनि जातां, सागर पुरीस बुडवील.' २३
कृष्णसखा! सर्व दिलें हें म्यां राज्य, स्त्रिया, धनें, रत्नें:
रक्षावें सुकृतयश स्वसखप्रीत्यर्थ बा! तुवां यत्नें. २४
घे स्वशिरीं तूं चि, न म्यां वृद्धें घेवूनि भार तापावें:
परमार्तांसि, मराया आज्ञा देऊनि, भारता! पावें." २५
पार्थ म्हणे, 'श्रीकृष्णत्यक्तमहीतें मला पहावेना,
न द्वारकेंत, शक्रप्रस्थांत, न गजपुरीं रहावेना. २६
पांचाळीसह आम्हां पांचांचा ही विचार एक असे;
राहेल कोण सोसुनि संसारीं शोकगरळसेक[7] असे? २७
शक्रप्रस्थीं नेउनि या सर्वा ही जनासि वसवीन,

१. गवत. २. विषाला. ३. शाप न्न हन्–**पंत.** ४. माझी आज्ञा. ५. कृष्ण-कीर्तीपुढें फिकें पडल्यानें ताप व आता त्याच्या असंभवामुळें आनंद. ६. पौर्णिमा –**पंत.** ७. दुःखरूपी विषाचें सिंचन.

बा! यादवराज्यपदीं मीं वज्रातें[1] स्वयें चि बसवीन.' २८
ऐसें वसुदेवासीं बोलुनियां, दारुकासि धाडूनीं,
यदुसचिव, पौरमुख्य[2], द्रुत आणविलें सभेंत झाडूनीं[3]. २९
त्यांसि म्हणे, 'न वसावें तप्तसरामाजि तप्तमीनाहीं,
सिंधु पुरीतें बुडविल, दिवसीं होईल सप्तमीं[4] नाहीं[5]. ३०
इंद्रप्रस्थासि तुम्हां नेतों, व्हा सिद्ध; सातवा साचा
प्रस्थानदिवस धरिला: स्पष्ट करिल लोभ[6] घात वासाचा[6].' ३१
सांगे ऐसें अर्जुन वृष्णींच्या जेधवां अमात्यांतें,
ती वर्षाकाळींची होय सुधर्मा* सभा अमा[8] त्यांतें. ३२
प्रभुमंदिरांत रात्रि प्रभुसख राहे जयांत, माकांत[9]
सर्वत्र पूर्ण जैसा पूर्वीं पाहे, तसा चि आकांत. ३३
लाजावें चि सविद्युत् सग्रहनक्षत्र नभ यदाकारा,
तें प्रभुगृह तैंवि तया, जैसी चोरासि न भयदा कारा[10]. ३४
प्रातःकाळीं †आनकदुंदुभि शोकें परासुता पावे,
साहेल काय तो, ज्या नाशश्रवणें परासु[11] तापावे? ३५
त्यासह करिति तयाच्या देवक्यादि प्रिया स्त्रिया गमनः
पार्थ करी पुत्रत्व, व्यसनीं तो विकळ होउ दे न मन. ३६
मग जावूनि निरखिला पार्थें अत्युग्र तो कदनदेश[12],
त्या मृतयदुनिकर, जसा यादा आटोनि शोकद नदेशीं[13]. ३७
पाहे यादवकदनस्थळ सर्व हि, म्हणुनि 'हा[14]!' तदा हा[15] तें,

१. कृष्णात्मजप्रद्युम्नपुत्रअनिरुद्धाचा मुलगा, त्यातें. २. ग्रामस्थाचे पुढारी. ३. यच्चावत्. ४. आजपासून सातव्या दिवशीं. ५. नाईशीं होईल. ६. द्वारकावसतीचा लोभ घात करिल—**पंत.** ७. शोके आधारी येता—**पंत.** ८. अमावास्या. ९. लक्ष्मीपति. १०. बंदिशाळा. ११. अरिप्राण—**पंत.** १२. यादवांच्या युद्धाचा प्रदेश. १३. महानद—**पंत.** १४. खेद—**पंत.** १५. पार्थ—**पंत.** * सुधर्मानामक देवसभेसारखी यादवसभा. † वसुदेवाच्या जन्मकाली देवानीं आनकदुंदुभी वाजविल्यावरून त्याला हें नांव पडलें आहे.

[1]प्रभुदेहाच्या करि, निज मुसळसख चि गणुनि हात, दाहातें.
सर्वांचें ही तेथें तो विधिवत् प्रेतकार्य संपादी,
उसळे, परि वरिचेवरि जिरवी धैर्यें चि अश्रुकंपादि. ३९
सप्तमदिवसीं पार्थ स्वरथीं बैसोनियां, सशोकातें,
घेउनि निघे अशेषा त्या द्वारवतीनिवासिलोकातें. ४०
जो स्त्रीजन चालविला वाहुनि रथवाजिहस्तिशिबिकांहीं,
तो मनि म्हणे, 'न कुंतीसूनुहुनि अधिक [2]शरण्य शिबि कांहीं.'
बुडवी सागर सहसा, ज्या देशा त्यजुनि तो जन निघाला;
पार्थ म्हणे, 'पडला तुजवरि काळ द्वारके! जननि! घाला.'
ज्या अर्जुन प्रदेशा सोडी, त्या सिंधु तत्क्षणीं बुडवी;
'धन सोडुनि जा,' ऐसें गर्जुनि, जनधैर्य तृण तसें उडवी. ४३
'मीं कोशाध्यक्षः पुन्हां होइल अवतार विष्णुचा; जन हो!
धन होय प्रभुचें हें; तुमचें लोभें न आंधळें मन हो.' ४४
ऐसें गर्जत, मागें धावे सागर, पुरीस बुडवीत,
पुरजन पळे, जसा [3]परिजन येतां तुरग [4]पार्ष्णि तुडवीत. ४५
नेली बहुजन[5]संहति बहु सांभाळूनि त्या महाभागें,
चाले त्यामागें ती, जैसी गंगा भगीरथामागें. ४६
'[6]प्रभुदार पात्र केले दुर्दैवें, करुनि वंचन, [7]दरा हे,'
ऐसें म्हणत, गाहिवरत, अर्जुन, पावोनि [8]पंचनद, राहे. ४७
तेथें स्त्रीधनलोभें [9]आभीर म्लेच्छ दस्यु बहु आले;
शस्त्रास्त्रभुजबळ न त्या विजयाचें तन्निवारणीं चाले. ४८
आधीं गुण चढवाया जातां, गांडीव न च लवे गा! तें;
इषुच्या न दस्युजन भी, वाताच्या जेंवि अचल वेगातें. ४९

१. भावार्थः—आपले हात हे यादवांचा नाश करणाऱ्या मुसळाचे च सांवर्ता आहेत असें समजून त्या हातांनी आपल्याच्या प्रेताला त्याने अग्नि दिला. २. आता. ३. सवक्र (सांतद्वार). ४. टाचा. ५. समूह. ६. ह्या कृष्णस्त्रिया. ७. सांवरिला. ८. हा च सांप्रतचा पंजाब असें म्हणतात. ९. एका संकीर्ण जातीचे लोक.

बहु चिंती, परि अस्त्रस्मरण नव्हे; सरुनि सर्व शर भाते
झाले चि रिते. दाविति काळबळें[1] शश हि गर्व शरभा ते. ५०
दंडें जेंवि पशूंतें, तो गांडीवें चि झोडपी त्यांतें.
असि तद्गति,*अमृताहुनि लागे यत्कीर्ति गोड पीत्यांतें. ५१
बा सुज्ञा जनमेजयराजा ! हे कालगति असी कुटिला;
अजितपरिग्रह[2] हि अजितसखविजयसमक्ष दस्युनीं लुटिला.
स्पष्ट बळात्कारें किति नेल्या प्रमदा हरूनि चोरानीं,
गेल्या स्वयें हि; विधिगति दुर्ज्ञेया वर्णिली च थोरानीं. ५३
यदुदार[3] बहुसहस्त्र प्रयुतार्बुद[4] काय ? कोन एकानें
सांभाळिला कथंचित्तद्विस्तर आयकों नये कानें. ५४
त्या काळीं *हृतशेष स्त्रीजनधन, तें चि बहुत भाउनि[6] घे,
धर्माचा, समरमखीं चोरांतें करुनि न हुत, भाउ निघे. ५५
जाउनि शक्रप्रस्थीं केला प्रभुपौत्र वज्र मग राजा,
त्या रुक्मिणी म्हणे, 'वा ! माजें सार्थक करूनि, नगरा जा.'
वैदर्भी[7], गांधारी, शैब्या देवी, तसी च हैमवती
अनळीं प्रवेशल्या, हो ! या चौघी, पांचवी हि जांबवती. ५७
सद्बुद्धि सत्यभामा, ज्या अन्या कृष्णसंमता भार्या,
त्या करुनि तपीं निश्चय, गेल्या लंघुनि हिमचळा, आर्या. ५८
वज्र बहु निवारी, परि शिरल्या चि सती सरस्वतीमाजी,
त्या अक्रूरवधूंचें किति यश वर्णिल सरस्वती माजी[9] ? ५९
सर्वस्व आपुलें जें, दे तें च, परस्व तीन दीनां दे,
सुरसिंधुसीं जगीं जगदिष्टार्थ सरस्वतीनदी नांदे. ६०

---

१. ससे देखील अनुकूल काळ असता सिंहास मारणाऱ्या शरभापुढें हि गर्व मिरवतात. २. श्रीकृष्णाचा परिवार. ३. यादवाच्या स्त्रिया. ४. दशलक्ष, दशकोटि. ५. एकट्या अर्जुनानें कसा तरी एक कोपरा साभाळला; पण तेवढ्यानें काय होणार ? कारण, यादवस्त्रिया हजारों, लाखों, कोट्यवधि होत्या. त्या सगळ्यांचा सांभाळ तो एकटा कसा करणार ? ६. मानुनि. ७. रुक्मिणी. ८. ह्या सर्व कृष्णस्त्रिया. ९. माझी ( कवीची ) वाणी. * हरण करून उरलेले.

नारद, मार्कंडेय, व्यास, भरद्वाज, याज्ञवल्क्य, मुनी
कृष्णश्राद्धीं धर्में जेवविले, परम आदरें नमुनीं. ९
मानधनें पूजुनि कृप, त्या धर्मन्यायजनकविप्रकरीं
शिष्यत्वें पौत्र दिला, व्हाया मत शूरजनकविप्रकरीं. १०
मग सर्व प्रकृतीतें आणउनि समग्रसाधुराय कवी,
त्यांतें कर्तव्य 'महाप्रस्थान' अजातशत्रु आयकवी. ११
होउनि बहु उद्विग्ना, करिती धर्माप्रति प्रजा प्रणती;
'बा! ऐसें न करावें त्वां,' यापरि गाहिवरोनि त्या म्हणती. १२
सांगे बहु समजावुनि जें धर्म नृप, प्रजा परिसती तें;
देती निरोप अंतीं, आग्रह करिति प्रजा परि मतीतें. १३
ज्या प्रभुनें करुनि पुढें, उत्तरी भूभाग पद्मनाभ रणें,
तो सानुज वल्कांतें स्वीकारी, त्यजुनि सर्व आभरणें. १४
पौत्रीं भूभर ठेवी, इष्टि करुनि, अग्नि धर्म तोयांत;
जन परम दुःख पावे, सानुज सस्त्रीक शर्म तो येत. १५
घरतीं तसा चि पौरांकरवीं म्हणवीत 'हा!'[?] निघे राजा,
नगरी म्हणे प्रजांतें, 'पति करितो, त्यजुनि, हानि; धरा जा.' १६
सस्त्रीक पाण्डवांतें निघतां, खेद वाटला तिश्वा;
त्यासीं लाडीगोडी तो, त्यांची धरुनि वाट, लावि श्वा. १७
ज्ञानें, तपें, प्रभावें, झाले न क्षम जया पर तराया,
जाउनि दूर, न शकले पौर म्हणाया तया, 'परत, राया!' १८
गेले पांडव झडकुनि, जय संपादुनि, जसे चि शूरवर,
परते अंतःपुर-पुर-जन धावुनि लाग जेंवि दुरवर. १९
गंगेनाजि उलूपी तापोनि उडी जलीं मगरिं घाली.
आर्या बहु शोकीं, मणिपुरीं चित्रांगदा मग निघाली. २०
उरल्या पांडवभार्या, आर्या शोकार्तबुद्धि ज्या अन्या,

---

१. समुदाय-**पंत.** २. जन-**पंत.** ३. गतनि-**पंत.** ४. या त्यागात-**पंत**
५. कुधा. ६. शत्रु. ७. जिंकण्याला; वरचढ करण्याला. ८. पाठलाग करणारे लोक.(?)

आश्रय करूनि बैसल्या अभिमन्युसुता परीक्षिता धन्या. २१
ते योगयुक्त भूतें[1], उपवास करीत, घालिती उजवी,
ज्यांची कीर्ति कळीचीं बहु करपृष्ठें[2] रदांबरें[3] सुजवी. २२
चाले पुढें युधिष्ठिर, त्यामागें भीमविजय, त्यापाठी[4]
नकुळ, सहदेव, देवी कृष्णा, धृतिची धरूनियां काठी. २३
देवीमागुनि चाले, श्रम गमनीं जरि, तथापि शुनक[5] वनीं;
सत्संगा सोडीना, जैसा दूषणपथा पिशुन[6] कवनीं. २४
तों लौहित्यजलार्णव[7], तेथें सानुज अजातरिपु गेला;
धरुनि पथ[8], पुरुषविग्रह[9] तो प्रभु पावक[10] पुढें उभा ठेला: २५
गांडीव अक्षयेषुधि[11] न त्यागी पार्थ रत्नलोभानें,
म्हणुनि, प्रकटुनि, तेजें उडवी यांचीं क्षणार्धें तो भानें. २६
त्यांसि म्हणे तो नामें घेउनि. 'ऐका मदुक्त, पांडव हो!
जाणा मातें, केलें ज्यां तें भक्षूनि भस्म खांडव, हो! २७
जावू जय गांडीव त्यजुनि, निरायुध तुम्हांसम वनातें;
समयीं येइल हस्तीं, करवाया साधुजनसमवनातें[12]. २८
वरुणाप्रति जावें हें: गेलें, ठेऊनि यश सुनाभ[13] जनीं;
मर्यादाश्वश्रूच्या[14] बहु जपती साधुमतिसुता भजनीं.' २९
बंधूक्त पार्थ टाकी भातें, गांडीव, चाप, तोयांत:
सर्वस्वाच्या होय न जो त्यागीं होय ताप तो यांत. ३०
गगनीं घन तेंवि जळीं गर्जे गांडीवचाप तो पातः
जाणों म्हणे, 'तव करीं पुनरपि येइन; करीं न कोपातें.' ३१
झाला गुप्त दहन, मग पांडव करिति प्रदक्षिणा महिला,

१. पृथ्वीनें-**पंत.** २. मनगटें. ३. आठ. ४. त्यापाठी? ५ कुत्रा. ६. नीच मनुष्य. ७. तांबडा समुद्र ८ वाट अडवून. ९. पुरुषाचें रूप धारण केलेला. १० अग्निनारायण. ११. अक्षय भाते. १२. संरक्षणासाठी. १३. सुदर्शनचक्र. १४ श्रेष्ठ लोकांनी घालून दिलेले नियम ही च कोणी सासू तिच्या. १५. या गांडीवत्यागात-**पंत.**

कीं, विष्णुची प्रसन्ना व्हावी ती क्षिप्र दक्षिणा[1] मंहिला. ३२
ती द्वारका निमग्ना ज्यांत, विलोकुनि अगाध अर्णव तो,
स्मरले प्रभुला पांडवः तत्प्रेमप्रसर[3] काय वर्णवतो? ३३
पांडुसुतांसि अकृष्ण स्थान, मयूरांसि नभ अघन गा! तें;
ते मानिति गुरु चित्तीं मेरुपरिस आपुल्या अघनगातें. ३४

---

## अध्याय दुसरा.

पांडव तेथुनि गेले योगबळें वायुसम हिमागातें;
कविकुळ सफळ कराया बहु ज्यांचा आयुस महिमा गातें. १
तेथें श्रीशंभु-शिवा-स्कंद-गणेशांसि नमुनियां धीर,
नीट स्वर्गपथें ते गेले, विषयीं धरुनियां वीर. २
गेले ते, लंघुनि बहु शैलनदीनदवनादि सायासः
लागे सुमेरु दूरुनि मग, निवावया मना, दिसायास. ३
तों भ्रष्टयोगशक्ति द्रुपदसुता ती धरातळीं पडली;
भीम म्हणे, 'बा धर्मा! ऐसी गति या सतीस कां घडली?' ४
धर्म म्हणे, 'कृष्णेला घडला कांहीं अधर्म मज कळला;
बहु पक्षपात विजयीं जो होता, तो चि या फळीं फळला.' ५
ऐसें बोलत जाय, न पाहे, पडली वृथा मुननु, तीतें;
तो पात्र होय, होउनि कठिनहृदय हीं, पृथासुत नुतीतें. ६
त्यावरि वृकोदर म्हणे, 'त्वत्प्रिय सहदेव हि प्रभो! पडला.
गुरुशुश्रूषातत्पर हाः याला हा निपात कां घडला?' ७
धर्म म्हणे, "या दोषें हा योगभ्रष्ट भूतळीं पडला,
कीं याच्या, 'मी एक प्राज्ञ,' असा मान मानसीं जडला." ८

१. उदारा. २. स्त्री-पंत. ३. त्याच्या प्रेमाचा विस्तार. ४. जीविताचें सार्थक करण्यास्तव ५. या परिणामानें फळास आला. ६. स्तुतीला.

पतित त्यजुनि म्हणे प्रभु निजचरणांसि,' न गणूनि असुख, चला;
नकुळ, प्रियानुजाच्या शोकें बहु पीडतां चि असु, खचला. ९
भीमें नकुळाचें ही पतन कळवितां, म्हणे अजातारी,
" नारिल इतर कवण त्या, बा ! निजशील चि जना न ज्या तारी?
' अप्रतिमरूप आपण एक चि; लोकीं सुरूप जे सर्व,
ते मत्समान नाहीं;' याच्या होता मनीं असा गर्व. ११
देवर्षिपतनकर जो गर्व, न देईल कां पतन यातें?
बा ! ये: पाहुनि पतिना माद्रीच्या, तूं न कांप, तनयातें." १२
बहु ' हाय !' म्हणे मार्गीं आठवुनि विजय मनीं मग तिघांस,
त्यांचा शोक तया दे सविषान्नाचा जसा च गति घांस. १३
पुनरपि भीम म्हणे, ' बा ! जो केशवसख सुकीर्तिचें वतन,
स्वैरीं हि अनृत न वदे, तो कां फाल्गुन हि पावला पतन?' १४
धर्म म्हणे, ' सर्वाहितदाहाचा एकदिन करी अवधी;
बोले मात्र बहु मुखें, परि अरिकरि हरि वदे तसे न वधी. १५
जे लोकांत धनुर्धर त्यातें हा वीरहीर अवमानी,
तत्फळ हे बा !, झाले बहु पतना पात्र भूमिधव मानी.' १६
ऐसें वदत, निघे प्रभु; न करिल हो ! कां तदा विलाप रसा?
वैराग्यें करुनि परम आप्त हि शोकांत दाविला परसा. १७
मग भूमितळीं पडला, योगगुणभ्रष्ट भीम हीरमणी.
ज्याच्या गदेसि होउनि परकरगा बहुत भी मही-रमणी. १८
भीम म्हणे, " सांग मला, कां त्वत्प्रिय मीं हि पावलों पतन?
धर्मा ! धन्य चि झालों ! सत्संगीं मृत हि जन म्हणे ' बत !' न."
धर्म म्हणे, " अतिभोक्ता तूं, ' मीं च बळी मनुष्यसृष्टींत,'

१. प्राण कासावीस होता च. २. हक्काचे ठिकाण. ३. थट्टेन देखील. ४. वायदा. ५. [ तो अर्जुनरूपी ] सिंह. ६. अभिमानी पृथ्वीपति. ७. वैराग्य परसा करूनि दाविला—पंत. ८. हिरा. ९. दुसऱ्याच्या हातांत गेलेली. १०. हाय ! हाय !

ऐसें वदोनि, आणित[1] नव्हतासि च बा ! परासि दृष्टांत. २०
या दोषास्तव भाजन भीमा झालासि आज पतनातें;
सुगुणांसीं[2] लावावें जें, असतें तें चि बा ! जपत नातें." २१
ऐसें बोलोनि, निघे, आप्त गुरु, परम दयालु, पर[3] तो न
परतोन त्यासि पाहे, निलयासि[4] सुयति जसा उपरतोन[5]. २२
विधि[6] जेंवि प्रभुचा ही क्षम तैसा भंग परशु[7] न कराया;
प्रियदारबंधु न[8] पथीं पुरले, दे संग पर शुनक राया. २३
तों येउनि शक्र म्हणे, 'बैस रथीं; चाल, सज्ज नाकास
जायाला हो सत्वर; सत्वरता ! घाल सज्जना ! कांस.' २४
धर्म म्हणे, 'देवेंद्रा ! झाले मद्दारबंधु जे शव, घे,
उठउनि, मज नेणें तरि, या दिव्यस्यंदनीं प्रथम अवघे.' २५
शक्र म्हणे, 'ते गेले स्वर्गीं सोडुनि मनुष्यदेहातें,
योद्धा, कृतार्थ होउनि, टाकुनि[9] मार्गण[10] धनुष्य दे हातें. २६
दिव्यरथीं बैसुनियां जाया तूं मात्र उचित या देहें.
बा ! स्वर्गलोक ऐसें यश, जो अत्यंत शुचि, तया दे हें.' २७
धर्म म्हणे, 'श्वा घे; न च[11] करु हा[11] जन घात सारमेयाचा[12];
मत्संगीं भ्रात्याचा आत्मा अनघा[13] तसा रमे गाचा. २८
नाकीं मम गति जसि, तसि हो मद्भक्ता हि या कुतारियाची.
कीं, जन भूतीं अदया अवलंबुनि शिव, जसा कुतरि, यांची[14].'
शक्र म्हणे, 'सुख भोगीं स्वर्गीं; झालासि मान्य मत्सम; या

१. जुमानीत नव्हताम. २. सद्गुणसंबंध रक्षणीं जपत असतां–पंत. ३. परंतु. ४. स्वगृहास. ५. वैराग्य प्राप्त झाल्यावर. ६. दैव. ७. कुऱ्हाड. ८. शेवटपर्यंत टिकले नाहीत. ९. टाकुनि देतो–पंत. १०. बाण. ११. मा. १२. कुत्र्याचा. १३. निष्पाप अशा. १४. अन्वयार्थः—जसा कुतरि अवलंबुनि (फुटक्या नावेचा आश्रय करून) जन शिव याची (मनुष्य कल्याणाची इच्छा करितो) [तसा] भूतीं (प्राणिमात्रावर) अदया अवलंबुनि शिव याची. अर्थात् उभयपक्षीं हि इच्छा सारख्या च अशक्य.

अपथ्रिआ टाकुनि दे: न भज अशा; जाणतोसि सत्समया.' ३०
धर्म म्हणे, "'भक्त त्यज' म्हणसी, परि मज घडे न आर्या! तें;
स्वर्गसुखार्थ, अकार्या न करिन, सोडूनि मीं सुकार्यातें. ३१
जीस्तव भक्तत्याग, श्रीसीं त्या मज नसो चि संगमन.
सोडिल सर्वस्वासि, न माजें पळभर हि भक्तसंग मन." ३२
इंद्र म्हणे, 'बा धर्मा! नाकीं नाहीं स्थळ श्ववंतास,
हरिति श्वदृष्ट सर्व क्रोधवश, कळे तुला हि संतास.' ३३
धर्म म्हणे, 'भक्ताचा त्याग असे ब्रह्मवधसम स्पष्ट:
तस्मात् स्वसुखार्थ न या त्यजिन; नसो सुख. जयापुढें कष्ट.'
शक्र म्हणे, 'प्रियदारभ्रात्यांच्या कठिन मानस त्यागा,
श्वा बहु मानुनि. कैसें दे होउनि, हठि, न मान सत्यागा.' ३५
धर्म म्हणे, 'या लोकीं मेल्यांसीं संधि विग्रह हि नाहीं;
उठवावे, तरि माझ्या आंगीं सामर्थ्य तें नसे कांहीं. ३६
यास्तव केला दारभ्रात्यांचा तो अकार्य न त्याग.
या भक्ता शुनकातें टाकिन, तरि मज घडेल अत्याग. ३७
मित्रद्रोह, स्त्रीवध. शरणागतदान, विप्रधनहरण,
बा! या चतुष्टयासम भक्तत्याग न घडो, घडो मरण.' ३८
इत्यादि जो वदे बहु सत्संमत तो कं विश्व ताराया,
निजधर्मता प्रकट करि, सोडुनियां तो कवि श्वता, राया! ३९
प्रकटुनि अजातरिपुतें धर्म म्हणे, 'बा! जगत्त्रयीं धन्य,

१. माधनीं घालून दिलेल्या नियमाला. २. सहवास. ३. कुत्र्याच्या धन्यास. ४. अन्वयार्थ:—सर्व क्रोधवश [होऊन] श्वदृष्ट (कुत्र्याने पाहिलेले म्हणजे हुंगलेले किंवा स्पर्श केलेले पदार्थ) हरिति (दूर टाकून देतात) [हे] तुला संतास हि कळे. ५. ज्या सुखाच्या अंतीं. ६. सत्यापराधास अशुचिश्वानग्रहरूपास मान देत नाहीं. अपराध होय असे हठ धरूनि मन मानीना; अथवा, सत्यास का गा! मान देत नाहीं?—**पंत.** (?). दुसऱ्या अर्थास पाठभेद 'सत्या गा!?' असा घेणे. ७. केलेला. ८. फिरोनि दैणें—**पंत.** ९. धर्मापत्य—**पंत.** १०. आपलें. यमधर्मस्वरूप. ११. सारमेयता—**पंत.**

पितृसम तूं चि, असा तों सत्पुत्र नसे चि ऐकिला अन्य. ४०
उपमा भूतदयेतें नाहीं च तुझ्या, तसी च मेधेतें;
रघुपतिशील स्मरतें, जेणें सच्चित्त विश्व वेधे, तें. ४१
द्वैतवनीं च निवालों, करुनि तुझी वासरा! परीक्षा मीं,
बहु हित तव शील जनीं अमृताच्या बा! सरापरी क्षामीं. ४२
भक्त शुनक न त्यजिला, जो बहु धन्यांसि दिव्य रथ वाहे,
अथवा हेयं तुज असु हि, सिद्धींचा ज्यांसि अवश न थवा हे.
याकरितां त्वत्तुल्य स्वर्गीं कोणी नसे चि, बा राया!
मानवले अतुळा तव तेज्या आदित्य फार बारा दा. ४४
पद जोडिलें सदेहें त्वां, योगी मृत्युउपर मागति तें;
त्वदनुजदार हि गेले, देहाच्या करुनि उपरमा, गतितें. ४५
पुण्यश्लोका! अद्भुतरूप तुझे लोक अक्षय; ज्ञानी
कोणी तव समतेतें पावतिल न अन्य लक्षयज्ञानीं. ४६
मग धर्म, शक्र, मारुत, दस्र, सुर, सुरर्षि, दिव्यरथरत्नीं
बसविति नृपासि; योगी आत्म्यासि जसे मुमुक्षु बहुयत्नीं. ४७
माथां देवर्षींचे विपुलाशीःपुष्पनिकर बरवे घे,
दिव्यरथारूढ द्युतिकरसा च रसापतींद्र वर देघे. ४८
तेव्हां देवर्षि म्हणे, "पूर्वीं झाला नसे असा राजा.

१. बुद्धीला. २ 'वत्सा'–**पंत.** ३. क्षीण अगर दीन जनांचे ठायीं. ४ जो दिव्य रथ पुष्कळ धन्य लोकांना [स्वर्गाला] वाहून नेतो [तो रथ त्वां त्यजिला], परंतु भक्त शुनक (कुत्रा) न त्यजिला. ५. टाकण्याला योग्य. ६. सर्वार्थसाधक–**पंत.** भावार्थ:—तूं भक्ताकरिता स्वर्गाचा त्याग केलास त्यांत कांहीं नवल नाहीं. कारण, ज्या तुझ्या प्राणाला सर्व सिद्धींचा समूह (अष्टसिद्धि) वश आहेत असे प्राण देखील टाकण्याला तूं मागेंपुढें पहाणार नाहींस. ७. या तव तेजा फार मानवले–**पंत.** ८ अंताला. ९. तुला प्राप्त झालेले लोक (वैकुंठादि) अद्भुतरूप आणि अक्षय असे आहेत. १०. अश्विनीकुमार. ११. पुष्कळ आशीर्वादयुक्त फुलांचा समूह. १२. सूर्यासारखा. १३. धर्म रसाप्रतींद्र (पृथ्वीचा जरि पति होता तरी) आकाशांत चढूं लागला.

याचें यश सेउनि, कवि म्हणतील, 'अमृतरसा! असारा! जा.'
या श्रीयुधिष्ठिराची कीर्ति शरच्चंद्रचंद्रिकासारा;
तारा इतरा. क्षीराब्धिसमता कसि वरिल दुग्धकासारा?" ५०
अत्युच्च बृहद्वादी ऐसें नारद बृहत्तपा बोले,
तें ऐकुनि राजर्षि, ब्रह्मर्षि, सुरर्षि, सर्व ही डोले. ५१
देवैंस्वपक्षपार्थिव तेव्हां होते समीप जे, त्यांतें
प्रार्थुनि युधिष्ठिर म्हणे स्वर्गपथीं स्तवुनि हर्षदेत्यांतेंः- ५२
'जेथें असतिल माझे कृष्णेसह बंधु ज्या अवस्थानीं,
तेथें चि न्या, असो शुभ अशुभ; न न्यावें चि मज नवस्थानीं.'
शक्र म्हणे, 'या स्वसुकृतनिर्जितनाकीं सुखें करीं क्रीडा;
स्नेह मनुष्यपणींचा त्यज; बहुभाग्यांत दैन्य दे व्रीडा. ५४
झाला न अन्य कोणी राया! या परमसिद्धिला पात्र,
गात्रत्याग न करितां स्वर्गनिवासार्ह एक तूं मात्र. ५५
झालासि पात्र तेथें स्वर्गस्थांच्या उपायना नाकीं,
येथें याया देहत्यागादि करिति उपाय नाना कीं. ५६
जी महि अहितशतजिता, जिंकायाला, करूनि आजि, तिला,
शकले तव अनुजनु परि न तिहीं त्वां तेंवि नाक हा जिंतिला.'
धर्म म्हणे, 'मीं स्वर्गीं सुख भोगाया नसें चि उत्साही.
मज मान्या भ्रात्यांसह जैसी पूजा, तसी च कुत्सा ही. ५८

१. हें वेचव 'अमृता' न आता काळें कर. २. शरदृतूतील चंद्राच्या चांदण्याच्या योग्यतेची. ३. इतर राजांची कीर्ति ताऱ्याप्रमाणे चांदण्यांत फिकी पडणारी. ४. क्षीरसमुद्राची योग्यता. ५. बृहत म्हणजे नारदाची वीणा ती वाजविणारा तो बृहद्वादी; अथवा बृहत म्हणजे सामवेद, त्याचें गायन करणारा तो बृहद्वादी. ६. बृहत म्हणजे मोठें आहे तप ज्याचें तो बृहत्तपा असा नारद. ७. देव आणि आपल्या बाजूचे राजे. ८. स्थितींत. ९. लाज; भीड. १०. नजराण्याला. ११. युद्ध. १२. तुझ्या पाठीमागून आहे जनु म्हणजे जन्म ज्यांचा असे कनिष्ठ भ्रात. १३. मूळपाठ–त्वां तेंवि तिहीं न.

जेथें[1] बृहती श्यामा, मतिसत्वसमन्विता[2], असे कृष्णा,
तेथें चि वसेन सुखें; तदितरसंपत्तिची नसे तृष्णा. ५९
प्रियदारबंधुरहिता मज नाक विष प्रभो! गमो, राहो.
विद्युद्रंजित[3]मुदिरांवांचूनि रुचे न भोग मोरा हो !' ६०

इति श्रीमहाभारते श्रीरामनंदनमयूरविरचिते महाप्रस्थानिके पर्वणि द्वितीयोऽध्याय । श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥



१. अत्यंत सुंदर. २. बुद्धि आणि धैर्य ह्यांनीं युक्त अशी. ३. विजेने प्रकाशित अशा मेघांशिवाय.

# स्वर्गारोहणपर्व.

## अध्याय पहिला.

तिलक सुकृतकीर्तींचा धर्म स्वर्गासि शतमखें नेला;
केला बंधुवियोगें खिन्न, परि सुरादराग्रहें[1] गेला. १
सुरपूजित शतमखसम परमासनगत[2] सुयोधन खलेश
दिसला, धर्म न सोसी: हरिचा जैसा सुयोध नखलेश. २
परते युधिष्ठिर म्हणे, 'या अपमानानळें न भाजावें:
भूविवरांत शिरावें, किंवा लंघुनि बळें नभा जावें. ३
ज्या लोकांत खळाचा बहुमान, तयांत कोण राहेल?
पाहेल[3] बाळ केवळ अनुचित[3]: अपमान दगड[4] साहेल.' ४
नारद म्हणे, "नृलोकीं करिती, न तसा विरोध या नाकीं;
यावें[5] येथ विकारा दवडूनि, म्हणुनि, 'फिरोनि याना कीं?' ५
सर्वामरपूज्यस्वभ्रातृव्यासीं भेट, धन्य वासर हा.
व्रतादि न चिंतुनियां, स्वर्गीं सोडूनि अन्यवास, रहा." ६
धर्म म्हणे, 'देवर्षे! जरि त्या[6] उग्रा[6] अनुग्र हा लोक;
मद्भ्रात्यांचा[7] कैसा? दावू मज तव अनुग्रहालोक[8]. ७
द्रुपदविराटादिक जे साधु रणमखांत पावले पतन.
त्यांसि दिलें देवाहीं कोणा लोकांत मुनिवरा! वतन? ८

---

१. देवाच्या आदरयुक्त आग्रहाने. २. श्रेष्ठ आसनावर बसलेला. ३. लहान मूल अयोग्य प्रकार पाहून सहन करील. ४. अचेतन वस्तु अपमान सहन करील. ५. आपल्या मनोविकाराना 'पुन्हा तुम्ही परत येणार नाही ना?' असें बजावून अखेरचा निरोप घेऊन येथे स्वर्गाला यावे. ६. त्या क्रूर दुर्योधनाला. ७. माझ्या भीमादि बंधूना मिळालेला लोक कसा आहे? ८. तुझे अनुग्रहयुक्तावलोकन–**पंत.**

जेथें कर्ण असे, ते अभिमन्युप्रमुख सुत हि असती, तें
स्थान मम स्वर्ग; इतर गतितें न सिवेन, जेंवि अ-सतीतें.' ९
सुर म्हणती, "भ्रात्यांच्या लोकीं जाणार तूं जरि, प्राज्ञा!
जा, प्रभुची 'धर्मप्रिय सर्व करावें,' असी असे आज्ञा." १०
ऐसें बोलोनि दिला देवानीं दूत, तो पुढें चाले,
त्यामागें धर्म प्रभु, कवि ज्याच्या सद्यशोमृतें धाले. ११
दाखविला सुरदूतें पुण्यश्लोकास मार्ग नरकाचा,
त्या परमदुर्गम तो जाय प्रभुवर्य, जेंवि नर कोचा. १२
धर्म म्हणे, 'हा हा! कां दिसति सकळ नरक यातना नाकीं?
येथिल भूमि सिकविती, करुनि सुखीं गरक, या तनाना कीं?'
त्या सुरदूतासि म्हणे, 'किति जायाचें असें पुढें आहे?'
तो परतोनि वदे, 'ये मार्गें, श्रम जरि मना न हा साहे.' १४
परते, परतायाचें दूत वदे जें, मनांत आणी तें.
बहु नरकदर्शनातें कंटाळे पांडुपुत्र घाणीतें. १५
तों परिसे नरकपतितदीनांच्या परततां चि हाकांतें,
ठाके उभा. शुभाशय आर्तोक्त अनादरील हा कां तें? १६
'पुण्यश्लोका! धर्मा! बा! एक मुहूर्तभरि तरी राहें.
सान्निध्य तुझें दुःख न बाधों दे आमुच्या शरीरा हें. १७
त्वद्देहपुण्यगंध ग्रहण करुनि, मंद शीत पवमान
वाहों दे, बा! दीनानुग्रह बहु वाढवील तव मान.' १८
ऐसें ऐकुनि ठाके नरकपतितदीनवेदनाशमना;
कविच्या व्रतनाश श्रमकर, विधिच्या जेंवि वेदनाश, मना. १९
गमले श्रुतपूर्व, बहु प्रिय, परिचित शब्द ते; न ज्या तारी

१. इंद्रानीं. २. मूळ पोथींत ही आर्या पत्राच्या अर्धभागावर समाप्त झाली असून पत्राचा पुढील अर्धभाग २८ पोकळ टिकांनीं भरून काढला आहे, यावरून काय अनुमान करावयाचें? ३. भित्रा. ४. या येथिल भूमि–पंत. ५. अर्थ? ६. कल्याणकारक आहे हेतु ज्याचा असा धर्म. ७. वारा.

स्वपरिचय, असा हा जन कोण?' म्हणे तो मनीं अजातारी.
मग त्यांतें, 'कवण तुम्हीं?' ऐसें तो साधुपति पुसे नाकीं,
चित्तीं म्हणे, 'स्वकीर्ति स्वपरिचितारक्षणें रुसेना कीं?' २१
पुसतां सम सर्व म्हणति, 'मीं कर्ण ज्येष्ठबंधु तव राज्या!'
'मीं भीमसेन:' 'मीं तो, रक्षी श्रीचा रणांत नवरा ज्या.' २२
'मीं नकुळ, नृपा!' 'मीं सहदेव, तुझा जो बहिश्चर प्राण;'
'मीं कृष्णा:' 'आम्हीं प्रतिविंध्यादि समस्त सुत तुझे जाण.'
तें ऐकुनि धर्म म्हणे, "यांसि महादोष हे कधीं घडले?
सुतबंधुदार सुकृती हा! हा! नरकीं कसे असे पडले? २४
तो[2] नाकीं, पावावा जो, पावुनि नरक, पातकी नाश,
ज्यां स्वर्गवास द्यावा, त्यां देतो नरकपात कीनाश[3]. २५
रे[4] धर्मा! मागें, कर जोडुनि देवांसि, सरक. वासवसा
पूजिति पाप सुयोधन: यांसि[5] म्हणति, 'वरुनि नरकवास वसा.'
स्पष्ट स्वप्न चि किंवा भ्रम मज पडला असेल? अथवा हे
कर्मांची गति गहना: संसारीं बहुत हा चि पथ वाहे." २७
देवांतें धर्मातें निंदुनि, होवूनि तप्त बहु रागें,
दूतासि म्हणे, "भद्रा! तूं ज्यांचा, त्यांकडे चि जा मागें. २८
जाउनि सांग सुरांतें, 'येथें मीं राहिलों; नभा वातें
जेंवि, तसें भावानें सोडावें आपुल्या न भावातें. २९
होतात सुखी नरकीं माझ्या पावोनि सन्निधानातें;
मीं हि निवालों, जैसा निर्धन लाहोनि सन्निधानातें.'" ३०
त्या सद्वृत्तें हरिला[6] निववी, आपण जसा निवे, दूत.
मग हरि हि म्हणे, 'कविजन निववाया या रसा निवेदूं[7]त.' ३१

१. एकदम, एका च वेळीं. २. दुर्योधन–**पंत.** ३. यम–**पंत.** ४. हे धर्माचें स्वगत भाषण आहे. देवांना हात जोडून त्याच्यापासून दूर रहा. ५. कर्णादिकांस–**पंत.** ६. इंद्राला. ७. कथन करोत.

मोहें, जसा प्रपंचा[1] मानूनि असारसा पेतित, उकडे;
होता मुहूर्त शोकभ्रमभार असा[2] रैसापतितउकडे. ३२
भेटे अजातरिपुला हरि जाणुनि लोकपाळ सुरसहित,
हरुनि नरकताप वदे, बहु वर्णुनि तो[4] कृपाळ, सुरस हित:- ३३
'राज्या युधिष्ठिरा! त्वां न धरावा मन्यु कीं मनीं शोक.
बा! सिद्धिप्राप्ति तुला झाली; अक्षय भले तुझे लोक. ३४
नरक अवश्य पहावे सर्वनृपांहीं, खरें वचन मान.
बा नरवर्या! देतें मर्यादेतें कुलीनमन मान. ३५
शुभ अशुभ कर्म असतें, फळ त्याचें स्वर्ग नरक; लघु आधीं,
मग गुरु; मर्यादेच्या शक्त हि बुध न प्रवर्तती बाधीं. ३६
स्वर्गास प्रथम चि जो घाली सेवावयासि नर कास,
तो मग जातो राजा धर्मा! भोगावयासि नरकास. ३७
आधीं जो घालितसे, धरुनि नरकभोगकामना, कास,
मग तो येतो, वरवपु[6] वरुनि, नर कभोगकाम[7] नाकास. ३८
आराधुनि, तूं विद्याकीर्ति नृपा! पावलासि, भव्या[8] ज्या
करिता झालासि तया गुरुसीं, व्हाया महाशुभ, व्याजा[9]. ३९
म्हणुनि तुला हे नरक प्रथम व्याजें चि दाविले, बापा!
पापापासुनि मुक्त चि केलासि, मुहूर्त भोगवुनि तापा. ४०
तूं, तेंवि सदार तुझे अनुज, व्याजें चि नरकगत, राया!
जे अन्या ताराया, ते व्हाल समर्थ काय न तराया? ४१
पर[10]भट न पावले जें पद, शूर तुझे स्वपक्ष बा! जे तें.

१ ब्रह्ममया-**पंत.** २ समारा पडला उकडतो-बहु तापतो-**पंत.** ३. राजा चालतांमागिला; त्याच्या ठायीं शोकभ्रमभार गळोन जायास चि कांहीं काळ होता-**पंत.** ४ धर्माचें नशीब. ५. राग. ६. सुंदर (दिव्य) शरीर धारण करून ७. सुख-**पंत.** सुख भोगण्याची इच्छा धरणारा. ८. ज्या कल्याणप्रद अशा गुरूंची आराधना करून. ९. कपट. १०. अन्वयार्थ:-बा! जें पद परभट न पावले, तें पद जे तुझे शूर स्वपक्ष [ते] पावले. [तुझें] मन शोकाच्या सगडीतें (शेगडीतें). [आणि] चिंतेच्या बाजेतें न भजो.

शोकाच्या सगडीतें, मन चिंतेच्या भजो न बाजेतें. ४२
ज्याचा शोक करिसि तूं, स्वस्थानीं हृष्ट कर्ण नांदे तो;
गात्यांतें वर रविसा रविसुत, परिसोनि वर्णनां, देतो. ४३
कर्ण, वृकोदर, फाल्गुन, यम, सौभद्रादिपुत्र, जे स्वजन,
ये, त्यांसि पहा, ज्यांचें करिती गंधर्व अप्सरा भजन. ४४
मजसह उत्तमलोकीं, जें इच्छित, वरुनि तें, विहार करीं.
जपति गुनि तुज वराया, जेंवि वधू, धरुनि तेंवि हार करीं. ४५
जे राजसूयनिर्जित, हयमखवर्धित, सुलोक, अनराते !
दानज्ञानतपोर्जित, अन्या धन्या हि सुलभ न नरा ते. ४६
लोक इतर राज्यांचे जे, त्यांच्या उपरिउपरि तव लोक,
जेंवि हरिश्चंद्र तसा उत्तमलोकीं समृद्धि अवलोक. ४७
भरत, भगीरथ, जेथें मांधाता मनुजनायक विराजे,
तेथें विराज: होतिल तुज गाउनि हृष्टकाय कविराजे. ४८
नरभाव सरो दे, हो सिद्ध सुरनदींत मज्जन कराया;
अन्यांची काय कथा? तुज बहुमानिल मज्जनक राया!' ४९
यमधर्म म्हणे, 'झालों तुझिया ठायीं प्रसन्न तनया! मीं,
राजेंद्रा! रजनीच्या जेंवि चतुर्थी प्रबुद्ध जन यामीं. ५०
या तिसरिया परीक्षेमध्यें ही आजि उतरलासि कसीं;
होतील असीं सुयशें प्राप्त भलत्या चि सुतरलासि कसीं? ५१
हीरातें जेंवि घनीं परीक्षितां, अग्निमाजि हेमातें;
तूनें छळीं, मिळाली अत्यंत प्रीति आजि हे मातें. ५२

१. वैकठवासादि भरुनि. २ राजसूययज्ञानें जिंकून घेतल्याप्रमाणे प्राप्त करून घेतलेले, अश्वमेधयज्ञानें वृद्धिगत केलेले व ज्ञान, दान आणि तप यांनी संपादन केलेले उत्तम लोक. ३. फार वर. ४. कश्यप. ५. रात्रीच्या चवथ्या प्रहरांत (ब्राह्म मुहूर्त) निजून उठलेल्या मनुष्याचें मन जसें प्रसन्न असतें तसा मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहें. ६. चपल-**पंत.** ७ घणाच्या घावानें. ८. परीक्षिता-**पंत.** तुझा छळ करून परीक्षा केली असता. * अजातरिपो क्षमा!

सुरपतिनें केली तव सत्वपरीक्षार्थ मात्र हे माया,
आतां गंगेमध्यें निववीं अतितप्तगात्रहेमा या. ५३
तव बंधुदार कोण्हीं पडले नाहीं च नंदना ! नरकीं,
तुमच्या कीर्तिश्रवणें पावतिल पुढें हि नंदना नर कीं. ५४
मग मज्जन तींत करी, जीणें बहु निववली नमज्जनता:
जी भगवती म्हणतसे पाप्या ही, 'नारकीं न मज्ज' नता. ५५
स्नानीं नरतनु घेउनि, दे दिव्याकृति सुरापगा याला,
जींत बुडोनि, सुरांनें लावी निजयश सुराप गायाला. ५६
स्नानेंकरूनि गेला, जो होता वैरभाव, तो मळसा:
जेणें, असुनि हि, दिसला सानुज दुर्योधनीं न कोमळसा. ५७
दिव्याकृति, दिव्यांबर, दिव्यालंकारधर, महातेजा,
'झाला हरि च,' म्हणति हरिपरिचित देवर्षि ही पहाते ज्या.
जे करि अजातरिपुचें, बहुमानुनि देवपतिसम, स्तवन,
वाटे वसंत तो, तें सुरमुनिवंळ हृष्टमनि समस्त वन. ५९

## अध्याय दुसरा.



धर्म सुरनदीस्नान करता नरभावसह महायास,
गेला जेथें कौरव होते, तेथें चि तो पहायास. १
कौरव पाहों गेला, तों तेथें कृष्ण देखिले हो ! ते,
ज्या रूपें, ज्या वेषें, जैसे हृदयांत रेखिले होते. २

१. दुःखानें मनप्त झालेलें शरीररूप सोनें. २. नंदनवनाला. ३. वंदन करणारा जनसमूह. ४. नरकीं—पंत. ५. नम्रा—पंत ६. ज्या गंगानदींत सहज पडून बुडाला तरी. ७. मद्यप्राशन करणारा [ देखील ]. ८. कटक, समूह—पंत. ९. आनंदित झालें आहे मन ज्याचें असें. १०. कृष्णार्जुन.

चिरकांक्षिता सुसुखदा भेटि यथायोग्य होय हो! त्यांची,
प्रेमें परस्पर हृदयतोयरुहा तरणितोय होत्यांची. ३
तैसा चि वायुलोकीं पाहे त्या वायुमूर्ति भीमातें,
जो होता निजतेज प्रकट करुनियां, जया न सीमा, तें. ४
नकुळसहदेव पाहे स्वस्थानीं मूर्त जेंवि नासत्य;
कर्म ससत्य करिति गुरुमोहा तें धूर्त, जें विना सत्य. ५
वैकुंठीं जसि लक्ष्मी, धरुनि प्रभुदास्यलोभ, लीना कीं,
कैलासीं दुर्गा तसि कृष्णादेवी हि शोभली नाकीं. ६
नेला समीप सहसा, परि साधु न तन्मुखाकडे पाहे,
शक्र म्हणे, " सत्पुरुषा! दयिता द्रुपदात्मजा तुझी बा! हे. ७
हे स्वर्गश्री भर्गें दिधली होती तुम्हांसि रत्यर्थ,
बहु पुण्यगंध जीच्या देहीं, लावण्यगुण हि अत्यर्थ. ८
गंधर्व महाभाग प्रतिविंध्यप्रमुख पांच सुत झाले;
ते हे स्वर्गीं पुनरपि, सुरकार्य करुनि, फिरोनियां आले. ९
जो अंध ज्येष्ठपिता, तो हा गंधर्वराज धृतराष्ट्र.
येणें चि देवकार्याकरितां तूं करविलासि हृतराष्ट्र. १०
कथितों ताप हराया रांया! प्रिय हित, मदुक्त आकर्ण.
ज्यातें शोचिसि, रविचा पुत्र पहा स्पष्ट तो चि हा कर्ण. ११
हे साध्य, वसु, मरुद्गण; वृष्णींतें, स्मरण धरुनि, यांत पहा.
हा सौभद्र शशितनय. नें म्हणे कोणी हि करुनियां तप, 'हा!'
हा कुंतीमाद्रीसह पांडु, पहा, बसुनिया वरविमानीं,
आला तुज भेटाया; रवि गमतो, तदपि तूं न रवि मानी. १३

---

१. फार दिवसापासून इच्छिलेली. २. हृदयरूपी कमलाला. ३. सूर्य आणि पाणी. ४. होणारे असे जे कृष्णार्जुन त्यांची. ५. गुरुजनमनोमोहनार्थ–**पंत.** ६. शंकराने. ७. बहुत–**पंत.** ८. ऐक. ९. हे स्वलोकातें आले. शोक वृथा केला. तुजसारिखे तपस्वी यांचा घात होत नाही–**पंत.** भावार्थ.

वसुसह आला भीष्म स्थैर्यविजितमेरुपर्वत,[1] पहा, हा.
ज्याच्या तपासि पाहुनि, वदले लोकांत सर्व तप 'हा ! हा !'
[3]गुरुला गुरु शोभवितो, विधु शारद जेंवि शारदा बा ! हे.
तें ज्ञानदान देती, ध्यायाला जे विशारदा आहे. १५
जे नरवर, जे योद्धे, तुझिया कार्यार्थ संगरीं मेले,
गंधर्वयक्षगुह्यकपुण्यजनांमाजि ते नृपा ! गेले. १६
ज्या ज्या [6]रणरंगनटें दाखविले वरगुणें असे नाचः
त्या त्याला या स्वर्गीं बहुमानः सुखा उणें असेना च. १७
धर्मार्थ जाय सोडुनि सहसा, होतां चि बरि पहाट; पती:
तत्संगा जसि दयिता, त्वत्संगा सिद्धि तसि, पहा टपती." १८
इत्यादि हरि वदे, तें जेंवि मयूरासि वर्ष, वीरा या
उत्तमलोकगता कुरुकुलतिलका फार हर्षवी, राया ! १९
जनमेजय भूप पुसे, 'गेले स्वर्गासि जे असे योध,
तद्गति काय पुढें ? वद. आहे तुज गुरुवरें बुधा ! शोध.' २०
वैशंपायन सांगे, 'कर्मांतीं प्रकृतितें चि पावावें,
[11]सेतु असा चि असे; त्वां चित्त प्रश्नोत्तरीं च लावावें.' २१
भीष्म प्रवेशला, वसु होते तितुके चि राहिले आठ,
जेथुनि जो झाला, तो त्यांत शिरे, एकरूप हा [12]पाठ. २२
राज्या ! त्या देवांच्या आचार्यांत प्रवेशला द्रोण.
मुनि वदला, परि विस्तरभीरु कवि पुन्हां वदेल हें कोण ? २३
सूत म्हणे, "ऐसा द्विजवर्या ! शौनकमुने ! कथा राज्या

१. आपल्या स्थिरपणानें जिंकला आहे मेरुपर्वत ज्यानें असा. २. तदनंतर सर्व तप. ३. बृहस्पतीला. ४. शरदृतूंतील चंद्र. ५. ज्ञानिगुरुद्रोण ज्ञानमानिमत्र सव-प्राध्य-**पंत.** ६. युद्धभूमीवरील नटानें. ७. सडासंमार्जनादि गृहधर्मकृत्यें करण्यासाठीं. ८. अरुणोदय. ९. व्यासाच्या वरानें. १०. ईश्वरी प्रकृतींत (स्वरूपांत) लीन व्हावें. ११. मर्यादा-**पंत.** १२. अखेर एकरूप होणें म्हणजे सायुज्यमुक्ति हा च परिपाठ [ आहे ].

वैशंपायन सांगे देती दोषां मनीं न थारा ज्या. २४
निजपूर्वजचरितांहीं होय मुदित, जेंवि तोक थानाहीं.
'ऐशा' म्हणे, 'परांच्या' जनमेजय भूप तो, 'कथा नाहीं.' २५
पूजी सर्वस्वें बहुमानें क्रतुच्या द्विजांसि अवसानीं,
पुरवावे काम जिहीं, श्रीपतिच्या सर्व जेंवि नवसानीं. २६
आस्तीक प्रीतीतें पावे, रक्षूनि तक्षका मरणीं,
सुकवि कविसभेसि, जसा जिंकुनि दयितेसि दक्ष कामरणीं.
यज्ञ समाप्त करुनि, शिर विप्रांच्या पदरजांत लोळउनीं,
आला कृतकृत्य प्रभु, सर्वांतें सबहुमान बोळउनीं. २८
मग तक्षशिळेहुनि तो जनमेजय गजपुरासि ये, राहे;
काय कथा होय रसिकसुबहुमता रससुराशि येरां हे? २९
श्रीमान् सर्वश्रेष्ठ ग्रंथांच्या पूज्य हा जय शतातें,
ज्यांत शुकाच्या केलें प्रकट कथुनि धर्मराजयश तातें. ३०
दिधलें सत्यवतीच्या पुण्ययश अनंत शर्म दायादें,
यांत कविकुळें, न तसीं यमुनासुरसिंधुनर्मदा यादें. ३१
न स्तवित्यांसि म्हणा, 'जिभ जरि न धरिल मौन, कापुनि वहा रे!'
वा! शारदी हि याच्या कीर्तिपुढें शौनका! पुनिव हारे. ३२
या ग्रंथा आदरितिल, जे हरिहरदास साधु सुरसिक, ते;
वाटे नरलोकीं जरि असते, तरि परिसतां चि सुर सिकते. ३३
श्रीमदुपाध्यायोत्तमकविवरकेशवगणेशपादरजा

---

१. इतर राजाच्या. २. सर्पसत्राच्या शेवटा. ३. चांगला कवि कविसमुदायाला जिंकुनि [किंवा] दक्ष कामरणीं (रतिक्रीडेंत) दयितेस जिंकुनि जसा प्रीतीतें पावे [तसा] आस्तीक तक्षकाला मृत्युमुखांतून वांचवून प्रीतीतें पावे. ४. यज्ञस्थान-पंत. ५. नवरसाचा उत्तम ठेवा. ६. रसिकाखेरीज इतरांना याची काय गोडी? ७. महाभारतग्रंथ. ८. सत्यवतीचा सुत जो व्यास त्यानें. ९. कार्तिकी पौर्णिमा सुद्धां धर्मराज्याच्या यशापुढें फिका पडेल. १०. अध्ययन करितें. ११. हे पन्हाळगडकर केशव आणि गणेश पाध्ये पंताचे विद्यागुरु होत.

धरुनि शिरीं, हें सयश लिहिलें, पीताति साधु सादर ज्या.
जो धीरवीरहीर, श्रीसिद्धे[1]श्वरमहादयापात्र,
श्रीमान् बाबूराय प्रभु, ज्याचें शोभलें यशें गात्र. ३५
भीष्मद्रोणसम गुणें, शांडिल्य[2]सुगोत्रपद्मरवि, दे हा
आश्रय, शंकर जैसा उपमन्यु[3]मना, मयूरकविदेहा. ३६
शीलें[4]जितामरचंदनतन्नंदन पांडुरंगराय हि तें
यश मिरवितो; प्रजांचीं करि दशरथसा न राम काय हितें?
श्रीगीतेच्या एकादशसंख्याचा जसा उपा[5]ध्याय,
केवळ भक्तिरसमय श्रीमदनंता[6]ख्य जो उपाध्याय, ३८
तो होयें, शोभवुनि या कवनातें, साधु विप्र भासविता[7].
निजतेजें श्री देवुनि पंकरुहा जेंवि विप्रभा[8] सविता. ३९
बहु शोभाप्रद झाला श्रीविठ्ठल[9] भक्तराय कवनातें,
जेंवि ऋतूंचा करिता प्रकट गुण वसंत नायक वनातें. ४०
[10]पाहे प्रणता तोका, नव्यासम हाक विप्र सादास
विप्राच्या दे, न करी न व्यास महाकवि प्रसादास. ४१
धन्य श्रीराम पिता, धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली,

---

१. श्रीसिद्धेश्वर हे बाबूजींचे उपास्य दैवत. बाबूजींनी बागमनी येथे श्रीसिद्धेश्वराचे एक मंदिर बांधलें आहे. २. शांडिल्यसगोत्ररूपी कमळाला [ विकसित करणारा ] सूर्य. ( कुलदीपक ). ३. कथासदम मार्ग अनु० अ० ११२ पहा. ४. आपल्या [ शांत व सुखकर ] स्वभावानें ज्यानें देवाच्या [ शीतल व सुगंधयुक्त ] चंदनवृक्षाला जिंकलें आहे असा. ५ जवळचा अध्याय. ( भक्तियोगनामक बारावा अध्याय ). ६. अनंत पाध्ये हे सुप्रसिद्ध धर्मसिंधुकार काशीनाथबाबा पाध्ये यांचे वडील होत. ७ प्रकाशित करिता झाला. ८. कोमेजलेल्या कमळाला. ९ हे पंतांचे मित्र विठोबादादा अनवेकर-चानसासे.
१०. अन्वयार्थः—[ हा ] विप्र ( विठोबादादा ) प्रणता तोका नव्यासम पाहे ( आपल्या पायां नम्र झालेल्या मुलाला नूतन अर्भकाप्रमाणें प्रेमानें लेखतो, असा भावार्थ ). विप्राच्या सादास हाक दे ( ब्राह्मणास संकटप्रसंगीं साहाय्य करितो. साद=आरोळी ). महाकवि व्यास [ याच्यावर ] प्रसादास न न करी ( याच्यावर महाज्ञानी व्यासाचा निश्चयानें अनुग्रह झाला आहे—याला भारताचें रहस्य चांगलें कळतें, असा भाव ).

आली[1] सत्यवतीची[2], कीं, भारतकीर्ति सुतमुखीं आली. ४२
श्रीनारदवाल्मीकिव्यासशुकप्रमुख जे कवीश्वर, ते
नमिले क्षमार्थ, ज्यांचें यश जाणुनि अमृतसेकें[3] विश्व रते. ४३
श्रीहरिजनरसिकसभे[4]! घे निजगुण, जरि मयूर चुकला, गे!
कीं, बोलका नव्हे हा; शिक्षित बोलावयासि शुक लागे. ४४
चुकलों, तदपि न चुकलों; कीं, जें बहुमत शुकादिसन्मुनितें,
म्यां गायिलें यथामति सच्चरित चि सत्प्रियार्थ जन्मुनि तें. ४५
चुकलों म्हणोनि, तो हरिहरभक्त क्षोणिसुरसभे[5]! लाजो,
घे बाळ शर्करेचा[6], न च मानुनि गार, सुरस भेला जो. ४६
साधुसभे! सुरभी तूं पोषिसि कवितर्णका[7], महाभागे!
परिससि बाळवचन बहु, परि न तुझ्या कर्णकाम[8] हा भागे. ४७
हरि[9] जन अरिज न परिजन करि जननि! प्राज्ञजनसभे! काय?
हा दास, यास हासत्रास नसोः शिशुसि निंदिना माय. ४८

विठोबादादांना पारावाळाचा फार लळा असे, असा उल्लेख पंतांनीं त्याचेवर रचलेल्या एका गुणवर्णनपर आर्यापंचकांतील पहिल्या आर्येत हि आहे:—

संत विठोबादादा लहानथोरांत सांगतां वाटे,
टाकुनि खेळ मुलांनीं धावें पायां पडावया वाटे!

१. भर्त्या-**पंत.** २. व्यासमातेची. ३. सिंचन. ४. अन्वयार्थ:--गे श्रीहरिजन-रसिकसभे! (अहो भगवद्भक्त आणि रसिक लोक हो!) मयूर जरि [बोलण्यांत] चुकला [तरी तो तसें हि बोलणें हा] निजगुण घे (आपला गुण च समजतो) कीं (कारण,) हा बोलका नव्हे. शिक्षित शुक (पोपट) [मात्र] बोलावयासि लागे. [मयूर न. अर्थात्, मयूर जरी चुकत चुकत बोलला तरी तो त्याचा गुण च म्हटला पाहिजे]. ५. ब्राह्मणसभे! ६. साखरेचा खडा-**पंत.** ७. कविरूप वत्साला. ८. तुझ्या श्रवणेच्छा पुरी होत नाहीं. ९. अन्वयार्थ-[हे] जननि प्राज्ञजनसभे! हरि अरिज जन (शत्रु जो हिरण्यकशिपु त्याचा पुत्र प्रल्हाद) [आपला] परिजन (सेवक, भक्त) न करी काय? [मग] हा (मी कवि) [तर तुझा पुत्र व] दास [आहे]. यास [तुझा] हासत्रास (उपहासाचा त्रास किंवा भय) नसो. [कारण,] माय शिशुसि निंदिना.

साधुसभे! भगवत्पदपद्मार्पित सर्व वस्तु तुज रुचलें,
यास्तव समर्पिलें हें कवन श्रीपतिपदीं: भलें सुचलें! ४९
हरिपदसमर्पिता या, मैत्री हरिपदनमज्जना, कवना.
लज्जा म्हणेल, 'होउनि शीघ्र अधोवदन, मज्ज, नाकवना!' ५०
श्रीगुरुपदपद्मार्पित हा ग्रंथ महाप्रसाद जाणावा,
सज्जन हो! मज्जन हो यांत, मना त्यांत दोष नाणावा. ५१
छंदःशास्त्रीं आद्या सन्मान्या जसि सतीगणीं आर्या,
आर्या हे सद्रसिका जेंवि शिवा ती तसि प्रिया आर्या. ५२
अष्टादशपर्व जयग्रंथकथा आपणांत आर्यांनीं
आणिलि, जसि आणावी आर्या बहुमान करुनि आर्यांनीं. ५३
शुद्ध अचंचळमनें अवलोकाव्या बुधें जशा आर्या,
निःशेषपापतापव्यापत्प्रशमार्थ या तशा आर्या. ५४
ज्यांच्या गानें व्हावें प्रेमाश्रुक्षपितचंदन मयूरें,
आर्या समर्पिल्या हरिचरणीं श्रीरामनंदनमयूरें. ५५
बहुमानील चि पूर्वप्रमातें न त्यजूनि ओव्या हीं,
आर्यांसि म्हणेल रसिक, अभिनव विहिणीस जेंवि 'ओ' व्याहीं.
ज्यांच्या वचनीं, चित्तीं, कर्मीं, सर्वत्र भाव कुशल वसे,
या कृतिस ते चि गातिल सुकृती, वाल्मीकिकृतिस कुशलवसें.

इति श्रीमहाभारते श्रीरामनंदनमयूरकविरचिते स्वर्गारोहणपर्वणि द्वितीयोऽध्यायः ।

समाप्त भारत ।

श्रीरामचंद्रार्पणमस्तु ।

१. हरिपदीं नम्र झालेल्या लोकांबरोबर. २. बुडून जा. ३. नंदनवना' ४. मनावर घेऊं नये. ५. पहिलें वृत्त जें 'आर्या' तें (पक्षीं) आदिसती पार्वती. ६. चांगल्या रसिक अशा शिष्ट लोकांना. ७. पतिव्रता स्त्रिया. ८. सर्व पाप व ताप यामुळें होणारी जी अति विपत्ति तिच्या निरसनार्थ. ९. आनंदाश्रूंनीं धुतले गेले आहे चंदन (चंदनउटी) ज्यावरील असें. १०. तुरगवदनोरस्थळें—**पंत.** तुरगवदन=हयग्रीव; हा विद्येची देवता. ११. वाल्मीकानें आपलें रामायण प्रथम रामपुत्र कुशलवांकडून राजसभेंत गावविलें, वगैरे कथा आहे.

# शुद्धिपत्र–आर्याभारत खंड ३ रा.

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. | पृष्ठ-पंक्ति | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८।२१ | नव तनय, | २५३।२८ | ज्यात कृष्णार्जुनांचा विजय वर्णिला आहे असा ग्रंथ. (भारत). |
| १०।९ | जरासंधाचा | २६१।१३ | रीति |
| १०।९ | सुद.महे | २६६।८ | तो |
| ११।१९ | महायोध, | २६६।९ | राजा |
| १६।१९ | शुंगाब्धिला | २९१।१२ | युयुत्सु |
| २१।२३ | घटोत्कचवधा | ३०५।५ | बुडवीले; |
| २४।३ | गमे | ३१३।१९ | कठात |
| २९।१२ | अनिदजय | ३१९।२ | धमयुद्धदुर्जय |
| ५०।२२ | पाञ्चरूपी | ३३७।३ | अनघाला.’ |
| ६५।८ | महावीर | ३३७।७ | शुद्ध.’ |
| ७०।६ | महास्त्रप्रयोगपटु कर्ण | ३४२।११ | गुरुशत्रुहानि |
| १५२।१२ | कालानळाभरोपाने | ३४९।१४ | मृतशोकज्वरासि |
| १५४।१३ | वाळी | ३६०।३ | त्वत्सुतहत्यासि |
| १५७।२ | मृद | ४२१।१८ | कळावा |
| १६०।१८ | दृष्टिविषसप | ४२८।२६ | पाचजन्य |
| १९१।४ | असिला, | ४३२।१२ | यत्कृत |
| १९१।५ | असिला? | ४४३।११ | धमनृप |
| २०५।१६ | काय भव दनुज?’ | ४५१।७ | रमागेहा! |
| २०८।१३ | जगत्रयंशाने, | ४५१।८ | वरप्रसादा |
| २२१।८ | धर्मराज नाश | ४५३।२२ | शांते.” |
| २४२।४ | सगुण | ४५४।३ | “मी |
| २४२।५ | अक्षत, | | |
| २५२।११ | अश्वत्थाम्याचा | | |

| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
|---|---|
| ४६०।२४ | २. मातीं. |
| ४६८।१७ | सुरासुर ज्या |
| ४७८।५ | ०मयूरमूर्त० |
| ४८५।१९ | सर्वांचें.’ |
| ४८६।१६ | लवलाहें, |
| ४८६।१७ | लवलाहें |
| ४९०।१६ | ‘सत्कारुनि दुर्वासा, |
| ४९३।१८ | वाटसुरथवे |
| ४९४।८ | मणगा |
| ४९४।१८ | धावुनि |
| ४९५।२० | स्रक्चंदनान्नपान |
| ४९९।२ | वरविप्र |
| ४९९।१२ | सभ्रातृवर्ग, |
| ५०३।६ | मुहूर्तभरि |
| ५०५।६ | सुनियमानीं; |
| ५०५।७ | संमाजन |
| ५०५।१० | गुरुभक्तिरन्विस |
| ५०५।१० | गुरुभक्तिरन्वीस |
| ५०५।११ | अरिकंटकक्षपकुळी |
| ५०६।२३ | शुचिकुक्षिभवा |
| ५०७।२१ | ०विरचिते० |
| ५१४।२ | दायादोत्कर्ष |
| ५१५।९ | सुदुर्लभ |
| ५२९।१२ | ‘सादरसेवेंत |
| ५३७।५ | वर्णू? |
| ५३७।५ | रडे. |
| ५४३।२ | उठविती, |
| ५५४।१४ | उठिव |
| ५५८।२ | मानिति |
| ५६९।१३ | कुळा? |
| ६४१।११ | तें[४] |
| ६४२।१२ | ‘हा!’? |
| ६४३।२४ | पृथ्वीतें—पंत. |
| ६५०।५ | हो!.’ |
| ६५३।२४; | ‘कवि जन |



# पुरवणी–शुद्धिपत्र.

स्त्रीपर्वाचें शुद्धिपत्र नजरचुकीनें राहिलें. तें पुढीलप्रमाणें

| पृष्ठ–पंक्ति. | शुद्ध. |
| --- | --- |
| ३६६।२४ | स्ववधूच्या विलापार्थ |
| ३६९।१६ | का न=कान ( ? ) |
| ३७०।२० | नृप सुत |
| ३७४।२० | विवस्वत |
| ३७६।२ | अर्धव्याघ्राम |
| ३८२।२ | स्ववर्ना |
| ३८२।२२ | चिबुकें |
| ३९१।२१ | प्रत्यय |
| ३९५।२८ | चंदनकाष्ठ |
| ३९८।१० | भक्तमयरघनश्रीराम |

होत्ये यदंशशेषश्वासज्वळनांत हे समिद धरणी,
त्याचा सखा धनंजय होय खलशैलभल्लया समिद्ध रणीं. ३
कोणाचें हि शरीर द्व्यंगुळ हि अविद्ध तो न राहूं दे,
मुनि म्हणति, 'खळांस हि गति बा! नारायणसखा! नरा! हूं दे.'
वाहे शोणितपूरीं शतश इभांचें हि कुणप. टोळांचा
मद किति गरुडीं? सद्भटभुजभुजग हि वरिति गुण पटोळांचा.
इतरांची काय कथा? अर्जुन संगर करी सहास कृप.
होय विरथ, सुर म्हणती, 'सिंह पथ न दे करीस हा सकृप.'
बीभत्सुपुढोनि विरथ सुविकळ कृप पळविला नरवरानीं.
तद्धनुचा भयद भटां, हरिचा हि तसा गजां न. रव. रानीं. ४
मग गगनगनगभिन्मुखसुरमत गुरुसीं हि अनव मुनि नर तो
कलह करी, कीं इतरीं गुरुकळहीं. थांमि जन वमुनि. न रतो
प्रथम गुरुच्या रथासीं रथ भिडवी क्षिप्र मग अंकोपार्थ
शिर चरणांसी प्रार्थुनि, 'करुणींसि' म्हणे, 'त्यजू नको.' पार्थ

१. ज्याचा (विष्णूचा–कृष्णाचा) अंश ... त्याच्या ... (प्रलयकाळी प्रखर सूर्यकिरणांनीं तापलेल्या पर्वताचा भाग ... असलेल्या शेषाच्या मस्तकाच्या पोचेने व त्यामुळे त्यास संतापून ... पृथ्वी जळून जाते, अशी कथा आहे) २. सामिध (आहुति) ३. ... (पक्षी) अग्नि. ४. दुष्ट (कौरव) हे च टोळ त्यांच्या नाशाय ५. प्रदीप्त–चा. प्र. ६. दोन बोटें. ७. अक्षत. ८. अर्जुना! ९. रक्ताच्या प्रवाहामध्ये शेकडों हत्तींचे प्रेत वाहूं लागले. (येथें 'कुणप' हा शब्द नपुंसकलिंगी व जातिवाचक म्हणून एकवचनी आहे). १०. मोठमोठ्या वीरांचे बाहुरूपी सर्प ११. पडवळाचा. (वीरांचे बाहु पडवळामारखे लुले पडले). १२. हास्यपूर्वक, (सहज, लीलेने). १३. अर्जुन–पं. प्र. हा सकृप (दयाळू) सिंह. १४. अतिशय विव्हल झालेला. १५. अर्जुनाच्या धनुष्याचा. १६. ध्वनि. १७. आकाशांतील इंद्रादि देवास मान्य. १८. पुराण, प्राचीन. १९. अर्जुन. २०. या प्रस्तुतच्या कलहाला. २१. सोडून, टाकून. २२. राग न यावा म्हणून.

'गुरुजी! करा प्रहार प्रथम, तुम्हीं गुरु, अविप्र हा[1], रामीं[2]
शांतनवसा[3], करीन, प्रमुदित व्हाया कवि, प्रहारा मीं.' १०
सच्छिष्यावरि सद्गुरु आधीं प्रेमेंकरूनि आशींची,
मग वृष्टि बहि:कोपें[4] सुबहु करी बहुविधेषुराशींची[5]. ११
गुरुला विविधशरांची वाहे तो रागराशि[6] लाखोली,
भेटे अस्त्रंतति तया, जसि पाहों सागरा शिला खोली[7]. १२
शरसागरीं तिमिंगिल[8] गुरु, पळभरि होय शिष्य कंप्र[9] तिमी,
परिभूत[10] द्रोण म्हणे, 'श्रीभार्गवसा[11] चि धन्य संप्रति मीं.' १३
त्या समयीं शंभु म्हणे, 'जरि तूं रुससील तरि उमे! रूस[12],
गुह काय? विदारिल हा वत्स विजय शक्तिनें सुमेरूस.' १४
कीर्ति[13] सूर्यास्तोदय एकमुहूर्तांत एक शतदा ते,

१. मी अर्जुन अब्राह्मण–क्षत्रिय आहे. २. परशुरामी. ३. भीष्माप्रमाणे. परशुराम व भीष्म या गुरुशिष्यांचें युद्ध काय कारणानें झालें वगैरे हकीकत प्रसंगानुसार भीष्मांनी स्वमुखानें सांगितली आहे, ती पुढें उद्योगपर्व अध्याय १७२।१९३ यांत पहावी. ४. बाह्यात्कारी [आणलेल्या] रागानें ५. अनेक प्रकारच्या बाणराशींची ६. क्रोधराशि (पक्षी) प्रेमराशि. ७. अन्वयार्थ–जसि शिला (दगड) सागरा खोली पाहों (पाहण्यास) भेटे [तसा] तया (गुरुला) अस्त्रंतति (अस्त्राची पंक्ति) खोली पाहों (त्याचें सत्व पाहण्यासाठीं) भेटे. ८. तिमिनामक माशाला गिळणारा एक मासा. ९. चपळ. १०. पराभव पावलेला. ११. [शिष्यें भीष्मानें पराभूत केलेल्या] गुरु परशुरामासारखा. १२. पार्वतीनें रुसण्याचें कारण, आपला मुलगा गुह (कार्तिकस्वामी) याची निंदा आणि अर्जुनाची स्तुति. शंभु म्हणतो, "गुहानें क्रौंचपर्वताचें च विदारण केलें; पण हा अर्जुन मेरुपर्वताचें हि विदारण करील." १३. द्रोणार्जुनांपैकीं एकानें शरवृष्टीनें आकाश व्यापून सूर्य दिसेनासा करावा व दुसऱ्यानें त्या शरपटलाचा छेद करून तो पुन्हा दिसेसा करावा, असे ते उभयता एका क्षणांत शेकडोदां करीत.

त्यांत [1] एकासम ही होती मेघांअसे हि शत दाते. १५
पाडिति शरपटलानीं जेव्हां नभ भरुनि अंधकारा ते,
कातरें [2] म्हणति, 'असमयीं करविसि कां कल्प [3] अंधकारारि [4] !?'
द्रोणार्जुन तुल्यक्रिय [5] बिंबप्रतिबिंबसे [6] चि ते गमती,
किति कुरुकटकें? प्रेक्षक वृत्रघ्नांच्या [7] हि लोचनें भ्रमती. १७
समरीं शंकरसा च द्रोण गमे. जिष्णु हरि अजित [8] साचः
त्रिजगद्विस्मयकर अति अद्भुत परिभव हि तो अजि! तसा च.
सुरमुनि म्हणति, 'छात्रें छिन्नध्वजकवच [9] गुरु पहा केला,
जाली बळें पराङ्मुख, मारितसे कुमति [10] कुरुप हाकेला. १९
अधिका न क्षत्रियता, न न्यूना विप्रता; पहा [11] तरणा
नसतां हि कसा, ज्याचे विक्षत हि न विप्रताप होत रणा.' २०
केला शीघ्रास्त्रबळें [12] शिष्यें परिभूत सत्वराशि [13] कवी,

१. मेघासारख्या शंभर दात्यांना देखील त्या द्रोणार्जुनांतून एकाची हि बरोबरी करवणार नाही. मेघाच्या जलवृष्टिदातृत्वापेक्षा द्रोणार्जुनाचें शरवृष्टिदातृत्व फार च मोठें होतें, असे तात्पर्य. २. भित्रे लोक ३. प्रळय ४. शंकरा ! ५ समान आहे क्रिया (पराक्रम) ज्याचा असे. ६. मूळ पदार्थ व त्याची छाया असे (द्रोण गुरु म्हणून बिंब व अर्जुन शिष्य म्हणून प्रतिबिंब). ७. इंद्राचीं. (कौरवपक्षाच्या सैनिकांना च द्रोण कोण व अर्जुन कोण हें ओळखतां आलें नाहीं असें नव्हे, तर तेव्हांचा प्रेक्षक जो इंद्र त्याला आपल्या सहस्रनेत्रांनीं देखील ते ओळखतां आले नाहीं). ८ विष्णु. (बाणासुराची कन्या उषा इचा कृष्णाचा नातु अनिरुद्ध याच्याशीं जडून आलेला प्रेमसंबंध तिच्या पित्याला न रुचून त्या निमित्तानें बाणासुराचा पक्ष घेऊन आलेल्या शंकराशीं कृष्णाचें युद्ध झालें व त्यांत शंकर पराभूत झाले, या कथेकडे येथें कविकटाक्ष आहे). ९. भग्न आहे ध्वज व कवच ज्याचें असा. १०. दुर्योधन. ११. अर्थ–द्रोणाचार्य तरणा नसतां हि कसा [ धीर वीर ] आहे पहा कीं, ज्याचे विक्षत हि (जखमी झालेले असे हि) शत रणा (युद्ध करण्याविषयीं) विप्रताप (प्रतापरहित, असमर्थ) झालेले नाहींत. १२. वेगवान् अशा अस्त्राच्या सामर्थ्यानें. १३. धैर्याचा निधि च असा.

यां[1] चि सुयशोर्थ बहुधा न शिके हा, गुरु हि न त्वरा शिकवी.
अश्वत्थामा धांवे रक्षाया संकटांत जनकास,
जन कासया[2] विते सुत, कसिते न करावया भजन कास? २२
इंद्रोपेंद्र[3] तसे ते गुरुबंधु सखे कृपीपृथातनय,[4]
धन यश ज्यांचें, त्यांत हि उठवी वैरासि शकुनिचा अनय.[5] २३
तो उत्तमर्णसा[6] गुरु सोडुनि, पुत्राकडे[7] हरिसख[8] वळे,
स्वपितृप्रतापहरणें द्रौणि हि हृतमणिफणीपरिस[9] खवळे. २४
सांवर्तिकमेघांच्या[10] लाजाव्या द्रौणिसायकां[11] धारा,
सत्तातांहुनि[12] होइल सुत, म्हणवायासि 'हाय!', कां धारा[13]?
'अत्युग्र राम कीं हा द्विज,' म्हणति असें पराशरव्यास,
'काळ हि चुकेल, याचा न चुकेल चि शर परा शरव्यास.[14]' २६
बहु कल्पना सुकविसा, विजय हि बहु शरपरंपरा, व्याली,[15]
भंगू पाहे समरीं गुरुपुत्रास हि, जसें पराव्याली.[16] २७

१. अर्जुनानें द्रोणाचार्याचा पराभव करण्याला इतका विलंब का लावला अशी शंका धरून कवि निच समाधान करितात कीं, द्रोण हि बळाचा निधि होता व अर्जुनानें हि असा बळाचा निधि परिभूत केला, हें ते उभयता शौर्यानें काहीं वेळ लढ ल्याशिवाय कसें कळावें? म्हणून ह्या च सत्कीर्तीसाठीं अर्जुन त्वरा शिकला नाहीं गुरूनें हि त्याला ती शिकविली नाहीं. २. अन्वयार्थ—[आपले] भजन (सेवा) करायाा काम न कसतें (सज्ज न होतें) [नर] जन सुत कासया (कशाकरितां) वितें (उत्पन्न करितें)? ३. इंद्र व उपेंद्र (इंद्राचा धाकटा भाऊ विष्णु). ४. कृपीपुत्र अश्वत्थामा, व पृथापुत्र अर्जुन. ५. त्या उभयता यशोधनांमध्ये हि शकुनीच्या अनीतीनें कलह लाविला. ६. सावकार—चा. प्र. ७. गुरुपुत्र अश्वत्थाम्याकडे. ८. कृष्णमित्र अर्जुन. ९. हरण केला आहे मणि ज्याचा अशा सर्पापेक्षा हि. १०. प्रलयकालीन मेघाच्या. ११. अश्वत्थाम्याच्या बाणांना. १२. चांगल्या बापापेक्षां. १३. लहान—चा. प्र. (कमी योग्यतेचा). १४. शत्रुरूप लक्ष्याला, निशाणाला. १५. सोडिता झाली. १६. परक्याला.

ज्या इषुनीं क्षत होतां रागें वरि आंत ही हर भरे, हो!
ते द्रौणिशग, जैसे कपिला दासें दिले हरभरे, हो! २८
तें सुर, नर, हय, गज, 'हा!' म्हणति, न याचे चि आठ वाजी 'हा!'
घडलें गुर्वघ जाया, अद्भुत संग्राम आठवा जी! हा. २९
आचार्यसुतें केली छिन्ना, सोडूनि खरशरा ज्या, तें
पाहुनि मुनि हि म्हणति, 'हा! पावेल अजातरिपु न राज्यातें.
भीष्मेंद्रमुखनरामर म्हणति, 'भला गा! भला महाबाहो!
त्वद्दोःप्रताप अतितर अद्भुत चि, कधीं उणा न हा बा! हो.'
हांसे नारायणसख तें सज्य पुन्हा करून कोदंड,
जे काळासि म्हणे, 'गा! झांक, मजपुढें करूं नको दंड.' ३२
शक्र म्हणे, 'व्यर्थ भरीं हो, त्यजुनि विचार तर्क. विप्र भरे.
वत्सा! तुझ्या शरानीं केला सुप्रभ हि अर्क विप्रभ रे!' ३३
स्त्रीस म्हणे, 'वत्साचे तसें गुरुसूनुचे शौचि! न भाते,
अक्षय्य काय असते, तरि करिते निरवकाश चि नभा ते.' ३४
प्रतिरवमिषें, शरानीं भरतां, कुंथावयासि नभ लागे:
देवी म्हणति, 'सख्यानो! दारुण हा क्षत्रधर्म, न भला, गे!
करितां तुमुलतर समर, शर सरले, गुरुसुतीं उणें होतें,

१. बाणानीं. २. जखमा. ३. क्रोधानें (पक्षीं) प्रेमानें ४. किरातरूपी शंकर ५. मानिक मनुष्यानें. ६. याचे- अर्जुन व अश्वत्थामा याचे. ( " ). ७. महापातक ८. भग्न. ९. तीक्ष्ण बाणास. १०. [ अर्जुनाच्या ] धनुष्याची दोरी. ११ अर्जुनाच्या धनुष्याची दोरी तुटल्यामुळे तो निजयी होणार नाहीं व मग अर्थात् त्र धर्माला राज्यप्राप्ति हि होणे नाहीं असे मुनींना वाटलें. १२. भीष्म, इंद्र इत्यादि मनुष्य व देव. १३. तुझा बाहुप्रताप. १४. यमदंड. ('माझ्यापेक्षा काळाचा हि दंड उग्र नाहीं' असे ते अर्जुनचाप म्हणे, असा भाव). १५. अश्वत्थामा. १६. अर्जुना! १७. हे इंद्राणि! १८. द्रौणीचे भाते [ अर्जुनाच्या भात्याप्रमाणे ] [ जर ] काय अक्षय्य ( ज्यांतील बाण संपत नाहीत असे ) असते तर त्यांनीं सर्व आकाश भरून टाकलें असते. १९. प्रतिध्वनीच्या रूपानें. २०. देवांगना २१. भयंकर. अत्यंत निकराचें.

पूर्णत्व पांडवीं, हें एकें हरिदासतागुणें हो ! तें. ३६
झाले भाते समरीं, आणाया गुरुसुतीं उणींव, रितेः
देती सा[1]मग्री जय, तरि कां सन्नीतिला गुणी वरिते ? ३७
भंगे अ[2]श्वत्थामा; अश्वत्था मा क्वचित्, सदा हरिलाः
नसि इतरांसि जयश्री, नित्य हरिजनांसि, तो तिणें वरिला.
करितां पार्थें गुरुसुत घटज[3]मुनिवरें समुद्रसा चि रिता,
धांवे कर्ण, गजावरि ख[4]र नखरानीं तया जसा चिरिता. ३९
कर्णधनुर्ध्वनि कर्णीं शिरतां, तिकडे चि पार्थ तो पाहे,
राहे अश्वत्थामा, कढले चढले अपार कोपा हे[6]. ४०
पार्थ म्हणे, 'रे ! कर्णा ! बहु भट मजसीं भिडोनि गडबडती,
ही आजि आजि आहे, नोहे केली सभेंत बडबड ती. ४१
तेव्हां पांच हि आम्हीं होतों दृढ धर्मपाशबद्ध, रणीं
आतां सुटलों, खळ हो ! कसि हरिली कपट करुनि सद्धरणी ?
कत्थ[10]न सुकर, सुदुष्कर समर, अमर यमर[11]वींद्रमुख हि तुला
होउत सहाय, न जयें होय खळांच्या कधीं हि सुख हितुलीं[12].
जं गांजिली कुरुसभेमध्यें त्वां बायको निकर करुनीं,
बांधावें चि यमें तुज पु[13]रजे तें नायकोनि करकरुनीं. ४४
तेव्हां यमधर्माचें अस्मद्धर्मापुढें न बळ मांडे,

१ साधनसंपन्नता. २. अन्वयार्थ–अश्वत्थामा भंगे; [कारण], अश्वत्था (पिंपळाला) मा (लक्ष्मी) क्वचित (फक्त शनिवारीं प्रातःकाळीं अश्वत्थापाशीं लक्ष्मीचा वास असतो असें शास्त्रवचन आहे.) वरिते, हरिला सदा वरिते; तसि जयश्री हरिजनांसि नित्य, इतरांसि क्वचित् वरिते. [म्हणून] तिणें (जयश्रीनें) तो (अर्जुन) वरिला. ३. मुनिश्रेष्ठ अगस्तीनें. ४. तीक्ष्ण. ५. चिरणारा. (सिंह). ६. तो अश्वत्थामा एकीकडे च राहिला, व हे कर्णार्जुन च अपार क्षुब्ध झाले. ७. युद्ध. ८. प्रतिज्ञापालनरूप धर्मपाशानें बांधलेले. ९. सज्जनाची भूमि. (आमचें राज्य). १०. बडबड. ११. यम, रवि, इंद्र, इत्यादि. १२. चित्ताला. १३. पुरजे !

आजि तुम्हीं ओगरिलां कोळामत्रांत[2] सर्व खळ मांडे.' ४५
कर्णे म्हणे, 'आलों बळ दावायास, स्वयें पहायास,
शोभे समरीं च, तसा न भटांचा भाषणीं महायास. ४६
वहु कर्म करी पंडित, कथनावसरीं हि थोडकें च वदे,
शाकांत प्रवर जसें पथ्य हि, तैसें न दोडकें चव दे. ४७
केला पण पूर्ण म्हणसि, आलासि करावयास कळहास,
ये, मजसीं युद्ध करीं, हो भग्न, करोत हे सकळ हास. ४८
तूं काय ? वासवास हि पळवीन रणांत आजि भंगुन, गा!
बहु हास्य येतसे, कीं, पाहे लंघावयासि पंगु नगा!' ४९
पार्थ म्हणे, 'राधेया! करुनि पलायन हि तूं न लाजसि रे!
साध्वी विटालयीं जसि, तसि बहुधा त्वन्मनीं न लाज सिरे.
मारविला मजकरवीं त्वां अनुजें[10], न तारिला, न तारविला.
जारविलासन्याय[11] स्मरला यां[12] खळतमाचिया रविला.' ५१
ऐसें वदोनि, सहसा, न पहावा साधुधर्महानिकर[13]
म्हणुनि शरांचा सोडी, झांकाया त्यासि, तो महानिकर. ५२
हस्तीं[15] हाणुनि खरतर शर, नरमुष्टीस कर्ण समरांत
सहसा विशीर्ण करिता, आला होता हि मान्य अमरांत, ५३
त्या कर्णाच्या तोडी तो हरितनुजनु धनुष्यवल्लीला.

---

१. वाढले गेला. २. ( मृत्युरूपी ) पात्रात—चा. प्र. ३. पक्वान्नविशेष ४. बोलण्याच्या प्रसंगी. ५. भाज्यात. ६. शाकविशेष. ( परवर ). ७. शाकांत प्रवर जसें पथ्य [ आणि ] चव हि दे तैसें दोडके न. ८. उपहास. ९. जारगृहां १०. आपला धाकटा भाऊ. ११. जारविलास क्षणिक व नश्वर, तद्वत् तुझे बंधुप्रेम १२. मज—चा. प्र. १३. सद्धर्माचा नाश करणारा. ( कर्ण ). १४. मोठा मत्सर १५. अन्वयार्थ—समरांत हस्तीं ( हाताचे ठिकाणीं ) खरतर शर हाणुनि नरमुष्टीस ( अर्जुनाच्या मुष्टीस ) सहसा ( एकाएकीं ) विशीर्ण ( भग्न ) करिता ( करणारा ) [ जो ] कर्ण अमरांत हि मान्य जाला होता त्या कर्णाच्या धनुष्यवल्लीला तो हरितनुजनु ( इंद्रपुत्र अर्जुन ) तोडी.

जन म्हणति, 'मूर्त काळ चि हा, वरि दावी मनुष्यवल्लीला.'[1]
उग्रें कोपें रोपें[2] भेदी मूर्छार्थ अंगपोराला,[3]
रवि हि तमांत बुडे हो! न घडो द्याया कुसंग[4] पोराला. ५५
हरिहरगुरुप्रसादज[5] अमित निजभुजप्रताप कळवीला,
वळवीला कर, जाणों, तो गर्वयशःसमेत[6] पळवीला. ५६
भीष्मावरि[7] जातां धृतिमान् केला जेंवि वज्रकवचार्नीं,
श्रांत भ्रांतस्वांत स्वांतत्रासातें उत्तर वचार्नीं. ५७
तद्धैर्यार्थ स्वयशें वर्णी स्वमुखें, जऱ्ही न वानावीं,
स्थिर त्यासि रथीं करि, गुरु जैसा हरिच्या सुमानवा नावीं. ५८
कुरुगुरुपितामहांसीं जिष्णु करायासि जाय कळहातें,
कीं[8] साधुच्या हि साधु हि पावे दुःसंगभंगफळ हातें. ५९
नारायणप्रियसखें सर्वमुनिवरें नरें सुरोपास्यें[9]
प्रथम चि पितामहाचा ध्वज तोडुनि पाडिला सुरोपास्यें.[10] ६०
पाखंडागम[11] रोधूं पाहति, येऊनि आड, वेदास;
पार्थासि तसे कौरव, ज्या यावे एक आडवे[12] दास. ६१
खळ दुःशासन दुःसह आणि विविंशति विकर्ण हे चवघे
विजयें दमुनि पळविले, दोष जसे दाशरथिगुणें अवघे. ६२

---

१. मनुष्यवत् लीला. २. बाणानें. ३. कर्णाच्या उराला. ४. कु=पृथ्वी, तिचा सग. (पृथ्वीवर पतन). ५. हरि, हर व गुरु (द्रोण) याच्या कृपेपासून उत्पन्न झालेला. ६. गर्व व यश यासहवर्तमान. ७. अन्वयार्थ–भीष्मावरि [चालून] जातां श्रांत (थकलेला), भ्रांतस्वांत (भ्रमिष्ट झालें आहे चित्त ज्याचें असा) [आणि] स्वान्तत्रासान (आपला अंत होईल या भयानें व्याकुळ झालेला) उत्तर जेंवि वज्रकवचार्नीं (अभेद्य कवचार्नीं) तेंवि [अर्जुनाच्या] वचार्नीं (शब्दार्नीं) धृतिमान् केला. ८. साधु भीष्म हि साधु अर्जुनाच्या हातें दुष्ट कौरवांच्या संगतीमुळें पराभवरूपी फळ पावला. ९. सुरानी उपासना करण्यास योग्य अशा नरें (अर्जुनानें). १०. चांगल्या बाणांच्या तोंडानें. ११. नास्तिकांचीं शास्त्रें. १२ दासपक्षीं सामोरि व कौरवपक्षीं प्रतिबंध करण्यासत्व.

सर्व [1]महारथ म्हणती त्या विजया, वासवा जसे नग, 'हूं,'
केले पिष्ट असुरगिरि जेणें, किति त्यास ते मसेन गहूं ? ६३
हूंरेनीं गजसे, कुरुभट जिष्णुशरानीं उदंड लोळविले,
दिव्यांगनांसह गगनयानीं मग बैसवूनि बोळविले. ६४
क्षतजनद्या [3]पक्षिरवें म्हणती वीरांसि, 'आयका. मन द्या,
आम्हांऐशा बुडवुनि करिति दुज्या पूर्ण काय काम नद्या ?' ६५
युद्ध न हरिसख मांडी, त्या सद्यःस्वर्गहेतुसत्रांस.
झाले सहस्रशः कृतकृत्य, न झाले कृतार्थ सत्रास. ६६
कर्ण, कृप, द्रोण पुन्हा धावुनि पार्थासि एकदा चि तिघे,
झांकिति दिव्यास्त्रानीं, ते तो पळभरि महाचैलस्थिरति घे. ६७
योजुनि इंद्रास्त्रातें, पळवी सकळांसि तो महातेजा.
भीतिल त्या रिपु न कसे ? भीती गगनस्थ ही पहाते ज्या
द्रोणाद्यखिळ पळवितां, भीष्मप्रभु कार्मुकासि आकर्षी
केतुस्थ [10]वानराला ताडी, तो खिन्न होय नाकर्षी. ६९
नर तच्छत्रें छेदी, लाजे पूर्णेंदु पांडुरें ज्यातें.
सत्सुतकृतनिजपूर्वजलंघन हो श्लाघ्य पांडुरा ज्यातें. ७०

१. दहा हजार प्रतिपक्ष्यांशीं लढणारा तो महारथ, अगणितांशीं लढणारा तो अतिरथ, एकट्याशीं लढणारा तो रथ आणि त्याहून अल्पबळ तो अर्धरथ असे रथांतून युद्ध करणाऱ्या वीरांचे चार भेद आहेत. २. न भमन (सनमह असे कौरवरूप) गहू. ३. रक्ताच्या नद्या. ४. पक्ष्यांच्या शब्दरूपानें ५. [illegible] स्वर्ग, देणाऱ्या यज्ञास. ६. भित्रे, सभय: (भित्रे कृतकृत्य झाले नाहीत, तर शूर झाले). ७. महापर्वताचें स्थैर्य. ८. आकाशांतून पाहणारे देव ९. ओढी १०. ध्वजावरील मारुतीला. ११. नारद. (हा आकाशांतून हें युद्ध पाहणारा होता. राम-रावण युद्धांत अद्वितीय पराक्रम गाजविलेल्या मारुतीला अर्जुनाच्या ध्वजावर बसून भीष्माचा शस्त्रप्रहार घ्यावा लागला, याचें नारदाला वाईट वाटलें). १२. भीष्माचीं छत्रें. १३. ज्या पांढऱ्याशुभ्र छत्रातें. १४. पांडुराजा तो त्याच्या सत्पुत्रानें (अर्जुनानें) केलेली [भीष्मपराभवरूप] आपल्या पूर्वजाची अवज्ञा ही श्लाघ्य (प्रशंसनीय) होय.'

चित्तीं भीष्म म्हणे, 'मजवर कर शस्त्रास्त्रवृष्टि, वत्सा ! हूं,
आम्हीं पुण्ययशोर्थ स्वशरीरीं दिव्यवृष्टिवत् साहूं.' ७१
नर हि म्हणे, 'ज्यासि दिले स्वमुखींचे त्वां पितामहा ! ग्रास,
तो हा तुसीं झगडतो, होवुनियां स्थापिता महाग्रास.' ७२
पांघुरविलें स्वयें प्रियपौत्राला शस्त्रवस्त्र शांतनवें !
तत्काळ योजिलें हो ! पहिलें होतां चि अस्त्र शांत, नवें. ७३
योजी आज्यावरि शरपटळ, करुनि चाप सज्ज, नातू, तें
पाहुनि कुळज कवि म्हणति, 'हें परम श्लाघ्य सज्जना ! तूतें.'
भीष्में विजयें हि सम चि शस्त्रपटळ सबहुमान वारावें,
अमरगवें चि भरावें तें नभ बहु न बहुमानवाऽरावें. ७५
मानी वृद्ध प्रेक्षक म्हणती, 'अपयश कधीं न यो जीना.'
तरुण म्हणती, 'असोनि श्रीपाशुपत हि अधीन योजीना !' ७६
साधु प्रेक्षक सुर नर म्हणति, 'भला ! साधु ! धन्य ! शांतनवा !
तूं रविसा, दीपकसा योद्धा होता चि अन्य शांत नवा. ७७
पार्थप्रतिभट गुरु कीं जो होय निमित्त पूतनामरणीं
कीं तो प्रभु, विजयप्रद ज्याचें मुनिवित्त पूत नाम रणीं.' ७८
निजकुळगुरुस्तुतिप्रति परिसुनि, अभिमन्युचा पिता महती
तच्चापलता खंडी, वर्णी धानुष्कता पितामह ती. ७९
पार्थमनीं, 'साधावी, जिंकुनियां कुरुपितामहा महि स्यां,
ऐसा चि पात्र व्हावा सुरलोकीं गुरु पितां महामहिम्या.' ८०

१ महापापाला २. देवाच्या 'जयजीव' शब्दानें. ३. बहुत मनुष्याच्या आरोळ्यांना. ४. अभिमाना. ५. म्हाताऱ्या भीष्माला. ६. नष्ट. ७. नवन, तरुण. ८ अर्जुनाची बरोबरी करणारा योद्धा. ९. भीष्म, द्रोण. १०. जो श्रीकृष्ण. ११. श्रीशंकर. १२. मुनीचें धन च असें. १३. पवित्र. (अर्जुनाची बरोबरी करणारे योद्धे गुरु, कृष्ण व शंकर हे तिघे च शोभतील ). १४. भीष्माच्या स्तुतिप्रत. १५. मोठी. १६. भीष्माची धनुष्यवल्ली. १७. [ अर्जुनाचा ] धनुर्धरपणा. १८. पांडु.

केलें सज्ज धनु असें अतिसत्वर त्या समस्तयोधनुतें[1]
कीं, दशशताक्ष[2] हि म्हणे, 'तुटलें नाहीं न काय हो! धनु तें?'
कारकड चित्र चि झालें केवळ तें चित्रसे न[3] ते, ज्यांतें
हरिहर मानुनि, वर्णी हरिपार्शी[4] चित्रसेन गेज्यांतें[5]. ८२
देवी म्हणति, 'न भ्यावें, हा मावध, हे! सुरापगे![6] सारे![7]
त्वत्सुत ज्यांच्या पक्षीं, खळ केवळ हे सुराप[8] गे! मारें. ८३
त्यांचा श्रम शमवाया बहु शीतल मंद गंधवह[9] वाहे,
शक्र स्वयें हि त्यांवरि पुष्पें प्रेमाश्रुबिंदुसह वाहे. ८४
सुरपुष्पवृष्टिला न स्पर्शो देती नयां तदिषुवृष्टि[10],
कीं मधुपचुंबिता[11] त्या पतितीं[12] त्यांच्या पडो नये दृष्टि. ८५
खंडी धनुष्य, द्याया निजनिपुणत्वें प्रमोद पुनरपि त्या;
[13]स्वगुणोत्कर्षें पूर्वज जिंकुनियां सुखविती, न कुनर पित्या. ८६
तुटलें कीं न अशा या घाली जों संशयांत देव पुन्हा,
तों पार्थ म्हणे, 'आर्या! स्वांबास्त्रें[14] शुद्ध होवु दे वपु. न्हा.' ८७
साहुनि पितामहाचे, त्याच्या पार्श्वी[15] च तो असुख[16] रचितें
हाणी सत्वर खरशर दश, अमराचे हि ते असु खरचितें. ८८
त्या खरशरप्रहारें जों पावे मोह आपगेय[17] महा,
देवी गंगेसि म्हणति, 'नातु नव्हे, बाइ! आपगे! यम हा.' ८९

१. सर्व योद्ध्यांनीं स्तुत अशा. २. इंद्र ( भीष्माच्या हातांतील धनुष्य तुटतां च दुसरें धनुष्य घेण्यात त्यानें इतकें चापल्य दाखविलें कीं, सहस्रनेत्र इंद्राला हि भीष्माचें धनुष्य तुटलें कीं नाहीं हा च शंका आली ). ३ भीष्मार्जुन. ४. इंद्रापाशीं. ५. [ भीष्मार्जुनाच्या ] पराक्रमातें. ६. हे देवनदि गंगे! ७. सारभूते! ८. मद्यपी. ९. वायु. १०. त्याच्या बाणाच्या वृष्टि. ११. भृंगस्पृष्टा ( पक्षीं ) मद्यपानीं चुंबिलेल्या. १२. पडलेल्या ( पक्षीं ) भ्रष्टा. १३. अन्वयार्थ—[ सुनर ] स्वगुणोत्कर्षें पूर्वज जिंकुनियां ( पूर्वजांपेक्षां अधिक पराक्रम गाजवून ) पित्या सुखविती; [ परंतु ] कुनर न. १४. आपल्या मातेच्या (गंगेच्या) अश्रूंनीं १५. कुशीवर. १६. दुःख. १७. नदीपुत्र भीष्म.

कुरु म्हणति, "हाय! हाय! न व्हावा हा [1]हरिचिया हि.हतें [2]हातें,
त्या प्राकृतांसि युक्त चि, गीर्वाणांला[3] हि म्हणति 'बतें! हा[4]!' तें."
दुःखद हि सुखद म्हणती कपि नारद 'रामराम! शिवशिव!' तें;
यद्गुनि पतिता.जीवा, बापा मुलसें, बळें चि शिव शिवनें. ९१
पडतां मूर्छित नेला माघारा भीष्म जाणत्या सूतें;
ईशप्रहिता देइल, दुःख न ज्या दिव्य बाण, त्या सू तें. ९२

## अध्याय सहावा.



जाले कर्णकृपगुरुप्रभृतिमहावीरभंग [5]नंउ ठावें,
*स्वबळ हि तन्हि कुरुप उठे, जन्हि [6]शिंक म्हणे, 'कदापि न उठावें.'
हाणी [7]भल्ल ललाटीं, त्यासि म्हणे पार्थ, 'हाण, [8]चवताळ,
[9]धृष्टा! दुष्टा! भ्रष्टा! तुझिया [10]वृत्तीं नसे चि [11]चव [12]ताळ.' २
हांसे तो [13]भटतल्लज, [14]भल्लज पीडा न [15]तल्ललाटांत,
[16]हेतींत पोहणारा, सिंधूच्या जेंवि मल्ल लाटांत. ३
होय कुरुप [17]नरशरपरिवृत [18]दववृत जेंवि [19]कुंज रानीं, कीं
शिरला [20]शरगणपंचानन त्या [21]कुरुकटककुंजरानीकीं. ४
धावे विकर्ण सत्वर कीं तो निष्फळ असो [22]नरायास.

१. इंद्राच्या. २. नष्ट. ३. देवाना. ४. खेदोद्गार. ५. कर्णकृपादि नऊ वीरांचे पराभव. ६. शिंक येणे हा प्रसंगानुसार शकुन किंवा अपशकुन समजतात. ७. बाण. ८. चीड, रागाव. ९. उद्धता! १०. वर्तनांत. ११. गोडी. (ग्राम्यांश). १२. तारतम्य, मर्यादा. १३. प्रशस्त भटः—चा. प्र. १४. बाणापासून झालेली. १५. त्या अर्जुनाच्या कपाळात. १६. शस्त्रात. (समररूप सागराच्या शस्त्ररूपी लाटांत). १७. अर्जुनाच्या बाणानी व्याप्त. १८. वणव्यानें व्याप्त. १९. वेलींचीं जाळीं. २०. बाणसमूहरूप सिंहः २१. कौरवसैन्यरूपी हत्तीच्या कळपांत. २२. अर्जुनाचे श्रम (प्रयत्न).' * आपले हि सामर्थ्य ठाऊक होतें तरी दुर्योधन उठला.

प्राणव्यसनीं सोडिल कैंवि, भ्राता असोन, रायास? ५
नर शर त्यावरि सोडी, वधिती तत्काळ तन्महेभा ते;[1]
प्रेमें म्हणे, 'पुजावे ज्यां धनुसह बहुत जन्म हे भाते.' ६
खळतत्सहायभंग[2] चि निजसङ्कृत हें मनांत आणून,
प्रथम विकर्ण पळविला, मग नृप, तदुरांत[3] बाण हाणून. ७
मिळतां त्रिवर्गसद्यश, सज्जन भेदील कां न नीचोर?
जो खळ सर्वस्व हरी धर्माचें जेंवि काननीं चोर ८
कुरुप म्हणे, 'बा! सूता! दे मज असुदान. हाक हाक हरी'
प्राकृत न म्हणतिल कसें, 'कां खवळविला नहाक हा करी'?
पळतां सुयोधनातें, पार्थ म्हणे, करूनि बाहुशब्द, 'अरे!
कोठें जाशिल? नाशिल तुज दहना मद्धनु:सदस्त्र अरे! १०
वृद्धांधगुरुमिथुन[11] हें[12] बहु धन्य परंतपा! परत रे! ते.
न मळो, जाला असमा ज्या शुद्धकुळीं. अपापरत रे! ते ११
केलें होतें कीं त्वां गुरुपाशीं क्षत्रधर्म मुखपाठ!
देती वृद्ध चि उष्णा कीं दहना व्हावयासि सुख पाठ? १२
कांपसि भयें? रणसमय हेमंतसमय नव्हे, तुझी आण;
मीं सत्य धनंजय,[13] परि पार्थ, नव्हे असितपथ,[14] खरें जाण. १३

१. त्या विकर्णाच्या मोठ्या हत्तीला. २. दुष्ट व [illegible] सहायक [illegible] पराभव करणें. ३. त्याच्या छातीत. ४. [illegible] कीर्ति. ५. नाचाचें [illegible] ६. घाट. ७. [illegible] ८. [illegible] ९. [illegible] अग्नीला. १०. माझें धनुष्य [illegible] ११. वृद्ध व अंध [illegible] धृतराष्ट्रगांधारींचें जोडपें. (पति अंध असल्यामुळें, आपण डोळे बांधून गांधारी [illegible] अंध झाली होती). १२. अन्वयार्थ– रे 'परंतपा ! (शत्रुतापना') परत [illegible] वृद्धांधगुरुमिथुन बहु धन्य हें. रे! ज्या शुद्धकुळा [illegible] तूं ! झाला असमा ते अपापरत (पापकर्मांत आसक्त न होणारे) कुळ [तुझ्या पलायनानें] न मळो. १३. अर्जुन (पक्षीं) अग्नि. १४. अग्नि. (अग्नीचा मार्ग–जळाल्याचा खूण काळा असतो म्हणून अग्नीला असितपथ, कृष्णवर्त्मन् अशीं नांवें आहेत).

म्हणतां, 'पुण्ययशःसुखहेतु[1] स्वर्दान' कां, 'नको, ग्रहो'?
ऐका निजमतिचें, अभिमानमळनिरुद्ध[2] कान कोरा हो! १४
स्वर्गतिकपिलादान चि घे, बहुहित हें चि तुज सुपात्रास,
असु वसु[3] चि मानले, परि याला बहु काळदस्युचा[4] ग्रास. १५
यश चि यशोभिरता[5] बहुमत, नाम चि एक जेंवि नामरता,
अपयश चि कुजन सेवी, जाणुनि ही पथ्य जेविना मरता. १६
मान विसरला कीं तो मरला? रुसला अहो! सुयोधन! हो!?
प्राणरहित हो, परि पळभरि मानरहित कधीं सुयोध न हो.
जसि कीर्ति सदा हरिस, न तसि आवडली नवी रमा नवरी,
स्वांतःपुरांत ही, जो गतकीर्ति[6], करी न वीर मान[7] वैरी." १८
इत्यादि नर वदे जें, जालें त्या कुंजरासि[8] अंकुश[9] तें,
सद्वचनें[10] दुखवे खळहृदय, जसें तप्तलोहशंकुशतें[11]. १९
परते पर पार्थावरि पदपीडितपुच्छभागतक्षकसा,[12] ०
न उगारिल गरुडसा त्यावरि तो दुष्टनाशदक्ष कसा? २०
तेव्हां नृप रक्षाया सावध होता नदीज त्यामागें,
कर्ण हि वामपार्श्वीं[13] रक्षियला, निधि[14] जसा महानागें[15]. २१
त्याच्या दक्षिणपार्श्वीं अश्वत्थामा, पुढें कृपद्रोण.
दुःशासनादि बहु खळ होते, आर्यांत[16] योजितो कोण? २२
ते लागले समस्त हि शस्त्रांहीं एकदा चि वर्षाया,

१ पुण्य, यश व सुख यांला कारण असें स्वर्गदान. (रणमरणाने मिळणारा सुखकर स्वर्गवास) २ अभिमानरूप मळाने भरलेले. ३. धन च असे. ४. काळरूप चोराचा. ५ यशोलोलुपास ६ गेली आहे कीर्ति ज्याची तो. ७. वैर मान करितें तसा, लज्जित होतो. ८. दुर्योधनरूप हत्तीला. ९ अंकुशाप्रमाणे टोचणारे. १० मूळपाठ—**खळहृदय साधुवचनें दुखवे, न सुतप्त लोहशंकुशतें.** ११. लोखंडाच्या तापलेल्या शेकडो खिळ्यांनीं. १२. पाय पडल्यामुळे दुखवले आहे शेपूट ज्याचें अशा सापाप्रमाणें. १३. डाव्या बाजूला. १४. ठेवा. १५. मोठ्या सर्पानें. १६. 'मज्जनांत (पक्षीं) कवितेत

हांसत.म्हणे धनंजय, 'या हो! या, एकदा चि वर्षा, या.' २३
जें स्वरथा हि नर शिवों एका ही आशुगा न दे, वर्षे,
शक्र म्हणे, 'कर हरिहरविजयांचें आशु गान, देवर्षे!' २४
साधु म्हणति, "हा होय द्रोणप्रियशिष्य, होय हरदास,
होय अजितसख, म्हणतिल घनें 'गुरुजी' या शरप्रकरदास."
प्रथम परास्त्रें वारी, द्रुत मग संमोहनास्त्र नर योजी,
चित्तांत म्हणे, 'गुरुजी! मनिं बाणासुरसहाय हर यो, जी!'
संमोहनास्त्र, चापप्रवर, प्रोद्दाम देवदत्तदर,
मोहिति परा, नर तसा होय, जसा वामदेव दैत्तदर. २७
पार्थ म्हणे, 'भगिनीचें स्मर उत्तर, उत्तरा! उतर, वास'
घे कर्णाचें, भ्रमले धनुच्या परिसोनि गाउत रवास. २८
डसला मोहाहि ससुत गुरुस, मग न कां सुयोधना चावे?
एक कबंध चि सक्रिय हे हर्षाया सुयोध नाचावे. २९
जा, न हसावें, न तुवां भ्यावें, घेतां हरूनि वास, कृपा,
घे मद्गुरुप्रसाद हि, नंत न लुटिति काय गा! शिवा सकृपा?
गुरुसुतसुयोधनांचीं नीळें, भरितें सदा नव सुवासें,
घ्यावीं, त्यां काय उणें? कितिकां देती न दान वसुवासें? ३१

१. बाणाला. २. लवकर. ३. नारदा! अर्जुनाला हरिहराप्रमाणे मानून त्याच्या विजयाचे गान कर, असा भावार्थ. ४. कृष्णसख ५. बाणांची वृष्टि करणाऱ्या या अर्जुनाला मेघ आपला गुरु समजतील, कारण, अर्जुनाची शरवृष्टि ही मेघवृष्टीपेक्षां हि मोठी होती. ६. लगेच. ७. मूर्छित करणारे पण हिंसा न करणारे असे एक अस्त्र. ८. बाणासुराचा सहायकर्ता. ९. धनुःश्रेष्ठ (गांडीव). १०. अति गंभीर. ११ शंकर. १२. दिली आहे भीति ज्याने असा. १३. उत्तरेचे. "दिव्यरुचिरवस्त्रातें आण करायासि बाहुल्या" इत्यादि वचन. १४ वस्त्र. १५. घोडेस्वार. १६. शब्दास. १७. मोहरूपी सर्प. १८. पुत्रासहित द्रोणाचार्यास. १९. धड. २०. चेतनायुक्त. २१. माझ्या गुरूंची कृपा. २२. नम्र. २३ अश्वत्थामा व दुर्योधन यांची. २४. भरलेली. २५. सुगंधानें. २६. द्रव्य आणि वस्त्रे.

भ्रमला नसे महात्मा, आहे याहुनि हि शांतनव सज्जो,
शिवसा पावत आला, व्हाया व्यसन प्रशांत, नवसा जो.' ३२
हरवी बाळाकरवीं त्या पांचांचीं हि कीर्तिसह वासें,
बुडती च सद्हितांच्या बहु थोरांची हि कीर्ति सहवासें. ३३
भीष्माची परमसुखा विजयिहरिजना पहात पावे धी;
मग मुरडितां चि रथ तो, इषुनीं त्यातें महातपा वेधी. ३४
पार्थ हि त्याच्या वेधी, सोडुनि शीघ्र क्षुरप्र, वोहातें,
तत्सूताचें हि धरी विजयविशिखहत उर प्रवाहातें. ३५
कुरुकटकांतूनि निघे घनघनपटलामधूनि जेंवि रवी,
हरिजनतेज न वदवे, षडरींस हि, अरि वधूनि, जें विरवी. ३६
हरिजन हरिसम सत्य, स्वरिपूस हि पार्थ सुगति दे वधुनीं,
आहे त्याची हि सदाचरणप्रभवा सुकीर्तिदेवधुनी. ३७
हे तों एक प्रभु, नरनारायण यांत भेद न गमो, जी!
यांच्या गुणापुढें न त्रिदशांचा आपणासि नग मोजी. ३८
भूप म्हणे, 'ज्या एकें केले बहु हे असे परासु भट,
तो सोडिला कसा हो!? सोडिति जीवा, न परि परा, सुभट.'
हांसोनि नदीज म्हणे, 'हा काळवरि त्वदीय शक्तिमती
कोठें गेल्या होत्या, चापलतेसह भुजा हि शक्तिमती. ४०
पार्थ बहु भला, तुमच्या तों आजि अपार्थ कापिता माना;

१. सज्जनशत्रूच्या. २. मोठें आहे तप ज्याचें असा. ३. बाण. ४. अश्वांतें. ५. त्याच्या सारथ्याचें. ६. अर्जुनाच्या बाणानें फोडलेलें. ७. विरघळवितें, नाहींसे करितें. ८. चांगल्या आचारापासून उत्पन्न झालेली. ( विष्णुपक्षीं ) 'सदा चरणप्रभवा' असा पदच्छेद. ९. चांगली कीर्ति ही च भागीरथी. १०. देवांचा वृक्ष, कल्पवृक्ष. ११. दुर्योधन. १२. शक्ति व मति. १३. बाहु. १४. शक्तियुक्त अशा.' १५. व्यर्थ. ✱ दाट अशा मेघपटलांतून.

या अभयदा, न व्हाया नरजाति[1] अपार्थका[2], पिता[3] माता. ४१
बा! न द्रवे अधार्मिक: सर्व हि ये, परि न ये नटा कविता;
अस्मद्वधार्थ[4] धृत[5] असि याकरवीं काळ हा न टाकविना. ४२
जे काय दुरभिमानी, श्रमनी जोडूनि अघ नर मदा ते.
भूपा असदुपदेशद[6], मरुपथिका[7] जेंवि अघनरमदाते[8]. ४३
जावू गोधन, योध न वेंचावे, तूं पुरासि चाल कसा
दे कर्णकृपद्रोणा रथ, मज ही आतुरासि. चालकसा. ४४
भूपाचे, उपदेशीं मग होतां गर्व शांत. न वच रणा.
वदला विहित हित म्हणुनि, नमिति मन सर्व शांतनवचरणा
परतों लागे जेव्हां कुरुबळ सोडूनि हुरुप दीनमनें.
विजय करी पाडुनि शर भीष्मद्रोणादिगुरुपदीं नमनें. ४६
मग कुरुपतिचें भेदुनि मुकुट, विखरिला धुळीत मणिगण[11] की
भीमीं[12] भक्ति, बहु दया त्या ही तज्जन्मपत्रकरगणकीं. ४७
करि कृष्णसख कुपतिची[13] कुदशा केवळ. तथापि कु[14] रुसेना
परते गरुडत्यक्ता जेसी नागी तसी च कुरुसेना. ४८
परि[15] ते प्रथम परतले, मग नगभित्तनुज[16] वीर तो परते.
नरतेज[17] किति तया, ज्या स्मरतां असुरवर युवतिसा न रते
प्रभु[18] सुरदत्तदराते[19] वाजवि, परिसोनि तद्रवा हरती

१. मनुष्यजाति २ निष्फळा ३ बाप (भयापासून रक्षण करणारास आपला बाप समजावें. मनुष्यजाति उपकार स्मरणारी आहे, म्हणून अभयदात्यास पिता व माता). ४. आमच्या वधाकरितां ५ धरलेला ६ वाईट उपदेश करणारा. ७. मारवाडांतील प्रवाशाला. ८. पाण्यावांचून इतर रस देणारा. ९ पारंगतीला. १०. जलद चालणारा. ११. रत्नसमुदाय १२. भीमावर भक्ति असल्यामुळे त्याची दुर्योधनवधाची प्रतिज्ञा खरी व्हावी म्हणून व दुर्योधनाची जन्मपत्रिका करणाऱ्या ज्योतिषावर दया असल्याने त्याचें दुर्योधनवधाचें भाकित खरें व्हावें म्हणून अर्जुनानें त्यास ठार केलें नाहीं. १३. पृथ्वीपति दुर्योधनाची, (पक्षीं) वाईट पतीची. १४. पृथ्वी. १५. शत्रु. १६. इंद्रपुत्र अर्जुन. १७. मनुष्याची शक्ति. १८. अर्जुन. १९. देवदत्तशंखाते.

मुतती भयें, विसरती त्या कुरुकटकांत भद्र[1] बाहु[2] गेला[3]. ५०
तो अभयदेश[4] जातां मत्स्यपुरा, करुनि अभयदेशपथें,
जे भग्नभीत[5]शरणागत कुरुभट त्यांसि अभय दे शपथें. ५१
हरुनि यशोधन गोधन, योध न गणित क्षयासि नेवून,
त्या नृपपुत्रासि[6] म्हणे, "चाल पुरा, हें मनीं[7] च ठेवून. ५२
यद्यपि सत्य वदावें निजगुरुपासीं[8], तथापि त्यासम[9] जो
तुज बहुमत धर्म प्रभु, तदनुमतें हे कथा पिता समजो. ५३
म्हण 'कुरुमर्दन, गोधनमोचन[10], इत्यादि कर्म हें माझें[11],'
अनृत[12] हि हित, साधूच्या रक्षी प्रेमा, तसें चि हेमा[13] जें." ५४
'साजेल कसा तुमच्या आंगींचा मज मुलास पेरावा[14]?
लज्जाफळार्थ[15] कैसा गुरुकर्णीं अनृतशब्द पेरावा? ५५
आहे प्रसादकामुक[16], आज्ञा मोडील हा कसा दास?
म्हणतां तसें म्हणेल चि, जड[17] कंदर[18] दे चि हाक सादास[19].' ५६
जयकथन करिति जावुनि नृपपुत्रप्रहित[20] दूत नगरातें,
बाळांस हि न गिळों दे वदनींचा मधुर नूतन गरा[21] तें[22]. ५७
तीं स्वायुधें शमीवरि ठेववितां राघवा वृषाकपिला[23]
स्मरुनि कपि उडे, विजयश्री ज्यासि भजे, जसी वृषा[24] कपिला[25].
मेला गगनपथें ध्वज जो निजतेजें म्हणे 'उभा' रविला,
पहिला सिंहांकध्वज[26] पार्थें त्या स्यंदनीं उभारविला. ५९

१. कल्याणकारक असे. २. घोटे. ३. जाणें. ४. अभय देणारात श्रेष्ठ. ५. पराभवानें भ्यालेले म्हणून च शरण आलेले. ६. उत्तराला. ७. गुप्त ठेवून. ८. आपल्या पित्यापाशीं. ९. त्या पित्याप्रमाणे पूज्य. १०. गाई सोडविणें. ११. माझें. १२. खोटें बोलणें. १३. सुवर्णाला. १४. पोषक. १५. लज्जारूप फल प्राप्त होईल म्हणून. १६. कृपेची इच्छा करणारा. १७. निर्जीव. १८. दरी—चा. प्र. १९. प्रतिध्वनीस. २०. उत्तरानें पाठविलेले. २१. फणसाचा गरा. २२. कथन. २३. विष्णूला. २४. बैलाला. २५. गाय. २६. सिंहचिन्हाचा ध्वज.

क्षतांकी वपुला क्षतजें[1], बसतां मर्मीं[2] अरीषु[3], न्हाल्याला,
जाला सारथि पहिल्या योषावेषासि[4] तो पुन्हा ल्याला. ६०
वैराटि रथी केला, सत्प्रेम[5] बहु श्रितीं, न बहु लेकीं,
व्रीडद[6] महत्व त्यां तें, विजयजयश्रीविवाहबहुलें[8] कीं. ६१
विजयी विराट इकडे ये, पूजिति पौर विप्रजन यातें;
येतां चि सभेंत पुसे प्रेमें त्या उत्तरा स्वतनयातें. ६२
जन कथिति, "धेनु कुरुनीं वळिल्या, येवूनि उत्तराशेला[9].
त्वत्कीर्तिनें[10] पसरिला स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला.[10] ६३
गेला कुरु जिंकाया, आहे सारथि बृहन्नडा. गमला
सत्य कुमार[11] चि, वदला 'लागो अपकीर्तिचा न डाग मला
भूप म्हणे, 'कुरु होतिल वारें, करितील आजि अभ्र[12] मुला[13].
दुःख सुदेष्णेला, जें शिरतां सिंहांत कलभ[14] अभ्रमुला[15]. ६५
अक्षत असाल ते जा, मेळविलें काल आर्य! हां! यश तें
लघु, गुरु हें घ्या, धीरां वीरांच्या सिद्ध कार्य हाय शतें.' ६६
हांसुनि धर्म म्हणे, "हो! विजयिसुतातें पहाल नयनाहीं.
आहे बृहन्नडा जरि सारथि, तरि गोधनासि भय नाहीं. ६७
सारथि बृहन्नडा जरि, उत्तर मांसें भरील तरि भूतें[16],
परिभूतें[17] होतील चि तन्मंत्रेंकरुनि[18] आजि अरिभूतें[19]. ६८
घालिल बृहन्नडा, जसि देवी[20] घाली नरामर[21] क्षमीं[22],

१. रक्ताने न्हालेल्या शरीराला. २. मर्मस्थानीं. ३. शत्रूंचे बाण ४. स्त्रीवेषाला. ५. सज्जनाचे प्रेम. ६. लाज उत्पन्न करणारें. ७ उत्तराला. ८. विजय (अर्जुन) आणि जयश्री यांच्या विवाहाचें बहुलें (तद्वत् निमित्तमात्र उत्तर). ९. उत्तर दिशेला. १०. तुझ्या (विराटाच्या) कीर्तीनें आपले रक्षण व्हावें म्हणून उत्तररूप शेला पसरिला. ११ कार्तिकस्वामी. १२. मेघ. १३. उत्तरहला. १४. हत्तीचा छावा. १५. हत्तिणीस. १६. पृथ्वीला. १७. पराभव पावलेलीं. १८. त्यांच्या मसलतीनें. १९. शत्रुरूप पिशाचें. २०. दुर्गा. २१. मनुष्य आणि देव. २२. सुखांत.

वांदी म्हणेल 'उरविन बाधा, घालीन रामरक्षे[2] मीं.[3]' ६९
ऐसें धर्म वदे, तों करिती येउनि सभेत दूत नती,
कथिती विजयकथा, जी देणारी हर्ष नित्य नूतन, ती. ७०
"देवा! कुमारें आला, सोडविल्या धेनु, पळविलीं कटकें,
'न वय प्रमाण तेजस्विजनीं[4]' म्हणती कवी, न तें लटकें." ७१
धर्म म्हणे, 'आयकिलें दूतांचें वचन चांगलें कानें,
राया! सुखरोमांचित[5] केलें कीं आजि आंग लेकानें. ७२
सारथि बृहन्नडा ज्या, तद्विजयें[6] करुत बायका नवला,
चिंतामणिगलबालक[7] जो, दुर्लभ त्यासि काय कानवला? ७३
दूतांतें सुखवुनि नृप सचिवांसि म्हणे, 'गुढ्या उभारा हो!
पुर शोभवा, पुढें जा, राजपथीं विप्रजन उभा राहो. ७४
गाजत, वाजत, साजत, आज तया जतन करुनि आणा, हो!'
मजमागें मत्स्याचा हा रिपुशशिराहुबाहु[8] राणा[9] हो.' ७५
यापरि वदोनि हर्षें, सामोरे सर्व लोक पाठउनीं,
आजि करावी अक्षक्रीडा[10] ऐसें मनांत आठउनीं, ७६
सर्वस्व[11] समर्पाया धर्मासि ब्राह्मणासि बाणकसें,[12]
नृप कृष्णेसि म्हणे, 'गे! सैरंध्रि! मदक्षपात्र[13] आण कसें.' ७७
धर्मासि म्हणे, 'हूं, या, मांडा उकलूनि रम्यतळ[14] पट, हो!'
कृष्णा हि म्हणे, 'मेल्यां अक्षकरांचें[15] समूळ तळपट हो.' ७८
'द्यूत करूं या' म्हणतां, धर्म म्हणे, "आवरूनि [16]धी राहें,

१. मन्त्रवादा, २. रामरक्षामन्त्राला. ३. नमस्कार. ४. तेजस्वी मनुष्यांत. ५. आनदाने शाहरे आलेले. ६. त्या उत्तराच्या जयाने. ७. चिंतामणि (इच्छित वस्तु देणारें रत्न) आहे गळ्यात ज्याच्या असा बालक. ८. शत्रुरूप चंद्राला राहूप्रमाणे आहे बाहु ज्याचा. ९. राजा. १०. द्यूतक्रीडा. ११. सर्व धन. १२. बाणासारखे. १३. माझा सोंगट्याचा पट. १४. सुंदर आहे तळ ज्याचा असा. १५. फांसे तयार करणाराचें. १६. बुद्धि.

व्यसनावर्तीं पाडी, न निघों दे सावरूनि धीरा हें. ७९
हें कामकोपलोभप्रमुखमहानर्थकोटिचें वेतन,
'धूत!' न म्हणे कवण कितव? धर्म हि दुःखांत पावला पतन
धर्मा नळा हि देवन दे वनवास प्रसिद्ध. उत्साहें
'हुं' न म्हणवे, विराटा निर्मील प्राणहानि कुत्सा हें. ८१
अक्षासह टाकूनि श्री, स्त्री, धी, कीर्ति ही कितव देतो,
आग्रह तरि प्रवर्तो द्यूत, नृपा! जो सखा, हित वदे तो." ८२
द्यूत प्रवर्ततां, तो भूप म्हणे, 'खेळलेसि कंका! तें?
कुरु जिंकिले कुमारें, वय तरि अद्यापि उचित अंकातें.' ८३
धर्म म्हणे, 'हे कौरव किति? सूत बृहन्नडा कुमारा ज्यां,
समरीं अमरींच्या ही तो भय देईल कुंकुमा, राज्या!' ८४
मत्स्य म्हणे, "रे! कंका! शंका सांडूनि बोलसी भलतें,
क्लीबासि मत्सुताधिक म्हणसी. हें वचन मन्मनीं सलतें. ८५
कंका! रंका! सद्योजात हि हरि भंगितो करिघटांतें,
ब्रह्मांडाधिक हि घटज, सेवुनियां सागरा, करि घटांत ८६
विप्राधमा! जरि मनीं वांचावें हें असेल, हो मूक,
न पुन्हा असें वद, सखा म्हणवुनि म्हणतो, 'न जीविता मूक'"
धर्म म्हणे, 'जिंकाया शक्त न भीष्मादिकां नेगांरातीं.
कुरुगुरुपुढें विरे परशक्ति, नृपा! होय कां न गारा ती? ८८
त्यांवरि बृहन्नडा चि प्रौढा, जसि दानवांवरि भवानी,
मावें या दोघींचें यश भूपा! आदरें हरिभवानी. ८९
कुरुगुरुसवें झगडतां त्या सुरगुरुचे हि ओंठ करपावे.

१. मकटाच्या फेऱ्यांत. २. द्यूतव्यसन. ३. मिराम. ४. हाय' हाय' ५. जुगारी. ६. अक्षक्रीडा—चा. प्र. ७. निंदा. ८. मुरू होवो. ९. माडीवर बसण्यास १०. देवस्त्रियांच्या. ११. नुक्ता च जन्मलेला. १२. सिंह. १३. गजसमुहाला. १४ अगस्ति ब्रह्मांडाधिक ही सागरा सेवुनिया घटांत करी.' १५. मुका. १६. ६६ १७. शत्रूंचें बळ. १८. गाराप्रमाणें तत्काळ विरघळणारी. १९. हरिहरांनी.

विंध्यस्कंधगशिशुचा[1] कां विधुच्या मंडळा न कर पावे?' ९०
ऐसें सत्य वदे जों, तों घाली माळ अक्षमा[2] राबा,
शिकवी युधिष्ठिराच्या भाळीं पाणिस्थ[3] अक्ष माराया. ९१
अक्षप्रहार होतां, वाहों लागे अशुद्ध[4] नाकानें,
तें स्वांजळींत[5] धरिलें, त्या शांतिक्षांतिविजितनाकानें[6]. ९२
धर्माभिप्रायज्ञा[7] कृष्णा ताटांत तें धरी रगत,
पतिहृद्गत साध्वीनें, नाडीनें जाणिजे शरीरगत[8]. ९३
तों तो उत्तर आला, द्वास्थानीं[9] त्या नृपासि जाणविला,
तेणें अत्युत्कंठित होउनि भेटावयासि आणविला. ९४
तेव्हां कंक हळू च क्षत्त्यासि[10] म्हणे, 'बृहन्नडा राहो,
पाहोनि हें, सभेंत न तत्क्षोभें रक्त नृपतिचें वाहो. ९५
रण नसतां मद्देहीं जो क्षत[11] कीं क्षतजलेश[12] काढील,
तो तत्काळ वधावा, जरि त्याला अमृत शक्र वाढील. ९६
हे सत्य तत्प्रतिज्ञा, या राज्याचें म्हणोनि हो हित, रे!
मारील विराटातें हें माजें देखतां चि लोहितें[13], रे!' ९७
क्षत्त्यानें गुंतविनां, जरि सक्षत तरि निराकुलक्षणसा[14]
राहे बाहेर प्रभु[15], परम सुलक्षण हि तो कुलक्षणसा. ९८
उत्तर पित्यासि वंदुनि, पाहे कंकासि तों सभाकोणीं[16],
तातासि पुसे, 'ऐसा केला अन्याय हा महा कोणीं?' ९९
भूप म्हणे, 'पुत्रा! म्यां केला स्वकरें चि दंड या कंका;
कीं, हा करी प्रशंसा षंढाची, न च धरी मनीं शंका.' १००

---

१. विंध्याचलाच्या शिखरावर असलेल्या मुलाचा. २. असहनशीलता. ३. हातांतील. ४. रक्त. ५. आपल्या ओंजळींत. ६. शांति व क्षमा यांनी जिंकला आहे स्वर्ग ज्याने. ७. धर्माचा हेतु जाणणारी. ८. शरीरांतील (रोग). ९. द्वारपालांनीं. १०. द्वारपालास. ११. व्रण. १२. रक्ताचा लेश. १३. रक्त. १४. अव्याकुळ आहे उत्साह ज्याचा असा. १५. अर्जुन. १६. सभेच्या कोपऱ्यांत.

उत्तर म्हणे; 'अहाहा! केला अन्याय हा, धरा पाय.
ब्रह्मक्षोभ स्वर्गापाय हि, केवळ नव्हे धरापाय.' १०१
नमुनि विराट म्हणे, 'बा कंका! चुकलों, महायशा! पावें.
न मला सख्या तुवां, या मदघां घेउनि म्हाप्वें, शापावें.' १०२
कंक म्हणे, "सोड चरण, मज 'सोसावें' असें जरि न कळतें.
गळतें रक्त महीवरि, तरि हें त्वद्राष्ट्र तत्क्षणीं जळतें." १०३
शमतां शोणितधारा, संपादी धर्मराज तो शुचिता
तों ये बृहन्नडा, मग दावी जी रीति आपणा उचिता १०४
राजा म्हणे, 'कुमारा! या वृत्तें लाज त्या कुमारा हो
निंदुनि इंदुनिभयशा क्षण मौनव्रतपरा उमा राहो. १०५
त्वां जिंकिला कसा तो अश्वत्थामा? तसा चि तो कर्ण?
तो हि द्रोण महात्मा दिव्यधनुर्वेदशंभुगोकर्ण? १०६
केला कसा कृपाचा भंग? कसा पळविला सुयोधन गा!?
कैसा भीष्मप्रमुखा स्वभुजअशनि कळविला सुयोधनगा?
उत्तर म्हणे, 'पित्या! कुरु पाहुनि, झालों भयाकुळ पळालों
सिंह प्रेक्षुनि यूथभ्रष्टकलभसा च मी बहु गळालों १०८
मरणेच्छुनिर्धना जें दाता, सोडूनि सुजळ, दे वसुतें.
जैसें यश, तैसें हें केलें मद्वदन उजळ देवसुतें. १०९
मज सारथि करुनि रथी झाला, विद्या प्रकाम रुद्रा ज्या

१ ब्राह्मणास आणलेला राग. २. स्वर्गहानिकर. ३ [illegible]
४. माझ्या पापामुळे. ५ स्वच्छपणा. ६. विजयाच्या वाटेमार्गें ७ [illegible]
८. चंद्राप्रमाणे शुभ्र अशा यशाला. ९. मकमाव [illegible] १० [illegible]
११. दिव्य असा धनुर्वेद हा च शंभु, त्याला गोकर्णक्षेत्राप्रमाणे [illegible]
असा. १२. खड्ग. १३. उत्तम योद्धे हे च पर्वत, त्यांना १४. कळपांतून चुकलेल्या
हत्तीच्या छाव्यासारखा. १५. मरू इच्छिणाऱ्या निर्धनाला. १६. द्रव्याला १७
देवपुत्राने. (अर्जुनाने सांगितल्याप्रमाणे गोप्यस्फोट होऊं नये म्हणून उत्तराने येथे
'देवसुत' या शब्दाने त्याचा उल्लेख केला आहे). १८. पुष्कळ.

डाव्या, त्या देवसुता, बहुमत तो त्र्यंबका मरुद्राज्या. ११०
दिव्यदराच्या नादें निर्मुनि त्या कुरुबळांत आर्धातें,
हरिलें होतें गोधन जें, सोडविलें पळांत आर्धीं तें. १११
आर्धी कर्ण पळविला, मग केला विरथ तो कृप हि राया!
शकला न एक ही त्या देवसुताच्या यशा नृप हिराया. ११२
अरिसेनेसि न वरतें पाहूं दे, जेंवि साधु कुलटेतें,
काय वदूं. गुरु गुरुसुत जिंकुनि भीष्मावरी हि उलटे तें? ११३
श्रीमद्भीष्मास हि तो निजशस्त्रास्त्रप्रवीणता कळवी,
पळवी सुयोधनातें, त्यासकट तदाश्रितानने मळवी. ११४
संमोहनास्त्र योजुनि सर्वांस हि देवपुत्र मग मोही,
हरिहरलीलेहूनि न्यूना लीला तुम्हांसि न गमो ही.' ११५
मत्स्य म्हणे, "तद्दर्शन तुज घडलें, तें मला चि कां नाहीं?
नेत्र बहु तळमळतो, लाभ मिळविला भला चि कानाहीं. ११६
सर्वस्वें पूजावा, तो आम्हां मायबापसा मान्य,
लोलेनें हरिला जरि तेणें हा ताप, काय सामान्य? ११७
सांग, कसें तुज दिसतें, तो मज दावील काय पाय सखा?
याहूनि उगा चि टुकळी म्हणता, 'हो पुष्टकाय, पायस खा.'"
उत्तर म्हणे, 'उद्यां की परवां भेटेल तो असें वाटे,
जळ कारुण्य हि विनतानुगत चि सोडील तें कसें वांटे?'
समजावें चि, परि न त्या यमधर्मवरें चि तत्व तें समजे,
सज्ज्ञानी सत्करणवांचुनि मतिचे न चालती गमजे. १२०
राजाज्ञेनें वस्त्रें कुरुवीरांचीं बृहन्नडा उचली,
त्या उत्तरेस चि न, तीं भेटि, बहुत सुकविमतिस ही, रुचलीं.

१ देवाचा राजा इंद्र, त्याला. २ रथहीन. ३ जाहिर्णांतें. ४. त्याच्या आश्रितांच्या मुखें ५. मूर्छित करणारें अस्त्र. ६. कमी. ७ त्या देवसुताचें दर्शन. ८. म्हणणारा. ९. लठ्ठ. १०. परमान्न, खीर. ११. दयालुत्व. १२. सखल जमिनीकडे (पक्षी) नम्र मनुष्याकडे जाणारें. १३. यशम मार्गाला. १४. यमाच्या वरानें.

करिता जाला सूतान्वयसागर[1] भीमकाय[2] हा[3] चि रिता. ६
हयपाळ[4] जो नकुल तो, गोपाळक[5] तो चि होय सहदेव,
अर्जुन बृहन्नडा मीं, भिडला ज्या चापपाणिसह[6] देवें[7]. ७
सैरंध्री हे कृष्णा, मेले कीचक इला अनादरिते,
हे किति? हरमुरज उदधि व्हावे क्षोभें इच्या[8] अनाद रिते. ८
अज्ञातवास दुर्घट परि निर्विघ्न त्वदाश्रयें घडला,
होतों सुखरूप तुझ्या गर्भांत[9], श्रम न लेश ही पडला.' ९
उत्तर हि पांडवांतें वर्णुनि, कळवी पुन्हा स्वजनकास
कीं, 'हे चि घालणार, व्यसनीं तारावया स्वजन, कास.'[10] १०
भूप म्हणे, 'त्वां अर्जुन पूजावा सर्वकाळ, भीम हि त्यां;
वा! सत्य हरिजनाच्या[11]. सोडुनियां गर्व, काळ भी महिम्या.
वत्सा! काय वदे रे!? धर्मात्मा धर्म हा असा मान्य,
त्यां ताडिला ललाटीं अक्ष, अपराध हा असामान्य. १२
सचिवांहीं, त्यां, त्वां ही प्रार्थावा धर्मराज, कन्या[12] या
द्यावी धनंजयाला, पोटीं घालावयासि अन्याया.' १३
उत्तर म्हणे, 'बहु बरें, न कळत अपराध घडति, परि साचे
साधु क्षमी यशस्कर; घन[13] हि सुभूषंत पडति परिसाचे.' १४
भेटे विराट राजा त्या पांचां पांडवांसि गुरुसा च.
व्यसनांत आश्रयप्रद, अन्नप्रद, वृद्ध, होय गुरु साच. १५
धर्मासि म्हणे, "वा! रा! सख्या! जोडा नसे चि या दिवसा!

१ कीचकांचा वंश हा च समुद्र. २. भयंकर आहे शरीर ज्याचें. ३. हा भीम च. ४ अश्वपाल. ५. गाई राखणारा. ६ चाप आहे पाणीचे (हाताचे) ठायीं ज्याच्या असा. ७. शंकर. ८. द्रौपदीच्या. (ह्या द्रौपदीच्या क्षोभानें शंकराचा मृदंग नादरहित होईल आणि समुद्र रिते होतील). ९. पोटांत. (घरांत). १०. कास घालणारे=सिद्ध होणारे. ११. ईश्वरभक्तांच्या. १२. उत्तरा. १३. परिसावर मारलेले घण सुद्धा अलंकारास कारण होतात.

स्वपदीं सच्चित्तीं ही, संपादुनि सुकृतजयदयादि. वसा. १६
तूं चि बळी स्वजनांसह तरलासि, न वायुनंदन वनौका.
वरिति सुमति सत्संगति, उतराया. वरिति मंद नव नौका
'तारुनि परासि, तरती हरिजन,' जें वर्णिलें असें कविनीं.
तें दाविलें मज तुम्हीं कुरुकुळसंततिसरोजिनीरविनीं. १८
राज्यादि सर्व दिधलें, तुज म्यां. 'हें आपुलें.' असें म्हण गा!
शशिचूड 'नको' न म्हणे धुतऱ्याचें फल वाहत्या भणगा. १९
धर्मा! धनंजयवधू होउ. म्हणो 'धन्य भाग्य मत्तनया.
देसील मान वचना तूं चि प्रभु. अन्य भाग्यमत्त न या.' २०
पाहे धर्म धनंजयवदनातें. तेधवां नर वंद तो.
तें परिसिनें म्हणाति. 'सुख याहून हरिचरणुच्या न रज देतो
'प्रेम तुझें आम्हांवरि ऐसें चि दयासुधानदा ' राहो
अभिमन्युची वधू हो. ती माझी वा! बुधा! न दारा हो २२
केंवि वरावी? वर्तत होती की एक वर्ष कन्यासी!
हरिजनकथेंत शिरतां न विशकावे शुकादि सन्यासी २३
तो साधुजना तोखद, अखिदसा होय खळजना भाचा
योग्य तुला जामाता बहिश्चर प्राण जळजनाभाचा.' २४
मत्स्य म्हणे, 'वा धर्मा! वंद्य तुजें नंदना वना शील
त्रिजगदघातें तुमचें पुण्यलताकंद नाव नाशील. २५
देवा! सौभद्रार्थ स्वीकारावी तुम्हीं च कन्या, हो!
घ्या पदरीं, हे संतति या संबंधें जगांत धन्या हो.' २६

१. मारुति. २. वनचर. ३. सज्जन लोक. ४. [भवसागर] उतरायां ५ मूढ लोक. ६. कुरुकुळाच्या संततिरूप कमलिनींना [विकसविणाऱ्या] सूर्यांनीं ७ चंद्रशेखर शंकर. ८. गरीबाला. ९. अर्जुनाची स्त्री १०. ऐश्वर्यमत्त. ११ या वचनाला. १२. [माझ्यासारख्या] परमेश्वरभक्ताच्या कथेंत. १३ कमलनाभ श्रीकृष्णाचा. १४. इंद्राच्या नंदनवनाला. १५. तिन्ही जगांतील पापाला. १६. पुण्यरूप लतेचा गड्डा.

धर्म म्हणे, 'बहु उत्तम; हें मज अश्लाघ्य काय हो! भातें?
मिळतां सुवर्णमुद्रा अर्थी इच्छील काय होनातें?' २७
धाडूनि दूत धर्में आप्ताला हा विवाह जाणविला;
अभिमन्यु, राम, कृष्ण, द्रुपद, स्वकुमारवर्ग, आणविला. २८
आणुनि संपत्ति दिल्या श्रीकृष्णें भक्तनायका सारा;
तो आटतां चि आला भेटाया मेघ काय कासारा? २९
अभिमन्युविवाहोत्सव जग निववी, जेंवि चंद्र पुनिवेचा,
धर्म म्हणे, 'हं! कनकें मणि बहु वस्त्रान्नराशिहुनि वेचा.' ३०
नटनर्तकीगणांतें धर्म म्हणे, 'रामकृष्णगानाचा
नृत्याचा रस शिवसे जाणति, जा त्यांपुढें चि, गा, नाचा.' ३१
भीम म्हणे 'वाढा हो देवि! अहो भूमिदेव! जेवा, जी!
न्यालों नका, वस्त्रा, या, न्या व्हावे जे महेभ, जे वाजी.' ३२
राम म्हणे, 'घालाव्या कुंडक्या च्यारी हि या च कानीं कीं.'
तुनि भूषवितां, भासे मूर्तकल्पवृक्ष याचकानीकीं. ३३
सहदेव, नकुळ, अर्जुन, अच्युत, बळ, भीम, धर्म नव्या ही
त्या नात्यास्मि न सिरविति, ते गर्मांत विराटबंधु, न व्याही.

१ नातेंग (या होनाप्रमाणें अधिक सन्मान आहे) २. द्रौपदीची मुलें. ३. भक्तश्रेष्ठाला ४ तुंबा, साठ्या. ५ सरोवराला ६ संग्रह करा. ७ बलराम व कृष्ण यांच्या यशोगायनाचा व नृत्याचा रस शंकराप्रमाणें जे जाणत असतील त्यांचेपुढें गाऊन गा व नाचा ८. द्रौपदी आदिकरून राजस्त्रिया हो ९. ब्राह्मण १० साठ गज ११ घोडे. १२ एक मर्दानी कर्णभूषण. (एका कानांत एक, फार तर दोन कुडक्या घालण्याची रीत असतांना एकेका कानांत चार चार कुडक्या घालावयास सांगून बळराम आपलें औदार्य व्यक्त करित आहे). १३. साक्षात् कल्पवृक्ष. १४. याचकांच्या समुदायांत. १५. त्या व्याहीपणाच्या नवीन नात्याला. * आप्तवर्गाला.

श्रोते हो! वर्णावे किति? मज 'गर्पा' अस वदाना [illegible]
स्वल्प उपश्लोक्यपुरी उत्सव. बहु होय हो! तदा नाकी ३१
वदावि मयूराकरवी श्रीराम 'विराटपर्व' [illegible] ना
स्वल्प म्हणोनि न सोडी अमृताची शांति [illegible] चव [illegible] ३२
रामघन सत्प्रसादामृत जो जो बहु वळोनि वर्षतसे
तो तो भक्तमयूर स्वार्यांकेका करोनि हर्षतसे ३३

हीत श्रीम [illegible]

[illegible]

१ अत्यन्त [illegible]

मध. ७ आपली आय [illegible]



| पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. | पृष्ठ-पंक्ति. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| २५३।१९ | कृष्ण. | ३८९।६ | मत्सुतांप्रियसखी |
| २५५।१४ | जेवील?' | ३८५।८ | पितगृहा |
| २५५।१५ | म्हणे, 'तद्रचिते | ३८६।९ | 'मावसि! |
| २६४।१५ | [१२]अगाधवळा' | ४०४।४ | [३]सुरपुरीयश |
| २७९।७ | नृपा | ४०४।७ | सुरासुरात |
| २८२।२७ | अर्जुनरूप | ४०७।१३ | 'हे |
| २९९।१७ | काय होतीच्या? | ४०७।१९ | [२२]रमान्या.' |
| २९९।२४ | ९. नाशाच्या. | ४०८।१९ | २. —( पक्षी ) मोठें उड्डाण करणारा. |
| ३१३।२ | अत्याज्य | ४१२।३ | दाखवावे |
| ३२२।१ | —नेत्रजळे. | ४१६।११ | मन वंदिते[१२] |
| ३२७।३ | [२]त्वत्प्रतिकळ | ४१६।१७ | [१६]अनादि [१६]सत्या, |
| ३२८।७ | गोळा? | ४२०।१७ | मबंध[१३] |
| ३२८।८ | गाळी. | ४२४।७ | अ-[६]मैशार्ता.' |
| ३३२।२० | करूनि | ४२४।२२ | ६. सुशाति नव्हेत असें. (तुमची आज्ञा म्हणून घेऊन येतो, असा भाव.). |
| ३३२।२७ | शुकमुनिचा | ४२९।२७ | मारण्याची |
| ३३५।७ | —कुळवृत्त्यर्थ | ४४८।२ | साक्षाच्छ्री० |
| ३४७।२ | धर्मोक्त | ४५१।२१-२२ | सहायभूत |
| ३५७।२२ | कायदुःख (?) | ४७४।१४ | अमृतफळी |
| ३५७।२१ | वि[१६]दारितेभा | ४७९।१८ | ब्रक्षाळा, |
| ३५८।१७ | [१४]पुरःस्थ० | ४७९।२० | ४. राक्षस. |
| ३६६।९ | सुगुणमणि[१२]करंडक | ४७९।२२ | १२. राक्षसांचा हितकर्ता. |
| ३६६।१० | [११]श्रेष्ठ्य प्रभु | ४८९।१९ | अमृतघने |
| ३६८।१४ | अन्यनर-माती? | ४९८।१३ | देव |
| ३६९।८ | काय, | | |
| ३६९।८ | मनातें?. | | |
| ३७४।६ | बंडवूनि | | |

